

श्री आनन्दवर्धनाचार्य विरचित

# ध्वन्यालोक

व त्यावरील श्री अभिनव गुप्तांची **लोचन टीका**




मूळ संस्कृत संहिता व तिचा विस्तृत विवेचक टीपांसह मराठी अनुवाद

संपादक

प्रा. पु. ना. वीर

प्रा. मा. वा. पट

प्रा. पु. ना वीरकर, एम्. ए., बी. टी., टी. डी. (लंडन). एम्. ए. मध्ये १ ल्या वर्गात १ ले; तीन सुवर्ण पदकांचे व एका पदव्युत्तर शिष्यवृत्तीचे मानकरी; डेक्कन एज्युकेशन सोसायटी ( पुणे ) चे आजीव सदस्य (१९४१ ते १९७२), प्रमुख, न्यू इं. स्कूल, सातारा व न्यू. इं. स्कूल टिळक रस्ता, पुणे ( २० वर्षे ); मुंबई राज्य माध्यमिक शाला प्रमुख-परिषदेचे अध्यक्ष, १९५४; ऑल इंडिया कौन्सिल फॉर सेकंडरी एज्युकेशन ( दिल्ली ) च्या उपसमितीचे सदस्य ( २ वर्षे );

भारत सरकारने १ ले पारितोषिक दिलेल्या **संस्कृत-विहार** या पुस्तकाचे लेखक; संस्कृत-विभाग-प्रमुख, विलिंग्डन कॉलेज, सांगली ( ६ वर्षे ) व फर्ग्युसन कॉलेज, पुणे (५ वर्षे); पुणे विद्यापीठ-एम. ए. ला संस्कृत साहित्यशास्त्राचे प्राध्यापक ( ६ वर्षे );

**संस्कृत कविश्रेष्ठ, सुरस नाटिका, किशोर – संगीत,** कल्पलता, **संस्कृत निबंधलेखन,** अनुवाद-मंजूषा, **कुमार-संभव सर्ग ४ चा समवृत्त पद्य अनुवाद** व इतर अनेक पुस्तकांचे लेखक; केंद्र सरकारने अनुदान दिलेल्या 'मराठी-कडून संस्कृताकडे' या शैक्षणिक विरचनेचे कल्पक; महाराष्ट्र राज्य माध्यमिक शिक्षण मंडळाच्या **संस्कृत-प्रवेशिका** व **संस्कृत-परिचय** या पुस्तकांचे एक संपादक; **सह्याद्रि, किर्लोस्कर, मनोहर महाराष्ट्र साहित्य पत्रिका प्रसाद,** नव-**भारत, Progress of Education** यांत लेख प्रसिद्ध;

सेवानिवृत्तीनंतर (१९७२) जे. जे. स्कूल ऑफ आर्ट, मुंबई येथे व्याख्याने ( ३ वर्षे ), १९७२ पासून अद्यापि अभिनव कलामहाविद्यालय येथे 'भारतीय सौंदर्यशास्त्रा' चे व टिळक विद्यापीठ, पुणे, येथे संस्कृत साहित्य शास्त्राचे सन्मान्य प्राध्यापक,

पुढील पान ३ वर

श्री आनन्दवर्धनाचार्यविरचित




# ध्वन्यालोक

व त्यावरील श्री अभिनवगुप्तांची

'लोचन' टीका

मूळ संस्कृत संहिता व त्यांचा विस्तृत विवेचनात्मक टीपांसह

मराठी अनुवाद

**प्रथम खंड**


संपादक व अनुवादक

प्रा. पु. ना. वीरकर, एम्. ए., बी. टी., टी. डी. (लंडन)

आणि

प्रा. मा. वा. पटवर्धन, एम्. ए.






महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई

# थोडेसे प्रारंभिक

संस्कृत साहित्यशास्त्राच्या विकासाचा आलेख काढावयाचा झाल्यास आपणास भरत, भामह, रुद्रट, वामन, दंडी, आनंदवर्धन, अभिनवगुप्त, महिमभट्ट, क्षेमेन्द्र, मम्मट, विश्वनाथ, पंडितराज जगन्नाथ, अप्पय्य दीक्षित इत्यादिकांचा विचार करावा लागेल. यांपैकी प्रत्येकाची साहित्यशास्त्राला एक देणगी आहे. याशिवाय ज्यांचे ग्रंथ अजून उपलब्ध नाहीत पण ज्यांचा उल्लेख अभिनवगुप्तादिकांच्या ग्रंथातून मिळतो अशा लोल्लट, शंकुक, भट्टनायक, भट्टतौत इत्यादिकांनीही साहित्यशास्त्राला साज चढविला आहे. या परंपरेचे मूळ काश्मिरी शैव मताच्या प्रत्यभिज्ञा-दर्शनात असल्यामुळे या दर्शनाच्या रूपाने जे विचारधन आज उपलब्ध आहे, ते पण मराठीत रूपांतरित व्हावयास पाहिजे. अर्थात् या आलंकारिकांपैकी सर्वच प्रत्यभिज्ञावादी होते असेही समजण्याचे कारण नाही. पंडितराज जगन्नाथ आणि अप्पय दीक्षित यांचे वेगळेच पंथ आहेत. शंकुक नैयायिक, लोल्लट मीमांसक व भट्टनायक सांख्यमताचे किंवा अद्वैत मताचे होते असाही समज आहे; पण संस्कृतातील साहित्यशास्त्र केवळ " आस्तिक " दर्शनांभोवतीच घोटाळत राहिले असेही समजण्याचे कारण नाही. हेमचंद्र, रामचंद्र, गुणचंद्र इत्यादि जैन मतानुयायांनी, तसेच बौद्ध पंडितांनीही संस्कृत साहित्यशास्त्रात मोलाची भर घातली आहे, त्यांनी केवळ भरताचीच री ओढली आहे असे दिसत नाही.

भरतमुनींनी जी साहित्य-मीमांसा केली ती नाट्याच्या अनुषंगाने. त्यांचा " रस " शब्दाचा प्रयोग आस्वाद्यवाचक आहे. " आस्वाद " वाचक दिसत नाही. त्यांची साहित्यमीमांसा खरे तर वाचिक अभिनयाच्या विचाराच्या संदर्भात येते. जे केवळ काव्याचाच विचार करतात असे भामहादि पंडित " शब्दार्थौ सहितौ काव्यम् " अशी काव्याची व्याख्या करून उपमा-उत्प्रेक्षादि अलंकारांचाच काव्याच्या संदर्भात विचार करतात. या अलंकारपरंपरेत वामन सौंदर्यसंकल्पनेचा प्रथम उपयोग करतात व खरा अलंकार सौंदर्य आहे, उपमा, उत्प्रेक्षा केवळ गौण दृष्टचा अलंकार आहेत असे सांगतात. वामन ग्राह्यतातत्त्व व आत्मतत्त्व अशा दोन कसोटचा काव्य-समीक्षेकरिता देतात. सौंदर्य हे ग्राह्यतातत्त्व व रीति हे आत्मतत्त्व. अशा रीतीने भरतांच्या नाटचशास्त्रपरंपरेबरोबरच भामहवामनांची एक स्वतंत्र काव्यशास्त्रपरंपरा पण आपल्या इतिहासात उत्पन्न होते. नाटचशास्त्रपरंपरेतील " रस " संकल्पना काव्यशास्त्राला लावण्याचा पहिला प्रयत्न रुद्रटांनी केला आणि तेव्हापासून रससंकल्पना काव्यशास्त्राला पूर्णतया चिकटली गेली. पण रससंकल्पने-शिवाय वक्रोक्ति, औचित्य इत्यादी संकल्पनांचाही काव्यशास्त्रपरंपरेत विचार

झाला. ध्वनिविचार हा याच परंपरेतील एक महत्वाचा टप्पा होय. ध्वन्यालोकामुळे ही संकल्पना मान्यता पावली आणि अभिनवगुप्तांच्या, ध्वन्यालोकावरील लोचन आणि नाटयशास्त्रावरील अभिनवभारती या टीकांमुळे रस आणि ध्वनी यांचे अद्वैत सांधले जाऊन रसध्वनि ही जोड संकल्पना पुढे आली व इतर बहुतेक संकल्पनांना गौणत्व प्राप्त झाले.

अर्थात् ध्वनि-संकल्पनेला तात्त्विक विरोधही झाला. आनंदवर्धनाची "व्यंजना वृत्ति" अनेकांनी मान्य केली नाही. महिमभट्ट हे त्यांतील सगळयांत प्रभावी. नैयायिकांनीही आपल्या "शब्द" विचारात अभिधा व लक्षणा ह्या दोनच शब्दशक्ती मानल्या आहेत. ध्वनि ही "अनुमितिरूप" असते असे त्यांपैकी काहींचे म्हणणे. नैयायिकांनी वाक्याचेही दोन प्रकारचे अर्थ सांगितले आहेत. एक अन्वय म्हणजे सरळ अर्थ, जो अभिधेपासून मिळतो व दुसरा तात्पर्य, जो वक्त्याला अभिप्रेत असतो. ध्वनिकाराच्या म्हणण्याप्रमाणे ध्वन्यर्थ म्हणजेच तात्पर्य. अनु-मिती व तात्पर्य यांची सांगड कशी घालावयाची हा आणखी एक प्रश्न येथे उत्पन्न होईल. कारण अनुमितीकरिता (प्रतिज्ञा)-हेतु-दृष्टांत-उपनयादि अवयवांची गरज लागणार, उलट तात्पर्याकरिता तशी गरज लागू नये. नैयायिकांच्या मता-प्रमाणे पदांचे दोन अर्थ-वाच्यार्थ (अभिधा) व लक्ष्यार्थ (लक्षणा) व वाक्याचे दोन अर्थ-अन्वय व तात्पर्य. "शब्द" हा पारिभाषिक शब्द; शब्द (word) व वाक्य (Sentence) या दोन्ही अर्थांनी वापरला गेल्यामुळे, काही गोंधळामुळे तर शब्दांच्या तीन शक्तींची—अभिधा, लक्षणा व व्यंजना यांची—निर्मिती झाली नाही ना असाही प्रश्न येथे उत्पन्न व्हावा. कारण अभिधा हा शब्द शब्द व वाक्य अशा दोन्ही संदर्भात वापरण्यात आला आहे. खास ध्वन्यालोकातच दुसऱ्या श्लोकात वाच्य आणि प्रतीयमान असे अर्थाचे दोन भेद आहेत असे सांगितले आहे. त्यातील द्विवचन व "उभौ" हा शब्दप्रयोग, यावर अधिक विचार व्हावयास पाहिजे. "आलोकातही" "वाच्य: प्रतीयमानश्चेति द्वौ भेदौ" असे म्हटले आहे. पण नंतर विवरण करताना दोनऐवजी तीन अर्थांचा ऊहापोह आहे हे मला महत्त्वाचे वाटते. कुठेतरी काहीतरी प्रक्षिप्त असावे असा भास निश्चितच होतो. पूर्वी कारिका करणारा ध्वनिकार व आलोक लिहिणारा आनंदवर्धन हे दोन आहेत असेही मत होतेच. तेव्हा अर्थ तीन प्रकारचा असला तरीही दोन प्रकारच्या अर्थाचे तीन प्रकारात कधी रूपांतर झाले याचाही साधक-बाधक विचार व्हावयास पाहिजे.

पण हे सर्व करावयाचे म्हणजे संस्कृतातील हे विचारधन प्रथम सामान्य लोकांपर्यंत पोचले पाहिजे. प्रा. पु. ना. वीरकर व प्रा. मा. वा. पटवर्धन यांचा हा ग्रंथ या दृष्टीने पुढचे पाऊल टाकणारा असल्यामुळे असा ग्रंथ लिहून साहित्य संस्कृती मंडळास उपकृत केल्याबद्दल लेखकद्वयांचे आभार मानावयास पाहिजेत. असे ग्रंथ मराठीत आले तर साहित्यशास्त्राची अधिक मूलग्राही चर्चा, चर्वणा

मराठीत होऊ शकेल.

या ग्रंथाचे हस्तलिखित मंडळाकडे येऊन फार काळ लोटला. मुद्रणाच्या कामात अनेक अडचणी आल्या. त्यांवर मात करून या ग्रंथाचा हा प्रथम खंड आता अभिनवगुप्तांच्या लोचन टीकेसह प्रसिद्ध होत आहे. हा बहुमोल ग्रंथ प्रसिद्ध करण्यास मंडळास आनंद होत आहे हे अर्थात् सांगावयास नकोच.

यशोधन,
मुंबई–४०००२०,
दि. २६–१–१९८३

सुरेंद्र बारलिंगे,
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ.

# संपादकांचे हृद्गत

आनंदवर्धनाचार्यांच्या ध्वन्यालोक या ग्रंथाला साहित्यशास्त्रीय संस्कृत ग्रंथांच्या मालिकेत कोणते स्थान आहे याचे उपोद्घातात स्पष्टपणे व विस्तृतपणे विवरण केले आहे. इतक्या मोलाचा मानला जाणारा हा ग्रंथ; पण त्याचा संपूर्णपणे व यथार्थ आशय मराठीमध्ये याच्या कितीतरी आधी यावयास पाहिजे होता. नवव्या शतकाच्या उत्तरार्धात मूळ संस्कृत ग्रंथ लिहिला गेला. सुमारे ७५ वर्षांनी त्याचे सांगोपांग विवेचन करणारी लोचननामक टीका लिहिली गेली. त्यानंतर नऊशे वर्षांनी म्हणजे १९ व्या शतकाच्या अखेरीस तो निर्णयसागर छापखान्यामध्ये प्रथम छापला गेला. १९०२-१९०३ मध्ये डॉ. याकोबी या जर्मन पंडिताने त्याचे जर्मन भाषांतर केले. १९४० मध्ये काशी संस्कृत सीरीज ग्रंथमालेतर्फे मूळ संस्कृत ग्रंथ अभिनवगुप्तांच्या संपूर्ण लोचन-टीकेसह पुष्कळच सुधारलेल्या स्वरूपात छापला गेला.

पण हा ग्रंथ या वेळेपर्यंत मराठीत अवतरला नाही. १९२५ साली महाराष्ट्र शारदामंदिराने प्रसिद्ध केलेल्या 'काव्यचर्चा' या साहित्यविषयक लेखसंग्रहामध्ये 'ध्वनिकाव्य' या नावाचा, व्यंग्य अर्थाची तोंडओळख करून देणारा एक अगदी छोटा लेख प्रा. लक्ष्मण गणेशशास्त्री लेले यांनी लिहिला होता. त्यात ध्वनीसंबंधी केलेली एक-दोन विधाने काहीशी शिथिलपणाने केलेली वाटली, म्हणून आम्हांपैकी प्रा. वीरकरांनी 'ध्वनिमीमांसा' या शीर्षकाखाली एक प्राथमिक स्वरूपाचा लेख लिहिला. तो डिसेंबर १९३९ च्या 'सह्याद्री'च्या अंकात प्रसिद्ध झाला. त्या लेखात काही मुद्दे स्पष्ट करण्यासाठी प्रा. वीरकरांनी मराठी कवींच्या कवितांतील उदाहरणे दिली होती.

पण हा लेखही लहानसाच होता. आणखी सात आठ वर्षांनी, त्या वेळी 'महाराष्ट्र साहित्यपत्रिका' या त्रैमासिकाचे संपादक असलेले 'महाराष्ट्रकवि यशवंत' यांनी प्रा. वीरकरांना विनंती केल्यावरून 'आनंदवर्धनाचा ध्वन्यालोक' या शीर्षकाखाली त्यांनी चार लेखांक लिहिले. ते महाराष्ट्र साहित्यपत्रिकेच्या जुलै १९४७ ते सप्टेंबर १९४८ पर्यंतच्या चार अंकांतून प्रसिद्ध झाले. हे लेखही सारांशात्मक, एकूण ग्रंथातील काही भागच संक्षेपाने सांगणारे होते.

आम्ही दोघांनीही 'ध्वन्यालोक' हा ग्रंथ संस्कृत साहित्यशास्त्र हा विषय घेऊन एम्. ए. ला बसू इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना पुणे विद्यापीठातर्फे काही वर्षे हौसेने शिकविला होता. १९७४ मध्ये 'साहित्य आणि नाट्य : काही समस्या' या नावाने प्रसिद्ध झालेल्या डॉ. रा. शं वाळिंबे गौरव ग्रंथात प्रा. वीरकरांनी 'आनंदवर्धनांचा रसपर्यवसायी ध्वनिसिद्धांत' हा व प्रा. पटवर्धनांनी 'करुणरसाचा आस्वाद' हा, असे लेख लिहिले.

१९६८ ते १९७० या कालावधीत प्रा. पटवर्धन यांनी जे. एल्. मॅसन या अमेरिकन पंडिताच्या सहकार्याने ध्वन्यालोकाचे व लोचनाचे इंग्रजी भाषांतर लिहिले. ते आता प्रकाशनाच्या वाटेवर आहे.

१९७८च्या ऑक्टोबरमध्ये आम्ही दोघांनी ध्वन्यालोकाच्या पूर्वार्धाचा म्हणजे पहिल्या दोन उद्योतांचा मराठी अनुवाद लिहून पुरा केला. जरूर तेथे अभिनवगुप्तांच्या 'लोचना'च्या त्या त्या भागाचा सारांश दिला व टीपाही लिहिल्या. तो प्रा. वीरकरांनी ऑक्टोबरच्या अखेरीस प्रकाशित केला. मूळ संस्कृत संहिता बाजारात उपलब्ध असल्याने ती त्या पुस्तकात दिली नव्हती. त्याला महामहोपाध्याय डॉ. वा. वि. मिराशी यांनी व पंडित आळाचार्य खुपेरकर यांनी 'पुरस्कार' लिहिले होते. त्यातली काही वाक्ये या ग्रंथाच्या वेष्टनाच्या ४थ्या पृष्ठावर उद्धृत केली आहेत.

मग तो पूर्वार्ध आम्ही महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति मंडळाकडे पाठविला व त्याचा उत्तरार्ध प्रकाशित करण्याकरिता मंडळाने साहाय्य करावे किंवा समग्र ग्रंथ मंडळाने स्वतः प्रकाशित करावा अशी विनंती केली. त्यावर मंडळाने ध्वन्यालोक व लोचन यांची मूळ संस्कृत संहिता व दोहोंचाही संपूर्ण मराठी अनुवाद प्रकाशित करावयाची आपली तयारी दर्शविली. त्यांच्या सामर्थ्यानुसार आम्ही दोघांनी संपूर्ण ध्वन्यालोकाचा व समग्र लोचनाचा मराठी अनुवाद लिहून पुरा केला. त्यावर विवरणात्मक व विवेचनात्मक विपुल टीपाही लिहिल्या व सर्व लिखाण जून १९७८ मध्ये मंडळाकडे पाठविले. त्यापैकी सुमारे ६०० पृष्ठांचा पूर्वार्ध, उपोद्घात व चार सूच्यांसह मंडळाच्या वतीने आता प्रकाशित होत आहे, याबद्दल महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति मंडळाचे आम्ही कृतज्ञ आहोत. उत्तरार्धही संपूर्णपणे लिहून आम्ही मंडळास १९७८ मध्येच सादर केला आहे. तोही मंडळ आता लवकरच छापावयास घेणार आहे.

महाराष्ट्रातील विद्यापीठांतून संस्कृत साहित्यशास्त्र घेऊन एम्. ए. होऊ इच्छिणाऱ्या, तसेच बी. ए.ला व एम्. ए.ला मराठी साहित्यशास्त्र घेऊन बसणाऱ्या विद्यार्थ्यांच्याही निकडीच्या गरजेच्या दृष्टीने मंडळ तो उत्तरार्धही लवकरात लवकर छापून प्रसिद्ध करील असा आमचा दृढ विश्वास आहे.

आमचे निकटचे स्नेही डॉ. वा. म. कुलकर्णी, भूतपूर्व संचालक, भाषा संचालनालय, मुंबई यांनी आमचा हा समग्र ग्रंथ आपुलकीने व सूक्ष्म दृष्टीने वाचून काही मार्मिक आणि मौलिक सूचना केल्या याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत. हा मराठी ग्रंथ मराठी रसिकांच्या आनंदाचे वर्धन करो हीच प्रभुचरणी प्रार्थना.

देवदीपावली,<br>शके १९०४,<br>१६ डिसेंबर १९८२

पु. ना. वीरकर<br>मा. वा. पटवर्धन

# विषयानुक्रम

(येथे दिलेल्या विषयांशिवाय इतर सर्व विषय सूचीमध्ये पाहावे.)

उपोद्घात :

आनंदवर्धनांचा ध्वन्यालोक—काव्यशास्त्रावरील संस्कृत ग्रंथांत अग्रगण्य, आनंदवर्धनांचा जीवनकाल; आनंदवर्धनांची ग्रंथसंपदा; ध्वन्यालोककारिकावरील वृत्ति आनंदवर्धनांचीच, पण कारिकाही त्यांनीच लिहिल्या की अन्य कोणी? कारिकांचा कर्ता भिन्न मानिला, तरी त्याचे नाव 'सहृदय' नव्हे; आनंदवर्धनांनी साहित्यशास्त्रात जी नवीन मौलिक भर घातली, ती अशी—१. ध्वनिकाव्यात व्यंग्यार्थ मुख्य, २. रसादिध्वनि व रसवदलंकार यांचे स्वरूप निश्चित करणे, ३. काव्याची ध्वनि, गुणीभूतव्यंग्य व चित्र अशी प्रतवारी, ४. व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाहून भिन्न याची सप्रमाण सिद्धता, ५. वस्तु, अलंकार व रसादि असे व्यंग्यार्थाचे वर्गीकरण, ६. सुंदर व्यंग्यार्थामुळेच काव्याला श्रेष्ठत्व प्राप्त होते, ७. वस्तु, अलंकार व रसादि या तीन प्रकारांत रसादि-प्रकार सर्वश्रेष्ठ होय, ८. मुख्यतया अभिव्यक्त होणारा रसादि आशय हाच काव्याचा आत्मा, ९. गुणांचा रसांशी संबंध प्रथम ध्वन्यालोकानेच जोडला, १०. गुण हे रसांचे धर्म असे सांगितल्याने गुणांचे महत्त्व अलंकारांपेक्षा कितीतरी अधिक, हे स्पष्ट झाले, ११. रसादींची निष्पत्ति करण्यावरच कवीचे लक्ष केंद्रित झाले असताना जो आपोआप निष्पन्न होईल, तोच खरा अलंकार, १२. अलंकारांचा वापर रसपरिपोषासाठी कसा करावा? १३. देवतादिकांच्या प्रणयक्रीडेचे उत्तान वर्णन करणे अनुचित, १४. काव्यदोषांचे दोषत्व रसाच्या दृष्टीनेच, १५. श्लेष अलंकारही प्रामुख्याने सूचित होऊ शकतो, १६. प्रबंध-रसाचा परिपोष करिताना पाळावयाची पथ्ये व टाळावयाची कुपथ्ये, १७. संघटनांचा संबंध रसाशीच, १८. शान्त रसाला नाट्यात स्थान, १९. काव्याकडे पाहण्याचे शास्त्रनय व काव्यनय हे दोन दृष्टिकोन, २०. सदाचारोपदेश हेच काव्याचे अंतिम उद्दिष्ट व प्रीति (= आनंद) हे त्या अंतिम उद्दिष्टाचे मुख्य साधन, २१. रसदोषांचा सविस्तर विचार प्रथम ध्वन्यालोकातच, २२. औचित्य —अत्यंत महत्त्वाचे तत्त्व— त्याची विस्ताराने चर्चा प्रथम ध्वन्यालोकातच, २३. औचित्य हे रसाविषयीच असते, २४. काव्यामधील विषय पूर्वकवींनी हाताळला असला, तरी व्यंजनेच्या स्पर्शाने त्याला अपूर्वता प्राप्त होते, २५. निरनिराळ्या काव्यांत आढळणारे साम्य-त्यातले त्याज्य कोणते व स्वागतार्ह कोणते याची चर्चा. २६. ध्वन्यालोकपूर्व शास्त्रकारांनी काव्यशास्त्रांतील कित्येक संकल्पनांपैकी काहींनाच विशेष महत्त्व दिले. त्या सर्व संकल्पनांचे स्वरूप स्पष्ट करून, त्या सर्वांना एका व्यापक

आकृतिबंधात' बसवून त्यांचा समन्वय करण्याचा पहिला मान ध्वन्यालोकालाच, २७. ध्वन्यालोक हा मुख्यतः साहित्यशास्त्रीय ग्रंथ. पण त्यात 'सौंदर्य-शास्त्रा'ला उपकारक अशी कैक तत्त्वे आढळतात. २८. उत्तरकालीन बहुतेक साहित्यशास्त्रकारांनी ध्वन्यालोकात मांडलेले निकष शिरसावंद्य मानले आहेत.

अभिनवगुप्तांचा जीवनकाल–त्यांची रसास्वादप्रक्रिया ही त्यांनी साहित्यशास्त्रात घातलेली सर्वात मोठी भर—भट्टनायकाच्या प्रक्रियेत त्यांनी केलेल्या मोलाच्या सुधारणा, अभिनवांनी केलेले सहृदयाचे लक्षण, प्रतिभेची व्याख्या, 'काव्य' शब्दाची व्युत्पत्ति, सदाचारोपदेश व आनंद या काव्यप्रयोजनांविषयी अभिनवांचे मत, 'रस' हाच काव्याचा आत्मा असा त्यांचा शब्दप्रयोग—अभिनवगुप्तांची ग्रंथसंपदा, त्यांनी दिलेले कित्येक समर्पक दृष्टांत उत्तरकालीनांनी जसेच्या तसेच वापरले—अभिनवांच्या अलौकिक रसिकतेचे काही नमुने.

## ग्रंथातील विषयांचा अनुक्रम


| विषय | पृष्ठ |
|---|---|
| उद्द्योत १– | |
| अभिनवगुप्तकृत 'लोचना'चे मंगलाचरण | १ |
| अभिनवगुप्ताचे एक गुरु भट्टेन्दुराज यांचा उल्लेख | १ |
| आनंदवर्धनकृत ध्वन्यालोक-वृत्तीचे मंगलाचरण | ३ |
| ध्वनीबद्दलच्या आनंदवर्धनकालीन मतभेदांचा निर्देश | १० |
| प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याचे प्रयोजन | १० व ५२ |
| 'ध्वनीचा अभाव आहे' असे म्हणणारांचे तीन पक्ष | १५ |
| अभाववाद्यांच्या तीन पक्षांच्या म्हणण्याचा लोचनात दिलेला सारांश | १६ |
| अभाववाद्यांचा पहिला वर्ग | २१ |
| अभाववाद्यांचा दुसरा वर्ग | ३० |
| अभाववाद्यांचा तिसरा वर्ग | ३४ |
| लोचनात तीन प्रकारांनी सांगितलेली 'वाक्' शब्दाची व्युत्पत्ति | ३६ |
| ध्वनीला लाक्षणिक मानणारे ( भक्तिवादी ) | ४० |
| 'गुणवृत्ति' शब्दाचे अभिनवगुप्तांनी सांगितलेले चार अर्थ | ४३ |
| लक्षणा | ४४ |
| रूढिलक्षणा | ४४ |
| प्रयोजनवती लक्षणा | ४५ |
| ध्वनीचे स्वरूप सांगता येत नाही असे म्हणणारे ( अवर्णनीयतावादी ) | ५० |

| विषय | पृष्ठ |
|---|---|
| या ग्रंथाचे चार अनुबंध | ५१ |
| काव्याचे मुख्य प्रयोजन 'आनंद' | ५२ |
| 'सहृदया'चे (रसिकाचे) अभिनवगुप्तांनी केलेले लक्षण | ५३ |
| काव्यातील अर्थाचे दोन प्रकार -- वाच्य आणि प्रतीयमान | ६१ |
| ध्वन्यालोक–कारिका २ वरील 'साहित्यदर्पण' काराच्या आक्षेपाचे खंडन (टीप १ पाहा) | ६४ |
| ध्वनि हा गुण किंवा अलंकारही नाही | ६८ |
| महाकवींच्या वाणीत 'प्रतीयमान' नावाचा वेगळाच अर्थ असतो | ७१ |
| 'लावण्य' हे अलंकार किंवा अवयव यांहून निराळे | ७२ |
| प्रतीयमानाचा 'वस्तु' हा प्रकार वाच्य अर्थाहून वेगळा, कारण (१) स्वरूपभेद | ७५ |
| प्रतीयमानाचे प्रकार | ८२ |
| 'रस' प्रकार स्वप्नातही 'वाच्य' नसतो | ८२ |
| 'भ्रम धार्मिक' या उदाहरणात 'विपरीतलक्षणा' नाही | ८५ |
| 'प्रयोजनवती' लक्षणेत चार व्यापार | ८७ |
| व्यंजनाव्यापार इतर व्यापारांहून वेगळा | ८९ |
| अन्विताभिधानवाद | ९१ |
| दीर्घ अभिधावाद्यांचे मत व त्याचे खंडन | ९१ |
| प्रतीयमानाचा वस्तु प्रकार वाच्यार्थाहून भिन्न, कारण (२) विषयभेद | ११७ |
| रसादिस्वरूपाचा अर्थ केव्हाही 'वाच्य' असत नाही | १२२ |
| प्रतीयमान अर्थच काव्याचा आत्मा होय | १३४ |
| प्रतीयमान अर्थाच्या प्रकारांत 'रसादि' प्रकार मुख्य होय | १३४ |
| 'हे पारध्या' यातील शोक हा मुनीचा शोक नव्हे | १३८ |
| पारध्याने क्रौञ्चपक्ष्यांच्या जोडप्यापैकी नर मारला की मादी ? (टीप ४) | १४१ |
| रसादि प्रतीयमान अर्थ हेच दिव्य प्रतिभेचे गमक | १४६ |
| 'प्रतिभा' शब्दाचा अर्थ | १४८ |
| प्रतीयमान अर्थाचे अस्तित्व सिद्ध करणारे आणखी एक कारण | १५० |
| काव्यात व्यङ्ग्य अर्थच प्रधान, आणि तो अर्थ योग्य प्रकारे काव्यातून प्रकट करण्यामुळेच 'महाकवी' ला महाकवित्व प्राप्त होते | १५३ |
| वाच्यार्थ हे व्यंग्यार्थप्रकटीकरणाचे साधन | १६० |
| आकांक्षा, योग्यता आणि संनिधि | १६३ |
| 'ध्वनिकाव्या'चे लक्षण | १६६ |
| अभाववाद्यांच्या दुसऱ्या वर्गाच्या मताचे खंडन | १६७ |

| विषय | पृष्ठ |
| --- | --- |
| अभाववाद्यांच्या तिसऱ्या वर्गाच्या मताचे खंडन | १६७ |
| (व्यंग्यार्थप्रधान काव्यातील) व्यंजक शब्द, व्यंग्य अर्थ, व्यंजना-व्यापार, व्यंजक वाच्यार्थ हे चारही ' ध्वनि 'च, पण या सर्वांच्या समुदायाला ' ध्वनिकाव्य ' म्हणावे | १७१ |
| व्यंग्यार्थयुक्त अलंकारांमध्ये ' ध्वनी 'चा अंतर्भाव नाही | १७५ |
| समासोक्ति म्हणजे ' ध्वनि ' नव्हे | १७५ |
| आक्षेप म्हणजे ' ध्वनि ' नव्हे | १८३ |
| अनुक्तनिमित्ता विशेषोक्ति म्हणजे ' ध्वनि ' नव्हे | १९३ |
| पर्यायोक्त आणि ध्वनि | १९८ |
| संकरालंकार आणि ध्वनि | २०७ |
| अप्रस्तुतप्रशंसा आणि ध्वनि | २०७ |
| सारांश, व्यंग्यार्थयुक्त अलंकार वेगळे आणि ' ध्वनि ' वेगळा | २०८ |
| ध्वनि या संज्ञेला परंपरा आहे | २३९ |
| वैयाकरणांचा ध्वनि (टीप ३ री पाहा) | २३९ |
| स्फोट–सिद्धांत | २४० |
| अनुरणनरूप व्यंग्यार्थ | २४१ |
| ध्वनिकाव्य व काव्यातील ' ध्वनि ' | २४२ |
| ध्वनीचे दोन प्रकार | २४४ |
| ध्वनि आणि लक्षणा एकच नव्हेत | २५४ |
| लक्षणा हे ध्वनीचे ' लक्षण ' नाही | २५७ |
| कोणत्या शब्दांना ' ध्वनिकाव्य ' म्हणावे ? | २६५ |
| ध्वनीच्या ' असंलक्ष्यक्रम ' प्रकारात लक्षणा मुळीच नाही | २७७ |
| रसप्रतीतीचे स्वरूप अलौकिक असते | २८४ |
| रसास्वाद व ब्रह्मास्वाद | २९६ |
| लक्षणा हे ध्वनीच्या एखाद्या प्रकाराचे निदर्शक चिह्न असू शकेल | २९७ |
| ध्वनीचे स्वरूप ' अवर्णनीय ' आहे या मताचे खंडन | ३०० |
| उद्द्योत २. | |
| ' अविवक्षितवाच्य ' ध्वनीचे दोन उपप्रकार– | ३०६ |
| (१) ' अर्थान्तरसंक्रमितवाच्य ' हा प्रकार | ३११ |
| (२) ' अत्यन्ततिरस्कृतवाच्य ' हा प्रकार | ३२२ |
| ' विवक्षितान्यपरवाच्य ' ध्वनीचे दोन प्रकार– | ३२७ |
| (१) ' असंलक्ष्यक्रम ' हा प्रकार | ३२९ |
| भावध्वनि | ३३० |

| विषय | पृष्ठ |
| --- | --- |
| भावोदय, भावप्रशम, भावसंधि व भावशबल | ३३५ |
| रसादिरूप अर्थ ज्यात प्रधान, तीच असंलक्ष्यक्रम ध्वनींची उदाहरणे | ३३८ |
| रसादिध्वनि व रसवदलंकार हे वेगळे होत. | ३४३ |
| रसास्वादाच्या प्रक्रियेसंबंधी मते (१) भट्टनायकाचा ' भुक्तिवाद ' | |
| साधारणीकरण | ३४४ |
| लोल्लटाचा उत्पत्तिवाद | ३४५ |
| श्रीशंकुकाचा अनुमितिवाद | ३४५ |
| अभिनवगुप्ताचा अभिव्यक्तिवाद | ३४६ |
| रसप्रक्रियेविषयी इतर काही मते (टीपा ३६ ते ४४) | ३६२ |
| रसादि अलंकार | ३६९ |
| रसादि अलंकारांचे दोन प्रकार १) शुद्ध | ३७३ |
| २) संकीर्ण | ३७७ |
| वस्तुतः रसध्वनि हाच आत्मा व अलंकार्य | ३८० |
| रसादि अलंकाराचे स्वरूप निश्चित करण्याचा पहिला मान कारिकाकार व आनंदवर्धन यांना ( टीप ३ री ) | ३८६ |
| रसवदलंकाराबाबत पूर्वपक्षाचे खंडन | ३८८ |
| गुण व अलंकार यांतील भेद | ३९७ |
| ' माधुर्य ' गुण | ३९९ |
| ' ओजस् ' गुण | ४०५ |
| ' प्रसाद ' गुण | ४१३ |
| श्रुतिदुष्टादि अनित्य दोष शृंगार व तत्सम रस-ध्वनीमध्येच वर्ज्य | ४१६ |
| रसादिध्वनीचे प्रकार असंख्य | ४२० |
| शृंगाररस मुख्य असता त्याच त्या व्यंजनांचा अनुप्रास टाळावा | ४२६ |
| शृंगारध्वनीत यमकादि अलंकार कटाक्षाने वर्ज्य करावे | ४२७ |
| ध्वनिकाव्यात खराखुरा अलंकार कोणता ? | ४२९ |
| शृंगारध्वनीत रूपकादि अलंकार घालताना दक्षता घ्यावयास हवी | ४३७ |
| ती दक्षता म्हणजे १) अलंकार रसादींचे अंगच राहिला पाहिजे, | ४३९ |
| तो अलंकारच ' अंगी ' म्हणजे मुख्य होता कामा नये | ४४२ |
| २) अलंकाराची योग्य वेळ येईल तेव्हाच तो वापरावा | ४४४ |
| ३) चालू अलंकाराचा, योग्य वेळ येताच त्यागही करायला हवा | ४४८ |
| ४) रसपरिपोषाला विघ्न करणारा अलंकारांचा अतिविस्तार टाळावा | ४५८ |
| ५) अलंकाराचा विकास करावा लागला तरी तो अंगच राहावा | ४६० |

| विषय | पृष्ठ |
|---|---|
| , विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीचा २ रा प्रकार जो संलक्ष्यक्रम म्हणजे ' अनुरणनरूप ' ध्वनि, त्याचे दोन उपप्रकार | ४६४ |
| ' वस्तुध्वनि ' शब्दशक्तिमूल नसतो. दोन्ही अर्थ वस्तुरूप असल्यास तो ' श्लेष ' अलंकारच, ध्वनि नव्हे | ४६६ |
| सुचविलेल्या अलंकाराची एका शब्दानेही ' वाच्यता ' नको | ४७७ |
| शब्दशक्तिमूल अलंकारध्वनीची उदाहरणे | ४८२ |
| श्लेषमूलक ( शब्दशक्तिमूल ) ध्वनीसंबंधी पाच मते | ४८३ |
| अर्थशक्तिमूल ध्वनि | ४९६ |
| काही उदाहरणांत प्रथम ' संलक्ष्यक्रम ' ध्वनि व मग त्याचे असंलक्ष्यक्रम ध्वनीत पर्यवसान | ४९६ |
| व्यंग्यार्थही वाच्य करून टाकल्याची उदाहरणे | ५०४ |
| उभयशक्तिमूल ध्वनीचे उदाहरण. अर्थशक्तिमूल ' अनुरणनरूप ' ध्वनीचे दोन प्रकार | ५११ |
| अलंकारध्वनीत व्यंग्य अलंकारच मुख्य हवा | ५२४ |
| अलंकारध्वनीची उदाहरणे | ५२५ |
| अलंकार सूचित केल्यास काव्याचे सौंदर्य वाढते | ५६९ |
| वाच्य वस्तूच्या द्वारा अलंकार सूचित झाल्यास तो ' ध्वनिच ' | ५७२ |
| वाच्यही अलंकार व व्यंग्यही अलंकार असल्यास व्यंग्य अलंकार जर प्रधान तरच ध्वनि | ५७३ |
| ध्वनीला व्यंग्यार्थ अस्पष्ट किंवा वाच्याचे अंग असणे नको | ५७५ |
| प्रतिभेच्या अभावी लक्षणेचा उपयोग म्हणजे ध्वनि नव्हे | ५८६ |

# काही विशेष नोंदी

( कसोशीने प्रयत्न करूनही ज्या चुका राहिल्या, त्या शुद्धिपत्रात दाखविल्या आहेत. या पृष्ठावर काही विशेष बाबी नजरेस आणिल्या आहेत. )

पृष्ठ २१०, शेवटी प्राकृत गाथा आहे. लोचनाने तिची संस्कृत छाया दिलेली नाही. ती अशी आहे —

**भवति न गुणानुरागः खलानां केवलं प्रसिद्धिशरणानाम् ।**
**किल प्रस्नौति शशिमणिः चन्द्रे न प्रियामुखे दृष्टे ॥**

पृष्ठ २१२, ओळ १४. लोचनाने संस्कृत छाया दिलेली नाही. ती अशी —

**स्वर्गमपारिजातं कौस्तुभलक्ष्मीरहितं मधुमथनस्योरः ।**
**स्मरामि मथनात्पुरतः अमुग्धचन्द्रं च हरजटाप्राग्भारम् ॥**

पृष्ठ ३७३, ओळ २८ नंतर वृत्तीची पुढील वाक्ये गळली आहेत :—

**इत्यत्र करुणरसस्य शुद्धस्याङ्गभावात्स्पष्टमेव रसवदलङ्कारत्वम् ।**
**एवमेवंविधे विषये रसान्तराणां स्पष्ट एवाङ्गभावः ।**

पृष्ठ ३७७. ६ व्या टीपेनंतर ७ वी टीप गळली आहे. ती अशी :—

७. विभावादि हे रसप्रतीतीचे ' उपाय ' असल्याने ते ' अलंकार्य ' होण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाही. विभावादि हेच अलंकार्य असले पाहिजेत ही भूमिका आम्हांला मान्य नाही, असे अभिनवगुप्तांचे म्हणणे.

पृष्ठ ४१९. टीप ११ नंतर टीप १२ गळली आहे, ती अशी :–

१२. लोचनाच्या प्रतीमध्ये **नापि गुणेभ्यो व्यतिरिक्तत्वं दर्शितम् ।** असा पाठ आहे. श्रुतिदुष्टादि दोष हे इतर म्हणजे नित्यवृत्तादि दोषांपासून वेगळे आहेत हे पूर्वाचार्यांनी स्पष्टपणे सांगितले नाही किंवा ते गुणांहूनही वेगळे आहेत हेही त्यांनी स्पष्टपणे म्हटले नाही. ' काही परिस्थितीत शोभूनही दिसतात ' असे म्हणून त्यांचे ठिकाणी काही वेळा गुणरूपत्व असते असे त्यांनी केवळ सुचविले आहे. आनंदवर्धनांनी श्रुतिदुष्टादींना ' अनित्य ' हे विशेषण लावल्याने ते काही वेळा दोष आणि काही वेळा गुण असतात हे स्पष्ट झाले.

पृष्ठ ५१३. लोचनम्च्या शेवटी असलेले **न केवलमिति... भावः ।** हे वाक्य येथे नको. ते पृ. ५१६ च्या तळाशी आहेच.

# उपोद्घात

## १. आनंदवर्धन – युगप्रवर्तक साहित्यशास्त्रकार

भरतमुनींच्या नाट्यशास्त्रापासून पंडितराज जगन्नाथाच्या रसगंगाधरापर्यंत काव्यशास्त्रावर जे काही विपुल लेखन केले गेले, त्यामध्ये आनंदवर्धनांच्या ध्वन्यालोकाला गुणवत्तेच्या दृष्टीने अग्रस्थान द्यावे लागेल. म. म. डॉ. काणे म्हणतात [१]

"अलंकार–विषयक वाङ्मयात 'ध्वन्यालोक' हा एक युगप्रवर्तक ग्रंथ आहे. व्याकरणात पाणिनिसूत्रांचे किंवा वेदान्तात वेदान्तसूत्रांचे जे महत्त्व, तेच अलंकारशास्त्रात 'ध्वन्यालोकाचे'चे आहे. या ग्रंथात (ग्रंथकाराची) गाढ विद्वत्ता व खोल चिकित्सक बुद्धि दिसून येते सदर ग्रंथाची भाषा स्पष्टार्थक व प्रभावशाली असून त्याच्या प्रत्येक पानावर ग्रंथकाराच्या स्वतंत्र बुद्धीची मुद्रा उमटलेली दिसते. 'रसगंगाधरा'त म्हटल्याप्रमाणे ध्वन्यालोककर्ता हा आलंकारिकांच्या पद्धतीचा प्रस्थापक होय." [२]

ध्वन्यालोकाने साहित्यशास्त्राचा पाया घातला असे जगन्नाथपंडिताने म्हटले' त्याशिवाय जल्हणाच्या 'सूक्तिमुक्तावली'त राजशेखराचा म्हणून पुढील श्लोक उद्धृत केलेला आहे:—

ध्वनिनातिगभीरेण काव्यतत्त्वनिवेशिना ।
आनन्दवर्धनः कस्य नासीदानन्दवर्धनः ॥

ध्वन्यालोकावर 'लोचन' टीका लिहिणाऱ्या विद्वद्वर अभिनवगुप्ताने **सहृदयचक्रवर्ती खल्वयं ग्रन्थकृत्** ( याच ग्रंथाचे पृ. ५४ पाहा) अशा शब्दांत आनन्दवर्धनांना गौरविले आहे.

ध्वन्यालोककार आनन्दवर्धन यांचा जीवनकाल नवव्या शतकाचा उत्तरार्ध असा निश्चित करिता येतो. कल्हणाच्या 'राजतरंगिणी' या ग्रंथात (५–३४) 'कवि आनंदवर्धन हा अवन्तिवर्मा नावाच्या नृपतीच्या कारकीर्दीत प्रसिद्धि पावला' [३] असे स्पष्टपणे म्हटले आहे. राजा अवन्तिवर्मा याचा काळ इ. स. ८५५–८८३ असा आहे. उद्भट (इ. स. ८००) याचा उल्लेख आनंदवर्धनांनी ध्वन्यालोकात अनेक ठिकाणी केला आहे. (पाहा, प्रस्तुत ग्रंथ पृ. ५२० व शिवाय 'विषय-सूची' मध्ये 'उद्भट' पाहा). राजशेखर (इ. स. ९००–९२५) आपल्या 'काव्यमीमांसा' या ग्रंथात आनंदवर्धनांचा निर्देश करितो, [४] यावरून आनंदवर्धनांचा काळ नवव्या शतकाचा उत्तरार्ध असे जे वर म्हटले आहे, त्याला दुजोरा मिळतो.

'राजतरंगिणी'त **मुक्ताकणः शिवस्वामी** इ. जो श्लोक आहे, त्यात आनन्दवर्धनांचा 'कवि' म्हणून उल्लेख केला आहे. आनन्दवर्धनांनी 'अर्जुनचरित'

नावाचे एक महाकाव्य लिहिले होते. काशी आवृत्ति, पृ. ३८८ वर मदीये एव अर्जुनचरिते असे विधान आहे. त्यातलेच पुढील दोन चरण अभिनवगुप्तांनी उद्धृत केले आहेत—

समुत्थिते धनुर्ध्वनौ भयावहे किरीटिनो
महानुपप्लवोऽभवत् पुरे पुरन्दरद्विषाम् ।

'विषमबाणलीला' या नावाचे एक प्राकृत काव्यही आनंदवर्धनकृतच आहे. (पाहा, प्रस्तुत ग्रंथ, पृ. ३१७ व ५३८). या काव्याचा विषय मदनाने त्रैलोक्यावर मिळविलेला विजय हा आहे असे अभिनवगुप्त म्हणतो (प्रस्तुत ग्रंथ, पृ. ५३८ पाहा). याशिवाय या काव्यामध्ये काही साहित्यशास्त्रीय विषयांचा सविस्तर विचार करण्यात आला असावा असे (काशी आवृत्ति, पृ. ५४० पाहा) विषमबाणलीलेसंबंधी आनंदवर्धनाने केलेल्या विधानांवरून वाटते.

याखेरीज 'तत्त्वालोक' नावाचा शास्त्रीय ग्रंथ, धर्मकीर्तीच्या प्रमाणविनिश्चयनामक ग्रंथावरील धर्मोत्तरी या टीकेवरची विवृति हा ग्रंथ व 'देवीशतक' नावाचे स्तोत्रपर काव्यही आनंदवर्धनाने लिहिले होते.

काशी आवृत्ति पृ. ४९९ येथे आनंदवर्धनाने स्वेषु काव्यप्रबन्धेषु असे शब्द वापरून आपल्या काव्यग्रंथांचा मोघम निर्देश केला आहे. याशिवाय प्रस्तुत ग्रंथ; पृ. ४९१ व ५३४ येथे ग्रंथांचा निर्देश न करिता यथा वा ममैव असा प्रस्ताव करून दोन पद्ये उद्धृत केलेली आढळतात. यावरून वर निर्देशिलेल्या काव्यांखेरीज आणखी काव्ये आनंदवर्धनाने रचली असल्यास नकळे.

ध्वन्यालोक या ग्रंथामध्ये कारिका व त्यांवरील वृत्ति असे दोन भाग आहेत. या दोन भागांच्या कर्तृत्वाबाबत विद्वानांत दोन मते प्रचलित आहेत : (१) एक–कर्तृकत्ववाद—ध्वनिकारिका व वृत्ति हे दोन्ही भाग आनंदवर्धन या एकाच लेखकाने लिहिले (२) भिन्नकर्तृकत्ववाद—वृत्ति आनंदवर्धनानेच लिहिली, पण ती लिहिताना कारिका हा आधी सिद्ध असलेला भाग त्याच्यापुढे होता, व तो त्याच्या पूर्वीच्या काव्यशास्त्रज्ञाने लिहिला होता.

या दोन्ही मतप्रवाहांवर विपुल साधकबाधक चर्चा आतापर्यंत निरनिराळ्या विचारवंतांनी आपल्या ग्रंथांमध्ये व स्फुट लेखांमध्ये केलेली आहे. १९६१ पूर्वी झालेल्या चर्चेचा सारांश म. म. डॉ. काणे यांनी आपल्या History of Sanskrit Poetics (१९६१) या ग्रंथामध्ये पृ. १९२–१९९ येथे दिला आहे, तो जिज्ञासूंनी अवश्य पाहावा. या वादविवादातील एककर्तृकत्वपक्ष म. म. कुप्पुस्वामी, डॉ. ए. शंकरन्, डॉ. सत्कारी मुखर्जी, डॉ. के. सी. पांडे व डॉ. कृष्णमूर्ति यांनी स्वीकारला आहे, तर भिन्नकर्तृकत्वपक्ष प्रो. एस्. पी. भट्टाचार्य, के. बोडा वर्मा इत्यादि पंडितांनी स्वीकारला आहे. स्वतः म. म. डॉ. काणे यांनी भिन्नकर्तृकत्वपक्षाचा पुरस्कार केलेला आहे. पण इतके करूनही हा प्रश्न अद्यापि निकालात निघालेला

आहे असे ठामपणे म्हणता येत नाही. भिन्नकर्तृकत्वाचे पुरस्कर्ते डॉ. काणेही म्हणतात–[५]

From the days of Buhler (in Kashmir report p, 65) about seventy-five years ago up to the present day[6] the question whether the author of the Karikas and that of the वृत्ति in the ध्वन्यालोक is one and the same person has been discussed at great length and it cannot be said that it has been settled beyond cavil.

आणि याच वाक्याच्या थोडे आधी, पृ. १६३ वर त्यांनी अशीही इच्छा प्रकट केली आहे—

' I should be glad if ultimately it be proved that the same person is the author of the Karikas and the वृत्ति. '

१९६१ नंतर, एककर्तृकत्वाला पुष्टि देणारा एक लेख १९७८ मध्ये डेक्कन एज्युकेशन सोसायटीने प्रकाशित केलेल्या Principal V. S. Apte commemoration Volume यात आम्हांपैकी प्रा. वीरकर यांनी लिहिला आहे. Anandavardhana and the Dhvanikarikas असे त्याचे शीर्षक आहे.

भिन्नकर्तृकत्वपक्षाला बळकटी आणणारा पुढील अंतर्गत, अत एव महत्त्वाचा पुरावा ध्वनिकारिका व त्यांवरील वृत्ति यांतच सापडतो—

उद्द्योत १, कारिका १० येथे (पाहा, प्रस्तुत ग्रंथ, पृ. १६० ) वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांमधील साधन–साध्य संबंध स्पष्ट करण्यासाठी पदार्थ–वाक्यार्थ–दृष्टान्त निर्देशिला आहे. पण पुढे उद्द्योत ३ मध्ये वृत्तीत ( पाहा, काशी आवृत्ति, पृ. ४१९–४२१ ) पदार्थ-वाक्यार्थ दृष्टांताचे खंडन करून त्याच्या जागी घटप्रदीप दृष्टांताची स्थापना केली असून तो दृष्टान्त अधिक समर्पक असल्याचे म्हटले आहे. जर वृत्तिकारानेच कारिका लिहिल्या असत्या, तर त्याने उद्द्योत १, कारिका १० मध्ये पदार्थ–वाक्यार्थ–दृष्टांताचा निर्देश न करिता घट–प्रदीप दृष्टांताचाच निर्देश केला असता.

**यथा पदार्थद्वारेण घटाद्यर्थः प्रतीयते ।**

**वाच्यार्थ–पूर्विका तद्वत् प्रतिपत् तस्य वस्तुनः ॥**

अशासारखी १–१० या कारिकेची शब्दरचना त्याला करिता आली असती. कारिकेत पदार्थ–वाक्यार्थ दृष्टांत देऊन मग वृत्तीत स्वतःच त्याचे खंडन करावयाचे, हे स्वाभाविक वाटत नाही. वृत्तिकार कारिकाकाराहून वेगळा मानिल्यास कारिकेतील दृष्टांताचा त्याग करण्याचा प्रसंग त्याजवर ओढवला, असे समजणे स्वाभाविक वाटते [७].

तसेच उद्द्योत ३, २५ व्या कारिकेच्या चौथ्या चरणात तस्य पोषेऽप्यदोषता

अशी शब्दयोजना आहे. वृत्तीमध्ये या चरणाचे विवरण करिताना अपि या अव्ययाचा संबंध पोषे या शब्दाशी न जोडता तस्य या शब्दाशी जोडला आहे. (पाहा, तथा सति तस्य विरोधिनोऽपि यः परिपोषः स निर्दोषः । हे काशी आवृत्ति पृ. ३८७ वरील वृत्तीतले वाक्य). यावरून हे स्पष्ट होते की वृत्तिकाराच्या मते अपि हे अव्यय कारिकाकाराने तस्य या शब्दानंतर न वापरता पोषे या शब्दानंतर वापरल्यामुळे 'भिन्नक्रमत्व' हा दोष उत्पन्न झाला आहे. (पाहा, काशी आवृत्ति, पृ. ३८८ वरील लोचन, ओळ २ री.) कारिकेतील हा दोष सुधारण्याचा प्रसंग वृत्तिकारावर जो आला, तो भिन्नकर्तृकत्वामुळे. असे वाटते. प्रस्तुत कारिका जर वृत्तिकारानेच लिहिली असती, तर त्याने तस्य पोषेऽप्यदोषता असे न म्हणता पोषे तस्याप्यदोषता असे म्हणून भिन्नक्रमत्व हा दोष मूळ कारिकेतच सहज टाळला असता. आधी काहीशी सदोष रचना करावयाची व नंतर ती सुधारावयाची यापेक्षा आधी तशा प्रकारची रचना न करणे हे केव्हाही श्रेयस्कर होय. म्हटलेच आहे– **प्रक्षालनाद्धि पङ्कस्य दूरादस्पर्शनं वरम्**[८] ।

भिन्नकर्तृकत्वाच्या संबंधात आणखी एक पुरावा १९७४ मधील एका लेखात पुढे करण्यात आला आहे. तो लेख जर्नल ऑफ दि अमेरिकन ओरिएंटल सोसायटी, खंड ९४ (१९७४, अंक १) यामध्ये पृ. १३१–१३२ वर प्रसिद्ध झाला आहे. लेखाचे शीर्षक 'The Dhvanikarika in fifteenth century Ceylon' असे असून त्याचा लेखक Senarat Paran (Parama ?) Vitana हा आहे.

सीलोन (श्रीलंका) मधील १५ व्या शतकातील ६ वा विक्रमबाहु या राजाच्या दरबारात भरलेल्या एका विद्वत्सभेमध्ये, ध्वनिकारिका हा ग्रंथ धर्मदास-नामक एका बौद्ध पंडिताने लिहिला असे मत पूर्वपक्ष म्हणून एका विद्वानाने प्रथम प्रतिपादिले व नंतर त्या मतावर इतर विद्वानांनी चर्चा केली अशा आशयाचा पाषाणस्तंभावरील एक शिलालेख उपलब्ध झाल्याचे सेनारत परन (परम ?)–वितान या लेखकाने म्हटले आहे, व त्या पूर्वपक्षाचे प्रतिपादन करणारी मूळ संस्कृत संहिता इंग्रजी भाषांतरासह छापली आहे. या पूर्वपक्षात असे म्हटले आहे की, सुमात्रा बेटावरील सुवर्णपुर या राजधानीतील राजकीय ग्रंथागारामध्ये ध्वनि-कारिकानामक ग्रंथाची एक हस्तलिखित प्रत राधाकृष्ण नावाच्या पंडिताने स्वतः पाहिली होती व त्या प्रतीमध्ये ध्वनिकारिका हा ग्रंथ धर्मदास नावाच्या पंडिताने लिहिला असल्याचा निर्देश होता. या ध्वनिकारिकांच्या पहिल्या प्रकरणातील प्रारंभीच्या वीस कारिकांमध्ये वाच्य व व्यंग्य या दोन अर्थप्रकारांचा निर्देश केलेला होता व गौतम बुद्धाने केलेल्या धर्मोपदेशाच्या संबंधात बौद्ध धार्मिक वाङ्मयामध्ये वारंवार वापरलेल्या **अर्थव्यञ्जनसम्पन्नं धर्मोपदेशम्** व **सार्थं सव्यञ्जनं धर्मोपदेशम्** या दोन वाक्यांमध्ये ध्वनि किंवा व्यंजना या संकल्पनेचा उगम झाला असे म्हटले होते. ध्वनि या संकल्पनेच्या उगमासंबंधीच्या २० कारिका भारतामध्ये प्रचलित

असलेल्या ध्वनिकारिकांच्या हस्तलिखितात आढळत नाहीत ध्वनिकारिकांवर वृत्ति लिहिणाऱ्या आनंदवर्धनाने त्या वीस कारिका गाळल्या व त्यांच्या जागी नव्या कारिका लिहून समाविष्ट केल्या. याचे कारण असे की, ध्वनि संकल्पनेचा उगम बौद्ध वाङमयात झाला हे त्या कारिकांत प्रतिपादिलेले मत सनातनधर्मीयांस रुचणारे नव्हते, असे राधाकृष्ण पंडिताने म्हटले असल्याचा हवाला पूर्वपक्ष मांडणाऱ्या विद्वानाने दिला होता. राधाकृष्ण या भारतीय व धर्मदास या बौद्ध पंडितांविषयी कोणतीही अधिक माहिती उपलब्ध नाही. पण वरील लिखाणावरून राधाकृष्ण पंडित आनंदवर्धनानंतर म्हणजे इ. स. च्या ९ व्या शतकानंतर व १५ व्या शतकापूर्वी आणि धर्मदास पंडित ९ व्या शतकाच्या प्रारंभी होऊन गेला असला पाहिजे असा तर्क करिता येतो.

एक बौद्ध पंडित ध्वनिकारिकांचा लेखक होता की नाही या मुद्द्याचे महत्त्व आम्हांस वाटत नाही. ध्वनिकारिका व त्यांवरील वृत्ति दोन वेगवेगळ्या लेखकांनी लिहिल्या हे मत आग्रहपूर्वक एका विद्वानाने सीलोन (श्रीलंका) येथे एका विद्वत्सभेमध्ये इ. स. च्या १५ व्या शतकात प्रतिपादिले होते व ते मत सीलोनमधील एका पाषाणस्तंभावरील शिलालेखात सुरक्षित अवस्थेत नमूद केलेले संशोधकांस पाहावयास मिळते, हे प्रस्तुत चर्चेच्या संदर्भात महत्त्वाचे आहे.

वरील सर्व माहिती निर्णायक स्वरूपाची मानण्यात अडचणी भरपूर आहेत. धर्मदास या पंडिताने 'ध्वनिकारिका' म्हणून काही लिहिले होते हे मान्य केले, तरी 'ध्वन्यालोका' तील ध्वनिकारिका व धर्मदासाच्या ध्वनिकारिका एकच आहेत याला प्रमाण उपलब्ध नाही. पहिल्या वीस कारिका ध्वन्यालोकात नाहीत असे राधाकृष्णाचे म्हणणे, पण बाकीच्या सर्व कारिका ध्वन्यालोकात आढळतात असे त्याचे मत होते काय? ध्वनिसंकल्पनेचा उगम बौद्ध वाङमयात झाला हे मान्य होण्यासारखे नाही म्हणून आनंदवर्धनाने त्या वगळल्या हा केवळ तर्क, की त्याला काही आधार आहे? नव्या वीस कारिका आनंदवर्धनाच्या असे मानिले, तर त्या पहिल्या उद्द्योतातल्याच, असे समजावयास हवे, कारण पहिल्या उद्द्योतातच १९ ( म्हणजे जवळजवळ वीस ) कारिका आहेत. व प्रारंभीच्याच कारिका बाजूस सारून त्यांऐवजी नव्या लिहिण्यात आल्या असे राधाकृष्ण पंडिताचे म्हणणे आहे. या १९ कारिकांतच वर उल्लेखिलेली **यथा पदार्थद्वारेण** ही (१० वी ) कारिका आहे. ती आनंदवर्धनाची असली, तर तीतला म्हणजे स्वतःच प्रथम दिलेला दृष्टांत त्याने तिसऱ्या उद्द्योतातील ( काशी आवृत्ति, पृष्ठ ४१९—४२१ वर ) वृत्तीमध्ये दूर सारला हे मान्य करावे लागेल,

मात्र कोणत्याही कारणास्तव कारिकाकार व वृत्तिकार हे वेगळे मानिले, तरी Journal of the Royal Asiatic Society च्या पहिल्या खंडात ( १९१० ) प्रा. सोबनी यांनी कारिकाकाराचे नाव 'सहृदय' हे असावे हा जो त्यांना वाटलेल्या काही

कारणांवरून निष्कर्ष काढला आहे, तो मुळीच ग्राह्य वाटत नाही. प्रस्तुत ग्रंथ, पृ. ५९ वर वृत्तीमध्ये सहृदयमनःप्रीतये असे शब्द आहेत. आनंदवर्धनाच्या गुरूचे नाव (किंवा उपाधि) 'सहृदय' असेल व त्याने कारिका लिहिल्या असाव्यात असा एक तर्क म. म. काणे यांनी केला आहे (पाहा, History of Sanskrit Poetics, 1961 edition, पृ. १९४ ). याच्या पुष्ट्यर्थ म. म. काणे म्हणतात की, सहृदयानामानन्दो मनसि लभतां प्रतिष्ठाम् या वाक्यात आपल्या सहृदयनामक गुरूचा उल्लेख करण्यात आनंदवर्धनाला सुप्त आनंद वाटला असणे अगदी स्वाभाविक आहे. पण असा तर्क करण्यात एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट विसरली जाते आणि ती ही की, हे आनंदवर्धनाचे वाक्य स्वतंत्र नसून ते १ ल्या कारिकेच्या तेन ब्रूमः सहृदयमनःप्रीतये तत्स्वरूपम् या चौथ्या चरणातील सहृदयमनःप्रीतये या सामासिक शब्दाचे विवरण आहे. गुरूचे नाव उल्लेखल्याने शिष्याला आनंद वाटेल, पण कारिकेत गुरूने स्वतःच आपला नामनिर्देश करून अमुकअमुक नावाच्या माझ्या स्वतःच्या मनाला आनंद वाटावा म्हणून मी लिहितो असं लिहिणे हे मुळीच स्वाभाविक वाटत नाही.[१]

आनंदवर्धनानंतर थोड्याच वर्षांनी होऊन गेलेला प्रतीहारेन्दुराज याने उद्भटाच्या काव्यालंकारसारसंग्रह या ग्रंथावर लिहिलेल्या 'लघुवृत्ति' नामक टीकेमध्ये ( भांडारकर संशोधन मंदिर आवृत्ति, १९२५, पृ. ८५ व पृ. ८१ येथे ) 'सर्वैकशरणमक्षय... इ. पद्य ( पाहा, प्रस्तुत ग्रंथ, पृ. ४९१ ) शब्दशक्तिमूल ध्वनीचे म्हणून सहृदयांनी दिले आहे ' असे विधान केले आहे. त्यावरून प्रतीहारेन्दुराजाने सहृदय या शब्दाने आनंदवर्धनांचाच निर्देश केलेला दिसतो, कारण उदाहरणे कारिकाकाराने दिली नसून आनंदवर्धनांनी दिली आहेत. आणि आनंदवर्धनाच्या संदर्भात अभिनवगुप्तांनी सहृदयचक्रवर्ती खल्वयं ग्रन्थकृत् असे जे म्हटले आहे ( पाहा, प्रस्तुत ग्रंथ, पृ. ५४ ), त्यावरून सहृदय हे आनंदवर्धनास व ध्वनीच्या इतर पुरस्कर्त्यांनाही मिळालेले बिरुद असावे.

## आनंदवर्धनांनी साहित्यशास्त्रीय विचारांत घातलेली मौलिक भर

ध्वन्यालोकाने काव्यशास्त्रीय विचारात नवीन, मौलिक भर घातल्याचे अभिनवगुप्तांनी 'लोचना'त तीन ठिकाणी म्हटले आहे. ( १ ) पाहा, प्रस्तुत ग्रंथ, पृ. १९६:-- व्यंग्यार्थयुक्त अलंकार हे ध्वनिकाव्य नव्हे, कारण तेथे व्यंग्यार्थापेक्षा वाच्यार्थ प्रधान असतो, तर ध्वनिकाव्यात वाच्यार्थापेक्षा व्यंग्यार्थ प्रधान असतो, हे सर्वप्रथम ध्वन्यालोक या ग्रंथामध्ये ध्वनिकाव्याचे लक्षण देताना उद्द्योत, १, कारिका १३ मध्ये व तीवरील वृत्तीमध्ये स्पष्टपणे प्रतिपादिले गेले. ( २ ) रसादि ध्वनीमध्ये रसादि आशय वाच्यार्थापेक्षा प्रधान असतो, तर रसवत् आदि अलंकारामध्ये तो वाच्यार्थाच्या तुलनेने गौण, दुय्यम महत्त्वाचा असतो हा या दोहोंमधील विवेक ध्वन्यालोकापूर्वीच्या ग्रंथांत कोठेही केलेला आढळत नाही. याच ग्रंथात तो

भेद सर्वप्रथम स्पष्ट केला गेला, असे लोचनात सांगितले आहे (पाहा, ह्याच ग्रंथ. पृ. ३७९ वरील 'लोचना'तील **एतत्प्रपञ्चपूर्वतया** इ. वाक्य. (३) पुढे दुसऱ्या खंडात (पाहा, काशी आवृत्ति, पृ. ४८६ वरील 'लोचना'तील **व्यङ्ग्यप्रकारस्तु (गुणीभूतव्यङ्ग्यरूप:) यो मया अपूर्वम् उत्प्रेक्षित:** इ. वाक्य.) गुणीभूतव्यङ्ग्य या काव्यप्रकाराचे लक्षण सर्वप्रथम ध्वन्यालोकात प्रतिपादिले गेले असे लोचनाने म्हटले आहे आणि काव्याची ध्वनि, गुणीभूतव्यङ्ग्य व चित्र अशी प्रतवारी व्यंग्यार्थाच्या सौंदर्याच्या उतरत्या क्रमानुसार ध्वन्यालोकापूर्वीच्या कोणत्याही ग्रंथात केलेली दिसत नाही.

वस्तुध्वनि, अलंकारध्वनि व रसादिध्वनि हे ध्वनीचे तीन प्रकार सर्वप्रथम ध्वन्यालोकातच प्रतिपादिले गेले. तसेच ध्वनीचे अविवक्षितवाच्य व विवक्षितान्यपर-वाच्य हे दोन प्रकारही ध्वन्यालोकानेच प्रथम सांगितले. ध्वन्यालोकपूर्वकालीन ग्रंथांत या पाचपैकी एकाही प्रकारच्या ध्वनीचा उल्लेख कोठेही स्पष्टपणे केलेला आढळत नाही. परंतु तसा निर्देश केलेला नसला, तरी व्यंग्य वस्तु, व्यंग्य अलंकार पूर्वकालीन ग्रंथकारांच्या मुळी गावीही नव्हते असे म्हणता येणार नाही. भामहाने **यत्रोक्ते गम्यतेऽन्योऽर्थः तत्समानविशेषणः** । असे समासोक्तीचे लक्षण केले, यावरून वस्तुरूप व्यंग्यार्थाची त्याला काहीतरी जाणीव होती, असे दिसते. या ग्रंथात पृ. ५२० वर रूपकादि अलंकार सूचित होऊ शकतात असे उद्भटादिकांनी दाखविले असल्याचे ध्वन्यालोकानेच म्हटले आहे. त्याचेच अधिक विवरण पृ. ५२१ वर 'लोचना'ने केले आहे. नाट्यशास्त्रात भरताने **काव्यरसाभिव्यक्तिहेतव: (एकोनपञ्चाशद्भावाः)** (रसभावविचार, कांगले, पृ. ३७९); **व्यञ्जित:** (रसभावविचार, पृ. १८८, ३८०) व पुढे अध्याय १४,२ येथे **वाक्यार्थं व्यञ्जयन्ति** या शब्दांनी रसांच्या संदर्भात जाता जाता व्यंजनेचा निर्देश केला आहे व रसही अभिव्यक्त होतात याची जाणीव असल्याचे दर्शविले आहे. यावरून हे स्पष्ट होते की, नाट्यशास्त्राचा मुख्य विषय नाट्य हा असल्याने भरताने अभिधा, लक्षणा व व्यंजना या शब्द-व्यापारांचे कोठेही स्वतंत्रपणे विवेचन केले नाही. त्याचप्रमाणे भामह, दण्डिन्, उद्भट, वामन व रुद्रट या ध्वन्यालोकपूर्व लेखकांच्या ग्रंथांचा मुख्य विषय काव्यालंकार हा असल्याने त्यांनी शब्दांच्या अभिधा, लक्षणा व व्यंजना या तीन व्यापारांचे स्वतंत्र विवेचन केलेले नाही. इतकेच नव्हे, तर भरताचा व रुद्रटाचा अपवाद वगळता रस, भाव, रसाभास, इ. भावनारूप आशयांचा व्यापक अर्थाने (म्हणजे काव्यशोभाकर धर्म या अर्थाने काव्याच्या रसवत्, प्रेयः, ऊर्जस्विन्, समाहित व भाव या अलंकारांमध्ये किंवा कान्ति या अर्थगुणामध्येच (वामन) त्यांनी अंतर्भाव केला. त्यांना व्यंजनाव्यापाराची, वस्तुरूप, अलंकाररूप व रसादिरूप व्यंग्य अर्थांची कल्पना होती, पण त्यांच्या ग्रंथांच्या मर्यादित स्वरूपा-मुळे त्यांनी या विषयांचा स्वतंत्रपणे विचार केला नाही, हे मात्र खरे आहे.

(पाहा, रसगंगाधर, पर्यायोक्त प्रकरण, पृ. ५५४-५५५—काव्यमाला, १९३९—व रुय्यक, अलंकारसर्वस्व, पृ. ३—काव्यमाला, १९३९).

ध्वन्यालोक या ग्रंथाने काव्यशास्त्रामध्ये तीन बाबतींत मौलिक भर घातली असे जरी अभिनवगुप्ताने म्हटले असले, तरी या तीन बाबतींव्यतिरिक्त आणखी कितीतरी बाबतींत ध्वन्यालोकाने परंपरागत साहित्यशास्त्रामध्ये मौलिक भर घातल्याचे दिसून येते.

(१) 'व्यंग्यार्थ' हा वाच्यार्थ व लक्ष्यार्थ यांहून वेगळाच असतो हे आनंदवर्धनांनी स्वरूपभेद, विषयभेद, इ. अनेक प्रमाणे देऊन सिद्ध केले. तसे त्यापूर्वी कोणाही केले नव्हते. पाहा, उद्द्योत १, कारिका ४ व तीवरील विवरण.

(२) महाकवींच्या वाणीत जो व्यंग्यार्थ असतो, तो विशेष सुंदर असतो. सुंदर व्यंग्यार्थामुळेच काव्याला उत्कृष्टपणा प्राप्त होतो. याबाबत आनंदवर्धनांनी उद्द्योत ४ मध्ये ( काशी आवृत्ति पृ. ५३३ पाहा ) पुढील विधान केले आहे —

प्रसिद्धिश्चेयमस्त्येव विदग्धविद्वत्परिषत्सु यदभिमततरं वस्तु व्यङ्ग्यत्वेन प्रकाश्यते, न साक्षाच्छब्दवाच्यत्वेन ।

आणि हे आनंदवर्धनांचे म्हणणे प्रत्येकाच्या अनुभवाला सर्वथैव पटणारे असेच नाही काय ? आपल्या बाळाचे लाड करिताना आई त्याला उद्देशून 'बाळा ! माझे तुझ्यावर कित्ती कित्ती प्रेम आहे !' असे सरळ कधी म्हणेल काय ? आणि तसे एखादीने म्हटले तर ऐकणाऱ्याला त्यात काही रमणीयता असल्याचे आढळून येईल काय ? ते तिच्या इतर बोलण्यातून, मुद्रेवरून व हावभावांच्या द्वारे सूचित होण्यातच खरी गोडी नाही का ?

(३) व्यंग्यार्थांच्या वस्तु, अलंकार व रसादि या तीनही प्रकारांत रसादि स्वरूपाचा व्यंग्यार्थ हाच सर्वश्रेष्ठ होय

(४) व्यंजनेने मुख्यत्वे प्रकट होणारा रसादि अर्थ हाच काव्याचा आत्मा होय हे मत उद्द्योत १, कारिका ५ मध्ये व तीवरील वृत्तीत आग्रहपूर्वक प्रतिपादिले आहे, व त्याचा पुनरुच्चार पुढे अनेक ठिकाणी जोरदारपणे केला आहे. द्वितीय खंडात याला पुष्कळ पुरावे मिळतील, पण येथे दिग्दर्शनार्थ आम्ही दोनतीनच वाक्ये उद्धृत करीत आहो—

१. रसादयो हि द्वयोरपि तयोर्जीवभूताः ।[१०]

२. परिपाकवतां कवीनां रसादितात्पर्यविरहे व्यापार एव न शोभते ।[११]

३. व्यङ्ग्यव्यञ्जकभावेऽस्मिन् विविधे संभवत्यपि ।

रसादिमय एकस्मिन् कविः स्यादवधानवान् ॥[१२]

हे मत भरताने नाट्यशास्त्रात न हि रसादृते कश्चिदर्थः प्रवर्तते । या वाक्यातून प्रकट केले आहे (रसभावविचार, कांगले, पृ. १२२ पाहा). पण वर उद्धृत केलेल्या व अशाच इतर विधानांच्या द्वारा ह्या मताचा जोरदारपणे पुर-

स्कार व पाठपुरावा सर्वप्रथम करणारा ध्वन्यालोक हाच ग्रंथ होय. शिवाय भरताने नाट्याच्या संदर्भात जे प्रकट केले होते, ते ध्वन्यालोकाने काव्यालाही लागू केले आहे हे ध्यानात घेतले पाहिजे.

दण्डिन् हा श्लेष, प्रसाद, इ. दहा गुणांना काव्याचे प्राण मानितो, हे इति वैदर्भमार्गस्य प्राणा दश गुणाः स्मृताः[13] या विधानावरून स्पष्ट होते. वामनाच्या मते रीति हा काव्याचा आत्मा व रीति म्हणजे विशिष्टगुणयुक्त पदरचना होय.[14] म्हणजे वामनाच्या मतेसुद्धा गुण हाच काव्याचा आत्मा असे निष्पन्न होते. पण या गुणांपैकी 'कांति' या अर्थगुणाचे दीप्तरसत्वं कांतिः असे लक्षण करून त्याने त्या गुणामध्ये रसांचा अन्तर्भाव केला, यावरून रस हा काव्याचा आत्मा या मताला अप्रत्यक्षपणे, अगदी थोडी का होईना, पण बळकटीच आणली आहे. पण ध्वन्यालोकात व्यंजनेने मुख्यतया प्रकट झालेला रसादि आशय हाच काव्याचा आत्मा, व गुण हे रसादि काव्यात्म्याचे आन्तरिक, अविभाज्य, नित्य धर्म होत, हे मत निस्संदिग्धपणे प्रतिपादन केले आहे.

(५) काव्यगुणांची संख्या ध्वन्यालोकात उद्द्योत २ मध्ये १० किंवा २० वरून ३ वर आणून त्यांचा रस या काव्यात्म्याशी मुख्यत्वाने आणि शब्द आणि अर्थ यांच्याशी गौणत्वाने संबंध जोडण्यात आला. भामहाने जरी ध्वन्यालोकाप्रमाणे माधुर्य, ओजस् व प्रसाद या तीन गुणांचाच पुरस्कार केला असला, तरी त्यांचा संबंध सामासिक शब्दांच्या वापराशी जोडला होता. ध्वन्यालोकात मात्र गुण हे रसाचे धर्म असे प्रथमच सांगितले आहे. उद्द्योत २, कारिका ६ ही—

तमर्थमवलम्बन्ते येऽङ्गिनं ते गुणाः स्मृताः ।

असे म्हणते व वृत्तीत तमर्थम् याचे स्पष्टीकरण रसादिलक्षणम् अर्थम् असेच केले आहे.[15]

( ६ ) काव्यगुण व काव्यालंकार यांच्या 'रस' या काव्यात्म्याशी असणाऱ्या संबंधाचे विवेचन उद्द्योत २, कारिका ६ येथे गुणि–गुण–भाव व अलंकार्य–अलंकार–भाव या दोन संबंधांच्या रूपात केले आहे. ध्वन्यालोकापूर्वी वामनाने 'काव्यालंकारसूत्रवृत्ती' मध्ये गुण व अलंकार यांमधील भेद काव्यशोभायाः कर्तारो गुणाः । तदतिशयहेतवस्त्वलङ्काराः । पूर्वे नित्याः । या तीन सूत्रांमध्ये (काव्यालंकार–सूत्रवृत्ति, ३,१, १–३) व त्यांवरील वृत्तीमध्ये स्पष्ट केला आहे. गुणांचा काव्याशी असणारा संबंध हा साक्षात्, आंतरिक व जिव्हाळ्याचा असतो, तर अलंकारांचा काव्याशी असणारा संबंध हा असाक्षात्, बाह्य, परंपरेने असतो. गुण हे काव्याचे नित्य (स्थायी, स्थिर) धर्म असतात, तर अलंकार हे काव्याचे अनित्य, अस्थायी, अस्थिर धर्म असतात असे वामन म्हणतो. वामनाच्या या मतामध्ये सुधारणा करून ध्वन्यालोकाने गुण व अलंकार यांचा रस या काव्यात्म्याशी अनुक्रमे जवळचा व दूरचा संबंध शास्त्रशुद्ध पायावर आधारून स्पष्ट केला आहे.

याबाबत उद्द्योत २, कारिका ६ ही अशी आहे :—

> **तमर्थमवलम्बन्ते येऽङ्गिनं ते गुणाः स्मृताः ।**
> **अङ्गाश्रितास्त्वलङ्कारा मन्तव्याः कटकादिवत् ॥**

ही कारिका व तीवरील विवेचन यांसाठी पाहा, याच ग्रंथातील पृ. ३०७ व त्यापुढची काही पृष्ठे.

(७) वामनाने काव्यशोभायाः कर्तारो गुणाः । तदतिशयहेतवस्त्वलङ्काराः । असे म्हणून गुण हे अलंकारांपेक्षा पुष्कळच अधिक महत्त्वाचे असे सर्वसामान्यपणे सांगितले असले तरी काव्याच्या दृष्टीने गुण व अलंकार यांच्या महत्त्वांमधील फरक—

> **तमर्थमवलम्बन्ते येऽङ्गिनं ते गुणाः स्मृताः ।**
> **अङ्गाश्रितास्त्वलङ्कारा मन्तव्याः कटकादिवत् ॥**

या, उद्द्योत २ मधील ६ व्या कारिकेने अगदी स्पष्ट केला आहे.

(८) अलंकार हा केव्हाही वापरला तरी तो काव्याची शोभा वाढवतो असे मुळीच नाही. कवीचे सर्व लक्ष रसपरिपोष करण्यावर केंद्रित झाले पाहिजे व तसे ते झाले असताना जो अलंकार सहज, त्याला स्वतःलाही नकळत निष्पन्न होईल, तोच अलंकार म्हणवून घेण्यास पात्र ठरेल असे अतिशय महत्त्वाचे व यथायोग्य विधान ध्वन्यालोकानेच प्रथम केलेले दिसते. उदाहरणे देऊन वृत्तीत ते स्पष्टही केले आहे (प्रस्तुत ग्रंथ, पृ. ४२९ पाहा)

(९) शब्दालंकार व अर्थालंकार यांचा वापर रस–परिपोषाच्या दृष्टीने कसा करावा याविषयी पाळावयाच्या यम–नियमांची तपशीलवार व सोदाहरण चर्चा उद्द्योत २ मध्ये केली आहे. (पाहा, प्रस्तुत ग्रंथ, पृ. ४२६–४६१). पूर्वीच्या कोणत्याही लेखकाने या प्रकारची चर्चा केली नाही.

(१०) महाकवींच्या काव्यांमध्ये देवतादिकांच्या प्रणयक्रीडेची जी उत्तान वर्णने केलेली आढळतात, त्यांबद्दल नम्रपणे नापसंती व्यक्त करून त्या कवींच्या अलौकिक प्रतिभेमुळे ते झाकले गेले, असे म्हणून नवकवींनी असे करण्याच्या फंदात मुळीच पडू नये असे आनंदवर्धनांनी अप्रत्यक्षपणे सुचविले आहे (पाहा, उद्द्योत ३, काशी आवृत्ति, पृ. ३०७, ३३३). यावरून आनंदवर्धनांची आध्यात्मिक प्रवृत्ति दिसून येते असे म्हणावेसे वाटते.

(११) सामान्यतः असंलक्ष्यक्रम असणारा रसादिध्वनि काही विशिष्ट परिस्थितीमध्ये संलक्ष्यक्रम असू शकतो हे कुमारसंभव, ६–८४ या श्लोकाच्या संदर्भात उद्द्योत २ मध्ये (प्रस्तुत पुस्तक, पृ. ४९६ पाहा) स्पष्ट केले आहे.

(१२) काव्यांमध्ये पुष्कळ वेळा अचेतन पदार्थांवर सचेतन व्यक्तींच्या वर्तनाचा आरोप[१७] कसा केला जातो यासंबंधी उद्द्योत २ मध्ये रसवत् अलंकाराच्या संदर्भात चर्चा केली आहे (पाहा, हाच ग्रंथ, पृ. ३८८–३९०). उद्द्योत ३

मधील भावानचेतनान्वि ... इ. पद्यही पाहा (काशी आवृत्ति, पृ. ४९८).

(१३) काव्यदोषांच्या बाबतीतल्या नित्यानित्यत्वाचा विचार जरी ध्वन्यालोकापूर्वी दण्डीच्या काव्यादर्शात व भामहाच्या काव्यालंकारात केलेला आढळतो तरी तो रसावर कसा सर्वस्वी अवलंबून आहे, हे उद्द्योत २ मध्ये (पाहा, हा ग्रंथ, पृ. ४१६ व ४१७) आवर्जून सांगितले आहे.

(१४) ध्वनिकाव्यातील व्यंग्यार्थ हा शेवटपर्यंत व्यंग्यच राहिला पाहिजे त्याची एकाही शब्दाने वाच्यता केल्यास त्या काव्याला गुणीभूतव्यंग्याची अवकळा प्राप्त होते, हे ह्याच ग्रंथ, पृ. ४७७ व पृ. ४९६ वर प्रतिपादिलेले मत अत्यंत योग्य असून ते पूर्वकालीन कोणत्याही ग्रंथात मांडलेले दिसत नाही.

(१५) ध्वन्यालोकात उद्द्योत २ मध्ये इतर अलंकारांच्या ध्वनीबरोबर 'श्लेष' ध्वनीची चर्चा केली आहे (पाहा, प्रस्तुत ग्रंथ, पृ. ५५५–५५६). इतर प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकारांनी शब्दश्लेष व अर्थश्लेषयांचा विचार केला आहे, पण श्लेषध्वनि या प्रधान व्यंग्यार्थप्रकाराचे विवेचन ध्वन्यालोकातच केलेले आढळते.

(१६) प्रबंध-रसाची कल्पना जरी भरताच्या नाट्यशास्त्रात जाता जाता निर्देशिली आहे (रस-भाव-विचार, कंगले, पृ. ४४५) तरी तिचा जोराने पुरस्कार करून त्याच्या बाबतीत पाळावयाची पथ्ये व टाळावयाची कुपथ्ये यांचा सविस्तर विचार ध्वन्यालोकात (पाहा, काशी आवृत्ति, पृ. ३२९–३५२ व पृ. ३६०–३६५) केला आहे व रामायण आणि महाभारत या ग्रंथांतील मुख्य रसाची चर्चा उद्द्योत ४ मध्ये केली आहे (काशी आवृत्ति, पृ. ५२९–५३३).

(१७) ध्वन्यालोक उद्द्योत ३ मध्ये (काशी आवृत्ति, पृ. ३०२–३०८ पाहा) काव्याच्या संदर्भात संघटनांचा म्हणजे सामासिक शब्दांच्या कमी–जास्त वापरावर आधारलेल्या रचनांचा विचार रसांच्या दृष्टिकोनातून केला आहे. दण्डीने काव्यादर्श १–८० येथे सामासिक शब्दांच्या वापराचा निर्देश वैदर्भी व गौडी या दोन रीतींच्या संदर्भात केला असून भामहाने सामासिक शब्दांच्या उपयोगाचा विचार काव्यगुणांच्या संदर्भात अत्यंत थोडक्यात केला आहे (पाहा, काव्यालंकार, २, १ ते ३). रुद्रटाने काव्यालंकार या आपल्या ग्रंथात परिच्छेद २, कारिका ३, ४, ५ यांमध्ये पांचाली लाटी व गौडीया या सामासिक शब्दांच्या वापरावर आधारलेल्या तीन रीतींचा (म्हणजे शैलींचा) विचार केलेला आढळतो रुद्रटाच्या या तीन रीतींचे ध्वन्यालोकातील असमासा, मध्यमसमासा व दीर्घसमासा या तीन संघटनांशी पुष्कळच साम्य आहे, परंतु या तीन संघटनांचा रसाशी जिव्हाळ्याचा संबंध असल्याचे ध्वन्यालोकात जसे प्रतिपादिले आहे, तसे पूर्वकालीन कोणत्याही ग्रंथात प्रतिपादिलेले नाही.

(१८) ध्वन्यालोकाच्या ३ ऱ्या उद्द्योतामध्ये (पाहा, काशी आवृत्ति, पृ. ३९०–३९४) शान्तरसाचे समर्थन नाट्यात वा नाट्येतर काव्यात मोठ्या हिरी-

रीतीने केले आहे. ध्वन्यालोकापूर्वी भरताच्या नाट्यशास्त्रात व रुद्रटाच्या काव्या-लंकारात शान्तरसाचा विचार केलेला आढळतो, पण ध्वन्यालोकात त्याचे सैद्धान्तिक दृष्टीने समर्थन करून 'नागानंद' नाटक (उद्द्योत ३, पृ. ३८२ व ३९४, काशी आवृत्ति) व महाभारत हे दोन ग्रंथ शांतरसाची उदाहरणे म्हणून निर्देशिले आहेत. काशी आवृत्ति, पृ. ५२९ ते ५३३ येथे महाभारतात शांतरस हा मुख्य रस असल्याचे युक्तिवादपूर्वक मांडले आहे.

(१९) उद्द्योत ४ मध्ये (काशी आवृत्ति पृ. ५३३ वर) महाभारताच्या संदर्भात शास्त्रनय व काव्यनय या दोन निकषांचा निर्देश आनंदवर्धनांनी केला आहे. 'शास्त्रनय' म्हणजे ललित साहित्याकडे पुरुषार्थप्राप्तीचा उपाय म्हणून पाहण्याचा दृष्टिकोन. 'काव्य-नय' म्हणजे रसपरिपोषाचा कलात्मक दृष्टिकोन. या दोन नयांचा विस्तृत विचार आनंदवर्धनांनी 'तत्त्वालोक' नावाच्या ग्रंथात केला असल्याचे अभिनवगुप्तांनी म्हटले आहे. वाङ्मयीन कलाकृतीकडे पाहण्याचे हे दोन दृष्टिकोन म्हणजे अनुक्रमे सदाचारोपदेशाचा व सौंदर्याचा दृष्टिकोनच होय. आनंदवर्धनांव्यतिरिक्त कोणाही अन्य लेखकाने या दोन दृष्टिकोनांचा किंवा निकषांचा विचार केलेला आढळत नाही.

(२०) सदाचारोपदेश हेच काव्याचे अन्तिम उद्दिष्ट होय असे ध्वन्यालोक, उद्द्योत ३, कारिका ३० येथे (काशी आवृत्ति, पृ. ३९७–९९) प्रतिपादिले आहे. तीवरील वृत्तीतील पुढील वाक्य पाहा—सदाचारोपदेशरूपा हि नाटकादिगोष्ठी विनेयजनहितार्थमेव मुनिभिरवतारिता। रसादि आशयाच्या चित्रणामुळे काव्या-मध्ये उत्पन्न होणारे सौंदर्य व तज्जन्य अलौकिक आनंद हे वाचकांना व प्रेक्षकांना सदाचरणास प्रवृत्त करणारे साधन होय हे मत ध्वन्यालोकाच्या पूर्वी अश्वघोषाच्या **सौन्दरनन्द** या काव्यात (१८, ६३–६४ येथे) आणि भामह[१८] व रुद्रट[१९] यांच्या 'काव्यालंकारा'त प्रतिपादिले आहे. ध्वन्यालोकात हे मत आग्रहपूर्वक मांडले आहे.

(२१) ध्वन्यालोक, उद्द्योत ३ मध्ये (काशी आवृत्ति, पृ. ३३५–३७७) निरनिराळ्या रसांमधील स्वाभाविक विरोध व तो टाळण्याचे विविध उपाय यांची सोदाहरण चर्चा केली आहे. या प्रकारची चर्चा पूर्वीच्या कोणत्याही ग्रंथात[२०] केलेली दिसत नाही.

(२२) उद्द्योत ३ मध्ये (काशी आवृत्ति, पृ. ३६१ ते ३६५) रसदोषांचा विचार स्वतंत्रपणे सर्वप्रथम ध्वन्यालोकातच केलेला आढळतो.

(२३) ध्वन्यालोक, उद्द्योत ३ येथे (पाहा, काशी आवृत्ति, पृ. ३१८–३२४) देश व काल यांचे औचित्य, पात्रांच्या स्वभावाचे व वर्तनाचे औचित्य इत्यादि निरनिराळ्या रूपांत काव्यातील औचित्याचा विस्ताराने विचार केलेला असून या सर्व प्रकारच्या औचित्यांचा संबंध काव्यातील रसादि आशयाशी असतो

असे आग्रहपूर्वक सांगितले आहे.

**अनौचित्यादृते नान्यद् रसभङ्गस्य कारणम् ।**
**प्रसिद्धौचित्यबन्धस्तु रसस्योपनिषत् परा ।।** [२१]

उद्द्योत ३, कारिका ९ मधील रसबन्धोक्तमौचित्यम् हे शब्द, तसेच त्याच उद्द्योतातील कारिका ११ मधील अभीष्टरसोचितकथोन्नयः व १२, १३ व १४ या कारिकांमध्येही औचित्य हे रसाविषयीच पाळावयाचे असते हे पुन्हा पुन्हा सांगितले आहे. या ग्रंथाच्या पान ६७ वर 'लोचना' नेही औचित्य हे रसांच्या दृष्टीनेच असते, असे म्हटले आहे.

नाट्यातील औचित्याचा विचार भरताने आनुषंगिक रीतीने व दण्डी, भामह आणि रुद्रट यांनी काव्यदोषांच्या संदर्भात अगदी थोडक्यात केला आहे. पण औचित्याचा शास्त्रशुद्ध व विस्ताराने विचार सर्वप्रथम ध्वन्यालोकातच केलेला दिसून येतो. याच्याच आधाराने क्षेमेन्द्राने ( ११ वे शतक ) 'औचित्यविचारचर्चा' या नावाचा स्वतंत्र ग्रंथ लिहिला. त्यात त्याने औचित्य हा रसाचा प्राण असे म्हटले आहे.

( २४ ) वस्तुध्वनि, अलंकारध्वनि व रसादिध्वनि या तीन प्रकारच्या ध्वनींमुळे काव्यामध्ये अपूर्वता, नावीन्य व वैचित्र्य कसे उत्पन्न होते यासंबंधी तपशीलवार विवेचन ध्वन्यालोकाच्या चौथ्या उद्द्योतात ( काशी आवृत्ति, पृ. ५२२ ते ५२९ येथे ) केलेले आहे. या प्रकारची चर्चा पूर्वकालीन कोणत्याही ग्रंथामध्ये केलेली नाही. काव्याचा विषय पूर्वकवींनी हाताळलेला असला, तरी व्यंजनेच्या स्पर्शाने त्याला नवीन सौंदर्य प्राप्त होते असे उद्द्योत ४, कारिका २ येथे म्हटले आहे.

( २५ ) निरनिराळ्या काव्यांत आढळणारे साम्य या विषयाचा विचार ध्वन्यालोकातच प्रथम केलेला दिसतो. या साम्याला तेथे 'काव्यार्थसंवाद' म्हटले आहे. या साम्याचे तीन प्रकार करून त्यांतला तुल्यदेहिवत् हा प्रकार कवींनी सोडू नये असे आवर्जून सांगितले आहे ( पाहा, उद्द्योत ४, कारिका ११ ते १६ ).

( २६ ) ध्वन्यालोकपूर्व ग्रंथांमध्ये काव्याच्या आत्म्याचा ( दण्डिन्, वामन ), काव्यातील दोषांचा ( भरत, भामह, दण्डिन् उद्भट, वामन, रुद्रट ), काव्यातील अलंकारांचा ( भरत, भामह, दण्डिन्, उद्भट, वामन, रुद्रट ), काव्यातील वैदर्भी आदि रीतींचा—म्हणजे शैलीचा ( भामह, दण्डिन्, वामन, रुद्रट ) व काव्यातील वृत्तींचा ( भरत, उद्भट ) जरी विचार केलेला असला, तरी या सर्व संकल्पनांना एका व्यापक आकृतिबंधामध्ये बसवून व त्यांचा समन्वय करून दाखविण्याचा मान ध्वन्यालोक या ग्रंथाकडेच निर्विवादपणे जातो. ध्वन्यालोकाने साहित्यशास्त्राचा पाया घातला व साहित्यसमीक्षेच्या कितीतरी नवीन पैलूंवर प्रकाश पाडला. म्हणूनच अभिनवगुप्तांनी ध्वन्यालोककाराला 'अस्मच्छास्त्रकार'

ही पदवी मोठ्या कौतुकाने व आदराने बहाल केली. ( पाहा. प्रस्तुत ग्रंथ, पृ. ८० श्लोक २२ ), व पंडितराज जगन्नाथासारख्यानेही ध्वनिकृतामालंकारिकसरणि-व्यवस्थापकत्वात् असे गौरवोद्गार काढले.

(२७) संस्कृत वाङ्मयामध्ये सौंदर्यशास्त्राची ( म्हणजे नाट्य, काव्य, चित्र, संगीत व शिल्प या सर्व ललितकलांना साधारण असलेल्या सौंदर्यविषयक तत्त्वांची स्वतंत्रपणे चर्चा करणारा ग्रंथ नाही. ध्वन्यालोक हा ग्रंथ जरी मुख्यतः साहित्यविषयक असला, तरी त्याच्या आधारे भारतीय सौंदर्यशास्त्रावर एक पुस्तक तयार करिता येईल, इतके सांगोपांग विवेचन त्यात आहे. कोणत्याही ललितकला-कृतीतून आशय ' सूचित ' करावा, ती ललितकलाकृति रसप्रधान म्हणजे ' भावा ' चा मुख्यतया आविष्कार करणारी असली तरच ती उत्कृष्ट दर्जाची व अलौकिक प्रतिभाशाली कलाकाराची कृति वाटते, रसाविष्कार करणाऱ्या कोणत्याही ललितकलाकृतीत कलावंताने औचित्याचे कसोशीने पालन केले पाहिजे, इत्यादि विविध व मोलाचे मार्गदर्शन ध्वन्यालोकातून प्राप्त होते.[२] यामुळेच ' Encyclopaedia of World Art ', पाचवा खंड, पृष्ठे ६२ ते ७१ येथे Raniero Gnoli याने लिहिलेल्या आपल्या लेखात पुढील गौरवोद्गार काढले आहेत—" It ( i. e., Bharata's Natyasastra ) is undeniably the foundation of Indian Aesthetic thought. However, for a simple and clear statement of the Indian attitude towards aesthetic problems one turns mainly to Anandavardhana. "

(२८) मानवाचे थोरपण त्याच्या आत्म्यामुळे, त्याच्या सद्गुणांमुळेच असते, शरीरामुळे नाही, अलंकारांमुळे तर त्याहून नाही हे अध्यात्माचे तत्त्व काव्यात व्यंग्यार्थ मुख्य, रसादि व्यंग्यार्थ हा काव्याचा प्राण असे म्हणून आनंदवर्धनांनी काव्याला लावले व तेणेकरून काव्यशास्त्राला दर्शनाचे स्वरूप दिले.

सारांश, या उपोद्घाताचे प्रारंभी उद्धृत केलेल्या म. म. काणे यांच्या वचनाप्रमाणे ध्वन्यालोक हा साहित्यशास्त्रावरील एक युगप्रवर्तक ग्रंथ आहे यात मुळीच शंका नाही. उत्तरकालीन बहुतेक सर्व साहित्यशास्त्रकारांनी, ध्वन्यालोका-मध्ये प्रतिपादिलेले साहित्याच्या गुणवत्तेच्या मूल्यमापनाचे मानदंड शिरसावंद्य मानले आहेत, यावरून हे स्पष्ट होते.

---

१. History of Sanskrit poetics, 1961 edition, p. 161.

२. रसगंगाधर, काव्यमाला आवृत्ति (१९४७), पृ. ५६९.

३. मुक्ताकणः शिवस्वामी कविरानन्दवर्धनः ।
प्रथां रत्नाकरश्चागात् साम्राज्येऽवन्तिवर्मणः ॥

४. ' प्रतिभाव्युत्पत्त्योः प्रतिभा श्रेयसी ' इति आनन्दः । असे. म्हणून राजशेखराने (पाहा काव्य-

मीमांसा, अध्याय ५, पृ. ५५, हरिदास संस्कृत सीरीज संस्करण, १९३४) उद्योत ३ मधील अव्युत्पत्तिकृतो दोषः इ. श्लोक उद्धृत केला आहे.

५. History of Sanskrit poetics (191), पृ. १६३–१६४.

६. म्हणजे १९६१ पर्यंत.

७. तरीही आधी सुचलेला दृष्टांत कारिकेत आलेला व मग अधिक काटेकोर चर्चा करताना दुसरा दृष्टांत सुचला असणे शक्य आहे. तसा पहिला दृष्टांत अगदी चुकीचाच आहे असे म्हणता येत नाही शिवाय या एखाद्या कारिकेवरून सर्वच कारिका भिन्न कर्त्याच्या असल्या पाहिजेत हा एकदम निष्कर्ष निघतो असे म्हणता येत नाही.

८. येथेही दोष किरकोळ आहे व येवढ्याच कारिकेवरून सर्व कारिका दुसऱ्याच्या असे ठामपणे कसे म्हणावे ?

९. याची अधिक विस्ताराने व इतर अनेक प्रमाणांसह चर्चा भांडारकर प्राच्यविद्यासंशोधनमंदिराच्या नियतकालिकाच्या १९७६ मध्ये प्रसिद्ध झालेल्या खंडात प्रा. पु. ना. वीरकर यांनी लिहिलेल्या ‘Was sahridaya the name of the author of the Dhvanikarikas?’ या लेखात पाहावी.

१०. ध्वन्यालोक, काशी आवृत्ति, पृ. ४०१.

११. ध्वन्यालोक, काशी आवृत्ति, पृ. ४०७.

१२. ध्वन्यालोक, काशी आवृत्ति, पृ. ५२९.

१३. काव्यादर्श, १–४९.

१४. काव्यालंकारसूत्रवृत्ति, १–१–१ ते ३.

१५. पाहा, प्रस्तुत ग्रंथ, पृ. ३९७.

१७. इंग्लिश साहित्यशास्त्रामध्ये या प्रकाराला Personification नावाचा अलंकार म्हणतात.

१८. भामह, काव्यालंकार, १–२.

१९. रुद्रट, काव्यालंकार, १२–१ व २.

२०. रुद्रटाने काव्यालंकार, ११, १२ ते १४ येथे रसदोषांच्या कल्पनेचे बीजारोपण केलेले दिसते.

२१. ध्वन्यालोक, काशी आवृत्ति, पृ. ३३०.

२२. या मुद्द्यासंबंधीच्या अधिक विवेचनासाठी जिज्ञासूंनी मराठी संशोधनमंडळाच्या १९७६ च्या वार्षिकातील प्रा. वीरकरांचा ‘भारतीय सौंदर्यशास्त्र व आनंदवर्धन’ हा लेख पाहावा.

## २. अभिनवगुप्त – एक अलौकिक भाष्यकार

अभिनवगुप्तांचा जीवनकाल इ. स. ९५० ते १०२५ असा मानायला हरकत नाही. ध्वन्यालोकावरील 'लोचन' व भरताच्या नाट्यशास्त्रावरील 'अभिनव-भारती' हे त्यांचे दोन विस्तृत टीकाग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. नाट्यशास्त्र व ध्वन्या-लोक या दोन ग्रंथांतून मांडलेल्या विचारांच्या अनुषंगाने कित्येक साहित्यशास्त्र-विषयक मुद्द्यांचे विवेचन करण्याची संधी अभिनवगुप्तांना 'अभिनव भारती' व 'लोचन' लिहिताना लाभलेली आहे. त्यापैकी 'लोचन' ही टीका अभिनव-भारतीपेक्षा अधिक सुस्थितीत व म्हणून अधिक सुबोध आहे. अभिनवगुप्तांपूर्वीचे नाट्यशास्त्र व काव्यशास्त्र यांविषयी चर्चा करणारे कित्येक ग्रंथ आता उपलब्ध नाहीत. उद्भटाचे 'भामहविवरण', त्याची नाट्यशास्त्रावरील टीका, भट्टलोल्लट व श्रीशंकुक यांची नाट्यशास्त्रामधील रससूत्राविषयीची मते, भट्टनायकाचा 'हृदयदर्पण', ध्वन्यालोकावरील 'चंद्रिका' नामक टीका, भट्टतौताचा 'काव्य-कौतुक' इत्यादि ग्रंथांचा अभिनवगुप्तकृत उल्लेख व त्यांतून अभिनवगुप्तांनी उद्धृत केलेली अवतरणे किंवा दिलेले सारांश, यांवरूनच त्यांचे काय ते ज्ञान आता आपल्याला होऊ शकते. त्यामुळे साहित्यशास्त्रात अभिनवगुप्तांनी नेमकी किती व कोणती भर घातली हे अगदी काटेकोरपणे निश्चित करणे कठीण आहे.

तथापि जे उपलब्ध आहे, त्याच्या आधारे सांगावयाचे, तर अभिनवगुप्तांनी भारतीय साहित्यशास्त्रात घातलेली डोळ्यांत भरण्यासारखी भर म्हणजे त्यांची रसास्वादप्रक्रिया होय. लोचन व अभिनवभारती यांत अभिनवांनी आपल्या पूर्वीच्या विद्वानांची रसविषयक मते मांडलेली आहेत, व शेवटी आपलेही मत सांगितले आहे. ते त्यांचे मत थोडक्यात असे–

काव्य वाचल्यावर प्रथम त्यातील शब्दांमधल्या 'अभिधा' शक्तीमुळे वाच-काला त्यांचा वाच्य अर्थ कळतो. रसप्रधान काव्याचा वाच्यार्थ म्हणजे त्यातील विभाव, अनुभाव[२३] इत्यादिकांची कवीने दिलेली माहिती होय. हा वाच्यार्थ लक्षात आल्यावर तो वाचकाचे मन इतके आकर्षून घेतो की, त्याला तोच अर्थ एकसारखा मनात घोळवीत बसावेसे वाटते. या एकसारख्या चिंतनालाच अभि-नवांनी 'अनुसंधान' असे म्हटले आहे. या अनुसंधानानंतर रसिक वाचकाच्या अंगी असलेला सहृदयता[२४] (म्हणजे रसिकता) हा गुण जागृत होतो व त्यायोगे काव्यातील विभावादिकांचे 'साधारणीकरण' होते. साधारणीकरणाचा सिद्धांत प्रथम अभिनवांच्या आधीच्या भट्टनायकाने मांडला होता. विभावादिकांचे 'साधा-रणीकरण' होते म्हणजे त्या विभावादिकांच्या स्थल, काल इत्यादींसंबंधीच्या वैशिष्ट्यांची वाचकाला प्रथम झालेली जाणीव हळूहळू गळून पडते व त्या विभाव अनुभाव, व्यभिचारी भाव व स्थायी भाव यांचे भान त्याला त्यांच्या विशिष्ट-

संबंधविरहित, सर्वसाधारण स्वरूपातच होते. अभिनवगुप्तांनी भट्टनायकाचा हा साधारणीकरणाचा सिद्धांत मान्य केला खरा, पण त्याची व्याप्ति वाढवून त्यांनी ती वाचकाच्या स्वतःच्या मनापर्यंत नेली. म्हणजे वाचकाला स्वतःविषयींच्या वैशिष्ट्यांचाही विसर पडतो, त्याचे देहभान हरपते व मी एक प्रमाता किंवा एक साक्षी, येवढीच स्वतःबद्दलची जाणीव त्याच्या मनात शिल्लक राहते. मग प्रेक्षकाच्या अन्तःकरणात जन्मापासूनच संस्काररूपाने, सुप्त स्वरूपात असलेला त्याचा स्वतःचा तो स्थायिभाव साधारणीकृत स्वरूपात जागृत होतो. काव्यातील शब्द व वाच्यार्थ यांमध्ये असणाऱ्या व्यंजनात्मक व्यापाराच्या योगाने प्रेक्षकाच्या आत्म्याभोवतीचे अज्ञानाचे आवरण बाजूला होऊन त्या आत्म्याचा शुद्ध प्रकाश त्याच्या स्वतःच्या साधारणीकृत स्थायिभावावर पडतो. हा आत्म्याच्या शुद्ध प्रकाशाने उजळलेला त्याचा साधारणीकृत स्थायिभाव म्हणजेच 'रस' होय.

भट्टनायकाच्या मताला अभिनवगुप्तांनी केलेल्या सुधारणा अशा : (१) काव्यातील शब्दांच्या ठिकाणी भट्टनायकाने अभिधा, भावकत्व व भोगकृत्त्व किंवा भोजकत्व अशा तीन शक्ती मानिल्या होत्या. त्यांपैकी भावकत्व ही शक्ती अनावश्यक असे म्हणून अभिनवांनी ती कमी केली. (२) साधारणीकरण हे भावकत्वामुळे होते, असे भट्टनायकाने म्हटले होते, ते अनुसंधान व रसिकता यांमुळे होते असे सांगून अभिनवांनी कवीने केलेले विभावादिकांचे वर्णन वाचकाच्या मनाला खेचून घेण्याइतके, म्हणजे त्याला त्याचेच अनुसंधान करावयास लावण्याइतके सुंदर असते हे सुचविले व त्याबरोबर रसिकाच्या रसिकता-गुणाला रसप्रक्रियेत खास स्थान दिले. (३) साधारणीकरणाची व्याप्ति विभावादिकांपासून वाचकाच्या स्वतःच्या मनापर्यंत नेली, व वाचकाला स्वतःविषयींच्या वैयक्तिक बाबींचा विसर पडतो, तसा तो पडला म्हणजेच त्यांचा पूर्णपणे तन्मयीभाव किंवा हृदयसंवाद झाला म्हणावयाचा, हा महत्त्वाचा मुद्दा सांगितला. (४) काव्यातून प्रकट होणारा जो स्थायिभाव तो नव्हे, तर वाचकाचा स्वतःचा स्थायिभाव साधारणीकृत स्वरूपात अभिव्यक्त होतो ही अतिशय महत्त्वाची बाब त्यांनी प्रतिपादन केली. वाचक आपला स्वतःचा स्थायिभाव अपूर्व सौंदर्याने नटलेला व उजळलेला पाहतो हे ध्यानात घेतले म्हणजेच वाचकाला अलौकिक आनंद का होतो, याचे कोडे उलगडते. [२५]

रसास्वादप्रक्रियेसंबंधी आपले मत मांडून व इतरही कित्येक मुद्द्यांचे प्रतिपादन करून अभिनवांनी भारतीय साहित्यशास्त्रात जी लक्षणीय भर घातली, ती घालताना त्यांना पूर्वाचार्यांच्या-विशेषतः भरतमुनींच्या नाट्यशास्त्राचा व आनंदवर्धनांच्या ध्वन्यालोकाचा पुष्कळ उपयोग झाला यात तिळमात्र संदेह नाही. त्यांनी स्वतःच ते ऋण आपल्या अभिनवभारतीमध्ये[२६] मान्य केले आहे. पण काही कल्पना-ज्या नाट्यशास्त्रात व ध्वन्यालोकात सर्वसामान्यपणे व बीजरूपाने मांडल्या

आहेत, त्यांना अभिनवांनी शास्त्रशुद्ध स्वरूप देऊन त्या विस्तारपूर्वक व सोदाहरण उकलून दाखविल्या आहेत, हे निर्विवाद आहे.

अभिनवांच्या कामगिरीचे संपूर्ण दर्शन घडवावयास एक वेगळा ग्रंथ लिहावा लागेल; पण या उपोद्घातात काही ठळक मुद्देच केवळ नमुन्यादाखल वाचकांच्या नजरेस आणणे शक्य आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या पृ. ५४ वर 'लोचना'त (मराठी अनुवाद पृ. ५६ वर) अभिनवांनी सहृदयाचे म्हणजे रसिकाचे लक्षण केले आहे. तसे सुस्पष्ट व यथार्थ लक्षण पूर्वी कोणी केलेले आढळत नाही. 'सहृदय' शब्दाचा वापर ध्वन्यालोकात जागोजाग केला आहे, पण त्याचा अर्थ तेथे असा स्पष्ट केलेला नाही. सहृदयता अंगी बाणावयास वाचकाला उत्तमोत्तम काव्य वाचण्याचा सराव लागतो व इतर सर्व गोष्टी विसरून काव्यातल्या मुख्य आशयाशी तन्मय होण्याच्या सामर्थ्याने संपन्न असावे लागते हे अभिनवांनी त्या लक्षणात प्रतिपादिले आहे. उत्कृष्ट काव्ये वाचण्याचा सराव या मुद्द्याचा उपयोग मम्मटाने काव्यप्रकाश, उल्लास १, कारिका ३ मध्ये काव्यज्ञशिक्षयाभ्यास: हा काव्यहेतु सांगताना केला आहे. 'सहृदय' या शब्दाची 'समानहृदय' अशी समर्पक व्युत्पत्ति होऊ शकते, असे एके ठिकाणी (प्रस्तुत ग्रंथ, पृ. ५९, टीप ११) दाखविले आहे. ते अभिनवांनी केलेल्या लक्षणाशी जुळणारे आहे.

लोचनाच्या मंगलाचरणात अभिनवांनी 'अपूर्व काव्यसृष्टीचा पसारा उभारणारा' असे 'कवी' चे वर्णन केले आहे. (प्रस्तुत ग्रंथ, पृ. २ वरील टीपा ३ व ४ पाहा). पुढे ६ व्या कारिकेवरील लोचनात (प्रस्तुत ग्रंथ पृ. १४७) प्रतिभेची व्याख्या 'अपूर्ववस्तुनिर्माण–क्षमा प्रज्ञा' अशी अभिनवांनी केली आहे. त्या आधी अभिनवगुप्तांचे एक गुरु भट्टतौत यांनी प्रतिभेचे लक्षण प्रज्ञा नवनवोन्मेषशालिनी प्रतिभा मता। अशा शब्दांनी सांगितलेच होते (पृ. ११९ वरील टीप ७ वी पाहा).

'काव्य' या शब्दाची व्युत्पत्ति अभिनवांनी 'कवनीय' या शब्दाने सांगितली आहे (पाहा, प्रस्तुत ग्रंथ, पृ. ३२). 'काव्य' हा शब्द 'कु' (आवाज करणे) या धातूला ओरावश्यके या पाणिनिसूत्रानुसार (३–१–१२५) ण्यत् हा प्रत्यय लागून बनलेले कर्मणि विध्यर्थी विशेषण होय. जीवनातील प्रसंग पाहून कवीचे विचार व भावना यांची ऊर्मि त्याला इतकी अनावर होते की, त्याला ते सर्व शब्दांनी व्यक्त केल्याशिवाय राहवतच नाही असा, किंवा 'जी ऊर्मि केवळ भाषेतील शब्दांच्या द्वारेच प्रकट होऊ शकते ते काव्य' असा अर्थ या व्युत्पत्तीतून अभिनवांनी सुचविला आहे, असे वाटते. तो लक्षात घेतल्यावर आंग्लकवि Wordsworth यांच्या 'Poetry is the spontaneous overflow of powerful feelings' इत्यादि प्रसिद्ध व्याख्येची आठवण झाल्यावाचून राहवत नाही.

उद्द्योत २ च्या शेवटी ( पाहा, याच ग्रंथाच्या पृ. ५७४ वरील टीप २ ) अभिनवांनी ' काव्य ' या शब्दाचा अर्थ थोडचा वेगळ्या प्रकारे, ' कविव्यापार ' असा सांगितला आहे. तिसऱ्या उद्द्योतात ( पाहा, काशी आवृत्ति पृ. ५०८ ) ते ' कवि ' या शब्दाचा अर्थ कवयो वर्णनायोगात् या शब्दांनी ' वर्णन करण्यात निपुण असलेला ' असा सांगतात. अर्थात् हा अर्थ त्यांनी भट्टतौतांच्या **वर्णनानिपुण: कवि:** या वचनानुसार केलेला दिसतो.

काव्यापासून रसिकाला होणाऱ्या लाभांचा — काव्यप्रयोजनांचा प्रश्न विचारात घेतल्यास प्रीति ( आनंद ) आणि व्युत्पत्ति (ज्ञान आणि सदाचारोपदेश) ही दोन प्रयोजने महत्त्वाची होत. त्यात अभिनवांच्या दृष्टीने नीत्युपदेश ( व्युत्पत्ति ) हे अधिक महत्त्वाचे प्रयोजन होय[२७] प्रीति हेही अत्यंत महत्त्वाचे, पण व्युत्पत्तीचे साधन होय. ध्वन्यालोक, काशी आवृत्ति, पृ. ३३६ वरील लोचनातील इति प्रीतिरेव व्युत्पत्ते: **प्रयोजिका** हे वाक्य व पृ. ४५५ वरील लोचनातील प्रीते: व्युत्पत्त्यङ्गत्वात् हे शब्द पाहा. पहिल्या उद्द्योतावरील लोचनात ( या ग्रंथाचे पृ. ५४ पहा ) तथापि तत्र **प्रीतिरेव प्रधानम्** । असे जे त्यांनी म्हटले आहे, त्याची संगति व्युत्पत्ति हे अंतिम उद्दिष्ट खरे, पण ते उद्दिष्ट साध्य व्हावयास प्रीति हे सर्वांत प्रभावी, महत्त्वाचे साधन होय, असा केला, तरच लागते.

रसादि हेच काव्याचे जीवित असे ध्वन्यालोकात जागोजाग म्हटले आहे. या संदर्भात अभिनवगुप्ताचे विवरणात्मक पुढील वाक्य ( प्रस्तुत ग्रंथ, पृ. १३५ पाहा ) ध्यानात राहील असे आहे —

**तेन रस एव वस्तुत आत्मा, वस्त्वलंकारध्वनी तु सर्वथा रसं प्रति पर्यवस्येते ।**

यावरूनच विश्वनाथ साहित्यदर्पणात **वाक्यं रसात्मकं काव्यम्** । अशी काव्याची व्याख्या करू शकला. शिवाय प्रस्तुत ग्रंथ, पृ. १३६ येथील लोचनातील **रसस्यैवात्मभूतत्वमुक्तम्** । हे शब्दही पाहा.

अभिनवगुप्ताची अलौकिक विद्वत्ता ही एखाद-दुसऱ्या शास्त्रापुरतीच मर्यादित नाही. काव्यशास्त्र, नाट्यशास्त्र, व्याकरणशास्त्र इ. शास्त्रे व मीमांसा, योग, न्याय, वैशेषिक, बौद्ध, वैष्णव, वेदान्त इ. कित्येक दर्शने यांचा त्यांचा अभ्यास गाढा होता. म्हणूनच म. म. डॉ. काणे यांनी History of Sanskrit Poetics पृ. २३६ येथे त्यांना a man of acute intellect and an encyclopaedic scholar म्हटले असून He had taken all knowledge for his province असे उद्गार काढले आहेत. अभिनवभारती व लोचन या विस्तृत टीकाग्रंथांच्या जोडीला तन्त्रालोकासारखा विविध तन्त्रांवरील प्रचंड ग्रंथ, तन्त्रसार, परात्रिंशिका-विवरण, मालिनीविजयवार्त्तिक, इ. अनेक ग्रंथ त्यांनी लिहिले असून भैरवस्तव, क्रमस्तोत्रे इ. स्तोत्रेही ही रचली आहेत. काश्मीरातील अद्वैत शैव तत्त्वज्ञानाचा तो कट्टा उपासक होता. त्या विषयावरील त्यांच्या ग्रंथांपैकी ईश्वरप्रत्यभिज्ञाविमर्शिनी

व उत्पलाचार्यांची ईश्वरप्रत्यभिज्ञासूत्रे व त्यांवरील वृत्ती यांवरील ईश्वरप्रत्य-भिज्ञाविवृतिविमर्शिनी हे ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. अभिनवांच्या ग्रंथसंपदेविषयी अधिक माहितीसाठी रसभावविचार, कंगले, यातील उपोद्‌घात, पृ. ३८ ते ४० पाहा.

अभिनवगुप्तांची तीव्र बुद्धि, विद्वत्ता, व्यासंग, वगैरेंबद्दल वर लिहिले, पण त्यांच्या असामान्य रसिकतेचे 'लोचना'तील दोन-तीन तरी नमुने वाचकांपुढे ठेविल्याशिवाय हा उपोद्‌घात पूर्ण होणार नाही.

अलंकार हा शरीराला अलंकृत करितो असे प्रथमदर्शनी जरी वाटले, तरी पर्यवसानी तो आत्म्यालाच अलंकृत करीत असतो, कारण तो विशिष्ट चित्त-वृत्तीचे सूचन करणारा असतो. या मुद्द्याचे विवेचन करिताना अभिनवांनी जे दोन दृष्टांत दिले आहेत, ते अतिशय समर्पक आहेत. ( हाच ग्रंथ, पृ. ३८० व ३८३ पाहा ). अभिनवगुप्त म्हणतात की, मृताच्या निर्जीव शरीरावर कुंडले वगैरे अलंकार चढविलेले असले, तरी ते शरीर सुंदर दिसत नाही, कारण त्या शरीरात ज्याला अलंकृत करावयाचे, तो आत्माच नसतो ! तसेच सलकडी वगैरे अलंकार संन्याशाच्या अंगावर घातले, तर ते हास्यकारक वाटतात, कारण अलं-कार्य असलेल्या संन्याशाच्या आत्म्याला ते उचित म्हणजे साजेसे नसतात.

उद्द्योत २ मध्ये ( प्रस्तुत ग्रंथ, पृ. ४६० पाहा ) आनंदवर्धनांनी मेघ-दूतातला श्यामास्वङ्गं चकितहरिणीप्रेक्षणे दृष्टिपातम् .. इ. प्रसिद्ध श्लोक उदा-हरणादाखल दिला आहे. यक्ष आपल्या दूरस्थ कांतेला म्हणतो की, येथे निरनिराळ्या वस्तूंत मला तुझ्या एक एक अवयवाचे साम्य दिसले, तरी तुझ्या समग्र सौंदर्याचे सादृश्य मला येथे कोणत्याही एका ठिकाणी आढळून येत नाही. या संदर्भात यक्षाने तिला उद्देशून 'भीरु' असे संबोधन योजिले आहे. त्या विशे-षणाची समर्पकता स्पष्ट करिताना अभिनव म्हणतात– 'भीरु' – कारण ज्याचे मन भित्रे असते, तो आपली सर्व संपत्ति एके ठिकाणी ठेवीत नाही, असा अर्थ. ( प्रस्तुत ग्रंथ, पृ. ४६३ वरील टीप ३ तीही पाहा ). एरवी 'भीरु' हे या श्लोकात विशेष सार्थ म्हणून प्रत्ययास न येणारे विशेषण, पण त्यातूनही वरील-सारखा अत्यंत उचित व कमालीचा रसपरिपोषक अर्थ काढणे हे अभिनवगुप्तांच्या अलौकिक रसिकतेचेच निदर्शक नव्हे, तर काय ?

उद्द्योत ३ मध्ये ( काशी आवृत्ति, पृ. ३७३ पाहा) आनंदवर्धन सांगतात की, दोन परस्परविरुद्ध रस एखाद्या ठिकाणी मुख्य म्हणून समाविष्ट केले, तर ते दोन रस एकमेकांना सर्वथैव निर्दाळून टाकतात. पण तेच विरुद्ध रस जर तिसऱ्या मुख्य असलेल्या अर्थाला अंगभूत म्हणून योजिले, तर तसे करणे मुळीच दोषास्पद ठरत नाही. उदा. 'प्रियेचा नुकताच अपराध केलेल्या'... इ. पद्यातून (प्रस्तुत ग्रंथ पृ. ३७८ पाहा) प्रकट होणारे ईर्ष्याविप्रलंभ व करुण हे दोन रस एरवी परस्पर-

विरोधी असले, तरी येथे ते विरोधी होत नाहीत; कारण ते रस या ठिकाणी मुख्य म्हणून प्रत्ययास येत नसून या पद्यात मुख्य म्हणून वर्णिलेल्या शंकराच्या लोकोत्तर प्रभावाची अंगे म्हणूनच प्रतीत होतात. या विधानाच्या समर्थनार्थ अभिनवांनी रोजच्या व्यवहारातलाच, पण बुद्धिमान लेखकांनाही सहजासहजी न सुचणारा एक बिनतोड दृष्टांत दिला आहे तो असा :—

पाणी आणि अग्नि यांत असलेले शीत व उष्ण हे गुणधर्म परस्परांचे बाधक आहेत. पण तेच जर तिसऱ्याला दुय्यम म्हणून उपयोगात आणले, तर ते एकमेकांचा बाध करतील ही शंकाही उपस्थित होत नाही. त्याच पाणी आणि विस्तव यांचा उपयोग तांदळावर संस्कार करण्यासाठी केला, तर त्या दोहोंमुळे त्या तांदळापासून मऊ भात तयार होतो !

---

२३. विभाव इ. संज्ञांच्या स्पष्टीकरणासाठी प्रस्तुत ग्रंथ, पृ. ८ वरील टीप २ री पाहा.

२४. या संज्ञेच्या अभिनवांनी सांगितलेल्या अर्थासाठी याच ग्रंथाच्या पृ. ५६ वरील ४ ते ९ या ओळी पाहा.

२५. या विषयाच्या सविस्तर विवरणासाठी ' भट्टनायक व अभिनवगुप्त–एक नवा दृष्टिकोन ' हा प्रा. बीरकरांचा विदर्भ संशोधन मंडळाच्या १९७८ च्या वार्षिकातला लेख पाहा.

२६. रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. १५३ वरील ऊर्ध्वोर्ध्व– इ. श्लोक पाहा.

२७. व्युत्पत्ति या काव्यप्रयोजनासंबंधी अधिक विस्ताराने चर्चा प्रा. मा. वा. पटवर्धन यांनी डेक्कन एज्युकेशन सोसायटीने १९७८ मध्ये प्रकाशित केलेल्या Principal V. S. Apte Commemoration volume मध्ये Vyutpatti as a purpose of poetry या आपल्या लेखात केली आहे.

# ध्वन्यालोकः

## प्रथम उद्द्योतः
## लोचनम्

श्रीभारत्यै नमः ।

अपूर्वं यद्वस्तु प्रथयति विना कारणकलां
जगद्ग्रावप्रख्यं निजरसभरात्सारयति च ।
क्रमात्प्रख्योपाख्याप्रसरसुभगं भासयति तत्
सरस्वत्यास्तत्त्वं कविसहृदयाख्यं विजयते ।।
भट्टेन्दुराजचरणाब्जकृताधिवास-
हृद्यश्रुतोऽभिनवगुप्तपदाभिधोऽहम् ।
यत्किंचिदप्यनुरणन्स्फुटयामि काव्या-
लोकं स्वलोचननियोजनया जनस्य ।।

## ध्वन्यालोक

## उद्द्योत पहिला
## लोचन

श्री सरस्वतीस नमस्कार असो.

'कवि व सहृदय' हे नाव असलेले[१] सरस्वती देवतेचे खरेखुरे (पारमार्थिक) चैतन्यस्वरूप सर्वांहून श्रेष्ठ होय; (कारण) ते (चैतन्य-स्वरूप) उपादान कारणाच्या[२] लवलेशावाचूनही अपूर्व (अद्‌भुत)[३] अशा (काव्य) सृष्टीचा पसारा उभारते. ते स्वरूप आपल्या रसनिर्भरतेमुळे

(एरवी) पाषाणतुल्य असलेल्या या जगामध्ये सार (म्हणजे चैतन्य) निर्माण करते[4] आणि (आधी) प्रतिभा व (मग) वर्णन,[5] ही क्रमाने प्रवर्तित झाल्यामुळे ते स्वरूप जगाला रमणीय रूपाने उजळविते.

भट्ट इन्दुराज[6] यांच्या चरणांपाशी निवास केल्यामुळे रमणीय (म्हणजे मनास प्रिय वाटणारे) ज्ञान संपादन केलेला 'अभिनवगुप्त' या नावाचा मी, माझ्या गुरुजींनी मला जे काही सांगितले त्याच्या आधाराने माझ्या 'लोचना'ची योजना करून 'काव्यालोक' लोकांसमोर स्पष्ट करीत आहे.

टीपा

१. मुळातल्या 'कविसहृदयाख्य' या शब्दाचा अर्थ (१) 'कवि व सहृदय' नावाचे, म्हणजे कवि व सहृदय यांच्या रूपाने असणारे. त्यांचे रूप म्हणजे या ठिकाणी त्यांचे शरीर नव्हे, तर, त्यांचे चैतन्यरूप' हा अर्थ घ्यायचा, किंवा (२) कवि व सहृदय यांच्या अंतःकरणात स्फुरित होणारे (हा **कविसहृदयाख्य** याचा दुसरा अर्थ).

२. कार्य निर्माण होण्यास कारणे पुष्कळ लागत असतील, पण त्यांपैकी ज्याचे कार्य बनलेले असेल, त्याला 'उपादानकारण' म्हणावयाचे. उदा. घटाचे उपादान कारण 'माती'.

३. ब्रह्मदेवाच्या सृष्टीशी तुलना करिता कवींची काव्यसृष्टि अपूर्वच. लौकिक सृष्टीत कमळ पाण्यातच उगवते, पण काव्यसृष्टीमध्ये (मुखरूपी) कमळ पाण्याशिवाय असू शकते. त्या (मुख) कमळातच (नेत्ररूपी दोन) निळी कमळे असू शकतात. अशा प्रकारे काव्यसृष्टि ही काही आगळीच (अपूर्व) आहे. अभिनवगुप्ताच्या या श्लोकाचा प्रभाव मम्मटाच्या मंगलाचरणपर श्लोकावर पडलेला उघडच दिसतो. (पाहा, 'काव्यप्रकाश, १ – १ व त्यावरील वृत्ति)

४. केशवसुतांच्या 'आम्ही कोण,' या कवितेतील पुढील ओळी लक्षात आणल्या म्हणजे या व यापुढील वाक्याचे स्वारस्य तेव्हाच उमगेल–

पाणिस्पर्शेचि आमुचा शकतसे वस्तुप्रती द्यावया
सौन्दर्यातिशया, अशी वसतसे जादू करामाजि या ॥

तसेच—

आम्हाला वगळा, गतप्रभ झणी होतील तारांगणे,
आम्हाला वगळा, विकेल, कवडीमोलापरी हे जिणे ॥

५. अश्या व उपाश्या या शब्दाचे विवरण कुंतकाने वक्रोक्तिजीवित, १-१२ वरील वृत्तीत केले आहे. त्याला अनुसरूनच आम्ही त्या शब्दांचे भाषांतर केले आहे.

६. अभिनवगुप्तांच्या (एका) गुरुचे नाव. यांच्या रचनांची अवतरणे अभिनवगुप्तांनी 'लोचना'त अनेक ठिकाणी दिली आहेत. पाहा. ध्वन्यालोकाची 'काशी' आवृत्ति, लोचन पृ. ८१, पृ. १२६, पृ. २७५ व पृ.४६५-६६. यांपैकी दोन ठिकाणी 'भट्ट इंदुराज' यांच्या नावाचा उल्लेख करताना 'अस्मदुपाध्याय' असा अभिनवगुप्तांनी निर्देश केला आहे.

'लोचन' म्हणजे ( १ ) डोळा आणि ( २ ) 'लोचन' नावाची अभिनवगुप्तांनी लिहिलेली टीका. 'लोचनाची योजना करून' म्हणजे 'लोचन–नामक टीका लिहून.' 'ध्वन्यालोक' या शब्दातील 'आलोक' शब्दाचा अर्थ 'प्रकाश' हा आहे. प्रकाश दिसावयास लोचन म्हणजे डोळे हवेतच ! तसेच 'ध्वन्यालोक' हा ग्रंथ समजावयास 'लोचन' या टीकेचे साहाय्य हवे ! तेव्हा 'लोचन' ही टीका लिहून लोकांना मी त्यांची स्वतःची दृष्टि देत आहे' असे अभिनवगुप्त म्हणतात.

८. ध्वन्यालोकाचे पहिले नाव 'काव्यालोक' असावे, कारण भट्टेन्दुराज- इ. श्लोकात आणि 'लोचन' टीकेच्या शेवटी ध्वन्यालोक, काशी आवृत्ति, पृ. ५५४ वर आणि त्यापूर्वी पृ. ५२० वर अभिनवगुप्तांनी ध्वन्यालोकाचा 'काव्यालोक' या नावानेच उल्लेख केला आहे. या ग्रंथाचा निर्देश सहृदयालोक, सहृदयहृदयालोक असाही काही ठिकाणी केलेला आढळतो. आनंदवर्धनांच्या 'तत्त्वालोक' नावाच्या एका ग्रंथाचा उल्लेख अभिनवगुप्तांनी काशी आवृत्तीच्या, पृ. ६७ वर केला आहे.

ध्वन्यालोकः

श्रीनृहरये नमः

स्वेच्छाकेसरिणः स्वच्छस्वच्छायायासितेन्दवः ।
त्रायन्तां वो मधुरिपोः प्रपन्नार्तिच्छिदा नखाः ॥

ध्वन्यालोक

श्रीनृसिंहाला नमस्कार असो.

स्वतःच्या इच्छेने सिंहाचे रूप, ( म्हणजे नृसिंहावतार ) घेतलेल्या

मधुरिपूची (मधुदैत्याचा शत्रु जो भगवान विष्णु, त्याची) नखे, की ज्या नखांनी आपल्या शुभ्र कान्तीने चंद्राला क्लेश दिला आणि जी शरणागतांच्या दुःखाचे विदारण करतात, ती तुमचे रक्षण करोत.

लोचनम्

स्वयमव्युच्छिन्नपरमेश्वरनमस्कारसम्पत्तिचरितार्थोऽपि व्याख्यातृश्रोतॄणामविघ्नेनाभीष्टव्याख्याश्रवणलक्षणफलसम्पत्तये समुचिताशीः–प्रकटनद्वारेण परमेश्वरसांमुख्यं करोति वृत्तिकारः – स्वेच्छेति।

मधुरिपोर्नखाः वो युष्मान्व्याख्यातृश्रोतॄंस्त्रायन्ताम्, तेषामेव सम्बोधनयोग्यत्वात्; सम्बोधनसारो हि युष्मदर्थः. त्राण चाभीष्टलाभं प्रति साहाय्यकाचरणं, तच्च तत्प्रतिद्वन्द्विविघ्नापसारणादिना भवतीति, इयदत्र त्राण विवक्षितम्। नित्योद्योगिनश्च भगवतोऽसम्मोहाध्यवसाययोगित्वेनोत्साहप्रतीतेर्वीररसो ध्वन्यते। नखानां प्रहरणत्वेन प्रहरणेन च रक्षणे कर्तव्ये नखानामव्यतिरिक्तत्वेन करणत्वात्सातिशयशक्तिता कर्तृत्वेन सूचिता, ध्वनितश्च परमेश्वरस्य व्यतिरिक्तकरणापेक्षाविरहः। मधुरिपोरित्यनेन तस्य सदैव जगत्त्रासापसारणोद्यम उक्तः। कीदृशस्य मधुरिपोः? स्वेच्छया केसरिणः न तु कर्मपारतन्त्र्येण, नाप्यन्यदीयेच्छया, अपि तु विशिष्टदानवहननोचिततथाविधेच्छापरिग्रहौचित्यादेव स्वीकृतसिंहरूपस्येत्यर्थः। कीदृशा नखाः? प्रपन्नानामार्तिं ये छिन्दन्ति। नखानां हि छेदकत्वमुचितम्, आर्तेः पुनश्छेद्यत्वं नखान्प्रत्यसम्भवनीयमपि तदीयानां नखानां स्वेच्छानिर्माणौचित्यात्सम्भाव्यत एवेति भावः। अथ वा त्रिजगत्कण्टको हिरण्यकशिपुर्विश्वस्योत्क्लेशकर इति स एव वस्तुतः प्रपन्नानां भगवदेकशरणानां जनानामार्तिकारित्वान्मूर्तैवार्तिस्तं विनाशयद्भिरार्तिरेवोच्छिन्ना भवतीति परमेश्वरस्य तस्यामप्यवस्थायां परमकारुणिकत्वमुक्तम्। किं च ते नखाः स्वच्छेन स्वच्छतागुणेन नैर्मल्येन; स्वच्छमृदुप्रभृतयो हि मुख्यतया भाववृत्तय एव, स्वच्छायया च वक्रहृद्यरूपयाऽऽकृत्याऽऽयासितः–खेदित इन्दुर्यैः। अत्रार्थशक्तिमूलेन ध्वनिना बालचन्द्रत्वं ध्वन्यते, आयासनेन तत्संनिधौ चन्द्रस्य विच्छायत्वप्रतीतिरहृद्यत्वप्रतीतिश्च ध्वन्यते। आयासकारित्वं च नखानां सुप्रसिद्धम्;

नरहरिनखानां तच्च लोकोत्तरेण रूपेण प्रतिपादितम् । किं च तदीयां स्वच्छतां कुटिलिमानं चावलोक्य बालचन्द्रः स्वात्मनि खेदमनुभवति, तुल्येऽपि स्वच्छकुटिलाकारयोगेऽमी प्रपन्नार्तिनिवारणकुशलाः, न त्वहमिति व्यतिरेकालङ्कारोऽपि ध्वनितः । किंचाहं पूर्वमेक एवासाधारणवैशद्य-हृद्याकारयोगात्समस्तजनाभिलषणीयताभाजनमभवम् अद्य पुनरेवंविधा नखा दश बालचन्द्राकाराः सन्तापार्तिच्छेदकुशलाश्चेति तानेव लोको बालेन्दुबहुमानेन पश्यति, न तु मामित्याकलयन्बालेन्दुरविरलमाया-समनुभवतीत्युत्प्रेक्षापह्नुतिध्वनिरपि । एवं वस्त्वलङ्काररसभेदेन त्रिधा ध्वनिरत्र श्लोकेऽस्मद्गुरुभिर्व्याख्यातः ।

लोचन

परमेश्वराला अखंडपणे उत्कटतेने नमस्कार करीत राहून वृत्तिकार स्वतः जरी कृतार्थ झाला असला, तरी ग्रंथाचे विवरण करणे व श्रवण करणे या स्वरूपाचे अभीष्ट फळ अनुक्रमे ग्रंथ शिकवणारे व व शिकणारे यांच्या पदरात निर्विघ्नपणे पडावे या हेतूने तो (वृत्तिकार) प्रथम 'स्वतःच्या इच्छेने' ... (**स्वेच्छाकेसरिणः**) इ. श्लोकाच्या द्वारे उचित असा आशीर्वाद प्रकट करून परमेश्वराची अनुकूलता संपादन करीत आहे—

मधुदैत्याच्या शत्रूची नखे तुमचे म्हणजे ग्रंथाचे विवरण करणाऱ्यांचे व श्रोत्यांचे रक्षण करोत, कारण (वृत्तिकाराने) विवरणकार व श्रोते यांनाच उद्देशून शुभकामना व्यक्त करणे हे योग्य आहे. 'तुम्ही' या शब्दाच्या अर्थाचे सार 'संबोधन' म्हणजे ज्यांना उद्देशून बोलावयाचे आहे त्यांचे लक्ष बोलणाऱ्याने आपल्याकडे वेधून घेणे हेच होय.

(ग्रंथाचे विवरणकार आणि श्रोते यांचे) रक्षण म्हणजे त्यांना अभीष्ट ते प्राप्त होण्यासाठी साहाय्य करणे आणि ते साहाय्य करण्याचे काम इष्टप्राप्तीच्या आड येणारी विघ्ने दूर सारणे इत्यादींच्या द्वारे होते. 'रक्षण' याचा (इष्टप्राप्तीसाठी साहाय्य करणे व विघ्ने दूर सारणे) हा इतका अर्थ वृत्तिकाराला या ठिकाणी अभिप्रेत आहे.

(दुराचारी दानवांचे निर्दालन करण्यासाठी) सदैव उद्योगशील असणाऱ्या भगवान् विष्णूच्या ( मी शरणागतांवर कृपा केली पाहिजे,

त्यांच्या शत्रूंचा नाश केला पाहिजे अशा प्रकारचा) न डगमगता निश्चय करण्याने त्याच्या ठिकाणचा 'उत्साह' या स्थायिभावाची[2] व्यंजनेने प्रतीति होते व म्हणूनच वृत्तीतील या श्लोकातून वीररस ध्वनित होत आहे. (रसध्वनि).

नखे ही (नरसिंहाची हिरण्यकशिपूवर) प्रहार करण्याची साधने आहेत आणि त्या साधनांनी प्रह्लादाचे हिरण्यकशिपूपासून रक्षण करावयाचे असले तरी नखे ही साधने (तरवार, धनुष्यबाण इत्यादीसारखी) बाह्य नसून शरीराचे अविभाज्य अवयव असल्याने या श्लोकात वृत्तिकाराने त्यांचा (तृतीया वापरून 'करण' या अर्थाने निर्देश न करता) कर्ता या अर्थाने निर्देश केल्यामुळे (म्हणजे वाक्यात नखे हा कर्ता केल्यामुळे) त्या नखांमध्ये विशेष शक्ति (म्हणजे विदारक व संरक्षक सामर्थ्य) आहे हे (वस्तुध्वनि[3] क्र. १) आणि परमेश्वराला बाह्य साधनांची गरज नसते हेही ध्वनित केले आहे. (वस्तुध्वनि क्र. २).

भगवान विष्णूबद्दल 'मधुरिपु' हा शब्द वापरून जगाला भय उत्पन्न करणाऱ्या शत्रूंचे निर्दालन करीत राहण्याचा त्याचा उद्योग सदैव चालू असतो हे सुचवले आहे. (वस्तुध्वनि क्र. ३). कशा प्रकारच्या मधुरिपूची (नखे)? तर स्वेच्छेने सिंहरूप घेतलेल्या. (पूर्व) कर्माच्या अधीन असल्यामुळे नव्हे, किंवा दुसऱ्या कोणाच्या इच्छेमुळेही नव्हे; तर विशेष प्रकारच्या दैत्याला (हिरण्यकशिपूला) ठार मारण्याच्या कार्याला अनुरूप असे नृसिंहरूप घेण्याची इच्छा मनात आणणे हे केवळ विष्णूलाच उचित असल्यामुळे ज्याने नृसिंहरूप घेतले आहे अशा (मधूरिपूची), हा आशय.

नखे कशा प्रकारची? तर जी शरणागतांचे दुःख 'तोडून' टाकतात अशी; कारण तोडून टाकण्याचा धर्म नखांमध्ये असणे स्वाभाविक आहे, पण (भक्तांच्या) दुःखाच्या ठिकाणी (दुःख हे अमूर्त असल्यामुळे) नखांकडून तोडले जाण्याचा धर्म असणे असंभवनीयच असले, तरी त्याने (म्हणजे नृसिंहाने) आपली नखे केवळ स्वेच्छेने निर्माण केलेली असल्यामुळे (तशा नखांनी तोडले जाण्याचा धर्म अमूर्त दुःखाचे ठिकाणी असणे) उचित, अत एव शक्य कोटीतले आहे, असा भावार्थ.

किंवा तिन्ही लोकांना काट्याप्रमाणे सलणारा हिरण्यकशिपु सर्व विश्वाला अतिशय क्लेश देणारा, म्हणून वस्तुतः तोच प्रपन्नांना म्हणजे केवळ भगवंताचाच आश्रय घेणाऱ्यांना दुःखदायक म्हणजे (खऱ्या अर्थाने) मूर्तिमंत दुःखच होय ! त्या हिरण्यकशिपूचा नाश करणाऱ्या नखांकडून (मूर्तिमंत) दुःखच संपूर्णपणे तोडले जाते, म्हणून त्या (म्हणजे हिरण्यकशिपुला ठार मारण्याच्या) अवस्थेतही परमेश्वराचा (भक्तजनांविषयीचा) कमालीचा दयाळूपणाच सुचवला गेला आहे. (वस्तुध्वनि क्र. ४)

आणखी असे की, स्वच्छ, मृदु इ. शब्द मुख्यत्वेकरून भाववाचक (म्हणजे स्वच्छतादि धर्मांचेच वाचक) असतात, म्हणून ती (नरसिंहाची) नखे आपल्या 'स्वच्छा'ने म्हणजे निर्मलतेने आणि आपल्या कांतीने, अर्थात् बाकदार आणि रम्य स्वरूपाच्या आकृतीने ज्यांनी चंद्राला आयासित केले, म्हणजे खेद दिला, अशी आहेत. या ठिकाणी 'अर्थशक्तिमूल'' ध्वनीने ('इन्दु' या शब्दातून) 'चंद्राची कोर' हा अर्थ सूचित होत आहे ! (वस्तुध्वनि क्र ५) 'आयास (म्हणजे खेद) उत्पन्न करणे' या द्वारे त्या नखांच्या सांनिध्यात चंद्रकोर निस्तेज व सौंदर्यहीन वाटते, हेही ध्वनित केले आहे. (वस्तुध्वनि क्र. ६).

नखांचे आयासकारित्व (म्हणजे इतरांना चिंतातुर करण्याचा धर्म) सुप्रसिद्धच आहे, आणि तो (म्हणजे चंद्रकोरीला चिंतातुर करण्याचा) धर्म नरहरीच्या नखांच्या ठिकाणी असामान्य प्रमाणात असल्याचे प्रतिपादन केले आहे. (वस्तुध्वनि क्र. ७).

आणखी असे की, त्या नखांची निर्मलता व कुटिलता (बाकदारपणा) पाहून चंद्रकोरीला आपल्या अन्तर्यामी खेद वाटतो की, निर्मल आणि वक्र आकाराचा संबंध माझ्यात आणि त्या नखांत सारखाच असला, तरी नख शरणागताचे दुःखनिवारण करण्यात कुशल आहेत. पण मी मात्र तशी नाही– अशा रीतीने व्यतिरेकालंकारही[४] सूचित होत आहे. (अलंकारध्वनि क्र. १).

आणखी असे की, पूर्वी मी एकटीच असामान्य निर्मलतेने आणि रमणीय आकृतीने युक्त असल्यामुळे सर्व लोकांना हवीशी वाटण्याजोगी होते, पण आज मात्र, अशा प्रकारची (लोकांना हवीशी वाटणारी)

नखे; तीही केवळ माझ्याच आकाराची, इतकेच नव्हे तर संख्येने दहा; आणि त्यातही ती नखे शरणागतांची मानसिक व शारीरिक दुःखे यांचे विदारण करण्यात कुशल, म्हणून त्यांच्याकडेच जग चंद्रकोरीबद्दल वाटावा अशा आदराने पाहाते आणि माझ्याकडे मात्र पाहात नाही असा विचार करीत चंद्रकोर मनामध्ये अखंड झुरत आहे; अशा प्रकारे उत्प्रेक्षाध्वनि[६] व अपह्नुतिध्वनि[७] देखील या ठिकाणी आहेत (अलंकार-ध्वनि क्र. २ व ३) या प्रमाणे वस्तु, अलंकार व रस या प्रकारांमुळे तिन्ही प्रकारचे ध्वनि या श्लोकात आमच्या गुरूंनी विशद करून सांगितले आहेत.

## टीपा

१. ध्वन्यालोकातील वृत्तिग्रंथाचा कर्ता, (आनन्दवर्धन).

२. स्थायी भाव, विभाव, अनुभाव, व व्यभिचारी भाव :– जीवनातील 'रति' (कान्त व कान्ता यांचे एकमेकांविषयीचे प्रेम) वगैरे स्थिर चित्तवृत्ती जेव्हा काव्यात किंवा नाटकात चित्रित केल्या जातात. तेव्हा त्यांना 'स्थायी भाव' म्हणतात. लौकिक जीवनात या स्थिरवृत्ती उत्पन्न वा उद्दीपित करणारी कारणे (उदा. स्त्रीच्या मनात रति उत्पन्न करणारे कारण तिचा प्रियकर व उद्दीपित करणारी कारणे वसंतऋतु, लताकुंज वगैरे) काव्य-नाट्यात वर्णिली की, त्या कारणांना त्या स्थायी भावाचे 'विभाव' म्हणतात. या स्थिर-वृत्तींची कार्ये म्हणजे परिणाम ( उदा. रति उत्पन्न झाल्याचे परिणाम म्हणजे स्वेद, रोमांच इ.) काव्य नाट्यात 'अनुभाव' म्हणून ओळखली जातात. त्या स्थिरवृत्तींची पोषक सहकारी कारणे (उदा. कांतेच्या मनात उदित होणारे लज्जा, हर्ष इ. सहकारी भाव हे कान्ताच्या मनातील रतिभावाची पोषक कारणे) काव्य–नाट्यांत 'व्यभिचारी भाव' किंवा संचारी भाव होतात. या विभावादिकांच्या उत्कृष्ट मिलाफाने रसिकाच्या हृदयात संस्काररूपाने असलेले रत्यादि स्थायी भाव सुन्दर रूप घेऊन जागृत होतात. यालाच शृंगारादि रस 'अभिव्यक्त होतात' असे म्हणतात. रति हा जसा शृंगाराचा, तसा 'उत्साह' हा वीररसाचा स्थायी भाव होय.

३. 'वस्तु' म्हणजे शब्दात मांडून दाखविता येईल असा अर्थ. ज्या ठिकाणी असा अर्थ प्रामुख्याने 'सूचित' झालेला असतो (म्हणजे असा अर्थ शब्दांत मांडून दाखविता येईल असा असला तरी तो ज्या विशिष्ट उदाहरणात प्रत्यक्ष शब्दांत मांडून न दाखविता सुचविलेला असतो ) त्या उदाहरणाला 'वस्तु-

ध्वनी 'चे उदाहरण म्हणावयाचे. प्रस्तुत उदाहरणात त्या नखांमध्ये विशेष विदारक व संरक्षक सामर्थ्य आहे, हा अर्थ प्रत्यक्ष शब्दांनी सांगितला नाही, तर ' सूचित ' केला आहे.

४. ध्वनीच्या या प्रकारची माहिती आपणास पुढे उद्द्योत २, कारिका २२ मध्ये होईल. सध्या इतके पुरे आहे–अर्थशक्तिमूल ध्वनीच्या उदाहरणात असा वाच्य अर्थ असतो की, जो केवळ आपल्याच सामर्थ्याने दुसरी 'वस्तु' ('वस्तु' शब्दाच्या अर्थासाठी वरील ३ री टीप पाहा.) प्राधान्याने सूचित करतो. आपल्याच सामर्थ्याने, म्हणजे त्या उदाहरणात सुचवलेल्या वस्तूचे वाचक शब्द नसतात, तर वाच्य अर्थाच्या वाचक शब्दांनी जो वाच्यार्थ सांगितला जातो, त्यामुळेच दुसरा अर्थ सूचित होतो. अशा उदाहरणात सूचितार्थाचा बोध द्व्यर्थी योजनेमुळे होणारा नसतो.

५. उपमानाहून उपमेय वरचढ आहे असे वर्णन जेथे असते, तेथे ' व्यतिरेक ' अलंकार असतो. येथे व्यतिरेक (बालचंद्राहून नखे अधिक चांगली) सरळ शब्दांनी सांगितलेला नसून सूचित झालेला आहे.

६. 'अमुक एक कारणास्तव चंद्राला जणू काय खेद वाटतो' यात कारण कल्पिलेलेच आहे; कारण चंद्र अचेतन असल्यामुळे त्याला मन नाही व म्हणून त्याच्या मनात विचारही येणे शक्य नाही. येथे कारण कल्पिलेले, म्हणून हेतूत्प्रेक्षा व तो हेतु श्लोकातील शब्दांनी सरळ न सांगता सुचविलेला, म्हणून येथे ' उत्प्रेक्षाध्वनि.'

७. लोक नखांना नखे न समजता चंद्रकोरी समजतात, अशा प्रकारे येथे ' अपह्नुति आहे. ती अपह्नुतिदेखील शब्दांनी सरळ सांगितली नाही, तर सुचविली आहे; म्हणून येथे ' अपह्नुतिध्वनि आहे ' (अपह्नुति या अलंकाराच्या आणखी माहितीसाठी पुढे कारिका १३ वरील वृत्तीच्या ' आक्षेप अलंकारात देखील '... या भागावरील ६ वी टीप पाहा.

— —

ध्वन्यालोकः

> काव्यस्यात्मा ध्वनिरिति बुधैर्यः समाम्नातपूर्वः
> तस्याभावं जगदुरपरे भाक्तमाहुस्तमन्ये ।
> केचिद्वाचां स्थितमविषये तत्त्वमूचुस्तदीयं
> तेन ब्रूमः सहृदयमनःप्रीतये तत्स्वरूपम् ॥ १ ॥

ध्वन्यालोक

‘ ध्वनि ’ हा काव्याचा आत्मा ’ असे म्हणून (काव्याच्या यथार्थ स्वरूपाचे ) जाणकार ज्याबद्दल पूर्वीपासून उत्तमप्रकार सांगत आले, ( ‘ तो नाहीच ’ म्हणजे ) ‘ त्याचा अभावच आहे ’ असे इतर लोकांनी म्हटले, दुसरे ( कोणी ) त्याला ‘ लाक्षणिक अर्थ ’ म्हणाले. काहींनी त्याचे यथार्थ स्वरूप शब्दांनी वर्णन करता येण्यापैकी नाही ’ असे प्रतिपादिले. त्यामुळे सहृदयांच्या मनाच्या संतोषासाठी त्या (ध्वनी) चे स्वरूप आम्ही सांगत आहोत. ॥ १ ॥

बुधैः काव्यतत्त्वविद्भिः, काव्यस्यात्मा ध्वनिरिति संज्ञितः, परम्परया यः समाम्नातपूर्वः सम्यक् आ समन्तात् म्नातः प्रकटितः, तस्य सहृदयजनमनःप्रकाशमानस्याप्यभावमन्ये जगदुः ।

जाणकारांनी, म्हणजे काव्याचे यथार्थ स्वरूप जाणणारांनी, ज्या काव्याच्या आत्म्याला ‘ ध्वनि ’ असे नाव दिले व जो (पूर्वीपासून) परंपरेने चहूकडे अगत्याने प्रकट केला, तो सहृदयांच्या मनांत प्रकाशमान होत असूनही, ‘ त्याचा अभाव आहे ’ असे इतरांनी म्हटले !

लोचनम्

अथ प्राधान्येनाभिधेयस्वरूपमभिदधदप्रधानतया प्रयोजनप्रयोजनं तत्संबद्धं प्रयोजनं च सामर्थ्यात्प्रकटयन्नादिवाक्यमाह — काव्यस्यात्मेति ।

काव्यात्मशब्दसंनिधानाद् बुधशब्दोऽत्र काव्यात्मावबोधनिमित्तक इत्यभिप्रायेण विवृणोति—काव्यतत्त्वविद्भिरिति । आत्मशब्दस्य तत्त्वशब्देनार्थं विवृण्वानः सारत्वमपरशब्दवैलक्षण्यकारित्वं च दर्शयति । इतिशब्दः स्वरूपपरत्वं ध्वनिशब्दस्याचष्टे, तदर्थस्य विवादास्पदीभूततया निश्चयाभावेनार्थत्वायोगात् । एतद्विवृणोति—संज्ञित इति । वस्तुतस्तु न

तत्संज्ञामात्रेणोक्तम्, अपि त्वस्त्येव ध्वनिशब्दवाच्यं प्रत्युत समस्तसारभूतम् । न ह्यन्यथा बुधास्तादृशमामनेयुरित्यभिप्रायेण विवृणोति—तस्य सहृदयेत्यादिना । एवं तु युक्ततरम् - इतिशब्दो भिन्नक्रमो वाक्यार्थपरामर्शकः, ध्वनिलक्षणोऽर्थः काव्यस्यात्मेति यः समाम्नात इति । शब्दपदार्थकत्वे हि ध्वनिसंज्ञितोऽर्थ इति का सङ्गतिः ? एवं हि ध्वनिशब्दः काव्यस्यात्मेत्युक्तं भवेद्, गवित्ययमाहेति यथा । न च विप्रतिपत्तिस्थानमसदेव, प्रत्युत सत्येव धर्मिणि धर्ममात्रकृता विप्रतिपत्तिरित्यलमप्रस्तुतेन भूयसा सहृदयजनोद्वेजनेन । बुधस्यैकस्य प्रामादिकमपि तथाभिधानं स्यात्, न तु भूयसां तद्युक्तम् । तेन बुधैरिति बहुवचनम् । तदेव व्याचष्टे—परम्परयेति । अविच्छिन्नेन प्रवाहेण तैरेतदुक्तं विनाऽपि विशिष्टपुस्तकेषु विनिवेशनादित्यभिप्रायः । न च बुधा भूयांसोऽनादरणीयं वस्त्वादरेणोपदिशेयुः, एतच्चादरेणोपदिष्टम् । तदाह – सम्यगाम्नातपूर्व इति । पूर्वग्रहणेनेदम्प्रथमता नात्र सम्भाव्यत इत्याह. व्याचष्टे च सम्यगासमन्ताद् म्नातः प्रकटित इत्यनेन । तस्येति । यस्याभिगमाय प्रत्युत यतनीयं, का तत्राभावसम्भावना । अतः किं कुर्मः, अपारं मौर्ख्यमभाववादिनामिति भावः ।

लोचन

आता मुख्यतः ग्रन्थाचा 'विषय' म्हणजे 'ध्वनीचे स्वरूप' सांगण्याकरिता आणि अप्रधानपणे (म्हणजे अनुषंगाने) 'प्रयोजनाच्या प्रयोजनाचा[३]' (म्हणजे गौण प्रयोजनाचा चतुर्थ्यन्त पदाच्या अर्थाच्या सामर्थ्याने) व त्याच्याशी (कारण या नात्याने) संबद्ध असलेल्या मुख्य प्रयोजनाचा संपूर्ण वाक्याच्या अर्थाच्या सामर्थ्याने बोध करून देण्याकरिता 'काव्याचा आत्मा... ...' इ. पहिले वाक्य ग्रंथकार सांगत आहेत.

'बुध' हा शब्द कारिकेत 'काव्याचा आत्मा' या शब्दांच्या सान्निध्यात उपयोजिला असल्याने तो (शब्द), 'ज्यांना काव्याच्या सारभूत तत्त्वाचे ज्ञान झाले आहे ते' हा अर्थ प्रकट करण्यासाठी आहे हे वाचकांच्या ध्यानात यावे म्हणून 'बुध' या शब्दाचे विवरण (वृत्तिकार) 'काव्याचे तत्त्व (म्हणजे यथार्थ स्वरूप) जाणणारे' असे

करतात. 'आत्मा' या शब्दाचा अर्थ वृत्तिकारांनी तत्त्व (म्हणजे यथार्थ स्वरूप) या शब्दाने स्पष्ट केला असल्याने तो (ध्वनि) सारभूत (म्हणजे उत्कृष्ट) असून शब्दांनी बोध करून दिल्या जाणाऱ्या इतरांहून (म्हणजे वाच्य व लक्ष्य या अर्थांहून) आगळाच आहे असे दर्शविले आहे.

कारिकेतील ध्वनिरिति यातला इति हा शब्द असे दर्शवितो की, त्या इति शब्दाच्या पूर्वी वापरलेल्या ध्वनिः या पदाचा अर्थ केवळ 'ध्वनि' या शब्दाचे स्वरूप, म्हणजे 'ध्वनि हे नाव' इतकाच आहे. ('व्यंग्यार्थ' हा नाही). याचे कारण ध्वनीचा (व्यंग्यार्थ हा) 'अर्थ' हा अद्यापि वादाचा विषय असल्याने त्या अर्थाने बाबतीत निश्चय झालेला नाही, म्हणून येथे 'ध्वनि' या शब्दाने 'व्यंग्य अर्थ' विवक्षित असणे शक्य नाही. हीच गोष्ट वृत्तिकार इति संज्ञितः (म्हणजे अशी 'संज्ञा' ज्याला आहे असा) या शब्दांनी स्पष्ट करतात.[४]

पण वास्तविक पाहता येथे ध्वनिः हा शब्द केवळ 'ध्वनि ही संज्ञा' या अर्थाने वापरलेला नाही. उलट 'ध्वनि' हा शब्द ज्या (म्हणजे व्यंग्य अर्थ या) अर्थाने वापरलेला आहे. तो व्यंग्य अर्थ सर्व उत्तम काव्यांचा महत्त्वाचा गाभा असतो यात मुळीच शंका नाही. तो तसा म्हणजे (पूर्वी सिद्ध असलेला) नसता, तर आणकारांनी तसल्या विवाद्य वस्तूची काव्याचा आत्मा म्हणून प्रसिद्धि केली नसती. याच अभिप्रायाने वृत्तिकार 'ध्वनि' शब्दाने सांगितल्या जाणाऱ्या 'व्यंग्यार्था'चे 'सहृदयांच्या अन्तःकरणात प्रकाशमान होणारा' असे विवरण करतात.

परंतु पुढील प्रकारे विवरण केल्यास ते अधिक योग्य होईल – इति शब्दाचा संबंध (केवळ ध्वनिः या शब्दाशीच न जोडता त्याचा) क्रम बदलून (काव्यस्यात्मा ध्वनिः या) संपूर्ण वाक्याशी जोडावा. (कशा प्रकारे ? तर) 'जो ध्वनिरूप अर्थ काव्याचा आत्मा आहे' म्हणून (इति) सांगितला गेला आहे' अशा प्रकारे वाक्याशी जोडावा.)

ध्वनि या पदाचा अर्थ ध्वनि हा शब्द (म्हणजे ध्वनि हे नाव) इतकाच घेतल्यास वृत्तीमधील 'ध्वनि हे नाव असलेला अर्थ' याची संगति कशी लावणार ? कारण असे केल्याने 'ध्वनि हा शब्द काव्याचा आत्मा होय' असे म्हटल्यासारखे होईल ! ज्याप्रमाणे 'गो असे हा

म्हणतो ' असे म्हटल्याने होईल, त्याप्रमाणे.

आणि जी गोष्ट विवादाचा विषय असते, ती गोष्ट अस्तित्वात नसणारीच असते असे नाही. उलट एखादी वस्तु अस्तित्वात असेल, तरच तिच्या ठिकाणी असणाऱ्या गुणधर्मांच्या बाबतीत मतभेद होऊ शकतात.[२] असो. अप्रस्तुताची फार चर्चा करून सहृदयांच्या मनाला कंटाळा आणणे पुरे. तशा प्रकारचे (म्हणजे ध्वनि हा काव्याचा आत्मा होय....या प्रकारचे) म्हणणे एखाद्याच विद्वानाचे असते, तर ते 'चुकीचे' असेही म्हणता आले असते. पण पुष्कळ विद्वानांचे म्हणणे चुकीचे समजणे योग्य नव्हे. म्हणून 'बुधांनी' (जाणकारांनी) असे बहुवचन वापरले आहे. त्याचेच विवरण (वृत्तिकार) 'परम्परेने' या शब्दाने करतात.

जरी जाणकारांनी आपले म्हणणे विशिष्ट पुस्तकात नमूद केलेले नसले, तरी अखंडित (मौखिक) परम्परेने ते सांगत आले, हा (वृत्ति-काराचा) आशय. आणि पुष्कळसे विद्वान् उपेक्षणीय वस्तूबद्दल आदराने उपदेश करीत बसणार नाहीत, पण हे तर त्यांनी आदराने सांगितले आहे! म्हणून (वृत्तिकार) म्हणतात-- "पूर्वीपासून मोठ्या आग्रहाने सांगितलेला." 'पूर्वीपासून' हा शब्द वापरला असल्याने 'ध्वनि हा काव्याचा आत्मा होय' हे मत आता पहिल्यानेच सांगितले जात आहे असे म्हणणे शक्य नाही, असे कारिका सांगते. आणि मोठ्या अगत्याने, आ म्हणजे चहूकडे (म्हणजे अनेकांनी पुन्हा पुन्हा) म्नातः म्हणजे प्रकट केलेला. इ. शब्दांनी (वृत्तिकार) विवरण करतात.

**त्याचा (अभाव)** .. इ - ज्याच्या ज्ञानासाठी वस्तुतः प्रयत्न करावयास हवा, त्याच्या बाबतीत (उलट) त्याच्या अभावाबाबतची कसली कल्पना? म्हणून ('ध्वनि नाही' असे काही लोक जे म्हणतात, त्याला) आम्ही काय करणार, त्या अभाववाद्यांच्या मूर्खपणाला पारा-वार नाही, हा आशय.

**टीपा**

१ या कारिकेतल्या 'ध्वनि' या शब्दाचा अर्थ 'रमणीय व्यंग्यार्थ' हा समजावा.

२. 'लाक्षणिक' शब्दाचे अधिक स्पष्टीकरण याच कारिकेवरील वृत्तीच्या 'पण दुसरे त्याला लाक्षणिक म्हणतात' ...या भागावरील १ त्याच टीपेमध्ये पाहा.

३. 'त्या ध्वनीचे स्वरूप आम्ही सांगत आहोत' असे कारिकेत म्हटले असल्याने 'ध्वनीचे स्वरूप' हा ग्रंथाचा मुख्य विषय झाला. सहृदयांना 'ध्वनीच्या स्वरूपाचे ज्ञान घडवणे' हे ग्रंथाचे मुख्य प्रयोजन. पण हे ज्ञान तरी कशासाठी घडवावयाचे ? तर त्यामुळे सहृदयांच्या मनास आनंद वाटावा, म्हणून तेव्हा 'सहृदयांच्या मनास आनंद देणे हे वरील 'मुख्य प्रयोजनाचे प्रयोजन (म्हणजे गौण, आनुषंगिक प्रयोजन) होय. ह्या गौण प्रयोजनाशी कारण या नात्याने शबद्ध असलेले (मुख्य) प्रयोजन म्हणजे ध्वनीच्या स्वरूपाचे ज्ञान करून देणे हे आहे. प्रयोजनाचे प्रयोजन 'सहृदयमनःसंतोषासाठी' या चतुर्थ्यंत पदानेच सांगितले असल्याने (सर्व वाक्याचा तो मुख्य आशय नव्हे, म्हणून) ते वाक्याच्या मुख्य अर्थाच्या दृष्टीने अप्रधान (गौण) च होय.

४. वास्तविक हे मत अभिनवगुप्तांचेही नाही किंवा वृत्तिकारांचेही नाही; पण असे मत कोणी मांडले, तर ते बरोबर होणार नाही हे दाखविण्यासाठीच केवळ हे मत मांडले, इतकेच. यापुढील 'पण वास्तविक पाहता' ...वगैरे शब्दांनी सांगितलेल्या मताप्रमाणे इति या शब्दाचा संबंध केवळ 'ध्वनि' या स्वनात्मक शब्दाशी किंवा नावाशी नसून व्यंग्यार्थ या अर्थाचा बोध करून देणाऱ्या ध्वनि या शब्दाशी आहे. पण, अभिनवगुप्त याहूनही चांगला मार्ग सुचवतात, तो असा - 'इति' चा संबंध संपूर्ण वाक्याकडेच न्यावयाचा, म्हणजे 'ध्वनिरूपी अर्थ हा काव्याचा आत्मा होय' असे (इति) जे पूर्वीच्या विद्वानांनी म्हटले आहे- असा अर्थ करणे अधिक योग्य होईल. म्हणजे ध्वनि = ध्वनि नावाचा 'शब्द' नव्हे, तर 'ध्वनिनामक व्यंग्यार्थ' असे निष्पन्न होते.

५. म्हणजे हा 'गो' या शब्दाचा उच्चार करतो, इतकेच. हे वाक्य पाणिनीच्या १-१-४४ या सूत्रावरील पतञ्जलीच्या महाभाष्यातून घेतलेले आहे.

६. यावरून अभिनवगुप्तांना असे म्हणावयाचे आहेसे दिसते की, ज्या अर्थी ध्वनीच्या बाबतीत मतभेद आहेत, त्या अर्थी ध्वनि ही गोष्ट अस्तित्वात आहे आणि जे काही मतभेद असतील ते त्या ध्वनीच्या ठिकाणच्या गुणधर्माबाबत असतील.

———

ध्वन्यालोकः

तदभाववादिनां चामी विकल्पाः संभवन्ति ।

ध्वन्यालोक

त्याचा अभाव प्रतिपादन करणारांचे हे ( पुढील प्रकारांचे ) पक्ष संभवतात.

लोचनम्

न चास्माभिरभाववादिनां विकल्पाः श्रुताः, किं तु सम्भाव्य दूषयिष्यन्ते, अतः परोक्षत्वम्। न च भविष्यद्वस्तु दूषयितुं युक्तम्, अनुत्पन्नत्वादेव। तदपि बुद्ध्यारोपितं दूष्यत इति चेत्; बुद्ध्यारोपितत्वादेव भविष्यत्वहानिः। अतो भूतकालोन्मेषात् पारोक्ष्याद्विशिष्टाद्यतनत्वप्रतिभानाभावाच्च लिटा प्रयोगः कृतः — जगदुरिति।

तद्व्याख्यानायैव सम्भाव्य दूषणं प्रकटयिष्यति। सम्भावनाऽपि नेयमसम्भवतो युक्ता, अपि तु सम्भवत एव, अन्यथा सम्भावनानामपर्यवसानं स्यात् दूषणानां च। अतः सम्भावनामभिधायिष्यमाणां समर्थयितुं पूर्वं सम्भवन्तीत्याह। सम्भाव्यन्त इति तूच्यमाने पुनरुक्तार्थमेव स्यात्। न च सम्भवस्यापि सम्भावना, अपि तु वर्तमानतैव स्फुटेति वर्तमानेनैव निर्देशः। ननु च सम्भवद्वस्तुमूलया सम्भावनया यत्सम्भावितं तद् दूषयितुमशक्यमित्याशङ्क्याह—विकल्पा इति। न तु वस्तु सम्भवति तादृक् यत इयं सम्भावना, अपि तु विकल्पा एव। ते च तत्त्वावबोधवन्ध्यतया स्फुरेयुरपि, अत एव 'आचक्षीरन्' इत्यादयोऽत्र सम्भावनाविषया लिङ्प्रयोगा अतीतपरमार्थं पर्यवस्यन्ति। यथा—

यदि नामास्य कायस्य यदन्तस्तद्बहिर्भवेत्।
दण्डमादाय लोकोऽयं शुनः काकांश्च वारयेत्॥

इत्यत्र। यद्येवं कायस्य वृत्ता स्यात्तदैवमवलोक्येतेति भूतप्राणतैव। यदि न स्यात्ततः किं स्यादित्यत्रापि, किं वृत्तं यदि पूर्ववन्न भवनस्य सम्भावनेत्ययमेवार्थ इत्यलमप्रकृतेन बहुना। तत्र समयापेक्षणेन शब्दोऽर्थप्रतिपादक इति कृत्वा वाच्यव्यतिरिक्तं नास्ति व्यङ्ग्यम्, सदपि वा

तदभिधावृत्त्याऽस्पृष्टं शब्दावगतार्थबलाकृष्टत्वाद्भाक्तम्, तदनाक्षिप्तमपि वा न वक्तुं शक्यं कुमारीष्विव भर्तृसुखमलक्षयितृषु इति त्रय एवैते प्रधानविप्रतिपत्तिप्रकाराः। तत्राभावविकल्पस्य त्रयः प्रकाराः। शब्दार्थगुणालङ्काराणामेव शब्दार्थशोभाकारित्वाल्लोकशास्त्रातिरिक्तसुन्दरशब्दार्थमयस्य काव्यस्य न शोभाहेतुः कश्चिदन्योऽस्ति योऽस्माभिर्न गणित इत्येकः प्रकारः। यो वा न गणितः स शोभाकार्येव न भवतीति द्वितीयः। अथ शोभाकारी भवति तर्ह्यस्मदुक्त एव गुणे वाऽलङ्कारे वाऽन्तर्भवति, नामान्तरकरणे तु कियदिदं पाण्डित्यम्।

अथाप्युक्तेषु गुणेष्वलङ्कारेषु वा नान्तर्भावः, तथापि किंचिद्विशेषलेशमाश्रित्य नामान्तरकरणमुपमाविच्छित्तिप्रकाराणामसंख्यत्वात्। तथापि गुणालङ्कारव्यतिरिक्तत्वाभाव एव। तावन्मात्रेण च किं कृतम्? अन्यस्यापि वैचित्र्यस्य शक्योत्प्रेक्षत्वात्। चिरन्तनैर्हि भरतमुनिप्रभृतिभिर्यमकोपमे एव शब्दार्थालङ्कारत्वेनेष्टे, तत्प्रपञ्चदिक्प्रदर्शनं त्वन्यैरलङ्कारकारैः कृतम्। तद्यथा — 'कर्मण्यण्' इत्यत्र कुम्भकाराद्युदाहरणं श्रुत्वा स्वयं नगरकारादिशब्दा उत्प्रेक्ष्यन्ते, तावता क आत्मनि बहुमानः। एवं प्रकृतेऽपीति तृतीयः प्रकारः। एवमेकस्त्रिधा विकल्पः, अन्यौ च द्वाविति पञ्च विकल्पा इति तात्पर्यार्थः।

लोचन

आणि अभाववाद्यांचे प्रकार आमच्या ऐकिवात नाहीत, पण त्या प्रकारांच्या शक्यतेची कल्पना करून आम्ही त्यातील दोष दाखवणार आहोत. म्हणून (म्हणजे ते प्रकार आम्हांला प्रत्यक्ष माहीत झालेले नाहीत, केवळ कल्पिलेलेच आहेत, म्हणून) त्या प्रकारांमध्ये 'परोक्षत्व' (म्हणजे प्रत्यक्ष अनुभवाचा विषय न होणे हे) आहे. आणि यावर जर कोणी असे म्हणेल की, भविष्यकाळच्या उदरात लपलेल्या गोष्टीतले दोष दाखविणे योग्य नाही; का, तर ती खरोखरी उत्पन्न झाली नाही हेच त्याचे कारण. आणि ती गोष्ट केवळ भविष्यकालीन आहे, इतकेच नव्हे, तर तुम्ही मनात त्या गोष्टीची (मुद्दाम) कल्पना करून तीतील दोष दाखवीत आहात, तर त्याला उत्तर हेच की, मनात तिची कल्पना केली गेल्यामुळेच तिच्या ठिकाणी भविष्यकालीनत्व राहात नाही.

म्हणून भूतकाळाची झाक प्राप्त झाल्यामुळे,[१] तसेच ते प्रकार परोक्ष असल्याने (म्हणजे प्रत्यक्ष ऐकलेले नसल्याने) आणि ते विशिष्ट म्हणजे व्यावहारिक किंवा वास्तव वर्तमानकाळातले नसल्यामुळे कारिकेत जगदुः असा परोक्षभूतकाळाचा प्रयोग केला आहे.

या (परोक्षभूतकाळा)चे स्पष्टीकरण करण्यासाठीच (वृत्तिकार) अभावाच्या प्रकारांची कल्पना करून त्यात दोष दाखवणार आहेत. ही कल्पनासुद्धा संभवनीय म्हणजे शक्य कोटीतल्या गोष्टीची करणे योग्य, असंभवनीय गोष्टींची नव्हे.[२] नाहीतर कल्पनांना आणि दोषांना अंतच राहणार नाही.[3] म्हणून पुढे सांगण्यात येणार असलेल्या (अभाववादाच्या) प्रकारांच्या कल्पनेचे शक्यतेच्या दृष्टीने समर्थन करण्यासाठी वृत्तिकारांनी आधी अभाववादाचे तीन प्रकार 'संभवतात' असे म्हटले. 'कल्पिले जात आहेत' असे जर त्यांनी म्हटले असते, तर 'विकल्पांची (म्हणजे कल्पित प्रकारांची) कल्पना केली जात आहे' असे म्हटल्यासारखे होऊन त्यामुळे (कल्पना करणे या अर्थाची) पुनरुक्तीच झाली असती. आणि 'संभवतात' असे न म्हणता 'संभवू शकतील' असे म्हणणे योग्य नाही. कारण संभव हा वर्तमानकाळातला हे स्पष्ट असल्याने[४] वृत्ति-कारांनी संभवाचा निर्देश 'संभवतात' या वर्तमानकालीच क्रियापदाने केला.

'पण कायही, संभवनीय गोष्ट जिचा आधार आहे, अशा कल्पनेने जे कल्पिले, त्यात दोष काढणे अशक्यच नाही का?' अशी शंका कोणी घेईल, म्हणूनच वृत्तिकारांनी 'विकल्प' (निराधार कल्पना) हा शब्द वापरला. या विकल्पांना आधार असलेले वस्तुरूप असे काही नाही, पण हे विकल्प म्हणजे केवळ कल्पनेचा विलासच होय. आणि हे विकल्प ध्वनीचे यथार्थ स्वरूप न कळल्याने सुचू शकतीलही. म्हणूनच 'कल्पना' हा आशय असलेली आचक्षीरन् (म्हणतील), इ. जी शक्यतार्थक विध्यर्थी क्रियापदे वृत्तिकारांनी पुढे वापरली आहेत, त्या सर्वांचे भूत-काळातच पर्यवसान होते.[५] ज्याप्रमाणे पुढील श्लोकात—

'या शरीराच्या आत जे आहे,[६] ते जर बाहेरच्या बाजूस दिसू लागेल, तर या जगातील लोक काठ्या घेऊन कुत्र्यांना व कावळ्यांना हाकलत बसतील.'[७]

(या श्लोकात) 'जर शरीर याप्रमाण दिसले, तर असे (म्हणजे लोक कुब्याकावळयांना हाकलत बसलेले) पाहावयास मिळेल अशा आशयामुळे 'दिसेल' सारख्या विध्यर्थी क्रियापदाचे मुख्यतः भूतकाळ हेच सार आहे.

'जर (असे) नसेल, तरी काय होईल' या (निषेधरूप) वाक्यातही पूर्वीप्रमाणे होण्याचा (म्हणजे आतले बाहेर न दिसण्याचा) संभव नसेल, तरी काय झाले[८] ? असाच, भूतकालाचाच अर्थ आहे. (पण) असो, या प्रकारची अप्रस्तुताची फार चर्चा पुरे झाली

आता संकेताच्या[९] आधारे (च) शब्द अर्थाचा बोध करून देतो, म्हणून वाच्यार्थाहून वेगळा (असा) व्यंग्य अर्थ नाहीच[१०] किंवा शब्दाला वाच्य अर्थाहून निराळा अर्थ असतो असे मानले, तरीदेखील तो अभिधावृत्ति[११] कुंठित झाल्यामुळे आक्षिप्त[१२] म्हणजे खेचून आणलेला व शब्दावरून समजणारा वाच्यार्थ बाधित झाल्यामुळे ओढून आणलेला असल्यामुळे तो 'भाक्त' (म्हणजे लाक्षणिक) होय. तो अभिधावृत्तीने आक्षिप्त नसतो असे मानले, तरी त्याचे यथार्थ स्वरूप शब्दांनी सांगणे शक्य नाही, जसे भर्त्याचे सुख न जाणणाऱ्या कुमारींना त्या सुखाची कल्पना शब्दांनी देणे अशक्य आहे, त्याप्रमाणे.

अशा रीतीने ध्वनिविरोधाचे तीन मुख्य प्रकार झाले. त्यांत अभाववाद या विकल्पाचे तीन (उप) प्रकार—१. काव्याला शोभा आणण्याचे काम शब्दगुण, शब्दालंकार, अर्थगुण व अर्थालंकार हेच करतात. लौकिक[१३] व शास्त्रीय शब्दार्थाहून भिन्न अशा सुंदर शब्दार्थांनी जे परिपूर्ण असते. तेच 'काव्य' होय. त्याच्या शोभेस आम्ही (म्हणजे आजपर्यंतच्या काव्यशास्त्रकारांनी) विचारात घेतली नाही अशी निराळी कोणतीतरी वस्तू कारणीभूत असणे शक्य नाही हा एक (उप) प्रकार होय. (२) किंवा जी आम्ही विचारात घेतली नाही, ती वस्तू शोभाकारक नाहीच हा दुसरा प्रकार. (३) आणि ती शोभाकारक असेलच, तर तिचा अन्तर्भाव आम्ही सांगितलेल्या गुण किंवा अलंकारातच होईल, त्याला केवळ दुसरे नाव देण्यात कितीसे पाण्डित्य आहे ?

आणि जरी (पूर्वसूरींनी) सांगितलेल्या गुणांमध्ये अथवा अलंकारांमध्ये त्याचा अन्तर्भाव होत नाही असे (ध्वनिवाद्यांचे) म्हणणे

असेल, तरीही एखाद्या विशेषाचा (म्हणजे प्रकाराचा) लहानसा अंश घेऊन त्याला केवळ दुसरे नाव द्यावेसे (ध्वनिवाद्यांना) वाटले असेल. उदा. उपमेच्या चमत्कृतीचे प्रकार असंख्य असू शकतात. त्यांपैकी काही प्रकारांची स्वतंत्र अलंकार म्हणून गणना करण्यात आली आहे.[१४] परंतु असे असले तरी गुण आणि अलंकार यांहून वेगळे असण्याचा धर्म त्यांच्या ठिकाणी नाहीच. कारण केवळ तेवढ्यानेच (म्हणजे लहानशा अंशाला दुसरे नाव देण्यानेच) तुम्ही काय (विशेष) मिळविले? (कारण) आणखी वैचित्र्याचीही कल्पना करणे शक्य आहे. उदा. भरतमुनी इ. चिरंतनांना 'यमक' हाच शब्दालंकार आणि 'उपमा' हाच अर्थालंकार प्रतिनिधी म्हणून सांगणे इष्ट वाटले.[१५] इतर अलंकारकारांनी त्या अलंकारांचा संपर्कच्या दृष्टीने विस्तार कसा होईल हे दाखविले. तर ज्याप्रमाणे कर्मण्यण् (३–२–१) या सूत्राच्या बाबतीतले 'कुम्भकार' हे उदाहरण ऐकल्यावर जर कोणी स्वत: 'नगरकार' इ. शब्दांची कल्पना केली, तर तेवढ्यामुळे त्याने आपली पाठ कितीशी थोपटून घ्यावयाची? त्याप्रमाणेच प्रस्तुत ठिकाणीही आहे.[१६] अशा रीतीने हा तिसरा प्रकार होय. याप्रमाणे एका (म्हणजे अभाववादी) पक्षाचे तीन (उप-)प्रकार आणि दुसरे दोन (म्हणजे भाक्तवाद आणि अनिर्वचनीयवाद हे) पक्ष असे एकूण पाच प्रकार आहेत.[१७] हा (ग्रंथकाराचा) आशय.

## टीपा

१. जे कल्पनेत आणले, ते त्या वेळी वर्तमानकालीन झाले व लगेच ते भूतकाळातच जमा झाले. प्रत्येक वर्तमानकालीन गोष्ट पुढच्याच क्षणाला भूतकाळात जमा होत असते.

२. उदा. 'गगनपुष्पे मला मिळाल्यास मी त्यांची माळ अशा तऱ्हेने गुंफीन,' किंवा 'शशशृंग मिळाल्यास ते घेऊन शत्रूवर असा असा हल्ला करीन' अशा कल्पना करण्यात काहीही हशील नाही.

३. कारण कल्पना काय, हव्या तेवढ्या करीत बसता येतील आणि त्यांना दूषणेही पाहिजे तितकी देता येतील !

४. संभव हा वर्तमानकाळातला असे म्हणण्याचे कारण संभवनीय कल्पना

( विकल्प ) मनात आणताक्षणी ती ' वर्तमानकाळातली ' होते.

५. ह्याच टीपांपैकी टीप १ ली पाहा.

६. म्हणजे रक्त, मांस, इ.

७. त्या बाहेर दिसणाऱ्या रक्त, मांस वगैरेवर कावळे, कुत्रे तुटून पडू पाहतील. त्यांचे निवारण करण्यासाठी लोकांना काठ्या वापराव्या लागतील हा आशय.

८. ' तरी काय आले ' ? असे म्हणण्यातील अभिप्राय असा की, आतले पदार्थ आतच राहून शरीर बाहेरून स्वच्छ दिसले तरी शेवटी ते विषयोपभोगाच्या कर्दमातच लोळणारे असल्याने किळस उत्पन्न करणारे आहे.

९. **' संकेत ' व ' वाच्यार्थ ' –**
प्रत्येक शब्दाचा जो ठरलेला अर्थ असतो, तो अगदी पहिल्याने काही लोकांनी ठरविलेला असतो व मग तो रूढ होतो. हे पहिले ठरवणे म्हणजेच ' संकेत '. पहिल्याने तो अर्थ कोणी ठरवला ते सांगता येत नाही, म्हणून ' या शब्दाचा अर्थ हा समजावा ' अशी पहिली ईश्वरी इच्छा मानून तिला नैयायिक ' संकेत ' म्हणतात. हा ठरलेला अर्थ म्हणजेच शब्दाचा ' वाच्यार्थ ' होय.

१०. या लोकांचे म्हणणे असे – शब्द उच्चारल्यावर जेवढा अर्थ ध्यानात येतो, तो सर्व वाच्यार्थच होय. त्याहून निराळा व्यंग्यार्थ नसतोच. पाहा, उद्द्योत ३, पृ. ४१५ (काशी आवृत्ति).

११. शब्द आपला ठरलेला अर्थ म्हणजे ' वाच्यार्थ ' आपल्या ज्या शक्तीने किंवा वृत्तीने ( व्यापाराने ) ज्ञात करून देतो, त्या वृत्तीला ' अभिधा-वृत्ति ' म्हणतात.

१२. ' आक्षिप्त ' म्हणजे ' अर्थापत्ती'ने ज्ञात होणारे. एखाद्या गोष्टीची उपपत्ती दुसऱ्या कशानेही लागत नसल्यास ज्याने उपपत्ती लागते, तो अर्थ तेथे अपरिहार्यपणे उपस्थित करणे याला ' अर्थापत्ति ' म्हणतात. लठ्ठ देवदत्त दिवसा जेवत नाही ' या उदाहरणात ' दिवसा न जेवताही तो लठ्ठ आहे, तेव्हा मग तो रात्री जेवत असला पाहिजे ' असे मानणे भागच पडते.

१३. लौकिक म्हणजे रोजच्या व्यवहारात वापरले जाणारे.

१४. उदा. दण्डीच्या ' संशयोपमा ' या प्रकाराला पुढे ' ससंदेह ' नावाचा अलंकार मानण्यात आले. त्याचा ' अद्‌भुतोपमा ' हा प्रकार पुढे ' यद्यर्थातिशयोक्ति ' झाला, तर त्याचा ' मोहोपमा ' हा प्रकार म्हणजेच नंतरचा ' भ्रान्तिमान् ' अलंकार होय.

१५. वस्तुतः भरतांनी नाट्यशास्त्राच्या १६ व्या अध्यायात ' यमक ' हा शब्दालंकार व उपमा, रूपक आणि दीपक हे तीन अर्थालंकार सांगितले आहेत. अभिनवगुप्तांनी रूपक व दीपक हे अलंकार साम्यावरच आधारलेले अस-

त्याने त्यांचा उपमेतच अंतर्भाव केलेला असावा.

१६. म्हणजे ध्वनि हा गुणालंकारामध्येच अंतर्भूत असूनही त्याला बाजूला काढून त्याच्यावर ध्वनिसिद्धान्त उभारण्यातही विशेष असे काही नाही.

१७. जयरथाने रुय्यकाच्या 'अलंकारसर्वस्वा' वरील टीकेच्या प्रारंभी (पाहा, अलंकारसर्वस्व, काव्यमाला आवृत्ति. पृ. ११) पुढील बारा ध्वनिविरोधी मतांचा निर्देश केला आहे— '

> तात्पर्यशक्तिरभिधा लक्षणानुमितिर्द्विधा ।
> अर्थापत्तिः, क्वचित तन्त्रं, समासोक्त्याद्यलंकृतिः ।।
> रसस्य कार्यता, भोगो, व्यापारान्तरबाधनम् ।
> द्वादशेत्थं ध्वनेरस्य स्थिता विप्रतिपत्तयः ।।

ही १२ मतें अशी : (१) ध्वनीचा अंतर्भाव तात्पर्यशक्तीमध्येच होतो (भाट्ट मीमांसक), (२) ध्वनीचा अंतर्भाव अभिधेत होतो (प्राभाकर मीमांसक); (३ व ४) ध्वनीचे कार्य (उपादानलक्षणा व लक्षणलक्षणा या) लक्षणेच्या दोन प्रकारांनीच होते, (५ व ६) व्यंग्यार्थाची प्रतीति (स्वार्थ व परार्थ) या दोन प्रकारच्या अनुमानाने होते (नैयायिक), (७) व्यंग्यार्थाची प्रतीति अर्थापत्ति या प्रमाणाने होते ( याच टीपांतील टीप १२ वी पाहा ), (८) व्यंग्यार्थाचे ज्ञान श्लेषामुळे होते, (९) ध्वनीचा अंतर्भाव समासोक्ति इ. अलंकारांतच होतो, (१०) रस हा 'व्यंग्य' नसून 'कार्य' म्हणजे उत्पाद्य आहे (लोल्लट), रस हा व्यंग्य नसून 'भोग्य' आहे (भट्टनायक), (१२) ध्वनीच्या बाबतीत कोणताही शब्द-व्यापार प्रवृत्त होत नसल्याने तो 'अनिर्वचनीय' आहे.

ध्वन्यालोकः

तत्र केचिदाचक्षीरन् — शब्दार्थशरीरं तावत्काव्यम् । तत्र च शब्दगताश्चारुत्वहेतवोऽनुप्रासादयः प्रसिद्धा एव । अर्थगताश्चोपमादयः । वर्णसंघटनाधर्माश्च ये माधुर्यादयस्तेऽपि प्रतीयन्ते । तदनतिरिक्तवृत्तयो वृत्तयोऽपि याः कैश्चिदुपनागरिकाद्याः प्रकाशिताः, ता अपि गताः श्रवणगोचरम् । रीतयश्च वैदर्भीप्रभृतयः । तद्व्यतिरिक्तः कोऽयं ध्वनिर्नामेति ।

ध्वन्यालोक

त्यापैकी काहीजण म्हणतील—काव्याचे घटक म्हणजे शब्द आणि अर्थ हे होत, हे तर सर्वमान्य आहे. त्या काव्याच्या सौंदर्याचे अनुप्रास वगैरे शब्दनिष्ठ हेतू प्रसिद्धच आहेत. आणि उपमा वगैरे अर्थनिष्ठ हेतूही ( प्रसिद्धच

आहेत ). आणि वर्णांच्या रचनेचे धर्म असलेले[1] जे माधुर्य इ. (सौंदर्यहेतु ), तेही प्रत्ययाला येतात. त्यांहून ज्यांचे स्वरूप वेगळे नाही, अशा ज्या 'उपनागरिका' वगैरे वृत्ति काहींनी प्रकाशित केल्या, त्याही आमच्या कानांवर आल्या आहेत. आणि वैदर्भी वगैरे रीतीही आम्ही ऐकल्या आहेत! त्यांहून वेगळा असा हा 'ध्वनि' नावाचा तथाकथित पदार्थ कोण आहे?

लोचनम्

तदेव क्रमेणाह – शब्दार्थशरीरं तावदित्यादिना। तावद्ग्रहणेन कस्याप्यत्र न विप्रतिपत्तिरिति दर्शयति। तत्र शब्दार्थौ न तावद् ध्वनिः, यतः संज्ञामात्रेण हि को गुणः? अथ शब्दार्थयोश्चारुत्वं स ध्वनिः। तथापि द्विविधं चारुत्वम्। स्वरूपमात्रनिष्ठं संघटनाश्रितं च। तत्र शब्दानां स्वरूपमात्रकृतं चारुत्वं शब्दालङ्कारेभ्यः, संघटनाश्रितं तु शब्दगुणेभ्यः। एवमर्थानां चारुत्वं स्वरूपमात्रनिष्ठमुपमादिभ्यः। संघटनापर्यवसितं तु अर्थगुणेभ्यः इति न गुणालङ्कारव्यतिरिक्तो ध्वनिः कश्चित्।

संघटनाधर्मा इति। शब्दार्थयोरिति शेषः। यद्गुणालङ्कारव्यतिरिक्तं तच्चारुत्वकारि न भवति, नित्यानित्यदोषा असाधुदुःश्रवादय इव। चारुत्वहेतुश्च ध्वनिः, तन्न तद्व्यतिरिक्त इति व्यतिरेकी हेतुः। ननु वृत्तयो रीतयश्च यथा गुणालङ्कारव्यतिरिक्ताश्चारुत्वहेतवश्च, तथा ध्वनिरपि तद्व्यतिरिक्तश्च चारुत्वहेतुश्च भविष्यतीत्यसिद्धो व्यतिरेक इत्यनेनाभिप्रायेणाह – तदनतिरिक्तवृत्तय इति। नैव वृत्तिरीतीनां तद्व्यतिरिक्तत्वं सिद्धम्। तथा ह्यनुप्रासानामेव दीप्तमसृणमध्यमवर्णनीयोपयोगितया परुषत्वललितत्वमध्यमत्वस्वरूपविवेचनाय वर्गत्रयसम्पादनार्थं तिस्रोऽनुप्रासजातयो वृत्तय इत्युक्ताः, वर्तन्तेऽनुप्रासभेदा आस्विति। यदाह

> सरूपव्यञ्जनन्यासं तिसृष्वेतासु वृत्तिषु।
> पृथक्पृथगनुप्रासमुशन्ति कवयः सदा॥ इति॥

पृथक्पृथगिति। परुषानुप्रासा नागरिका। मसृणानुप्रासा उपनागरिका, ललिता। नागरिकया विदग्धया उपमितेति कृत्वा। मध्यममकोमलपरुषमित्यर्थः। अत एव वैदग्ध्यविहीनस्वभावासुकुमारापरुष-

ग्राम्यवनितासादृश्यादियं वृत्तिर्ग्राम्येति । तत्र तृतीय: कोमलानुप्रास इति वृत्तयोऽनुप्रासजातय एव । न चेह वैशेषिकवद् वृत्तिर्विवक्षिता, येन जातौ जातिमतो वर्तमानत्वं न स्यात्, तदनुग्रह एव हि तत्र वर्तमानत्वम् । यथाह कश्चित्—

लोकोत्तरे हि गाम्भीर्ये वर्तन्ते पृथिवीभुज: । इति ।

तस्माद् वृत्तयोऽनुप्रासादिभ्योऽनतिरिक्तवृत्तयो नाभ्यधिकव्यापारा: । अत एव व्यापारभेदाभावान्न पृथगनुमेयस्वरूपा अपीति वृत्तिशब्दस्य व्यापारवाचिनोऽभिप्राय: । अनतिरिक्तत्वादेव वृत्तिव्यवहारो भामहादिभिर्न कृत: उद्भटादिभि: प्रयुक्तेऽपि तस्मिन्नार्थ: कश्चिदधिको हृदयपथमवतीर्ण इत्यभिप्रायेणाह—गता: श्रवणगोचरमिति । रीतयश्चेति । तदनतिरिक्तवृत्तयोऽपि गता: श्रवणगोचरमिति संबन्ध: । तच्छब्देनात्र माधुर्यादयो गुणा: तेषां च समुचितवृत्त्यर्पणे यदन्योन्यमेलनक्षमत्वेन पानक इव गुडमरिचादिरसानां सङ्घातरूपतागमनं दीप्तललितमध्यमवर्णनीयविषयं गौडीयवैदर्भपाञ्चालदेशहेवाकप्राचुर्यदृशा तदेव त्रिविधं रीतिरित्युक्तम् । जातिर्जातिमतो नान्या, समुदायश्च समुदायिनो नान्य इति वृत्तिरीतयो न गुणालङ्कारव्यतिरिक्ता इति स्थित एवासौ व्यतिरेकी हेतु: । तदाह—तद्व्यतिरिक्त: कोऽयं ध्वनिरिति । नैष चारुत्वस्थानं शब्दार्थरूपत्वाभावात् । नापि चारुत्वहेतु: गुणालङ्कारव्यतिरिक्तत्वादिति । तेनाखण्डबुद्धिसमास्वाद्यमपि काव्यमपोद्धारबुद्ध्या यदि विभज्यते, तथाप्यत्र ध्वनिशब्दवाच्यो न कश्चिदतिरिक्तोऽर्थो लभ्यत इति नामशब्देनाह ॥

लोचन

तेच (पाच प्रकार) 'काव्याचे शरीर (घटक)'...इ. शब्दांनी वृत्तिकार क्रमाने वर्णन करतात–तावत् (म्हणजे हे तर सर्वमान्य आहे) हा शब्द वृत्तीमध्ये वापरून या बाबतीत कोणाचेही विरुद्ध मत नाही असे दर्शविण्याचा वृत्तिकारांचा हेतू आहे. आता शब्द आणि अर्थ हे तर काही ध्वनि नव्हेत, कारण (तसे असल्यास) त्यांना नुसते 'ध्वनि' हे दुसरे नाव देण्याने काय फायदा ? बरे, 'शब्दार्थांचे जे सौंदर्य तो ध्वनि' (असे म्हणणे) असेल, तर ते सौंदर्य दोन प्रकारचे

असते–१) (शब्दार्थांच्या) केवळ स्वरूपात राहणारे व २) संघटनेत (म्हणजे रचनेत) राहणारे. त्यांपैकी शब्दांतले (त्यांच्या) केवळ स्वरूपामुळे उत्पन्न होणारे सौंदर्य शब्दालंकारांमुळे, व संघटनेमुळे उत्पन्न होणारे (सौंदर्य) शब्दगुणांमुळे उत्पन्न होते. याचप्रमाणे अर्थांमधील, केवळ स्वरूपामुळे उत्पन्न होणारे सौंदर्य उपमा इ. अर्थालंकारांमुळे व संघटनेत राहणारे सौंदर्य अर्थगुणांमुळे उत्पन्न होते. अशा रीतीने ध्वनि म्हणजे गुण व अलंकार यांहून वेगळे असे काहीही नाही.

आता वृत्तीत 'संघटनांचे (म्हणजे रचनांचे) धर्म असलेले' हे जे शब्द आहेत, त्यांच्या जोडीला 'शब्द आणि अर्थ यांच्या' हे शब्द अध्याहृत घ्यावे (व 'शब्दांच्या व अर्थांच्या रचनांचे धर्म' असा अर्थ करावा). जे जे गुणालंकारांहून वेगळे आहे, ते ते सौंदर्यास कारणीभूत होत नाही, ज्याप्रमाणे (गुण आणि अलंकार यांहून वेगळे असणारे असाधुत्व,[२] दुःश्रवत्व[३] इत्यादि अनुक्रमे नित्य व अनित्य असणारे दोष (सौंदर्यास कारणीभूत नसतात), त्याप्रमाणे. ध्वनि तर सौंदर्यहेतू आहे, म्हणून तो त्यांहून वेगळा असणार नाही. अशा रीतीने हा व्यतिरेकी[४] हेतू आहे.

(यावर ध्वनिवादी कदाचित् असे म्हणेल की) काय हो, ज्याप्रमाणे 'वृत्ति' आणि 'रीति' या गुण आणि अलंकार यांहून वेगळ्याही आहेत आणि सौंदर्यहेतूही आहेत, त्याप्रमाणे ध्वनिसुद्धा गुणालंकारांहून निराळा आणि सौंदर्यहेतूही असू शकेल ! मग (जे जे गुणालंकारांहून भिन्न ते ते सौंदर्याचे कारण असू शकत नाही) ही (अभाववाद्यांची) व्यतिरेक-व्याप्ति सिद्ध होत नाही[५] ! (असे ध्वनिवादी म्हणणार हे) लक्षात घेऊनच अभाववादी 'त्यांहून (म्हणजे गुणालंकारांहून) ज्यांचे स्वरूप वेगळे नाही अशा वृत्ति' असे म्हणतात. वृत्ति आणि रीति या गुणालंकारांहून निराळ्या आहेत असे मुळीच सिद्ध झालेले नाही, कारण दीप्त (म्हणजे प्रखर), मसृण (म्हणजे कोमल), मध्यम (म्हणजे प्रखरही नाही व सौम्यही नाही अशी) अशा निरनिराळ्या प्रकारच्या वर्ण्य विषयांना (अनुप्रास) पोषक होतात, म्हणून अनुप्रासांची स्वरूपेही परुषत्व, ललितत्व आणि मध्यमत्व अशी वेगवेगळी दाखविण्यासाठी व त्यांचे तीन वर्ग साधण्यासाठी अनुप्रासांच्या तीन जातींनाच 'वृत्ति'

म्हटले गेले आहे. ' अनुप्रासांचे प्रकार यांच्यात 'आहेत' (वर्तन्ते) अशा व्युत्पत्तीमुळे यांना वृत्ती म्हटले. कारण (भट्टोद्भटांनी) म्हटले आहे–

'या तीन वृत्तीमध्ये केल्या जाणाऱ्या समान (म्हणजे सारखे) स्वरूप असलेल्या व्यंजनांच्या समावेशाला जाणते लोक अनुप्रासांचे निरनिराळे प्रकार मानतात.[६] '

वरील विधानातील पृथक् पृथक् (म्हणजे वेगवेगळ्या प्रकारचे) या शब्दांचे विवरण असे – परुष (म्हणजे कठोर) वर्णांच्या[७] अनुप्रासाने युक्त असलेली वृत्ति ' नागरिका ' होय. जीत मसृण (म्हणजे कोमल) वर्णांचा[८] अनुप्रास असतो, ती वृत्ति ' उपनागरिका ' किंवा ' ललिता. ' (तिला) उपनागरिका म्हणण्याचे कारण ती ' नागरिक ' म्हणजे विदग्ध किंवा चतुर ललनेसारखी असते हे होय. जे परुषही नाही व जे कोमलही नाही ते मध्यम असा अर्थ (समजावा). म्हणूनच, विदग्ध (म्ह. चतुर) स्वभाव नसलेल्या, सुकुमारही नव्हे किंवा परुषही नव्हे अशा ग्राम्य स्त्रीशी (या वृत्तीचे) साम्य, म्हणून ही वृत्ति ' ग्राम्या ' होय. त्यांपैकी तिसऱ्या अनुप्रासास कोमलानुप्रास[९] म्हणतात. अशा रीतीने वृत्ति म्हणजे अनुप्रासांच्या जातीच होत.

आणि या ठिकाणी वृत्ति या जातीमध्ये म्हणजे ' सामान्या 'मध्ये अनुप्रास या व्यक्ति राहतात असे जे म्हटले, ते वैशेषिक मतानुसार[१०] ( वृत्ति = राहणे या अर्थाने ) म्हटलेले नाही, कारण ते म्हणणे जर वैशेषिक मतानुसार असते, तर ' व्यक्ति ही जातीच्या ठिकाणी राहात नाही ' या वैशेषिकांच्या मताला ते विरुद्ध झाले असते. तर त्यांच्या ठिकाणी अनुप्रासांचे ' राहणे ' याचा अर्थ अनुप्रासांनी वृत्तींना विशिष्ट रसाभिव्यक्ति करण्याचे कामी ' उपकारक होणे ' हा होय. जसे कोणीतरी ( जर ) म्हटले की––

' राजेलोक खरोखर लोकोत्तर गांभीर्याचे ठिकाणी राहतात ' (तर याचा अर्थ ' गांभीर्य राजे लोकांना आपापली कामे करण्याचे कामी उपकारक होते ' हा घ्यावयाचा, ' राजे लोक गांभीर्यामध्ये राहतात ' असा नाही.)

म्हणून वृत्ति या अनुप्रासादिकांहून ' अनतिरिक्तवृत्तीच्या ' आहेत,

म्हणजे त्यांचे कार्य अनुप्रासादींच्या कार्याहून भिन्न नाही. याच कारणामुळे, म्हणजे त्यांच्या कार्यात फरक नसल्याने या वृत्तींचे स्वरूपही अनुप्रासांच्या स्वरूपाहून वेगळे आहे असे अनुमान करता येण्याजोगे नाही. हा 'कार्य' या अर्थाचा 'वृत्ति' हा शब्द वापरण्यामागचा (वृत्तिकारांचा) हेतू. 'वृत्ति' अनुप्रासांहून वेगळ्या नसल्यामुळेच भामहादिकांनी[11] आपल्या ग्रंथात (अनुप्रासांची चर्चा केली असली तरी) 'वृत्ति' हा शब्द वापरला नाही, आणि उद्भटादिकांनी[12] वृत्ति हा शब्द वापरून अनुप्रासांचे विवेचन केले असले तरी त्या वृत्तींमध्ये अनुप्रासांच्या प्रकारांहून अधिक काही स्वरूप प्रत्ययास येत नाही, या अभिप्रायाने वृत्तिकारांनी 'त्या वृत्तिदेखील आमच्या कानांवर[13] आल्या आहेत' असे म्हटले.

'आणि रीतिदेखील'.... इ. – त्यांहून (म्हणजे गुणांहून) ज्यांचे कार्य भिन्न नाही अशा, आमच्या कानांवरून गेल्या आहेत, असा संबंध जोडावयाचा. 'त्यांहून' या शब्दाने येथे 'माधुर्यादि गुणांहून' असे सांगितले आहे. ज्याप्रमाणे 'पानका'मध्ये (म्हणजे पन्हे किंवा सार अशासारख्या पेयामध्ये) गूळ, मिरे इत्यादींच्या रसांचे –(म्हणजे स्वादांचे)– एकीभवन होते, त्याप्रमाणे दीप्त (म्हणजे प्रखर), ललित (म्हणजे कोमल), आणि मध्यम (म्हणजे प्रखरही नव्हे व कोमलही नव्हे) अशा, वर्ण्य विषयांना उचित अशा मनोवृत्ती निर्माण करण्याचे कामी माधुर्यादि गुणांमध्ये एकमेकात मिसळून जाण्याची क्षमता असल्यामुळे ते गुणही एकमेकात मिसळून जाऊन त्यांचे एकीभवन होते व ते मिश्रण दीप्त, मसृण, मध्यम यांपैकी ज्या वर्ण्य विषयाला उचित असेल त्याप्रमाणे त्या मिश्रणाचे तीन प्रकार होतात. त्या तिन्हींपैकी एकेक प्रकार विपुल प्रमाणावर वापरण्याची प्रवृत्ती विदर्भ, गौड व पांचाल या देशांतल्या कवींमध्ये त्या वेळच्या शास्त्रकारांना आढळून आली, म्हणून (त्यांनी) त्या तीन प्रकारच्या गुणमिश्रणांना 'रीति' हे नाव दिले.[14]'

'जाति' ही त्या जातीने युक्त अशा व्यक्तीपेक्षा भिन्न नाही.[15] व समुदायही त्याच्या घटकांहून वेगळा नाही; म्हणून वृत्ति आणि रीतिदेखील गुणालंकारांहून निराळ्या नाहीत – अशा रीतीने हा

व्यतिरेकी हेतू योग्यच आहे.[१६] म्हणून (अभाववादी) म्हणतात– 'त्याहून वेगळा असा हा ध्वनि नावाचा कोण पदार्थ असणार ?'

तो (ध्वनि) काव्यसौंदर्याचे स्थान (आधार) होऊ शकत नाही, कारण तो शब्द किंवा अर्थ या स्वरूपाचा नाही. तो सौंदर्याचा हेतूही नाही, कारण तो (तुमच्या म्हणण्याप्रमाणे) काव्यसौंदर्य असणाऱ्या गुण आणि अलंकार यांहून वेगळा आहे. त्यामुळे संपूर्ण काव्याचा आस्वाद हा (वस्तुतः) अविभाज्य अनुभव असतो, पण तरीही शास्त्रीयदृष्ट्या त्याची चिकित्सा करण्यासाठी जरी त्याचे विभाग कल्पिले,[१७] तरी ध्वनि या नावाची कोणतीही स्वतंत्र गोष्ट आढळत नाही, असा अभाववाद्यांचा अभिप्राय आहे. हे दर्शविण्यासाठी (वृत्तिकारांनी) 'नाम' हा शब्द अभाववाद्यांचे म्हणणे मांडताना वापरला.

टीपा

१. माधुर्य इ. गुण हे वर्णांच्या रचनेचे धर्म असे भट्टोद्भट वगैरेंचे मत, आनंदवर्धनांचे नव्हे. आनंदवर्धनांच्या मते गुण हे रसांचे धर्म आहेत. (पाहा– उद्द्योत २, कारिका ६ आणि उद्द्योत ३, कारिका ६.)

२. असाधुत्व म्हणजे व्याकरणदृष्ट्या अशुद्ध रूप वापरणे हा काव्यातला एक दोष मानला जातो व असे व्याकरणदृष्ट्या अशुद्ध रूप सहृदयांना नेहमीच बोचणारे असल्याने याला 'नित्य' दोष म्हटले आहे.

३. दुःश्रवत्व म्हणजे कर्णकटु वर्णांचा उपयोग. हा अनित्य दोष, कारण शृंगारादि रसांनी निर्भर अशा काव्यात कर्णकटु वर्ण वापरणे हा दोष होतो, पण तेच कर्णकटु वर्ण रौद्र वगैरे रसांच्या अभिव्यक्तीस पोषक होतात.

४. व्यतिरेकी हा न्यायशास्त्रातला शब्द आहे. 'जेथे धूर असतो, तेथे अग्नि असतो' याला 'अन्वयव्याप्ति' म्हणतात. 'जेथे अग्नि नसतो, तेथे धूर नसतो' ही 'व्यतिरेकव्याप्ति' होय. या उदाहरणात दोन्ही प्रकारच्या व्याप्ति संभवतात. काही हेतु असे असतात की, जेथे फक्त व्यतिरेकव्याप्ति संभवते. उदा. 'पृथ्वी इतर सर्वांहून वेगळी आहे, कारण ती गन्धवती आहे' या उदाहरणात 'जे इतरांहून वेगळे नाही (म्हणजे इतरांतच अन्तर्भूत आहे) ते गन्धवत् नाही, जसे पाणी;' अशी व्यतिरेकव्याप्ति जमते व त्या व्याप्तीला दृष्टान्तही मिळतो. पण 'जे गन्धवत् असते ते इतरांहून वेगळे असते' ही अन्वयव्याप्ति पुरी होत नाही, कारण पृथ्वीव्यतिरिक्त गन्धवत् असणारे उदाहरणच नाही. प्रस्तुत ठिकाणी अभाववाद्यांचे म्हणणे असे–

' ध्वनि गुणालंकारांहून वेगळा नाही, कारण तो सौंदर्यहेतु आहे.' येथील व्यतिरेकव्याप्ति अशी–जो जो गुणालंकारांहून वेगळा असतो, तो सौंदर्यहेतु असत नाही, उदा. असाधुत्व इ. दोष. (अभिनवगुप्तांनी येथे 'व्यतिरेकी हेतु' इतकेच म्हटले आहे. त्यावर व्यतिरेकी = केवलव्यतिरेकी असे अनेक टीकाकार म्हणतात. पण वस्तुतः येथील हेतु केवलव्यतिरेकी नसून अन्वय-व्यतिरेकी आहे. कारण येथे 'जो सौन्दर्यहेतु असतो, तो गुणालंकारांहून वेगळा नसतो' या अन्वयव्याप्तीलाही 'जसे उपमा, यमक, माधुर्य वगैरे' असे अनेक दृष्टान्त मिळतात. अभिनवगुप्तांनी या अन्वयव्यतिरेकी हेतूची व्यतिरेकी बाजू तेवढी मांडून दाखवली, पण त्यामुळे येथे अन्वयाची बाजू नाही असा अभिनवगुप्तांचा अभिप्राय नाही. जे टीकाकार व्यतिरेकी = केवल-व्यतिरेकी असे म्हणतात त्यांचे म्हणणे बरोबर नाही असे आम्हांस वाटते.

५. कारण 'चारुत्वहेतु असणे' हा हेतु 'साधारण अनैकान्तिक' आहे. जो हेतु पक्ष, सपक्ष आणि विपक्ष या तिहींवरही आढळतो, तो 'साधारण अनैका-न्तिक' होय. येथे चारुत्वहेतु असणे हा धर्म गुणालंकारांचे ठिकाणी आहे आणि गुणालंकारांहून वेगळ्या अशा रीति व वृत्ति यांमध्येही आहे.

६. काव्यालंकारसारसंग्रह, १–१२.

७. **भट्टोद्भट** म्हणतात–श्, ष् यांचा रेफाशी संयोग ( म्हणजे श्र्, ष्र्, अशी जोडाक्षरे), ट वर्ग, ह्र, ह्व, ह्म, यांनी युक्त असलेल्या वृत्तीचे नाव 'परुषा'. (हिचेच दुसरे नाव वर अभिनवगुप्तांनी सांगितल्याप्रमाणे 'नागरिका' होय.

८. समानरूप वर्णांचे संयोग ( म्हणजे च्च्, त्त् इ. जोडाक्षरे) ङ्, ञ्, ण्, न्, म् ही अनुनासिके शिरोभागी असलेले क पासून म पर्यंतचे वर्ण' ( उदा. ङ्क, न्द वगैरे) यांनी युक्त असलेल्या वृत्तीला 'उपनागरिका' समजतात.

९. **भट्टोद्भटांच्या** मते 'ग्राम्या' वृत्तीला 'कोमला' असेही (दुसरे) नाव आहे. वस्तुतःउपनागरिका वृत्तीत कोमल वर्णांचा अनुप्रास असतो ( मसृण = कोमल ) म्हणून तिला 'कोमला' नाव देणे योग्य. ती वृत्ती असताना मध्यमानुप्रास असलेल्या ग्राम्या वृत्तीला **उद्भट** वगैरेंनी 'कोमला' का म्हणावे आणि **अभिनवगुप्तांनीही** या वृत्तीला 'कोमलानुप्रासा' का म्हणावे याचा उलगडा होत नाही.

१० वैशेषिक मताचे लोक 'सामान्य' ( म्हणजे जाति ) हा वेगळा पदार्थ मानतात. 'जाति' ही व्यक्तींच्या ठिकाणी ( उदा. मनुष्यत्व हे सर्व मनुष्यांच्या ठिकाणी ) समवाय संबंधाने म्हणजे अभेद्य संबंधाने राहते, असे ते म्हणतात. 'व्यक्ति' या जातीच्या ठिकाणी राहतात' असे ते मानीत नाहीत. 'अनुप्रास हे वृत्तींच्या म्हणजे अनुप्रासजातीच्या ठिकाणी राहतात' असे वैशेषिक मताच्या

विरुद्ध काहीतरी बोलल्यासारखे होऊ नये, म्हणून या ठिकाणी अनुप्रास-प्रकार आणि वृत्ती यांमध्ये ' आधाराधेय ' संबंध विवक्षित नसून ' उपकार्य–उपकारक ' संबंध विवक्षित आहे, असे **अभिनवगुप्तांचे** म्हणणे.

११. ' भामहादिक ' यातील ' आदि ' शब्दामध्ये ' दण्डी 'चा निर्देश असावा, कारण त्यानेही अनुप्रासांच्या संदर्भात ' वृत्ति ' हा शब्द कोठेही उपयोगात आणलेला नाही.

१२. ' उद्भटादिकांनी ' यामधील ' आदि ' शब्दाने रुद्रटाचा निर्देश केला असणे शक्य आहे, कारण त्याने ' काव्यालंकारा ' च्या २ ऱ्या अध्यायात पाच प्रकारच्या वृत्तींचा म्हणजे अनुप्रासांचा विचार केला आहे.

१३. म्हणजे कानांवर आल्या आहेत, (पण) हृदयापर्यंत जाऊन भिडण्यासारखे काही ' विशेष ' त्यांच्यात नाही.

१४. वामनाला त्या त्या देशाच्या त्या वेळच्या कवींमध्ये ते ते गुण प्राचुर्याने आढळले तरी ते देश व त्या रीति यांमध्ये जन्य–जनकसंबंध नाही असे तो स्पष्ट म्हणतो. कुन्तकाने ' वक्रोक्तिजीविता ' मध्ये ( पाहा, १–२४ ) काव्यातील शैलींना देशांवरून नावे देणे योग्य नाही असे म्हटले आहे. त्याने वैदर्भी, गौडी व पांचाली या रीतींना अनुक्रमे ' सुकुमार'–मार्ग, ' विचित्र ' मार्ग व ' मध्यम ' मार्ग ही नावे दिली आहेत. त्याच्या मते काव्यातील शैली कवींच्या प्रतिभेशी, व्युत्पत्तीशी व मनाच्या ठेवणीशी संबद्ध असतात, भौगोलिक प्रदेशांशी निगडित नसतात.

१५. म्हणजे वृत्ति ही तिन्ही अनुप्रासांना व्यापणारी जाति असल्यामुळे ती वृत्ति, ' अनुप्रास ' या व्यक्तींहून वेगळी नाही. तसेच रीति म्हणजे गुणसमुदायच असल्याने ती ' गुण ' या घटकांहून वेगळी नाही, हा आशय.

१६. म्हणजे वृत्ति-रीति जशा सौंदर्यहेतु असूनही गुणालंकारांहून भिन्न नाहीत, तसा ध्वनि हाही सौंदर्य-हेतु असूनही गुणालंकारांहून भिन्न नाही, हे अभाव-वाद्याने आपले पहिलेच म्हणणे प्रस्थापित केले.

१७. ' वाक्यपदीय ' कर्ता भर्तृहरि म्हणतो की–

**पदे न वर्णा विद्यन्ते वर्णेष्ववयवा न च ।**
**वाक्यात् पदानामत्यन्तं प्रविवेको न कश्चन ॥**

(वाक्यपदीय १–७३)

**उपायाः शिक्षमाणानां बालानामुपलालनाः ।**
**असत्ये वर्त्मनि स्थित्वा ततः सत्यं समीहते ॥**

(वाक्यपदीय २–२३८)

म्हणजे संपूर्ण वाक्याच्या अर्थाचे ज्ञान हे अखंड स्वरूपातच होते. त्या वेळी वाक्यातील पदे, त्यांचे प्रकृति-प्रत्यय हे अंश, त्यांचे वेगवेगळे अर्थ यांची जाणीव

नसते. परंतु नवशिक्यांना भाषेचे अध्ययन सुकर करण्याचे उपाय म्हणून पदे, त्यांचे अंश, इत्यादी घटकांच्या कल्पना शास्त्रकारांनी केल्या आहेत. कल्पित घटकांचा अवलंब करून भाषेचे सत्य स्वरूप स्पष्ट करण्याचा यत्न व्याकरणशास्त्र करते. काव्यास्वादाच्या बाबतीतले वरील मत यासारखेच आहे.

ध्वन्यालोकः

अन्ये ब्रूयुः – नास्त्येव ध्वनिः । प्रसिद्धप्रस्थानव्यतिरेकिणः काव्यप्रकारस्य काव्यत्वहानेः । सहृदयहृदयाह्लादिशब्दार्थमयत्वमेव काव्यलक्षणम् । न चोक्तप्रस्थानातिरेकिणो मार्गस्य तत्सम्भवति । न च तत्समयान्तःपातिनः सहृदयान् कांश्चित्परिकल्प्य तत्प्रसिद्ध्या ध्वनौ काव्यव्यपदेशः प्रवर्तितोऽपि सकलविद्वन्मनोग्राहितामवलम्बते ।

ध्वन्यालोक

दुसरे (कोणी) म्हणतील–ध्वनि नाहीच. कारण प्रसिद्ध (प्रस्थानाहून म्हणजे) मार्गाहून भिन्न असणाऱ्या काव्यप्रकारामध्ये काव्यत्व असू शकत नाही. सहृदयांना आनंद देणारे शब्द आणि अर्थ यांनी परिपूर्ण असणे हेच काव्याचे लक्षण होय, आणि ते (काव्याचे लक्षण) आतापर्यंत सांगितलेल्या मार्गाबाहेर असणाऱ्या मार्गाच्या बाबतीत संभवत (असू शकत) नाही आणि 'ध्वनि' संप्रदायात पडणारे (म्हणजे त्या संप्रदायाचा स्वीकार करणारे) जे कोणी असतील, त्यांनाच सहृदय मानून त्यांनी काव्य म्हणून मानलेल्या ध्वनीला काव्य म्हणण्याचा प्रघात सुरू केला, तरी तो काही सर्व विद्वानांच्या मनाची पकड घेणे शक्य नाही.

लोचनम्

ननु मा भूदसौ शब्दार्थस्वभावः मा च भूच्चारुत्वहेतुः, तेन गुणालङ्कारव्यतिरिक्तोऽसौ स्यादित्याशङ्क्य द्वितीयमभाववादप्रकारमाह– अन्ये इति । भवत्वेवम्; तथापि नास्त्येव ध्वनिर्यादृशस्त्वया लिलक्षयिषितः । काव्यस्य ह्यसौ कश्चिद्वक्तव्यः । न चासौ नृत्तगीतवाद्यादिस्थानीयः काव्यस्य कश्चित् । कवनीयं काव्यं, तस्य भावश्च काव्यत्वम् । न च नृत्तगीतादि कवनीयमित्युच्यते ।

प्रसिद्धेति । प्रसिद्धं प्रस्थानं शब्दार्थौ तद्गुणालङ्काराश्चेति, प्रतिष्ठन्ते परम्परया व्यवहरन्ति येन मार्गेण तत्प्रस्थानम् । काव्यप्रकार-

स्येति । काव्यप्रकारत्वेन तव स मार्गोऽभिप्रेतः, 'काव्यस्यात्मा' इत्युक्तत्वात् । ननु कस्मात्तत्काव्यं न भवतीत्याह – सहृदयेति । मार्गस्येति । नृत्तगीताक्षिनिकोचनादिप्रायस्येत्यर्थः । तदिति । सहृदयेत्यादिकाव्यलक्षणमित्यर्थः । ननु ये तादृशमपूर्वं काव्यरूपतया जानन्ति, त एव सहृदयाः । तदभिमतत्वं च नाम काव्यलक्षणमुक्तप्रस्थानातिरेकिण एव भविष्यतीत्याशङ्कयाह – न चेति । यथा हि खड्गलक्षणं करोमीत्युक्त्वा आतानवितानात्मा प्रक्रियमाणः सकलदेहाच्छादकः सुकुमारश्चित्रतन्तुविरचितसंवर्तनविवर्तनसहिष्णुरच्छेदकः सुच्छेद्य उत्कृष्टः खड्ग इति ब्रुवाणः परैः पटः खल्वेवंविधो भवति न खड्ग इत्ययुक्ततया पर्यनुयुज्यमान एवं ब्रूयात् – ईदृश एव खड्गो ममाभिमत इति तादृगेवैतत् । प्रसिद्धं हि लक्ष्यं भवति न कल्पितमिति भावः । तदाह – सकलविद्वदिति । विद्वांसोऽपि हि तत्समयज्ञा एव भविष्यन्तीति शङ्कां सकलशब्देन निराकरोति । एवं हि कृतेऽपि न किञ्चित्कृतं स्यादुन्मत्तता परं प्रकटितेति भावः ।

यस्त्वत्राभिप्रायं व्याचष्टे –– जीवितभूतो ध्वनिस्तावत्तवाभिमतः, जीवितं च नाम प्रसिद्धप्रस्थानातिरिक्तमलङ्कारकारैरनुक्तत्वात्, तच्च न काव्यमिति लोके प्रसिद्धमिति । तस्येदं सर्वं स्ववचनविरुद्धम् । यदि हि तत्काव्यस्यानुप्राणकं तेनाङ्गीकृतं पूर्वपक्षवादिना तच्चिरन्तनैरनुक्तमिति प्रत्युत लक्षणार्हमेव भवति । तस्मात्प्राक्तन एवात्राभिप्रायः ।

लोचन

'पण काय हो, तो (ध्वनि) शब्द किंवा अर्थ या स्वरूपाचा नसू द्या, आणि तो सौंदर्यहेतूही नसू द्या. पण मग तरी तो गुण अथवा अलंकार यांहून भिन्न असू शकेल ना ?' अशी शंका (ध्वनिवाद्यांच्या बाजूने) उपस्थित होऊ शकेल हे विचारात घेऊन (वृत्तिकार) अभाववादाचा दुसरा प्रकार 'दुसरे (कोणी) ...इ. शब्दांमध्ये मांडतात. या तऱ्हेने (ध्वनि गुणालंकारांहून निराळा होत. असला, तर) खुशाल होऊ दे, पण तरीही तुम्ही ज्या प्रकारच्या (म्हणजे आत्मा म्हणून काव्याशी संबद्ध असलेल्या) ध्वनीचे लक्षण करू इच्छीत आहात, तशा प्रकारचा ध्वनि नाहीच. कारण तो (ध्वनि) काव्याचा कोणीतरी (म्हणजे संबंधी) म्हणून तुम्ही सांगायला हवा! जर तो नृत्त, गीत,

वाद्य यांच्या वर्गातला असला तर तो काव्याचा कोणीतरी (संबंधी) असू शकणार नाही. (कारण) जे 'कवनीय' (म्हणजे शब्दांनी जुळवावयाचे) असते, ते 'काव्य' होय आणि त्या काव्याचा जो असाधारण धर्म, त्याला 'काव्यत्व' म्हणतात. आणि नृत्त, गीत इत्यादींना काही कोणी 'कवनीय' (शब्दांनी जुळवावयचे) म्हणत नाहीत.[3]

**प्रसिद्ध प्रस्थान** – म्हणजे सर्वमान्य असलेले शब्द, अर्थ आणि त्यांचे गुण व अलंकार हे होय. ज्या मार्गाने म्हणजे जे निकष लावून **प्रतिष्ठन्ते** म्हणजे (काव्याचे समीक्षक) परंपरेने व्यवहार करीत आले आहेत, तो मार्ग म्हणजे 'प्रस्थान'! काव्यप्रकारांमध्ये इ. – तो (ध्वनीचा) मार्ग काव्याचा धर्म म्हणून हवा आहे. कारण तुम्ही (म्हणजे ध्वनिवाद्याने) (कारिकेमध्ये) 'काव्याचा आत्मा ध्वनि' असे म्हटले आहे. यावर 'तो कोणत्या कारणामुळे काव्य होत नाही?' असे जर तुम्ही विचारले तर त्याचे उत्तर अभाववादी 'सहृदयांना...' इ. शब्दांनी देईल. 'मार्गाच्या बाबतीत' म्हणजे नृत्त, गीत, डोळे किलकिले करणे, यासारख्या मार्गाच्या बाबतीत, असा अर्थ. 'ते (काव्याचे लक्षण)' म्हणजे 'सहृदयांना'...इ. काव्यलक्षण असा अर्थ.

'पण काय हो, तशा अपूर्व (म्हणजे पूर्वी कोणाच्याही ध्यानात न आलेल्या 'ध्वनि' या) प्रकारालाच जे काव्य म्हणून जाणतात, तेच (खरे) सहृदय होत, नाही का ? आणि त्यांना पसंत असणे हे (जे) काव्याचे लक्षण, ते पूर्वी सांगितलेल्या निकषांहून भिन्न असलेल्या ध्वनि-तत्त्वाच्याच बाबतीत संभवेल! अशी शंका (ध्वनिवाद्यातर्फे) घेतली जाईल हे जाणून त्यावरचे अभाववाद्याचे म्हणणे वृत्तिकार 'आणि... नाही' इ. शब्दांत मांडतात. कारण 'मी खड्गाची व्याख्या करतो' असे म्हणून जर कोणी सांगू लागेल की, लांबी व रुंदी असलेले, पांघरण्याचे कामी येणारे, सर्व शरीर आच्छादित करणारे, मुलायम, रंगीबेरंगी धाग्यांचे विणलेले, गुंडाळता व उलगडता येणारे, (इतर वस्तूंना) कापू न शकणारे पण स्वतः सहज कापले जाऊ शकणारे असे जे उत्कृष्ट प्रकारचे असते, तेच खड्ग होय,' तर बाकीचे त्याचे म्हणणे अयोग्य आहे असे म्हणून त्याच्यावर आक्षेप घेतील की, 'बाबा रे ! खरे म्हणजे वस्त्र अशा प्रकारचे असते, खड्ग नाही !' या उपरही जर तो म्हणेल

की, मला आपला असाच पदार्थ खड्ग म्हणून अभिप्रेत आहे, तर त्याच्या या म्हणण्याप्रमाणेच ध्वनिवाद्यांचे हे (म्हणजे ध्वनीला काव्य-प्रकार म्हणून जे जाणतात तेच खरे सहृदय हे) म्हणणे आहे. ज्याचे (शास्त्रशुद्ध) लक्षण करावयाचे, ते प्रसिद्ध (म्हणजे सर्वमान्य) असते, कल्पित असत नाही, हा भावार्थ. म्हणून (अभाववाद्यातर्फे) 'सर्व विद्वानांच्या...' असे मांडले जात आहे. 'विद्वानदेखील तेच असतील की, जे ध्वनि-संकेत जाणतील' या ध्वनिवाद्यांच्या बाजूच्या शंकेचे निराकरण (वृत्तिकारानी) अभाववाद्याच्या तोंडी 'सर्व' शब्द घालून केले आहे. कारण (अशा थोड्या विद्वानांना आनंद देईल तोच ध्वनि) असे लक्षण केले, तरी काही (लक्षण केल्यासारखे म्हणजे काही मिळविल्यासारखे तर होणार नाहीच, पण) उलट (ध्वनिवाद्याने आपला) वेडेपणा मात्र प्रकट केल्याप्रमाणे होईल हे तात्पर्य.

पण कोणा एका टीकाकाराने या द्वितीय अभाववाद्याचा अभिप्राय पुढीलप्रमाणे आहे असे व्याख्यान (विवरण) केले आहे– 'तुम्हांला (म्हणजे ध्वनिवाद्याला) तो ध्वनि काव्याचे जीवित असलेला असाच मान्य आहे, आणि (हे म्हणजे ध्वनिरूपी) जीवित खरोखर प्रसिद्ध प्रस्थानाहून निराळे आहे, कारण ते (जीवित) अलंकारकारांनी सांगितलेले नाही आणि ते काव्य नाही असे जगात प्रसिद्ध आहे.'

(परंतु) त्याचे हे सगळे (व्याख्यान) अभाववाद्याच्या स्वतःच्या मताच्या विरुद्ध आहे[४] कारण जर त्या पूर्वपक्ष मांडणाऱ्याने म्हणजे अभाववाद्याने ते ध्वनितत्त्व काव्याचे जीवित म्हणून मान्य केले,[५] तर प्राचीनांनी सांगितले नाही म्हणून उलट ते लक्षण करावयाच्याच योग्यतेचे ठरते म्हणून (हे मत पूर्वपक्ष्याच्या तोंडी शोभण्यासारखे नसल्याने) पूर्वी (आम्ही) सांगितल्याप्रमाणेच या ठिकाणी पूर्वपक्ष्याचा अभिप्राय आहे.

टीपा

१. 'प्रसिद्ध प्रस्थान' म्हणजे काव्याचे किंवा काव्याच्या शोभाहेतूंचे मूल्यमापन करण्याबाबत आतापर्यंतच्या काव्यशास्त्रकारांनी सांगितलेले निकष किंवा मानदंड. ते निकष म्हणजे शब्द, अर्थ आणि त्यांचे गुण व अलंकार. 'प्रस्थान' या शब्दाची व्युत्पत्ती अभिनवगुप्तांनी 'ज्या मार्गाने प्रतिष्ठन्ते

म्हणजे परंपरेने व्यवहार करतात, तो मार्ग म्हणजे प्रस्थान ' अशी दिली आहे.

२. तो नाट्याशी संबद्ध असू शकेल, पण तो शब्दार्थस्वरूप असलेल्या काव्याचा कोणीतरी असू शकणार नाही.

३. ह्याच आशय पुढे (काशी आवृत्ति, पृ. १०७ वरील लोचनात) यच्च नृत्त-गीतादि .... किंचित् या वाक्याने पुन्हा सांगितला आहे. एकूण तात्पर्य हे की, ध्वनि असला तरी तो काव्यबाह्य असल्यामुळे तो काव्याशी संबद्ध असा कोणीतरी असू शकणार नाही.

४. स्वतःच्या मताच्या विरुद्ध आहे असे म्हणण्यातील आशय असा की, अभाव-वादी, ध्वनि हे काव्यजीवित म्हणून मानावयास वस्तुतः तयार नाही. त्याने ते मान्य केले आणि केवळ प्राचीन लोकांनी सांगितलेले नाही, एवढ्याच कारणास्तव ते काव्याचे जीवित होऊ शकत नाही असे म्हटले तर त्याच्या या म्हणण्यामध्ये काहीही दम न राहून तो अगदीच फुसका पूर्वपक्ष होतो.

५. वस्तुतः तो ध्वनीला जीवित म्हणून मान्य करील हे संभवनीय वाटत नाही. तरीसुद्धा 'जर त्याने जीवित म्हणून मान्य केले तर '......अशा तऱ्हेचे विधान अभिनवगुप्तांनी त्याच्यावर का लादावे हे कळण्यास मार्ग नाही. त्या टीका-काराचे प्रत्यक्ष विवरण उपलब्ध झाले असते, तर कदाचित याचा उलगडा होऊ शकला असता.

ध्वन्यालोकः

पुनरपरे तस्याभावमन्यथा कथयेयुः- न सम्भवत्येव ध्वनिर्नामापूर्वः कश्चित् । कामनीयकमनतिवर्तमानस्य तस्योक्तेष्वेव चारुत्वहेतुष्वन्तर्भावात् । तेषामन्यतमस्यैव वा अपूर्वसमाख्यामात्रकरणे यत्किंचन कथनं स्यात् । किञ्च वाग्विकल्पानामानन्त्यात् सम्भवत्यपि वा कस्मिंश्चित् काव्यलक्षणविधायिभिः प्रसिद्धैरप्रदर्शिते प्रकारलेशे ध्वनिर्ध्वनिरिति यदेतदलीकसहृदयत्वभावनामुकुलितलोचनैर्नृत्यते, तत्र हेतुं न विद्मः । सहस्रशो हि महात्मभिरन्यैरलङ्कारप्रकाराः प्रकाशिताः, प्रकाश्यन्ते च । न च तेषामेषा दशा श्रूयते ।

ध्वन्यालोक

आणखी दुसरे (कोणी) त्याचा अभाव वेगळ्या तऱ्हेने प्रतिपादन करतील :—

'ध्वनि नावाचा अपूर्व (पूर्वी न सांगितलेला) कोणीतरी मुळी असूच शकत नाही. (काही झाले तरी) तो रमणीयतेच्या क्षेत्राबाहेरचा नसल्याने त्याचा अंतर्भाव, यापूर्वी सांगितल्या गेलेल्या (गुण, अलंकार इ.) सौंदर्यहेतूंतच होत असला पाहिजे. किंवा (फारतर) त्या सौंदर्यहेतूंपैकीच एखाद्याला तुम्ही केवळ नवीन नाव दिले असेल, तर ते अगदीच किरकोळ स्वरूपाचे काहीतरी सांगितल्यासारखे होईल.

आणखी असे की, भाषेमध्ये बोलण्याने प्रकार अनंत असल्याने सुप्रसिद्ध काव्यलक्षणकारांनी न दाखवलेला कोठला तरी एखादा बारीकसा प्रकार संभवत असला तरी आपण (मोठे) सहृदय आहोत अशी खोटीच कल्पना करून घेऊन तुम्ही हे जे डोळे मिटून 'ध्वनि', 'ध्वनि' असे म्हणत नाचता आहात, त्याचे कारण आम्हांला काही कळत नाही (बुवा)! कारण दुसऱ्या थोर विद्वानांनी अलंकारांचे प्रकार आजपर्यंत हजारोंनी उजेडात आणले आहेत आणि ते अजूनही आणले जात आहेत, पण त्या प्रकारांबाबत काही अशी (म्हणजे तुमच्या 'ध्वनी' च्या बाबत आहे तशी) परिस्थिती असल्याचे कुठे ऐकू येत नाही!

लोचनम्

ननु भवत्वसौ चारुत्वहेतुः शब्दार्थगुणालङ्कारान्तर्भूतश्च, तथापि ध्वनिरित्यमुया भाषया जीवितमित्यसौ न केनचिदुक्त इत्यभिप्रायमाशङ्क्य तृतीयमभाववादमुपन्यस्यति – पुनरपर इति। कामनीयकमिति कमनीयस्य कर्म। चारुत्वधीहेतुतेति यावत्।

ननु विच्छित्तीनामसंख्यत्वात्काचित्तादृशी विच्छित्तिरस्माभिर्दृष्टा, या नानुप्रासादौ, नापि माधुर्यादावुक्तलक्षणेऽन्तर्भवेदित्याशङ्कयाभ्युपगमपूर्वकं परिहरति – वाग्विकल्पानामिति। वक्तीति वाक् शब्दः। उच्यते इति वागर्थः। उच्यतेऽनयेति वागभिधाव्यापारः। तत्र शब्दार्थवैचित्र्यप्रकारोऽनन्तः। अभिधावैचित्र्यप्रकारोऽप्यसंख्येयः। प्रकारलेश इति। स हि चारुत्वहेतुर्गुणो वालङ्कारो वा। स च सामान्यलक्षणेन संगृहीत एव। यदाहुः–'काव्यशोभायाः कर्तारो धर्मा गुणाः, तदतिशयहेतवस्त्वलङ्काराः' इति। तथा 'वक्राभिधेयशब्दोक्तिरिष्टा वाचामलङ्कृतिः' इति। ध्वनिर्ध्वनिरिति वीप्सया सम्भ्रमं सूचयन्नादरं दर्शयति। नृत्यत इति।

तल्लक्षणकृद्भिस्तद्युक्तकाव्यविधायिभिस्तच्छ्रवणोद्भूतचमत्कारैश्च प्रतिपत्तृभिरिति शेषः। ध्वनिशब्दे कोऽत्यादर इति भावः। एषा दर्शोति। स्वयं दर्पः परैश्च स्तूयमानतेत्यर्थः। वाग्विकल्पाः वाक्प्रवृत्तिहेतुप्रतिभाव्यापारप्रकारा इति वा।

लोचन

'पण काय हो, तो ध्वनि सौंदर्यहेतू असू द्या आणि शब्द, अर्थ, गुण व अलंकार यांमध्येच अन्तर्भूत होणारा असू द्या. पण तरीही त्याबद्दल 'ध्वनि' अशी संज्ञा वापरून 'तो काव्याचे जीवित होय' असे तर आमच्या आधी कोणी म्हटले नाही ना? (ते आम्ही ध्वनिवादी म्हणत आहोत') असाही ध्वनीच्या पुरस्कर्त्यांचा अभिप्राय असू शकेल हा संभव विचारात घेऊन वृत्तिकार अभाववादाचा तिसरा प्रकार मांडण्यास 'आणखी दुसरे कोणी ...' इ. शब्दांनी प्रारंभ करतात. 'कामनीयक' म्हणजे कमनीयाचे (म्हणजे सुंदर वस्तूचे) कार्य, सौंदर्याची जाणीव उत्पन्न करण्यास कारण असणे हा अर्थ.

'पण काय हो, काव्यसौंदर्याचे प्रकार असंख्य असल्यामुळे आम्हाला असे काही काव्यसौंदर्य दिसले की, जे आजपर्यंत वर्णिलेल्या अनुप्रासादिकांमध्ये किंवा माधुर्यादिकांमध्ये अन्तर्भूत होऊ शकत नाही.' अशी शंका (ध्वनिवाद्याच्या बाजूने) घेतली जाण्याची शक्यता लक्षात घेऊन, इतकेच नव्हे, तर ते म्हणणे मान्यही करून त्याला अभाववाद्यातर्फे 'भाषेचे प्रकार' ....इ. शब्दांनी उत्तर दिले जात आहे.

(वाक् या शब्दाची व्युत्पत्ती तीन प्रकारांनी सांगता येईल.)

१) वाक् म्हणजे जो (बोलणाऱ्याच्या मनातील विचार) सांगतो तो, म्हणजे 'शब्द.'

२) वाक् म्हणजे (शब्दाच्या द्वारा) जो सांगितला जातो, तो, म्हणजे 'अर्थ' आणि

३) वाक् म्हणजे ज्याच्या योगे अर्थ सांगितला जातो, तो म्हणजे 'अभिधाव्यापार'.'

त्यांपैकी शब्द आणि अर्थ यांच्या विविधतेचे प्रकार अनन्त आहेत आणि अभिधाव्यापाराच्या वैचित्र्याचे प्रकारही मोजता येणार

नाहीत इतके आहेत. 'बारीकसा प्रकार' इ. – कारण तो सौन्दर्याला कारणीभूत असलेला (प्रकार) एकतर 'गुण' तरी असेल किंवा 'अलंकार' तरी असेल. आणि (पूर्वाचार्यांनी केलेल्या गुण आणि अलंकार यांच्या) 'सामान्य' लक्षणात त्याचा अन्तर्भाव होऊन गेलाच आहे की! कारण, म्हटलेच आहे[२] –

'काव्याची शोभा निर्माण करणारे जे धर्म ते 'गुण' होत आणि ती शोभा वाढविण्यास कारणीभूत असणारे ते 'अलंकार' होत.'

तसेच (म्हटले आहे[३]) – (वाच्य) अर्थ आणि शब्द यांचा वक्र (म्हणजे चमत्कृतिजनक) वापर म्हणजेच भाषेचे अलंकार होत!

'ध्वनि', 'ध्वनि' अशा (वृत्तीमधील) द्विरुक्तीने त्यांच्या (म्हणजे ध्वनिवाद्यांच्या) मनात उत्पन्न होणारा आवेग सुचवून त्यांना ध्वनीबद्दल केवढा आदर[४] वाटतो ते दाखविले आहे, 'नाचता आहात ...' वगैरे. म्हणजे १) ध्वनीचे लक्षण करणारे, २) ध्वनीने युक्त असलेले काव्य रचणारे, ३) ते काव्य ऐकून ज्यांना चमत्कार वाटतो असे श्रोते, (असे तिघेजण नाचत आहात), असा आशय. 'ध्वनि' शब्दाबद्दल कसला हा इतका मोठा आदर, हा अभाववाद्याच्या म्हणण्यातील भावार्थ. 'अशी दशा' म्हणजे स्वत:विषयी गर्व आणि दुसऱ्यांकडून स्तुती केली जाणे ही परिस्थिती, असा अर्थ.[५]

किंवा 'भाषेचे प्रकार' ....याचा अर्थ 'भाषा वापरण्यास कारण होणारे प्रतिभेचे निरनिराळे व्यापार' असाही करता येईल.[६]

टीपा

१. पाहा, पृ. २० वरील ११ वी टीप.
२. वामनाचे 'काव्यालङ्कारसूत्र' ३/१/१–२.
३. भामहाचा 'काव्यालङ्कार', १–३६.
४. काही प्रतींमध्ये 'आदर' असा पाठ आहे, तर काहींमध्ये 'अनादर' असा पाठ आहे. 'अनादर' असा पाठ असला, तर 'अभाववाद्यांचा ध्वनीबद्दलचा अनादर' असा अर्थ करावा.
५. मूळातल्या 'अशी परिस्थिती' याचा अर्थ अभिनवगुप्तांनी 'स्वत:ला गर्व आणि दुसऱ्यांकडून स्तुती केली जाण्याची परिस्थिती' असा केला आहे. पण 'अशी परिस्थिती' याचा अर्थ पुढीलप्रमाणेही करता येईल:– अशी दशा

. म्हणजे अशी केविलवाणी अवस्था. ध्वनीभोवती विरोधाचे काहूर माजल्याने त्याची जी दीनवाणी अवस्था झाली आहे ती. आतापर्यंत इतरांनी जे बारीकसे का होईना पण नवे अलंकार उजेडात आणले, त्यांना ध्वनीसारखा विरोधही झाला नाही. त्यामुळे त्या अलंकारांइतकीही ध्वनीची किंमत नाही, हा भावार्थ. आणि इतके असूनही ध्वनिवादी लोक उगाचच नाचत आहेत !

६. मागे 'वाग्विकल्प' याचे तीन प्रकारे अर्थ केले होते:–१) 'शब्दवैचित्र्य' हा प्रकार, २) 'अर्थवैचित्र्य' हा प्रकार आणि ३) 'अभिधावैचित्र्य' हा प्रकार. आता येथे 'प्रतिभाव्यापाराचे प्रकार' हा ४ था पर्यायी अर्थ सांगण्यात येत आहे.

### ध्वन्यालोकः

तस्मात् प्रवादमात्रं ध्वनिः । न त्वस्य क्षोदक्षमं तत्त्वं किञ्चिदपि प्रकाशयितुं शक्यम् । तथा चान्येन कृत एवात्र श्लोकः–

यस्मिन्नस्ति न वस्तु किंचन मनःप्रह्लादि सालंकृति
व्युत्पन्नै रचितं च नैव वचनैर्वक्रोक्तिशून्यं च यत् ।
काव्यं तद्ध्वनिना समन्वितमिति प्रीत्या प्रशंसञ्जडो
नो विद्मोऽभिदधाति किं सुमतिना पृष्टः स्वरूपं ध्वनेः ॥

### ध्वन्यालोक

म्हणून ध्वनि हा केवळ एक पोकळ ( अर्थशून्य ) शब्द आहे. चिकित्सा केली तर तिला तोंड देऊ शकेल असे कोणतेही तत्त्व हा ध्वनीमध्ये दाखविता येणे शक्य नाही. आणि या बाबतीत अशाच आशयाचा एक श्लोक दुसऱ्या (एका कवीने) केलाच आहे–

'ज्यामध्ये अलंकारयुक्त असा, मनाला आनंद देणारा कोणताही अर्थ नाही, ज्याची रचना विद्वत्ताप्रचुर शब्द वापरून केलेली नाही, ज्यामध्ये वक्रोक्तीचा अभाव आहे, ते काव्य ध्वनीने युक्त आहे अशी आनंदाने प्रशंसा करणाऱ्या मन्दमतीला एखाद्या बुद्धिमानाने 'त्या ध्वनीचे स्वरूप काय ?' असे विचारले तर, तो मूढ काय सांगेल हे आम्हाला कळत नाही !

### लोचनम्

तस्मात्प्रवादमात्रमिति । सर्वेषामभाववादिनां साधारण उपसंहारः। यतः शोभाहेतुत्वे गुणालङ्कारेभ्यो न व्यतिरिक्तः, यतश्च व्यतिरिक्तत्वे

न शोभाहेतुः, यतश्च शोभाहेतुत्वेऽपि नादरास्पदं तस्मादित्यर्थः । न चेयमभावसम्भावना निर्मूलैव दूषितेत्याह — तथा चान्येनेति । ग्रन्थकृत्समानकालभाविना मनोरथनाम्ना कविना । यतो न सालङ्कृति, अतो न मनःप्रह्लादि । अनेन अर्थालङ्काराणामभाव उक्तः । व्युत्पन्नै रचितं च नैव वचनैरिति शब्दालङ्काराणाम् । वक्रोक्तिः उत्कृष्टा संघटना, तच्छून्यमिति शब्दार्थगुणानाम् । वक्रोक्तिशून्यशब्देन सामान्यलक्षणाभावेन सर्वालङ्काराभाव उक्त इति केचित् । तैः पुनरुक्तत्वं न परिहृतमेवेत्यलम् । प्रीत्येति । गतानुगतिकानुरागेणेत्यर्थः । सुमतिनेति । जडेन पृष्टो भ्रूभङ्गकटाक्षादिभिः एव उत्तरं ददत्तत्स्वरूपं काममाचक्षीतेति भावः ।

लोचन

'म्हणून.... केवळ एक पोकळ शब्द आहे '.... सर्व अभाववाद्यांच्या म्हणण्याचा हा एकच, समान समारोप आहे. कारण (१ ल्या अभाववाद्यांच्या मतानुसार) तो (ध्वनि) शोभाहेतू असला तर गुणालंकारांहून वेगळा असणार नाही. (२ ऱ्या अभाववाद्यांच्या मतानुसार) गुणालंकारांहून वेगळा असला, तर शोभाहेतू असणार नाही. आणि (३ ऱ्या अभाववाद्यांच्या मतानुसार) शोभाहेतू असला, तरीही उपेक्षणीय, म्हणजे किरकोळ, क्षुल्लक आहे, म्हणून (तो केवळ एक पोकळ शब्द आहे), असा आशय.

आणि या ध्वनीच्या अभावासंबंधी अशी कल्पना करण्यास काहीच आधार नसताना तिचे खंडन केले (जाणार आहे) असे नाही, हे स्पष्ट करण्यासाठी 'अशाच आशयाचा दुसऱ्या एकाने (श्लोक रचला आहे) हे सांगितले. (दुसऱ्या एकाने) म्हणजे ग्रंथकर्त्यांच्या समकालीन असलेल्या 'मनोरथ' नावाच्या कवीने. ज्या अर्थी अलंकारांनी युक्त नाही, त्या अर्थी मनाला आनंद देणारे नाही . त्यामुळे तशा काव्यात अलंकारांचा अभाव असल्याचे सांगितले. 'ज्याची रचना विद्वत्ताप्रचुर शब्द वापरून केलेली नाही'— यामुळे त्या काव्यातला शब्दालंकारांचा अभाव सांगितला.

'वक्रोक्ति' म्हणजे उत्कृष्ट (शब्दांची व अर्थांची) रचना.

'तीविरहित' म्हणजे त्या काव्यात शब्दगुण किंवा अर्थगुण नाहीत, हे सांगितले. काहीजण असेही म्हणतात की, 'वक्रोक्तिविरहित' या शब्दाने येथे सर्वच अलंकारांचा अभाव' हा अर्थ व्यक्त होतो, कारण वक्रोक्ति हे अलंकारांचे सर्वसामान्य लक्षण आहे. पण (असे व्याख्यान करून) त्या टीकाकारांनी पुनरुक्तीचा दोष टाळला नाहीच;[२] म्हणून हे राहू द्या.

'आनंदाने' म्हणजे (स्वत: विचार न करता) दुसऱ्याची मते अंधपणे अनुसरण्याच्या हौशीने, असा अर्थ. 'बुद्धिमानाने' वगैरे– एखाद्या मूढाने (ध्वनीच्या स्वरूपाबद्दल) विचारले, तर हा (ध्वनीचा प्रेमी) केवळ भुवया वाकवून, डोळे मिचकावून (म्हणजे केवळ मूक अभिनयानेच) त्या ध्वनीचे स्वरूप मारे वाटेल त्या तऱ्हेने सांगेल (व वेळ मारून नेऊ शकेल, पण विद्वानाने विचारल्यास शब्दाच्या द्वारा काय सांगू शकेल हा भावार्थ.)

टीपा

१. 'मनोरथ' कवीने ध्वनीविषयी काढलेल्या उद्‌गारांवरून असे दिसते की, अभाववादाचे सामान्यपणे प्रतिपादन प्रत्यक्षात केले जात होते, त्यामुळे अभाव हा कल्पित नसून त्याचे विशिष्ट संभाव्य प्रकार मात्र कल्पिलेले आहेत. आणि तसे पूर्वी पृ. १६ वर अभिनवगुप्तांनी म्हटले आहे.
२. भामहाप्रमाणे वक्रोक्ति–अतिशयोक्ति– ही सर्व अर्थालंकारांना आधारभूत असते. वरील श्लोकातल्या 'वक्रोक्ति' शब्दाचा हा अर्थ घेतला, तर या श्लोकातल्या पहिल्या ओळीतल्या कल्पनेची पुनरुक्ति होते. म्हणून 'लोचना'त वक्रोक्तीचा अर्थ निराळा केला.

ध्वन्यालोकः

भाक्तमाहुस्तमन्ये । अन्ये तं ध्वनिसंज्ञितं काव्यात्मानं गुणवृत्तिरित्याहुः ।

ध्वन्यालोक

दुसरे त्याला 'लाक्षणिक' म्हणतात.[१] (म्हणजेच) दुसरे, ध्वनि नावाच्या त्या काव्यात्म्याला 'गुणवृत्ति' (म्हणजे लक्षणा) म्हणतात.

एवमेतेऽभावविकल्पाः शृङ्खलाक्रमेणागताः, न त्वन्योन्यासंबद्धा एव। तथा हि तृतीयाभावप्रकारनिरूपणोपक्रमे पुनःशब्दस्यायमेवाभिप्रायः। उपसंहारैक्यं च सङ्गच्छते। अभाववादस्य सम्भावनाप्राणत्वेन भूतत्वमुक्तम्। भाक्तवादस्त्वविच्छिन्नः पुस्तकेष्वित्यभिप्रायेण भाक्तमाहुरिति। नित्यप्रवृत्तवर्तमानापेक्षयाभिधानम्। भज्यते सेव्यते पदार्थेन प्रसिद्धतयोत्प्रेक्ष्यत इति भक्तिर्धर्मोऽभिधेयेन सामीप्यादिः, तत आगतो भाक्तो लाक्षणिकोऽर्थः। यदाहुः —

अभिधेयेन सामीप्यात्सारूप्यात्समवायतः।
वैपरीत्यात्क्रियायोगाल्लक्षणा पञ्चधा मता॥ इति।

गुणसमुदायवृत्तेः शब्दस्यार्थभागस्तैक्ष्ण्यादिर्भक्तिः, तत आगतो गौणोऽर्थो भाक्तः। भक्तिः प्रतिपाद्ये सामीप्यतैक्ष्ण्यादौ श्रद्धातिशयः, तां प्रयोजनत्वेनोद्दिश्य तत आगतो भाक्त इति गौणो लाक्षणिकश्च। मुख्यस्य चार्थस्य भङ्गो भक्तिरित्येवं मुख्यार्थबाधा, निमित्तं प्रयोजनमिति त्रयसद्भाव उपचारबीजमित्युक्तं भवति। काव्यात्मानं गुणवृत्तिरिति। सामानाधिकरण्यस्यायं भावः — यद्यप्यविवक्षितवाच्ये ध्वनिभेदे 'निःश्वासान्ध इवादर्शः' इत्यादावुपचारोऽस्ति, तथापि न तदात्मैव ध्वनिः, तद्व्यतिरेकेणापि भावात्, विवक्षितान्यपरवाच्यप्रभेदादौ। अविवक्षितवाच्येऽप्युपचार एव न ध्वनिरिति वक्ष्यामः। तथा च वक्ष्यति —

भक्त्या बिभर्ति नैकत्वं रूपभेदादयं ध्वनिः।
अतिव्याप्तेरथाव्याप्तेर्न चासौ लक्ष्यते तया॥ इति॥
कस्यचिद् ध्वनिभेदस्य सा तु स्यादुपलक्षणम्। इति च।

गुणाः सामीप्यादयो धर्मास्तैक्ष्ण्यादयश्च। तैरुपायैर्वृत्तिरर्थान्तरे यस्य, तैरुपायैर्वृत्तिर्वा शब्दस्य यत्र स गुणवृत्तिः शब्दोऽर्थो वा। गुणद्वारेण वा वर्तनं गुणवृत्तिरमुख्योऽभिधाव्यापारः। एतदुक्तं भवति— ध्वनतीति वा, ध्वन्यते इति वा, ध्वननमिति वा यदि ध्वनिः। तथाप्युपचरितशब्दार्थव्यापारातिरिक्तो नासौ कश्चित्। मुख्यार्थे ह्यभिधैवेति पारिशेष्यादमुख्य एव ध्वनि, तृतीयराश्यभावात्।

याप्रमाणे हे अभावाचे तीन प्रकार परस्परांशी असंबद्ध, स्वतंत्र असे आलेले नसून त्यांच्यामध्ये शृंखलाबन्धन्यायाने एक विशिष्ट क्रम आहे. कारण अभावाच्या तिसऱ्या प्रकाराच्या निरूपणाच्या सुरुवातीस असलेल्या 'पुनः' (म्हणजे 'आणखी') या शब्दाचा हाच (म्हणजे आधी सांगितलेल्या प्रकाराला जोडूनच त्यानंतरचा प्रकार येतो, हाच) अभिप्राय आहे. शिवाय सर्व अभाववाद्यांच्या म्हणण्याचा समारोप हा एकच आहे[१] ही गोष्टही हे अभावाचे प्रकार एकमेकांशी संबद्ध आहेत याच्याशी जुळणारी आहे

अभाववादाचे तीनही प्रकार निव्वळ काल्पनिक असल्यामुळे कारिकेमध्ये (परोक्ष) भूतकाळाचा उपयोग केला आहे. पण भाक्त-वाद (म्हणजे लक्षणावाद) पुस्तकातून अविच्छिन्न परंपरेने आला आहे या अभिप्रायाने 'त्याला लाक्षणिक म्हणतात' असा वर्तमानकाळाचा वापर केला, कारण वर्तमानकाळाचा अर्थ एखादी गोष्ट नित्य घडत आली आहे, किंवा चालू आहे असा होतो.[३]

'भक्ति' म्हणजे वाच्यार्थाशी सामीप्य (सांनिध्य) वगैरे धर्म. तो (धर्म) 'भजला जातो' (म्हणजे वाच्यार्थाकडून त्याचा आश्रय केला जातो), म्हणून याला 'भक्ति' म्हणावयाचे. तो सामीप्यादि धर्म प्रसिद्ध[४] असल्यामुळे वाच्यार्थाकडून त्याची कल्पना केली जाते, म्हणजे वाच्यार्थाला त्या धर्माची आवश्यकता असते. त्या भक्ती (धर्मा)-पासून आलेला[५] तो भाक्त, म्हणजे सादृश्येतर संबंधावर आधारलेला लाक्षणिक अर्थ. कारण, म्हटलेच आहे की—

'वाच्यार्थाशी सामीप्य, सादृश्य, समवाय, विपरीतता (म्हणजे विरुद्धता) आणि क्रियायोग (म्हणजे वाच्यार्थाशी क्रियाद्वारक संबंध) या (संबंधां)मुळे लक्षणा पाच प्रकारची आहे असे मानतात.[६]

गुणसमुदायाचा बोधक असणाऱ्या[७] शब्दाच्या अर्थाचा 'तेजस्विता' वगैरे एक भाग म्हणजे भक्ति. त्या भक्तीपासून म्हणजे अंशरूप धर्मापासून आलेला गौण अर्थ तो 'भाक्त.' (किंवा) प्रतिपादन करावयाचा असलेला जो निकटता, तेजस्विता इ. धर्म, त्याविषयी

बोलणाऱ्याला वाटणारी विशेष श्रद्धा (म्हणजे आस्था) म्हणजे 'भक्ति'. त्या भक्तीला म्हणजे आस्थेला प्रयोजन मानून तीपासून आलेला, म्हणजे ती आस्था प्रत्ययास आणण्याच्या इच्छेतून निर्माण झालेला अर्थ तो भाक्त, म्हणजे गौण (म्हणजे सादृश्य संबंधावर आधारलेला लक्ष्यार्थ) हे दोन्हीही अर्थ 'भाक्त' होत आणि मुख्य अर्थाचा 'भङ्ग (म्हणजे बाध) म्हणजेही भक्ति![८] अशा रीतीने मुख्यार्थाचा बाध, निमित्त (म्हणजे वाच्यार्थ व लक्ष्यार्थ यांमधील सादृश्येतर किंवा सादृश्य हा संबंध) आणि प्रयोजन, ही तिन्ही कारणे असणे हे लक्षणेचे बीज (म्हणजे लक्षणा मानावयास आवश्यक कारण) असे म्हटल्याप्रमाणे झाले आहे.[९]

(त्या) काव्यात्म्याला 'गुणवृत्ति' (म्हणतात)– (तम् भाक्तम् हे कारिकेतले शब्द) एकाच विभक्तीत वापरण्यामागचा अभिप्राय असा[१०]–'नि:श्वासांनी अन्ध झालेल्या आरशाप्रमाणे असलेला' इत्यादि[११] अविवक्षितवाच्य[१२] प्रकारामध्ये जरी लक्षणा आहे, तरी ध्वनि हा त्या लक्षणेशी एकरूप मुळीच नाही, कारण जेथे लक्षणा नसते, तेथेही ध्वनि असतो. उदाहरणार्थ–विवक्षितान्यपरवाच्य[१३] प्रकार वगैरेमध्ये. 'अविवक्षितवाच्य' प्रकारामध्येसुद्धा लक्षणा हाच ध्वनि नव्हे हे आम्ही पुढे[१४] सांगणार आहोत. आणि त्याचप्रमाणे (मूलग्रंथकार म्हणजे कारिकाकार) पुढे[१५] म्हणणार आहेत की–

'ध्वनीचे स्वरूप लक्षणेच्या स्वरूपाहून वेगळे असल्यामुळे हा ध्वनी लक्षणेशी एकरूप नव्हे. अतिव्याप्ति आणि त्याचप्रमाणे अव्याप्ति (हे दोष) उद्भवतात म्हणून ती लक्षणा त्या ध्वनीचे लक्षण (म्हणजे व्यवच्छेदक, असाधारण धर्म) ही होऊ शकत नाही. मात्र लक्षणा हे ध्वनीच्या एखाद्या प्रकारचे उपलक्षण असू शकेल.'

'गुण' म्हणजे सामीप्य वगैरे (सादृश्येतर) धर्म आणि तेजस्वी-पणा इ. (सादृश्यरूप) धर्म. त्या गुणांमुळे, जो शब्द वाच्यार्थाहून भिन्न अर्थाने वापरलेला असतो, तो (लाक्षणिक) शब्द 'गुण-वृत्ति' होय. किंवा त्या गुणांमुळे शब्द ज्या लक्ष्य अर्थाकडे बोट दाखवितो, तो (लक्ष्य) अर्थ 'गुणवृत्ति' (म्हणता येईल). किंवा गुणांमुळे (लक्ष्यार्थ प्रकट करण्याचे) कार्य करणे म्हणजेही गुणवृत्ति – म्हणजे अभिधेचा,

मुख्य नसलेला व्यापार[१६] हाही गुणवृत्ति होऊ शकेल. लक्षणावाद्यांनी एकंदरीत असे म्हटल्यासारखे आहे की, ध्वनित करतो तो (व्यंजक) शब्द, किंवा ध्वनित होतो तो (व्यंग्य) अर्थ किंवा ध्वनित करणे हा (व्यंजना) व्यापार यांपैकी कोणताही जरी 'ध्वनि' म्हटला,[१७] तरी तो 'गुणवृत्ति' असणारा शब्द, किंवा 'गुणवृत्ति' असणारा अर्थ किंवा 'गुणवृत्ति' असणारा व्यापार यांहून वेगळा असा कोणीही नाही. मुख्यार्थाच्या बाबतीत अभिधा हाच व्यापार असल्यामुळे त्याहून निराळा अमुख्य अर्थ हाच ध्वनि होय कारण शब्द – अभिधा – मुख्यार्थ व शब्द –गुणवृत्ति – अमुख्यार्थ याखेरीज तिसरा गट नाहीच ![१८]

टीपा

१. लक्षणा

व्यवहारातील पुष्कळसे शब्द आपण जरी त्यांच्या ठरलेल्या अर्थानेच म्हणजे वाच्यार्थानेच वापरीत असलो तरी, काही वेळा आपण असे शब्दप्रयोग करतो की त्या शब्दांचा वाच्यार्थ घेऊन वाक्याचा अर्थ लावू गेल्यास तो लागत नाही, म्हणजे तो संभवनीय नसतो. उदा. 'पातेले उकळते आहे' या वाक्यातील 'पातेले' हा शब्द वाच्यार्थाने घेऊन चालणार नाही. कारण पातेले कसे उकळू शकेल ? अशा रीतीने या वाक्यात 'पातेले' शब्दाचा वाच्यार्थ अडल्यामुळे म्हणजेच वाच्यार्थाचा बाध झाल्यामुळे आपल्याला 'पातेले' या शब्दाचा 'पातेल्यातले पाणी' अशासारखा दुसरा योग्य अर्थ घेतल्यावाचून गत्यंतर राहात नाही. जो दुसरा अर्थ घेतल्याने वाक्याचा अर्थ नीटपणे लागतो, त्याला त्या शब्दाचा लक्ष्यार्थ म्हणतात. शब्द आपला वाच्यार्थ आपल्या 'अभिधा' या शक्तीने प्रकट करतो. तो वाच्यार्थ सांगितल्यावर अभिधेचे काम संपते. मग तो शब्द आपला लक्ष्यार्थ आपल्या 'लक्षणा' नावाच्या दुसऱ्या व्यापाराने सांगतो. वाच्यार्थाचा बाध झाला, तरच 'लक्ष्यार्थ' घेण्याची जरुरी भासते. मात्र या लक्ष्यार्थाचा आणि वाच्यार्थाचा काही-ना काही संबंध असावाच लागतो. उदा. पातेले आणि पातेल्यातले पाणी यांचा आश्रय–आश्रित हा संबंध आहे.

२. रूढिलक्षणा–

पण वाच्यार्थ आणि लक्ष्यार्थ यांचा केवळ संबंध असूनही भागत नाही. तो शब्द त्या लक्ष्यार्थाने वापरण्याची वहिवाट असावी लागते. उदा. 'पातेल्यातले पाणी' या अर्थाने 'पातेले' हा शब्द वरीलसारख्या उदाहरणात वापरण्याची वहिवाट म्हणजे 'रूढि' आहे.

प्रयोजनवती लक्षणा–

पण काही वेळा तो शब्द त्या लक्ष्यार्थाने वापरण्याची वहिवाटच असते, असे नाही. कवी किंवा वक्ता काही विशेष अर्थ प्रत्ययास यावा म्हणून एखाद्या शब्दाचा लक्षणेने उपयोग करतो. उदा. 'तानाजी म्हणजे सिंह होता' हे वाक्य घ्या. यातल्या 'सिंह' शब्दाचा वाच्यार्थ 'सिंह हा प्राणी' हा आहे. पण तो घेऊन वाक्याचा संभवनीय असा अर्थ लागत नाही. म्हणून 'सिंह' याचा लक्ष्यार्थ (या वाक्यात) 'शूर' असा घ्यावा लागतो पण 'तानाजी शूर होता' असे म्हटल्याने जो परिणाम होत नाही तो 'तानाजी हा सिंह होता' असे म्हटल्याने होतो. म्हणजे 'सिंह' हा शब्द तानाजीला उद्देशून वापरण्यात त्याचे (तानाजीचे) अलौकिक शौर्य ऐकणाऱ्याच्या प्रत्ययास आणावे, हा बोलणाऱ्याचा हेतु असतो. या हेतूलाच प्रयोजन असे म्हणतात. हे प्रयोजन नेहमी सूचित किंवा 'व्यंग्य' असते व त्या प्रयोजनाला शब्द आपल्या 'व्यंजना' नावाच्या व्यापाराने व्यक्त करतो. अशा रीतीने लक्षणेला तीन अटी आवश्यक आहेत— १) वाच्यार्थाचा बाध होणे २) वाच्यार्थाचा लक्ष्यार्थाशी काहीतरी संबंध असणे व ३) एक तर तो शब्द त्या लक्ष्यार्थाने वापरण्याची रूढी असणे किंवा त्या लक्ष्यार्थाने तो शब्द वापरण्यामागे कवीचे किंवा बोलणाराचे काही प्रयोजन (विशेष अभिप्राय) असणे.

३. पाहा, पाणिनि, ३–२–१२३ वरील वार्तिक 'नित्यप्रवृत्ते'.

४. 'गंगेवर गवळीवाडा आहे' या वाक्यात 'गंगेवर' याचा 'गंगाप्रवाहावर' हा मुख्यार्थ सोडून देऊन 'गंगातीरावर' असा लक्ष्यार्थ घ्यावा लागतो (कारण मुख्यार्थ घेऊन वाक्याचा अर्थ लागतच नाही). 'गंगातीरावर' हा लक्ष्यार्थ घ्यावयास गंगातीराचा गंगाप्रवाहाशी असलेला 'सामीप्य' हा प्रसिद्ध संबंध कारणीभूत होतो. तसेच 'हा बटु सिंह आहे' यात सिंह शब्दाचा 'सिंहाप्रमाणे शौर्यादिगुणांनी युक्त' हा लक्ष्यार्थ घ्यायला 'सादृश्य' संबंध कारणीभूत होतो, वगैरे. या सर्व संबंधांची उदाहरणे याच उद्द्योताचे शेवटी, १८ व्या कारिकेवरील 'लोचना'त पाहावीत.

५. पाहा, तत आगतः । ४-३-७४ हे पाणिनीचे सूत्र.

६. ही कारिका 'भर्तृमित्र' या मीमांसकाची आहे असे मानण्यात येते. 'समवाय' याचा अर्थ 'संयोग' असा टीकाकारांनी केला आहे, पण वैशेषिक मताप्रमाणे 'गुण-गुणी' इत्यादिकांमधील 'नित्यसंबंध' असाही अर्थ घेता येईल.

७. उदा. 'सिंह' हा शब्द तेजस्वितादि 'गुणसमुदाया'चा बोधक आहे.

८. वरती, भज् या धातूचा 'सेवणे' असा अर्थ घेतला होता, तर या ठिकाणी भज् म्हणजे 'अलग करणे' हा अर्थ घेतला आहे.

९. अशा रीतीने 'भाक्त' या शब्दाचे चार अर्थ सांगितल्याने अभिनवगुप्तांनी लक्षणेच्या मुख्यार्थाचा बाध, मुख्यार्थ व लक्ष्यार्थ यांमधील (सादृश्य किंवा

सादृश्याहून इतर) संबंध व प्रयोजन या तिन्ही कारणांचा बोध करून दिला आहे.

१०. 'एकाच विभक्तीत वापरण्यामागचा अभिप्राय असा' या शब्दांमुळे ध्वनि आणि गुणवृत्ति यांमध्ये मुळीच भेद नाही या भाक्तवाद्याच्या अभिप्रायाची अपेक्षा निर्माण होते. पण यानंतरचे पुढील वाक्य ध्वनिवाद्याची भूमिका मांडणारे, म्हणजे भाक्तवाद्याच्या म्हणण्याला उत्तर आहे.

११. पाहा, वाल्मीकिरामायण, अरण्यकांड, १६-१३, व उद्द्योत २, कारिका १ वरील वृत्तीमधील 'चंद्राने...' इ. उदाहरण.

१२. पाहा, १४ व्या कारिकेपूर्वी वृत्तीच्या 'तेव्हा ध्वनि आहे' इ. भागावरील २ री टीप, व उद्द्योत २, कारिका १ वरील वृत्ति.

१३. पाहा, १४ व्या कारिकेपूर्वी वृत्तीच्या 'तेव्हा ध्वनि आहे' इ. भागावरील ३ री टीप. विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीचे प्रकार म्हणजे वस्तुध्वनि, अलंकारध्वनि व रसादिध्वनि. 'वगैरेमध्ये' यातील 'वगैरे' म्हणजे 'संगीतातील सूर' इ. पाहा, ध्वन्यालोक, काशी आवृत्ति, पृ. ४१७.

१४. पाहा, काशी आवृत्ति, पृ. ४३२.

१५. पाहा, १ ला उद्द्योत, कारिका १४ वी व १९ वी

१६. अभिधेचा मुख्य व्यापार म्हणजे शब्द ऐकताक्षणीच वाच्यार्थाचा बोध करून देणे. ज्या वेळी तो वाच्यार्थ पुरा पडत नाही, म्हणजे अडचणीत येतो, तेथे लक्ष्यार्थाचा आश्रय करून काम भागवावे लागते. लक्ष्यार्थ हा अभिधेचेच अडलेले कार्य पूर्ण करणारा असतो व त्याचा बोध वाच्यार्थानंतर होतो, म्हणून त्याला अभिधेचाच अमुख्य व्यापार म्हटले आहे. पुढे काशी आवृत्ति, पृष्ठ १५१ वर अभिनवगुप्तांनी लक्षणेचा 'अभिधेचे पुच्छ' म्हणून उल्लेख केला आहे.

१७. 'ध्वनि' शब्दाचे हेच तीन अर्थ पुढे अभिनवगुप्तांनी काशी आवृत्ति, पृ. ९९ व पृ. १०५,१०६ येथे सांगितले आहेत. त्याशिवाय तीच आवृत्ति पृ. १३५ वर ध्वनि म्हणजे व्यंजक वाच्यार्थ, व ध्वनि म्हणजे व्यंग्यार्थप्रधान काव्य हे आणखी दोन अर्थ सांगून एकूण ५ अर्थ सांगितले आहेत.

१८. (उद्भटासारख्या) भक्तिवाद्यांच्या मते शब्दाचे दोनच अर्थ-१) मुख्य २) अमुख्य. (यानंतर काशी आवृत्ति, पृ. ३२ वरील 'भट्टोद्भटो बभाषे' इ. मजकूर पाहा.) मुख्य अर्थाचे बाबतीत 'अभिधा' हा व्यापार असतो हे प्रसिद्धच आहे. उरला 'अमुख्य' अर्थ. तोच अर्थ ध्वनि दाखवणार, म्हणून ध्वनि लक्षणेहून वेगळा असणे शक्य नाही. कारण मुख्य व अमुख्य यांखेरीज तिसरा अर्थ नाहीच.

ध्वन्यालोकः

यद्यपि च ध्वनिशब्दसंकीर्तनेन काव्यलक्षणविधायिभिर्गुणवृत्ति-रन्यो वा न कश्चित्प्रकारः प्रकाशितः, तथापि अमुख्यवृत्त्या काव्येषु व्यवहारं दर्शयता ध्वनिमार्गो मनाक्स्पृष्टोऽपि न लक्षित इति परिकल्प्यैवमुक्तम् – 'भाक्तमाहुस्तमन्ये' इति।

ध्वन्यालोक

आणि जरी पूर्वीच्या काव्यशास्त्रकारांनी 'ध्वनि' हा शब्द उच्चारून गुणवृत्ति (म्हणजे लक्षणा) किंवा दुसरा कोणताही प्रकार पुढे आणला नसला (म्हणजे ध्वनि म्हणजे गुणवृत्ति होय असे जरी त्यांनी कोठेही म्हटले नसले), तरी काव्यामध्ये अमुख्य व्यापाराचा[1] अवलंब केला जातो हे दाखवणाऱ्याने ध्वनिमार्गावर थोडेसे पदार्पण करूनही[2] त्या मार्गाचे विवरण केले नाही अशी आम्ही कल्पना करून (कारिकेत) 'दुसरे त्याला लाक्षणिक म्हणतात' असे म्हटले आहे.

लोचनम्

ननु केनैतदुक्तं ध्वनिर्गुणवृत्तिरित्याशङ्क्याह – यद्यपि चेति। अन्यो वेति। गुणालङ्कारप्रकार इति यावत्। दर्शयतेति भट्टोद्भटवामनादिना। भामहेनोक्तम् – 'शब्दाश्छन्दोऽभिधानार्थाः' इति। अभिधानस्य शब्दात् भेदं व्याख्यातुं भट्टोद्भटो बभाषे – 'शब्दानामभिधाव्यापारो मुख्यो गुणवृत्तिश्च' इति। वामनोऽपि 'सादृश्याल्लक्षणा वक्रोक्तिः' इति। मनाक्स्पृष्ट इति। तैस्तावद् ध्वनिदिगुन्मीलिता, यथालिखितपाठकैस्तु स्वरूपविवेकं कर्तुमशक्नुवद्भिस्ततस्वरूपविवेको न कृतः प्रत्युतोपालभ्यते, अभग्ननारिकेलवद् यथाश्रुततद्ग्रन्थोद्ग्रहणमात्रेणेति। अत एवाह – परिकल्प्यैवमुक्तमिति। यद्येवं न योज्यते तदा ध्वनिमार्गः स्पृष्ट इति पूर्वपक्षाभिधानं विरुध्यते।

लोचन

पण काय हो, 'ध्वनि म्हणजे गुणवृत्ति' असे कोणी म्हटले? अशी शंका मनात आणून वृत्तिकार 'आणि जरी' इ. सांगतात. 'किंवा

दुसरा '... म्हणजे गुण किंवा अलंकार हा प्रकार 'दाखवणाऱ्याने' म्हणजे भट्टोद्भट, वामन इत्यादिकांनी. भामहाने म्हटले आहे[3]–'शब्द,[4] छन्द, अभिधान, अर्थ (इ. काव्यहेतु होत).' 'अभिधान' हे 'शब्दा'हून वेगळे होय हे सांगण्यासाठी भट्टोद्भटाने (आपल्या 'भामहविवरण' या टीकेमध्ये) म्हटले–'शब्दाचे 'अभिधान' म्हणजे अभिधा व्यापार–१) मुख्य (अभिधाव्यापार) आणि २) गुणवृत्ति (म्हणजे दुय्यम अभिधा-व्यापार). वामनानेही सांगितले आहे[5] – 'सादृश्यामुळे (उपयोगिली जाणारी) लक्षणा म्हणजेच वक्रोक्ती नावाचा अलंकार'. 'थोडेसे पदार्पण केले'... म्हणजे त्यांनी प्रथम ध्वनीची दिशा सुस्पष्टपणे जरी नाही, पण खुली केली. पण (रामायणादि काव्यात) लिहिले असेल तसेच वाचत जाणाऱ्या म्हणजे केवळ वाच्यार्थ लक्षात घेणाऱ्या (प्राचीन) शास्त्रकारांना (ध्वनीचे) स्वरूप वेगळे करण्याचे सामर्थ्य नसल्याने त्यांनी त्या ध्वनीचे स्वरूप तर वेगळे करून दाखविले नाहीच, पण उलट त्यांनी त्याच्याकडे दुर्लक्ष केले. कारण एखाद्या माणसाने नारळ न फोडता (वरूनच तो दगडासारखा आहे असे पाहून) फेकून द्यावा, त्याप्रमाणे त्यांनी ते काव्यग्रंथ जसे ऐकण्यात आले तसाच त्यांचा अर्थ लावला (व त्यांतील व्यंग्यार्थाची उपेक्षा केली). म्हणूनच वृत्तिकार म्हणतात – अशी (आम्ही) कल्पना करून कारिकेत (दुसरे त्याला लाक्षणिक म्हणतात) असे म्हटले आहे. जर असा अर्थ लावला नाही (म्हणजे जर न लक्षितः याचा अर्थ 'लक्षण केले नाही' असा न लावता 'त्यांना दिसला नाही' असा लावला), तर 'ध्वनिमार्गावर थोडेसे पदार्पण केले' हे पूर्वपक्ष्याचे म्हणणे 'दिसला नाही' वाक्याशी विसंगत होईल.

टीपा

१. भामहाने आपल्या ग्रंथाच्या सुरुवातीस 'शब्द,' 'छंद,' 'अभिधान' असे काही शब्द वापरले. अभिधान हे शब्दाहून वेगळे होय हे सांगण्यासाठी भट्टोद्भटाने म्हटले:– शब्दाचे 'अभिधान' म्हणजे अभिधा–व्यापार–१) मुख्य आणि २) गुणवृत्ति. उद्भटासारख्या भक्तिवाद्यांच्या मते शब्दाचे दोनच अर्थ –१) मुख्य आणि २) अमुख्य. मुख्य अर्थाचे बाबतीत अभिधा हा व्यापार असतो हे प्रसिद्धच आहे; उरला 'अमुख्य' अर्थ. तोच अर्थ 'ध्वनि' दाखविणार, म्हणून 'ध्वनि' लक्षणेहून वेगळा असणे शक्य नाही;

कारण मुख्य व अमुख्य यांखेरीज तिसरा अर्थ नाहीच.

२. ' गंगातीरावर गवळीवाडा आहे ' असे सरळ न म्हणता आपण ' गंगेवर गवळी-वाडा आहे ' असे का म्हणतो ? तर गंगाप्रवाहामध्ये असणारी कमालीची शीतलता, पवित्रता इ. धर्म त्या गवळीवाड्यात आहेत हे श्रोत्यांच्या मनात ठसवावे, हा बोलणाराचा हेतू असतो. या हेतूला ' प्रयोजन ' म्हणतात. हे प्रयोजन ' गंगेवर गवळीवाडा ' इ. वाक्याने सरळ सांगितले जात नाही ते सुचविले जाते. हा व्यङ्ग्यार्थ होय हे जरी भट्टोद्भटादिकांच्या लक्षात आले नसले, तरीही लक्षणेबद्दल त्यांनी लिहिले. लक्षणेत प्रयोजनवती लक्षणाही येऊन जाते. म्हणून ' त्यांनी ध्वनिमार्गावर थोडेसे पदार्पण केले ' अशी कल्पना केली आहे.

३. पाहा, काव्यालङ्कार, १ ९.

४. ' शब्द ' म्हणजे भाषेतील शब्दसमूह किंवा शब्दविद्या, म्हणजे ' व्याकरण ' असाही अर्थ घेता येईल.

५. लोचनामध्ये येथे व पुढे उद्द्योत १, कारिका १३ वरील (वृत्तीतील विशेषोक्ती या शब्दावरील ) व त्यानंतर उद्द्योत ३, कारिका ५ वरील लोचनात भट्टोद्भटाचा उल्लेख केला आहे. त्यांपैकी येथेच ' लोचना 'त ' शब्दाश्छन्दोऽभिधानार्थाः.. इ. (काव्यालंकार १–९) या कारिकेचे विवरण करिताना भट्टोद्भटाचे मत उद्धृत केले आहे. त्यावरून ते मत ' भामहविवरणा ' तीलच असले पाहिजे यात शंका नाही. उद्द्योत १, कारिका१३ वरील ' लोचना 'त विवरणकृत् असा शब्द योजिलेला आहे ते 'विवरण' म्हणजे 'भामहविवरण'च असावे. उ. ३, कारिका ५ वरील व उ. १, कारिका १३ वरील ' लोचना 'त उद्धृत केलेली भट्टोद्भटाची मतेही भामहविवरणातीलच असावीतसे वाटते.

' गुण व अलंकार यांमध्ये भेद नाही असे मत उद्भटाने 'भामहविवरणा 'त प्रकट केले आहे ' असे हेमचन्द्राने काव्यानुशासनावरील ' विवेक ' टीकेत म्हटले आहे. ( १९६४ ची मुंबई आवृत्ति, पृ. ६८ ). Raniero Gnoli यांनी इ. १९६२ मध्ये रोम येथे प्रसिद्ध केलेल्या Udbhata's commentary on the काव्यालंकार of भामह या ग्रंथामध्ये एका जीर्ण, त्रुटित भूर्जपत्रा-वरील शारदा लिपीतील हस्तलिखिताच्या आधारे उद्भटाच्या भामहविवरण या टीकेचा पुनरुद्धार करण्याचा प्रयत्न केला आहे. या पंडिताच्या मते अभिनवगुप्तांनी येथेच ' लोचना 'त जे उद्भटाचे मत उद्धृत केले आहे, ते या हस्तलिखिताच्या क्रमांक १० या तुकड्यातील एकदोन ओळींशी जुळणारे आहे. डॉ. राघवन् यांना हे Gnoli चे मत मान्य नाही.

६. काव्यालंकारसूत्रवृत्ति, ४–३–८.

ध्वन्यालोकः

केचित्पुनर्लक्षणकरणशालीनबुद्धयो ध्वनेस्तत्त्वं गिरामगोचरं सहृदयहृदयसंवेद्यमेव समाख्यातवन्तः । तेनैवंविधासु विमतिषु स्थितासु सहृदयमनःप्रीतये तत्स्वरूपं ब्रूमः ।

ध्वन्यालोक

आणि ध्वनीचे शास्त्रशुद्ध लक्षण करावयास ज्यांची बुद्धी असमर्थ आहे असे काहीजण ध्वनीचे यथार्थ स्वरूप शब्दांच्या पलीकडचे, ' केवळ सहृदयांनी जाणावे असेच आहे ' असे म्हणाले.

त्यामुळे ( म्हणजे ) असे निरनिराळ्या प्रकारचे मतभेद असल्यामुळे सहृदयांच्या मनाच्या आनंदासाठी त्या ( ध्वनी ) चे स्वरूप आम्ही सांगत आहोत.

लोचनम्

शालीनबुद्धय इति । अप्रगल्भमतय इत्यर्थः । एते च त्रय उत्तरोत्तरं भव्यबुद्धयः । प्राच्या हि विपर्यस्ता एव सर्वथा । मध्यमास्तु तद्रूपं जानाना अपि सन्देहेनापह्नुवते । अन्त्यास्त्वनपह्नुवाना अपि लक्षयितुं न जानत इति क्रमेण विपर्याससन्देहाज्ञानप्राधान्यमेतेषाम् । तेनेति । एकैकोऽप्ययं विप्रतिपत्तिरूपो वाक्यार्थो निरूपणे हेतुत्वं प्रतिपद्यत इत्येकवचनम् । एवंविधासु विमतिष्विति निर्धारणे सप्तमी । आसु मध्ये एकोऽपि यो विमतिप्रकारस्तेनैव हेतुना तत्स्वरूपं ब्रूमः इति, ध्वनिस्वरूपमभिधेयम्, अभिधानाभिधेयलक्षणो ध्वनिशास्त्रयोर्वक्तृश्रोत्रोर्व्युत्पाद्यव्युत्पादकभावः संबन्धः, विमतिनिवृत्त्या तत्स्वरूपज्ञानं प्रयोजनम्, शास्त्रप्रयोजनयोः साध्यसाधनभावस्संबन्ध इत्युक्तम् ।

लोचन

ज्यांची बुद्धि असमर्थ आहे, म्हणजे तितकी प्रगल्भ (विकसित) झालेली नाही, असा अर्थ. आणि हे तिघे उत्तरोत्तर अधिक प्रामाणिक वृत्तीचे लोक होत. कारण पहिले (म्हणजे अभाववादी) तर सर्वस्वी विपर्यस्त म्हणजे जाणून बुजून विपर्यास करणाऱ्या बुद्धीचेच आहेत [१]

पण मधले (भक्तिवादी) त्या ध्वनीचे (म्हणजे व्यंग्य या तिसऱ्या अर्थाचे अस्तित्व जाणत असूनही संशयात पडल्यामुळे ते त्याचे स्वतंत्र अस्तित्व नाकारतात. शेवटचे मात्र त्याचे स्वतंत्र अस्तित्व नाकारीत नसले, तरी त्याचे लक्षण कसे करावे हे त्यांना कळत नाही. अशा रीतीने या मतभेद असणाऱ्यांमध्ये अनुक्रमे विपर्यास, संदेह आणि अज्ञान यांचे प्राधान्य आहे. या विरोधी मतांपैकी एकेकदेखील आम्ही ध्वनिस्वरूप स्पष्ट करणे आवश्यक आहे याला कारणीभूत आहे, म्हणून कारिकेत। तेन ( = त्या एकेक मतामुळे) असे एकवचन वापरले. 'अशा (नाना) प्रकारच्या मतभेदांपैकी ही 'निर्धारण' (म्हणजे अनेकांपैकी एकेक निवडणे) या अर्थी सप्तमी वापरली आहे.[3] या भिन्न भिन्न मतांमध्ये एक एक देखील जो मतभेदाचा प्रकार आहे, त्याच कारणामुळे आम्ही त्याचे स्वरूप सांगत आहोत, हा आशय. ध्वनीचे स्वरूप हा ग्रंथाचा (प्रतिपाद्य) विषय होय. ध्वनिस्वरूप आणि प्रस्तुत ग्रंथ यांमध्ये अभिधेय (म्हणजे विषय) आणि अभिधान (म्हणजे प्रतिपादन करणारा) हा संबंध असून वक्ता (म्हणजे या ग्रंथाचा कर्ता) आणि श्रोता (म्हणजे 'सहृदय' या शब्दाने निर्देशिलेला वाचक) यांमध्ये 'उकलून दाखविणारा आणि ज्याला उकलून दाखवायचे तो' असा संबंध आहे. मतभेदांचे निरसन करून ध्वनिस्वरूपाचे ज्ञान मिळवून देणे हे प्रयोजन (म्हणजे मुख्य फल) आहे. हा ग्रंथ आणि प्रयोजन यांमध्ये साधक आणि साध्य असा संबंध आहे, हा (चवथ्या चरणाचा) आशय.

टीपा

१. कारण ध्वनीचे अस्तित्व मान्य करण्याची त्यांना मुळी इच्छाच नाही.
२. लक्षणेमागचा हेतु (म्हणजे प्रयोजन) त्यांना दिसत असला, तरी ते प्रयोजन लक्ष्यार्थातच अन्तर्भूत आहे की त्याहून वेगळे आहे या संशयामुळे ते त्या प्रयोजनाला लक्षणेतच दडपतात.
३. पहा, पाणिनि, यतश्च निर्धारणम् २–३–४१. वस्तुतः, तेन एवंविधासु विमतिषु स्थितासु ही सति सप्तमीची वाक्यरचना आहे. म्हणजे 'म्हणून अशा प्रकारचे मतभेद असताना म्हणजे असल्यामुळे' असा अर्थ करणे योग्य होईल. परंतु अभिनवगुप्तांनी 'ही निर्धारणार्थी सप्तमी आहे' असे मानून 'नाना प्रकारच्या मतभेदांपैकी' असा अर्थ केला आहे, त्याचे कारण कारिके-

तील ' तेन ' याचा अभिनवगुप्तांनी स्वतः ' त्या एकेक मतामुळे ' असा जो अर्थ केला आहे, त्याच्याशी सुसंगति राखणे हेच असावे असे वाटते.

४. कोणताही ग्रंथ लिहिताना चार अनुबन्ध ( मार्गदर्शक तत्त्वे ) पाळावे लागतात ते असे–१) विषय २) प्रयोजन ३) अधिकारी व ४) संबंध. या ग्रंथाचा विषय ' ध्वनिस्वरूप ', ' त्याचे ज्ञान देणे ' हे प्रयोजन, सहृदय वाचक हा अधिकारी आणि विषय आणि ग्रंथ, ग्रंथकार आणि श्रोता, तसेच ग्रंथ आणि प्रयोजन यांमधील निरनिराळे संबंध, हे सर्व, कारिकेतल्या तेवढ्या अंशास अनुसरून अभिनवगुप्तांनी सांगितले आहेत.

### ध्वन्यालोकः

तस्य हि ध्वनेः स्वरूपं सकलसत्कविकाव्योपनिषद्भूतमतिरमणीयमणीयसीभिरपि चिरन्तनकाव्यलक्षणविधायिनां बुद्धिभिरनुन्मीलितपूर्वम्, अथ च रामायणमहाभारतप्रभृतिनि लक्ष्ये सर्वत्र प्रसिद्धव्यवहारं लक्षयतां सहृदयानामानन्दो मनसि लभतां प्रतिष्ठामिति प्रकाश्यते ।

### ध्वन्यालोक

खरोखर त्या ध्वनीचे स्वरूप सर्व सत्कवींच्या काव्यांचे सार असलेले आणि अत्यंत रमणीय असे आहे. प्राचीन काव्यलक्षणकारांच्या अतिशय सूक्ष्म बुद्धीही ते ( स्वरूप ) यापूर्वी उमलवू ( स्पष्ट करू ) शकल्या नाहीत. आणि रामायण, महाभारत इ. काव्यग्रंथांमध्ये तर त्या ( ध्वनिस्वरूपा ) चा वापर स्पष्टपणे दिसून येतो.[१] त्याचे लक्षण करू इच्छिणाऱ्या[२] सहृदयांच्या अंतःकरणात आनंदाला स्थिरपद प्राप्त व्हावे, ( त्यांच्या अंतःकरणाला स्थिर स्वरूपाचा आनंद मिळावा ), म्हणून त्या ( ध्वनी ) चे स्वरूप आम्ही प्रकाशित करीत आहोत.

### लोचनम्

अथ श्रोतृगतप्रयोजनप्रतिपादकं ' सहृदयमनःप्रीतये ' इति भागं व्याख्यातुमाह – तस्य हीति । विमतिपदपतितस्येत्यर्थः । ध्वनेः स्वरूपं लक्षयतां सम्बन्धिनि मनसि आनन्दो निर्वृत्यात्मा चमत्कारापरपर्यायः, प्रतिष्ठां परैर्विपर्यासाद्युपहतैरनुन्मूल्यमानत्वेन स्थेमानं, लभतामिति

प्रयोजनं संपादयितुं तत्स्वरूपं प्रकाश्यत इति सङ्गतिः । प्रयोजनं च नाम तत्सम्पादकवस्तुप्रयोक्तृताप्राणतयैव तथा भवतीत्याशयेन 'प्रीतये तत्स्वरूपं ब्रूमः' इत्येकवाक्यतया व्याख्येयम् । तत्स्वरूपशब्दं व्याचक्षाणः संक्षेपेण तावत्पूर्वोदीरितविकल्पपञ्चकोद्धरणं सूचयति-सकलेत्यादिना । सकलशब्देन सत्कविशब्देन च प्रकारलेशे कस्मिंश्चिदिति निराकरोति । अतिरमणीयमिति भाक्ताद्व्यतिरेकमाह । न हि 'सिंहो बटुः', 'गङ्गायां घोषः' इति रम्यता काचित् । उपनिषद्भूतशब्देन तु अपूर्वसमाख्यामात्रकरण इत्यादि निराकृतम् । अणीयसीभिरित्यादिना गुणालङ्कारानन्तर्भूतत्वं सूचयति । अथ चेत्यादिना 'तत्समयान्तःपातिनः' इत्यादिना यत्सामयिकत्वं शङ्कितं तन्निरवकाशीकरोति । रामायणमहाभारतशब्देनादिकवेः प्रभृति सर्वैरेव सूरिभिरस्यादरः कृत इति दर्शयति । लक्षयतामित्यनेन वाचां स्थितमविषय इति परास्यति । लक्ष्यतेऽनेनेति लक्षो लक्षणम् । लक्षेण निरूपयन्ति लक्षयन्ति, तेषां लक्षणद्वारेण निरूपयतामित्यर्थः । सहृदयानामिति । येषां काव्यानुशीलनाभ्यासवशाद्विशदीभूते मनोमुकुरे वर्णनीयतन्मयीभवनयोग्यता ते स्वहृदयसंवादभाजः सहृदयाः । यथोक्तम्–

योऽर्थो हृदयसंवादी तस्य भावो रसोद्भवः ।
शरीरं व्याप्यते तेन शुष्कं काष्ठमिवाग्निना ॥ इति ॥

आनन्द इति । रसचर्वणात्मनः प्राधान्यं दर्शयन् रसध्वनेरेव सर्वत्र मुख्यभूतमात्मत्वमिति दर्शयति । तेन यदुक्तम्–

ध्वनिर्नामापरो योऽपि व्यापारो व्यञ्जनात्मकः ।
तस्य सिद्धेऽपि भेदे स्यात्काव्येंऽशत्वं न रूपता ॥

इति, तदपहस्तितं भवति । तथा ह्यभिधाभावनारसचर्वणात्मकेऽपि त्र्यंशे काव्ये रसचर्वणा तावज्जीवितभूतेति भवतोऽप्यविवादोऽस्ति । तथोक्तं त्वयैव–

काव्ये रसयिता सर्वो न बोद्धा न नियोगभाक् । इति ।

तद्वस्त्वलङ्कारध्वन्यभिप्रायेणांशमात्रत्वमिति सिद्धसाधनम् । रसध्वन्यभिप्रायेण तु स्वाभ्युपगमप्रसिद्धिसंवेदनविरुद्धमिति । तत्र कवेस्तावत्कीर्त्यापि प्रीतिरेव सम्पाद्या । यदाह– 'कीर्तिं स्वर्गफलामाहुः'

इत्यादि। श्रोतॄणां च व्युत्पत्तिप्रीती यद्यपि स्तः, यथोक्तम् –

धर्मार्थकाममोक्षेषु वैचक्षण्यं कलासु च।
करोति कीर्ति प्रीतिं च साधुकाव्यनिषेवणम्।। इति।

तथापि तत्र प्रीतिरेव प्रधानम्। अन्यथा प्रभुसंमितेभ्यो मित्रसंमितेभ्यश्चेतिहासादिभ्यो व्युत्पत्तिहेतुभ्यः कोऽस्य काव्यरूपस्य व्युत्पत्तिहेतोर्जायासंमितत्वलक्षणो विशेष इति प्राधान्येनानन्द एवोक्तः। चतुर्वर्गव्युत्पत्तेरपि चानन्द एव पार्यन्तिकं मुख्यं फलम्।

आनन्द इति च ग्रन्थकृतो नाम। तेन स आनन्दवर्धनाचार्य एतच्छास्त्रद्वारेण सहृदयहृदयेषु प्रतिष्ठां देवतायतनादिवदनश्वरीं स्थितिं गच्छत्विति भावः। यथोक्तम्–

उपेयुषामपि दिवं सन्निबन्धविधायिनाम्।
आस्त एव निरातङ्कं कान्तं काव्यमयं वपुः।। इति।।

यद्वा मनसि प्रतिष्ठा एवंविधमस्य मनः, सहृदयचक्रवर्ती खल्वयं ग्रन्थकृदिति यावत्। यथा – 'युद्धे प्रतिष्ठा परमार्जुनस्य' इति। स्वनामप्रकटीकरणं श्रोतॄणां प्रवृत्त्यङ्गमेव संभावनाप्रत्ययोत्पादनमुखेनेति ग्रन्थान्ते वक्ष्यामः। एवं ग्रन्थकृतः कवेः श्रोतुश्च मुख्यं प्रयोजनमुक्तम्।। १।।

लोचन

आता श्रोत्याच्या ठिकाणचा, 'प्रयोजनाचे प्रयोजन[३]' सांगणारा 'सहृदयांच्या मनाच्या आनंदासाठी' हा भाग विशद करण्यासाठी (वृत्तिकार) 'खरोखर त्या ध्वनीचे स्वरूप' इ. कथन करितात. 'त्याचे' म्हणजे मतभेदाचा विषय झालेल्या त्या (ध्वनी) चे, असा अर्थ. ध्वनीच्या स्वरूपाचे लक्षण करणाऱ्यांच्या मनात 'परमोच्च संतोष हे ज्याचे स्वरूप आहे व 'चमत्कार' (म्हणजे विस्मयाला कारणीभूत होणारा) हे ज्याला दुसरे नाव आहे अशा आनंदाला 'प्रतिष्ठा' म्हणजे विपर्यास[४] वगैरेंनी पछाडलेले दुसरे कोणी[५] विचलित करणार नाहीत अशी 'स्थिरता' प्राप्त व्हावी, हे (गौण) प्रयोजन साधण्यासाठी त्या

(ध्वनीचे) स्वरूप आम्ही प्रकाशित करीत आहोत, अशी एकंदर वाक्याची संगति (म्हणजे परस्परसंबंध) आहे.

आणि प्रयोजन हे (खऱ्या अर्थाने[६]) प्रयोजन कशामुळे ठरते ? तर त्या (प्रयोजना)चे साधन असलेल्या वस्तूचा वापर करण्यास (ध्वनीला) प्रवृत्त (म्हणजे प्रेरित) करणे हा त्याचा प्राण (म्हणजे त्याचे जीवितकार्य) असतो, या कारणामुळेच. याच आशयाने 'आनंदासाठी आम्ही त्याचे स्वरूप सांगत आहोत.' अशी (स्वरूपज्ञान व आनंद यांची) एकवाक्यता[७] साधूनच विवरण करावयास हवे.

'त्याचे स्वरूप' याचे विवरण करिताना आधी, पूर्वी सांगितलेल्या पाच विकल्पांचे[८] संक्षेपाने खंडन (वृत्तिकार) सर्व 'सत्कवींच्या)....इ. शब्दांनी सुचवितात. 'कोठला तरी बारीकसा प्रकार' याचे निराकरण ते 'सर्व' आणि 'सत्कवींच्या' या शब्दांनी करितात. 'अतिशय रमणीय' या द्वारे ते (ध्वनीच्या स्वरूपाचा) भाक्ताहून वेगळेपणा सांगतात. कारण 'तो छोकरा सिंह आहे,' 'गंगेवर गवळीवाडा आहे', यासारख्या ठिकाणी कसलीही रमणीयता नाही.[९]

(सर्व सत्कवींच्या) 'काव्याचे सार असलेले' या शब्दांनी 'एखादाला तुम्ही केवळ नवीन नाव दिले असेल' इ. आक्षेपाचे निराकरण केले. 'अतिशय' सूक्ष्म बुद्धीही–' इ. वाक्याने ध्वनि हा गुणालंकारांमध्ये अन्तर्भूत होत नाही, हे सुचवतात. 'त्या (ध्वनि) संप्रदायात पडणारे' असे म्हणून ध्वनिवादी हे सांप्रदायिक आहेत अशी जी शंका घेतली, तिला मुळीच थारा नाही, हे 'आणि त्याशिवाय (रामायण)'...इ. 'शब्दांनी दाखवितात. ' रामायण, महाभारत, 'या शब्दांनी आदिकवी (वाल्मीकी) पासून सर्वच कवींनी या ध्वनितत्त्वाचा आदर केला (म्हणजे आपल्या काव्यांतून व्यंग्यार्थाचे दर्शन घडवले) असे वृत्तिकार सुचवितात. 'लक्षण करू इच्छिणाऱ्या ( म्हणजे त्याचे स्वरूप समजून घेऊ इच्छिणाऱ्या )' या शब्दांनी '(ध्वनीचे यथार्थ स्वरूप) शब्दांच्या आटोक्याबाहेरचे आहे' या, अनिर्वचनीयतावाद्याच्या मताचे पार निरसन करितात. ज्याच्या योगे स्वरूपज्ञान होते तो 'लक्ष' म्हणजे 'लक्षण' (म्हणजे स्वरूपज्ञानाचे साधन), 'लक्षाने' ( म्हणजे त्या

स्वरूपज्ञानाच्या साधनाने म्हणजे विचारविनिमयाच्या योगाने ) निरूपण (समीक्षण) करितात, म्हणजेच 'लक्षितात'. त्या (लक्षि-णाऱ्या म्हणजे 'स्वरूपज्ञानाच्या साधनाच्या द्वारे समीक्षण करणाऱ्या' असा अर्थ. 'सहृदयांच्या' (याचे विवरण)– काव्याचे पुनः पुनः वाचन करणे व त्यातील अर्थावर लक्ष केंद्रित करणे, या गोष्टींच्या सरावामुळे स्वच्छ झालेल्या ज्यांच्या अन्तःकरणरूपी आरशामध्ये वर्ण्य विषयाशी तन्मय होण्याचे सामर्थ्य आलेले असते, ते स्वहृदयाचा (वर्ण्य विषयाशी अथवा कवीच्या हृदयाशी ) संवाद (म्हणजे तद्रूपता )[१०] अनुभवणारे 'सहृदय,[११]' होत. कारण म्हटले आहे–[१२]

सहृदयाच्या हृदयाशी संवाद पावणारा (म्हणजे पूर्णपणे जुळणारा) जो विभावादिरूप[१३] अर्थ, त्याचे पुनः पुनः अनुसंधान[१४] रसाच्या आविष्काराला कारणीभूत होते. अग्नि ज्याप्रमाणे शुष्क काष्ठाला, त्या-प्रमाणे तो रसाविष्कार शरीराला व्यापून टाकतो.

'आनंद' (याचे विवरण)– रसचर्वणारूप[१५] आनंद हा वस्तु व अलंकार यांहून प्रधान असतो हे दाखवून, वस्तु, अलंकार व रस यांमध्ये रसध्वनि हाच सर्वत्र मुख्य असणारा 'आत्मा' होय, असे वृत्तिकार दर्शवितात. त्यामुळे, पुढीलप्रमाणे जे म्हटले आहे–[१६]

'ध्वनि नावाचा व्यंजनास्वरूपी असा जो दुसरा व्यापार (ध्वनिवाद्यांनी) सांगितला आहे, तो अभिधा व भावना[१७] यांहून वेगळा असल्याचे (ध्वनिवाद्यांनी) सिद्ध केले, तरीही तो व्यापार काव्यामधील एक अंशच (म्हणजे बारीकसा एक घटकच) होईल. तो काव्याचे सर्वस्व असणार नाही.' त्याचे निराकरण होते. कारण, अभिधा, भावना व रसचर्वणा या तीन अंशांनी घडलेल्या काव्यातही 'रसचर्वणा' ही जीवितभूत आहे, याबद्दल तुमचेही दुमत नाही. कारण, तुम्हीच म्हटले आहे की 'प्रत्येक जण काव्य वाचतो, तो रसग्रहणा-साठीच वाचतो. ज्ञानप्राप्तीसाठी नव्हे किंवा कर्तव्यासंबंधी आदेश मिळविण्यासाठीही नव्हे.'

तेव्हा केवळ वस्तुध्वनि व अलंकारध्वनि यांच्यापुरता विचार केल्यास ध्वनि हा काव्याचा केवळ अंश आहे असे म्हणणे सिद्ध (म्हणजे

ध्वनिवाद्याला मान्य) असलेल्या गोष्टींचाच अनुवाद केल्यासारखे होईल. पण रसध्वनीच्या दृष्टीने पाहिल्यास मात्र ते तुमचाच (म्हणजे ध्वनिवाद्यांचा हे काव्यातील प्राणतत्त्व आहे हा) सिद्धान्त, सर्व सत्काव्यांमधील प्राणभूत तत्त्व म्हणून (त्या रसध्वनीची) असलेली प्रसिद्धि व सहृदयांचा अनुभव यांच्या विरुद्ध आहे.

आता कवीच्या बाबतीत बोलावयाचे झाले, तर त्याला काव्य करण्यामुळे प्राप्त होणाऱ्या कीर्तीच्या योगे आनन्दच प्राप्त करून घ्यावयाचा असतो. कारण म्हटले आहे की,

'कीर्तीचे फल स्वर्ग (म्हणजे स्वर्गसुख) असे म्हणतात'[१८] ... ... वगैरे.

आणि श्रोत्यांना जरी बहुश्रुतपणा आणि आनंद ही दोन्ही मिळत असली, कारण, म्हटले आहे की[१९]–

'सत्काव्याचे परिशीलन हे धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांबद्दलचे, तसेच कलांबद्दलचे, डोळस ज्ञान आणि कीर्ती व प्रीति (आनन्द) यांना कारणीभूत होते.'

तरीदेखील त्या (दोहों)मध्ये प्रीति (म्हणजे आनंद) हीच मुख्य होय. नाही तर प्रभूसारखे (म्हणजे मालकासारखे) असणारे वेदादि आणि मित्रासारखे असणारे इतिहासादि, या ज्ञानप्राप्तीच्या साधनांहून, पत्नीसारख्या असणाऱ्या 'काव्य' या ज्ञानप्राप्तीच्या साधनामध्ये वैशिष्टय ते कोणते? कारिका व वृत्ति यांमध्ये) प्राधान्येकरून 'आनन्द' हेच (काव्याचे व त्यामुळे अर्थात काव्यशास्त्राचेही)[२१] प्रयोजन म्हणून सांगितले आहे. धर्मादि पुरुषार्थामधील निपुणतेचेही[२२] अन्तिम, मुख्य फल आनन्द हेच होय.

आणि 'आनन्द' हे ग्रन्थकाराचे नाव.[२३] त्यामुळे त्या आनन्दवर्धनाचार्याला या (ध्वनि) शास्त्राच्या (प्रतिपादनाच्या) द्वारे, देवाला ज्याप्रमाणे देवमन्दिरात, त्याप्रमाणे सहृदयांच्या अन्तःकरणात प्रतिष्ठा म्हणजे शाश्वत स्थान प्राप्त होवो, असाही भावार्थ (व्यंजनेने प्रकट होत आहे). कारण म्हटले आहे की[२४]–

'सत्काव्य रचणारे कवि स्वर्गाला गेले, तरी त्यांचे काव्यमय, रमणीय शरीर काहीही अपाय न होता (भूलोकावर टिकून) राहतेच.'

सहृदयांच्या मनात (याला) जेणेकरून प्रतिष्ठा प्राप्त होईल असेच याचे मत (म्हणजे याने या ग्रंथात प्रकट केलेले विचार) आहे. म्हणजे हा ग्रंथकार खरोखर सहृदयांमध्ये चक्रवर्तीच (म्हणजे अग्र-गण्यच) होय. जसे– 'युद्धात (म्हणजे युद्ध या विषयाचे बाबतीत) अर्जुनाची प्रतिष्ठा कमालीची आहे.' (या उदाहरणात प्रतिष्ठा हा शब्द 'शाश्वत स्थान' या अर्थी वापरला आहे). अशा तऱ्हेने (व्यंजनेने का होईना, पण) आपल्या नावाचा उल्लेख करणे हे श्रोत्यांच्या मनात आदराची भावना व विश्वास उत्पन्न करून त्याद्वारे त्यांना (हा ग्रंथ वाचण्यास) प्रवृत्त करण्याचे अंगच (म्हणजे त्या कामी उपयोगी पडणारेच) आहे, हे आम्ही या ग्रंथाच्या शेवटी सांगणार आहोत.[२५] याप्रमाणे ग्रंथकाराचे (हा ग्रंथ लिहिण्यामागचे), कवीचे (काव्य रचण्या-मागचे) आणि श्रोत्याचे (हा ग्रंथ आणि काव्य वाचण्यामागचे) मुख्य प्रयोजन (आनंद हे) सांगितले.

टीपा

१. अभिनवगुप्त व इतर सर्व टीकाकारांनी 'सर्वत्र प्रसिद्धव्यवहारम्' हे वृत्तीतले शब्द (प्रसिद्धः व्यवहारः यस्य तत् असा समास सोडवून) **ध्वनेः स्वरूपम्** याचे विशेषण म्हणून घेतले आहेत. वरील 'त्या (ध्वनिस्वरूपा)चा वापर स्पष्टपणे दिसून येतो' हा अनुवादही आम्ही त्यांना अनुसरून केला आहे. पण वृत्तीत '**अथ च**' इ. वाक्य वेगळे आहे, हे लक्षात घेतल्यास त्या वाक्याचा अर्थ पुढीलप्रमाणेही लावता येईल असे आम्हाला वाटते– 'आणि रामायण, महाभारत इ. ग्रंथांमध्ये सगळीकडे (आतापर्यंत) प्रसिद्ध (म्हणजे आतापर्यंतच्या काव्यशास्त्रकारांनी सांगितलेल्या) गोष्टींचाच उपयोग पाहाणाऱ्या सहृदयांच्या अंतःकरणास विशेष (नवा, स्थिर स्वरूपाचा) आनंद मिळावा, यासाठी....' वगैरे.

२. मूळातल्या '**लक्षयताम्**' याचा अर्थ आमच्या मते '**पश्यताम्**' असा घेणे अधिक योग्य, व तसा घेऊन आम्ही वरील १ ल्या टीपेत वाक्याचा अनुवाद केला आहे. पण अभिनवगुप्त म्हणतात त्याप्रमाणे **लक्षयताम्** म्हणजे लक्षण करू इच्छिणाऱ्या' असा घेतल्यास **लक्षयताम्** हा शब्द '**लिलक्षयिषताम्**' या अर्थाने वापरला आहे, असे समजावे लागेल.

३. पृ. १४, टीप ३ री पहा.

४. पृ. ५१, टीप १ ली पहा.

५. म्हणजे पूर्वी पृ. ५० व ५१ वर 'लोचना'त सांगितलेले ध्वनीचे विरोधक.

६. 'प्रयोजन' हा शब्द प्रयोजय- प्रवृत्त करणे किंवा प्रेरणा देणे या धातूपासून आला आहे. जे स्वत:ची (प्रयोजनाची) प्राप्ति एखाद्या मनुष्याला व्हावी यासाठी त्याला योग्य ती साधने वापरण्यास प्रवृत्त करते, ते 'प्रयोजन' होय. हेच प्रयोजनाचे 'सार' म्हणजे 'जीवितकार्य' असते, व त्यामुळेच प्रयोजन हे खरेखुरे 'प्रयोजन' होते.

७. म्हणजे आनन्द व स्वरूपज्ञान या दोन स्वतंत्र गोष्टी नसून त्यांच्यामध्ये प्रयोजन व त्या प्रयोजनाच्या प्राप्तीसाठी करावयाची क्रिया असा जिव्हाळ्याचा संबंध असल्यामुळे दोहोंमिळून विशिष्ट असा एकच अर्थ प्रतिपादिला जातो, ही दोहोंची ( म्हणजे आनंद आणि ध्वनिस्वरूपज्ञान यांची ) एकवाक्यता होय.

८. पृ. १९, 'लोचना'तील शेवटच्या काही ओळी पाहा.

९. या उदाहरणांमध्ये 'प्रयोजन' या व्यंग्यार्थाची प्रतीति होत असली, तरी तो व्यंग्यार्थ 'अतिरमणीय' या सदरात येणारा नाही. आमचा ध्वनि हा 'अतिरमणीय' असल्यामुळे तो या लक्षणायुक्त वाक्यातील व्यंग्यार्थाहून कितीतरी श्रेष्ठ आहे.

१०. इतर कशाचीही जाणीव न ठेवता ( 'विगलितवेद्यान्तर' ) केवळ रसास्वादामुळे उत्पन्न होणारा आनंद अनुभवणे हे काव्याचे प्रधान फल होय असे मम्मट काव्यप्रकाशात सांगतो. सहृदयाचे मन इतर सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष करून रसावरच केन्द्रित होण्यास सरावलेले असते.

११. 'सहृदय' याचा 'समानहृदय' असा अर्थ होऊ शकतो पाहा, पाणिनिसूत्र –६।३।८१ व त्यावरील 'काशिका' वृत्ति. हा अर्थ 'हृदयासह' किंवा 'हृदय असलेला' या अर्थापेक्षा या ठिकाणी अत्यंत उचित असा व अभिनवगुप्तांनी सांगितलेल्या 'सहृदयाच्या' लक्षणाशी पूर्णपणे जुळणारा आहे. तुलनार्थ पाहा, समाना हृदयानि व:। ऋग्वेद, १०–१९१

१२. नाट्यशास्त्र, अध्याय ७, श्लोक १०

१३. पृ. ८ वरील २ री टीप पाहा.

१४. भाव: = भावना = अनुसंधान = एकसारखे स्मरण.

१५. रसचर्वणा म्हणजे आस्वादन.

१६. 'हृदयदर्पण'कार भट्टनायकाने.

१७. काव्यातल्या शब्दांच्या ठिकाणी भट्टनायकांनी 'भावना' नावाचा एक खास व्यापार मानला आहे. त्या व्यापारामुळे विभावादिकांचे 'साधारणीकरण'

होते. साधारणीकरण म्हणजे रसिकाच्या दृष्टीने काव्यनाटकातल्या 'शकुन्तला' इ. पात्रांमधील विशिष्टत्व बाजूला होऊन 'कान्तात्व' वगैरे सर्वसाधारण धर्म तेवढे शिल्लक राहतात. ही 'शकुन्तला' आहे अशी जाणीव रसिकाला रसस्वादाचे वेळी राहिल्यास त्याच्या दृष्टीने ती वैशिष्ट्याची जाणीव रसास्वादाच्या आड येते. ती बाजूला करून 'साधारणीकरण' करण्याचे काम 'भावना' करिते अशा रीतीने 'भावना' हा साधारणीकरण घडवून आणणारा रसास्वादानुकूल व्यापार होय

१८. तुलनेसाठी पाहा, भामह, काव्यालंकार १-७

**रुणद्धि रोदसी चास्य यावत्कीर्तिरनश्वरी ।**
**तावत्किलायमध्यास्ते सुकृती वैबुधं पदम् ॥**

जोपर्यंत कवीची शाश्वत अशी कीर्ती स्वर्ग आणि पृथ्वी यांना व्यापून राहते तोपर्यंत तो पुण्यवान् कवि स्वर्गात वास्तव्य करून राहतो असे सांगतात.

१९. भामह, काव्यालंकार, १-२.

२०. 'धन्यासारखे वेदादि' --इ.- अगदी याच कल्पना घेऊन मम्मटाने 'काव्य-प्रकाश'च्या पहिल्या उल्लासात जगाच्या तशा सांगितल्या आहेत. त्यानेही काव्याच्या सर्व प्रयोजनात आनन्द हेच श्रेष्ठ (**मौलिभूतम्**) प्रयोजन म्हणून सांगितले आहे. हाच विचार अभिनवगुप्तांपूर्वी भट्टनायकांनी थोड्या निराळ्या शब्दांत प्रकट केला होता असे दिसते. पाहा, काशी आवृत्ती, लोचन पृ. ८७, अभिनवगुप्तांनी हाच विचार पुढे काशी आवृत्ति, पृ. ३३६ वर अधिक विस्ताराने मांडला आहे.

२१. काव्याची प्रयोजने हवी ती असतील, पण हा ग्रंथ 'काव्य' नसून 'काव्यशास्त्र' या स्वरूपाचा आहे ! तेव्हा या ग्रंथाचे प्रयोजन कोणते अशी शंका कोणी घेतल्यास त्याचे उत्तर विश्वनाथाने 'साहित्यदर्पणा'त असे दिले आहे–हा ग्रंथ काव्याचे अंग असल्याने काव्याची जी फले तीच याची फले होत. पाहा, साहित्यदर्पण, प्रथम परिच्छेद, पहिल्याच कारिकेनंतरची वृत्तीतली पहिली ओळ.

२२. भामहाने 'चार पुरुषार्थांमधील प्रावीण्य' हे जे एक प्रयोजन म्हणून सांगितले, त्या चार पुरुषार्थांची साधना करण्यातही ऐहिक व पारमार्थिक सुखाची प्राप्ति हेच अंतिम प्रयोजन असते, म्हणूनच कारिकाकाराने मनःप्रीतये असे व वृत्तिकाराने **आनन्दो मनसि लभतां प्रतिष्ठाम्**' हे सार काढले आहे.

२३. आनंद = १) आनंद आणि २) आनंदवर्धन. असे दोन अर्थ या ठिकाणी अभि-नवगुप्तांनी केले. 'सहृदयांच्या अन्तःकरणात' यातील सहृदय शब्दाच्या दोन.

अर्थाबद्दल त्यांनी अवाक्षरही काढले नाही. तरीदेखील सहृदय = १) रसिक आणि २) आनंदवर्धनाच्या गुरूंचे–कारिकाकाराचे–नाव असा तर्क प्रा. सोवनी यांनी केला आहे व. म. म. काणे यांनाही तो तर्क बराचसा ग्राह्य वाटतो. जे अभिनवगुप्त 'आनंद' हे ग्रंथकाराचे नाव असे स्पष्ट सांगतात, त्यांनी 'सहृदय' हेही विशेषनाम असल्याचे अप्रत्यक्षपणे तरी सुचवू नये ? या व इतर अनेक कारणांस्तव सहृदय हे कारिकाकाराचे नाव असावे हा तर्क मुळीच पटत नाही.

२४. भामह, काव्यालंकार, १–६.

२५. पाहा, ध्वन्यालोक, काशी आवृत्ति, लोचन– पृ–५५२–५३.



ध्वन्यालोकः

तत्र ध्वनेरेव लक्षयितुमारब्धस्य भूमिकां रचयितुमिदमुच्यते–

ध्वन्यालोक

असे असताना, ज्या ( ध्वनी ) चे लक्षण करावयास प्रारंभ करावयाचा, त्या ध्वनीचीच भूमिका तयार करण्यासाठी पुढीलप्रमाणे सांगण्यात येत आहे.

ध्वन्यालोकः

योऽर्थः सहृदयश्लाघ्यः काव्यात्मेति व्यवस्थितः ।
वाच्यप्रतीयमानाख्यौ तस्य भेदावुभौ स्मृतौ ॥ २ ॥

ध्वन्यालोक

सहृदयांना वाखाणण्याजोगा असा जो अर्थ काव्याचा आत्मा म्हणून निश्चित झाला आहे[१], त्याचे 'वाच्य' आणि 'प्रतीयमान' नावाचे दोन भाग मानले गेले आहेत. ॥ २ ॥

लोचनम्

**ननु 'ध्वनिस्वरूपं ब्रूमः' इति प्रतिज्ञाय वाच्यप्रतीयमानाख्यौ द्वौ भेदावर्थस्येति वाच्याभिधाने का सङ्गतिः कारिकाया इत्याशङ्क्य सङ्गतिं कर्तुमवतरणिकां करोति – तत्रेति । एवंविधेऽभिधेये प्रयोजने**

न्न स्थित इत्यर्थः। भूमिरिव भूमिका। यथा अपूर्वनिर्माणे चिकीर्षिते पूर्वं भूमिर्विरच्यते, तथा ध्वनिस्वरूपे प्रतीयमानाख्ये निरूपयितव्ये निर्विवादसिद्धवाच्याभिधानं भूमिः।तत्पृष्ठेऽधिकप्रतीयमानांशोल्लिङ्गनात्। वाच्येन समशीर्षिकया गणनं तस्याप्यनपह्नवनीयत्वं प्रतिपादयितुम्। स्मृतावित्यनेन 'यः समाम्नातपूर्व' इति द्रढयति। 'शब्दार्थशरीरं काव्यमि'ति यदुक्तं, तत्र शरीरग्रहणादेव केनचिदात्मना तदनुप्राणकेन भाव्यमेव। तत्र शब्दस्तावच्छरीरभाग एव सन्निविशते सर्वजनसंवेद्य-धर्मत्वात्स्थूलकृशादिवत्। अर्थः पुनः सकलजनसंवेद्यो न भवति। न ह्यर्थमात्रेण काव्यव्यपदेशः, लौकिकवैदिकवाक्येषु तदभावात्। तदाह – सहृदयश्लाघ्य इति। स एक एवार्थो द्विशाखतया विवेकिभिर्विभागबुद्ध्या विभज्यते।

तथाहि– तुल्येऽर्थरूपत्वे किमिति कस्मैचिदेव सहृदयाः श्लाघन्ते। तद्भवितव्यं तत्र केनचिद्विशेषेण। यो विशेषः, स प्रतीयमानभागो विवेकिभिर्विशेषहेतुत्वादात्मेति व्यवस्थाप्यते। वाच्यसंवलनाविमोहित-हृदयैस्तु तत्पृथग्भावे विप्रतिपद्यते, चार्वाकैरिवात्मपृथग्भावे। अत एव अर्थ इत्येकतयोपक्रम्य सहृदयश्लाघ्य इति विशेषणद्वारा हेतुमभिधायापोद्धारदृशा तस्य द्वौ भेदावंशावित्युक्तम्,। न तु द्वावप्यात्मानौ काव्यस्येति।

लोचन

पण काय हो, 'ध्वनीचे स्वरूप सांगत आहोत,' अशी (पहिल्या कारिकेत) प्रतिज्ञा करून 'अर्थाचे वाच्य व प्रतीयमान असे दोन भाग आहेत' असे मानून वाच्य अर्थाचा उल्लेख (दुसऱ्या कारिकेत) करण्यात (दुसऱ्या) कारिकेचा (पहिलीशी) संबंध तो कोणता? अशा शंकेची शक्यता लक्षात घेऊन संबंध जुळवून दाखविण्यासाठी वृत्तिकार दुसऱ्या कारिकेपूर्वी 'असे... असताना'...इ. प्रस्तावना करीत आहेत. 'असे असताना' याचा अर्थ 'या ग्रंथाचा विषय आणि प्रयोजन ही (म्हणजे वर सांगितल्याप्रमाणे) असताना' असा आहे.

जी भूमीसारखी, ती 'भूमिका' (म्हणजे पाया). ज्याप्रमाणे (राजवाडा वगैरेसारखी) नवीन उभारणी करण्याची इच्छा असताना

प्रथम पाया रचला जातो, त्याप्रमाणे 'प्रतीयमान' हे नाव असलेल्या ध्वनीच्या स्वरूपाचे लक्षण करावयाचे (योजिले) असताना जो निर्विवादपणे सिद्ध आहे, त्या 'वाच्यार्था' चा उल्लेख करणे, हा पाया होय. कारण त्या (वाच्यार्था) च्या प्रतीतीनंतरच त्या वाच्यार्थाहून निराळ्या असलेल्या 'प्रतीयमान' अंशाचा प्रत्यय येतो. (म्हणून वाच्यार्थाचा उल्लेख प्रतीयमानाच्या पूर्वी करणे उचित आहे). (कारिकेत) 'प्रतीयमाना' चा निर्देश 'वाच्या' च्या बरोबरीने करण्याचे कारण (वाच्यासारखाच) तो 'प्रतीयमान' अंशही नाकारता येण्यासारखा नाही हे दाखवणे हे होय.

'मानले गेले आहेत' असे म्हणून (कारिकाकार) '(जाणकार) ज्याबद्दल पूर्वीपासून अगत्यपूर्वक सांगत आले' या (पहिल्या कारिके-तालच) म्हणण्यास बळकटी आणीत आहेत. (पूर्वी वृत्तीत पृ. २१ वर) 'काव्याचे (शरीर म्हणजे) घटक शब्द आणि अर्थ हे होत, हे तर सर्वमान्य आहे' असे ज्या अर्थी म्हटले, त्या अर्थी 'शरीर' म्हटल्या-मुळेच त्याला सजीवपणा आणणारा 'आत्मा' म्हणून कोणीतरी असायलाच हवा ! त्यांपैकी 'शब्द' तर शरीर या भागातच अंतर्भूत होतो, कारण तो (शरीरातील) स्थूलत्व, कृशत्व इत्यादींप्रमाणे सर्व लोकांच्या प्रत्ययाला येणारा असा असतो. पण (प्रतीयमान अंशासहित असलेल्या) काव्यार्थाचे आकलन मात्र सर्व लोकांना होण्याजोगे नसते. खरे पाहता केवळ (वाच्य) अर्थ असण्यामुळे काही 'काव्य' ही संज्ञा दिली जात नाही, कारण लौकिक व वैदिक वाक्यांना ती संज्ञा नसते. म्हणून कारिकेत (व वृत्तीतही) 'सहृदयांनी नावाजण्याजोगा (अर्थ)' असे म्हटले. (वस्तुतः) तो अर्थ 'अर्थ' या नात्याने एकच आहे, पण त्यात दोन अंश असल्याने त्या अंशांच्या वेगळेपणाचे जाणकार त्यांमधील फरक दाखविण्यासाठी त्या अर्थाचे दोन भाग करतात. कारण (काव्यातील अर्थ व लौकिक अगर वैदिक अर्थ या दोहोंचेही स्वरूप जर 'अर्थ' हेच आहे (म्हणजे 'अर्थ–पणा' हा जर दोहोंमध्ये सारखाच आहे), तर सहृदय त्यांपैकी एकालाच काय म्हणून वाखाणतात ? तर अर्थात त्या अर्थात काहीतरी वैशिष्टच (म्हणजे आगळेपणा) असते. (म्हणूनच ते वैशिष्टच म्हणजेच 'प्रतीयमानत्व' हे काव्याच्या उत्कृष्टपणाचे

कारण असल्यामुळेच जाणकारांकडून त्याला 'आत्मा' म्हणून ठरवण्यात आले आहे. पण तो वाच्यार्थात मिसळलेला असल्यामुळे ज्या सामान्य वाचकांच्या मनाचा गोंधळ उडून त्याचे वेगळेपण ज्यांच्या लक्षात येत नाही, ते मात्र त्याला वाच्यार्थाहून वेगळा म्हणून मान्य करायला विरोध करतात. चार्वाकमतानुयायी लोक ज्याप्रमाणे ( आत्मा हा 'शरीराशी संलग्न झालेला असल्यामुळे' ) आत्म्याला शरीराहून वेगळा मानायच्या विरुद्ध असतात, त्याप्रमाणे. म्हणूनच ( प्रथम ) 'अर्थ' अशा एकवचनी शब्दाने सुरुवात करून 'सहृदयांनी नावाजण्याजोगा' अशा विशेषणाच्या द्वारे ( तो काव्याचा आत्मा का मानला जातो याचे ) कारण सांगून, मग विभाग करण्याच्या दृष्टीने 'त्याचे दोन भेद म्हणजे अंश आहेत' असे म्हटले. 'दोन्हीही काव्याचे आत्मे आहेत' असे म्हटले नाही.

टीपा

१. या दुसऱ्या कारिकेतल्या 'व्यवस्थितः' (निश्चित झाला आहे) या शब्दाचा अर्थ 'खरोखरच असलेला' किंवा 'ध्वनिकारांच्या मते असलेला' असा समजून 'साहित्यदर्पण' हा ग्रंथ लिहिणाऱ्या 'विश्वनाथा'ने स्वतःचा गैरसमज करून घेऊन दुसऱ्याचाही केला आहे या गैरसमजामुळेच विश्वनाथ पहिल्याच परिच्छेदात म्हणतो :--"येथे ध्वनिकारांनी वाच्यार्थाला काव्याचा आत्मा म्हटले आहे. ते 'काव्याचा आत्मा ध्वनि' या त्यांच्या स्वतःच्या म्हणण्याच्याच विरुद्ध असल्यामुळे त्याज्य आहे." पण विश्वनाथाचा हा आक्षेप बरोबर नाही. वास्तविक ध्वनिकारांच्या मते काव्याचा आत्मा 'ध्वनि' म्हणजे सुंदर असा प्रतीयमान अर्थच. (पुढे कारिका ५ हीदेखील पाहा ) पण ध्वनीची किंवा प्रतीयमानाची ज्याला कल्पनाच नाही, अशा माणसास नीटपणे समजावून देण्याकरिता प्रथम त्याला माहीत असलेलीच कल्पना घेऊन मग तिची योग्य ती फोड करून दाखवली आहे. नवे तत्त्व समजावून देताना शिकणाराला जे माहीत असेल तेथूनच त्याच्या त्या पातळीवरूनच सुरुवात करावी, ( ज्ञाताकडून अज्ञाताकडे ) हा शिक्षणशास्त्रातला सिद्धान्त आहे. उद्भटादि शास्त्रकारांनाही प्रतीयमानाचा विवेक झाला नाही, मग इतरांची काय कथा ? म्हणूनच ही दुसरी कारिका ध्वनीची कल्पना उभी करण्या-पूर्वीची 'भूमिका' ( म्हणजे पाया ) रचणे आहे, असे खुद्द आनन्दवर्धनच सांगतात. (पाहा, २ ऱ्या कारिकेपूर्वीच्या 'वृत्ती'तले 'भूमिका तयार

करण्यासाठी ' हे शब्द. )

म्हणून व्यवस्थितः या कारिकेतील शब्दाचा अर्थ 'असलेला' असा न घेता 'निश्चित झालेला' म्हणजे 'आजवर निश्चित होऊन बसलेला' असा घ्यावा. 'जो आजवरच्या काव्यशास्त्रकारांनी आत्मा म्हणून मानला, त्या, सहृदयांनी नावाजण्याजोग्या अर्थाचे वस्तुतः दोन भाग करायला हवे.' त्या दोन म्हणजे वाच्य आणि प्रतीयमान या भागांपैकी ज्याचा विवेक आतापर्यंतच्या काव्यशास्त्रज्ञांना होऊ शकला नाही, तो 'प्रतीयमान' हा भागच खरा काव्यात्मा होय. हा ध्वनिकारांचा आशय लक्षात घेतला, म्हणजे विश्वनाथाच्या आक्षेपाला उभे राहायला पायाच मिळत नाही. काव्यातील प्रतीयमान हा वाच्यार्थाच्या आश्रयानेच असतो. तो प्रतीयमान स्वतंत्रपणे उभा राहू शकत नाही. म्हणून त्याचे वेगळेपण लोकांच्या ध्यानात येत नाही. ते एकूण गोळाबेरीज अर्थालाच काव्यात्मा समजतात. लोकांची हीच समजूत असते. त्याच्या पुष्ट्यर्थ दण्डीचे पुढील वचन पाहा–

**शरीरं तावदिष्टार्थव्यवच्छिन्ना पदावली ।** 'पदावली' हे काव्याचे शरीर, तर इष्टार्थ हा त्याचा आत्मा म्हणून दण्डीला अभिप्रेत आहे. हे त्याने प्रत्यक्ष सांगितले नसले तरी अनुमानाने कळून येते. हा 'इष्टार्थ' म्हणजेच जगन्नाथपण्डिताचा 'रमणीयार्थ' म्हणजेच वरील कारिकेत निर्देशिलेला 'सहृदयश्लाघ्य' अर्थ. या सहृदयश्लाघ्य अर्थात दोन अंश असून त्यातील प्रतीयमान अंश हाच मुख्य अंश होय हा विवेक ध्वन्यालोकाच्या पूर्वीच्या काव्यशास्त्रकारांना झाला नाही.

दण्डीने काव्यादर्शात अन्यत्र असेही म्हटले आहे–

**इति वैदर्भमार्गस्य प्राणा दश गुणाः स्मृताः ।** म्हणजे दशगुणांना उद्देशून त्याने **प्राणाः** हा शब्द वापरलेला आहे.

दण्डीनंतरच्या वामनाने आत्मा हा शब्द प्रत्यक्षच उपयोजिलेला आहे. तो म्हणतो– **रीतिरात्मा काव्यस्य । विशिष्टा पदरचना रीतिः । विशेषो गुणात्मा ।** (काव्यालंकारसूत्र, १–२–६ ते ८) वामनाने असेही सांगितले आहे–

**काव्यं ग्राह्यमलंकारात् । सौन्दर्यमलंकारः । स दोषगुणालङ्कारहानोपादानाभ्याम् ।** (काव्यालंकारसूत्र, १–१–१ ते ३).

म्हणजे, काव्यामध्ये सौंदर्य निर्माण होते, ते दोष टाकून गुण व अलंकार यांचे ग्रहण केल्याने असे म्हटल्याने काव्यातील एकूण सुंदर अर्थालाच तो काव्यात मुख्य समजतो हे स्पष्ट दिसते.

प्रा. रा. ब. आठवले हे आपण संपादिलेल्या जगन्नाथपंडितकृत 'रसगंगाधरा'च्या ३ ऱ्या खंडातील प्रस्तावनेत ध्वन्यालोकातील प्रस्तुत (२ ऱ्या) कारिकेचे मराठी भाषांतर पुढीलप्रमाणे करतात–

'सहृदयांना प्रशंसनीय वाटणाऱ्या अर्थाला काव्याचा आत्मा निश्चितपणे म्हणावे. अशा त्या काव्याचा आत्मा गणल्या जाणाऱ्या अर्थाचे वाच्यार्थ व व्यंग्यार्थ

असे दोन प्रकार पूर्वसूरींनी सांगून ठवले आहेत.

यापैकी पहिल्या वाक्यातील 'म्हणावे' ह्या प्रा. आठवले यांनी कशाचा अर्थ केला ? दुसऱ्या वाक्यातील 'आत्मा गणल्या जाणाऱ्या अर्थाचे' यावरून तर स्पष्ट होते की, सहृदय व आतापर्यंतचे काव्यशास्त्रकार काव्यातील एकूण सुंदर अर्थालाच काव्यात्मा मानीत आले.

प्रा. आठवले त्यानंतर म्हणतात--

'या' वरील कारिकेच्या होणाऱ्या सरळ अर्थात व मम्मटाने केलेल्या काव्याच्या व्याख्येच्या विशद अर्थात काय फरक आहे ? आणि म्हणून वरील कारिकेचा अभिनवगुप्तांनी केलेला अर्थ ओढून ताणून केल्यासारखा वाटतो, असे मम्मटाच्या मताला अनुसरून एखाद्या अलंकारवाद्याने म्हटले, तर त्यात काय गैर आहे ?

हे प्रा. आठवले यांचे म्हणणे त्यांच्या मनाच्या झालेल्या गोंधळाचे निदर्शक आहे. पहिली गोष्ट, अभिनवगुप्त मम्मटाच्या पूर्वीचा म्हणजे ध्वन्यालोकाच्या अधिक जवळचा आहे. दुसरे, मम्मटाने काव्यलक्षणात 'काव्याचा आत्मा अमुक' असे म्हटले नाही त्याने आपल्या काव्याचे एकंदर स्वरूप वर्णिले आहे. 'अलंकार-वाद्याने' काव्य म्हणजे काय, याबद्दल स्वतःचे मत काहीही सांगावे, पण ध्वनिकारालाही वाच्यार्थ आत्मा म्हणून अभिप्रेत होता असे विधान करणे म्हणजे स्वतःचे मत त्याच्यावर लादणे आहे. शिवाय 'अलंकारवादी' म्हणजे काय ? अलंकार हाच काव्याचा आत्मा मानणारा, की (सौंदर्यमलङ्कारः या वामनाच्या मतानुसार) एकंदरीत 'सुंदर' असणाऱ्या अर्थाला काव्यात्मा मानणारा ?

ध्वन्यालोकः

काव्यस्य हि ललितोचितसन्निवेशचारुणः शरीरस्येवात्मा सार-रूपतया स्थितः सहृदयश्लाघ्यो योऽर्थस्तस्य वाच्यः प्रतीयमानश्चेति द्वौ भेदौ ।

ध्वन्यालोक

शरीराचे (सारसर्वस्व) ज्याप्रमाणे आत्मा, त्याप्रमाणे (गुणालंकारांमुळे) सुंदर आणि (रसपरिपोषाच्या दृष्टीने) उचित अशा रचनेमुळे रमणीय झालेल्या काव्याचे सार या रूपाने असलेला, सहृदयांनी नावाजण्याजोगा जो अर्थ, त्याचे 'वाच्य' आणि 'प्रतीयमान' असे दोन अंश आहेत.

लोचनम्

कारिकाभागगतं काव्यशब्दं व्याकर्तुमाह– काव्यस्य हीति। ललितशब्देन गुणालङ्कारानुग्रहमाह। उचितशब्देन रसविषयमेवौचित्यं भवतीति दर्शयन् रसध्वनेर्जीवितत्वं सूचयति। तदभावे हि किमपेक्षयेदमौचित्यं नाम सर्वत्रोद्घोष्यते, इति भावः। योऽर्थ इति यदानुवदन् परेणाप्येतत्तावदभ्युपगतमिति दर्शयति। तस्येत्यादिना तदभ्युपगम एव द्वयात्मत्वे सत्युपपद्यत इति दर्शयति। तेन यदुक्तम्– 'चारुत्वहेतुत्वाद् गुणालङ्कारव्यतिरिक्तो न ध्वनिः' इति, तत्र ध्वनेरात्मस्वरूपत्वाद्धेतुरसिद्ध इति दर्शितम्। न ह्यात्मा चारुत्वहेतुर्देहस्येति भवति। अथाप्येवं स्यात्तथापि वाच्येऽनैकान्तिको हेतुः। न ह्यलङ्कार्य एवालङ्कारः, गुणी एव गुणः। एतदर्थमपि वाच्यांशोपक्षेपः। अत एव वक्ष्यति– 'वाच्यः प्रसिद्धः' इति ॥ २ ॥

लोचन

(ग्रन्थाच्या) 'कारिका' भागात असलेल्या 'काव्य'शब्दाचे विवरण करण्यासाठी (वृत्तिकार) 'काव्याचे (सार) ...' इ. सांगतात. 'ललित' (म्हणजे सुंदर) हा शब्द योजून (त्यांनी) काव्यास गुणालंकारांचा, सौन्दर्य वाढवण्याचे कामी हातभार असल्याचे सांगितले आहे. 'उचित' या शब्दाने ('संनिवेशा'चे म्हणजे रचनेचे) औचित्य हे रसाविषयीच असते, हे दाखवून रसध्वनि हे काव्याचे जीवित होय, हे ते (म्हणजे वृत्तिकार) सुचवितात. कारण, त्याच्या (म्हणजे रसाच्या) अभावी, 'औचित्य' म्हणून ज्याची सर्वत्र द्वाही फिरवली जाते, ते (औचित्य) कोणाच्या अपेक्षेने असणार, हा भावार्थ.

'जो अर्थ...' वगैरे. 'जो' या (सर्वनामा)ने '**सहृदयश्लाघ्यः अर्थः काव्यस्य आत्मा**' या शब्दसमूहातील प्रसिद्ध असलेल्या सहृदयश्लाघ्य अर्थाचा निर्देश करून (वृत्तिकार) दर्शवितात की, आतापर्यंत होऊन गेलेल्या इतर काव्यशास्त्रकारांनी सुद्धा ही तर गोष्ट (म्हणजे सहृदयांच्या प्रशंसेस पात्र असलेला अर्थ काव्याचा आत्मा असतो, ही) मान्य केलीच आहे आणि सहृदयांनी नावाजण्याजोग्या वरील गोष्टीचा

(म्हणजे सहृदयांच्या प्रशंसेस पात्र अर्थच काव्याचा आत्मा, याचा ) स्वीकार काव्यामध्ये वाच्यार्थ व व्यंग्यार्थ हे दोन अंश असतील, तरच बुद्धीला पटणारा आहे. हे 'त्याचे' इ. शब्दांनी (वृत्तिकार) दाखवितात.

त्यामुळे (म्हणजे काव्यार्थाचे दोन अंश असून 'प्रतीयमान' अंश हा आत्मा होय असे सांगितल्यामुळे ) असे दाखविले गेले आहे— 'ध्वनि हा सौंदर्यहेतु असल्याने (तो) गुणालंकारांहून वेगळा नाही' असे जे म्हटले गेले, त्या म्हणण्यातील हेतु, ध्वनि हा आत्मस्वरूप असल्याने 'असिद्ध[२]' आहे. कारण आत्मा हा देहाच्या सौन्दर्यास कारणीभूत आहे, असे कधी होत नाही. आणि असे असतानाही आत्मा हा सौन्दर्यहेतु आहे असे जरी क्षणभर मानले, तरीसुद्धा तो हेतु 'अनैकान्तिक'[३] आहे. कारण ज्याला अलंकृत करावयाचे, तो ( स्वतःच स्वतःचा ) अलंकार' असू शकत नाही, किंवा जो 'गुणवान्' असतो तो स्वतःचा 'गुण' असत नाही, म्हणून व्यंग्यार्थ हा ('गुणी' व अलंकार्य' असल्याने ) गुणही नाही किंवा अलंकारही नाही. हेतु अनैकान्तिक आहे, हे दाखविण्यासाठीही[४] (कारिकेत) वाच्य या अंशाचा उल्लेख केलेला आहे. म्हणूनच ( आता कारिकाकार त्या दोन अंशांपैकी ) 'वाच्य हा प्रसिद्ध आहे' असे ( पुढच्याच कारिकेत ) म्हणतील.

टीपा

१. 'औचित्या'ची सविस्तर चर्चा ध्वन्यालोकापूर्वीच्या ग्रंथात केलेली आढळत नाही. औचित्याचा अप्रत्यक्ष उल्लेख–म्हणजे अनौचित्य टाळावे अशा स्वरूपाचा उल्लेख–भरत, भामह व दण्डी यांच्या ग्रंथात आढळतो 'रामाभ्युदय' नाटकाचा कर्ता यशोवर्मा व काव्यालंकार लिहिणारा रुद्रट यांनी 'औचित्य' शब्दाचा प्रत्यक्ष उल्लेख करून त्याचे काव्यनाटकादिकात महत्त्व आहे असे सांगितले आहे. परंतु औचित्याचा संबंध रसभावादिकांशीच आहे हे सांगून त्याचे विस्ताराने विवेचन पहिल्याप्रथम आनंदवर्धनांच्या ध्वन्यालोकातच केलेले आढळते. त्यानंतर राजशेखर, कुन्तक व जगन्नाथ यांनी औचित्याची ही कल्पना उचलून धरिली आहे. क्षेमेन्द्राने तर औचित्यावर 'औचित्यविचारचर्चा' नावाचा वेगळा ग्रंथच लिहिला. मम्मट व विश्वनाथ

यांनी रसदोषांचा विचार करताना औचित्याचा अप्रत्यक्ष निर्देश केला आहे, पण त्यांनी त्याची सविस्तर चर्चा केलेली दिसत नाही.

२. 'पर्वतावर अग्नि असला पाहिजे, कारण त्यावर धूर आहे' या विधानात अग्नि असणे हे 'साध्य,' पर्वत हा 'पक्ष' आणि धूर असणे हा 'हेतु' होय. काही विधानात सांगितलेला हेतु पक्षावर असतच नाही. हा अर्थात् दोष आहे, कारण हेतुच जर पक्षावर नसला, तर तो त्या पक्षावर साध्याचे अस्तित्व कसे सिद्ध करू शकणार ? 'पक्षावर नसणे' या दोषाने युक्त अस-लेल्या हेतूला 'स्वरूपासिद्ध' हेत्वाभास म्हणतात. 'घोडा हा पशु आहे, कारण त्याला शिंगे असतात' असे म्हटल्यास शिंगे असणे हा धर्म घोड्याच्या ठिकाणी नाही म्हणून तो हेतु स्वरूपासिद्ध आहे. प्रस्तुत उदाहरणातही 'सौंदर्यहेतु असणे' हा धर्म आत्मस्वरूप असलेल्या ध्वनीचे ठिकाणी नाही, म्हणून हा हेतु असिद्ध ( म्हणजे स्वरूपासिद्ध ) होय.

३. 'असिद्धा'प्रमाणेच 'अनैकान्तिक' हा सदोष हेतूचा एक प्रकार आहे. वस्तुतः निर्दोष हेतु हा साध्य जेथे असेल, तेथेच असावयास पाहिजे. साध्य नसेल तेथेही असणाऱ्या (सदोष) हेतूस 'अनैकान्तिक' (साधारण, सव्यभिचार) म्हणतात. 'ध्वनि (=पक्ष), गुणालंकारांहून वेगळा नाही (=साध्य), कारण, तो सौन्दर्यहेतु आहे. (=हेतु).' या प्रस्तुत उदाहरणात वाच्यार्थ हा काव्याचा चारुत्वहेतु असूनही वस्तुतः गुणालंकारांहून भिन्न आहे (म्हण-जेच वाच्यार्थाच्या ठिकाणी साध्याचे अस्तित्व नाही). प्रतीयमानाला चारुत्व-हेतु (जर) मानले तर चारुत्वहेतु असणे हा हेतु प्रतीयमानाबरोबर साध्या—भावयुक्त असलेल्या वाच्यार्थ या विपक्षावरही राहतो, असे होईल ! म्हणून चारुत्वहेतु हा हेतु 'अनैकान्तिक' ठरेल.

४. वाच्यार्थाचा उल्लेख एक तर 'ध्वनी'ची भूमिका तयार करण्यासाठी आणि दुसरे म्हणजे हेतु 'अनैकान्तिक' दाखविण्यासाठी, असा अभिनवगुप्तांचा दावा आहे. पण 'कारिकाकाराने वाच्यार्थाचा उल्लेख हेतु अनैकान्तिक आहे हे दाखविण्यासाठी केला' असे जे त्यांनी म्हटले आहे, ते त्यांनी कारिकाकारा-वर लादल्यासारखे वाटते.

ध्वन्यालोकः

तत्र वाच्यः प्रसिद्धो यः प्रकारैरुपमादिभिः ।
बहुधा व्याकृत सोऽन्यैः –

ध्वन्यालोक

त्यात (म्हणजे त्या दोन अंशात) जो वाच्य (अंश), तो प्रसिद्ध आहे. इतरांनी उपमा इ. प्रकारांद्वारे (अलंकारांद्वारे) त्याचे पुष्कळ विवरण केले आहे....

ध्वन्यालोकः

काव्यलक्ष्मविधायिभिः ।

ध्वन्यालोक

(इतरांनी म्हणजे) (भट्टोद्भट वगैरे) काव्यलक्षणकारांनी.

लोचनम्

तत्रेति द्व्यंशत्वे सत्यपीत्यर्थः । प्रसिद्ध इति । वनितावदनोद्यानेन्दूदयादिर्लौकिक एवेत्यर्थ । 'उपमादिभिः प्रकारैः स व्याकृतो बहुधे' ति सङ्गतिः । अन्यैरिति कारिकाभागं काव्येत्यादिना व्याचष्टे ।

लोचन

'त्यात' म्हणजे दोन अंश असले तरी देखील, हा आशय. 'प्रसिद्ध' म्हणजे रमणीचे मुख, उद्यान, चन्द्रोदय, यांसारखा लोकप्रसिद्ध (म्हणजे कोणत्याही दृष्टीने अलौकिक नसलेला) हा अर्थ 'उपमा वगैरे अलंकारांद्वारे त्याचे पुष्कळ विवरण केले आहे' असा (दुसऱ्या चरणाचा तिसऱ्या चरणाशी' असलेला संबंध. 'इतरांनी' .... वगैरे कारिकेचा भाग (वृत्तिकार)'काव्यलक्षणकारांनी' इ. ने स्पष्ट करितात.

टीपा

१. म्हणजे दुसऱ्या चरणाचा पहिल्या चरणाशी संबंध नाही असे अभिनवगुप्तांचे सांगणे.

ध्वन्यालोकः

– ततो नेह प्रतन्यते ॥ ३ ॥

ध्वन्यालोक

म्हणून येथे ( या ग्रंथात ) आम्ही त्याचा फार विस्तार करीत नाही. ॥ ३ ॥

ध्वन्यालोकः

केवलमनूद्यते पुनर्यथोपयोगमिति ॥ ३ ॥

ध्वन्यालोक

मात्र गरज पडेल तेव्हा आम्ही त्याचा अनुवाद ( उल्लेख ) करू. ॥ ३ ॥

**'ततो नेह प्रतन्यत' इति विशेषप्रतिषेधेन शेषाभ्यनुज्ञेति दर्शयति –केवलमित्यादिना ॥ ३ ॥**

लोचन

'म्हणून या ग्रंथात आम्ही त्याचा फार विस्तार करीत नाही' असे म्हणून 'विशिष्ट प्रकाराचा (म्हणजे वाच्यार्थाचे विस्ताराने प्रतिपादन करण्याचा) निषेध करून (म्हणजे विस्ताराने प्रतिपादन करणार नाही असे म्हणून) त्याद्वारे बाकीचे (म्हणजे संक्षेपाने निर्देश करण्याचे) स्वातंत्र्य घेतले जाईल, असे 'मात्र त्याचा अनुवाद करू' इ. शब्दांनी दाखविले आहे. ॥३॥

ध्वन्यालोकः

प्रतीयमानं पुनरन्यदेव वस्त्वस्ति वाणीषु महाकवीनाम्।
यत्तत्प्रसिद्धावयवातिरिक्तं विभाति लावण्यमिवाङ्गनासु ॥ ४ ॥

ध्वन्यालोक

परंतु महाकवींच्या वाणींमध्ये 'प्रतीयमान' हा जो काही निराळाच

अर्थ असतो, तो सुंदर स्त्रियांमध्ये, प्रसिद्ध अवयवांहून वेगळ्याच असलेल्या 'लावण्या 'प्रमाणे' झळकतो ( वेगळेपणाने उठून दिसतो. ) ॥ ४ ॥

ध्वन्यालोक:

प्रतीयमानं पुनरन्यदेव वाच्याद्वस्त्वस्ति वाणीषु महाकवीनाम्। यत्तत्सहृदयसुप्रसिद्धं प्रसिद्धेभ्योऽलङ्कृतेभ्यः प्रतीतेभ्यो वाऽवयवेभ्यो व्यतिरिक्तत्वेन प्रकाशते लावण्यमिवाङ्गनासु। यथा ह्यङ्गनासु लावण्यं पृथङ्निर्वर्ण्यमानं निखिलावयवव्यतिरेकि किमप्यन्यदेव सहृदय-लोचनामृतं तत्त्वान्तरं तद्वदेव सोऽर्थः।

ध्वन्यालोक:

पण महाकवींच्या वाणीमध्ये वाच्यार्थाहून निराळाच असा 'प्रतीयमान' ( नावाचा ) अर्थ असतो. हा जो काही असतो. तो सहृदयांच्या चांगल्या परिचयाचा आहे. सुंदरींमध्ये ज्याप्रमाणे लावण्य हे प्रसिद्ध अशा, म्हणजे अलंकारांनी मंडित असलेल्या किंवा सर्व लोकांस माहीत असलेल्या अवयवांहून निराळेपणाने झळकते," तसाच तो ( प्रतीयमान अर्थ ) अलंकृत किंवा सुप्रसिद्ध अशा शब्द व अर्थ या घटकांहून निराळेपणाने झळकतो. कारण, रमणींमधील लावण्याचा स्वतंत्रपणे विचार केला असताना ती जशी वेगळी उठून दिसणारी, सर्व अवयवांहून आगळी, अवर्णनीय अशी काही न्यारीच, सहृदयांच्या लोच-नांस अमृताप्रमाणे निववणारी वस्तु ( असते ), तसाच तो अर्थ होय.

लोचनम्

अन्यदेव वस्त्विति। पुनःशब्दो वाच्याद्विशेषद्योतकः। तद्व्यतिरिक्तं सारभूतं चेत्यर्थः। महाकवीनामिति बहुवचनमशेषविषयव्यापकत्वमाह। एतदभिधास्यमानप्रतीयमानानुप्राणितकाव्यनिर्माणनिपुणप्रतिभाभाजन - त्वेनैव महाकविव्यपदेशो भवतीति भावः। यदेवंविधमस्ति तद्भाति। न ह्यत्यन्तासतो भानमुपपन्नम्, रजताद्यपि नात्यन्तमसद्भाति। अनेन सत्त्वप्रयुक्तं तावद्भानमिति भानात्सत्त्वमवगम्यते। तेन यद्भाति तदस्ति तथेत्युक्तं भवति। तेनायं प्रयोगार्थ :- प्रसिद्धं वाच्यं धर्मि, प्रतीयमानेन व्यतिरिक्तेन तद्वत्, तथा भासमानत्वात् लावण्योपेताङ्गनाङ्गवत्। प्रसि-

छशब्दस्य सर्वप्रतीतत्वमलंकृतत्वं चार्थः । यत्तदिति सर्वनामसमुदायश्चमत्कारसारताप्रकटीकरणार्थमव्यपदेश्यत्वमन्योन्यसंवलनाकृतं चाव्यतिरेकभ्रमं दृष्टान्तदार्ष्टान्तिकयोर्दर्शयति । एतच्च किमपीत्यादिना व्याचष्टे । लावण्यं हि नामावयवसंस्थानाभिव्यङ्ग्यमवयवव्यतिरिक्तं धर्मान्तरमेव । न चावयवानामेव निर्दोषता वा भूषणयोगो वा लावण्यम्; पृथङ्निर्वर्ण्यमानकाणादिदोषशून्यशरीरावयवयोगिन्यामप्यलङ्कृतायामपि लावण्यशून्येयमिति, अतथाभूतायामपि कस्याञ्चिल्लावण्यामृतचन्द्रिकेयमिति सहृदयानां व्यवहारात् ।

लोचनं

'निराळाच अर्थ'.... 'पण' हा शब्द प्रतीयमान अर्थाच्या, वाच्यार्थाहून वेगळेपणाचा द्योतक आहे. त्या वाच्यार्थाहून वेगळा आणि सारभूत, असा आशय. 'महाकवींच्या' हे बहुवचन असे सांगते की, प्रतीयमान अर्थ सर्व विषयाला (म्हणजे महाकवींच्या सर्व काव्यांना) व्यापतो. तात्पर्य हे की, या ग्रन्थात जो प्रतीयमान अर्थ सांगितला जाणार आहे, त्यानेच काव्याला जिवतपणा प्राप्त होतो व असे ('जिवंत) काव्य निर्माण करण्यात निपुण अशा प्रतिभेने जो निष्णात असेल, त्यालाच 'महाकवि' ही पदवी मिळते. प्रतीयमान अर्थ अशा प्रकारचा (म्हणजे वाच्यार्थाहून निराळा व सारभूत) आहे, म्हणूनच त्याचे भान (म्हणजे ज्ञान) होते. कारण मुळीच अस्तित्वात नसणारी[3] गोष्ट भासमान होते हे बुद्धीला पटणारे नाही. चांदी वगैरेसारखी गोष्ट मुळीच अस्तित्वात नसणारी नव्हे, आणि म्हणूनच ती (शिंप वगैरेंच्या ठिकाणी) भासमान[4] होते. यामुळे कोणत्याही वस्तूचे ज्ञान होणे हे तिच्या अस्तित्वामुळेच घडून येते, असे असल्याने भासमान होण्यावरून अस्तित्वाचे अनुमान होते. त्यामुळे जे ज्या स्वरूपात भासमान होते, ते त्या स्वरूपात (कोठे तरी) असते असा ग्रंथकाराचा अभिप्राय आहे. त्यामुळे येथे अनुमानाच्या वाक्याची मांडणी अशी– 'प्रसिद्ध असणारा वाच्यार्थ हा जो धर्मी (म्हणजे धर्म धारण करणारा) आहे (पक्ष), तो वाच्यार्थाहून वेगळ्या अशा 'प्रतीयमान' या धर्माने युक्त (साध्य) असतो (प्रतिज्ञा); कारण तो वाच्यार्थाहून निराळ्या, प्रतीयमान

अर्थाने युक्त असा भासमान होतो (हेतु), ज्याप्रमाणे (शरीराहून निराळ्या असलेल्या) लावण्य या धर्माने युक्त असे सुन्दरीचे शरीर (धर्मी), त्याप्रमाणे' (उदाहरण). 'सर्वांच्या अनुभवाचा विषय असणे व 'अलंकृत असणे' हा 'प्रसिद्ध' शब्दाचा अर्थ होय. 'जो' व 'तो' हा सर्वनामांचा समुदाय ('हा जो काही असतो, तो') 'चमत्कार (म्हणजे आश्चर्यकारक आनंद देण्याचे सामर्थ्य) हे प्रतीयमानाचे (आणि लावण्याचे) सार होय, म्हणूनच त्याचे ठिकाणी अलौकिकत्व असते, आणि वाच्य व व्यङ्ग्य, तसेच शरीर व लावण्य ही एकमेकात मिसळून गेल्यामुळे भिन्न नाहीत (एकच आहेत) असा भ्रम होतो,[४]' इतका अर्थ सुचवितो. आणि याचे व्याख्यान (वृत्तिकार) 'किमपि' (अलौकिक) या शब्दाने करितात. कारण, 'लावण्य' म्हणजे अवयवांच्या विशिष्ट ठेवणीतून अभिव्यक्त होणारा (पण नेत्रादि) अवयवांहून निराळा, आगळाच धर्म होय. आणि अवयवांचा निर्दोषपणा किंवा ते अवयव अलंकारांनी मंडित असणे हेच काही 'लावण्य' नव्हे, कारण, वेगळेपणाने दिसून पडणारा, काणेपणा वगैरेसारखा एकही दोष एखाद्या स्त्रीत नसला व तिने अलंकारही घातले असले, तरी ही 'लावण्यशून्य आहे' असा आणि दुसरी एखादी स्त्री तशी (म्हणजे अलंकृत व सर्वथैव निर्दोष) नसली, तरीही ही 'लावण्यामृतरसाने ओथंबलेली ज्योत्स्ना[२]' आहे, असे सहृदय म्हणताना आढळतात.

टीपा

१. लावण्य म्हणजे एक प्रकारचा मोहकपणा होय तो कोणत्याही अवयवापेक्षा निराळाच असणार !

२. याच अर्थाचे आंग्लकवि 'पोप' याचे पुढील वचन पाहण्यासारखे आहे –

'Tis not a lip or eye we beauty call,
But the joint force and full result of all.

३. मुळीच अस्तित्वात नसणारी गोष्ट म्हणजे उदाहरणार्थ, सशाचे शिंग, वन्ध्येचा पुत्र, इत्यादि. या गोष्टी जर नसतातच, तर भासमान कशा होणार ?

४. हा वेदांतशास्त्रातला सुप्रसिद्ध दृष्टांत आहे. शिंपल्याचे ठिकाणी सूर्यप्रकाशात 'ही चांदी आहे' असा एखादे वेळी भास होतो, तो चांदी नावाची वस्तु

पूर्वी कोठेतरी पाहिलेली असते, म्हणूनच होतो. पाहा- ब्रह्मसूत्रशांकरभाष्य, १-१-१ —

स्मृतिरूपः, अन्यत्र पूर्वदृष्टावभासः अध्यासः। (अध्यास म्हणजे पूर्वी कोठे तरी पाहिलेल्या वस्तूचे स्मरण होऊन तिचा आरोप जेथे ती नाही अशा दुसऱ्या ठिकाणी करणे )

५. 'प्रसिद्ध' या शब्दाचे 'ख्यात' व 'भूषित' असे दोन अर्थ अमरकोशात दिले आहेत. (प्रसिद्धौ ख्यातभूषितौ।) कुमारसंभवामध्ये (५-९) प्रसिद्धैः शिरोरुहैः यात 'प्रसिद्ध' हा शब्द 'भूषित' अशा अर्थाने वापरला आहे.

६. तुलनार्थ पाहा, पृ. ६४, 'चार्वाकमतानुयायी' ... इ.

७. तुलनार्थ पाहा, त्वमस्य लोकस्य च नेत्रकौमुदी (कुमारसंभव, ५–७१), त्वं कौमुदी नयनयोः (उत्तररामचरित, ३-२६), आणि विलोचनचंद्रिका (मालतीमाधव, १–३६.)

ध्वन्यालोकः

स ह्यर्थो वाच्यसामर्थ्याक्षिप्तं वस्तुमात्रमलंकाररसादयश्चेत्यनेक-प्रभेदप्रभिन्नो दर्शयिष्यते। सर्वेषु च तेषु प्रकारेषु तस्य वाच्यादन्यत्वम्। तथा ह्याद्यस्तावत्प्रभेदो वाच्याद्दूरं विभेदवान्। स हि कदाचिद्वाच्ये विधिरूपे प्रतिषेधरूपः। यथा –

भम धम्मिअ वीसत्थो सो सुणओ अज्ज मारिओ देण।
गोलाणइकच्छकुडंगवासिणा दरिअसीहेण॥

ध्वन्यालोक

कारण तो ( प्रतीयमान ) अर्थ वाच्यार्थाच्या सामर्थ्याने सुचवलेली केवळ वस्तु,[१] अलंकार आणि रसादि अशा अनेक प्रकारांमुळे विविध स्वरूपाचा असतो, असे पुढे दाखविले जाईल आणि त्या सर्व प्रकारांमध्ये तो वाच्यार्थाहून अगदी निराळा असतो. उदाहरणार्थ, ( प्रतीयमानाचा ) पहिलाच ( म्हणजे 'वस्तु' हा ) प्रकार वाच्यार्थाहून खूप वेगळा आहे. कारण, एखाद्या वेळी वाच्यार्थ हा विधिस्वरूप ( म्हणजे 'अमुक कर' असे सांगणारा ) असताना तो ( प्रतीयमान अर्थ ) निषेधस्वरूप ( म्हणजे 'करू नको' असे सांगणारा ) असतो. जसे–

हे धार्मिका! तू ( खुशाल ) निःशंकपणे हिंड. गोदावरीच्या काठी

वेलींच्या जाळीत राहणाऱ्या उन्मत्त सिंहाने तो कुतरडा आज मारून टाकला आहे.

लोचनम्

ननु लावण्यं तावद् व्यतिरिक्तं प्रथितम्। प्रतीयमानं किं तदित्येव न जानीमः, दूरे तु व्यतिरेकप्रथेति। तथा भासमानत्वमसिद्धो हेतुरित्याशङ्क्य स ह्यर्थ इत्यादिना स्वरूपं तस्याभिधत्ते। सर्वेषु चेत्यादिना च व्यतिरेकप्रथां साधयिष्यति। तत्र प्रतीयमानस्य तावद् द्वौ भेदौ– लौकिकः, काव्यव्यापारैकगोचरश्चेति। लौकिको यः स्वशब्दवाच्यतां कदाचिदधिशेते, स च विधिनिषेधाद्यनेकप्रकारो वस्तुशब्देनोच्यते। सोऽपि द्विविधः – यः पूर्वं क्वापि वाक्यार्थेऽलङ्कारभावमुपमादिरूपतयान्वभूत्, इदानीं त्वनलङ्काररूप एवान्यत्र गुणीभावात्, स पूर्वप्रत्यभिज्ञानबलादलङ्कारध्वनिरिति व्यपदिश्यते ब्राह्मणश्रमणन्यायेन। तद्रूपताभावेन तूपलक्षितं वस्तुमात्रमुच्यते। मात्रग्रहेन हि रूपान्तरं निराकृतम्। यस्तु स्वप्नेऽपि न स्वशब्दवाच्यो न लौकिकव्यवहारपतितः, किं तु शब्दसमर्प्यमाणहृदयसंवादसुन्दरविभावानुभावसमुचितप्राग्विनिविष्टरत्यादिवासनानुरागसुकुमारस्वसंविदानन्दचर्वणाव्यापाररसनीयरूपो रसः, स काव्यव्यापारैकगोचरो रसध्वनिरिति, स च ध्वनिरेवेति, स एव मुख्यतयात्मेति।

यदूचे भट्टनायकेन – 'अंशत्वं न रूपता' इति, तद्वस्त्वलङ्कारध्वन्योरेव यदि नामोपालम्भः, रसध्वनिस्तु तेनैवात्मतयाङ्गीकृतः, रसचर्वणात्मनस्तृतीयस्यांशस्याभिधाभावनांशद्वयोत्तीर्णत्वेन निर्णयात्, वस्त्वलंकारध्वन्यो रसध्वनिपर्यन्तत्वमेवेति वयमेव वक्ष्यामस्तत्र तत्रेत्यास्तां तावत्। वाच्यसामर्थ्याक्षिप्तमिति भेदत्रयव्यापकं सामान्यलक्षणम्। यद्यपि हि ध्वननं शब्दस्यैव व्यापारः, तथाप्यर्थसामर्थ्यस्य सहकारिणः सर्वत्रानपायाद् वाच्यसामर्थ्याक्षिप्तत्वम्। शब्दशक्तिमूलानुरणनव्यङ्ग्येऽप्यर्थसामर्थ्यादेव प्रतीयमानावगतिः, शब्दशक्तिः केवलमवान्तरसहकारिणीति वक्ष्यामः। दूरं विभेदवानिति। विधिनिषेधौ विरुद्धाविति न कस्यचिदपि विमतिः। एतदर्थं प्रथमं तावदेवोदाहरति–

भ्रम धार्मिक विस्रब्धः स शुनकोऽद्य मारितस्तेन ।
गोदानदीकूललतागहनवासिना दृप्तसिंहेन ॥

कस्याश्चित्संकेतस्थानं जीवितसर्वस्वायमानं धार्मिकसंचरणान्तरायदोषात्तदवलुप्यमानपल्लवकुसुमादिविच्छायीकरणाच्च परित्रातुमियमुक्तिः । तत्र स्वतःसिद्धमपि भ्रमणं श्वभयेनापोदितमिति प्रतिप्रसवात्मको निषेधाभावरूपः, न तु नियोगः प्रैषादिरूपोऽत्र* विधिः, अतिसर्गप्राप्तकालयोर्ह्ययं लोट् । तत्र भावतदभावयोर्विरोधाद् द्वयोस्तावन्न युगपद् वाच्यता, न क्रमेण, विरम्य व्यापाराभावात् । 'विशेष्यं नाभिधा गच्छेत्' इत्यादिनाभिधाव्यापारस्य विरम्य व्यापारासंभवाभिधानात् ।

ननु तात्पर्यशक्तिरपर्यवसिता विवक्षया दृप्तधार्मिकतदादिपदार्थानन्वयरूपमुख्यार्थबाधबलेन विरोधनिमित्तया विपरीतलक्षणया च वाक्यार्थीभूतनिषेधप्रतीतिमभिहितान्वयदृशा करोतीति शब्दशक्तिमूल एव सोऽर्थः एवमनेनोक्तमिति हि व्यवहारः, तन्न वाच्यातिरिक्तोऽन्योऽर्थ इति ।

नैतत्, त्रयो ह्यत्र व्यापाराः संवेद्यन्ते – पदार्थेषु सामान्यात्मस्वभिधाव्यापारः, समयापेक्षयार्थावगमनशक्तिर्ह्यभिधा । समयश्च तावत्येव, न विशेषांशे, आनन्त्याद् व्यभिचाराच्चैकस्य । ततो विशेषरूपे वाक्यार्थे तात्पर्यशक्तिः परस्परान्विते, 'सामान्यान्यन्यथासिद्धेर्विशेषं गमयन्ति हि' इति न्यायात् । तत्र च द्वितीयकक्ष्यायां 'भ्रम' इति विध्यतिरिक्तं न किंचित् प्रतीयते, अन्वयमात्रस्यैव प्रतिपन्नत्वात् । न हि 'गङ्गायां घोषः', 'सिंहो वटुः' इत्यत्र यथान्वय एव बुभूषन् प्रतिहन्यते, योग्यताविरहात्; तथा तव भ्रमणनिषेद्धा स श्वा सिंहेन हत , तदिदानीं भ्रमणनिषेधकारणवैकल्याद्भ्रमणं तवोचितमित्यन्वयस्य काचित्क्षतिः । अत एव मुख्यार्थबाधा नात्र शङ्क्येति न विपरीतलक्षणाया अवसरः । भवतु वासौ । तथापि द्वितीयस्थानसंक्रान्ता तावदसौ न भवति । तथा

---

* 'कल्पलताविवेक' या ग्रंथात पृ. १०७ वर लोचनातून उद्धृत केलेल्या उताऱ्यामध्ये 'नियोगप्रैषादिरूपः' असा पाठ आढळतो, तो अधिक बरा वाटतो. तो स्वीकारल्यास वाक्याचे भाषांतर 'आग्रहाची विनंती, आज्ञा; इत्यादि स्वरूपाचा विधि येथे नाही' असे होईल.

हि – मुख्यार्थबाधायां लक्षणायाः प्रक्लृप्तिः। बाधा च विरोधप्रतीतिरेव। न चात्र पदार्थानां स्वात्मनि विरोधः। परस्परं विरोध इति चेत् – सोऽयं तर्ह्यन्वये विरोधः प्रत्येयः। न चाप्रतिपन्नेऽन्वये विरोधप्रतीतिः, प्रतिपत्तिश्चान्वयस्य नाभिधाशक्त्या, तस्याः पदार्थप्रतिपत्त्युपक्षीणाया विरम्याव्यापारात् इति तात्पर्यशक्त्यैवान्वयप्रतिपत्तिः।

नन्वेवं 'अङ्गुल्यग्रे करिवरशतम्' इत्यत्राप्यन्वयप्रतीतिः स्यात्। किं न भवत्यन्वयप्रतीतिः दशदाडिमादिवाक्यवत्? किन्तु प्रमाणान्तरेण सोऽन्वयः प्रत्यक्षादिना बाधितः प्रतिपन्नोऽपि, शुक्तिकायां रजतमिवेति तदवगमकारिणो वाक्यस्याप्रामाण्यम्। 'सिंहो माणवकः' इत्यत्र द्वितीयकक्ष्यानिविष्टतात्पर्यशक्तिसमर्पितान्वयबाधकोल्लासानन्तरमभिधा-तात्पर्यशक्तिद्वयव्यतिरिक्ता तावत् तृतीयैव शक्तिस्तद्बाधकविधुरी-करणनिपुणा लक्षणाभिधाना समुल्लसति।

"नन्वेवं 'सिंहो बटुः' इत्यत्रापि काव्यरूपता स्यात्, ध्वनन-लक्षणस्यात्मनोऽत्रापि समनन्तरं वक्ष्यमाणतया भावात्।" "ननु घटेऽपि जीवव्यवहारः स्यात्, आत्मनो विभुत्वेन तत्रापि भावात्"। "शरीरस्य खलु विशिष्टाधिष्ठानयुक्तस्य सत्यात्मनि जीवव्यवहारः, न यस्य कस्यचित्" इति चेत् – गुणालङ्कारौचित्यसुन्दरशब्दार्थशरीरस्य सति ध्वननाख्यात्मनि काव्यरूपताव्यवहारः। न चात्मनोऽसारता काचिदिति च समानम्। न चैवं भक्तिरेव ध्वनिः। भक्तिर्हि लक्षणा-व्यापारस्तृतीयकक्ष्यानिवेशी। चतुर्थ्यां तु कक्ष्यायां ध्वननव्यापारः। तथा हि – त्रितयसन्निधौ लक्षणा प्रवर्तत इति तावद्भवन्त एव वदन्ति। तत्र मुख्यार्थबाधा तावत्प्रत्यक्षादिप्रमाणान्तरमूला। निमित्तं च यद-भिधीयते सामीप्यादि तदपि प्रमाणान्तरावगम्यमेव।

यत्त्विदं घोषस्यातिपवित्रत्वशीतलत्वसेव्यत्वादिकं प्रयोजनम-शब्दान्तरवाच्यं प्रमाणान्तराप्रतिपन्नम्, बटोर्वा पराक्रमातिशयशालित्वं, तत्र शब्दस्य न तावन्न व्यापारः। तथाहि– तत्सामीप्यात्तद्धर्मत्वानुमान-मनैकान्तिकम्, सिंहशब्दवाच्यत्वं च बटोरसिद्धम्। अथ यत्र यत्रैवंशब्द-प्रयोगस्तत्र तत्र तद्धर्मयोग इत्यनुमानम्। तस्यापि व्याप्तिग्रहणकाले मौलिकं प्रमाणान्तरं वाच्यम्, न चास्ति। न च स्मृतिरियम्, अननुभूते

तदयोगात्, नियमाप्रतिपत्तेर्वक्तुरेतद्विवक्षितमित्यध्यवसायाभावप्रसङ्गाच्चेत्यस्ति तावदत्र शब्दस्यैव व्यापारः। व्यापारश्च नाभिधात्मा, समयाभावात्। न तात्पर्यात्मा, तस्यान्वयप्रतीतावेव परिक्षयात्। न लक्षणात्मा, उक्तादेव हेतोः स्खलद्गतित्वाभावात्। तत्रापि हि स्खलद्गतित्वे पुनर्मुख्यार्थबाधा निमित्तं प्रयोजनमित्यनवस्था स्यात्। अत एव यत्केनचिल्लक्षितलक्षणेति नाम कृतं तद्व्यसनमात्रम्। तस्मादभिधातात्पर्यलक्षणाव्यतिरिक्तश्चतुर्थोऽसौ व्यापारो ध्वननद्योतनव्यञ्जनप्रत्यायनावगमनादिसोदरव्यपदेशनिरूपितोऽभ्युपगन्तव्यः। यद्वक्ष्यति —

'मुख्यां वृत्तिं परित्यज्य गुणवृत्त्यार्थदर्शनम्।
यदुद्दिश्य फलं तत्र शब्दो नैव स्खलद्गतिः।' इति।

तेन समयापेक्षा वाच्यावगमनशक्तिरभिधाशक्तिः। तदन्यथानुपपत्तिसहायार्थावबोधनशक्तिस्तात्पर्यशक्तिः। मुख्यार्थबाधादिसहकार्यपेक्षार्थप्रतिभासनशक्तिर्लक्षणाशक्तिः। तच्छक्तित्रयोपजनितार्थावगममूलजाततत्प्रतिभासपवित्रितप्रतिपत्तृप्रतिभासहायार्थद्योतनशक्तिर्ध्वननव्यापारः। स च प्राग्वृत्तं व्यापारत्रयं न्यक्कुर्वन्प्रधानभूतः काव्यात्मेत्याशयेन निषेधप्रमुखतया च प्रयोजनविषयोऽपि निषेधविषय इत्युक्तम्। अभ्युपगममात्रेण चैतदुक्तम्: न त्वत्र लक्षणा, अत्यन्ततिरस्कारान्यसंक्रमणयोरभावात्। न ह्यर्थशक्तिमूलेऽस्या व्यापारः। सहकारिभेदाच्च शक्तिभेदः स्पष्ट एव। यथा तस्यैव शब्दस्य व्याप्तिस्मृत्यादिसहकृतस्य विवक्षावगतावनुमापकत्वव्यापारः; अक्षादिसहकृतस्य वा विकल्पकत्वव्यापारः। एवमभिहितान्वयवादिनामियदनपह्नवनीयम्।

योऽप्यन्विताभिधानवादी 'यत्परः शब्दःस शब्दार्थः' इति हृदये गृहीत्वा शरवदभिधाव्यापारमेव दीर्घदीर्घमिच्छति, तस्य यदि दीर्घो व्यापारस्तदेकोऽसाविति कुतः? भिन्नविषयत्वात्। अथानेकोऽसौ? तद्विषयसहकारिभेदादसजातीय एव युक्तः। सजातीये च कार्ये विरम्य व्यापारः शब्दकर्मबुद्ध्यादीनां पदार्थविद्भिर्निषिद्धः। असजातीये चास्मन्नय एव।

अथ योऽसौ चतुर्थकक्षानिविष्टोऽर्थः, स एव झटिति वाक्येनाभिधीयत इत्येवंविधं दीर्घदीर्घत्वं विवक्षितम्, तर्हि तत्र सङ्केताकरणात्कथं

साक्षात्प्रतिपत्तिः। निमित्तेषु सङ्केतः, नैमित्तिकस्त्वसावर्थस्संकेतानपेक्ष एवेति चेत्, पश्यत श्रोत्रियस्योक्तिकौशलम्। यो ह्यसौ पर्यन्तकक्षाभाग्यर्थः प्रथमं प्रतीतिपथमवतीर्णः तस्य पश्चात्तनाः पदार्थावगमाः निमित्ततां गच्छन्तीति नूनं मीमांसकस्य प्रपौत्रं प्रति नैमित्तिकत्वमभिमतम्।

अथोच्यते-पूर्वं तत्र सङ्केतग्रहणसंस्कृतस्य तथा प्रतिपत्तिर्भवतीत्यमुया वस्तुस्थित्या निमित्तत्वं पदार्थानाम्, तर्हि तदनुसरणोपयोगि न किञ्चिदप्युक्तं स्यात्। न चापि प्राक्पदार्थेषु सङ्केतग्रहणं वृत्तम्, अन्वितानामेव सर्वदा प्रयोगात्। आवापोद्वापाभ्यां तथाभाव इति चेत्, सङ्केतः पदार्थमात्र एवेत्यभ्युपगमे पाश्चात्यैव विशेषप्रतीतिः।

अथोच्यते – दृष्टैव झटिति तात्पर्यप्रतिपत्तिः, किमत्र कुर्म इति। तदिदं वयमपि न नाङ्गीकुर्मः। यद्वक्ष्यामः–

तद्वत्सचेतसां सोऽर्थो वाक्यार्थविमुखात्मनाम्।
बुद्धौ तत्त्वावभासिन्यां झटित्येवावभासते॥ इति।

किंतु सातिशयानुशीलनाभ्यासात्तत्र सम्भाव्यमानोऽपि क्रमः सजातीयतद्विकल्पपरम्परानुदयादभ्यस्तविषयव्याप्तिसमयस्मृतिक्रमवन्न संवेद्यत इति। निमित्तनैमित्तिकभावश्चावश्याश्रयणीयः, अन्यथा 'गौणलाक्षणिकयोर्मुख्याद् भेदः,' 'श्रुतिलिङ्गादिप्रमाणषट्कस्य पारदौर्बल्यम्' इत्यादिप्रक्रियाविघातः, निमित्ततावैचित्र्येणैवास्याः समर्थितत्वात्। निमित्ततावैचित्र्ये चाभ्युपगते किमपरमस्मास्वसूयया। येऽप्यविभक्तं स्फोटं वाक्यं तदर्थं चाहुः, तैरप्यविद्यापदपतितैः सर्वेयमनुसरणीया प्रक्रिया। तदुत्तीर्णत्वे तु सर्वं परमेश्वराद्वयं ब्रह्मेत्यस्मच्छास्त्रकारेण न न विदितं तत्त्वालोकग्रन्थं विरचयतेत्यास्ताम्।

यत्तु भट्टनायकेनोक्तम् - इह दृप्तसिंहादिपदप्रयोगे च धार्मिकपदप्रयोगे च भयानकरसावेशकृतैव निषेधावगतिः तदीयभीरुवीरत्वप्रकृतिनियमावगममन्तरेणैकान्ततो निषेधावगत्यभावादिति, तत्र केवलार्थसामर्थ्यं निषेधावगतेर्निमित्तमिति। तत्रोच्यते – केनोक्तमेतत् 'वक्तृप्रतिपत्तृविशेषावगमविरहेण शब्दगतध्वननव्यापारविरहेण च निषेधावगतिः' इति। प्रतिपत्तृप्रतिभासहकारित्वं ह्यस्माभिर्द्योतनस्य प्राणत्वेनोक्तम्। भयानकरसावेशश्च न निवार्यते, तस्य भयमात्रोत्पत्त्यभ्युपग-

मात् । प्रतिपत्तुश्च रसावेशो रसाभिव्यक्त्यैव । रसश्च व्यङ्ग्य एव । तस्य च शब्दवाच्यत्वं तेनापि नोपगतमिति व्यङ्ग्यत्वमेव । प्रतिपत्तुरपि रसावेशो न नियतः । न ह्यसौ नियमेन भीरुधार्मिकसब्रह्मचारी सहृदयः ।

अथ तद्विशेषोऽपि सहकारी कल्प्यते, तर्हि वक्तृप्रतिपत्तृप्रतिभा-प्राणितो ध्वननव्यापारः किं न सह्यते । किं च वस्तुध्वनिं दूषयता रस-ध्वनिस्तदनुग्राहकः समर्थ्यत इति सुष्ठुतरां ध्वनिध्वंसोऽयम् । यदाह – 'क्रोधोऽपि देवस्य वरेण तुल्यः' इति । अथ रसस्यैवेयता प्राधान्य-मुक्तम्; तत्को न सहते । अथ वस्तुमात्रध्वनेरेतदुदाहरणं न युक्तमित्यु-च्यते, तथापि काव्योदाहरणत्वात् द्वावप्यत्र ध्वनी स्तः, को दोषः ।

यदि तु रसानुवेधेन विना न तुष्यति, तद् भयानकरसानुवेधो नात्र सहृदयहृदयदर्पणमध्यास्ते, अपि तु उक्तनीत्या सम्भोगाभिलाषविभाव-सङ्केतस्थानोचितविशिष्टकाक्वाद्यनुभावशबलनोदितशृङ्गाररसानुवेधः । रसस्यालौकिकत्वात्तावन्मात्रादेव चानवगमात्प्रथमं निर्विवादसिद्ध-विविक्तविधिनिषेधप्रदर्शनाभिप्रायेण चैतद्वस्तुध्वनेरुदाहरणं दत्तम् ।

यस्तु ध्वनिव्याख्यानोद्यतस्तात्पर्यशक्तिमेव विवक्षासूचकत्वमेव वा ध्वननमवोचत्, स नास्माकं हृदयमावर्जयति । यदाहुः – 'भिन्नरुचिर्हि लोकः' इति । तदेतदग्रे यथायथं प्रतनिष्यामः इत्यास्तां तावत् । भ्रमेति । अतिसृष्टोऽसि, प्राप्तस्ते भ्रमणकालः । धार्मिकेति । कुसुमाद्युपकरणार्थं युक्तं ते भ्रमणम् । विस्रब्ध इति शङ्काकारणवैकल्यात् । स इति यस्ते भयप्रकम्पप्रामभङ्गलतिकामकृत । अद्येति । दिष्ट्या वर्धस इत्यर्थः । मारित इति पुनरस्यानुत्थानम् । तेनेति । यः पूर्वं कर्णाकर्णिकया त्वयाप्याकर्णितो गोदावरीकच्छगहने प्रतिवसतीति । पूर्वमेव हि तद्रक्षार्थं तत्तयोपश्राविः-तोऽसौ । स चाधुना तु दृप्तत्वात्ततो गहनान्निस्सरतीति प्रसिद्धगोदावरी-तीरपरिसरानुसरणमपि तावत्कथाशेषीभूतं का कथा तल्लतागहनप्रवेश-शङ्कयेति भावः ।

लोचन

" पण काय हो, लावण्य हे (शरीराहून) वेगळे म्हणून सुप्रसिद्ध आहे; हे निर्विवाद. पण ते (तुम्ही सांगत असलेले) 'प्रतीयमान' ही

काय चीज आहे, हेच (आधी) आम्हांला माहीत नाही, मग ते (वाच्यार्थाहून) वेगळे असल्याबद्दलची प्रसिद्धी (तर) दूरच ! म्हणून 'तसे (म्हणजे वाच्यार्थाहून निराळेपणाने) भासमान होणे' हा हेतू 'असिद्ध[२]' आहे" अशी (पूर्वपक्षाची) शंका लक्षात आणून (तिचे निरसन करण्याकरिता) 'कारण तो (प्रतीयमान) अर्थ ...' वगैरे शब्दांनी वृत्तिकार प्रथम त्याचे स्वरूप सांगतात आणि मग 'आणि त्या सर्व प्रकारांमध्ये '...इ. शब्दांनी तो (वाच्यार्थाहून) वेगळा म्हणून सर्वमान्य असल्याचे सिद्ध करतील.

आता 'प्रतीयमाना'चे आधी दोन प्रकार –लौकिक (म्हणजे काव्याखेरीज इतर व्यवहारात वापरला जाणारा) आणि केवळ काव्यव्यापाराचाच (म्हणजे व्यंजनेचाच) विषय असलेला. जो लौकिक असतो, तो काही काही वेळा आपल्या वाचक शब्दांनी वाच्य होऊ शकतो[३] आणि त्याचे विधी, निषेध इ. अनेक प्रकार असतात. त्याला 'वस्तु' हे नाव आहे. तो 'वस्तु' प्रकारही दोन प्रकारचा असतो : जो पूर्वी केव्हातरी ( म्हणजे जेव्हा केव्हा तो वाच्यावस्थेत होता, तेव्हा) 'उपमा' वगैरे स्वरूपाचा असल्यामुळे कोठल्या तरी वाक्याच्या अर्थाची शोभा वाढवीत होता, पण आता (व्यंग्यावस्थेत असताना) मात्र तो गौण (म्हणजे वाक्यार्थाला भूषविणारा) न राहिल्याने (म्हणजे स्वतःच प्रधान असल्याने) 'अलंकार' या स्वरूपाचा असतच नाही. पण पूर्वीची त्याची 'अलंकार' ही अवस्था लक्षात घेऊन 'ब्राह्मण-श्रमण'न्यायाने[४] त्याला 'अलंकारध्वनि' हे नाव दिले जाते. ज्या प्रकारामध्ये अलंकारस्वरूपी असणे हे वैशिष्टच केव्हाच असू शकत नाही, त्याला 'केवळ वस्तु' असे म्हणतात. कारण 'केवळ' या शब्दामुळे दुसऱ्या म्हणजे अलंकारस्वरूपी या प्रकाराचे निराकरण झाले.

पण 'रस' हा तिसरा प्रकार होय. तो स्वप्नातही (म्हणजे कधीही) आपल्या साक्षात् वाचक शब्दांनी म्हणजे 'शृंगार' इ. शब्दांनी 'वाच्य' असत नाही व लौकिक व्यवहारातही कधी अनुभवास येत नाही; पण विभावानुभाव[५] हे शब्दांच्या द्वारे सहृदयहृदयात संक्रान्त होतात आणि ते हृदय–संवादामुळे[६] रमणीय वाटतात. विभावानुभावांना उचित अशा रत्यादिवासना आपल्या अन्तःकरणात जन्मापासूनच असतात त्यांनी

(रत्यादिवासनांनी) रंगल्यामुळे सहृदयांच्या सुकुमार (म्हणजे रसचर्वणायोग्य)[७] झालेल्या मनाचा जो आनन्दमय चर्वणारूपी व्यापार, त्याने तो 'रस' आस्वादनयोग्य होतो. तो रस केवळ काव्यव्यापाराचाच (म्हणजे व्यंजनेचाच) विषय असतो. तो (प्रकार म्हणजे) 'रसध्वनि' होय आणि तो ध्वनिच (म्हणजे मुख्यतया व्यंग्यच) असतो, आणि (ध्वनीच्या तिन्ही प्रकारांत) तोच मुख्य असल्यामुळे तोच (काव्याचा) आत्मा होय.[८]

भट्टनायकाने म्हटले की, 'ध्वनि हा काव्याचा अंश असू शकेल, पण तो काव्याचे सारसर्वस्व असू शकणार नाही.'[९] या त्याच्या म्हणण्यामुळे ध्वनीच्या फारतर वस्तु आणि अलंकार या प्रकारांचीच नालस्ती होऊ शकेल (रसध्वनीची होऊ शकणार नाही). पण रसध्वनीचा तर त्याने स्वतःच 'आत्मा' म्हणून स्वीकार केला आहे! कारण तिसरा जो रसचर्वणारूपी अंश आहे, तो अभिधा आणि भावना या दोन अंशांहून श्रेष्ठ आहे, असा त्याचा निर्णय आहे. वस्तुध्वनि व अलंकारध्वनि हे शेवटी रसध्वनीतच विश्रांत होतात असे आम्ही स्वतःच पुढे ठिकठिकाणी[१०] सांगणार आहोत, तेव्हा सध्या इतकेच पुरे.

'वाच्यार्थाच्या सामर्थ्याने सुचविलेले' हे वस्तु, अलंकार व रसादि या तिन्ही प्रकारांना व्यापणारे सामान्य असे लक्षण (म्हणजे धर्म) आहे. कारण 'ध्वनन' (म्हणजे सुचविणे) हा व्यापार जरी शब्दाचाच असला, तरी त्याचे सहकारी असणारे वाच्यार्थाचे सामर्थ्य' हे सर्वत्र उपस्थित असल्यामुळे ध्वनीचे तिन्ही प्रकार वाच्यार्थाच्या सामर्थ्याने सुचविलेलेच असतात. शब्द–शक्तिमूल–अनुरणन–व्यङ्ग्य[११] प्रकारामध्येही वाच्य अर्थाच्या सामर्थ्यामुळेच प्रतीयमानाची प्रतीती होते, आणि शब्दशक्ती ही वाच्यार्थाच्या सामर्थ्याशी केवळ सहकार्य करणारी असते, हे आम्ही पुढे[१२] सांगणार आहोत.

'खूपच वेगळा'–विधि ('कर' या स्वरूपाचा) आणि निषेध ('करू नको' या स्वरूपाचा) हे (एकमेकांच्या) विरुद्ध असतात, याबद्दल कोणाचेही दुमत नाही. म्हणून (वृत्तिकार) प्रथम त्यांचेच (म्हणजे विधिनिषेधांचेच) उदाहरण देतात––

(हे धार्मिका! तू (खुशाल) निःशङ्कपणे हिंड. गोदावरीच्या

काठी वेलींच्या जाळीत राहणाऱ्या उन्मत्त सिंहाने तो कुतरडा आज मारून टाकला (आहे.)'

वरील वाक्य एका स्त्रीने आपल्या संकेत-स्थानाचे (म्हणजे प्रियकराला भेटण्याच्या ठरलेल्या ठिकाणाचे) रक्षण करण्यासाठी एका धार्मिकाला उद्देशून म्हटले आहे. ते स्थान तिला आपले जीवितसर्वस्व असल्यासारखे वाटते. तो धार्मिक तेथे वारंवार हिंडत असे, ती तिला अडचण वाटत आहे आणि तो तेथली पाने, फुले इत्यादी तोडीत असल्यामुळे त्या स्थानाची शोभा नष्ट होऊ लागली होती. तेही तिला नको आहे.'[3]

अशी परिस्थिती असताना त्या धार्मिकाचे तेथे हिंडणे नेहमीचेच असले, तरी त्या धार्मिकाला वाटणाऱ्या कुत्र्याच्या भयामुळे त्याच्या त्या हिंडण्यात अलीकडे खंड पडला होता. म्हणून या वाक्यातला 'हिंड' हा विधी, तो प्रतिबन्ध दूर झाला आहे असे सांगणारा आहे व म्हणून 'निषेधाचा अभाव' या स्वरूपाचा आहे. ती 'तू हिंडणे सुरू केलेच पाहिजेस' अशा स्वरूपाची आग्रहाची विनंती नाही, कारण 'हिंड' यामधील आज्ञार्थ हा 'अतिसर्ग' ('इच्छा असेल, तर वाटल्यास हिंड' असे सांगणे) किंवा 'प्राप्तकाल' ('आता हिंडण्यास अनुकूल वेळ प्राप्त झाली आहे' असे सांगणे) या अर्थाचा आहे. आता (भ्रमणाचा) भाव आणि (त्याचा) अभाव हे परस्पर-विरुद्ध असल्यामुळे ते दोन्ही एकाच वेळी 'वाच्य' असणे शक्य नाही. बरे, हे दोन अर्थ क्रमाने (म्हणजे प्रथम भावरूप व नंतर अभावरूप अशा तऱ्हेने) वाच्य म्हणावेत, तर तसेही शक्य नाही, कारण 'अभिधा' हा व्यापार (भावरूप अर्थ सांगून एकदा) थांबल्यावर (पुन: सुरू) होत नाही. (कारण) 'अभिधेची सर्व शक्ती विशेषणाचा (म्हणजे जाती, द्रव्य, गुण व क्रिया या धर्मांचा) बोध करून देण्यात खर्च झाल्यावर ती विशेष्याचा (म्हणजे त्या धर्मांचा आश्रय असलेल्या व्यक्तीचा) बोध करून देणार नाही' या उक्तीने अभिधाव्यापार थांबल्यावर पुन: चालू होणे अशक्य, असे सांगितले आहे.

(शंका-) पण काय हो बोलणाऱ्या स्त्रीच्या मनातील अंतिम अभिप्राय 'हिंड' असा नसून निषेध' (म्हणजे हिंडू नको) हा अर्थ प्रकट

करण्याचा आहे. या वाक्याची तात्पर्यशक्ती[१४] ही वाक्याच्या वाच्यार्थावरच थांबत नाही, कारण 'उन्मत्त', 'धार्मिक,' 'तो' इत्यादी पदांच्या अर्थांची, वाक्याच्या 'हिंड' या अर्थाशी संगती लागत नसल्याने[१५] मुख्यार्थाचा 'बाध' होतो. त्या 'बाधा'च्या सामर्थ्यामुळे अभिहितान्वयवाद्यांच्या म्हणजे भाट्ट मीमांसकांच्या दृष्टीने विरोध या सम्बन्धावर आधारलेल्या 'विपरीत' लक्षणेच्या द्वारा (अवान्तर) तात्पर्यशक्ती' ही शेवटी वाक्याचे अन्तिम तात्पर्य असलेल्या निषेधाचीच (म्हणजे 'हिंडू नको' या अर्थाचीच) प्रतीती करून देते. त्यामुळे त्या निषेधस्वरूपी अर्थाचे कारण (अभिधा, तात्पर्य व लक्षणा अशी त्रिविध) शब्दशक्ती हेच आहे. (व्यंजना नाही.) कारण 'याच्या म्हणण्याचे अंतिम उद्दिष्ट असे होते' असे म्हणण्याऐवजी 'हा असे असे म्हणाला' असे म्हणणे हा 'व्यवहार' (म्हणजे व्यवहारात बोलण्याचा प्रघात) आहे. ('याने ध्वनित केले' असे बोलण्याचा प्रघात नाही). म्हणून वाच्यार्थाहून निराळा असा दुसरा कोणताही अर्थ अस्तित्वात नाहीच![१६]

(उत्तर–) हे असे नाही. कारण या (म्हणजे शब्दांच्या) बाबतीत तीन व्यापार असल्याची जाणीव होते. प्रत्येक पदाचा जो सर्वसामान्य स्वरूपाचा[१७] अर्थ, त्याचा बोध करून देणारा तो 'अभिधाव्यापार'; कारण, शब्दाची संकेतावर[१८] अवलंबून असलेल्या अर्थाचा बोध करून देणारी शक्ती म्हणजे अभिधा होय. आणि संकेत हा केवळचाच अंशावर (म्हणजे 'जातीवरच' किंवा 'सामान्या' वरच) होतो,[१९] विशेष अंशावर (म्हणजे व्यक्तीवर) होत नाही. कारण (व्यक्तीवर होतो असे मानल्यास) आनन्त्य[२०] व व्यभिचार[२१] (हे दोष) उद्भवतात त्यानंतर 'विशिष्ट' म्हणजे परस्परसम्बद्ध स्वरूपाचा वाक्यार्थ हाच 'तात्पर्य' शक्तीचा विषय होय. कारण 'अन्यथा असिद्धी' मुळे[२२] 'सामान्ये' (म्हणजे जाती) ही विशेषांचा (म्हणजे व्यक्तींचा) बोध करून देतात, असा न्याय आहे

(आता) यातल्या दुसऱ्या (म्हणजे) तात्पर्यशक्तीच्या टप्प्यात 'हिंड' या विधीखेरीज म्हणजे भावरूप अर्थाखेरीज दुसरा अर्थ प्रतीत होत नाही, कारण त्या वेळी फक्त अन्वयच (म्हणजे शब्दांच्या सुट्या अर्थांचा परस्परसंबंधच) प्रत्ययाला येईल. 'गंगेवर गवळीवाडा

(आहे)', (तो) छोकरा सिंह आहे' या उदाहरणांत त्यांतील दोन पदांच्या अर्थांमध्ये 'योग्यता' नसल्याने त्यांचा अन्वय करू लागता-क्षणीच जसा त्या अन्वयाचा बाध होतो, तसा 'तुझ्या भ्रमणाला प्रतिबन्ध करणारा तो कुत्रा सिंहाने मारला, तेव्हा आता भ्रमणाला विरोध करणारे कारणच नाहीसे झाल्यामुळे तू हिंडायेस' या तऱ्हेच्या अन्वय लावण्यामध्ये कोणताही बाध येत नाही. म्हणनच येथे मुख्यार्थबाधाची शंका घेण्याजोगी नाही आणि म्हणून येथे विपरीत लक्षणेला अवसरच नाही.

किंवा ती (म्हणजे विपरीत लक्षणा) असेना का ! पण तरी-देखील ती दुसऱ्या टप्प्यात तर नक्कीच असू शकणार नाही. कारण जर मुख्यार्थाचा बाध झाला, तरच लक्षणेची कल्पना करण्याची आवश्यकता. आणि (मुख्यार्थाचा) बाध म्हणजे इतर शब्दांच्या अर्थांशी विरोधच होय. आता येथे (प्रस्तुत उदाहरणात) पदांच्या अर्थांचा स्वतःशीच तर काही विरोध (म्हणजे त्यांच्या स्वतःच्या बाबतीतच काही असंभव-नीयता)[२३] नाही. (मग) त्यांचा परस्परांशी विरोध आहे असे म्हणणे असेल, तर तो हा विरोध, अन्वय लावता लावताच लक्षात येतो, म्हणजे अन्वय होऊ शकत नाही. आणि आधी अन्वयाचे ज्ञान झाल्याखेरीज काही विरोध प्रत्ययाला येऊ शकत नाही; आणि अन्वयाचे ज्ञान तर काही अभिधाशक्तीने होत नाही. कारण ती अभिधाशक्ती पदांच्या अर्थांचा बोध करून देताच क्षीण होते. तिचा व्यापार (एकदा) थांब-ल्यावर पुन्हा चालू होत नाही.[२४] म्हणून अन्वयाचे ज्ञान हे तात्पर्य-शक्तीनेच होते.

**शंका**— पण काय हो, असे (म्हणजे आधी अन्वय प्रत्ययाला येतो व मग विरोध प्रत्ययाला येतो, असे) मानले, तर '(माझ्या) बोटावर शंभर मोठेमोठे हत्ती आहेत'* या वाक्यातही अन्वयाची प्रतीति होते असे म्हणावे लागेल, नाही का ?

उत्तर— 'दहा डाळिंबे, सहा वडे[२५] (एक कुण्ड, बकऱ्याचे कातडे) ... इ. वाक्यांतील शब्दांचा परस्परांशी संबंध नसल्याने तेथे अन्वयाची प्रतीती होत नसेल, पण म्हणून येथेही (म्हणजे 'माझ्या' बोटावर ...

'* हे वाक्य जयंतभट्टाच्या 'न्यायमंजरी' मध्येही (पृ. ९ वर) उद्धृत केले आहे.

इ. वाक्यातही) ती होत नाही का ? (अर्थात होतेच) पण तो अन्वय प्रतीत झाला, तरी तो प्रत्यक्ष वगैरे दुसऱ्या प्रमाणांनी बाधित होतो, जसा शिंपल्यात चांदीचा आधी भास होतो, पण नंतर तो प्रत्यक्षादि प्रमाणांनी बाधित होतो, तसाच. म्हणून अशा अन्वयाची प्रतीती करून देणारे वाक्य अप्रमाण ठरते. (पण) 'माणवक हा सिंह आहे' या वाक्यात दुसऱ्या टप्प्यात कार्य करणारी तात्पर्यशक्ती अन्वयाची प्रतीती करून देते. मग त्या अन्वयाची बाधक प्रत्यक्षादी प्रमाणे ध्यानात आल्यावर अभिधा व तात्पर्य या दोन्ही शक्तीहून निराळी, त्या बाधक प्रमाणाचा विरोध दूर करण्यात प्रवीण असलेली 'लक्षणा' नावाची तिसरी शक्ती कार्य करण्यास प्रवृत्त होते.

शंका— 'पण काय हो, असे (म्हणजे लक्षणेमुळे विरोधाचे निरसन होणे, असे) असल्यास '(तो) छोकरा सिंह आहे' या वाक्यालाही काव्यत्व आहे असे म्हणावे लागेल, कारण तुम्ही पुढे स्पष्ट करून सांगणार असलेला 'ध्वनन' (म्हणजे व्यंग्यार्थ) या स्वरूपाचा आत्मा येथेही आहे !'

उत्तर— मग अशा रीतीने (म्हणजे तुमच्या युक्तिवादाचा अवलंब केल्यास) 'घटातही जिवंतपणा आहे' असा व्यवहार होऊ लागेल. कारण आत्मा हा सर्वव्यापी असल्याने त्याचे घटातही अस्तित्व असतेच !' यावर तुम्ही म्हणाल की, "वाटेल त्या पदार्थाच्या बाबतीत 'यात जिवंतपणा आहे' असा व्यवहार होत नाही, तर (आत्म्याच्या आविष्काराला योग्य अशा) इन्द्रिये, करचरणादि अवयव इत्यादी विशिष्ट आश्रयांनी युक्त असलेल्या शरीराच्या बाबतीतच (त्यात आत्मा असताना) 'यात जिवंतपणा आहे' असा व्यवहार होतो", तर याला आमचेही उत्तर अगदी तुमच्यासारखेच आहे की, 'गुण व अलंकार (यांच्या वर्ण्यविषयाशी असणाऱ्या) औचित्यामुळे सुंदर असणाऱ्या शब्दार्थरूपी शरीराच्या बाबतीतच 'ध्वनन' नावाचा आत्मा असताना 'यात काव्य आहे' असा व्यवहार होतो आणि (इन्द्रियादिसामग्रीविरहित) घटामध्ये आत्म्याचे अस्तित्व असूनही 'तो घट निर्जीव आहे' असे म्हणण्यामुळे आत्म्याला जसा कोणताही कमीपणा प्राप्त होत नाही, त्याप्रमाणे ध्वननस्वरूपाचा आत्मा

('माणवक सिंह आहे' यासारख्या) लौकिक वाक्यात असूनही तेथे गुणालंकारादी सामग्री नसल्यामुळे 'यात काव्यत्व नाही' असे म्हणण्या-मुळे त्या ध्वननस्वरूपी आत्म्यालाही कसलाही कमीपणा प्राप्त होत नाही.

आणि असे असले (म्हणजे प्रयोजनमूलक लक्षणेमध्येही व्यंग्यार्थाची प्रतीती होत असली) तरी 'भक्ती' (म्हणजे लक्षणा) हाच 'ध्वनी' (म्हणजे व्यंजना) नव्हे, कारण भक्ती म्हणजे लक्षणाव्यापार हा तिसऱ्या टप्प्यात प्रविष्ट होणारा आहे. पण ध्वननव्यापार हा चौथ्या टप्प्यात प्रवृत्त होतो. कारण, (मुख्यार्थ-बाधा, निमित्त म्हणजे सामीप्यादी सम्बन्ध आणि प्रयोजन या) तिघांच्या सान्निध्यातच लक्षणा प्रवृत्त होते, असे तर आपणच[26] म्हणता! त्या तिघांपैकी मुख्यार्थ-बाधा तर प्रत्यक्ष वगैरे दुसऱ्या प्रमाणांमुळे कळते. आणि सामीप्य वगैरे – ज्याला 'निमित्त' असे म्हणतात – तेही दुसऱ्या प्रमाणाने ज्ञात होणारेच आहे.

परंतु गवळीवाड्याच्या ठिकाणी अतिपवित्रत्व, अति शीतलत्व, निवासास विशेष सुखावह असणे वगैरे किंवा छोकऱ्याच्या ठिकाणी कमालीचा पराक्रमीपणा (आहे असे ऐकणाराच्या प्रत्ययास आणून देणे) हे जे 'प्रयोजन[27] आहे, ते कोणत्याही शब्दाने 'वाच्य' झालेले नाही, किंवा ते प्रत्यक्ष वगैरे दुसऱ्या कोणत्याही प्रमाणाने ज्ञात होण्यासारखेही नाही. त्या प्रयोजनाचा बोध करून देण्यामध्ये शब्दाचे सामर्थ्य नाही, असे तर नाहीच. कारण 'त्याच्या (म्हणजे उदा. गंगेच्या) सामीप्यामुळे त्याच्या (म्हणजे गवळीवाड्याच्या) ठिकाणी त्या गंगेचे धर्म (अति-पवित्रत्व इ.) आहेत. हे अनुमान 'अनैकान्तिक'[29] (या हेत्वाभासाने युक्त) आहे आणि 'सिंह' शब्दाने वाच्य होणे हे छोकऱ्याचे ठिकाणी 'असिद्ध'[30] आहे. आता जेथे जेथे असा (म्हणजे 'हा छोकरा सिंह आहे' असा) (लाक्षणिक) शब्दप्रयोग असतो, तेथे तेथे सिंह वगैरेंच्या (पराक्रमशालित्व इ.) धर्मांचा (छोकरा इत्यादिकांशी) संबंध असतो' असे 'अनुमान' करावे म्हणाल, तर त्या अनुमानाच्या बाबतीत व्याप्तीचे ज्ञान होण्याचे वेळी[31] त्या व्याप्तीला आधारभूत असणारे दुसरे प्रत्यक्षादी प्रबल प्रमाण सांगता आले पाहिजे. आणि ते तर प्रस्तुत ठिकाणी नाही!

आणि ही[३२] 'स्मृती' नव्हे. कारण ज्याचा (म्हणजे गवळीवाड्याचे ठिकाणी गंगाप्रवाहाचे अतिशीतलत्व इ. धर्म आहेत असे वक्त्याला म्हणावयाचे आहे याचा) अनुभव घेतलेला नाही,[३३] त्याची स्मृती होणे अशक्य असते. आणखी असे की, तसा एखादा नियम[३४] प्रतीत होत नसल्याने वक्त्याला अमुक एका ठिकाणी अमुक एक धर्मच अभिप्रेत आहे असा निश्चय करता येणे अशक्य होईल. म्हणून (म्हणजे हे ज्ञान अनुमितिरूप किंवा स्मृतिरूप नसल्याने) शब्दाच्या सामर्थ्यानेच होते, हे निर्विवाद. आणि हे सामर्थ्य 'अभिधा' स्वरूपाचे नाही[३५], कारण गंगा वगैरे शब्दांचा अतिपवित्रत्व इ. अर्थावर संकेत झालेला नसतो. ते सामर्थ्य 'तात्पर्य' या स्वरूपाचे नाही, कारण तो तात्पर्यरूपी व्यापार अन्वयाची प्रतीती होताच क्षीण होऊन जातो. आणि ते सामर्थ्य 'लक्षणा' स्वरूपाचेही नाही. कारण पूर्वी सांगितलेल्याच[३६] कारणामुळे (म्हणजे) 'गंगा' याच शब्दाचे ठिकाणी प्रयोजनाचे ज्ञान करून देण्याचे सामर्थ्य असल्यामुळे त्या (उदा. 'गङ्गा' या) शब्दाची गती (म्हणजे सामर्थ्य) त्या म्हणजे प्रयोजन या अर्थाचे ज्ञान करून देण्याच्या बाबतीत) खुंटणारी नाही.[३७] आता त्या (म्हणजे प्रयोजन या) अर्थाचा बोध करून देतानाही (गंगा या शब्दाचे) सामर्थ्य खुंटले व त्यामुळे द्वितीय लक्षणा मानणे अपरिहार्य ठरेल असे जर लक्षणावादी म्हणेल, तर त्या 'प्रयोजन' या (लक्षणावाद्यांच्या मते 'लक्ष्य' असलेल्या) अर्थाचा बोध होण्यासाठी पुनः मुख्यार्थबाध, निमित्त म्हणजे संबंध व प्रयोजन (हे त्रय मानावे लागेल) आणि अशा तऱ्हेने अनवस्थाप्रसंग[३८] ओढवेल म्हणूनच (म्हणजे इतक्या अडचणी असल्यामुळे) कोणीतरी याला लक्षित-लक्षणा[३९] (एकदा लक्षित झाल्यावर पुनः लक्षणा, म्हणजे द्वितीय लक्षणा) असे नाव दिले, तो त्याचा निव्वळ सोस, दुराग्रह आहे. म्हणून अभिधा, तात्पर्य किंवा लक्षणा यांहून निराळा असा तो ध्वनन, द्योतन, व्यञ्जन, प्रत्यायन, अवगमन वगैरे समानार्थक नावे असलेला चौथा व्यापार (म्हणजे सामर्थ्य) स्वीकारला पाहिजे; कारण, (कारिकाकार) पुढे[४०] सांगणारच आहेत की—

मुख्य व्यापार (म्हणजे अभिधाव्यापार) बाजूला सारून गुण-वृत्तीने (लक्षणेने) लक्ष्य अर्थाचा बोध करून देण्याचे काम ज्या

फलाची (म्हणजे प्रयोजनाची) प्रतीती करून देण्याच्या उद्देशाने केले जाते, त्या (फलाचा बोध करून देण्याचे) कामी त्या शब्दाची गति (म्हणजे सामर्थ्य) मुळीच खुंटत नाही.

म्हणून संकेताच्या साहाय्याने वाच्यार्थाचा बोध करून देणारी शक्ती म्हणजे अभिधाशक्ती होय. अन्य तऱ्हेने (म्हणजे अन्वित, परस्पर-संबद्ध अशा 'विशेष' स्वरूपाचा) वाक्यार्थ (समग्र वाक्याचा अर्थ) निष्पन्न होणार नसला, तर सामान्य स्वरूपाच्या अर्थावरून ऐकणाराच्या-कडून विशिष्ट क्रिया कशी घडते याची उपपत्ती लावता येत नाही. अशा तऱ्हेने उपपत्ती लागत नसल्यामुळे विशेष (म्हणजे अन्वित, एकमुखी) अर्थाचा बोध करून देणारी शक्ती, ती 'तात्पर्यशक्ती' होय. मुख्यार्थ-बाध वगैरे तीन सहकारी कारणांमुळेच (लक्ष्य) अर्थाचा बोध करून देणारी शक्ती म्हणजे लक्षणाशक्ती. ह्या तीन शक्तींनी ज्ञात करून दिलेल्या (वाच्य, तात्पर्य व लक्ष्य या तीन) अर्थांच्या ज्ञानामुळे उत्पन्न झालेल्या त्या तीन अर्थांच्या प्रकाशामुळे[४१] संस्कारित झालेल्या अशा, सहृदयाच्या प्रतिभेच्या साहाय्याने (वरील तीन अर्थांहून निराळ्या, चौथ्या) अर्थाचे द्योतन (म्हणजे प्रकाशन) करणारी शक्ती म्हणजे ध्वननव्यापार होय आणि तो (ध्वननव्यापार) पूर्वी आपापले कार्य केलेल्या तीनही व्यापारांवर मात करून स्वतःकडे प्राधान्य घेतो व स्वतः काव्याचा आत्मा होतो, या अभिप्रायाने, तसेच लताकुंजाचे (संकेतस्थानाचे) रक्षण व्हावे हे प्रयोजन देखील निषेधाच्या द्वारेच साध्य होणारे आहे, म्हणून (संकेतस्थानाचे रक्षण हे) प्रयोजन सुचविणाऱ्या ध्वननव्यापाराचा विषयही निषेध हा आहे, ...असे[४२] वृत्तिकारांनी म्हटले. आणि हे (सर्व) आम्ही येथे लक्षणा आहे असे मानूनच केवळ म्हटले. (पण) वस्तुतः येथे लक्षणा नाही, कारण असे की, वाच्यार्थाचा अत्यन्त तिरस्कार किंवा त्याचे दुसऱ्या अर्थात संक्रमण[४३] होणे (यांपैकी काहीच) प्रस्तुत उदाहरणात नाही. (शिवाय) अर्थशक्तिमूल[४४] ध्वनीच्या बाबतीत लक्षणेचा व्यापार केव्हाही नसतो. आणि लक्षणा व व्यंजना यांची सहकारी[४५] कारणे निरनिराळी असल्यामुळे हे व्यापारही एक-मेकांहून निरनिराळेच आहेत ही गोष्ट स्पष्टच आहे. ज्याप्रमाणे त्याच म्हणजे उच्चारलेल्या शब्दाला व्याप्ति स्मरण[४६] वगैरे कारणे सहकारी

देत असताना ' वक्त्याला हा शब्द बोलण्याची (आणि त्याद्वारे काहीतरी अर्थ प्रकट करण्याची) इच्छा होती'[४७] हे ज्ञान श्रोत्याला करून देण्यात त्याच शब्दाचा अनुमापकत्व[४८] हा व्यापार असतो, किंवा इंद्रिये[४९] वगैरे[५०] त्या शब्दाची सहकारी असताना त्याच शब्दाचा ' विकल्पकत्व ' (म्हणजे सविकल्पक[५१] ज्ञान करून देणे) हा व्यापार असतो, त्याप्रमाणे (सहकारी कारणे वेगळी असल्याने लक्षणा व व्यञ्जना हे व्यापार वेगवेगळे आहेत हे स्पष्ट आहे.). अशा रीतीने अभिहितान्वयवाद्यांनी[५२] तरी हे (म्हणजे व्यञ्जनाव्यापाराचे अस्तित्व) नाकारणे शक्य नाही.

आणि अन्विताभिधानवादी,[५३] ' शब्दापासून जे जे अर्थ ध्यानात येतात ते सर्व शब्दाचे (वाच्य) अर्थच होत ' असा आपल्या मनाचा ग्रह करून घेऊन शब्दाचा ' अभिधा ' व्यापार धनुर्धाऱ्याने सोडलेल्या बाणाप्रमाणे लांब लांब होत जातो (व त्या अभिधाव्यापारानेच शब्दाच्या सर्व अर्थांचे ज्ञान होते.) असे मत मांडू इच्छितो त्याला इष्ट असलेला व्यापार जर लांबत लांबत जाणारा असला, तर तो व्यापार एकच असतो हे कसे काय ? कारण त्या व्यापाराचे विषय[५४] वेगवेगळे आहेत ! आणि जर तो व्यापार (एकजिनसी नसून) अनेकविध असला, तर त्याचे विषय व त्याची सहकारी कारणेही[५५] भिन्न भिन्न असल्याने त्या अनेकविध व्यापाराला एकच न मानता अनेकच मानणे योग्य होय. तथापि, तो अनेकविध व्यापार ' अनेक ' न समजता एकच मानला, तर त्या व्यापाराचे कार्य आधी वाच्यार्थज्ञान मग तात्पर्यार्थज्ञान अशा तऱ्हेने थांबून थांबून होते असे म्हणावे लागेल, व हे तर शब्द व अर्थ यांच्या जाणकारांना[५६] मुळीच मान्य नाही ! कारण ते ' शब्द, बुद्धी आणि कर्म यांचे कार्य थांबून थांबून होत नाही ' असे मानतात.[५७] आणि जर तो लांबत लांबत जाणारा व्यापार अनेकांचा समूह आहे असे मानले, तर त्यामुळे आमचाच–म्हणजे व्यंजना हा व्यापार वेगळा आहे हाच–सिद्धान्त बळकट होतो.

आता ' शब्दाचा अभिधाव्यापार लांबत लांबत जातो ' असे म्हणण्यामागचा (तुमचा) अभिप्राय[५८] जर असा असेल की, चौथ्या टप्प्यात ज्या अर्थाचा बोध होतो, तोच संपूर्ण वाक्याने अभिधाद्वारा अतिशय लवकर सांगितला जातो, तर त्यावर आमचा प्रश्न असा की,

त्या अर्थावर संकेत केलेला नसताना त्याचा साक्षात् म्हणजे अभिधेने बोध कसा होऊ शकतो ? यावर तुम्ही कदाचित असे म्हणाल की, संकेत हा निमित्तांवर[५९] होतो, आणि तो अर्थ 'नैमित्तिक'[६०] असल्यामुळे तो 'संकेता'वर अवलंबून नसतो.

तर या मीमांसकाच्या बोलण्यातील कौशल्य तर बघा[६१] ! ते तुमचे कौशल्य असे आहे :– तुम्ही म्हणता की, तो चौथ्या टप्प्यात असणारा अर्थ पहिल्याने प्रतीत होतो आणि त्याच्यानंतर प्रतीत होणारे पदांचे अर्थ या, पहिल्याने प्रतीत होणाऱ्या, अर्थाला निमित्तभूत असतात, म्हणजे खरोखर मीमांसकाचा पणतू हा झाला 'निमित्त' आणि स्वत: मीमांसक झाला 'नैमित्तिक', म्हणजे मीमांसक आपल्या पणतवंडापासून उत्पन्न होतो, असे झाले !

यावरही तुम्ही म्हणाल– 'पदांच्या अर्थांवर संकेतग्रहण पूर्वीच (म्हणजे प्रस्तुत वाक्य ऐकण्यापूर्वी, अगदी पहिल्याने पदांचे अर्थ माहीत झाले त्या वेळी) होऊन गेलेले असते. या संकेतग्रहणाचा संस्कार आधीच झालेला असल्यामुळे प्रस्तुत वाक्यापासून शेवटचा अभिप्रेत अर्थ प्रतीत होतो अशी वस्तुस्थिती असल्यामुळे पदार्थ हे वाक्याच्या अंतिम अर्थाचे निमित्त असतात' (असे जर तुमचे म्हणणे असेल), तर मग अंतिम अर्थाच्या प्रतीतीला कारण होणारे काहीही आपण सांगितलेच नाही, असे होईल.[६२] शिवाय असे की, तुमच्या मताप्रमाणे पदार्थांवर आधी संकेतग्रहणही झालेले नसते, कारण तुम्ही म्हणता की, अन्वित (म्हणजे संबद्ध अर्थाचा बोध करून देणारी) पदेच व्यवहारात नेहमी वापरली जातात.[६३] (आता) आवाप व उद्वाप[६४] केल्यामुळेच पदार्थांवर वेगवेगळेपणाने संकेतग्रहण होते असे म्हणणे असेल, तर संकेतग्रहण हे पदांच्या केवळ सामान्य, सुट्या अर्थांवरच होते असे तुम्ही स्वीकारले असे होऊन मग विशेष अर्थ मागाहूनच प्रतीत होणार असे तुम्हांला मानावे लागेल. (म्हणजे विशेष, संबद्ध अर्थ तात्पर्य वृत्तीने कळतो असे काहीतरी आपल्याला मानावे लागेल व मग आपला 'अन्विताभिधानवाद' आपणांस सोडून द्यावा लागेल !)

यावर आपण म्हणाल की (पदार्थ व अंतिम अर्थ यांमध्ये निमित्त व नैमित्तिक असा संबंध होत असेल, नाहीतर नसेलही, पण) शेवटचा

तात्पर्यार्थ (वाक्य एकवाक्यता) ताबडतोब कळतो असा आमचा अनुभव आहे या गोष्टीला आम्ही काय करणार ? (म्हणजे असा अनुभव येत असूनही तो येत नाही असे आम्ही कसे म्हणणार ?), तर हा अनुभव आम्हीही मान्य करीत नाही असे नाही; कारण आम्ही पुढे[६५] म्हणणारच आहोत की....

'त्याप्रमाणे केवळ वाच्यार्थानेच समाधान न झाल्याने वाच्यार्थाकडे पाठ फिरविणाऱ्या व सारभूत अर्थाचाच वेध घेणाऱ्या सहृदयांच्या अंत:करणात तो (व्यंग्य) अर्थ तत्क्षणीच प्रकाशित होतो.'

परन्तु त्या ठिकाणी वाक्याचा वाच्यार्थ व त्यातून प्रतीत होणारा व्यङ्ग्यार्थ यांमध्ये एक आधी व दुसरा मागून असा क्रम असला, तरीही तो क्रम सहृदयांच्या ध्यानात येत नाही. याचे कारण असे की, काव्य व त्याचा अर्थ यासंबंधी अतिशय आस्थापूर्वक विचार करण्याची सहृदयांना सवय झालेली असते व त्यामुळे अंतिम व्यङ्ग्यार्थाची प्रतीति होतेवेळी तिला कारणीभूत असणारी सुट्या शब्दांच्या अर्थांची ज्ञाने सहृदयांच्या मनापुढे स्वतंत्रपणे उभी राहात नाहीत. म्हणून अनुमानात ज्याप्रमाणे व्याप्तिस्मृती[६६] व अनुमिती यांचा व शाब्दबोधात ज्याप्रमाणे शब्दश्रवण व संकेतस्मृती यांचा क्रम सवयीमुळे लक्षात येत नाही, त्याप्रमाणेच वाच्यार्थ व व्यङ्ग्यार्थ यांचा क्रमही संभवत असला तरी त्याची जाणीव होत नाही, अशी परिस्थिती आहे. मात्र त्यांमध्ये कारण–कार्य संबंध मानणे भागच आहे, नाहीतर गौण व लाक्षणिक[६७] अर्थ हे मुख्यार्थाहून वेगळे असतात, तसेच 'श्रुति, लिङ्ग, वाक्य, प्रकरण, स्थान व समाख्या या प्रमाणांपैकी नंतरनंतरचे प्रमाण आधी–आधीच्याहून कमजोर असते'[६८] वगैरे (मीमांसकांच्याच) भूमिका कोसळतील; कारण, कार्य–कारणभाव वेगवेगळे असण्यावरच तर त्यांचे हे सिद्धांत उभे आहेत ![६९] आणि एकदा कार्यकारण-भावाचे वेगळेपण मान्य केल्यावर केवळ व्यञ्जनाव्यापार वेगळा न मानण्यामध्ये तुमच्या मनात आमच्याबद्दल मत्सरच आहे, दुसरे काय ?

आता संपूर्ण वाक्य, त्याच्या द्वारा प्रकाशित होणारा वाक्यस्फोटामुळे लक्षात येणारा संपूर्ण वाक्याचा अर्थ, हे सर्व अखंड (म्हणजे अविभाज्य) आहे असे जे (वैयाकरण व वेदान्ती) मानतात,[७०] त्यांना

देखील अविद्येच्या म्हणजे व्यावहारिक पातळीवर आल्यानंतर आमची प्रक्रिया मानलीच पाहिजे.[71] पण ती व्यावहारिक (द्वैताधिष्ठित) पातळी ओलांडून वरच्या पारमार्थिक पातळीवर गेल्यानंतर सर्वत्र एकच एक, परमेश्वराहून भिन्न नसणारे ब्रह्म आहे ही गोष्ट 'तत्त्वालोक'[72] हा ग्रंथ लिहिणाऱ्या आमच्या (ध्वनि) शास्त्रकारांना माहीत नव्हती, असे नाही. असो, हा विषय आता पुरे झाला.

पण आता भट्टनायकाचे म्हणणे असे :- या (हे धार्मिका ! इ. ) उदाहरणात खवळलेला सिंह वगैरे आणि धार्मिक वगैरे शब्दांचा उपयोग केला असल्यामुळे (धार्मिक व वाचक यांना) भयानक रसाने ग्रस्त झाल्यामुळेच निषेध (म्हणजे 'हिंडू नको' हा अर्थ) प्रतीत होतो, कारण धार्मिकाचा स्वभाव भित्राच आहे व सिंहाच्या ठिकाणी क्रूर वृत्तीच आहे याचे हटकून ज्ञान झाल्याशिवाय निषेधाचे ज्ञान होईलच असे नाही. म्हणून निषेधाच्या प्रतीतीचे कारण वाच्य अर्थाचे सामर्थ्य हे एकटेच नाही.[73]

यावर आम्हाला असे म्हणावयाचे आहे—बोलणारी व्यक्ती संकेत-स्थानाचे रक्षण करू इच्छिणारी स्त्री आहे व ऐकणारी व्यक्ती भित्रा धार्मिक आहे ही अनुक्रमे बोलणारा व ऐकणारा यांची वैशिष्ट्ये समजल्या-शिवाय आणि शब्दाच्या ठिकाणच्या ध्वननव्यापाराशिवायच या उदाहर-णात निषेधाचा बोध होतो, असे तुम्हाला कोणी सांगितले ? श्रोत्याच्या आणि वाचकाच्या प्रतिभेचे सहकार्य हा व्यञ्जनेचा प्राण आहे असेच तर आम्ही पूर्वी[74] म्हटले आहे आणि वाचकाला होणारी भयानक रसाची प्रतीतीही आम्हाला नाकारायची नाही, कारण ती प्रतीती ( वाचकाच्या मनातील सुप्त असलेल्या ) 'भय ' या स्थायीभावाच्या जागृतीमुळेच उत्पन्न होते, हे आम्हाला मान्य आहे. आणि वाचकाच्या मनात रसप्रतीती होते, ती रसाच्या केवळ अभिव्यक्तीमुळेच ( म्हणजे व्यंजनेमुळेच) आणि रस तर व्यंग्यच असतो ! शिवाय असे की, रसाचे शब्दाने 'वाच्य' असणे हे तर खुद्द भट्टनायकालाही मान्य नाही, म्हणजे शेवटी रस हा व्यंग्यच होय. आणि वाचकालासुद्धा या भयानक रसाची प्रतीती हटकून होईलच असे नाही. शिवाय वाचक हाही काही नेहमी भिड्या धार्मिकाशी समरस होणाराच असेल, असा नियम नाही.

यावर तुम्ही भिल्या धार्मिकाशी समरस होणाऱ्या विशिष्ट स्वभावाचा वाचक हे ( भयानक रसाच्या प्रतीतीला ) सहकारी कारण म्हणून कल्पीत असाल, तर ( इतकी कल्पना करीत बसण्यापेक्षा ) वक्ता आणि सहृदय यांच्या प्रतिभेमुळे सजीव होऊन कार्य करू लागणारा व्यञ्जनाव्यापारच तुम्ही का स्वीकारीत नाही ?[७५] आणखी मौज अशी की, वस्तुध्वनीचे खंडन करू पाहावयाचे व ते करण्यासाठी त्या वस्तुध्वनीला उपकारक असलेल्या रसध्वनीचे समर्थन करावयाचे, ही तुमची ध्वनीच्या खंडनाची रीत अगदी खाशी आहे ! म्हटले आहे ना की, महात्म्यांचा रागदेखील वरासारखा असतो ![७६]

आता (तुमच्या) या सगळ्या म्हणण्याचा उद्देश जर (या उदाहरणात) रसाचेच प्राधान्य आहे असे प्रतिपादन करणे हा असेल, तर ते कोणास मान्य होणार नाही ? (ते मान्य करण्यास आमचीही हरकत नाही.) आणि हे उदाहरण केवळ वस्तुध्वनीचेच मानणे योग्य नाही (म्हणजे हे... रसध्वनीचेही उदाहरण आहे) असे तुमचे म्हणणे असेल,[७७] तरी देखील हे उदाहरण काव्यवाङ्मयातून उद्धृत केले केले असल्याने दोन्ही प्रकारचे ध्वनि (म्हणजे वस्तुध्वनी व रसध्वनी) यात आहेत, यात काय दोष आहे ?

मात्र हे उदाहरण रसयुक्त मानल्याशिवाय तुमचे जर समाधान होणार नसेल, तर यात भयानक रसाचेच अस्तित्व आहे हे मात्र सहृदयांच्या हृदयास मान्य होणारे नाही, परंतु वर सांगितलेल्या[७८] रीतीने यात 'अभिलाषशृंगार' रसच आहे, संभोगाचा अभिलाष म्हणजेच 'अभिलाषरती' हा स्थायीभाव, त्याचा संकेतस्थान हा (उद्दीपन) विभाव, त्या स्थायीभावाला उचित असे विशिष्ट 'काकु'[७९] वगैरे अनुभाव, यांच्या मिलाफाने येथे अभिलाष शृंगाररसच अभिव्यक्त होत आहे. पण रस हा अलौकिक (म्हणजे वास्तव जीवनात येणाऱ्या अनुभवाहून निराळा) आहे आणि त्याचे केवळ उदाहरण दिल्याने रसाचे स्वरूप रसिकाच्या बुद्धीस प्रतीत होणारे नाही, म्हणून सुरुवातीला निर्विवादपणे वेगळे म्हणून सर्वांना परिचित असलेल्या विधी आणि निषेध या रूपाने प्रकट होणाऱ्या वस्तुध्वनीचे हे उदाहरण दिले आहे.

मात्र ध्वनीची व्याख्या करावयास उद्युक्त झालेल्या ज्याने

तात्पर्यशक्तीलाच किंवा 'वक्त्याची असे सांगण्याची इच्छा असली पाहिजे' हे अनुमानाने सुचविण्याच्या क्रियेलाच 'ध्वनी' म्हटले,[६०] त्याच्या म्हणण्याकडे आमचे लक्ष मुळीच आकृष्ट होत नाही. म्हटले आहे की, 'लोकांच्या आवडी निरनिराळ्या असतात!'[६१] पण त्यांचा आम्ही पुढे[६२] योग्य त्या रीतीने सविस्तर परामर्श घेणार आहोत. म्हणून सध्या इतकेच पुरे.

'हिंड' म्हणजे तुझी इच्छा असेल, तर माझी परवानगी आहे, तुझ्या हिंडण्यास अनुकूल वेळ आता प्राप्त झाली आहे. 'धार्मिका'!— म्हणजे तू धार्मिक असल्यामुळे फुले वगैरे सामग्री गोळा करण्यासाठी तुझे हिंडणे योग्यच आहे. 'निःशंकपणे' किंवा 'विश्वस्तपणे' म्हणण्याचे कारण (तुला वाटत असलेल्या) भीतीचे निमित्त (असलेला कुत्रा) नष्ट झाले आहे, हे होय. 'तो' म्हणजे जो (कुत्रा) तुझ्या कृश शरीराला भयाने कापरे भरवीत असे, तो. 'आज' हा शब्द, पूर्वी दैव तुला प्रतिकूल होते, पण आता (कुत्रा मेल्यामुळे) तुझे नशीब जोरावर आहे' असा आशय प्रकाशित करतो. 'मारून टाकला आहे' म्हणजे तो पुनः उठणे शक्य नाही. 'त्याने' म्हणजे जो गोदावरी तीरावरील जाळी-मध्ये राहतो हे कर्णोपकर्णी तुझ्याही कानी आले असेल. त्या कामिनीने हा सिंह (जाळीमध्ये) राहत असल्याचा वृत्तान्त संकेतस्थानाच्या रक्षणा-साठी (आपल्या मैत्रिणीच्या द्वारा) त्या धार्मिकाला पूर्वीच ऐकविला होता. पण आता तो सिंह दृप्त म्हणजे उन्मत्त होऊन त्या जाळीतून बाहेर पडू लागला आहे. अशा रीतीने गोदावरी काठच्या परिसराकडे तुझ्या रिवाजानुसार जाणेदेखील आता इतिहासजमा झाले आहे— मग तीरावरील वेलींच्या त्या विशिष्ट कुंजात प्रवेश करण्याची गोष्ट तर दूरच, हा भावार्थ.

टीपा

१. पृ. ८ वरील ३ री टीप पाहा.

२. पृ. ६९ वरील २ री टीप पाहा— 'प्रतीयमान हा वाच्याहून वेगळेपणाने भासमान होतो म्हणून तो असला पाहिजे' यात 'वेगळेपणाने भासमान होणे' हा हेतू सांगण्यात आला. हा 'असिद्ध' हेतूचा दुसरा (आश्रयासिद्ध) नावाचा प्रकार होय. 'वेगळेपणाने भासमान होणे' हा 'धर्म' आहे. तो ज्याच्या आश्रयाने

राहावयाचा, तो (म्हणजे प्रतीयमानच) आम्हांला माहीत नाही. अशा रीतीने जर आश्रयच असिद्ध, मग त्यावर राहणारा धर्म-- वेगळेपणाने भासमान होणे — हा हेतूही 'असिद्ध' होय.

३. काही काही वेळा वाच्य होऊ शकतो, म्हणणे तो शब्दांत मांडून दाखविता येण्याजोगा असतो. उदा. शकुंतला व दुष्यंत एकांतात होती, त्या वेळी तिच्या सखीने 'शकुन्तले, दुष्यन्तास निरोप दे' असे सरळ म्हणावे तेव्हा तो वाच्य होतो, म्हणून त्याला 'वस्तु' म्हटले.

४. एकजण पूर्वी ब्राह्मण होता. पण आता श्रमण (म्हणजे बुद्धभिक्षु) झाला. पण श्रमण झाल्यावरही त्याच्या पूर्वावस्थेचीच स्मृती लोकांच्या मनात जागृत असल्याने लोक त्याला अजूनही 'ब्राह्मण'च म्हणतात. हा 'ब्राह्मण--श्रमण-न्याय' होय

५. पृ. ८ वरील २ री टीप पाहा.

६. पृ. ५६ वरील 'सहृदया' च्या लक्षणातील 'सहृदयाचा संवाद' हे शब्द पाहा.

७ पृ. ५९ वरील १५ वी टीप पाहा.

८. पृ. ८३ वरील 'वस्तुध्वनि व अलंकारध्वनि'...इ. वाक्य पाहा.

९. पृ. ५६ वरील 'ध्वनि नावाचा' ......इ. (भट्टनायकाचे) अवतरण पाहा.

१० उदा. काशी आवृत्ति, पृ. ८५, ८७, ९०, १७५ इ. पाहा.

११. 'अनुरणन' याचा अर्थ काशी आवृत्ति, पृ. १३३ वर 'लोचना'त पाहा.

१२. 'पुढे' म्हणजे काशी आवृत्ति, लोचन, पृ. १०४ वर. 'काव्यप्रकाश' उल्लास ३ मधील २३ वी कारिका अशी आहे: —

> शब्दप्रमाणवेद्योऽर्थो व्यनक्त्यर्थान्तरं यतः।
> अर्थस्य व्यञ्जकत्वे तत् शब्दस्य सहकारिता॥

'ज्या अर्थी वाच्यार्थ आधी शब्दांनी ज्ञात व्हावा लागतो व मगच तो दुसऱ्या (म्हणजे व्यंग्य) अर्थाला सुचवितो, त्या अर्थी वाच्यार्थ जेव्हा व्यंजक होतो, तेव्हा शब्द हा त्याचा सहकारी असतो.'

आणि २ ऱ्या उल्लासाच्या २० व्या कारिकेतही मम्मट म्हणतो:—

> तद्युक्तो व्यञ्जकः शब्दः, यत्सोऽर्थान्तरयुक् तथा।
> अर्थोऽपि व्यञ्जकस्तत्र सहकारितया मतः॥

'जो शब्द (अनेकार्थी असून) व्यंजनाव्यापाराने युक्त असतो, तो व्यंजक शब्द होय. पण तो शब्दही ज्या अर्थी आधी त्याचा वाच्यार्थ निश्चित झाल्यावर

मगच व्यंजक होतो. त्या अर्थी तो वाच्यार्थही व्यंजकत्वाचे बाबतीत शब्दाचा सहकारी म्हणून मानला गेला आहे.'

साहित्यदर्पणकार विश्वनाथानेही साहित्यदर्पण, परिच्छेद २, कारिका १८ मध्ये हेच मत मांडले आहे. मम्मट व विश्वनाथ या दोघांनीही हा विचार अभिनवगुप्तांच्या वरील विवेचनावरून घेतला, हे स्पष्ट आहे.

१३. म्हणून वरील उदाहरणात वरवरचा अर्थ 'हिंड' असा वाटत असला, तरी 'हिंडू नको' असे सुचविणे हाच तिच्या बोलण्यातला अभिप्राय आहे. कुत्रडा गेला खरा, पण त्याला मारणारा सिंह तेथे आहे! म्हणून तेथे हिंडणे हे मुळीच सुरक्षित नाही, असे सुचविले आहे.

१४. वाक्यातल्या प्रत्येक पदाचा ( वेगवेगळा सर्वसामान्य स्वरूपाचा ) अर्थ त्या त्या पदाच्या 'अभिधा' शक्तीने कळल्यावर त्या अर्थाचा अन्वय ( म्हणजे परस्परसम्बन्ध ) म्हणजेच वाक्याचा नंबद्ध व विशिष्ट स्वरूपाचा एकूण अर्थ 'तात्पर्य' नावाच्या शक्तीने कळतो, असे 'अभिहितान्वयवादी' म्हणतात. ( यांना 'अभिहितान्वयवादी' म्हणण्याचे कारण 'पदांनी अभिधाशक्तीने सांगितलेल्या म्हणजे 'अभिहित' केलेल्या अर्थांचा 'अन्वय' मागाहून, तात्पर्यशक्तीने कळतो.' असे यांचे मत. वरील उदाहरणात त्या स्त्रीचे एकूण बोलणे 'हिंडू नको' या अर्थात विश्रान्त होणारे आहे. 'हिंड' हा शब्द शेवटी 'तत्पर' म्हणजे 'निषेधपर' आहे, म्हणून तात्पर्यशक्ती (जी अभिधेच्याच आश्रयाने असते) ही शेवटी निषेध याच अर्थाचा बोध करून देते, असे पूर्वपक्षाचे म्हणणे.

१५. कारण 'उन्मत्त', 'धार्मिक' ( = धर्मशील वृत्तीचा, म्हणजे शेवटी भित्रा स्वभाव असलेला ) आणि 'त्या' ( म्हणजे कुप्रसिद्ध असलेल्या ) या शब्दांचे अर्थ 'हिंड' या वाच्यार्थाशी जुळत नाहीत.

१६. तात्पर्यशक्ती आणि लक्षणा या दोन्ही अभिधेच्याच आश्रयाने (लक्षणेला 'अभिधेचे पुच्छ असलेली' असेच म्हणतात.) राहात असल्याने त्या दोहोंमुळे प्रतीत होणारे अनुक्रमे वाक्यार्थ व लक्ष्यार्थ या दोहोंचा बोध ( जवळजवळ ) अभिधेनेच होतो. तेव्हा तो सगळा वाच्यार्थच, असा एकंदर भावार्थ. तुलनेसाठी पाहा — **तात्पर्यानतिरेकाच्च व्यञ्जनीयस्य न ध्वनिः ।** — 'दशरूपका' च्या ४ थ्या प्रकाशातील ३७ व्या श्लोकावरील 'धनिका'च्या टीकेमधील अवतरण.

१७. याच पानावरील १४ वी टीप पहा.

१८. 'संकेत' शब्दाच्या अर्थासाठी पृ. २०, टीप ९ वी पाहा.

१९. 'मनुष्य' या शब्दाचा संकेत 'मनुष्यत्व' या जातीवर होतो, व त्यामुळे मनुष्यत्व हाच 'मनुष्य' शब्दाचा वाच्यार्थ, असे मीमांसकांचे मत. तसेच 'गो' या शब्दाचा संकेत 'गोत्व' या जातीवर, याप्रमाणे प्रत्येक शब्दाचा संकेत व्यक्तीवर न होता 'जाती' वरच होतो, असे ते मानतात. असे मानण्याचे

कारण पुढीलप्रमाणे — ' गाय ' या शब्दाचा अर्थ आयुष्यात पहिल्यानेच कळलेवेळी आपल्याला एक गाय, दाखवण्यात आली. पुढे ' गाय ' हा शब्द ऐकल्यावर आपल्याला तीच नव्हे, तर दुसरी कोणतीही गाय, या अर्थाचा बोध कसा होतो ? म्हणून ' गोत्व ' या जातीवरच संकेत होत असला पाहिजे, असा तर्क.

वर लोचनातील ' तेवढ्याच अंशावर ' याचा अर्थ आम्ही कंसांत ' म्हणजे जातीवर (किंवा ' सामान्या ' वर ) च ' असा लिहिला आहे, तो अभिनवगुप्तांच्या ' आनन्त्य ' व ' व्यभिचार ' यांचा उल्लेख करणाऱ्या पुढच्याच वाक्यास अनुसरून केला आहे. पण वस्तुतः ' केवळ जातीवर संकेत होतो ' हे मत मीमांसकांचे आहे, आलंकारिकांचे नव्हे. आलंकारिक हे, संकेत हा त्या त्या शब्दाच्या प्रकारास अनुसरून जाति, गुण, क्रिया व द्रव्य या चारही उपाधींवर होतो असे मानतात. पाहा, काव्यप्रकाश, उल्लास २, ८ व्या कारिकेचा पूर्वार्ध व त्यावरील वृत्ति.

२०. केवळ व्यक्तीवरच संकेत होतो असे मानल्यास गाई अनन्त असल्याने अनन्त गाईंवर संकेत करीत बसावे लागेल व या संकेत करण्याच्या कार्याचा कधी शेवटच होणार नाही. अशा रीतीने सगळ्या गाईंवर संकेत होणे अशक्य. म्हणून या मतात ' आनन्त्य ' दोष उत्पन्न होतो.

२१. प्रथम एका गाईवर संकेत झाला असताना, पुढे ' तीच गाय ' असा बोध न होता ' वाटेल ती गाय ' असा होतो. म्हणजे ' ज्याच्यावर संकेत झाला त्याचाच बोध त्या शब्दाने व्हावयास पाहिजे ' या नियमाचा भंग ( व्यभिचार ) होतो. म्हणून ' केवळ व्यक्तीवर संकेत ' या मतात ' व्यभिचार ' हाही दोष उद्भवतो.

२२. व्यवहार हा व्यक्तींच्याच आश्रयाने चालतो, जातीच्या आश्रयाने नव्हे. ' गाय आण ' असे म्हटल्यावर कोणी ' गोत्व ' ही जाति आणू शकत नाही. मग संकेत हा जातीवर ( म्हणजे प्रस्तुत उदाहरणात ' गोत्वा ' वर ) होतो, हे मीमांसकांचे मत बरोबर कसे ? तर यावर मीमांसकांचे उत्तर असे – व्यक्तीचा बोध ' आक्षेपाने ' ( पृ. २०, टीप १२ पाहा ) होतो. गोत्व हे ' अन्यथा ' म्हणजे गोव्यक्तीच्या आश्रयाखेरीज राहाणे ' असिद्ध ' म्हणजे अशक्य, म्हणून ' गो ' शब्दाने गोव्यक्ती हीच अभिप्रेत असली पाहिजे हे अर्थापत्तीने कळते.

किंवा ' अन्यथा असिद्धि ' याचा अर्थ असाही लावता येईल.—

" तात्पर्यशक्तीमुळे वाक्यातील पदांचा केवळ सर्वसामान्य सुटा अर्थच कळला आणि विशिष्ट व संबद्ध अर्थ जर कळला नाही, तर ते वाक्य ऐकणाऱ्याकडून व्यवहारात जी विशिष्ट स्वरूपाची क्रिया घडून येते, तिची उपपत्ती लावता येणार नाही. "

सामान्य व विशेष या शब्दांचे दोनही ( म्हणजे १ जाती व व्यक्ती आणि २. सुटा अर्थ व संबद्ध अर्थ ) अर्थ अभिनवगुप्तांना या ठिकाणी अभिप्रेत

असावेत, हे वरील विवेचनावरून स्पष्ट होते. ( पाहा, पृ. ९७, तात्पर्यशक्तीच्या संबंधातील विधान. )

२३. उदा. शशशृंग, वन्ध्यापुत्र इ. शब्दांचे अर्थ स्वतःच असंभवनीय आहेत.

२४. पाहा, पृ. ८४.

२५. हे वाक्य पाणिनीच्या १–२–४५ या सूत्रावरील पतञ्जलीच्या महाभाष्यात आले आहे. शिवाय पाहा, भामह, काव्यालंकार, ४–८.

२६. आपणच, म्हणजे ' ध्वनि हा लक्षणेहून वेगळा नाही, ' असे म्हणणारे तुम्हीच– भाट्टमीमांसक.

२७. 'गंगातीरावर गवळीवाडा आहे ' असे सरळ सरळ न म्हणता तो ' गंगेवर ' आहे असे म्हणण्यामागचा वक्त्याचा हेतू किंवा अभिप्राय म्हणजेच ' प्रयोजन. '

२८. प्रयोजनाचे ज्ञान करून देण्याचे काम शब्दामुळेच होते. परंतु ते अभिधा किंवा लक्षणा या शब्दसामर्थ्यांमुळे न होता केवळ व्यंजनेमुळेच होते म्हणजे व्यंजना हे शब्दाचेच एक सामर्थ्य होय, असा आशय.

२९. पृ. ६९, टीप ३ री पाहा. येथे अतिपवित्रत्व, अतिशीतलत्व, निवासास विशेष सुखावह असणे हे साध्य. ते साध्य ज्या ठिकाणी नाही, तेथेही म्हणजे विपक्षावरही ' गंगेचे सामीप्य ' हा हेतु आढळतो. उदा. गंगेच्या जवळपास पड-लेल्या, अर्धवट जळालेल्या कनटच्या, हाडे वगैरे. त्यामुळे ' गंगेचे सामीप्य ' हा या ठिकाणी अनैकान्तिक हेत्वाभास आहे.

३०. पृ. ६९, टीप २ री पाहा. ' छोकरा ' हा या ठिकाणी ' पक्ष ' आहे त्याच्यावर ' सिंह ' शब्दाने वाच्य होणे हा धर्म–' हेतु ' असलेला–राहात नाही. म्हणून तो हेतू ' असिद्ध ' (स्वरूपासिद्ध) होय.

३१. स्वयंपाकघर वगैरे अनेक ठिकाणी प्रत्यक्ष पाहिल्यावर त्या प्रत्यक्ष अनुभवाच्या जोरावर आपल्याला ' जेथे धूर असतो तेथे अग्नि असतो ' या निय-माचे ज्ञान होते. यालाच ' व्याप्तिग्रहण ' ( व्याप्तीचे ज्ञान होणे ) म्हणतात. असे व्याप्तीचे ज्ञान झाले म्हणजे मगच त्या व्याप्तीच्या आधारे आपण कोठेही धूर दिसल्यास ' येथे अग्नि आहे ' असे अनुमान निश्चितपणे करू शकतो. पण ' तो छोकरा सिंह आहे ' हे वाक्य प्रथमच कानी पडल्यावर ' सिंहाचे विशेष पराक्रम-शालित्व छोकऱ्याचे ठिकाणी आहे असा बोलणाराचा अभिप्राय आहे ' हे ऐक-णाराला कसे समजले ? ते प्रत्यक्ष वगैरेसारख्या मौलिक प्रमाणाने कळत नाही. ऐकणारा रसिक असला, तरच तो आपल्या रसिकता–गुणामुळे विशिष्ट परिस्थिती लक्षात घेऊन तशी कल्पना करतो. अनुमान करावयास व्याप्तिग्रहण झाले पाहिजे, इतकेच नव्हे, तर निरनिराळ्या उदाहरणांचे ठिकाणी साध्याच्या अस्तित्वाचे ज्ञान प्रत्यक्षासारख्या मौलिक प्रमाणाने व्हावयास पाहिजे. म्हणून ' तो छोकरा सिंह

आहे' यासारख्या वाक्यांत अनुमान करता येत नाही. तर व्यंजनाच मानावी लागते.

शिवाय 'तो छोकरा सिंह आहे' यासारख्या वाक्यांचे बाबतीत 'जेथे जेथे असा शब्दप्रयोग असतो तेथे तेथे त्या त्या (लाक्षणिक) शब्दांच्या वाच्यार्थातील विशिष्ट धर्माचा संबंध असतो' ही व्याप्ती अव्यभिचारी होणार नाही, कारण एखाद्या छोकऱ्याला उपरोधाने 'सिंह' म्हटल्यास बोलणाराला छोकऱ्याचे ठिकाणी सिंहाच्या धर्मांचा अभावच प्रतिपादन करावयाचा असतो. त्याउलट अनुमान हे अव्यभिचारीच असते.

३२. 'ही' म्हणजे अतिपवित्रत्व इ. धर्म गवळीवाड्याचे ठिकाणी आहेत हे सांगण्याचा वक्त्याचा अभिप्राय आहे याचे ऐकणाराला होणारे ज्ञान.

३३. वक्त्याच्या अभिप्रायाचे पहिल्याने ज्ञान होते. त्या वेळी त्या ज्ञानाचा पूर्वानुभव नसल्यामुळे त्या पहिल्याने होणाऱ्या ज्ञानाला 'स्मृति' म्हणताच येत नाही.

३४. एखादा शब्द ऐकल्याने त्याच्या वाच्यार्थाची स्मृती होईल पण त्या वाच्यार्थामधील धर्मांची स्मृती (तो शब्द ऐकल्याने) होते, याला काही नियामक प्रमाण नाही. शिवाय एकेका वस्तूच्या ठिकाणी धर्म पुष्कळ असल्यामुळे वक्त्याला अमुक ठिकाणी अमुकच एक धर्म विवक्षित आहे हे निश्चितपणे सांगता येत नाही स्मृतीमध्ये मात्र पूर्वी अनुभवलेल्या त्याच गोष्टींची स्मृती निश्चितपणे होते. अशा रीतीने अनुमान व स्मृती या दोहोंमध्येही निश्चितपणा असतो, तसा 'तो छोकरा सिंह आहे' इ. वाक्यांतून सिंहाच्या एखाद्याच विशिष्ट धर्माचे ज्ञान होण्याचे बाबतीत नियम किंवा निश्चितपणा नसतो.

३५. 'लोचना' नील या वाक्यांचा उपयोग मम्मटाने नाविषा समयाबाबत् ...... इ. लिहिताना केलेला दिसतो. पाहा, काव्यप्रकाश, दुसरा उल्लास, कारिका १५ व तीवरील वृत्ती.

३६ पाहा पृ. १०० वरील २८ वी टीप.

३७ अतिशीतलत्व इ. धर्म गंगेच्याच ठिकाणी आहेत, गंगातीराच्या ठिकाणी नाहीत. म्हणून 'गंगा' शब्द वापरल्यामुळेच त्या धर्मांचा बोध होऊ शकतो. मग प्रयोजनाचा म्हणजे त्या धर्मांचा बोध करून देताना 'गंगा' शब्दाची गती कशी खुंटेल ? त्यांचा बोध करून द्यावयास 'गंगा' शब्द असमर्थ कसा ठरेल ?

३८. लक्षणावाद्याच्या मतानुसार 'प्रयोजन' हाही 'लक्ष्यार्थ' मानल्यास त्याच्या बाबतीत लक्षणेचा आश्रय करावयास मुख्यार्थबाध, निमित्त (म्हणजे संबंध) व आणखी प्रयोजन मानावे लागेल. ते आणखी प्रयोजन हाही (लक्षणावाद्याच्या मते) लक्ष्यार्थच. तेव्हा त्या लक्षणेसाठी आणखी प्रयोजन मानावयाचे— अशा तऱ्हेने ही प्रयोजनांची मालिका कधी संपावयाचीच नाही. यालाच 'अनवस्था'

( म्हणजे कधीही थांबता न येण्याचा ) प्रसंग म्हणतात. पाहा. काव्यप्रकाश, उल्लास २, कारिका १७ वी व तीवरील वृत्ती.

३९. याच 'लक्षितलक्षणा' या अर्थाचा 'लक्षणलक्षणा' हा शब्द पुढे पृ. १४९ व २०९ ( काशी आवृत्ति ) वर 'लोचना'त वापरला आहे.

४०. प्रथम उद्द्योत, कारिका १७ वी पाहा.

४१. 'लोचना'त अभिनवगुप्तांनी अवगम व प्रतिभास असे शब्द वापरले आहेत, तो पुनरुक्ती वाटण्याचा संभव आहे. कारण अवगम म्हणजे 'ज्ञान' व प्रतिभास म्हणजेही 'ज्ञान'च. म्हणून आम्ही 'प्रतिभास' याचा 'प्रकाश' हा अर्थ घेऊन 'ज्ञानामुळे उत्पन्न झालेल्या प्रकाशामुळे' असा अनुवाद केला आहे.

४२. वस्तुतः 'हे धार्मिका !'... ... इ. पद्यामध्ये व्यंग्यार्थ त्या संकेतस्थानाचे रक्षण व्हावे व ( नायिकेच्या ) आपल्या प्रियकराशी भेटी निर्वेधपणे व्हाव्यात, हा आहे. अर्थात् हा व्यंग्यार्थही 'वस्तु' रूपच आहे. आता हा व्यंग्यार्थ सुचविणारा ध्वननव्यापार 'हिंडू नको' या (व्यंजनावाद्यांच्या मते अवान्तरव्यङ्ग्य असलेल्या) निषेधस्वरूपी अर्थावर मुख्यतया अवलंबून असल्यामुळे त्या ध्वननव्यापारालाही 'निषेध हा विषय असणारा' म्हणजे निषेधस्वरूपी व्यंग्यार्थ प्रकट करणारा आहे, असे वृत्तिकारांनी म्हटले.

४३. लक्षणा ही दोन प्रकारची : १. जहल्लक्षणा व २. अजहल्लक्षणा. ज्या लक्षणेत वाच्यार्थांचा पूर्णपणे त्याग करून दुसरा लक्ष्यार्थ स्वीकारला जातो, ती 'जहल्लक्षणा' होय. उदा. 'गंगेवर गवळीवाडा आहे' या उदाहरणात 'गंगा' शब्दाचा 'गंगाप्रवाह' हा वाच्यार्थ टाकून 'तीर' हा लक्ष्यार्थ घ्यावा लागतो. ज्या लक्षणेत वाच्यार्थ कायम राहून त्यात काही अधिक अर्थाची भर पडते व त्या दोहोंमिळून लक्ष्यार्थ बनतो, ती 'अजहल्लक्षणा' होय. उदा. 'भाले प्रवेश करतात' या वाक्यात 'भाले' हा वाच्यार्थ टाकला जात नाही, तर 'भाले धारण करणारे सैनिक' असा, 'भाले' या वाच्यार्थासह असलेला लक्ष्यार्थ स्वीकारावा लागतो. वाच्यार्थाचा संपूर्णपणे त्याग याला 'अत्यन्ततिरस्कार' असे म्हटले आहे व वाच्यार्थ हा लक्ष्य अर्थात समाविष्ट होणे याला 'वाच्यार्थाचे दुसऱ्या अर्थात संक्रमण होणे' असे म्हटले आहे. लक्षणेच्या दोन्ही प्रकारांमध्ये वाच्यार्थाचा बाध होणे ही आवश्यक, आधारभूत गोष्ट आहे. वाच्यार्थबाध नसल्यास लक्षणा प्रवृत्त होणारच नाही. परंतु प्रस्तुत उदाहरणामध्ये 'हिंड' या वाच्यार्थाचा बाध होतच नाही असे अभिनवगुप्तांचे मत आहे. पाहा, पृ. ८६ वरील 'मुख्यार्थ-बाधाची शंका घेण्याजोगी नाही' हे वाक्य.

४४. पाहा, उद्द्योत २, कारिका २२, व शिवाय पृ. ९ वरील ४ थी टीप.

४५. मुख्यार्थ-बाध, निमित्त म्हणजे संबंध व रूढी किंवा प्रयोजन ही लक्षणेची व वक्तृवैशिष्ट्य इ. ( पाहा मम्मट, काव्यप्रकाश, उल्लास ३, कारिका १ व २ )

ही व्यंजनेची सहकारी कारणे होत

४६. पर्वतावर धूर पाहिल्यावर 'जेथे धूर असतो तेथे अग्नि असतो' या व्याप्तीचे ( म्हणजे धूर व अग्नि यांच्या साहचर्याबद्दलच्या नियमाचे ) स्मरण होते. त्याची पर्वतावर अग्नि असला पाहिजे याचे अनुमान करावयास मदत होते.

४७. पाहा, काशी आवृत्ति, लोचन, पृ. ४५०.

४८. अनुमान करावयास कारणीभूत होणे.

४९. ज्या वेळी शब्द ऐकल्यामुळे ऐकणाऱ्याला एखाद्या पदार्थाचे अगर व्यक्तीचे ज्ञान होते, त्या वेळी ऐकणाऱ्याचे कर्णेन्द्रिय हे त्या शब्दाचे सहकारी कारण असते. लिहिलेला शब्द वाचताना नेत्रेन्द्रिय हे सहकारी कारण होईल. पांढरा, घोडा. इ. शब्द कर्णेन्द्रियाच्या साहाय्याने ऐकले की, त्या पदार्थाची अगर व्यक्तीची वैशिष्ट्ये ( विकल्प ) कळून येतात. शब्द ऐकल्यामुळेच विकल्पांचे ज्ञान होते. म्हणून शब्दाचे ठिकाणी विकल्पकत्व असते, असे म्हटले आहे.

५०. 'संस्कारामुळे उत्पन्न होणारे ज्ञान म्हणजे स्मृती' अशी स्मृतीची व्याख्या न्यायशास्त्रात केली आहे. एखाद्या वस्तूचे आपणांस प्रथम ज्ञान झाले म्हणजे त्या ज्ञानाचा संस्कार म्हणजे ठसा आपल्या मनावर उमटतो. पुढे केव्हातरी ती वस्तू समोर नसताही कोणत्या तरी निमित्तामुळे तिच्या पूर्वी झालेल्या ज्ञानाचा संस्कार जागृत होऊन तिचे आपल्याला स्मरण होते. म्हणजे स्मरण होण्याचे, संस्कार हे कारण असते. वर इन्द्रिये 'वगैरे' असे जे म्हटले आहे, त्यातील 'वगैरे' या शब्दाने त्या शब्दाच्या अर्थाच्या ज्ञानाचे पूर्वी झालेले संस्कार हेही आता विकल्पांचे ज्ञान होताना सहकारी कारणे म्हणून अभिप्रेत असावेत.

५१. खूप लांबून एखादी गोष्ट दिसली तर प्रथम 'हे काहीतरी आहे' इतकीच जाणीव होते ते काय आहे, कसे आहे, हा तपशील त्या वेळी माहीत नसतो. मग ती गोष्ट जवळ आल्यावर हा माणूस आहे, हा गोरा आहे इ. विकल्पांचे ( म्हणजे वैशिष्ट्यांचे ) ज्ञान होते. या, नंतरच्या म्हणजे वैशिष्ट्यांसहित झालेल्या ज्ञानाला 'सविकल्पक ज्ञान' म्हणतात.

५२. पृ. ९८ वरील १४ वी टीप पाहा. अभिहितान्वयवादी हे अभिधाशक्ती व तात्पर्यशक्ती यांची सहकारी कारणे वेगळी असल्यामुळे (उदा. 'सङ्केत' हे अभिधाशक्तीचे सहकारी कारण व आकांक्षा, योग्यता व संनिधी ही तात्पर्यशक्तीची सहकारी कारणे ) या दोन शक्ती वेगळ्या मानतात. तेव्हा त्याच न्यायाने व्यञ्जनेची सहकारी कारणे वेगळी असल्यामुळे व्यञ्जना हा वेगळा व्यापार मानणे त्यांना भागच आहे.

५३ प्राभाकर मीमांसक हे अन्विताभिधानवादी होत. त्यांचे म्हणणे असे की, अभिहितान्वयवाद्यांप्रमाणे, 'प्रत्येक पदाचा अर्थ आधी सामान्यपणे कळतो व मग विशिष्ट म्हणजे वाक्यातील पदांचा परस्परसंबद्ध अर्थ तात्पर्य वृत्तीने कळतो' असे

समजण्याचे कारण नाही. प्रत्येक पदाचा अर्थ आपल्याला 'विशिष्ट' म्हणजे 'अन्वित' म्हणजे कशाशीतरी संबद्ध अशा स्वरूपातच कळतो. आणि म्हणून अन्वय (म्हणजे परस्पर-संबंध) समजण्यासाठी वेगळी तात्पर्यवृत्ती मानणे अनावश्यक आहे. लहान मुलाला ज्या वेळी शब्दांचे अर्थ कळतात, त्या वेळी ते शब्द कोणत्यातरी वाक्यातच वापरलेले असतात. आणि म्हणूनच त्याला त्या शब्दांचे अर्थ विशिष्ट म्हणजे त्या वाक्यातील इतर शब्दांच्या अर्थाशी संबद्ध अशा स्वरूपातच कळतात. म्हणूनच 'शब्दांच्या अर्थाचा एकमेकाशी असलेला संबंध कळण्यासाठी तात्पर्य ही वेगळी वृत्ती मानण्याचे कारण नाही' असे अन्विताभिधानवाद्यांचे म्हणजे प्राभाकर मीमांसकांचे म्हणणे.

५४. विषय म्हणजे त्या व्यापारांमुळे कळणारे वाच्यार्थ, तात्पर्यार्थ, लक्ष्यार्थ व व्यंग्यार्थ हे वेगवेगळे अर्थ.

५५. उदा. अभिधाव्यापाराचे सहकारी कारण 'संकेतग्रहण,' तात्पर्यशक्तीची सहकारी कारणे 'आकांक्षा, योग्यता व सन्निधि' (या शब्दांच्या स्पष्टीकरणार्थ पुढे ११ व्या कारिकेवरील टीप १ ही पाहा.), लक्षणेची सहकारी कारणे 'मुख्यार्थबाध' वगैरे तीन अटी व व्यंजनेची वक्त्याचे वैशिष्टच, श्रोत्याचे वैशिष्टच, इ.

५६. हे 'जाणकार' म्हणजे वैयाकरण, मीमांसक व नैयायिक हे होत.

५७. एकदा उच्चारलेला शब्द एकदाच त्याच्या अर्थाचे ज्ञान करून देतो, थांबून थांबून पुन्हा पुन्हा देत नाही. तसेच पर्वतावर एकदा पाहिलेल्या धुरावरून अग्नीच्या अस्तित्वाचे ज्ञानही एकदाच होते, थांबून थांबून पुनः पुनः होत राहात नाही. एकदा केलेले (यज्ञादि) कर्मही एकदाच फळ देते, थांबून थांबून वारंवार देत नाही. जसे एकदा जेवल्याने एकदाच तृप्ती होते, दररोज तृप्ती होत राहून पोटाचा प्रश्न कायमचा सुटला, असे होत नाही.

५८. पूर्वपक्ष्याचे म्हणणे असे की, 'लांबत लांबत जाणारा' म्हणजे 'मध्ये थांबण्यात वेळ न घालवता वेगाने कार्य करणारा' असा अभिप्राय समजावयाचा.

५९ व ६०. वाक्यातील सुटचा पदांचे अर्थ ही सर्व वाक्याचा अर्थ कळण्याची 'निमित्ते' होत, आणि अगदी शेवटी प्रतीत होणारा संपूर्ण वाक्याचा अर्थ हा त्या निमित्तांमुळेच कळणारा, म्हणून 'नैमित्तिक' होय. पूर्वपक्ष्याचा रोख असा की, प्रत्येक पदाचा वाच्यार्थ कळावयास संकेताची जरूरी असते, पण अगदी शेवटी ध्यानात येणाऱ्या संपूर्ण वाक्याच्या अर्थाला संकेताची जरूरी नाही.

६१. याप्रमाणेच अभिनवगुप्तांनी आणखी दोन-तीन ठिकाणी पूर्वमीमांसकांचा उपहास केला आहे. पाहा, काशी आवृत्ती, लोचन, पृ. १७३, २७४.

६२. ज्यावर संकेतग्रहण झाले असेल तेवढ्याच अर्थाचा बोध अभिधेने होईल. अंतिम अर्थावर संकेत झालेला नसल्याने त्या अर्थाचा बोध अभिधेने होणार नाही.

त्या अर्थाच्या बोधाला वेगळे कारण सांगावयास हवे.

६३. पृ. १०३, टीप ५३ वी पाहा.

६४. 'पदाचा अर्थ अन्वितस्वरूपातच कळतो,' या आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ अन्विताभिधानवादी व्यवहारातील पुढील दाखला देतात :—वडिलांनी मोठ्या मुलास 'गाय आण' असे म्हटल्यावर मोठा मुलगा विशिष्ट प्राण्याला घेऊन येतो हे पाहून 'गाय आण' या समग्र वाक्याचा अर्थ अमुक, असे लहान मुलाला आधी कळते. मग 'गाय ने' असे म्हटल्यावर मोठा मुलगा त्याच प्राण्याला दूर घेऊन जातो. 'घोडा आण' म्हटल्यावर मोठा मुलगा दुसऱ्या प्राण्याला घेऊन येतो हे पाहिल्यावर 'घोडा' हा शब्द वाक्यात नवीन घेतला (आवाप), 'गाय' हा शब्द गाळला (उद्वाप). अशा आवाप–उद्वापांमुळे त्या लहान मुलाला वाक्यातील सुट्या पदांचे अर्थ कळून येतात

६५. उद्द्योत १ ला, कारिका १२ वी.

६६. पृष्ठ १०३, टीप ४६ पाहा.

६७. 'गौणी' हा लक्षणेचाच एक प्रकार आहे वाच्यार्थ आणि लक्ष्यार्थ यामध्ये जेव्हा 'सादृश्य' हा संबंध असतो, तेव्हा ते गौणी लक्षणेचे उदा म्हणावयाचे. 'तुझे मुख म्हणजे चंद्रच!' या उदाहरणात 'चंद्र' या शब्दाचा वाच्यार्थ घेऊन वाक्याचा अर्थ लागत नाही. 'चंद्र व चंद्रासारखे सुंदर (मुख)' या दोन अर्थांमध्ये 'सादृश्य' हा संबंध आहे, म्हणून ही 'गौणी' लक्षणा होय. वाच्यार्थ व लक्ष्यार्थ यांमध्ये सादृश्याखेरीज दुसरा कोणतातरी संबंध असला, तर ती गौणीपेक्षा निराळ्या प्रकारची लक्षणा होते (या प्रकारच्या लक्षणेला मीमांसकांनी नुसतेच 'लक्षणा' म्हटले आहे). याच प्रकाराला पुढे मम्मटादिकांनी 'शुद्धा लक्षणा' हे नाव दिले आहे. लक्षणेच्या या प्रकाराचे उदाहरण 'गंगेवर गवळीवाडा' हे होय. या उदाहरणात गंगाप्रवाह व तीर या दोन अर्थांमधला संबंध सादृश्य हा नसून 'सामीप्य' हा आहे. गौणी लक्षणेला म्हणजे सादृश्यावर आधारलेल्या लक्षणेला मीमांसक नुसतेच 'गौणी' किंवा 'गौणीवृत्ती' असे म्हणतात. वर 'गौण अर्थ' व 'लाक्षणिक अर्थ' असे जे शब्द आहेत, त्यांचे अर्थ अनुक्रमे 'गौणी लक्षणेने कळणारा लक्ष्यार्थ' व 'गौणीखेरीज इतर प्रकारच्या लक्षणेने कळणारा लक्ष्यार्थ' असे समजावेत.

६८ जैमिनीच्या पूर्वमीमांसा सूत्रांमध्ये पुढील सूत्र आहे—श्रुतिलिङ्गवाक्यप्रकरणस्थानसमाख्यानां समवाये पारदौर्बल्यमर्थविप्रकर्षात् । ३. ३. १४. याचा 'अर्थ 'श्रुती, लिंग, वाक्य, प्रकरण, स्थान व समाख्या या प्रमाणांपैकी नंतरनंतरचे प्रमाण पूर्वीपूर्वीच्या प्रमाणापेक्षा दुर्बल समजावे, कारण नंतरनंतरच्या प्रमाणांमुळे साध्याच्या सिद्धीला पूर्वीपूर्वीच्या प्रमाणापेक्षा अधिकाधिक उशीर लागतो. उदा. ऐन्द्र्या गार्हपत्यमुपतिष्ठते । हे एक श्रुतिवचन आहे. ऐन्द्री ही एक

ऋचा आहे. ती पुढीलप्रमाणे...कदाचन स्तरीरसि नेन्द्र सश्चसि दाशुषे। या ऋचेत 'इन्द्र' हे एक पद आहे. 'इन्द्र' या शब्दाचा रूढ अर्थ देवांचा राजा इन्द्र हा आहे. लिङ्गप्रमाण म्हणजे शब्दाचा रूढ अर्थ. तेव्हा लिङ्गप्रमाणावरून म्हणजे इन्द्र शब्दाच्या रूढार्थावरून असे अनुमान निघते की, ही ऋचा इन्द्राच्या उपस्थानाचे वेळी म्हणावयाची असली पाहिजे. या अनुमानाचे आधारे, 'अशा अर्थाची ऐन्द्र्या इन्द्रमुपतिष्ठते। अशी श्रुती असली पाहिजे' असे कल्पावे लागते. अशा अर्थाची म्हणजे 'ही ऋचा म्हणून इन्द्राचे उपस्थान करावे' अशा अर्थाची. पण ऐन्द्र्या गार्हपत्यमुपतिष्ठते। हे श्रुतिवाक्य सांगते की, ही ऐन्द्री ऋचा गार्हपत्य अग्नीचे उपस्थान करताना म्हणावयाची आहे. हे साक्षात श्रुतीनेच सांगितले असल्यामुळे ऐन्द्री ऋचा गार्हपत्योपस्थानाचे अंग आहे. हे तावडतोब कळते. पण लिङ्ग प्रमाणाने प्रथम त्या ऋचेतील 'इन्द्र' शब्दाचा रूढार्थ अमुक हे लक्षात घ्यावयाचे व मग ही ऋचा (ऋग्वेद, ८-५१-७) इन्द्रोपस्थानाचे अंग असली पाहिजे असे सांगणारी श्रुती कल्पावयाची, यामुळे लिङ्गप्रमाणाने अंगत्व ठरवावयास श्रुतिप्रमाणापेक्षा अधिक वेळ लागतो. म्हणूनच लिङ्गप्रमाण हे श्रुतिप्रमाणापेक्षा अधिक दुर्बळ, असे सांगितले आहे. याच कारणास्तव लिङ्गापेक्षा वाक्य दुर्बळ, वाक्यापेक्षा प्रकरण दुर्बळ, वगैरे. आता श्रुतीनंतरच्या प्रमाणावरून सर्वांत शेवटी कळणारा अर्थही अभिधेनेच कळतो असे मानल्यास श्रुतिप्रमाणाने कळणारा अर्थ व इतर प्रमाणांनी कळणारे अर्थ एकाच व्यापाराने सांगितलेले, म्हणून तुल्यबल ठरतील आणि ते तसे ठरल्यास जैमिनीने सांगितलेला पूर्वमीमांसाशास्त्रातील एक महत्त्वाचा सिद्धान्त कोलमडून पडेल. म्हणून या, श्रुतीहून भिन्न असणाऱ्या प्रमाणांनी कळणारा अर्थ अभिधेनेच कळतो, असा हट्ट धरता येणार नाही. तसेच व्यङ्ग्यार्थ हाही अभिधेनेच कळतो असा हेका धरण्यात अर्थ नाही; व्यङ्ग्यार्थ कळावयास अभिधेहून व्यंजना हे वेगळेच निमित्त मानणे भाग आहे.

६९. मुख्यार्थ ( म्हणजे वाच्यार्थ ) कळावयास 'अभिधा' हे कारण आहे व ( गौण किंवा लाक्षणिक ) लक्ष्यार्थ कळावयास लक्षणा हे वेगळे कारण आहे. तसेच श्रुतीवरून अंगत्वाचे जे ज्ञान होते, त्याचे कारण 'अभिधा' हे आहे व लिङ्गावरून कल्पिल्या जाणाऱ्या श्रुतिवचनाचे ज्ञान 'अनुमान' या वेगळ्या कारणामुळे होते. या दोन्ही ठिकाणी कार्यकारणभाव वेगवेगळे आहेत

७०. पाहा, पृ. २९ वरील १७ वी टीप व लोचन, बालप्रिया आवृत्ति, पृ. ४४८. तसेच खालील ७१ वी टीप पाहा.

७१. वाक्य हे एकच, विभागरहित असते व त्यापासून अखंड अशा एकाच अर्थाचा बोध होतो, असे वैयाकरण व वेदान्ती म्हणतात. वाक्याचे वर्ण, पद, इ. विभाग आणि वाक्यार्थाचे पदार्थ इ. विभाग आपण केवळ प्रक्रिया समजावून सांगण्यासाठी मानतो. यालाच ते 'अविद्या' दशा मानतात. त्या व्यावहारिक

अभिधेच्या पातळीवर तरी त्यांना अभिधा, तात्पर्य, लक्षणा व व्यञ्जना या वेगवेगळ्या वृत्ती मानल्याच पाहिजेत !

७२. तत्त्वालोक हा ग्रंथ आनन्दवर्धनांनीच लिहिला आहे असे ( काशी आवृत्ति, पृ. ५३३ वर ) 'लोचना'त म्हटले आहे. हा ग्रंथ परमेश्वराच्या तात्त्विक स्वरूपाची चर्चा करणारा आहे असे 'उत्तुंगोदय' हा टीकाकार म्हणतो. ( पाहा, ध्वन्यालोक, कुप्पुस्वामी संस्करण, पृ. १२५ )

७३. भयानक रसाच्या चर्वणेमुळेच निषेध हा अर्थ कळत असल्याने तो अर्थ कळण्यासाठी वेगळी शब्दांची व अर्थांची व्यञ्जनावृत्ती मानण्याचे कारण नाही, असा भट्टनायकाच्या म्हणण्यातील आशय.

७४. पाहा, पृ. १०.

७५. विशिष्ट प्रकारच्या वाचकाची सहकारी म्हणून कल्पना करणे यामध्ये 'कल्पना-गौरव' हा दोष उत्पन्न होतो, पण वक्ता आणि वाचक यांच्या प्रतिभेने सजीव होणारा व्यञ्जना व्यापार स्वीकारण्यामध्ये कल्पनागौरव हा दोष उत्पन्न होत नाही, असे अभिनवगुप्तांचे म्हणणे.

७६. म्हणजे भट्टनायकानुयायांनी केलेल्या वस्तुध्वनीच्या खंडनातून रसध्वनीची निष्पत्ती झाली, हे वाईटातूनही चांगलेच निघाले, असा अभिप्राय.

७७. वस्तुतः भट्टनायक व्यञ्जनेवर अवलंबून असलेला ध्वनी मानीत नाही, तेव्हा हे म्हणजे प्रस्तुत पद्य 'केवळ वस्तुध्वनीचेच उदाहरण नाही' अशी कल्पना त्याच्यावर लादणे योग्य वाटत नाही.

७८. पृ. ८४ वर 'वरील वाक्य एका स्त्रीने'… अशा रीतीने प्रारंभ करून दाखविलेल्या पद्धतीने.

७९. काकु म्हणजे स्वरात, आवाजात केले जाणारे चढउतार, कंप इ. बदल. एकच शब्द निरनिराळ्या आवाजांत उच्चारला, तर त्या शब्दातून निरनिराळे अर्थ, निरनिराळे भाव सूचित होऊ शकतात.

८०. अर्थात हा अभिनवगुप्तांच्या आधीचा ध्वनिमत-विरोधी कोणीतरी टीकाकार असावा.

८१. पाहा, रघुवंश, ६-३०, **भिन्नरुचिर्हि लोकः ।**

८२. पाहा, काशी आवृत्ति, पृ. ४४३ ते ४५३.

क्वचिद्वाच्ये प्रतिषेधरूपे विधिरूपो यथा—
अत्ता एत्थ णुमज्जइ एत्थ अहं दिअसअं पलोएहि।
मा पहिअ रत्तिअन्धअ सेज्जाए मह णुमज्जिहिसि ॥

ध्वन्यालोक

केव्हा केव्हा वाच्यार्थ निषेधस्वरूपी असताना तो ( प्रतीयमान अर्थ ) विधिस्वरूप असतो. उदाहरणार्थ—

" सासूबाई येथे ( निद्रामग्न होऊन निश्चेष्ट ) पडलेल्या असतात. येथे मी ( निजत्ये ). हा मेला दिवस आहे, तेवढ्यात नीट पाहून घे. ( नाहीतर ) हे वाटसरा ! तुला आहे रातांधळे, म्हणून आम्हा दोघींच्या बिछान्यावर येऊन अडमडू नकोस !

लोचनम्

अत्ता इति ।

श्वश्रूरत्र निषीदति अत्राहं दिवसकं प्रलोकय ।
मा पथिक राज्यन्ध, शय्यायामावयोः शयिष्ठाः ॥

मह इति निपातोऽनेकार्थवृत्तिरत्रावयोरित्यर्थः, न तु ममेति । एवं हि विशेषवचनमेव शङ्काकारि भवेदिति प्रच्छन्नाभ्युपगमो न स्यात् । कांचित्प्रोषितपतिकां तरुणीमवलोक्य प्रवृद्धमदनाङ्कुरः संपन्नः पान्थोऽनेन निषेधद्वारेण तयाभ्युपगत इति निषेधाभावोऽत्र विधिः । न तु निमन्त्रणरूपोऽप्रवृत्तप्रवर्तनास्वभावः, सौभाग्याभिमानखण्डनाप्रसङ्गात् । अत एव राज्यन्धेति समुचितसमयसम्भाव्यमानविकाराकुलितत्वं ध्वनितम् । भावतदभावयोश्च साक्षाद्विरोधाद्वाच्याद्व्यङ्ग्यस्य स्फुटमेवान्यत्वम् ।

यत्त्वाह भट्टनायकः— ' अहमित्यभिनयविशेषेणात्मदशावेदनाच्छादमेतदपी 'ति । तत्राहमिति शब्दस्य तावन्नायं साक्षादर्थः, काक्वादिसहायस्य च तावति ध्वननमेव व्यापार इति ध्वनेर्भूषणमेतत् । अत्तेति प्रयत्नेनानिभृतसम्भोगपरिहारः । अथ यद्यपि भवान्मदनशरासारदीर्यमाणहृदय उपेक्षितुं न युक्तः, तथापि किं करोमि, पापो दिवसकोऽयम-

नुचितत्वात्कुत्सितोऽर्थमित्यर्थः । प्राकृते पुंनपुंसकयोरनियमः । न च सर्वथा त्वामुपेक्षे, यतोऽत्रैवाहं, तत्प्रलोकय नान्यतोऽहं गच्छामि, तदन्योन्यवदनावलोकनविनोदेन दिनं तावदतिवाहयाव इत्यर्थः । प्रतिपन्न-मात्रायां च रात्रावन्धीभूतो मदीयायां शय्यायां मा शिलक्षः, अपि तु निभृतनिभृतमेवात्ताभिधाननिकटकण्ठकानिद्रान्वेषणपूर्वकामितीयदत्र ध्वन्यते ।

लोचन

'सासूवाई'– 'मह' हा निपात[1] यथे अनेकवचनाचा अर्थ असलेला आहे. त्याचा अर्थ 'आम्हा दोघींच्या' असा आहे. 'माझ्या' असा नाही. कारण 'माझ्या' असा विशेषत्वाने एकवचनाचा प्रयोग केला असता, तर तो (सासूच्या मनात) संशय उत्पन्न करावयास कारण झाला असता, आणि मग त्या पान्थाला तिच्या खाटेवर येऊ देण्यास गुप्तपणे (म्हणजे व्यंजनेने) समती देण्याचा तिचा उद्देश सफल झाला नसता. जिचा पती परगावी गेला आहे अशी एक तरुणी दृष्टीस पडल्यामुळे एका पथिकाच्या मनात मदनविकार उत्पन्न झाला. त्या पथिकाला तिने 'अडमडू नकोस' या निषेधाच्या द्वारे अनुज्ञा दिली असे असल्याने या उदाहरणातील (व्यंजनेने सूचविलेला) 'विधी' हा निषेधाचा अभाव' (म्हणजे अनुमती) या स्वरूपाचा आहे. तो (विधी) प्रवृत्त न झालेल्याला प्रवृत्त करणे अशा 'निमन्त्रण' (म्हणजे विनंती) या स्वरूपाचा नाही. कारण त्यामुळे (म्हणजे तो निमन्त्रण-स्वरूप मानल्यास) नायिकेच्या आपल्या स्वतःच्या मोहक सौंदर्या-बद्दलच्या अभिमानाचे खंडन होण्याचा प्रसंग[2] ओढवतो. म्हणूनच (पान्थाला) 'रातांधळे असणारा' असे विशेषण देऊन रात्री म्हणजे रतिक्रीडेस योग्य अशा वेळी (काम) विकारांनी त्याने व्याकुळ होणे अगदी स्वाभाविक आहे, हे सुचविले आहे. भाव (म्हणजे 'येऊन नीज') आणि अभाव (म्हणजे 'येऊ नको') यांमध्ये प्रत्यक्ष विरोध असल्यामुळे व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाहून वेगळा आहे, हे उघड आहे.

पण भट्टनायकाने जे म्हटले आहे की–" 'मी' हा शब्द त्या स्त्रीने विशेष अभिनयपूर्वक (म्हणजे वक्षःस्थलावर बोट ठेवून) उच्चारून

स्वतःची अवस्था प्रकट केल्यामुळे ('हे धार्मिका'! या पद्यातल्या-प्रमाणे याही पद्यात तिने बिछान्यावर येण्यास त्याला दिलेली अनुमती) हीदेखील शब्दानेच सांगितली गेली आहे." त्याबाबत वस्तुस्थिती अशी की, (तुला निजावयास अनुमती आहे) हा काही 'मी' या शब्दाचा प्रत्यक्ष (म्हणजे वाच्य) अर्थ नव्हे. काकु, अभिनय वगैरेंच्या[3] मदतीने तो (वाच्यार्थाहून वेगळा) अर्थ व्यक्त करण्याचे काम ध्वननव्यापारच करणार हे तर ध्वनीचे भूषण म्हणजे वैशिष्ट्यच आहे! 'सासूबाई (येथे झोपतात)' हा शब्दप्रयोग करून 'फार प्रकटपणे रतिक्रीडा करणे तुला प्रयत्नपूर्वक टाळले पाहिजे' असे सुचविले आहे. आता, तुझे हृदय मदनबाणांच्या वर्षावाने विदीर्ण होत असताना तुझ्याकडे दुर्लक्ष करणे जरी अयोग्य नसले, तरी मी काय करू, आता ही मेली दिवसाची दुष्ट वेळ आहे, ही दिवसाची वेळ (तुझ्या इच्छापूर्तीस) अयोग्य असल्यामुळे निन्द्य आहे,' हा अर्थ. प्राकृत भाषेत पुंलिंग व नपुंसकलिंग यांबाबत काही नियम नाही (म्हणून दिअसअम्[4]–दिवस–हा शब्द येथे नपुंसकलिंगी प्रथमा एकवचनात वापरला असला, तरी तो दोष नाही.) आणि मी तुझ्याकडे सर्वथैव दुर्लक्ष करणार आहे असेही नाही, कारण मी येथेच (म्हणजे आता दाखविलेल्या बिछान्यावरच) आहे, म्हणून (ती जागा) नीट पाहून घे, मी दुसरीकडे जात नाही, म्हणून हा दिवस (म्हणजे दिवसाचा उरलेला भाग) तेवढा आपण एकमेकांच्या मुखांकडे केवळ पाहून करमणूक करीत घालवू, हा आशय. रात्र पडताक्षणीच तू कामान्ध (म्हणजे कामवासनेने बेभान) होऊन माझ्या खाटेवर आदळू नको, तर हलके हलके (आवाज न करता) गुप्तपणे (आपल्या मार्गात) काट्याप्रमाणे (म्हणजे शत्रुवत्) असलेली माझी सासू झोपली आहे ना, याची खात्री करून मग ये" हे इतके येथे सूचित केले जात आहे.

टीपा

१. 'निपात' म्हणजे 'निपातन' ही व्याकरणातील एक पारिभाषिक संज्ञा असून तिचा अर्थ 'सिद्ध स्वरूपाचा (म्हणजे ज्याच्या बाबतीत मूळ शब्द व प्रत्यय असा विभाग दाखविता येत नाही, असा) शब्द.'

२. तिने त्या पान्थाला स्वतःच्या गरजेसाठी बोलाविले, येथवर तिची मजल

गर्जी नाही. त्याच्या मनात प्रेम उत्पन्न झाल्याने त्या रूपगर्वितेने त्याला गुप्तपणे अनुमति दिली, इतकाच आशय आहे.

३. पाहा, **काव्यप्रकाश**, उल्लास ३, कारिका १ व २. 'काकु' शब्दाचे विवरण पृ. १०७ वर ७९ व्या टीपेत आलेच आहे.

४. संस्कृत भाषेतही 'दिवस' हा शब्द पुंलिंगी व नपुंसकलिंगी आहे. **दिअसअम्** ( म्हणजे **दिवसकम्** ) असा मूळ पद्यातला शब्द आहे, त्याचा वाच्य अर्थ 'दिवसाच्या वेळात' म्हणजे 'दिवस आहे तोवर' असा आहे. म्हणजे वाच्यार्थ-दशेमध्ये ही कालवाचक द्वितीया आहे. पण या शब्दाचा व्यंग्यार्थ 'आता मेल्या दुष्ट दिवसाची वेळ चालू आहे, तेव्हा मी काय करू ?' असा आहे. म्हणजे **दिअसअम्** ही प्रथमा विभक्ति घ्यावयाची, आणि क या अर्थाचा अ प्रत्यय कुत्सित, निन्द्य या अर्थाचा आहे असे मानावयाचे. वाच्यार्थदशेमध्ये मात्र हा प्रत्यय केवळ स्वार्थी ( म्हणजे मूळ शब्दाच्या अर्थात काहीही बदल घडवून न आणणारा ) आहे.

५. विवाहित स्त्रीला वाटसराविषयी, म्हणजे अनुचित व्यक्तीविषयी उत्पन्न झालेल्या रतिभावाचे या श्लोकात वर्णन केलेले असल्याने हे उदाहरण 'रसाभासा'चे आहे.

ध्वन्यालोकः

क्वचिद्वाच्ये विधिरूपेऽनुभयरूपो यथा–
वच्च मह च्चिअ एक्काएँ होंतु णीसासरोइअव्वाइं ।
मा तुज्ज वि तीएँ विणा दक्खिण्णहअस्स जाअंतु ॥

ध्वन्यालोक

काही ठिकाणी वाच्यार्थ विधिस्वरूप असताना व्यंग्यार्थ हा विधि किंवा निषेध यांपैकी कोठल्याच स्वरूपाचा नसतो. उदा.—

जा, उसासे आणि रडणी ही माझ्या एकटीच्याच वाट्याला असू देत. तू ( केवळ ) दाक्षिण्याच्या आहारी गेल्यामुळे तुझ्या प्रेयसीचा तुला वियोग घडून ती ( म्हणजे उसासे आणि रडणी ) आणखी तुझ्याही बाबतीत उत्पन्न व्हायला नकोत !

लोचनम्

व्रज ममैवैकस्या भवन्तु निःश्वासरोदितव्यानि ।
मा तवापि तया विना दाक्षिण्यहतस्य जनिषत ॥

अत्र व्रजेति विधिः । न प्रमादादेव नायिकान्तरसंगमनं तव, अपि तु गाढानुरागात्, येनान्यादृङ्मुखरागाः गोत्रस्खलनादि च केवलं पूर्वकृतानुपालनात्मना दाक्षिण्येनैकरूपत्वाभिमानेनैव त्वमत्र स्थितः । तत्सर्वथा शठोऽसीति गाढमन्युरूपोऽयं खण्डितनायिकाभिप्रायोऽत्र प्रतीयते । न चासौ अभ्याभावरूपो निषेधः, नापि विध्यन्तरमेवान्यनिषेधाभावः ।

लोचन

या उदाहरणात 'जा' असा विधी (वाच्य) आहे. तुझे दुसऱ्या नायिकेशी समागम करणे हे काही केवळ योगायोगामुळेच घडले नाही, तर तुझ्या तिच्यावरील गाढ प्रेमामुळेच. त्यामुळेच तर तुझ्या मुखाला नेहमीपेक्षा निराळाच रक्तिमा प्राप्त झालेला दिसत आहे आणि गोत्रस्खलनादि[1] चुका तुझ्याकडून घडताना दिसत आहेत. केवळ पूर्वी मला दिलेले अभिवचन पाळावयाचे या स्वरूपाच्या दाक्षिण्यामुळे (म्हणजे औपचारिकपणामुळे) आणि आपण पूर्वी होतो तसेच माझ्याशी एकनिष्ठ आहोत याचे प्रदर्शन करण्यासाठी तू येथे थांबला आहेस. त्यामुळे 'तू सर्वथैव लबाड, बेइमान आहेस' अशा प्रकारचा, खण्डित[2] नायिकेच्या तीव्र कोपाच्या स्वरूपाचा अभिप्राय येथे सूचित होत आहे. तो सूचित अर्थ 'जाऊ नको' अशासारखा, निषेधाच्या स्वरूपाचाही नाही, किंवा 'जा' अशासारखा विधीच्या स्वरूपाचाही नाही (किंवा 'गेलास तरी चालेल' अशा अनुज्ञेच्या स्वरूपाचाही नाही.)[3]

टीपा

१. गोत्रस्खलन म्हणजे नायिकेला संबोधताना नायकाच्या तोंडून अनवधानाने दुसऱ्या स्त्रीचे नाव उच्चारले जाणे.

२. 'साहित्यदर्पणा'त (पाहा, ३–११७) 'खण्डित' नायिकेचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे–

पार्श्वमेति प्रियो यस्या अन्यसंभोगलाञ्छितः ।
सा खण्डितेति कथिता धीरैरीर्ष्याकषायिता ॥

३. 'हे धार्मिका !'...इ. पद्यात भ्रमणनिषेध हा व्यंग्यार्थ आहे. 'सासूबाई'... इ. पद्यात तो म्हणजे व्यंग्यार्थ 'शय्येवर येण्यास अनुज्ञा' या स्वरूपाचा आहे. परंतु प्रस्तुत पद्यात तो विधिरूप, निषेधरूप किंवा अनुज्ञारूपही नसून त्याचे स्वरूप नायिकेने नायकाची केलेली निर्भर्त्सना, असे आहे.

ध्वन्यालोकः

क्वचिद्वाच्ये प्रतिषेधरूपेऽनुभयरूपो यथा–
दे आ पसिअ णिवत्तसु मुहससिजोण्हाविलुत्ततमणिवहे ।
अहिसारिआण विग्घं करोसि अण्णाण वि हआसे ॥

ध्वन्यालोक

काही वेळा वाच्यार्थ निषेधस्वरूपी असताना प्रतीयमान अर्थ हा विधि अगर निषेध यांपैकी कोणत्याच स्वरूपाचा नसतो. उदा.—

'हे बघ, माझी तुला विनंती आहे. कृपा कर आणि आधी परत फीर. तू आपल्या मुखचंद्राच्या चांदण्यामुळे अंधाराचे पटल नाहीसे केले आहेस. त्यामुळे हे करंटे ! तू ( स्वतःच्याच नव्हे, तर ) दुसऱ्या अभिसारिकांच्याही सुखात विघ्न उत्पन्न करीत आहेस.'

लोचनम्

दे इति निपातः प्रार्थनायाम् । आ इति तावच्छब्दार्थे । तेनायमर्थः–
प्रार्थये तावत्प्रसीद निवर्तस्व मुखशशिज्योत्स्नाविलुप्ततमोनिवहे ।
अभिसारिकाणां विघ्नं करोष्यन्यासामपि हताशे ॥

अत्र व्यवसितादृगमनान्निवर्तस्वेति प्रतीतेर्निषेधो वाच्यः । गृहागता नायिका गोत्रस्खलिताद्यपराधिनि नायके सति ततः प्रतिगन्तुं प्रवृत्ता, नायकेन चाटूपक्रमपूर्वकं निवर्त्यते । न केवलं स्वात्मनो मम च निर्वृतिविघ्नं करोषि, यावदन्यासामपि । ततस्तव न कदाचन सुखलवलाभोऽपि भविष्यतीत्यत एव हताशासीति वल्लभाभिप्रायरूपश्चाटुविशेषो व्यङ्ग्यः ।

यदि वा सख्योपदिश्यमानापि तदवधीरणया गच्छन्ती सख्योच्यते–न केवलमात्मनो विघ्नं करोषि, लाघवादबहुमानास्पदमात्मानं कुर्वती, अत एव हताशा, यावद्वदनचन्द्रिकाप्रकाशितमार्गतयान्यासामप्यभिसारिकाणां विघ्नं करोषीति सख्यभिप्रायरूपश्चाटुविशेषो व्यङ्ग्यः। अत्र तु व्याख्यान-द्वयेऽपि व्यवसितात्प्रतीपगमनात्प्रियतमगृहगमनाच्च निवर्तस्वेति पुनरपि वाच्य एव विश्रान्तेर्गुणीभूतव्यङ्गयभेदस्य प्रेयोरसवदलङ्कारस्योदाहरण-मिदं स्यात्, न ध्वनेः।

तेनायमत्र भावः– काचिदिद्वभसात्प्रियतममभिसरन्ती तद्गृहा-भिमुखमागच्छता तेनैव हृदयवल्लभेनैवमुपश्लोक्यतेऽप्रत्यभिज्ञानच्छलेन। अत एवात्मप्रत्यभिज्ञापनार्थमेव नर्मवचनं हताश इति। अन्यासां च विघ्नं करोषि तव चेप्सितलाभो भविष्यतीति का प्रत्याशा। अत एव मदीयं वा गृहमागच्छ, त्वदीयं वा गच्छावेत्युभयत्रापि तात्पर्यादनुनय-रूपो वल्लभाभिप्रायश्चाट्वात्मा व्यङ्ग्य इयत्येव व्यवतिष्ठते। अन्ये तु 'तटस्थानां सहृदयानामभिसारिकां प्रतीयमुक्तिः' इत्याहुः। तत्र हताशे इत्यामन्त्रणादि युक्तमयुक्तं वेति सहृदया एव प्रमाणम्।

लोचन

(प्रस्तुत गाथेतील) दे हा निपात (म्हणजे अव्यय) 'प्रार्थना' या अर्थी वापरला आहे व आ हा निपात तावत् (म्हणजे 'आधी') या अर्थी आहे. या गाथेमध्ये 'तू योजिलेल्या जाण्यापासून मागे फीर' या अर्थाची प्रतीती होत असल्याने ('जाऊ नकोस' असा) 'निषेध' वाच्य आहे.

नायिका (नायकाच्या) घरी आलेली असताना नायकाने 'गोत्र-स्खलन'[1] वगैरे काहीतरी अपराध केला म्हणून ती तेथून परत जावयाला उद्युक्त झाली. त्यामुळे नायक प्रथम तिची स्तुती करून तिला, पुढील शब्दांनी, निघून जाण्यापासून परावृत्त करीत आहे–

'(येथून परत जाऊन) तू केवळ स्वतःच्या आणि माझ्या सुखात विघ्न उत्पन्न करीत आहेस एवढेच नाही, तर इतर अभिसारिकांच्या[2] सुखातदेखील! या कारणामुळे तुला केव्हाही लवमात्र सुख मिळणार

नाही. म्हणूनच तू करंटी आहेस,' अशा प्रकारे प्रियकराच्या मनात असलेली विशेष प्रकारची प्रशंसा सूचित होत आहे.

किंवा (वरील गाथेचा अर्थ लावण्याचा दुसरा प्रकार असा)—

नायिका आपण होऊन प्रियकराकडे जात असताना तिची मैत्रीण तिला (नायकास भेटण्यास न जाण्याचा) उपदेश करीत आहे. तथापि त्याकडे दुर्लक्ष करून नायिका जात आहे हे पाहिल्यावर ती मैत्रीण तिला पुढीलप्रमाणे सांगते—

(अशा प्रकारची लाचारी दाखवून तू नायकाच्या दृष्टीने स्वत:चे अवमूल्यन करून घेत आहेस.) त्यामुळे तू केवळ स्वत:च्याच अभिमानास धक्का लावीत आहेस आणि म्हणूनच तू दुर्दैवी आहेस, इतकेच नाही तर आपल्या वदनचंद्राच्या चांदण्यामुळे आसमंत उजळवून इतर अभिसारिकांच्याही सुखात अडथळा उत्पन्न करीत आहेस.' अशा प्रकारे तिची स्तुती करण्याचा सखीचा अभिप्राय येथे सूचित होत आहे.

परंतु (अर्थ लावण्याच्या) वरील दोन्ही प्रकारांमध्ये 'तू मनाशी ठरविलेल्या स्वगृही परत जाण्यापासून परावृत्त हो' आणि 'प्रियकराच्या घराकडे आपण होऊन जाण्यापासून परावृत्त हो' अशा तऱ्हेने वाच्यार्थातच पुन: पर्यवसान होत आहे[3] त्यामुळे हे काव्य ध्वनीचे उदाहरण होऊ शकणार नाही, तर प्रेयोऽलंकार[4] किंवा रसवद् अलंकार[5] या गुणीभूतव्यङ्ग्य[6] प्रकाराचे हे उदाहरण होईल.

त्यामुळे या उदाहरणातला आशय असा समजावा :—

कोणी एक नायिका उत्कंठेने आपल्या प्रियकरास भेटावयास निघालेली असताना तो प्रियकरच तिच्या घराकडे येत असतो. तो तिला न ओळखल्याचा बहाणा करून तिची (वरील गाथेत सांगितल्याप्रमाणे) प्रशंसा करीत आहे. म्हणूनच त्याने केवळ 'मी येथेच आलो आहे' याची तिला जाणीव करून देण्यासाठीच 'हताशे' (करंटे) हे विशेषण तिला उद्देशून गमतीने वापरले आहे. इकडे दुसऱ्या अभिसारिकांच्या सुखातही तू विघ्न करीत आहेस, तेव्हा तुझाही मनोरथ सफल होण्याची कोठली आशा? म्हणूनच 'वाटल्यास तू माझ्या घरी चल किंवा आपण दोघेही तुझ्या घरी जाऊ' या दोहोंपैकी कोणताही अर्थ प्रकट करण्याची वक्त्याची इच्छा नाही,[7] (नायिकेची स्तुती करणे हीच

त्याची इच्छा आहे) म्हणून शेवटी विधी अगर निषेध यांपैकी कोणत्याही स्वरूपाचा नसलेला, 'तू अद्वितीय लावण्यवती आहेस' असा स्तुतिस्वरूप असलेला प्रियकराचा अभिप्राय येथे व्यङ्ग्य आहे व तो व्यङ्ग्यार्थ तेथेच थांबतो (म्हणजे तो मुख्य म्हणून राहतो, कोणत्याही वाच्यार्थाला उपकारक म्हणजेच वाच्यार्थाचे अंग होत नाही) म्हणून हे गुणीभूतव्यङ्ग्याचे उदाहरण न होता ध्वनिकाव्याचे होऊ शकते.[6]

पण दुसरे कोणी (विवरणकार) तटस्थ (म्हणजे नायिकेवर प्रेम करीत नसलेल्या) (सहृदयांचे (म्हणजे अर्थात स्त्रीसौंदर्याची जाण असलेल्यांचे) हे (नायिकेला उद्देशून) उद्‌गार आहेत असे म्हणतात. पण त्या पक्षी 'हताशे' हे संबोधन वगैरे गोष्टी (आणि मूळ गाथेतील 'कृपा कर' या अर्थाचा दे हा निपात) योग्य आहे की अयोग्य, ही गोष्ट सहृदयांनीच ठरवावी.

टीपा

१. पृ. ११० वरील १ ली टीप पाहा.

२. अमरकोशात अभिसारिकेचे लक्षण पुढीलप्रमाणे सांगितले आहे– कान्तार्थिनी तु या याति संकेतं साऽभिसारिका। (म्हणजे प्रियकराला भेटण्यासाठी जी संकेतस्थलाकडे जाते, ती अभिसारिका होय.

३. अर्थ लावण्याच्या वरील दोन्ही प्रकारांमध्ये 'जाऊ नकोस' हा वाच्यार्थच मुख्य आहे. व्यङ्ग्य स्तुति ही त्या वाच्यार्थाला उपकारक आहे. तिने परत फिरावयास प्रवृत्त व्हावे यासाठी तर ती स्तुति आहे. अशा रीतीने व्यङ्ग्यार्थ हा मुख्य असलेल्या वाच्यार्थाला अंगभूत असल्याने हे गुणीभूतव्यङ्ग्याचे उदाहरण आहे.

४. एखाद्या उदाहरणात 'भाव' (म्हणजे देव, गुरु, मित्र इत्यादींबद्दलची (प्रीति) गुणीभूत असल्यास ते प्रेयोऽलंकाराचे उदाहरण होय. प्रेयोऽलंकाराचा उल्लेख ध्वन्यालोक, काशी आवृत्ती, पृ. १९१ वर आला आहे.

५. शृंगार वगैरेंपैकी एखादा रस एखाद्या काव्यात गुणीभूत असल्यास ते रसवदलंकाराचे उदाहरण होय. वरील गाथा नायकाने नायिकेला उद्देशून म्हटली आहे असे मानल्यास ती रसवदलंकाराचे उदाहरण होईल. तीच सखीने नायिकेला उद्देशून म्हटली आहे असे समजल्यास ती प्रेयोऽलंकाराचे उदाहरण होईल.

६. व्यङ्ग्यार्थ ज्या ज्या काव्यात वाच्यार्थाहून प्रधान असेल (पुढे कारिका

१३ पाहा ) ते ध्वनिकाव्याचे व ज्यात व्यङ्ग्यार्थ वाच्यार्थाहून गौण असेल ते काव्य गुणीभूतव्यङ्ग्याचे ( पुढे उद्योत ३ कारिका ३४ पाहा ). उदाहरण समजावे.

७. कुप्पुस्वामींच्या आवृत्तीमध्ये अतात्पर्यात् असा पाठ आहे व तो आम्हाला इतर आवृत्यांतील तात्पर्यात् या पाठापेक्षा ग्राह्य वाटतो. कारण तात्पर्य ( म्हणजे वक्त्याची इच्छा ) नायिकेची स्तुति करणे हेच आहे, माझ्या घरी जाणे किंवा तुझ्या घरी जाणे हे नाही. अतात्पर्यात् या पाठाला कल्पलता-विवेक या टीकाग्रंथात (पृ. १०९, पंक्ति ४ येथे) तोच मूळ पाठ असल्याचा सबळ पुरावा मिळतो. पण तात्पर्यात् हा पाठ स्वीकारल्यास माझ्या घरी जाणे किंवा तुझ्या घरी जाणे यांपैकी कोणता तरी एक किंवा दोनही वक्त्याच्या मनात आहे असे मानावे लागेल व मग नायिकेची स्तुति करणे ही वक्त्याची इच्छा याच्याशी ते जुळणार नाही

८. वस्तुत: आनन्दवर्धनांचा हेतु व्यङ्ग्यार्थ हा वाच्यार्थाहून अगदी भिन्न असतो एवढेच दाखविण्याचा आहे. ध्वनिकाव्याची व गुणीभूतव्यङ्ग्यकाव्याची व्याख्या नंतर केली जाणार असल्याने आता ही सर्व उदाहरणे ध्वनीचीच असली पाहिजेत, गुणीभूतव्यङ्ग्याची नसली पाहिजेत असा आग्रह धरणे योग्य होणार नाही. 'हे धार्मिका... ही गाथा गुणीभूतव्यङ्ग्याचीच आहे, कारण तेथे हिंडू नकोस ' हा व्यंग्यार्थ 'हिंड' या अडणाऱ्या वाच्यार्थाची संगति लावण्याकरिताच खर्ची पडतो, म्हणजे तेथे 'हिंडू नकोस' हा व्यंग्यार्थ वाच्यार्थाचे अंगच बनतो. 'हिंड' हा वाच्यार्थ अडण्याचे कारण गाथेतील 'दृप्त सिंह', 'धार्मिक' वगैरे पदे. अभिनवगुप्तांच्या मते हे तिसरे विवरण पहिल्या दोन विवरणांपेक्षा सरस आहे, कारण पहिल्या दोहोंमध्ये हे पद्य ध्वनीचे उदाहरण न ठरता गुणीभूतव्यङ्ग्याचे होते. तिसऱ्या विवरणामध्ये मात्र 'तुझ्या घराकडे जाऊ किंवा माझ्या घराकडे जाऊ, यांपैकी कोणताही अर्थ प्रकट करण्याची इच्छा नसल्याने निवर्तस्व ( परत फीर ) हा वाच्यार्थ शिल्लक राहात नाही. म्हणून नायिकेची प्रशंसा हा व्यङ्ग्यार्थ वाच्यार्थाला गुणीभूत होण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाही

ध्वन्यालोकः

**क्वचिद्वाच्याद्विभिन्नविषयत्वेन व्यवस्थापितो यथा—**

**कस्य व ण होइ रोसो (दट्ठूण पिआएँ सव्वणं अहरं।)**

**सभमरपडमग्घाइरि (वारिअवामे सहसु एण्हिं॥)**

अन्ये चैवंप्रकारा वाच्यादिभेदिनः प्रतीयमानभेदाः सम्भवन्ति। तेषां दिङ्मात्रमेतत्प्रदर्शितम्। द्वितीयोऽपि प्रभेदो वाच्याद्विभिन्नः सप्रपञ्चमग्रे दर्शयिष्यते।

ध्वन्यालोक

काही वेळा वाच्यार्थाहून व्यंग्यार्थाचा विषयही वेगळा असल्याचे सहृदयांना स्पष्टपणे निश्चित करिता येते. उदा.—

' आपल्या प्रियेच्या अधरोष्ठावर व्रण असलेला पाहून कोणाला राग येणार नाही ? भ्रमराने युक्त असलेल्या कमळाचा सुगंध सेवन करण्याची तुला भारी खोड. तसे करू नको म्हणून सांगितले, तरी ते तू मानीत नाहीस. तेव्हा आता हो ( परिणाम ) सहन करायला तयार !

आणखीही अशा तऱ्हेचे वाच्याहून भिन्न असणारे प्रतीयमानाचे वेगवेगळे प्रकार संभवतात. त्याबाबत वर केवळ दिग्दर्शन केले आहे.

व्यंग्यार्थाचा दुसरा मोठा प्रकार ( म्हणजे व्यंग्य अलंकार, हा ) देखील वाच्यार्थाहून भिन्न असतो, हे सविस्तरपणे पुढे दाखवण्यात येईल.

लोचनम्

एवं वाच्यव्यङ्ग्ययोर्धार्मिकपान्थप्रियतमाभिसारिकाविषयैक्येऽपि स्वरूपभेदाद्भेद इति प्रतिपादितम्। अधुना तु विषयभेदादपि व्यङ्ग्यस्य वाच्याद्भेद इत्याह– क्वचिद्वाच्यादिति। व्यवस्थापित इति। विषयभेदोऽपि विचित्ररूपो व्यवतिष्ठमानः सहृदयैर्व्यवस्थापयितुं शक्यत इत्यर्थः।

कस्य वा न भवति रोषो दृष्ट्वा प्रियायाः सव्रणमधरम्।
सभ्रमरपद्माघ्राणशीले वारितवामे सहस्वेदानीम्॥

कस्य वेति। अनीर्ष्यालोरपि भवति रोषो दृष्ट्वैव, अकृत्वापि कुतश्चिदेवापूर्वतया प्रियायाः सव्रणमधरमवलोक्य। सभ्रमरपद्माघ्राणशीले, शीलं हि कथंचिदपि वारयितुं न शक्यम्। वारिते वारणायां, वामे तदनङ्गीकारिणि। सहस्वेदानीमुपालम्भपरम्परामित्यर्थः। अत्रायं भावः– काचिदविनीता कुतश्चित्खण्डिताधरा निश्चिततत्सविधसंनिधाने तद्भर्तरि तमनवलोकमानयेव कयाचिद्विदग्धसख्या तद्वाच्यतापरिहारा-

र्यैवमुच्यते। सहस्वेदानीमिति वाच्यमविनयवतीविषयम्। भर्तृविषयं तु अपराधो नास्तीत्यावेद्यमानं व्यङ्ग्यम्। सहस्वेत्यपि च तद्विषयं व्यङ्ग्यम्। तस्यां च प्रियतमेन गाढमुपालभ्यमानायां तद्व्यलीकशङ्कित-प्रातिवेशिकलोकविषयं चाविनयप्रच्छादनेन प्रत्यायनं व्यङ्ग्यम्। तत्स-पत्न्यां च तदुपालम्भतदविनयप्रहृष्टायां सौभाग्यातिशयख्यापनं प्रियाया इति शब्दबलादिति सपत्नीविषयं व्यङ्ग्यम्। सपत्नीमध्ये इयता खली-कृतास्मीति लाघवमात्मनि ग्रहीतुं न युक्तं, प्रत्युतायं बहुमानः, सहस्व शोभस्वेदानीमिति सखीविषयं सौभाग्यप्रख्यापनं व्यङ्ग्यम्। अद्यं तव प्रच्छन्नानुरागिणी हृदयवल्लभेत्थं रक्षिता, पुनः प्रकटरदनदंशनविधिर्न विधेय इति तच्चौर्यकामुकविषयसंबोधनं व्यङ्ग्यम्। इत्थं मयैतदपह्नुत-मिति स्ववैदग्ध्यख्यापनं तटस्थविदग्धलोकविषयं व्यङ्ग्यमिति। तदेत-दुक्तं व्यवस्थापितशब्देन। अग्र इति द्वितीयोद्द्योते 'असंलक्ष्यक्रम-व्यङ्ग्यः क्रमेणोद्द्योतितः परः' इति विवक्षितान्यपरवाच्यस्य द्वितीय-प्रभेदवर्णनावसरे। यथा हि विधिनिषेधतदनुभयात्मना रूपेण संकलय्य वस्तुध्वनिः संक्षेपेण सुवचः, तथा नालङ्कारध्वनिः, अलङ्काराणां भूयस्त्वात्। तत एवोक्तम्—सप्रपञ्चमिति।

लोचन

याप्रमाणे वरील चारही उदाहरणांमध्ये वाच्यार्थ व व्यङ्ग्यार्थ या दोहोंचा विषय एकच असला, तरी म्हणजे दोन्ही अर्थ अनुक्रमे धार्मिक, पान्थ, प्रियतम आणि अभिसारिका अशा एकेकाच व्यक्तीला उद्देशून असले, तरी वाच्यार्थ व व्यङ्ग्यार्थ यांचे स्वरूप (विधी, निषेध, इ.) वेगळे असल्यामुळे हे दोन्ही अर्थ (परस्परांहून) भिन्न आहेत, असे प्रतिपादन केले.

पण आता काही वेळा त्या दोन अर्थांचे विषयही (तो अर्थ ज्या व्यक्तीला उद्देशून असेल ती व्यक्ती त्या अर्थाचा 'विषय' होय) वेगळे असू शकतात, म्हणूनही व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाहून निराळा होय हे 'काही वेळा वाच्यार्थाहून '... आणि 'निश्चित करण्यात आला आहे'....... वगैरे शब्दांनी सांगतात. विषय म्हणजे उद्दिष्ट व्यक्तीदेखील निरनिराळ्या प्रकारच्या असू शकतात हे सहृदयांना स्पष्टपणे दिसते, हा भावार्थ.

'कोणाला (राग येणार नाही)' वगैरे. ईर्ष्यारहित (स्वभावाच्या) व्यक्तीलासुद्धा आपल्या प्रियेच्या अधरोष्ठावर आपण स्वत: (व्रण) केलेला नसतानाही तो दुसऱ्या कोणातरी व्यक्तीकडून झालेला पाहिल्याने केवळ पाहूनच राग येतो. 'भ्रमराने युक्त असलेले कमळ हुंगण्याची तुझी खोड आहे......कारण एकदा जडलेल्या खोडीचे निवारण काही केल्या करणे शक्य नसते. प्रतिबंध केला असताना, म्हणजे 'करू नको' म्हणून सांगितले असतानाही, ते सांगणे तू कधी मानीत नाहीस. आता सहन कर.' अर्थात इतरांनी दिलेल्या टोचण्यामागून टोचण्या. या ठिकाणी तात्पर्य असे आहे–

कोणीतरी अ-सती स्त्री आपला अधरोष्ठ कोणा प्रियकराकडून व्रणयुक्त करून घेऊन आली आहे. तिचा पती तिच्या जवळपासच आहे याची तिच्या मैत्रिणीला खात्री आहे. पण त्याला आपण जणू पाहिलेच नाही असे भासवून ती चतुर मैत्रीण त्या अ–सती स्त्रीला तिच्यावर तिच्या पतीने ठपका ठेवू नये म्हणून वरीलप्रमाणे म्हणत आहे. 'आता सहन कर (पतीची बोलणी)' हा वाच्यार्थ त्या अ–सती स्त्रीला उद्देशून आहे (विषय क्रमांक१). 'हिचा काहीच अपराध नाही' हा प्रतिपादिला जाणारा व्यंग्यार्थ तिच्या पतीला उद्देशून आहे. (विषय क्रमांक २). 'सहन कर' यातला ('आपला राग सहन कर म्हणजे गिळून टाक' हा) सूचित अर्थसुद्धा तिच्या पतीलाच उद्देशून आहे (क्र. २) तिचा पति तिला खूप मारताडन करू लागल्यावर, तिचा अपराध असावा असा शेजाऱ्यांना संशय आला, तर तिच्या 'गैरवर्तणुकीवर पांघरूण घालून त्या द्वारा तिजविषयी (शेजाऱ्यांमध्ये) विश्वास उत्पन्न करणे' हा व्यङ्ग्य अभिप्राय शेजाऱ्यांना उद्देशून आहे (क्र. ३). तिला खाली लागणारी बोलणी व तिची उच्छृंखल वागणूक यांमुळे तिच्या सवतीला हर्षाच्या उकळ्या फुटू लागलेल्या असताना वरील उदाहरणातला 'प्रियेचा' हा शब्द योजून त्याच्या साहाय्याने नायिकेचा विशेष मोहकपणा प्रकाशित करणे हा व्यङ्ग्यार्थ तिच्या सवतीला उद्देशून आहे. (क्र. ४( 'या इतक्या (प्रकरणा) मुळे (म्हणजे माझा अविनय उजेडात आल्यामुळे) मी सवतींमध्ये अवमानित झाले, अशा विचाराने तू आपलेकडे कमीपणा घेणे योग्य नाही, उलट पतीव्यतिरिक्त दुसऱ्यांच्याही

प्रेमाला तू पात्र आहेस हा तुझा एक मोठेपणाच आहे. तेव्हा आता तू खुशाल मान ताठ करून मिरवावेस,' अशा रीतीने तिचा म्हणजे नायिकेचा आकर्षकपणा प्रकट करणे हा व्यङ्ग्य आशय नायिकेच्या इतर मैत्रिणींना उद्देशून आहे (क्र ५). 'तुझ्यावर गुप्तपणे प्रेम करणाऱ्या हिचे (म्हणजे नायिकेचे) मी आज या प्रकारे रक्षण केले, आता यानंतर पुन: तू स्पष्ट दिसेल अशा रीतीने अधरोष्ठावर दंतव्रण करू नयेस ' असे सांगून (तिच्या प्रियकराला) सावध करणे हा व्यङ्ग्य अभिप्राय त्या नायिकेवर प्रेम करणाऱ्या कामुकाला उद्देशून आहे (क्र.६). हे नायिकेचे गैरवर्तन मी या प्रकारे दडवले ' असे स्वत:चे चातुर्य नजरेस आणून देणे हा व्यङ्ग्यार्थ (जवळपास असणाऱ्या) तटस्थ (म्हणजे प्रत्यक्ष संबंध नसलेल्या पण ज्यांना तिची चालचलणूक माहीत आहे अशा) चाणाक्ष लोकांना उद्देशून आहे (क्र. ७) हेच ते व्यवस्थापित: (निरनिराळ्या विषयांना म्हणजे श्रोत्यांना अनुसरून व्यंग्यार्थाच्या बदलत जाणाऱ्या स्वरूपाची सहृदयांना निश्चित कल्पना करता येते) या शब्दाने सुचविले आहे.

पुढे म्हणजे दुसऱ्या उद्योतातील ' ज्यातला व्यङ्ग्यार्थ समजण्याचा क्रम स्पष्टपणे लक्षात येत नाही असा (एक प्रकार) आणि (ज्यातला व्यङ्ग्यार्थ) क्रमाने प्रकाशित होतो असा दुसरा (प्रकार) या (क्र.२च्या कारिकेने ' विवक्षितान्यपरवाच्य ' ध्वनीच्या दुसऱ्या (उप) प्रकाराचे (म्हणजे संलक्ष्यक्रम ध्वनिप्रकाराचे) वर्णन करतेवेळी, कारण विधिरूप, निषेधरूप किंवा विधि अगर निषेध या दोहोंपैकी कोणत्याच स्वरूपाचा नसणारा, अशा प्रकारांनी वस्तुध्वनीच्या प्रकारांची रूपे पूर्णपणे लक्षात घेऊन वस्तुध्वनी संक्षेपाने वर्णन करणे जसे सोपे आहे, तसे अलंकारध्वनीच्या बाबतीत नाही, कारण अलंकारांची संख्या फारच मोठी आहे. म्हणूनच (दुसरा मोठा ' अलंकारध्वनि ' हा प्रकार वाच्यार्थाहून भिन्न असतो, हे) ' सविस्तरपणे ' दाखवण्यात येईल, असे (वृत्तीत) म्हटले आहे.

टीपा

१. सह या धातूचा प्राकृत भाषेत ' शोभून दिसणे ' असाही अर्थ आहे. त्याला अनुलक्षून अभिनवगुप्तांनी हा व्यंग्यार्थ सांगितला आहे.

ध्वन्यालोकः

तृतीयस्तु रसादिलक्षणः प्रभेदो वाच्यसामर्थ्याक्षिप्तः प्रकाशते, न तु साक्षाच्छब्दव्यापारविषयः, इति वाच्याद्विभिन्न एव। तथा हि वाच्यत्वं तस्य स्वशब्दनिवेदितत्वेन वा स्यात्, विभावादिप्रतिपादनमुखेन वा। पूर्वस्मिन् पक्षे स्वशब्दनिवेदितत्वाभावे रसादीनामप्रतीतिप्रसङ्गः। न च सर्वत्र तेषां स्वशब्दनिवेदितत्वम्। यत्राप्यस्ति तत्, तत्रापि विशिष्टविभावादिप्रतिपादनमुखेनैवैषां प्रतीतिः। स्वशब्देन सा केवलमनूद्यते, न तु तत्कृता, विषयान्तरे तथा तस्या अदर्शनात्।

न हि केवलशृङ्गारादिशब्दमात्रभाजि विभावादिप्रतिपादनरहिते काव्ये मनागपि रसवत्त्वप्रतीतिरस्ति। यतश्च स्वाभिधानमन्तरेण केवलेभ्योऽपि विभावादिभ्यो विशिष्टेभ्यो रसादीनां प्रतीतिः, केवलाच्च स्वाभिधानादप्रतीतिः, तस्मादन्वयव्यतिरेकाभ्यामभिधेयसामर्थ्याक्षिप्तत्वमेव रसादीनाम्। न त्वभिधेयत्वं कथञ्चित्, इति तृतीयोऽपि प्रभेदो वाच्याद्भिन्न एवेति स्थितम्। वाच्येन त्वस्य सहेव प्रतीतिरित्यग्रे दर्शयिष्यते।

ध्वन्यालोक

पण व्यंग्यार्थाचा तिसरा, ' रसादिस्वरूपी ' प्रकार वाच्याच्या ( व्यंजकत्वरूपी ) सामर्थ्याने सूचित होऊनच प्रकाशित होतो. तो कधीही साक्षात् शब्दव्यापाराचा ( म्हणजे अभिधेचा ) विषय होऊ शकत नाही. म्हणून तोही प्रकार वाच्याहून वेगळाच आहे. कारण तो वाच्य केव्हा असू शकेल ? तर एकतर त्याचा स्वशब्दांनी ( म्हणजे रस, शृंगार इ नावांनी ) उल्लेख करून, किंवा विभावादिकांचे वर्णन करून त्याद्वारे. पहिल्या पक्षी रसादींची नावे जेथे उपयोजिलेली नसतील, तेथे रसादींची प्रतीति न होण्याची आपत्ति ओढवेल ! आणि सगळ्या उदाहरणात काही रसादींचा स्वशब्दांनी उल्लेख केलेला नसतो. ज्या उदाहरणात तो तसा केलेला असतो. तेथेदेखील त्या रसादिकांची प्रतीति विशिष्ट विभावादिकांच्या वर्णनाच्या द्वारेच होते. ( विभावादिकांमुळे आधीच झालेल्या ) प्रतीतीचा स्वशब्दांनी केवळ अनुवाद म्हणजे पुनर्निर्देश केला जातो. ती प्रतीति काही स्वशब्दांनी म्हणजे त्यांच्या सामान्य किंवा विशेष नावांचा उल्लेख केल्याने घडून आलेली नसते. कारण इतर उदाहरणात

( म्हणजे जेथे स्वशब्द म्हणजे केवळ रसादींची नावेच उल्लेखिलेली असतात तेथे ) काही रसादींची प्रतीति स्वशब्दांनी घडून आलेली दिसत नाही. कारण ज्या काव्यात विभाव वगैरेंचे प्रतिपादन नसते आणि केवळ 'शृंगार' वगैरे शब्दच असतात अशा काव्यामुळे रसादिकांची प्रतीति अल्पांशानेदेखील होत नाही. आणि ज्या अर्थी रसादींचे नाव उल्लेखिलेले नसताना सुद्धा केवळ ( त्या त्या स्थायी भावाला अनुरूप अशा ) विभावादिकांचेच प्रतिपादन केलेले असल्यामुळे केवळ विभावादींमुळेही रसादींची प्रतीति होते आणि ज्या अर्थी रसादींच्या नुसत्या नामोल्लेखामुळे रसादींची प्रतीति होत नाही, त्या अर्थी अन्वय आणि व्यतिरेक[१] यांवरून रसादि हे कोणत्याही प्रकारे वाच्य नसतात, तर वाच्याच्या व्यंजकत्व सामर्थ्याने प्रकाशित होणारेच असतात. असे असल्यामुळे व्यंग्यार्थाचा तिसरा ( म्हणजे रसादिरूप ) प्रकारदेखील वाच्याहून वेगळा होय हे सिद्ध झाले. मात्र या तिसऱ्या प्रकारच्या ( रसादि ) व्यंग्यार्थाची प्रतीति वाच्याच्या जवळजवळ बरोबरच होते हे पुढे दाखविण्यात येईल.

लोचनम्

तृतीयस्त्विति। तुशब्दो व्यतिरेके। वस्त्वलंकारावपि शब्दाभिधेयत्वमध्यासाते तावत्। रसभावतदाभासतत्प्रशमाः पुनर्न कदाचिदभिधीयन्ते, अथ चास्वाद्यमानताप्राणतया भान्ति। तत्र ध्वननव्यापारादृते नास्ति कल्पनान्तरम्। स्खलद्गतित्वाभावे मुख्यार्थबाधादेर्लक्षणानिबन्धनस्याशङ्कनीयत्वात्।

औचित्येन प्रवृत्तौ चित्तवृत्तेरास्वाद्यत्वे स्थायिन्या रसो, व्यभिचारिण्या भावः, अनौचित्येन तदाभासः, रावणस्येव सीतायां रतेः। यद्यपि तत्र हास्यरसरूपतैव, 'शृङ्गाराद्धि भवेद्धास्यः' इति वचनात्। तथापि पाश्चात्त्येयं सामाजिकानां स्थितिः। तन्मयीभवनदशायां तु रतेरेवास्वाद्यतेति शृङ्गारतैव भाति पौर्वापर्यविवेकावधीरणेन 'दूराकर्षणमोहमन्त्र इव मे तन्नाम्नि याते श्रुतिम्' इत्यादौ। तदसौ शृङ्गाराभास एव। तदङ्गं भावाभासः। चित्तवृत्तेः प्रशम एव प्रक्रान्ताया हृदयमाह्लादयति यतो विशेषेण, तत एव तत्संगृहीतोऽपि पृथग्गणितोऽसौ। यथा-

एकस्मिन् शयने पराङ्मुखतया वीतोत्तरं ताम्यतो–

रन्योन्यस्य हृदि स्थितेऽप्यनुनये संरक्षतोर्गौरवम् ।
दंपत्योः शनकैरपाङ्गवलनामिश्रीभवच्चक्षुषोः
भग्नो मानकलिः सहासरभस-व्यावृत्तकण्ठग्रहम् ।।

इत्यत्रेर्ष्यारोषात्मनो मानस्य प्रशमः । न चायं रसादिरर्थः 'पुत्रस्ते जातः' इत्यतो यथा हर्षो जायते तथा । नापि लक्षणया । अपि तु सहृदयस्य हृदयसंवादबलाद्विभावानुभावप्रतीतौ तन्मयीभावेनास्वाद्यमान एव रस्यमानतैकप्राणः सिद्धस्वभावसुखादिविलक्षणः परिस्फुरति । तदाह प्रकाशत इति । तेन तत्र शब्दस्य ध्वननमेव व्यापारोऽर्थसहकृतस्येति । विभावाद्यर्थोऽपि न पुत्रजन्महर्षन्यायेन तां चित्तवृत्तिं जनयतीति जननातिरिक्तोऽर्थस्यापि व्यापारो ध्वननमेवोच्यते । स्वशब्देति शृङ्गारा-दिना शब्देनाभिधाव्यापारवशादेव निवेदितत्वेन । विभावादीति । तात्पर्यशक्त्येत्यर्थः । तत्र स्वशब्दस्यान्वयव्यतिरेकौ रस्यमानतासारं रसं प्रति निराकुर्वन् ध्वननस्यैव तावेति दर्शयति, न च सर्वत्रेति । यथा भट्टेन्दुराजस्य--

यद्विश्रम्य विलोकितेषु बहुशो निःस्थेमनी लोचने
यद्गात्राणि दरिद्रति प्रतिदिनं लूनाब्जिनीनालवत् ।
दूर्वाकाण्डविडम्बकश्च निबिडो यत्पाण्डिमा गण्डयोः
कृष्णे यूनि सयौवनासु वनितास्वेषैव वेषस्थितिः ।।

इत्यत्रानुभावविभावावबोधनोत्तरमेव तन्मयीभवनयुक्त्या तद्वि-भावानुभावोचितचित्तवृत्तिवासनानुरञ्जितस्वसंविदानन्दचर्वणागोचरोऽर्थो रसात्मा स्फुरत्येवाभिलाषचिन्तौत्सुक्यनिद्राधृतिग्लान्यालस्यश्रम-स्मृतिवितर्कादिशब्दाभावेऽपि ।

एवं व्यतिरेकाभावं प्रदर्श्यान्वयाभावं दर्शयति यत्रापीति । तदिति स्वशब्दनिवेदितत्वम् । प्रतिपादनमुखेनेति । शब्दप्रयुक्त्या विभावादि-प्रतिपत्त्येत्यर्थः । सा केवलमिति । तथाहि--

याते द्वारवतीं तदा मधुरिपौ तद्दत्तझम्पानतां
कालिन्दीतटरूढवंजुललतामालिङ्ग्य सोत्कण्ठया ।
तद्गीतं गुरुबाष्पगद्गदगलत्तारस्वरं राधया
येनान्तर्जलचारिभिर्जलचरैरप्युत्कमुत्कूजितम् ।।

इत्यत्र विभावानुभावावम्लानतया प्रतीयेते। उत्कण्ठा च चर्वणागोचरं प्रतिपद्यत एव। सोत्कण्ठाशब्दः केवलं सिद्धं साधयति। उत्कमित्यनेन तूक्तानुभावानुकर्षणं कर्तुं सोत्कण्ठाशब्दः प्रयुक्त इत्यनुवादोऽपि नानर्थकः। पुनरनुभावप्रतिपादने हि पुनरुक्तिरतन्मयीभावो वा न तु तत्कृतेत्यत्र हेतुमाह–विषयान्तर इति। 'यद्विश्रम्य' इत्यादौ। न हि स्वभावेऽपि यद्भवति तत्कृतं तदिति भावः। अदर्शनमेव द्रढयति–न हीति केवलशब्दार्थं स्फुटयति। विभावादीति। काव्य इति। तव मते काव्यरूपतया प्रसज्यमान इत्यर्थः। मनागपीति।

शृङ्गारहास्यकरुणरौद्रवीरभयानकाः।
बीभत्साद्भुतसंज्ञौ चेत्यष्टौ नाट्ये रसाः स्मृताः॥

इत्यत्र। एवं स्वशब्देन सह रसादेर्व्यतिरेकान्वयाभावमुपपत्त्या प्रदर्श्य तथैवोपसंहरति। यतश्चेत्यादिना कथञ्चिदित्यन्तेन। अभिधेयमेव सामर्थ्यं सहकारिशक्तिरूपं विभावादिकं रसध्वनने शब्दस्य कर्तव्ये, अभिधेयस्य च पुत्रजन्महर्षभिन्नयोगक्षेमतया जननव्यतिरिक्ते दिवाभोजनाभावविशिष्टपीनत्वानुमितरात्रिभोजनविलक्षणतया चानुमानव्यतिरिक्ते ध्वनने कर्तव्ये, सामर्थ्यं शक्तिः विशिष्टसमुचितवाचकसाकल्यमिति द्वयोरपि शब्दार्थयोर्ध्वननं व्यापारः। एवं द्वौ पक्षावुपक्रम्याद्यो दूषितः, द्वितीयस्तु कथञ्चित् दूषितः कथञ्चिदङ्गीकृतः, जननानुमानव्यापाराभिप्रायेण दूषितः, ध्वननाभिप्रायेणाङ्गीकृतः।

यस्त्वत्रापि तात्पर्यशक्तिमेव ध्वननं मन्यते, स न वस्तुतत्त्ववेदी। विभावानुभावप्रतिपादके हि वाक्ये तात्पर्यशक्तिर्भेदे संसर्गे वा पर्यवस्येत्; न तु रस्यमानतासारे रसे, इत्यलं बहुना। इतिशब्दो हेत्वर्थे। 'इत्यपि हेतोस्तृतीयोऽपि प्रकारो वाच्याद्भिन्न एवे'ति सम्बन्धः। सहैवेति। इव शब्देन विद्यमानोऽपि क्रमो न संलक्ष्यत इति तद्दर्शयति। अग्र इति। द्वितीयोद्द्योते॥ ४॥

लोचन

'पण (व्यङ्ग्यार्थाचा) तिसरा'... वगैरे. 'पण' हा शब्द (रसध्वनीचा इतर प्रकारांहून) 'वेगळेपणा' या अर्थी आहे. वस्तु आणि अलङ्कार हे (काही वेळा व्यङ्ग्य असले, तरी), शब्दांनी वाच्य होऊ

शकणारे असतात, हे तर प्रसिद्धच आहे. पण रस, भाव,[२] त्यांचे आभास,[३] भावांचे प्रशम,[४] हे मात्र केव्हाही वाच्य होऊ शकत नाहीत, इतकेच नव्हे, तर केवळ आस्वाद घेण्यास योग्य अशा स्वरूपाने ते प्रतीत होतात. त्यांच्या बाबतीत ध्वनन–(म्हणजे व्यञ्जना–) व्यापाराशिवाय दुसऱ्या कोणत्याही शब्दव्यापाराची कल्पनाच करता येत नाही. कारण तेथे (म्हणजे रसादि अर्थ प्रकट करण्याचे बाबतीत) शब्दाचे (व्यञ्जक) सामर्थ्य कुण्ठित होत नसल्याने वाच्यार्थाचा बाध होणे वगैरे, 'लक्षणा' प्रवृत्त होण्याच्या कारणांच्या अस्तित्वाबद्दल शंकाही उपस्थित होऊ शकत नाही. स्थायी (म्हणजे स्थिरस्वरूपाची) चित्तवृत्ती जर (औचित्याने म्हणजे) योग्य[५] व्यक्तीविषयी प्रवृत्त होत (म्हणजे कार्य करीत) असली आणि जर ती आस्वादयोग्य असली, तर तिला 'रस' म्हणावयाचे. ती चित्तवृत्ति (स्थायी नसून) जर व्यभिचारिणी[६] असली, तर तिला 'भाव' अशी संज्ञा आहे. याच (म्हणजे स्थायी व व्यभिचारिणी) चित्तवृत्ति जर अनुचित व्यक्तीविषयी प्रवृत्त झाल्या, तर ते (अनुक्रमे) रस व भाव यांचे आभास होत. जसे, रावणाची (परस्त्री असलेल्या) सीतेविषयी (प्रवृत्त झालेली) रती (हे रसाभासाचे... उदाहरण होय[७]) आणि शृंगारा-पासून (म्हणजे 'शृंगाराभासा'च्या द्वारे) हास्यरस उत्पन्न होतो[८]' या वचनाप्रमाणे जरी रावणाची सीताविषयक रती ही हास्योत्पादकच असली, तरी ती हास्याची स्थिती रसिकांना (तन्मय होण्याच्या अवस्थे-नंतर) मागाहून प्राप्त होते. परंतु ते तन्मय झाले असताना रती हीच आस्वाद्य असते, म्हणून 'लोंबून आकृष्ट करणाऱ्या जादूच्या मंत्राप्रमाणे असलेले तिचे नाव माझ्या कानी पडताच' इत्यादि उदाहरणांमध्ये[९] (तन्मय अवस्थेत) योग्यायोग्यतेचा[१०] (म्हणजे ही कोणाची कोणा-बद्दल रती आहे वगैरे तपशिलाचा) विवेक राहात नसल्याने त्या अवस्थेत शृंगाररसाचाच अनुभव येतो. तेव्हा तो शृंगाराभासच होय (हास्यरस नव्हे). शृंगारादि रसांच्या आभासांचे जो अंग असतो तो भावाभास. (उद्दीपित झालेल्या) चित्तवृत्तीचा प्रशमच ज्याअर्थी हृदयाला विशेष आनंद देतो, त्याअर्थीच भाव–प्रशम जरी 'भावां'-तच अन्तर्भूत होत असला, तरी तो रस, भाव, रसाभास यांहून वेगळा मानण्यात आला आहे.[११] जसे–

पती व पत्नी एकाच शय्येवर पडली होती,[११] पण त्यांनी तोंडे एकमेकांपासून फिरवलेली असल्यामुळे त्यांना एकमेकांचे समागमसुख मिळत नव्हते व ती तळमळत होती. दोघांच्याही मनात परस्परांचा अनुनय करण्याची इच्छा असूनही दोघेही आपापल्या अभिमानाचे कसोशीने रक्षण करीत होती. मग त्यानंतर ते आपापल्या डोळ्यांच्या बाहुल्या डोळ्यांच्या कोपऱ्यांकडे हळूहळू वळवीत असताना दोघांच्या नजरा एकमेकींत मिसळल्या व मग हसू येऊन वेगाने एकमेकांकडे वळून ते एकमेकांच्या गळ्यांना मिठी मारीत असतानाच त्यांचे स्वाभिमानाच्या पोटी उत्पन्न झालेले भांडण पार मोडून पडले !')

या उदाहरणात मान[१३] म्हणजे ईर्ष्येमुळे उत्पन्न झालेला रोष पार शान्त झालेला (म्हणजे ओसरून गेलेला) आहे.

आणि हा रसादी अर्थ 'तुला मुलगा झाला आहे' या लौकिक वार्तेमुळे जो (लौकिक) हर्ष होतो, त्या प्रकारचा नाही. किंवा हा 'लक्षणे' मुळे उत्पन्न होणाराही नाही. तर सहृदयाच्या हृदयाच्या तारा (पात्रांच्या भावनांशी) जुळून त्या अवस्थेत विभाव, अनुभाव प्रतीत झाले असताना त्याला प्राप्त होणाऱ्या तन्मयतेमुळे तो केवळ आस्वादिला जाणाराच असतो. आस्वादिले जाणे हाच त्याचा एकुलता एक प्राण (स्वभाव) असतो आणि तो (रसादि) प्रसिद्ध स्वरूपाच्या लौकिक सुखादिकांहून वेगळा असा[१४] स्फुरतो, म्हणूनच वृत्तिकार म्हणतात की तो 'प्रकाशित होतो.' त्यामुळे त्या रसादिकांच्या बाबतीत, अर्थाचे सहकार्य लाभलेल्या[१५] शब्दाचा 'ध्वनन (व्यञ्जन)' हाच व्यापार असतो. (अभिधेने प्रकट केले जाणारे) विभाव वगैरे अर्थसुद्धा त्या (रसानुभवरूपी) चित्तवृत्तीला पुत्रजन्मामुळे उत्पन्न होणाऱ्या हर्षाच्या पद्धतीने उत्पन्न करीत नाहीत. म्हणून उत्पादनाच्या व्यापाराहून वेगळ्या असलेल्या, अर्थाच्या व्यापारालाही 'ध्वनन'च म्हटले आहे. 'स्वशब्दांनी' – म्हणजे 'शृंगार' वगैरे शब्दांनी, केवळ अभिधा व्यापाराने त्याचा बोध करून दिल्यामुळे. 'विभावादिकांचे' इ. म्हणजे (संपूर्ण वाक्याच्या) तात्पर्यशक्तीने. त्यांपैकी स्वशब्दांचा (म्हणजे रसादींच्या वाचकशब्दांचा) आस्वादिला जाणे हेच जिचे सर्वस्व असते अशा रसप्रतीतीशी अन्वयव्यतिरेकांनी[१६] साहचर्यसंबंध

नसतो. अशा रीतीने त्यांचे खंडन करण्याकरिता ध्वननाच्या अन्वयव्यति-रेकांचाच रसप्रतीतीशी साहचर्यसंबंध असतो, हे वृत्तिकार 'आणि सगळ्या उदाहरणात काही' ... इ. शब्दांनी दर्शवितात. उदा. भट्टेन्दु-राजांचा[१७] पुढील श्लोक पाहा–

मध्येच थांबून थांबून (कृष्णाकडे) अनेक वेळा पाहिल्याने (गोपस्त्रियांची) दृष्टी जर चंचल होत असेल, तोडलेल्या कमलवेलींच्या देठाप्रमाणे त्यांची गात्रे प्रत्येक दिवशी कृश होऊन सुकून जात असतील आणि दूर्वांकुरांचे अनुकरण करणारा दाट पांढरेपणा गालांवर दिसत असेल, तर, तीच, म्हणजे अशीच, कृष्णाने तारुण्यात पदार्पण केले असताना नवयौवना गोपस्त्रियांची अवस्था असणार (नाही का?)

या उदाहरणात जरी अभिलाष, चिन्ता, औत्सुक्य, निद्रा, धृति, ग्लानि, आलस्य, श्रम, स्मृति, वितर्क वगैरे (व्यभिचारिभावांचे[१८] वाचक) शब्द (वापरलेले) नसले, तरी अनुभाव–विभावांचे[१९] ज्ञान (अभिधेने) झाल्याबरोबरच (सहृदयांना पद्यातील विषयाशी) तन्मयता प्राप्त होते. त्यामुळे त्या त्या अनुभाव – विभावांना योग्य असणाऱ्या (स्थायी – व्यभिचारस्वरूपी) चित्तवृत्तींच्या वासनांनी (म्हणजे संस्कारांनी) मिश्रित झालेल्या (म्हणजे रंगलेल्या) अशा (सहृदयाच्या) आत्मचैतन्याच्या आनन्दमय साक्षात्काराचा विषय होणारा (विप्रलम्भ शृंगार–) रसस्वरूपाचा अर्थ प्रकाशित होतोच!

याप्रमाणे व्यतिरेकव्याप्ती नाही (म्हणजे रसादींचे वाचकशब्द नसतील तेथे रसादींची प्रतीती होत नाही ही व्याप्ती खरी नाही) हे दाखविल्यावर (रसादींचे वाचक शब्द असले तरच रसप्रतीती होते, ही) अन्वयव्याप्तिसुद्धा खरी नाही हे वृत्तिकार 'ज्या उदाहरणात' इ. शब्दांनी स्पष्ट करतात 'तो' म्हणजे (रसादींचा त्यांच्या) वाचकशब्दांनी केलेला उल्लेख. '(विशिष्ट विभावादिकांच्या) वर्णनाच्या द्वारेच,' म्हणजे शब्दद्वारा करून दिलेल्या, विभाव वगैरेंच्या ज्ञानामुळेच, असा आशय. 'त्या प्रतीतीचा केवळ अनुवाद'.... वगैरे. जसे–

'त्यावेळी (गोकुळ सोडून) मधुसूदन कृष्ण द्वारकेला निघून गेल्यावर त्याने (जलविहार करताना) यमुनेत (वारंवार) अंग झोकून दिल्यामुळे किंचित नम्र झालेल्या (म्हणजे वाकलेल्या), यमुना-

तीरी वाढलेल्या वेतसवृक्षाला उत्कंठित झालेल्या राधेने आलिंगन दिले. त्यावेळी बाष्पप्रवाहामुळे दाटलेल्या कण्ठाने तिने तारस्वराने असे काही गीत गायिले की, जलप्रवाहाच्या अन्तर्भागी राहणाऱ्या जलचर पक्ष्यांनी-देखील उत्कण्ठित होऊन मोठ्याने कूजन केले.

या उदाहरणातले विभाव व अनुभाव[२०] स्पष्टपणे प्रत्ययाला येतात. आणि राधेची 'उत्कण्ठा' (हा व्यभिचारिभाव) सुद्धा (सहृदयाच्या) आस्वादाचा विषय होतेच. (दुसऱ्या चरणातला) सोत्कण्ठा हा शब्द सिद्ध असलेली गोष्टच पुन: सांगणारा (म्हणजे विभाव-अनुभावांनीच सुचविलेल्या उत्कण्ठेचा केवळ अनुवाद म्हणजे पुनरुच्चार करणारा) आहे. पण हा 'अनुवाद (म्हणजे पुनरुच्चार) देखील निरुपयोगी नाही, कारण हा 'सोत्कण्ठा' शब्द वापरला असल्यामुळे पुढे म्हणजे चवथ्या चरणात योजिलेल्या उत्कम् (उत्कण्ठित होऊन) या शब्दाने राधेचे, प्रथम वर्णिलेले अनुभाव (जलचरांच्या बाबतीत) खेचून आणले जातात (व त्यांची जलचरांच्या उत्कंठेशी सांगड घातली जाते).[२१] जलचर पक्ष्यांच्या बाबतीत त्या अनुभावांचे पुन्हा वर्णन केले असते, तर पुनरुक्ती झाली असती व त्या उत्कंठेशी रसिक तन्मयही झाले नसते. 'ती प्रतीति काही (रसादींच्या) वाचक शब्दांनी घडून आलेली नसते' याचे कारण (वृत्तिकार) 'इतर उदाहरणात' इत्यादि शब्दांनी सांगतात. (इतर उदाहरणात म्हणजे) 'मध्येच थांबून थांबून'– इ. उदाहरणात (स्थायी व व्यभिचारी भावांचा त्यांच्या वाचक शब्दांनी उल्लेख केलेला नसूनही रसप्रतीती होते). कारण जी गोष्ट दुसऱ्या एखाद्या गोष्टीच्या अभावी घडून येते, ती काही त्या दुसऱ्या गोष्टीमुळे घडून येत नाही; हा भावार्थ. विभावादींचे प्रतिपादन केले नसताना रसादिप्रतीती झालेली दिसत नाही, याच गोष्टीला (वृत्तिकार 'कारण ज्या काव्यात'– वगैरे शब्दांनी दुजोरा देतात. (वृत्तीतल्या) 'केवळ' शब्दाचा अर्थ (वृत्तिकार) 'विभाव वगैरेंचे (प्रतिपादन नसलेल्या काव्यामध्ये)' इत्यादि शब्दांनी स्पष्ट करतात. 'काव्यामध्ये' म्हणजे तुमच्या मतें ज्या रचनेला[२२] काव्य म्हणून संबोधण्याचा प्रसंग येतो, त्यामध्ये, हा अर्थ. 'अल्पांशाने देखील'.... म्हणजे उदाहरणार्थ –

शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर,भयानक, तसेच बीभत्स व

अद्‌भुत या नावांचे असे आठ रस नाट्यामध्ये मानले आहेत.[२३]

यासारख्या उदाहरणांमध्ये.[२४] याप्रमाणे रसादींची त्यांच्या वाचक शब्दांशी अन्वयव्याप्ती किंवा व्यतिरेकव्याप्ती नसते, हे युक्तिवादाने दाखवून देऊन तसाच समारोप (वृत्तिकार 'अन्वय' व 'व्यतिरेक' हे शब्द प्रत्यक्ष वापरून) 'आणि जेथे रसादींचे'....पासून 'आक्षिप्त होणारेच असतात' येथपर्यंतच्या वाक्यांनी करितात. ('वाच्यसामर्थ्याने आक्षिप्त होणारे' हे विशेषण शब्द आणि अर्थ या दोहोंच्याही बाबतीत लावून दाखविता येईल हे लोचनकार पुढीलप्रमाणे स्पष्ट करतात –) शब्द रसाचे ध्वनन करतो (असे ज्या वेळी म्हटले जाते), त्या वेळी त्याचा वाच्यार्थ म्हणजे विभाव वगैरे, हेच त्याला (म्हणजे शब्दाला), ध्वननाचे कामी मदत करणारे[२५] त्याचे (म्हणजे शब्दाचे) सामर्थ्य असते. येथे 'अभिधेय हेच सामर्थ्य' (असा कर्मधारय समास मानला). (त्या साहाय्यभूत सामर्थ्याने शब्द रसादींना 'आक्षिप्त' करतो, हे झाले शब्दाचे ध्वननसामर्थ्य) आणि वाच्यार्थ ज्या वेळी रसादींचे ध्वनन करतो, त्या वेळी (गुणालंकारांनी) विशिष्ट आणि (रसाभिव्यक्तीस) उचित असा शब्दसमूह हे त्याचे (म्हणजे अभिधेयाचे) व्यंजकत्वसामर्थ्य होय. (येथे 'अभिधेयाचे सामर्थ्य' असा षष्ठी तत्पुरुष समास मानला). हा (शब्द व वाच्यार्थ यांचा) ध्वननव्यापार जननव्यापाराहून म्हणजे 'उत्पन्न करणे' या व्यापाराहून वेगळा असतो.[२६] कारण पुत्रजन्मामुळे पित्याला होणाऱ्या हर्षाहून रसादींचा आनंदरूप अनुभव हा भिन्न असतो. तो (ध्वनन–व्यापार) अनुमानाहूनही वेगळा असतो,[२७] कारण रसादींचे स्वरूप, दिवसा न जेवणे याने विशिष्ट अशा पुष्टपणावरून अनुमित होणाऱ्या रात्रिभोजनाहूनही[२८] निराळे असते. अशा रीतीने शब्द आणि (वाच्य) अर्थ या दोहोंचाही 'ध्वनन' हा व्यापार असतो.[२९] याप्रमाणे दोन पक्षांचा प्रस्ताव करून त्यातील (रस स्वशब्दांनी वाच्य होऊ शकतो हा) पहिला पक्ष खोडून काढला. पण दुसरा (विभावादींच्या प्रतिपादनाच्या द्वारे रसादींची प्रतीति येते, हा) काहीसा खोडला आणि काहीसा स्वीकारला. म्हणजे विभावादिकांचा तो व्यापार जनन किंवा अनुमानाच्या स्वरूपाचा नसतो अशा दृष्टीने खोडला आणि तो ध्वननस्वरूपच असतो या दृष्टीने स्वीकारला.[३०]

पण यथेही (म्हणजे रसादिकांच्या प्रतीतीच्या बाबतीतही) जो ध्वनन म्हणजे तात्पर्यशक्तीच होय असे मानतो,[31] त्याला यातले सत्य काय हे कळलेले (दिसत) नाही. कारण विभाव, अनुभाव इत्यादींचे वर्णन करणाऱ्या वाक्याच्या बाबतीत तात्पर्यशक्तीचे कार्य एकतर भेद किंवा संसर्ग[32] दाखविण्यातच संपते. या तात्पर्यशक्तीचे पर्यवसान 'आस्वादिले जाणे हेच ज्याचे स्वरूप (किंवा सार) आहे' अशा रसात केव्हाही होत नाही. तेव्हा आता या बाबतीत अधिक काही बोलण्याची गरज नाही. (वृत्तीतला) इति (असे असल्यामुळे) हा शब्द 'या कारणामुळे' या अर्थी आहे. 'याही कारणामुळे तिसरा (म्हणजे रसादि हा) प्रकारदेखील वाच्यार्थाहून वेगळाच आहे' असा संबंध जोडावयाचा. ('वाच्यार्थाच्या) जवळजवळ बरोबरच'... वगैरे. 'जवळजवळ' या शब्दाने (वाच्यार्थाचा बोध होणे व रसादींची प्रतीती होणे यांमधे) क्रम (म्हणजे एक आधी व दुसरा नंतर असा) असूनही तो (क्रम सहृदयांच्या) लक्षात येत नाही हे (वृत्तिकार दाखवीत आहेत). 'पुढे' म्हणजे दुसऱ्या उद्द्योतात.

टीपा

१. 'हे असले, म्हणजेच तेही असते' याला 'अन्वय' म्हणतात व 'हे नसले की तेही नसते' याला 'व्यतिरेक' म्हणतात. विभावादिकांचे प्रतिपादन असले, तरच रसादींची प्रतीति होते हा झाला अन्वय व विभावादिकांचे प्रतिपादन नसले तर रसादींची प्रतीति होत नाही हा झाला व्यतिरेक.

२, ३. व ४.–रस, भाव, रसाभास, भावाभास व भावप्रशम यांचे स्पष्टीकरण यानंतर लगेच, याच परिच्छेदात आले आहे.

५. योग्य म्हणजे उदाहरणार्थ पत्नीची पतीविषयी आणि पतीची पत्नीविषयी इ.

६. म्हणजे अल्पकाळ टिकणारी.

७. रस व भाव यांची उदाहरणे जागोजाग सापडत असल्याने ती अभिनवगुप्तांनी दिलेली नसावीत आणि रसाभासाचे उदाहरण दिल्यावर त्यावरून भावाभासाची कल्पना करिता येते, म्हणून भावाभासाचे उदाहरण दिले नसावे.

८. पाहा, नाट्यशास्त्र, ६–३९.

९. हे उद्गार रावणाच्या तोंडचे आहेत. पाहा, लोचन-(बालप्रिया आवृत्ति), पृ. १७८; व अभिनवभारती, कंगलेकृत 'रसभाव–विचार', पृ. २११.

अभिनवभारतीमध्ये ही पहिली ओळ ' रावणकाव्यातील ' आहे असे म्हटले आहे व लोचन (काशी आवृत्ती) पृ. १७८ वरही ' रावणकाव्य ' असा उल्लेख आहे. त्याचा अर्थ रावणविषयक नाटक अगर काव्य असा करिता येईल, परंतु नक्की कोणत्या ग्रंथातील हा श्लोक असावा हे समजण्यास मार्ग नाही.

१०. ' पौर्वापर्य ' याचा अर्थ आम्ही ' योग्यायोग्यता ' असा केला आहे. याच शब्दाचा वापर ' लोचना 'त पुनः पृ. ३१७ वर (बालप्रिया आवृत्ति) केला आहे.

११. तुलनार्थ पाहा, जगन्नाथाचा रसगङ्गाधर, आठवले आवृत्ति, पृ. २४३ व २४६.

१२. अमरुशतक, २३.

१३. ' मान ' हा शब्द तेहेतीस व्यभिचारिभावांच्या यादीत नसला, तरी ' मान ' म्हणजे (ईर्ष्याजन्य) अमर्ष. ' अमर्ष ' हा व्यभिचारिभाव मानण्यात आला आहेच.

१४ म्हणजे रसादि हा आधीपासूनच सिद्ध असलेला अशा स्वरूपाचा नसतो, तर तो सहृदयाला येणारा एक विशिष्ट अनुभव आहे. हाच आशय अभिनवगुप्तांनी ' अभिनवभारती 'मध्ये (पृ. १७५–प्रा. कंगलेकृत रस–भाव–विचार) सांगितला आहे.

१५. पाहा, पृ. २७ वरील टीप दुसरी

१६. पाहा, पृ. १३१ वरील टीप ६ वी

१७. पाहा, पृ. ३ वरील भट्ट इंदुराज यांच्यासंबंधीची ६ वी टीप.

१८. या व्यभिचारिभावांच्या विवेचनासाठी पाहा, भरत, नाट्यशास्त्र, अध्याय ७; साहित्यदर्पण, परिच्छेद ३; रसगंगाधर, आनन १.

१९. उदा.–येथे कृष्ण हा आलम्बनविभाव असून नेत्रांचा अस्थिरपणा इ. ' अनुभाव ' आहेत.

२०. येथे ' कृष्ण ' हा आलम्बन विभाव, वेतसवृक्ष हा उद्दीपनविभाव आणि आलिंगन, तारस्वराने गीत गाणे इ. ' अनुभाव ' आहेत.

२१. ' उत्कम् ' या शब्दाने जलचरांची उत्कंठा हा राधेने उत्कण्ठित होऊन गायिलेल्या गीताचा परिणाम होय, इतके दाखवावयाचे आहे. ' उत्कण्ठित झालेल्या, असे आधी (राधेच्या बाबतीत) म्हटले नसते, तर राधेचे अनुभाव जलचरांच्या बाबतीत पुन्हा वर्णावे लागले असते. राधेच्या उत्कण्ठेचा आस्वाद मात्र अनुभावांच्या द्वारेच (व्यंजनेने) घेतला जातो, ' उत्कंठित झालेल्या ' या शब्दाच्या अभिधेने नाही.

२२. ज्या रचनेत विभावादिकांचे वर्णन नसून रसादींचे वाचकशब्दच असतात, त्या रचनेमध्ये रसादींची प्रतीति होत नाही. अशी रचनासुद्धा प्रतिपक्ष्याच्या

मते ' काव्य ' या संज्ञेला पात्र होईल, असा भावार्थ.

२३. पाहा, नाट्यशास्त्र. ६–१५

२४. येथे कोणत्याही रसाची प्रतीति होत नाही असा आशय.

२५. पाहा, पृ. १२७.

२६. चक्र, दण्ड, कुंभार इ. घटाच्या निमित्तकारणांचा नाश झाला, तरी त्यामुळे त्यापासून उत्पन्न झालेले कार्य जो घट, त्याचा नाश होत नाही, परंतु विभावादि कारणे दूर झाली की, त्यांपासून व्यंजनेने होणारी रसप्रतीति-सुद्धा नाहीशी होते, म्हणून ध्वननव्यापार हा उत्पादन व्यापार नव्हे.

२७. ध्वननव्यापार हा अनुमानाहून वेगळा, कारण अनुमानामध्ये जसा निश्चित-पणा असतो तसा ध्वननाचे बाबतीत नसतो. या मुद्द्याचे अधिक विवरण ' ध्वन्यालोका 'च्या तिसऱ्या उद्द्योतामध्ये (पाहा, काशी आवृत्ति पृ. ४४८ पासून पुढे) केलेले आहे.

२८. दिवसा न जेवणे याने विशिष्ट इ. आशयाचे वाक्य मीमांसकांच्या मते ' अर्थापत्ति ' या प्रमाणाचे उदाहरण आहे, पाहा, पृ. २० वरील १२ वी टीप) परंतु नैयायिक हे अर्थापत्तीचा अन्तर्भाव अनुमानप्रमाणामध्येच करितात. येथे अभिनवगुप्तांनी नैयायिकांच्या मताला अनुसरून अर्थापत्तीलाही अनुमानच म्हटले आहे.

२९. ध्वननव्यापार जरी शब्द व वाच्यार्थ या दोहोंचाही असला, तरी ज्या उदाहरणात शब्द व अर्थ यांपैकी जो मुख्यत्वाने व्यंजक असेल त्यावरून त्या व्यंजनेच्या प्रकाराला शाब्दी व्यंजना किंवा आर्थी व्यंजना असे म्हणण्यात येते. प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति । हा न्याय सुप्रसिद्धच आहे.

३०. रस हा ' उत्पन्न होत नाही ' या मताच्या खंडनासाठी पाहा, काशी आवृत्ति, पृ. १८२ वरील भट्टनायकाने केलेले उत्पत्तिवादाचे खण्डन. ' अनुमान ' पक्षाच्या खंडनासाठी काशी आवृत्ति, ४४८ पासून पुढील पृष्ठे पाहा.

३१. पाहा, पृ. ९८, टीप १४ वी. सर्वत्र तात्पर्यशक्तीच मानणारा हा टीकाकार अर्थात् मीमांसक असावा.

३२. ' गाय आण ' या सारखे वाक्य घेऊ. तात्पर्यशक्तीने एक तर ' गाय 'च आणावयाची आहे, दुसरे काही आणावयाचे नाही. तसेच गाय ' आणा-वयाची ' आहे, दुसरी काही कृति करावयाची नाही. अशा रीतीने इतर कर्मे किंवा क्रिया यांहून भेद (फरक) दाखविला जातो, किंवा ' आण-ण्याच्या क्रियेचे गाय हे कर्म आहे ' अशा तऱ्हेने संसर्ग (विशिष्ट संबंध) दाखविला जातो.

ध्वन्यालोकः

> काव्यस्यात्मा स एवार्थस्तथा चादिकवेः पुरा।
> क्रौञ्चद्वन्द्ववियोगोत्थः शोकः श्लोकत्वमागतः ॥ ५ ॥

ध्वन्यालोक

तोच अर्थ काव्याचा आत्मा होय. कारण पूर्वी क्रौञ्च पक्ष्याला झालेल्या (सहचरीच्या) वियोगामुळे उत्पन्न झालेल्या आदिकवींच्या[१] शोकाचेच श्लोकात पर्यवसान झाले. ॥ ५ ॥

ध्वन्यालोकः

विविधवाच्यवाचकरचनाप्रपञ्चचारुणः काव्यस्य स एवार्थः सारभूतः। तथा चादिकवेर्वाल्मीकेः निहतसहचरीविरहकातरक्रौञ्चाक्रन्द-जनितः शोक एव श्लोकतया परिणतः। शोको हि करुणरसस्थायिभावः। प्रतीयमानस्य चान्यप्रभेददर्शनेऽपि रसभावमुखेनैवोपलक्षणम्, प्राधान्यात्।

ध्वन्यालोक

नाना प्रकारचे वाच्यार्थ, वाचक शब्द आणि रचना२ (म्हणजे समासांचा योग्य वापर) यांच्या (रम्य) आविष्कारामुळे सुंदर झालेल्या काव्याचे[३] सार-सर्वस्व म्हणजे तोच अर्थ होय. असे असल्यामुळेच, मारल्या गेलेल्या सहचरीच्या वियोगाने[४] व्याकुळ झालेल्या क्रौञ्च पक्ष्याच्या आक्रोशामुळे उत्पन्न झालेल्या, आदिकवींच्या शोकाचेच श्लोकात रूपांतर झाले. शोक हा तर करुणरसाचा स्थायी भाव होय. ('शोक' हा प्रतीयमानच म्हणजे व्यंग्यच असतो हे ५ व्या कारिकेच्या लगेच आधी वृत्तीत सांगितले आहे); आणि प्रतीयमानाचे इतर, म्हणजे वस्तु व अलंकार हे प्रकार आढळत असले तरी या कारिकेत केवळ रस, भाव, इत्यादींचाच निर्देश प्रतीयमानाच्या सर्वच प्रकारांचा बोधक म्हणून केला आहे.[५] कारण रस, भाव हेच (प्रतीयमानाच्या प्रकारांत) मुख्य आहेत.

लोचनम

एवं 'प्रतीयमानं पुनरन्यदेव' इतीयता ध्वनिस्वरूपं व्याख्यातम्। अधुना काव्यात्मत्वमितिहासव्याजेन च दर्शयति – काव्यस्यात्मेति। स

एवेति प्रतीयमानमात्रेऽपि प्रक्रान्ते तृतीय एव रसध्वनिरिति मन्तव्यम्, इतिहासबलात् प्रक्रान्तवृत्तिग्रन्थार्थबलाच्च। तेन रस एव वस्तुत आत्मा॰ वस्त्वलङ्कारध्वनी तु सर्वथा रसं प्रति पर्यवस्येते इति वाच्यादुत्कृष्टौ तावित्यभिप्रायेण 'ध्वनिः काव्यस्यात्मे'ति सामान्येनोक्तम्। शोक इति। क्रौञ्चस्य द्वन्द्ववियोगेन सहचरीहननोद्भूतेन साहचर्यध्वंसनेनोत्थितो यः शोकः स्थायिभावो निरपेक्षभावत्वाद्विप्रलम्भशृङ्गारोचितरतिस्थायिभावादन्य एव, स एव तथाभूतविभावतदुत्थाक्रन्दाद्यनुभावचर्वणया हृदयसंवादतन्मयीभवनक्रमादास्वाद्यमानतां प्रतिपन्नः करुणरसरूपतां लौकिकशोकव्यतिरिक्तां स्वचित्तद्रुतिसमास्वाद्यसारां प्रतिपन्नो रसपरिपूर्णकुम्भोच्चलनवच्चित्तवृत्तिनिःष्यन्दस्वभाववाग्विलापादिवच्च समयानपेक्षत्वेऽपि चित्तवृत्तिव्यञ्जकत्वादिति नयेनाकृतकतयैवावेशवशात्समुचितशब्दच्छन्दोवृत्तादिनियन्त्रितश्लोकरूपतां प्राप्तः —

मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः।
यत्क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम्॥ इति। (रामायणम्, १-२-१५).

न तु मुनेः शोक इति मन्तव्यम्। एवं हि सति तद्दुःखेन सोऽपि दुःखित इति कृत्वा रसस्यात्मतेति निरवकाशं भवेत्। न च दुःखसन्तप्तस्यैषा दशेति। एवं चर्वणोचितशोकस्थायिभावात्मककरुणरससमुच्चलनस्वभावत्वात्स एव काव्यस्यात्मा सारभूतस्वभावोऽपरशाब्दवैलक्षण्यकारकः।

एतदेवोक्तं हृदयदर्पणे– 'यावत्पूर्णो न चैतेन तावन्नैव वमत्यमुम्' इति।

अगम इति च्छान्दसेनाडागमेन। स एवेत्येवकारेणेदमाह – नान्य आत्मेति। तेन यदाह भट्टनायकः –

शब्दप्राधान्यमाश्रित्य तत्र शास्त्रं पृथग्विदुः।
अर्थतत्त्वेन युक्तं तु वदन्त्याख्यानमेतयोः॥
द्वयोर्गुणत्वे व्यापारप्राधान्ये काव्यधीर्भवेत्। इति, तदपास्तम्।

व्यापारो हि यदि ध्वननात्मा रसनास्वभावस्तन्नापूर्वमुक्तम्। अथाभिधैव व्यापारस्तथाप्यस्याः प्राधान्यं नेत्यावेदितं प्राक्।

श्लोकं व्याचष्टे – विविधेति। विविधं तत्तदभिव्यञ्जनीयरसानु-

गुण्येन विचित्रं कृत्वा वाच्ये वाचके रचनायां च प्रयत्नेन यत्काव्यं शब्दार्थालङ्कारगुणयुक्तमित्यर्थः। तेन सर्वत्रापि ध्वननसद्भावेऽपि न तथा व्यवहारः। आत्मसद्भावेऽपि क्वचिदेव जीवव्यवहार इत्युक्तं प्रागेव। तेनैतन्निरवकाशम्, यदुक्तं हृदयदर्पणे – 'सर्वत्र तर्हि काव्यव्यवहारः स्यात्' इति। निहतसहचरीति विभाव उक्तः। आक्रन्दितशब्देनानुभावः। जनित इति। चर्वणागोचरत्वेनेति शेषः।

ननु शोकचर्वणातो यदि श्लोक उद्भूतस्तत्प्रतीयमानं वस्तु काव्यस्यात्मेति कुत इत्याशङ्कयाह – शोको हीति। करुणस्य तच्चर्वणागोचरात्मनः स्थायिभावः। शोके हि स्थायिभावे ये विभावानुभावास्तत्समुचिता चित्तवृत्तिश्चर्व्यमाणात्मा रस इत्यौचित्यात्स्थायिनो रसतापत्तिरित्युच्यते। प्राक्संविदितं परत्रानुमितं च चित्तवृत्तिजातं संस्कारक्रमेण हृदयसंवादमादधानं चर्वणायामुपयुज्यते यतः। ननु प्रतीयमानरूपमात्मा तच्च त्रिभेदं प्रतिपादितं न तु रसैकरूपम्, अनेन चेतिहासेन रसस्यैवात्मभूतत्वमुक्तं भवतीत्याशङ्क्याभ्युपगमेनैवोत्तरमाह – प्रतीयमानस्य चेति। अन्यो भेदो वस्त्वलङ्कारात्मा। भावग्रहणेन व्यभिचारिणोऽपि चर्व्यमाणस्य तावन्मात्रविश्रान्तावपि स्थायिचर्वणापर्यवसानोचितरसप्रतिष्ठामनवाप्यापि प्राणत्वं भवतीत्युक्तम्। यथा –

नखं नखाग्रेण विघट्टयन्ती विवर्तयन्ती वलयं विलोलम्।
आमन्द्रमाशिञ्जितनूपुरेण पादेन मन्दं भुवमालिखन्ती॥

इत्यत्र लज्जायाः। रसभावशब्देन च तदाभासतत्प्रशमावपि संगृहीतावेव; अवान्तरवैचित्र्येऽपि तदेकरूपत्वात्। प्राधान्यादिति। रसपर्यवसानादित्यर्थः। तावन्मात्रविश्रान्तावपि चान्यशब्दवैलक्षण्यकारित्वेन वस्त्वलङ्कारध्वनेरपि जीवितत्वमौचित्यादुक्तमिति भावः॥५॥
लोचन

याप्रमाणे 'परंतु प्रतीयमान हा काही वेगळाच'... या (कारिकेमधील व वृत्तीमधील) शब्दांनी ध्वनीचे स्वरूप सांगितले. आता काव्याचा आत्मा तोच (म्हणजे प्रतीयमानच) हे 'तोच अर्थ काव्याचा आत्मा'... इत्यादि कारिकेने व इतिहासाच्या (म्हणजे रामायणातील एका घटनेच्या) आधारानेही दाखवितात. 'तोच' या शब्दामुळे सर्व

(प्रकारच्या) प्रतीयमानाचा निर्देश होत असला, तरी कारिकेत रामायणातील जे उदाहरण दिले आहे, त्याच्या जोरावरून आणि वृत्तीतल्या या कारिकेपूर्वी लगेच असलेल्या मजकुराच्या[6] आशयाच्या सामर्थ्यावरून असे समजावे की, तिसऱ्याचाच म्हणजे रसध्वनीचाच (काव्याचा आत्मा म्हणून) उल्लेख केला आहे. त्यामुळे वास्तविकपणे रस हाच काव्याचा आत्मा होय. वस्तुध्वनी व अलंकारध्वनी यांचे पर्यवसान सर्वथैव रसाची प्रतीती घडविण्यातच होत[7] असते, म्हणून ते दोन प्रकार वाच्यार्थाहून उत्कृष्ट होत, या अभिप्रायाने ध्वनीला 'काव्याचा आत्मा' असे (पहिल्या कारिकेत) सर्वसामान्यपणे म्हटले आहे.

'शोक म्हणजे–सहचरी ठार मारली गेल्याने झालेली 'जोडी'ची ताटातूट म्हणजे निकट सहवासाचा नाश. त्यामुळे उफाळलेला शोक हा स्थायी भाव. तो (स्थायीभाव) पुनर्भेटीची आशा नसल्याने विप्रलंभ शृंगाराला योग्य असलेल्या '(विप्रलंभ) रती' या स्थायीभावाहून वेगळा होय,[8] यात संदेह नाही. तोच (शोक,) तशी अवस्था झालेली (म्हणजे मृत झालेली) क्रौञ्ची हा आलम्बन विभाव[9] आणि तिच्या त्या अवस्थेमुळे क्रौञ्च नराने केलेला आक्रोश इ. जे अनुभाव उत्पन्न झाले, त्यांच्या चर्वणेने (म्हणजे वाल्मीकीला आलेल्या अनुभवाने) हृदयसंवाद (म्हणजे नितान्त सहानुभूति), आणि मग तन्मयीभवन (म्हणजे प्रसङ्गाशी एकरूप होणे), या रीतीने (मुनीला) आस्वादयोग्य झाला. म्हणजेच त्या शोकाला 'करुणरसा'चे स्वरूप प्राप्त झाले. हे करुणरसाचे रूप लौकिक शोकापेक्षा वेगळे, स्वतःच्या द्रव पावलेल्या चित्तवृत्तीने घेतलेला आस्वाद या वैशिष्ट्याने युक्त होते. पाण्याने काठोकाठ भरलेला घडा ओसंडू लागावा, तसे किंवा चित्तवृत्ती उफाळण्याचा परिणाम ज्याप्रमाणे स्वाभाविकपणे (हाय हाय, अरेरे इ.) उद्गार वगैरेंमध्ये होतो–कारण त्या उद्गारांचा शोक वगैरे चित्तवृत्तीवर सङ्केत झालेला नसला तरी ते उद्गार शोकादि चित्तवृत्तींचे सूचक असतात–त्याप्रमाणे वाल्मीकी हा शोकाने ग्रस्त झाल्यामुळे तो (म्हणजे शोक) सहजस्फूर्तपणे योग्य शब्द, छंद म्हणजे वृत्त इत्यादींमुळे सुबद्ध स्वरूप प्राप्त झालेल्या (पुढील) श्लोकाच्या रूपाने[10] अवतरला—

'हे पारध्या, ज्या अर्थी क्रौञ्चांच्या जोडीपैकी कामपीडित झालेल्या एकाला तू ठार मारलेस, त्या अर्थी तुला अनन्तकाळपर्यंत मानाचे स्थान मिळणार नाही.'

परंतु (आदिकवीला म्हणजे) मुनीला झालेला शोक[11] असे समजून (मूळ कारिकेमध्ये) तसा (म्हणजे आदिकवेःशोकः असा) अन्वय करू नये, कारण असे झाल्यास त्या क्रौञ्चाच्या दुःखाने तो मुनीही दुःखित झाला, असे होऊन '(आनंदरूप) रस हा काव्याचा आत्मा' या म्हणण्यास बाध येईल. आणि दुःखाने तापलेल्या मनुष्याची काही अशी म्हणजे श्लोक रचण्याची अवस्था असत नाही.[12] म्हणून शोक हा स्थायी भाव हाच आत्मा असलेल्या, आस्वादाला योग्य झालेल्या करुणरसाचा ओसंडू लागणे हा स्वभावच असल्याकारणाने, तोच काव्याचा आत्मा म्हणजे सारसर्वस्व या स्वरूपाचा होय. ती चमत्कृति शब्दापासून होणाऱ्या इतर कोणत्याही चमत्कृतीपेक्षा[13] आगळीच असते.

भट्टनायकाने) 'हृदयदर्पणा'त हेच सांगितले आहे– 'जोपर्यंत (कवी) 'ह्याने' (म्हणजे रसाने) परिपूर्ण झाला नाही, तोपर्यंत तो त्या रसाला (काव्यरूपाने) प्रकट करीत नाही.[14]'

(मा निषाद ! इ. श्लोकात) अगमः असे जे पद आले आहे, त्यातील अ हा आगम वैदिक नियमाप्रमाणे आहे.[15] 'तोच अर्थ' स एव यातील 'च' (एव) या अव्ययाने (त्या अर्थाखेरीज) दुसरा कोणताही अर्थ (म्हणजे वाच्यार्थ इ.) आत्मा नाही असे सांगितले आहे. त्यामुळे भट्टनायकाने जे म्हटले आहे की– 'आता शब्दाला (म्हणजे शब्दाच्या स्वनात्मक स्वरूपाला) प्राधान्य असणे या वैशिष्ट्याच्या आधारे शास्त्राचा (म्हणजे श्रुतिग्रंथांचा) वेगळा प्रकार मानण्यात येतो. शब्द आणि अर्थ यांपैकी अर्थाला प्राधान्य असलेल्या ग्रंथांना 'आख्यान' म्हणतात. ज्या वाङ्मयामध्ये शब्द व अर्थ ही दोन्ही गौण असून 'व्यापार' मुख्य असतो, तो वाङ्मयप्रकार काव्य समजण्यात येतो.'[16]

त्या (भट्टनायकाच्या म्हणण्या)चे निराकरण झाले. कारण हा व्यापार 'ध्वनन' या स्वरूपाचा व रसना (म्हणजे आस्वादन) यात परिणत होणारा असला, तर भट्टनायकाने (आमच्यापेक्षा नवीन) काही

सांगितले नाही. बरे, 'अभिधा' हाच व्यापार (त्याला अभिप्रेत) असला, तर तो काव्यात महत्त्वाचा नव्हे, हे (आम्ही) मागेच[१७] सांगितले आहे.

(आता वृत्तिकार ५ व्या) कारिकेचे विवरण करतात–

'विविध' इ.– 'अभिव्यक्त करावयाच्या असलेल्या त्या त्या रसाला उचित होईल अशा रीतीने त्यामध्ये विविधता आणली आहे व वाच्य अर्थ, वाचक शब्द आणि मांडणी यांच्या यथायोग्य आविष्कारामुळे जे रमणीय झाले आहे असे, म्हणजेच शब्द व अर्थ यांच्या अलङ्कारांनी व गुणांनी जे युक्त आहे' असा अर्थ समजावा. त्यामुळे ध्वननव्यापार सर्वच वाङ्मयात असला, तरी सर्वच वाङ्मयाला 'काव्य' म्हणण्यात येत नाही. सगळीकडे आत्म्याचे अस्तित्व असले, तरी काहींनाच 'जीव' म्हटले जाते, हे मागेच[१८] सांगितले आहे. त्यामुळे 'हृदयदर्पणा'त जे म्हटले आहे की, 'तर मग सगळ्याच शब्दप्रयोगांना काव्य म्हणण्याचा प्रसंग येईल,' त्याचे निरसन झाले.[१९]

'मारली गेलेली सहचरी' या शब्दांनी (क्रौञ्च पक्ष्याच्या शोकाचा) 'आलम्बनविभाव' व 'आक्रोश' या शब्दाने (त्याच्या शोकाचा) 'अनुभाव' सांगितला गेला आहे. 'उत्पन्न झालेला' याचा अर्थ लावताना 'आस्वादाचा विषय म्हणून' हे शब्द अध्याहृत घ्यावेत.[२०]

(शंका–) पण काय हो, शोकाच्या आस्वादामुळे जर श्लोक उत्पन्न झाला असे तुमचे म्हणणे आहे तर त्यामुळे '(करुणरसरूपी) प्रतीयमान अर्थ (या श्लोकातील) काव्याचा आत्मा' हे कसे सिद्ध होते? अशी शङ्का कल्पून (वृत्तिकार) म्हणतात– 'शोक हा तर'....इ. खरोखर शोकाचा आस्वाद हे स्वरूप असलेल्या करुणरसाचा शोक हा स्थायी भाव होय. (क्रौञ्चपक्ष्याच्या) शोक या स्थायी भावाचे जे (वर सांगितलेले) विभाव-अनुभाव, त्यांना योग्य अशी चित्तवृत्ती (सहानुभूतीमुळे वाल्मीकीच्या ठिकाणी) प्रकट झाली. तिचा वाल्मीकी-कडून घेतला जाणारा आस्वाद म्हणजेच करुणरस होय. म्हणून 'क्रौञ्च पक्ष्याचा शोक' या स्थायीभावाने करुणरसाचे रूप धारण केले' असे[२१] उपचाराने (म्हणजे लक्षणेने) म्हटले. (सहृदयाने) पूर्वी स्वतः निरनिराळे

स्थायीभाव अनुभवलेले असतात. मग मूळ पात्रांच्या ठिकाणी (विभाव, अनुभाव इ. मुळे) ते स्थायी भाव उदित झालेले आहेत असे तो अनुमान करतो. नंतर पूर्वी स्वत: अनुभवलेल्या त्या त्या स्थायीभावांनी त्याच्या मनावर झालेले संस्कार जागृत केले जातात व त्यामुळे सहृदयाच्या मनाचे मूळ पात्रांच्या अवस्थेशी 'तन्मयीभवन' होते. अशा रीतीने मूळ पात्रांच्या मनातील स्थायीभाव सहृदयाच्या रसास्वादाला उपयोगी पडतात.

पण काय हो, काव्याचा आत्मा प्रतीयमान अर्थ हा आहे व त्याचे (वस्तु, अलंकार व रसादि हे) तीन प्रकार आहेत असे (वृत्ती-मध्ये पृ. १३५ वर) सांगितले गेले. 'फक्त रस हा एकच प्रकार आहे' असे सांगितले गेले नाही. पण 'शोक श्लोक झाला' या ऐतिहासिक घटनेवरून तुम्हांला रसालाच काव्याचा आत्मा म्हणावयाचे आहे असे दिसते !' अशी शंका कल्पून व पूर्वपक्ष्याचे ते (म्हणजे रस हाच काव्याचा आत्मा आहे) म्हणणे बरोबरच आहे असे मान्य करूनच (वृत्तिकार) म्हणतात—'आणि प्रतीयमानाचे' इ. (रसाखेरीज) इतर प्रकार म्हणजे वस्तु व अलङ्कार या स्वरूपाचे. (वृत्तीत रसभावमुखेन यात 'रस' शब्दाच्या जोडीला) 'भाव' शब्द योजून असे सुचविले आहे की, जेव्हा व्यभिचारी भाव हा सहृदयाच्या आस्वादाचा विषय होतो तेव्हा (तो व्यभिचारी भाव स्थायीभावाचे अंग असल्यामुळे व त्याला महत्त्व नसल्यामुळे) जरी त्याचे स्वत:मध्ये पर्यवसान होत नसले (व स्थायीभावामध्येच होत असले) आणि स्थायीभावाचेच आस्वादा-मध्ये पर्यवसान झाल्याने त्या पर्यवसानाला योग्य अशी 'रसा'ची प्रतिष्ठा त्या व्यभिचारी भावाला प्राप्त झालेली नसली, तरी तो सहृदयाच्या आस्वादाचा विषय झालेला व्यभिचारी भावसुद्धा काव्याचा आत्मा होऊ शकतो. उदा.

('एका हाताच्या अंगठ्याच्या) नखाच्या टोकाने (त्याच हाताच्या दुसऱ्या बोटाचे) नख घाशीत, (व दुसऱ्या हाताच्या बोटांनी पहिल्या हाताच्या मनगटावरील) चंचल कंकण फिरवण्याचा चाळा करीत, आणि ज्यात चढवलेला पैंजण किञ्चित् नाद करीत आहे अशा आपल्या पायाने जमिनीवर हळूहळू रेघोट्या काढीत ती[३३] ...'

या श्लोकात 'लज्जा' हा व्यभिचारी भाव काव्याचा आत्मा आहे.[२३]

आणि वृत्तीतल्या रस-भाव या शब्दांनी रस व भाव यांचे आभास[२४] व भावाचा प्रशम[२५] हेही सांगितले गेले आहेत, कारण रसाभास, भावाभास आणि भाव-प्रशम यांमध्ये रस व भाव यांपेक्षा थोडा फरक असला, तरी त्यांचे स्वरूप रसभावांसारखेच आहे. 'प्राधान्यामुळे' याचा अर्थ त्या वस्तु व अलंकार या प्रकारांचे रसामध्येच पर्यवसान होते, म्हणून, असा आहे. तात्पर्य हे की, वस्तुध्वनि व अलंकारध्वनि यांचे पर्यवसान त्यांच्या स्वतःमध्येच होत नसले, तरी ते अभिधा, तात्पर्य, लक्षणा यांमुळे निर्माण होणाऱ्या चमत्कृतीहून वेगळी चमत्कृती निर्माण करतात, म्हणून त्यांनाही उपचाराने[२६] (म्हणजे लक्षणेने) 'काव्याचे जीवित' म्हटले आहे, हे तात्पर्य.

## टीपा

१. '**आदिकवे:– शोक:श्लोकत्वमागत:**' याचा अनुवाद आम्ही वृत्तीला अनुसरून 'आदिकवीच्या शोकाचेच श्लोकात पर्यवसान झाले' असा केला आहे. तो 'आदिकवीच्या बाबतीत (क्रौंचाच्या) शोकाचेच श्लोकात पर्यवसान झाले' असा केल्यास अधिक उचित होईल.

२. वृत्तीतल्या 'वाच्यवाचकरचना' याचा एक अर्थ आम्ही वरील अनुवादात अभिनवगुप्तांना अनुसरून दिला आहे. दुसरा अर्थ 'वाच्यार्थ आणि वाचक शब्द यांची रचना (जुळणी)' असाही करिता येईल.

३. वरील कारिका ५ मधील 'काव्य' या शब्दाचे विवरण आनंदवर्धनांनी '**विविधवाच्यवाचकरचनाप्रपंचचारु**' असे केले आहे. कोणत्याही काव्यातील सौंदर्य जरी हृद्य व्यंग्यार्थाच्या अस्तित्वावर अवलंबून असले, तरी तो हृद्य व्यंग्यार्थ प्रकट होण्यासाठी त्या काव्यामधील वाचक शब्द, वाच्य अर्थ व त्यांची परस्पर जुळणी ही सर्व त्या व्यंग्यार्थाच्या हृद्यत्वाला पोषक किंवा उपकारक असली पाहिजेत. ती जर तशी नसतील, तर व्यंग्यार्थ असूनही काव्यत्वाचा अभाव असू शकतो.

४. वरील कारिका ५ मध्ये रामायणातील क्रौञ्च पक्षाच्या कथेचा दाखला देऊन काव्यामध्ये रसादिरूप व्यंग्यार्थच महत्त्वाचा असतो, असे म्हटले. रामायणातील बालकांडाच्या २ ऱ्या सर्गामध्ये ही क्रौंच पक्ष्याची कथा आली आहे व तिचा निर्देश आनंदवर्धनांनी या कारिकेवरील वृत्तीमध्ये

केला आहे. मूळ रामायणातील कथेमध्ये एका व्याधानें क्रौंच पक्ष्यांच्या जोडीपैकी नराला ठार मारले, व त्याच्या मृत्यूमुळे त्याची मादी दुःखित झाली व ते दृश्य पाहून वाल्मीकि ऋषींनाही दुःख होऊन त्यांनी–

'हे निषादा, ज्याअर्थी प्रेमात रंगून गेलेल्या क्रौंच पक्ष्यांच्या जोडप्या-पैकी एकाला तू ठार मारलेस, त्याअर्थी तुला या जगात अनंत काळपर्यंत मानाचे स्थान मिळणार नाही.'

हा श्लोक उत्स्फूर्तपणे म्हणून त्या व्याधाला शाप दिला, असे म्हटले आहे, पण आनंदवर्धनांनी वृत्तीमध्ये व्याधाच्या बाणाने क्रौंच पक्षीण मारली गेली व तिच्या मृत्यूमुळे क्रौंच पक्ष्याने शोक केला असे म्हटले आहे. कालिदासाने रघुवंश सर्ग १४, श्लोक ७० मध्ये रामायणाप्रमाणेच क्रौंच पक्षी मारला गेला होता असे म्हटले आहे. आनंदवर्धनाप्रमाणेच राजशेखरानेसुद्धा 'काव्य-मीमांसा' या ग्रंथामध्ये व्याधाकडून क्रौंच पक्षीणच मारली गेली, असे म्हटले आहे. अभिनवगुप्तांनी अर्थात् आनंदवर्धनांच्या मताचा अनुवाद केला आहे. रामायणातील मूळ कथेच्या तपशीलातला हा बदल आनंदवर्धनांच्या हातून अनवधानाने झाला किंवा तो त्यांनी हेतुपुरस्पर केला असा प्रश्न येथे वाचकाच्या समोर उभा राहतो. आनंदवर्धनांसारख्या साक्षेपी ग्रंथ-काराच्या हातून अनवधनाने प्रमाद झाला असेल हे मुळीच संभवत नाही. त्यांनी सहेतुकपणेच हा बदल केला असला पाहिजे. रामकथेमध्ये सीतेला अनेक वेळा नानाप्रकारची मरणप्राय यातना देणारी दुःखे सहन करावी लागली आहेत. अशा या दुःखी सीतेचे प्रतीक या दृष्टीने क्रौंच पक्ष्याऐवजी क्रौंच पक्षिणीची योजना आनंदवर्धनांनी हेतुपूर्वक केली असावी. रामायणाचे शेवटी सीता धरणीच्या उदरात नष्ट होणे, रामाने आजन्म दुःखी होऊन राहणे आणि क्रौंचीच्या नाशामुळे क्रौंच पक्ष्याने आक्रोश करणे यांमधील साम्य नजरेत भरण्यासारखे आहे. म्हणूनच ४ थ्या उद्योतात आनंदवर्धन म्हणतात की, रामायणातील मुख्य रस करुणच आहे. या सर्व गोष्टींचा विचार करिता क्रौंच पक्षिणीची योजना करण्यात आनंदवर्धनांनी उच्च कोटीची रसिकता, सहृदयता आणि काव्यात्मता प्रकट केली आहे हे दिसून येईल. (पाहा, उद्योत ३ रा, कारिका ११ वरील वृत्ती ).

५. कारिका ४ मध्ये प्रतीयमान ( म्हणजे व्यंग्य) अर्थाचे काव्यामधील महत्वाचे स्थान स्पष्ट केले आहे; तर वरील कारिका ५ मध्ये 'तोच प्रतीयमान किंवा व्यंग्य अर्थ काव्याचा आत्मा होय' असे म्हणून क्रौंच पक्ष्यांच्या जोडीपैकी एकाचा व्याधाने केलेला वध व त्यामुळे दुसऱ्याला झालेले दुःख पाहून वाल्मीकीचे मन हेलावले व त्याला क्रौंच पक्ष्याच्या दुःखाचा जो अनुभव (आस्वाद, चर्वणा) आला, त्यामुळे त्याच्या तोंडून 'मा निषाद'

इ. श्लोक उत्स्फूर्तपणे बाहेर पडला असे म्हटले आहे. क्रौंच पक्ष्याच्या ठिकाणी जागृत झालेल्या शोक या स्थायी भावाचा जो साक्षात्कार वाल्मीकीच्या ठिकाणी घडून आला, तोच करुणरस होय. वाल्मीकींना हा जो करुणरसरूपी साक्षात्कार झाला, त्या साक्षात्काराची प्रतीति वाचकांना 'मा निषाद (हे पारध्या' इ. श्लोकामुळे व्यंजनेने येत असल्यामुळे या श्लोकामध्ये करुणरसरूप–प्रतीयमान (व्यंग्य) अर्थ आहे. व म्हणून हा श्लोक, रसरूपव्यंग्यार्थसंपन्न काव्याचे उदाहरण आहे. कोणताही प्रतीयमान (म्ह. व्यंग्य) अर्थ काव्याचा आत्मा असतो असे म्हणून केवळ रसरूप प्रतीयमान अर्थाचे उदाहरण कारिकाकाराने दिले असले व वस्तुरूप आणि अलंकाररूप प्रतीयमान अर्थाचे उदाहरण जरी दिले नसले, तरी काही बिघडत नाही. कारण रसभावादिरूप प्रतीयमान अर्थ हाच तीन प्रकारच्या प्रतीयमान अर्थांमध्ये मुख्य आहे व वस्तु आणि अलंकाररूप प्रतीयमान अर्थांचे पर्यवसान सरतेशेवटी रसादिरूप प्रतीयमान अर्थामध्येच होत असल्यामुळे त्यांची स्वतंत्र उदाहरणे देण्याची जरूरी ग्रंथकाराला वाटली नाही, हे उघड आहे,

६. लगेच पूर्वीचा मजकूर म्हणजे 'पण व्यंग्यार्थाचा 'रसादिरूपी प्रकार' इ. (वृत्तीतील) मजकूर. ५ व्या कारिकेवरील वृत्तीमध्येही कारिकेचा अर्थ सांगून झाल्याबरोबर पहिल्याच परिच्छेदात 'आणि प्रतीयमानाचे इतर' इ. वाक्यातही रसादि अर्थाचाच निर्देश आहे. कारिकेआधीच्या व नंतरच्या वृत्तिग्रंथाच्या चिमटयामध्ये या कारिकेतील 'तोच अर्थ' हे शब्द असल्या-मुळे 'तोच' अर्थ म्हणजे 'रसादि' अर्थ' हे निश्चित होते.

७. पाहा, पृ. १४१

८. निरपेक्षभाव व सापेक्ष भाव हे शब्द भरताने नाटयशास्त्र, ६–४५ मध्ये योजिले आहेत. (पाहा, प्रा. कंगले–संपादित रस–भाव–विचार, पृ. २५७. विप्रलम्भरति व शोक यांतील भेद दर्शविणाऱ्या सुंदर दृष्टान्तासाठी पाहा, **रघुवंशम्**, ८–५६.

९. विभाव, अनुभाव इ. संज्ञांच्या स्पष्टीकरणार्थ पृ. ८, टीप २ री पाहा.

१०. या संदर्भात 'सर वॉल्टर स्कॉट' याच्या Patriotism या कवितेतील पुढील ओळ आठवते.– 'For him no minstrel raptures swell,' हे देशाविषयी लवमात्र प्रेम नसलेल्या स्वार्थान्ध माणसाबद्दल म्हटले आहे. याच पद्धतीने थोर देशप्रेमी माणसाबद्दल बोलावयाचे झाल्यास 'Minstrel raptures swell for him' असे म्हणावे लागेल. म्हणजे थोर देशभक्ता-च्या बाबतीत कवीच्या भावना उचंबळतात. इतक्या की, त्या भावना बाहेर वाहू लागून काव्याच्या रूपाने प्रकट होतात. कवीच्या भावना कोणत्याही

कारणाने उत्कट झाल्या की, त्या काव्यरूपाने अवतरतात हेच अभिनवगुप्तांना म्हणावयाचे आहे.

११. या 'शोक' शब्दाचा अर्थ 'लौकिक शोक' असा समजावा. स्वतःवर काही आपत्ती कोसळल्यामुळे माणसाला जो शोक होतो तो लौकिक शोक. पण दुसऱ्याचे दुःख पाहून जो कळवळा उत्पन्न होतो, ती भावना लौकिक शोकाची नव्हे. क्रौंचाच्या शोकामुळे वाल्मीकींच्या मनात उसळलेला शोक लौकिक शोकाचा नव्हता, असा अभिनवगुप्तांच्या वरील वाक्याचा आशय आहे.

१२. म्हणजे स्वतःवर आपत्ती कोसळल्यामुळे मनुष्य ज्यावेळी दुःखाने व्याकुळ होतो, त्याचवेळी काही तो काव्य रचण्याच्या मनःस्थितीत नसतो.

१३. इतर कोणतेही परिणाम म्हणजे अभिधा, तात्पर्य, लक्षणा या वृत्तींच्या द्वारे होणारे बोध. **अपरशाब्दवैलक्षण्य** हा शब्दप्रयोग यापूर्वी पृ. १० वर व पृ. १३६ वरही केलेला आहे.

१४. अभिनवगुप्तांच्या या म्हणण्याचे तात्पर्य एकंदरीत असे दिसते की, क्रौंचाचा शोक आणि त्याचा मुनींवर झालेला परिणाम या दोन्ही भावना अगदी एकच नव्हेत. क्रौंचाच्या त्या शोकामुळे मुनींच्या मनावर प्रथम आघात झाला. त्यानंतर त्या पक्ष्याबद्दल सहानुभूति, व्याधाबद्दल तीव्र संताप इ. भावना उचंबळून येऊन मग त्यावर वाल्मीकींच्या प्रतिभेचे संस्कार झाले व त्या संस्कारित भावनांनी श्लोकरूप घेतले. आंग्लकवि Wordsworth यांच्या 'Poetry is the spontaneous overflow of powerul feelings recollected in contemplation and worked upon by imagination.' या विधानाचे तात्पर्य असेच आहे

१५ 'मा' या अव्ययाबरोबर ज्यावेळा प्रथम भूतकाळी अथर तृतीयभूतकाळी रूपांचा उपयोग करितात, त्यावेळी **न माङ्योगे** या सूत्राप्रमाणे रूपाच्या प्रारंभी अ योजीत नाहीत. पण रामायणातील वरील श्लोकात तर मा अगमः असे म्हटले आहे, म्हणजे अ वापरला आहे. लौकिक भाषेत अ वापरीत नाहीत, पण वैदिक भाषेत तो विकल्पाने वापरतात. या बाबतीत पाणिनीचे **बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि ।** (६–४–७५) हे सूत्र पहा.

१६. मागील पृ. ५७ वरील 'लोचना'तील 'ग्रन्थासारखे असणारे वेदादि'— इ. वाक्ये पाहा. म्हणजे अभिनवगुप्तांपूर्वी भट्टनायकाने अशा प्रकारच्या वर्गीकरणाचा उल्लेख केलेला दिसतो. अर्थात् काव्यात 'व्यापार' मुख्य असतो असे जे भट्टनायकाने म्हटले आहे, त्या 'व्यापार' शब्दाने त्याला 'भोजकत्व' हा व्यापार अभिप्रेत आहेसे वाटते, कारण भट्टनायक 'व्यंजना' मानीत नाही.

रुय्यकाने 'अलंकारसर्वस्व' (काव्यमाला आवृति) पृ. १० वर भट्ट-

नायकाचे मत सांगताना त्याच्या याच श्लोकातील शब्द व वाच्यार्थ यांचे गौणत्व व ' व्यापारा 'चे प्राधान्य यांचा उल्लेख केला आहे.

१७. पृ. ७९ वरील स च व्यापारश्चयं व्यक्कुर्वन् इ. वाक्ये पहा.

१८. मागे म्हणजे पृ. ८७ वर.

१९. म्हणजे अभिनवगुप्तांचे म्हणणे असे की, केवळ ध्वननव्यापारामुळे वाङ्मयाला ' काव्य ' म्हटले जात नाही, तर उचित गुणालङ्कारांनी युक्त अशी शब्द व वाच्यार्थ यांची मांडणी असेल व तीतून ध्वननव्यापाराने रसादि प्रकट होत असतील, तरच त्याला ' काव्य ' ही संज्ञा देण्यात येते.

२०. म्हणजे वाल्मीकीच्या ठिकाणी प्रकट झालेला शोक (म्हणजे करुणरस) हा ' उत्पन्न ' झालेला नसून ' आस्वादाचा विषय ' झालेला होता. कारण रस हा केव्हाही उत्पन्न होत नाही, तो अभिव्यक्त होतो, असे अभिनवगुप्तांचे ठाम मत आहे.

२१. काव्याचा आत्मा रस, तेव्हा वाल्मीकीच्या श्लोकाचा आत्मा वस्तुतः ' करुण रस ' हा होय. पण मूळ पात्राच्या ( लौकिक ) स्थायिभावामुळे प्रेक्षकाच्या मनात जागृत होणारा जो तत्सदृश (अलौकिक) स्थायिभाव, त्याचाच रस या रूपाने आस्वाद घेतला जात असतो, म्हणून ' शोक हा स्थायिभावच श्लोक झाला ' असे लक्षणेने म्हटले.

२२. तुलनेसाठी पाहा, किरातार्जुनीय, ८–१४.

२३. या व्यभिचारी भावाचे पर्यवसान जरी शेवटी नायिकेच्या मनातील ' अभिलाषरति ' या स्थायिभावामध्ये होत असले, तरी या श्लोकापुरते त्या व्यभिचारिभावाला प्राधान्य असल्यामुळे त्यालाच या श्लोकाचा प्राण मानिले आहे.

२४. रस व भाव यांचे आभास व भाव–प्रशम यांच्या स्पष्टीकरणासाठी पृ. १२६ पाहा.

२५. पाहा, जगन्नाथपंडिताचा ' रसगंगाधर, ' पृ. १२७ (काव्यमाला आवृत्ति, १९४७. )

२६. औचित्यात् हा शब्द ' उपचाराने ' याच अर्थी पृ. १२६ वर वापरला आहे.

ध्वन्यालोकः

सरस्वती स्वादु तदर्थवस्तु निःष्यन्दमाना महतां कवीनाम् ।
अलोकसामान्यमभिव्यनक्ति परिस्फुरन्तं प्रतिभाविशेषम् ॥ ६ ॥

तद् वस्तुतत्त्वं निःष्यन्दमाना महतां कवीनां भारती अलोकसामान्यं प्रतिभाविशेषं परिस्फुरन्तमभिव्यनक्ति । येनास्मिन्नतिविचित्रकविपरम्परावाहिनि संसारे कालिदासप्रभृतयो द्वित्राः पञ्चषा वा महाकवय इति गण्यन्ते ।

ध्वन्यालोक

अर्थामधील ते ( दिव्य, आनंदरसरूप ) सारभूत तत्त्व थोर कवींच्या वाणीतून ओसंडत असते. ती त्यांची वाणी ( सहृदयांना ), लकाकणाऱ्या अलौकिक अशा दिव्य प्रतिभेचा साक्षात्कार घडविते. ॥ ६ ॥

त्या सारभूत अर्थाने पान्हवणारी थोर कवींची वाणी चकाकणाऱ्या अलौकिक थोर प्रतिभेचे दर्शन घडविते. असे असल्यामुळेच अगदी निरनिराळ्या प्रकारच्या कवींच्या परंपरा धारण करणाऱ्या या विश्वात कालिदासासारखे दोनतीनच किंवा फार तर पाचसहाच कवि ' महाकवि ' म्हणून गणले जातात.

लोचनम्

एवमितिहासमुखेन प्रतीयमानस्य काव्यात्मतां प्रदर्श्य स्वसंवित्सिद्धमप्येतदिति दर्शयति । — सरस्वतीति । वाग्रूपा भगवतीत्यर्थः । वस्तुशब्देनार्थशब्दं तत्त्वशब्देन च वस्तुशब्दं व्याचष्टे । निःष्यन्दमानेति । दिव्यमानन्दरसं स्वयमेव प्रस्नुवानेत्यर्थः । यदाह भट्टनायक :—

वाग्धेनुर्दुग्ध एतं हि रसं यद्बालतृष्णया ।
तेन नास्य समः स स्याद् दुह्यते योगिभिर्हि यः ।

तदावेशेन विनाप्याक्रान्त्या हि यो योगिभिर्दुह्यते । अत एव—

यं सर्वशैलाः परिकल्प्य वत्सं मेरौ स्थिते दोग्धरि दोहदक्षे ।
भास्वन्ति रत्नानि महौषधीश्च पृथूपदिष्टां दुदुहुर्धरित्रीम् ॥

इत्यनेन सारान्यवस्तुपात्रत्वं हिमवत उक्तम् । ' अभिव्यनक्ति

परिस्फुरन्तम्' इति। प्रतिपत्तॄन् प्रति सा प्रतिभा नानुमीयमाना, अपि तु तदावेशेन भासमानेत्यर्थः। यदुक्तमस्मदुपाध्यायभट्टतौतेन— 'नायकस्य कवेः श्रोतुः समानोऽनुभवस्ततः।' इति। 'प्रतिभा' अपूर्ववस्तुनिर्माणक्षमा प्रज्ञा; तस्या 'विशेषो' रसावेशवैशद्यसौन्दर्यकाव्यनिर्माणक्षमत्वम्। यदाह मुनिः— 'कवेरन्तर्गतं भावम्' (नाट्यशास्त्रम्, ७–२) इति। व्यनक्ति। अभिव्यक्तेन स्फुरता प्रतिभाविशेषेण निमित्तेन महाकवित्वगणनेति यावत् ॥ ६ ॥

लोचन

अशा रीतीने (रामायणातील) ऐतिहासिक घटनेचा दाखला देऊन त्याद्वारे (रसादिरूपी) 'प्रतीयमान' अर्थ हा काव्याचा आत्मा असतो हे दाखविल्यावर (सहृदयांच्या) स्वतःच्या अनुभवावरूनही हे सिद्ध होते, हे पुढील कारिकेत दाखविण्यात येत आहे.

सरस्वती म्हणजे '(कवि) वाणीची अधिष्ठात्री देवता' असा अर्थ. कारिकेतील 'अर्थ' या शब्दाचे व्याख्यान वृत्तीत 'वस्तु' या शब्दाने केले आहे, आणि 'वस्तु' या शब्दाचे व्याख्यान 'तत्त्व' या शब्दाने केले आहे.[२] 'वाणीतून ओसंडत असते' याचा अर्थ दिव्य अशा आनंद-रूपी रसाचा त्या वाणीला आपोआपच पान्हा फुटतो. जसे भट्टनायकाने म्हटले आहे की–

(सहृदयरूपी) वासराविषयी असणाऱ्या अपार प्रेमामुळे वाणीरूपी धेनूला ज्या अर्थी या रसाचा पान्हा फुटतो, त्या अर्थी जो (ब्रह्मानन्द-रूपी) रस योग्यांकडून अनुभवला जातो, तो रस या (म्हणजे काव्या-तील) रसाच्या तोडीचा नव्हे.' ब्रह्माचे ठिकाणी (धेनूसारखा) स्नेहाचा उमाळा नसतानाच योग्यांना त्याचा अनुभव कष्टानेच घ्यावा लागतो.[३] म्हणूनच 'ज्या हिमालयाची वासरू म्हणून योजना करून सर्व पर्वतांनी, पृथुराजाने सांगितल्याप्रमाणे पृथ्वी (रूपी धेनू)ची धार काढली. धार काढणारा, त्या कर्मात प्रवीण असा मेरुपर्वत होता. त्या पृथ्वीरूपी गाईची धार काढून त्यांनी तेजस्वी रत्ने व मोठ्या प्रभावशाली वनस्पति मिळविल्या.[४]

या श्लोकाने हिमालयाला (पृथ्वीपासून) सारभूत व श्रेष्ठ वस्तु प्राप्त झाल्या, असे (कवीने) सुचविले आहे[५]. लकाकणाऱ्या (प्रतिभेचा साक्षात्कार) घडविते – त्या (कवीच्या) प्रतिभेचे रसिकांना अनुमान करावे लागत नाही, तर तशी प्रतिभा रसिकांच्या ठिकाणीही जागृत झाल्याने ती त्यांना स्वानुभवानेच जाणवते, असा अर्थ. असे आमचे गुरु 'भट्टतौत' यांनी म्हटले आहे–

'म्हणून नायकाला, कवीला आणि श्रोत्याला येणारा अनुभव सारखाच असतो.[६]

'प्रतिभा' म्हणजे अगदी नवा, (अपूर्व) काव्यार्थ निर्माण करण्याचे सामर्थ्य असलेली बुद्धि.[७] ती अलौकिक प्रतिभा म्हणजे रसादींच्या साक्षात्काराने प्राप्त झालेल्या निर्मलतेमुळे निर्माण होणाऱ्या सौंदर्याने निर्भर असे काव्य रचण्याची शक्ति. (भरत) मुनींनी जे म्हटले आहे—

'कवीच्या अन्तःकरणातील भावनेला–' इ. ज्यामुळे–म्हणजे 'अभिव्यक्त झालेला, लकाकणारा प्रतिभाविशेष' या कारणामुळे. त्यामुळेच त्या कवीची महाकवींमध्ये गणना केली जाते, हा आशय.

टीपा

१. कारिका ६ मध्ये महाकवींची वाणी त्यांच्या काव्यातून रसभावादिरूप श्रेष्ठ प्रकारच्या अर्थाचा आविष्कार करते व त्यामुळेच महाकवींच्या ठिकाणी असणाऱ्या लोकोत्तर प्रतिभेच्या चमकेची ओळख वाचकांना पटते, असे म्हटले आहे. महाकवींनी रचलेल्या काव्यांमधून रसभावादिरूप श्रेष्ठ प्रकारच्या अर्थाचा आविष्कार होणे व त्याचा सहृदय वाचकांना साक्षात्कार होणे हेच महाकवींच्या अलौकिक प्रतिभाविलासाचे लक्षण किंवा गमक होय व काव्याच्या द्वारा रसभावादिरूप आशयाचा साक्षात्कार वाचकांना करविण्याचे सामर्थ्य म्हणजेच प्रतिभा होय. वाचकांना कवीच्या प्रतिभेची व तिच्यामुळे कवीने प्रकट केलेल्या रसभावादिरूप आशयाची जी ओळख पटते, ती केवळ तटस्थपणे केलेल्या अनुमानाने पटत नसून रसभावादि आशयाच्या साक्षात्कारामुळे वाचक कवीच्या मनोव्यापाराशी एकरूप होऊन कवीच्या प्रतिभाविलासाने म्हणजे कवीने प्रकट केलेल्या रसभावादि अर्थाने ते नाचविले जातात, म्हणूनच होय. यासंबंधात अभिनवगुप्तांनी भट्ट तौतांचे एक वचन उद्धृत केले आहे– "नायकस्य कवेः श्रोतुः समानोऽनुभवस्ततः ।" याचा अर्थ असा की, मूळ कथेतील दुष्यन्त, रामादि पात्रे, कवि व वाचक

यांना होणारा भावभावनांचा साक्षात्कार हा सारखाच उत्कट असतो. राजशेखराने कारयित्री व भावयित्री प्रतिभा असे प्रतिभेचे दोन प्रकार सांगितले आहेत. कवीच्या ठिकाणी असणारी प्रतिभा ही कारयित्री (म्हणजे कवीला काव्य करावयास लावणारी) प्रतिभा; व सहृदय वाचकाच्या ठिकाणी असणारी प्रतिभा ही भावयित्री (म्हणजे काव्यातील रसभावादिरूप सौंदर्याचा त्याला स्वतःला साक्षात्कार करून देणारी) प्रतिभा होय. कवि व वाचक यांच्या भूमिका अनुक्रमे काव्यनिर्मिती करणारा व काव्यातील रसभावादिकांचा आस्वाद घेणारा या दृष्टीने भिन्न असल्या, तरी त्या दोघांच्या ठिकाणी असणाऱ्या प्रतिभेची जात शेवटीशेवटी एकच असते. हाच विचार अभिनवगुप्तांनी 'लोचन' टीकेच्या प्रारंभीच्या मंगलपर श्लोकामध्ये 'सरस्वत्यास्तत्त्वं कविसहृदयाख्यं विजयते।'' (म्हणजे कवि व सहृदय' हे नाव असलेले सरस्वती देवतेचे चैतन्यस्वरूप सर्वांहून उत्कृष्ट होय) या शब्दांनी प्रकट केला आहे.

२. म्हणजे 'अर्थवस्तु' याचा अर्थ वस्तु, अलंकार व रस या तीन काव्यार्थांमधील अत्यंत महत्त्वाचा, 'रसरूपी' अर्थ.

३. पाहा, श्रीमद्भगवद्गीता, १२–५. अभिनवगुप्तांनी अभिनवभारतीलही योग्यांच्या मार्गाला 'पङ्क' म्हटले आहे. पाहा, 'रसभावविचार,' कांगले आवृत्ति, पृ. १९४. मात्र ब्रह्मानंद हा कष्टसाध्य असला, तरी तो एकदा मिळाल्यावर दुसऱ्या कोठल्याही आनंदाची त्याच्याशी बरोबरी होऊ शकत नाही असे अभिनवगुप्तांनी पुढे काशी आवृत्ति, पृ. ५१० वर म्हटले आहे.

४. कुमारसंभवम्–१–२.

५. या उदाहरणातील पृथ्वी ही वाग्धेनूच्या ठिकाणी, हिमालय हा कविरूपी वासराच्या ठिकाणी आणि हिमालयाला पृथ्वीपासून प्राप्त झालेल्या श्रेष्ठ वस्तु कवीला वाग्धेनूपासून प्राप्त होणाऱ्या आनंदरूप रसाच्या ठिकाणी असल्यामुळे हा श्लोक अभिनवगुप्तांनी दृष्टान्तादाखल उद्धृत केला आहे.

६. विभावानाही एकाच स्थायिभावाचा अनुभव येत असला तरी नायकाला तो अनुभव 'स्थायिभाव' या रूपानेच येतो, परंतु कवीला व रसिकाला मात्र तो रसरूपाने येत असतो.

७. तुलनार्थ भट्टतौतांचे पुढील सुप्रसिद्ध वचन पाहा–

प्रज्ञा नवनवोन्मेषशालिनी प्रतिभा मता।
तदनुप्राणनाजीवद् वर्णनानिपुणः कविः॥

यातील पहिली ओळ 'क्षेमेन्द्राने औचित्यविचारचर्चा' या ग्रंथात कारिका ३५ नंतर (प्रथमच) उद्धृत केली असून २ री ओळ हेमचंद्राने दिली

आहे. या दोन्ही ओळींचा अर्थ असा :—तेजाच्या नित्यनवीन उन्मेषाने चमकणारी बुद्धि म्हणजेच 'प्रतिभा' होय, आणि त्या प्रतिभेच्या चैतन्याचा संचार झाल्यामुळे ज्याच्या वर्णनामध्ये जिवंतपणा उत्पन्न होतो, तो 'कवि' होय.

८. ही सबंध कारिका अशी आहे–

वागङ्गमुखरागेण सत्त्वेनाभिनयेन च ।
कवेरन्तर्गतं भावं भावयन् भाव उच्यते ॥

म्हणजे वाणीने, शरीराच्या हालचालींनी, मुद्राभिनयाने आणि सात्त्विक भावांमुळे विशिष्ट स्थायी किंवा व्यभिचारी भावाचे चित्रण करण्याचे उद्दिष्ट साकार करणाऱ्या स्थायिभावाला व व्यभिचारिभावाला 'भाव' म्हणतात.

ध्वन्यालोकः

इदं चापरं प्रतीयमानस्यार्थस्य सद्भावसाधनं प्रमाणम्–

शब्दार्थशासनज्ञानमात्रेणैव न वेद्यते ।
वेद्यते स तु काव्यार्थतत्त्वज्ञैरेव केवलम् ॥ ७ ॥

सोऽर्थो यस्मात्केवलं काव्यार्थतत्त्वज्ञैरेव ज्ञायते । यदि च वाच्यरूप एवासावर्थः स्यात्तद्वाच्यवाचकरूपपरिज्ञानादेव तत्प्रतीतिः स्यात् । अथ च वाच्यवाचकलक्षणमात्रकृतश्रमाणां काव्यतत्त्वार्थभावनाविमुखानां स्वरश्रुत्यादिलक्षणमिवाप्रगीतानां गान्धर्वलक्षणविदामगोचर एवासावर्थः ।

ध्वन्यालोक

प्रतीयमान अर्थाचे अस्तित्व सिद्ध करणारा हा आणखी दुसरा पुरावा–

कारण त्या प्रतीयमान अर्थाचे आकलन केवळ शब्दांचे शास्त्र (म्ह. व्याकरण) आणि अर्थाचे शास्त्र (म्हणजे कोश वगैरे) यांच्या अभ्यासानेच होऊ शकत नाही. तो अर्थ फक्त काव्याचे मर्म जाणणारांनाच कळतो. ॥ ७ ॥

कारण तो अर्थ काव्याचे मर्म जाणणारांनाच कळतो. आता तो अर्थ आणि वाच्यार्थ हे जर एकच असते, तर केवळ वाच्यार्थ व वाचक शब्द यांच्या ज्ञानानेच त्याही अर्थाचा बोध झाला असता ! उलट असे की, ज्यांनी

केवळ वाच्यार्थ व वाचक शब्द समजावून घेण्यापुरतेच परिश्रम केले आहेत आणि काव्याचे सारभूत तत्त्व कोणते आहे याकडे ज्यांचे मन एकसारखे लागून राहात नाही, त्यांच्या आटोक्यात तो प्रतीयमान अर्थ येऊच शकत नाही. ज्यांनी प्रत्यक्ष गाण्यात फारशी प्रगति केली नाही किंवा ज्यांनी गायनास केवळ प्रारंभच केला आहे असे संगीताभ्यासक ज्याप्रमाणे स्वर, श्रुति[1] इत्यादिकांच्या यथार्थ स्वरूपाला पारखेच असतात, त्याप्रमाणे.

लोचनम्

इदं चेति । न केवलं 'प्रतीयमानं पुनरन्यदेव' इत्येतत्कारिका-सूचितौ स्वरूपविषयभेदावेव; यावद्भिन्नसामग्रीवेद्यत्वमपि वाच्याति-रिक्तत्वे प्रमाणमिति यावत् । वेद्यत इति । न तु न वेद्यते, येन न स्यादसाविति भावः । काव्यस्य तत्त्वभूतो योऽर्थस्तस्य भावना वाच्यार्था-तिरेकेणानवरतचर्वणा, तत्र विमुखानाम् । स्वराः षड्जादयः सप्त । श्रुतिर्नाम शब्दस्य वैलक्षण्यमात्रकारि यद्रूपान्तरं तत्परिमाणा स्वरतद-न्तरालोभयभेदकल्पिता द्वाविंशतिविधा । आदिशब्देन जात्यंशकग्रामराग-भाषाविभाषान्तरभाषादेशीमार्गा गृह्यन्ते । प्रकृष्टं गीतं गानं येषां ते प्रगीताः, गातुं वा प्रारब्धा इत्यादिकर्मणि क्तः । प्रारम्भेण चात्र फलपर्यन्तता लक्ष्यते ॥ ७ ॥

लोचन

'हा आणखी दुसरा पुरावा.इ.-परंतु महाकवींच्या वाणीमध्ये' इ. – या कारिकेतून सूचित केलेले स्वरूपभेद आणि विषयभेद[2] ही दोनच प्रमाणे नव्हेत, तर व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाहून निराळ्या (कारण–) सामग्रीमुळे ज्ञात होतो, हेही व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाहून वेगळा आहे हे सिद्ध करणारे प्रमाण आहे, असा आशय. 'कळतो' म्हणजे तो कळत नाही असे नाही, की ज्यामुळे (म्हणजे तो कळत नसल्यामुळे) 'तो नाही' असे म्हणता येईल[3]! काव्याचे सार असलेल्या रसरूपी अर्थाच्या भावनेकडे (म्हणजे चिंतनाकडे) म्हणजे वाच्यार्थाहून भिन्न अशा स्वरूपात त्याचा निरन्तर आस्वाद घेण्याकडे ज्यांचे लक्ष लागत नाही अशांच्या. स्वर हे षड्ज इ. सात आहेत. 'श्रुति' म्हणजे मूळ नादामध्ये केवळ वेगळेपण

आणणारे जे दुसरे रूप, ते उत्पन्न करणारी[४] व स्वर आणि त्यातील अंतरे या दोहोंच्या भेदावर आधारलेली २२ प्रकारची.[५] ('स्वर, श्रुति वगैरे' यातील) 'वगैरे' शब्दाने जाति, अंशक, ग्राम, भाषा, विभाषा, अन्तरभाषा, देशीमार्ग, यांचा समावेश केला आहे.[६] प्रकृष्ट (म्हणजे उत्कृष्ट) आहे गीत म्हणजे गायन ज्याचे, ते प्रगीत किंवा 'गावयास प्रारंभ केलेले' असा अर्थ घेतल्यास येथे म्हणजे 'प्रगीत' या शब्दात प्र + गै या धातूला आदिकर्मणि क्तः कर्तरि। (पाणिनि, ३-४-७१) या सूत्राने क्त हा प्रत्यय लागला आहे असे समजावे. 'गावयास प्रारंभ केलेले' यातील 'प्रारंभ' शब्दाने 'फलप्राप्तीपर्यंत पोहोचलेले' असा अर्थ लक्षणेने घ्यावयाचा.[७] ॥७॥

टीपा

१. सा, रे, ग, म, प, ध, नि हे सात स्वर सर्वांना माहीत आहेत. 'सा' या स्वरापेक्षा रे उंच असतो; 'रे' पेक्षा 'ग', 'ग' पेक्षा 'म,' अशा रीतीने पुढचा स्वर मागच्या स्वरापेक्षा उंच असतो, हेही आपल्याला परिचित आहे.

पण एका स्वराची त्याच्या मागच्या स्वरापासून जी अधिक उंची असते, त्या उंचीचे अतिसूक्ष्म भाग असतात. अशा रीतीने 'सा' पासून 'नि' पर्यंत, ('सा' ते 'नि' – सातही स्वर धरून) एकूण जे अंतर आहे, त्याचे बावीस सूक्ष्म भाग पाडून त्या भागांना 'श्रुति' अशी संज्ञा देण्यात आली आहे. तेव्हा 'श्रुति' म्हणजे अतिसूक्ष्म सूरच. 'बिंदु' हे अतिसूक्ष्मअसून त्या बिंदूंचीच 'रेषा' बनते. त्याप्रमाणेच बावीस श्रुती मिळून एक 'स्वरसप्तक' बनते. या श्रुति वस्तुतः इतक्या सूक्ष्म आहेत की, अत्युत्कृष्ट गायकालेरीज इतरांस त्या श्रुति कंठातून अनुकरणे काढूनही दाखविता येत नाहीत आणि एखाद्याच गायकाने त्या कंठातून काढून दाखविल्यास, तर कित्येकांस त्या समजतही नाहीत. म्हणून सर्वसामान्यांना कळतील असे ढोबळ सात स्वर कल्पिले.

'भारतीय संगीत व संगीतशास्त्र' (ले.– बा. गं. आचरेकर) या पुस्तकाच्या पृ. २०७ वर म्हटले आहे की—

'स्वरान्तर्गत श्रुती असतात. श्रुती म्हणजे दोन स्थिर स्वरांमधील अंतर दर्शविणारे सूक्ष्म स्वरच होत.'

२. पृ. ३११, – या परिच्छेदाच्या प्रारंभीच्या काही ओळी पाहा.

३. उदा. यद्भाति तदस्ति । –जे ज्या स्वरूपात भासमान होते, ते त्या स्वरूपात कोठेतरी असते. हे पृ. ७२ वरील वाक्य पाहा.

४. श्रुतीसंबंधी माहिती वर १ ल्या टीपेत दिलीच आहे.

५. जाति, अंशक, ग्राम, इ. शब्द संगीतशास्त्रातले आहेत. 'यांची माहिती दुसऱ्या ग्रंथांतून मिळवावी' असे 'बालप्रिया' टीका म्हणते. भरताच्या नाट्यशास्त्रातल्या २८ व्या अध्यायातून व संगीतरत्नाकरासारख्या ग्रंथांतून जिज्ञासूंना ही माहिती मिळविता येईल. यांपैकी काही संज्ञांचा (स्थूलमानाने) खुलासा असा :–'जाति' म्हणजे संगीतातील रागांचे ओडव, षाडव, संपूर्ण वगैरे प्रकार. एखाद्या रागात सात स्वरांपैकी किती स्वर लागतात, यावरून त्या रागाची 'जाति' ठरते. सातांपैकी पाचच स्वर लागले, तर त्या रागाची जाति 'ओडव'; सहा लागले, तर 'षाडव,' सातही लागले, तर 'संपूर्ण.' 'ग्राम' म्हणजे 'मध्यमग्राम.' 'षड्जग्राम' व 'गांधारग्राम' हे तीन स्वर–समूह. समूहवाचिनौ ग्रामौ स्वरश्रुत्यादिसंयुतौ असे त्यांचे वर्णन आहे. 'मार्गी' संगीत व 'देशी संगीत' ही भिन्न भिन्न आहेत. ब्रह्मदेवाने शोधून काढलेले व भरतादिकांनी उपयोगात आणलेले ते 'मार्गी' संगीत होय. निरनिराळ्या देशांत तेथील लोकांच्या आवडीप्रमाणे रूढ झालेले संगीत म्हणजे 'देशी' संगीत. 'विभाषा' ही एक रागिणी असून तिला 'पंचम स्वराची एक भार्या' असे म्हटले आहे. या शब्दांसंबंधी अधिक माहिती व इतर शब्दांसंबंधी विवरण संगीतविषयक तांत्रिक ग्रंथांतून मिळेल.

६. एकूण प्रगीत या शब्दाचा अर्थ दोन्हींपैकी कोणत्याही मार्गाने लावला, तरी शेवटी अर्थ एकच, म्हणजे 'गायनकलेत पारंगत असलेले' हा. मग अप्रगीत म्हणजे 'गायनकलेत पारंगत नसलेले.'

ध्वन्यालोकः

एवं वाच्यव्यतिरेकिणो व्यङ्ग्यस्य सद्भावं प्रतिपाद्य प्राधान्यं तस्यैवेति दर्शयति –

सोऽर्थस्तद्व्यक्तिसामर्थ्ययोगी शब्दश्च कश्चन ।
यत्नतः प्रत्यभिज्ञेयौ तौ शब्दार्थौ महाकवेः ॥ ८ ॥

व्यङ्ग्योऽर्थस्तद्व्यक्तिसामर्थ्ययोगी शब्दश्च कश्चन, न शब्दमात्रम् । तावेव शब्दार्थौ महाकवेः प्रत्यभिज्ञेयौ । व्यङ्ग्यव्यञ्जकाभ्यामेव सुप्रयुक्ताभ्यां महाकवित्वलाभो महाकवीनां, न वाच्यवाचकरचनामात्रेण ।

अशा रीतीने वाच्यार्थाहून वेगळा असा व्यंग्यार्थ असतो असे प्रतिपादन केल्यावर काव्यात प्रधानही तोच अर्थ असतो, हे पुढीलप्रमाणे दाखवले जात आहे. तो प्रतीयमान अर्थ आणि त्या अर्थाला अभिव्यक्त करण्यास समर्थ असलेला शब्दही दुर्मिळच असतो. असा अर्थ आणि असा शब्द महाकवि होऊ पाहाणाराने अतिशय प्रयत्नपूर्वक ओळखण्याचा ( व त्यांची निवड करण्याचा ) सराव करावा[१]. ॥८॥

तो अर्थ आणि त्याला अभिव्यक्त करू शकणारा शब्दही एखादाच असतो. सर्व शब्दांच्या ठिकाणी काही ते सामर्थ्य नसते. असेच शब्द आणि अर्थ पारखण्यास महाकवीने झटावे, कारण व्यंग्यार्थ व व्यंजक शब्दच योग्य प्रकाराने वापरल्यामुळे महाकवींना महाकविपद मिळते.[२] केवळ वाच्यार्थ व वाचक शब्द जुळविल्याने नव्हे.

लोचनम्

एवमिति । स्वरूपभेदेन भिन्नसामग्रीज्ञेयत्वेन चेत्यर्थः । प्रत्यभिज्ञेयावित्यर्हार्थे कृत्यः । सर्वो हि तथा यतते इतीयता प्राधान्ये लोकसिद्धत्वं प्रमाणमुक्तम् । नियोगार्थेन च कृत्येन शिक्षाक्रम उक्तः । प्रत्यभिज्ञेयशब्देनेदमाह–

काव्यं तु जातु जायेत कस्यचित्प्रतिभावतः ।

इति नयेन यद्यपि स्वयमस्यैतत्परिस्फुरति, तथापीदमित्थमिति विशेषतो निरूप्यमाणं सहस्रशाखीभवति ।

यथोक्तमस्मत्परमगुरुभिः श्रीमदुत्पलपादैः :–

तैस्तैरप्युपयाचितैरुपनतस्तन्व्याः स्थितोऽप्यन्तिके ।
कान्तो लोकसमान एवमपरिज्ञातो न रन्तुं तथा ॥
लोकस्यैष तथानवेक्षितगुणः स्वात्मापि विश्वेश्वरो
नैवालं निजवैभवाय तदियं तत्प्रत्यभिज्ञोदिता ॥ इति ॥

तेन ज्ञातस्यापि विशेषतो निरूपणमनुसंधानात्मकमत्र प्रत्यभिज्ञानं, न तु तदेवेदमित्येतावन्मात्रम् । महाकवेरिति । यो महाकविरहं भूयास-मित्याशास्ते । एवं व्यङ्ग्यस्यार्थस्य व्यञ्जकस्य शब्दस्य च प्राधान्यं

वदता व्यङ्ग्यस्यैवाङ्गभावस्यापि प्राधान्यमुक्तमिति ध्वनति ध्वन्यते ध्वननमिति त्रितयमप्युपपन्नमित्युक्तम् ॥ ८ ॥

लोचन

याप्रमाणे, म्हणजे (वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांची) स्वरूपे वेगवेगळी असल्याने आणि त्यांच्या ज्ञानाची (साधन-) सामग्रीही भिन्न असल्यामुळे, असा अर्थ. **प्रत्यभिज्ञेयौ** या शब्दात य हा कृत्यप्रत्यय 'योग्य असणे' या अर्थी लागला आहे,[३] कारण सगळे महाकवि तसा म्हणजे व्यंग्यार्थच प्राधान्याने सुचविण्याचा प्रयत्न करितात, याबद्दल व्यंग्यार्थ हा काव्यामध्ये प्रधान होय, याला 'लोकांचा अनुभव' हे प्रमाण सांगितले आहे.[४] किंवा 'प्रत्यभिज्ञेय' यातील य हा प्रत्यय 'नियोग' (म्हणजे उपदेश) या अर्थी घ्यावा. त्या अर्थी लागलेल्या त्या प्रत्ययाने कवीने काव्यरचनेची पूर्वतयारी कशी करावी, यासंबंधी मार्गदर्शन केले. **प्रत्यभिज्ञेय** या शब्दाने असें सांगितले आहे की –
'परंतु काव्य हे एखाद्याच प्रतिभावंताकडून एखाद्याच वेळी निर्माण होते.[५]' (सामान्य माणसाकडून नव्हे).

या न्यायाने जरी याला (म्हणजे कवीला) हे (म्हणजे काव्य) आपोआप स्फुरत असले, तरीही स्फुरलेल्या काव्याचे सूक्ष्म परीक्षण करताना 'हे असे असणे योग्य होईल' असे त्या काव्यास हजारो प्रकारांनी फाटे फुटतात (व मग त्यांपैकी एकाच प्रकाराची निवड करणे आवश्यक होते. त्या निवडीवरच महाकवीचे महाकवित्व अवलंबून असते[६]). जसे आमचे परमगुरु श्री उत्पलपाद यांनी पुढील श्लोकात सांगितले आहे–

त्या त्या (म्हणजे दूती वगैरे पाठवून केलेल्या विनवण्या वगैरे) उपायांनी प्रियकर सुंदरीच्या जवळ येऊन उभा राहिला होता, तरी तो आपलाच प्रियकर हे ओळखू न आल्याने तिला तो इतरेजनांसारखाच (अपरिचित) वाटून ती त्याच्याशी रममाण होऊ शकली नाही. त्याप्रमाणेच परमेश्वर हा जरी सर्व विश्वाचा आत्मा असला, तरी जगाला त्याचे लोकोत्तर गुण ओळखू न आल्यामुळे तो आपले वैभव लोकांना प्रकट करून दाखवू शकत नाही. म्हणून (आम्ही) त्याची ओळख पट-

ण्याचे हे शास्त्र सांगत आहोत [७]

त्यामुळे, (सर्वसामान्यपणे) माहीत असलेल्या गोष्टीचेही पुनः पुनः चिन्तन करून बारकाईने परीक्षण करून ती गोष्ट निश्चित करणे या स्वरूपाचे 'प्रत्यभिज्ञान' येथे अपेक्षित आहे, केवळ (मी पूर्वी जी गोष्ट पाहिली होती.) 'तीच ही' येवढीच प्रत्यभिज्ञा किंवा ओळख अपेक्षित नाही [८] 'महाकवीने' (किंवा 'महाकवीचे') म्हणजे मी महाकवि होईन अशी आकांक्षा बाळगणाऱ्याने (किंवा बाळगणाऱ्याचे).

याप्रमाणे व्यंग्य अर्थ व व्यंजक शब्द यांचे काव्यातील महत्त्व प्रतिपादन केल्याने व्यंग्य-व्यंजक संबंधाचेही (म्हणजे व्यंजना-व्यापाराचेही) प्राधान्य सांगितले गेले. म्हणुन (शब्द व्यंग्य अर्थाला) 'जो ध्वनित करतो, तो' (व्यंग्य अर्थ) 'जो ध्वनित होतो, तो' आणि (व्यंजनाव्यापार म्हणजे) 'ध्वनित करण्याची क्रिया' अशा रीतीने व्यंजक शब्द, व्यंग्य अर्थ, व व्यंजनाव्यापार हे तीनही काव्याचा आत्मा आहेत असे मानणे तर्कशुद्ध आहे, असे (प्रत्यभिज्ञेयौ या शब्दाने) सुचविले गेले.[९]

टीपा

१. महाकवे : याचा एक अर्थ 'महाकवि होऊ पाहणाराने' असा वर दिला आहे. या वाक्याचा अर्थ दुसऱ्या तऱ्हेने असाही लावता येईल– 'महाकवीचे असे अर्थ व असे शब्द सहृदयाने प्रयत्नपूर्वक ओळखण्याचा सराव करावा.
२. म्हणजे महाकवीलाही साधना करावी लागतेच !
३. पाहा, पाणिनि ३–३–१६९.
४. महाकवे : प्रत्यभिज्ञेयौ या शब्दात 'योग्य असणे' या अर्थाचा कृत्यप्रत्यय मानला, तरीही या वाक्याचा दोन प्रकारांनी अर्थ लावणे शक्य आहे– १. महाकवीने जाणण्यास (म्हणजे निवडण्यास) योग्य आहेत आणि २. महाकवीचे आहेत (म्हणजे महाकविच वापरू शकतात) हे सहृदयांनी ओळखणे योग्य आहे. 'सर्वजण तसा प्रयत्न करितात' याचा अर्थ एकतर 'सर्व महाकवि असे (म्हणजे व्यंजक) शब्द निवडण्याचा प्रयत्न करितात' किंवा दुसरा अर्थ 'सर्व सहृदय लोक असे शब्द महाकवींचेच आहेत असे ओळखण्याचा प्रयत्न करितात. म्हणून व्यंग्यार्थाचे प्राधान्य हे लोकांनी म्हणजे महाकवींनी आणि सहृदयांनी मान्य केले आहे, असे म्हटले आहे. मात्र व प्रत्ययाचा 'नियोग' असा अर्थ घेतल्यास 'व्यंजक शब्द व व्यंग्य अर्थ महाकवि होऊ

पाहण्याराने जाणल्येत. असा केवळ कवींना मार्गदर्शनपर होणारा अर्थ निघेल.

५. भामह, काव्यालंकार, १–५.

६. तुलनार्थ पाहा, वक्रोक्तिजीवित, १–९ :–

**शब्दो विवक्षितैकार्थवाचकोऽन्येषु सत्स्वपि ।**
**अर्थ : सहृदयाह्लादकारी प्रस्पन्दसुन्दरः ॥**

( काव्यात वापरला जाणारा शब्द, इतर अनेक शब्द उपलब्ध असूनसुद्धा कवीच्या मनातील अभिप्राय अचूकपणे प्रकट करील असाच असावा. तसेच काव्यातील शब्दांचा अर्थ सहृदयांना आनंद होईल अशा स्पन्दनांनी म्हणजे स्फुरणांनी युक्त असावा. )–

७. 'ईश्वरप्रत्यभिज्ञा,' ४–१–१७. या श्लोकाचा प्रस्तुताशी संबंध असा जोडता येईल– कविप्रतिभा ही नायिका मानावयाची व योग्य व्यंग्य अर्थ किंवा व्यंजक शब्द हा नायक मानावयाचा. अनेक शब्द व अर्थ यांबरोबरच योग्य व्यंग्य अर्थ किंवा व्यंजक शब्द हाही जरी कवीपुढे आला, तरी तोच इष्ट असा व्यंग्यत्वसंपन्न अर्थ किंवा व्यंजकत्वसंपन्न शब्द आहे अशी जोपर्यंत कविप्रतिभेला ओळख पटत नाही, तोपर्यंत कविप्रतिभा त्याच अर्थाचा किंवा शब्दाचा स्वीकार करू शकत नाही. आणि म्हणूनच असा अर्थ किंवा असा शब्द जरी काव्यामध्ये सारभूत असला, तरी त्याचे लोकोत्तर गुण जोपर्यंत ओळखले जात नाहीत, तोपर्यंत तो आपल्या खऱ्या तेजाने तळपू शकत नाही. म्हणूनच आम्ही त्याची ओळख पटण्यासाठी हे 'ध्वनिशास्त्र' सांगत आहोत असा आशय.

८. तात्पर्य हे की, वाच्यार्थाचे ज्ञान पूर्वीच झालेले असले तरी 'चिंतनपूर्वक परीक्षणाने विशिष्ट शब्दाच्या विशिष्ट व्यंग्यार्थ प्रकट करण्याच्या सामर्थ्याचे निर्धारण' हा 'प्रत्यभिज्ञान' शब्दाचा येथे अर्थ आहे.

९. आणि हेच म्हणजे व्यंजक शब्द, व्यंग्य अर्थ व व्यंजनाव्यापार हे 'ध्वनि' शब्दाचे तिन्ही अर्थ पहिल्या कारिकेतील **काव्यस्यात्मा ध्वनिः** यातल्या 'ध्वनि' या शब्दाने अभिप्रेत आहेत, असे अभिनवगुप्तांचे म्हणणे. येथे अभिनवगुप्तांच्या मते **ध्वन्** या धातूला 'इ' हा कृत् प्रत्यय कर्तरि, कर्मणि व भाव म्हणजे क्रिया या अर्थी लावून **ध्वनि** या शब्दाचे तीन अर्थ करणे शक्य आहे. पुढे (काशी आवृत्तीच्या) पृ. १३५ वर तर अभिनवगुप्तांनी 'ध्वनि' या शब्दाचे पाच अर्थ करून दाखविले आहेत.

ध्वन्यालोकः

इदानीं व्यङ्ग्यव्यञ्जकयोः प्राधान्येऽपि यद्वाच्यवाचकावेव प्रथम-मुपाददते कवयस्तदपि युक्तमेवेत्याह –

आलोकार्थी यथा दीपशिखायां यत्नवाञ्जनः ।
तदुपायतया, तद्वदर्थे वाच्ये तदादृतः ॥ ९ ॥

यथा ह्यालोकार्थी सन्नपि दीपशिखायां यत्नवाञ्जनो भवति तदुपायतया । न हि दीपशिखामन्तरेणालोकः सम्भवति । तद्वद्व्यङ्ग्य-मर्थं प्रत्यादृतो जनो वाच्येऽर्थे यत्नवान् भवति। अनेन प्रतिपादकस्य कवेर्व्यङ्ग्यमर्थं प्रति व्यापारो दर्शितः ॥ ९ ॥

ध्वन्यालोक

आता काव्यामध्ये व्यंग्य अर्थ आणि व्यंजक शब्द हे प्रधान असले, तरी कवि प्रथम वाच्यार्थ व वाचक शब्द यांचीच जुळणी करतात हेही योग्यच आहे, हे सांगण्यात येत आहे—

दृश्य वस्तु दिसाव्यात अशी इच्छा असणारा मनुष्य ज्याप्रमाणे त्याचे साधन म्हणून प्रथम दिव्याची वात पेटविण्याच्या तयारीस लागतो, त्याप्रमाणे व्यंग्यार्थ प्रकट करण्याची आस्था असलेला कवीही त्याचा 'उपाय' म्हणून प्रथम वाच्यार्थ जुळविण्याच्या उद्योगास लागतो. ॥ ९ ॥

ज्याप्रमाणे पदार्थ पाहाण्याची इच्छा असली तरी मनुष्य दिव्याची वात पेटविण्याच्या मागे लागतो, कारण तो त्याचा उपाय असतो. पाहाणे हे काही दिव्याच्या ज्योतीशिवाय शक्य होत नाही. त्याचप्रमाणे व्यंग्यार्थाबद्दलच विशेष प्रेम असणारा कवि प्रथम वाच्यार्थ जुळवण्याचा प्रयत्न करितो. या कारिकेतील विधानाने व्यंग्यार्थाच्या अभिव्यक्तीसाठी कवीला काय खटपट करावी लागते, ते दाखविले.

लोचनम्

ननु प्रथमोपादीयमानत्वाद्वाच्यवाचकतद्भावस्यैव प्राधान्यमित्या-शङ्क्योपायानामेव प्रथममुपादानं भवतीत्यभिप्रायेण विरुद्धोऽयं प्राधान्ये साध्ये हेतुरिति दर्शयति – इदानीमित्यादिना । आलोकनमालोकः, वनिता-वदनारविन्दादिविलोकनमित्यर्थः । तत्र चोपायो दीपशिखा ॥९॥

लोचन

"पण काय हो, वाच्यार्थ, वाचक शब्द व या दोहोंमधील वाच्य-वाचकसंबंध (म्हणजे अभिधाव्यापार) यांनीच कवि हा काव्य लिहिण्यास प्रारंभ करीत असल्यामुळे तेच कवीच्या दृष्टीने व्यंग्यार्थ वगैरेपेक्षा मुख्य नव्हेत का ?" अशी शंका कल्पून तिच्या उत्तराबद्दल सर्वत्र साध्याच्या सिद्धीसाठी आधी उपायाचीच कास धरली जाते, हा आशय मनात घेऊन प्राधान्य ठरविण्याच्या बाबतीत (प्रथम स्वीकारला जाणे हा) हेतु 'विरुद्ध'[२] आहे, असे (वृत्तिकार) 'आता' वगैरे वाक्याने दाखवितात. (कारिकेतील) 'आलोक' या शब्दाचा अर्थ 'आलोकन' म्हणजे सुंदरीचे मुखकमल इ. 'पाहणे' असा आहे. आणि त्या कामी 'उपाय' म्हणजे दिव्याची ज्योत. ॥९॥

टीपा

१. कारिकेतील आलोक या शब्दाचा अर्थ आम्ही अभिनवगुप्तांना अनुसरून पाहणे (आलोकनम्) असा केला आहे. पण आलोक या शब्दाचा 'प्रकाश' हा प्रसिद्ध अर्थ घेतला तरी कारिकेचा व्यवस्थित अर्थ लागू शकतो.
२. हेत्वाभासाचे असिद्ध व अनैकान्तिक हे प्रकार आपण पृ. ६९ वरील टीप २ व ३ यांमध्ये पाहिले. 'विरुद्ध' हा हेत्वाभासाचा आणखी एक प्रकार. 'विरुद्ध' हेत्वाभासावरून साध्याचे अस्तित्व सिद्ध न होता त्याउलट, साध्याचा अभावच सिद्ध होतो. उदा. 'बंडू हा मुलगा हा शोध त्याने लावील, कारण तो मन्दमति आहे,' या उदाहरणात 'मन्दमतित्व' हा हेतु 'विरुद्ध' आहे, कारण मन्दमतित्वामुळे 'शोध लावण्याचे बुद्धिसामर्थ्य असणे' या साध्याच्या अस्तित्वाऐवजी साध्याचा अभाव म्हणजे शोध लावण्याचे बुद्धिसामर्थ्य नसणे हेच सिद्ध होईल. तसेच 'वाच्यार्थ हा व्यंग्यार्थाहून प्रधान आहे, कारण लोक व्यंग्यार्थाच्या आधी वाच्यार्थ समजावून घेतात' या उदाहरणात 'आधी समजावून घेणे' हा हेतु 'विरुद्ध' आहे, कारण त्यामुळे प्राधान्य सिद्ध न होता प्राधान्याचा अभावच सिद्ध होईल. (काशी आवृत्तीच्या) पृ. १५९ वर 'उपाय हे प्रथम स्वीकारूनही मागाहून टाकूनच दिले जातात.' या अर्थाचे 'वाक्यपदीया'-तील वचन 'लोचन' टीकेमध्ये उद्धृत केले आहे. यातील आशय असा की, साध्य वस्तु हीच मुख्य असते व साधने ही दुय्यम, तेवढ्यापुरतीच उपयोजिली जाणारी असतात.

ध्वन्यालोकः

प्रतिपाद्यस्यापि तं दर्शयितुमाह –

यथा पदार्थद्वारेण वाक्यार्थः सम्प्रतीयते ।
वाच्यार्थपूर्विका तद्वत्प्रतिपत्तस्य वस्तुनः ॥१०॥

यथा हि पदार्थद्वारेण वाक्यार्थावगमस्तथा वाच्यार्थप्रतीतिपूर्विका व्यङ्ग्यस्यार्थस्य प्रतिपत्तिः ॥१०॥

ध्वन्यालोक

आता व्यंग्यार्थ समजण्यासाठी सहृदयाचीही काय तयारी असावी लागते, ते दाखवले जात आहे–

ज्याप्रमाणे वाक्यातील पदांचे अर्थ प्रथम कळून मग त्याद्वारे वाक्याचा अर्थ लक्षात येतो, त्याप्रमाणे त्या प्रतीयमान अर्थाचा बोधही आधी ( वाक्याचा ) वाच्यार्थ कळून मगच होतो.[१] || १० ||

पदांच्या अर्थांच्या द्वारा जसा वाक्याच्या अर्थाचा बोध होतो, तसा व्यंग्यार्थाचा बोधही आधी वाक्याचा वाच्यार्थ कळल्यानंतरच होतो. ||१०||

लोचनम्

प्रतिपदिति भावे क्विप् । 'तस्य वस्तुन' इति व्यङ्ग्यरूपस्य सारस्येत्यर्थः । अनेन श्लोकेनात्यन्तसहृदयो यो न भवति, तस्यैव स्फुटसंवेद्य एव क्रमः । यथात्यन्तशब्दवृत्तज्ञो यो न भवति, तस्य पदार्थवाक्यार्थक्रमः । काष्ठाप्राप्तसहृदयभावस्य तु वाक्यवृत्तकुशलस्येव सन्नपि क्रमोऽभ्यस्तानुमानाविनाभावस्मृत्यादिवदसंवेद्य इति दर्शितम् ।

लोचन

कारिकेतले **प्रतिपत्** हे पद 'भाव' म्हणजे 'क्रिया' या अर्थी असलेला **क्विप्** हा कृत् प्रत्यय लागून बनलेले आहे[२] (म्हणजे **प्रतिपत्** याचा अर्थ 'प्रतिपत्ति' म्हणजे 'बोध'). 'त्या अर्थाचा' म्हणजे सारभूत असलेल्या व्यंग्य अर्थाचा. या १० व्या कारिकेने असे सांगितले की, जो अत्यंत संवेदनाशील सहृदय नाही, त्याच्या बाबतीत हा (म्हणजे आधी वाच्यार्थबोध व मग व्यङ्ग्यार्थबोध हा) क्रम स्पष्टपणे लक्षात

येणारा असाच आहे.[३] ज्याप्रमाणे जो शब्दांचे (वाक्यातील तात्पर्यार्थाचा बोध करून देण्याचे) सामर्थ्य जाणणारा नसतो, त्याच्या बाबतीत आधी पदांच्या अर्थाचे ज्ञान व नंतर (सावकाश) वाक्याच्या अर्थाचे (म्हणजे तात्पर्यार्थाचे) ज्ञान असा क्रम असतो, त्याप्रमाणे. पण असा हा क्रम अस्तित्वात असला, तरी ज्याचा सहृदयता हा गुण अगदी वरच्या पायरीला पोहोचलेला असतो त्याच्या व जो वाक्यातील शब्दांचे तात्पर्यार्थ ज्ञात करून देण्याचे सामर्थ्य जाणणारा असतो, त्याच्या लक्षात तो क्रम येतच नाही. ज्याप्रमाणे अनुमान करण्याचा ज्याला चांगला सराव झाला आहे, त्याला व्याप्ति-स्मृति वगैरे पायऱ्यांमुळे लागणाऱ्या वेळाची जाणीव होत नाही, त्याप्रमाणे.[४]

टीपा

१. पदार्थ व वाक्यार्थ यांच्या, तसेच वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांच्या बोधाचा क्रम सामान्य बुद्धीच्या वाचकाच्या लक्षात येतो, पण पूर्णपणे सरावलेल्या सहृदयाच्या अंतःकरणात हे व्यंग्यार्थबोधाचे काम इतक्या झटपट होते की, तो क्रम त्याच्या लक्षातही येत नाही, असे अभिनवगुप्त सांगतात. (तसेच जो शब्द-वृत्त जाणतो, त्याच्या लक्षात पदार्थ ज्ञान व वाक्यार्थ ज्ञान यांचा क्रम येत नाही) वस्तुतः या व्यंग्यार्थबोधाच्या कामी पदार्थ–वाक्यार्थ न्यायापेक्षा 'घटप्रदीपन्याय' हाच अधिक समर्पक आहे असे प्रतिपादन पुढे ३ ऱ्या उद्द्योतात कारिका ३३ वरील वृत्तीत केले आहे.

२. पाहा, पाणिनि, ३–१–१७८.

३. कारण त्याला वाच्यार्थ समजल्यावर व्यङ्ग्यार्थ ध्यानात येण्यास बराच वेळ लागतो, पण सहृदयाला मात्र व्यङ्ग्यार्थ तत्क्षणी कळतो.

४. अनुमान करण्याचा सराव असलेल्यांच्या बाबतीत हेतूवरून अनुमान करण्याची क्रिया इतक्या शीघ्रतेने होते की, व्याप्तिस्मृति वगैरे पायऱ्यांमुळे लागणाऱ्या वेळाची जाणीव होत नाही, त्याप्रमाणे.

ध्वन्यालोकः

इदानीं वाच्यार्थप्रतीतिपूर्वकत्वेऽपि तत्प्रतीतेर्व्यङ्ग्यस्यार्थस्य प्राधान्यं यथा न व्यालुप्यते तथा दर्शयति–

स्वसामर्थ्यवशेनैव वाक्यार्थं प्रतिपादयन् ।
यथा व्यापारनिष्पत्तौ पदार्थो न विभाव्यते ॥११॥

यथा स्वसामर्थ्यवशेनैव वाक्यार्थं प्रकाशयन्नपि पदार्थो व्यापार-निष्पत्तौ न भाव्यते विभक्ततया ॥ ११ ॥

ध्वन्यालोक

आता व्यंग्यार्थाच्या प्रतीतीच्या आधी जरी वाच्यार्थाची प्रतीति होत असली, तरी त्यामुळे व्यंग्यार्थाचे प्राधान्य कसे नष्ट होत नाही ते दाखविले जात आहे—

वाक्यातील पदांचा अर्थ जरी स्वतःमधील सामर्थ्याच्या बळावरच वाक्यार्थाचा बोध करून देत असला, तरी ते काम पूर्ण झाल्यावर म्हणजे समग्र वाक्याचा अर्थ कळल्यावर ज्याप्रमाणे पदाच्या अर्थाचा वेगळेपणा जाणवत नाही— ॥११॥

ज्याप्रमाणे ( वाक्यातील ) पदांचे अर्थ जरी स्वतःमधील सामर्थ्याच्या जोरावरच वाक्याचा अर्थ प्रकाशित करीत असले, तरी वाक्यार्थबोध करून देण्याचे काम पूर्ण झाल्यावर ते ज्याप्रमाणे वाक्यार्थाहून वेगळे असे दिसून येत नाहीत;—

लोचनम्

न व्यालुप्यत इति । प्राधान्यादेव तत्पर्यन्तानुसरणरणरणकत्वरिता मध्ये विश्रान्तिं न कुर्वते इति क्रमस्य सतोऽप्यलक्षणं प्राधान्ये हेतुः । स्वसामर्थ्यमाकाङ्क्षायोग्यतासन्निधयः । विभाव्यत इति । विशब्देन विभक्ततोक्ता; विभक्ततया न भाव्यत इत्यर्थः । अनेन विद्यमान एव क्रमो न संवेद्यते इत्युक्तम् । तेन यत्स्फोटाभिप्रायेणासन्नेव क्रम इति व्याचक्षते तत्प्रत्युत विरुद्धमेव ।

लोचन

( व्यङ्ग्य अर्थाचे प्राधान्य ) नष्ट होत नाही – व्यंग्यार्थ प्रधान असल्यामुळेच त्याचा बोध होईपर्यंत त्याच्यामागे लागण्याची जी आतुरता, तीमुळे सहृदय उतावीळ होतात व म्हणूनच ते मध्ये थांबत

नाहीत. यामुळे वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांमध्ये क्रम असूनसुद्धा तो त्यांच्या लक्षात येत नाही, हे व्यंग्यार्थ प्रधान असण्याचे कारण होय.[१] 'स्वतःचे सामर्थ्य' म्हणजे आकांक्षा, योग्यता व संनिधि[२] हे होय. 'वेगळेपणा जाणवत नाही' – 'वि' या शब्दाचा अर्थ 'वेगळेपणा'. म्हणूनच न विभाव्यते याचा अर्थ 'पदांचे अर्थ वेगळेपणाने जाणवत नाहीत' हा होय. या द्वारेच, म्हणजे वेगळेपणाने भासण्याचा निषेध केल्यामुळेच वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांमध्ये क्रम असूनही त्याची जाणीव होत नाही हे सूचविले आहे. अखंडवाक्यार्थ– स्फोट मानणारे काही लोक[३] (पदांना अर्थ असतो असे मानीतच नाहीत, म्हणून ते) 'पदार्थ व वाक्याचा अर्थ यांमध्ये क्रम नसतोच' असा **पदार्थो न विभाव्यते** याचा अर्थ लावतात, ते त्यांचे विवरण, वरील कारिका व वृत्ति यांच्या आशयाच्या विरुद्धच होते.[४]

टीपा

१. वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांमधील आधीचा व नंतरचा या क्रमाची त्यांना जाणीव होत नाही याचे कारण त्यांना व्यंग्यार्थाच्या ज्ञानाबद्दलच आतुरता असते. आतुरता ही प्रधान असलेल्या गोष्टीबद्दलच वाटत असते, म्हणून व्यंग्यार्थ ह्याच प्रधान होय.

२. पदांच्या अर्थांच्या ठिकाणचे हे सामर्थ्य म्हणजे आकांक्षा, योग्यता व संनिधि असे अभिनवगुप्त सांगतात. वाक्यातले एक पद उच्चारल्यावर त्या पदाचा अर्थ कळतो, 'पण त्याचे पुढे काय ?' अशी जिज्ञासा श्रोत्याच्या मनात उत्पन्न होते. ती जिज्ञासा वाक्यातली इतर पदे उच्चारल्यावर त्यांचा अर्थ कळूनच तृप्त होते. तेव्हा दुसरी पदे उच्चारल्याशिवाय एक पद आपल्या अर्थाच्या अन्वयाचा किंवा संबंधाचा बोध करून देण्यास असमर्थ असणे यालाच 'आकांक्षा' म्हणतात. अशी परस्परांसंबंधीची आकांक्षा ज्या पदसमूहामध्ये असते, त्यालाच वाक्य म्हणतात. गाय, हत्ती, घोडा, माणूस यासारख्या एक-मेकांचा अर्थ पूर्ण करण्याचे सामर्थ्य नसलेल्या पदसमूहाला 'वाक्य' म्हणत नाहीत.

   'मी तुझ्या पैंजणांचा आवाज पाहतो', यात आवाज व पाहतो यांमध्ये जरी आकांक्षा असली म्हणजे या दोन पदांच्या अर्थांमध्ये कर्म व क्रिया असा संबंध जरी असला तरी त्या दोन अर्थांचा संबंध व्यवहारात जोडणे असंभव-नीय असते. 'आवाजा'ला 'पाहणे' शक्य नाही. म्हणून या दोन पदांच्या

अर्थांमध्ये 'योग्यता' नाही असे म्हणतात. कोणताही पदसमूह 'वाक्य' असायला त्या पदांच्या अर्थांमध्ये योग्यता असावीच लागते. उदा. आवाज व ऐकणे यांचा व्यवहारातही संबंध जोडता येणे शक्य असल्यामुळे त्यांमध्ये योग्यता आहे.

पण पदांच्या अर्थांमध्ये आकांक्षा व योग्यता असूनही ती पदे जर तासा-तासाने उच्चारली गेली, तर त्यांच्यामध्ये संनिधि म्हणजे सांनिध्य असत नाही. ती पदे एकामागून एक अविलंबाने उच्चारली गेली, तरच त्यांच्या अर्थांमध्ये सांनिध्य उत्पन्न होते. पदसमूह हा 'वाक्य' व्हायला पदांमध्ये व पदांच्या अर्थांमध्ये सांनिध्यही असावेच लागते.

कोणत्याही वाक्यातल्या पदांचा प्रथम वेगवेगळा अर्थ कळतो व आकांक्षा योग्यता व संनिधि यांमुळे पदांच्या अर्थांमधील परस्पर-संबंध व वाक्याचा जुळलेला, संपूर्ण, एकमुखी अर्थ मागाहून कळतो असे अभिहितान्वयवादी लोकांचे मत आहे ( पाहा, पृ. ९८, टीप १४ वी )

३. अखंड वाक्यार्थ स्फोट मानणारे 'काही लोक' म्हणजे वैयाकरण होत. पृ. २९ वरील १७ वी टीप पाहा.

४. विरुद्ध होण्याचे कारण असे :– कारिकाकारांच्या मते पदार्थ हे कारण व वाक्यार्थ हे कार्य. या दोहोंमध्ये क्रम असलाच पाहिजे. पण तो क्रम असूनही लक्षात येत नाही हा कारिकारांचा आशय. पण वरील म्हणण्याप्रमाणे 'क्रम नाहीच, म्हणून तो लक्षात येत नाही'. हे कारिकाकारांच्या भूमिकेशी विसंगत आहे

**ध्वन्यालोकः**

> तद्वत्सचेतसां सोऽर्थो वाच्यार्थविमुखात्मनाम् ।
> बुद्धौ तत्त्वार्थदर्शिन्यां झटित्येवावभासते ॥ १२ ॥

**ध्वन्यालोक**

त्याप्रमाणे केवळ वाच्यार्थानेच समाधान न झाल्याने वाच्यार्थाकडे पाठ फिरवणाऱ्या[1] व सारभूत अर्थाचाच वेध घेणाऱ्या सहृदयांच्या अन्तःकरणात तो ( व्यंग्य ) अर्थ तत्क्षणीच प्रकाशित होतो. ॥ १२ ॥

**लोचनम्**

**वाच्येऽर्थे विमुखो विश्रान्तिनिबन्धनं परितोषमलभमान आत्मा**

हृदयं येषामित्यनेन सचेतसामित्यस्यैवार्थोऽभिव्यक्तः। सहृदयानामेव तर्ह्ययं महिमास्तु, न तु काव्यस्यासौ कश्चिदतिशय इत्याशङ्क्याह– अवभासत इति। तेनात्र विभक्ततया न भासते, न तु वाच्यस्य सर्वथैवानवभासः। अत एव तृतीयोद्द्योते घटप्रदीपदृष्टान्तबलाद्व्यङ्ग्यप्रतीतिकालेऽपि वाच्यप्रतीतिर्न विघटत इति यद्वक्ष्यति तेन सहास्य ग्रन्थस्य न विरोधः ।। १२ ।।

लोचन

वाच्य अर्थाचे बाबतीत पराङ्मुख, म्हणजे तेथेच थांबल्याने ज्यांच्या हृदयाला तृप्ति मिळू शकत नाही, असे. (वाच्य अर्थाचे बाबतीत पराङ्मुख असलेले) या विशेषणाने 'सहृदयांच्या' या शब्दाचाच अर्थ प्रकट केला गेला आहे.[२] 'तर मग (व्यंग्यार्थाकडेच धाव घेणे) हे सहृदयांचेच विशेष सामर्थ्य होईल, तो काही काव्याचा विशेष गुण होणार नाही' अशी शंका कोणी घेतल्यास कारिकाकार तिचे उत्तर 'प्रकाशित होतो' या शब्दांनी देतात.[३] त्यामुळे, म्हणजे व्यंग्यार्थाच्या प्रतीतीच्या शीघ्रपणामुळे, 'अशा ठिकाणी वाच्यार्थ हा व्यंग्यार्थाहून वेगळेपणाने जाणवत नाही' इतकेच सांगितले आहे. वाच्यार्थाचा बोधच होत नाही' असे सांगितले नाही. म्हणूनच तिसऱ्या उद्द्योतामध्ये घट आणि दिवा यांच्या उदाहरणाच्या सामर्थ्याने व्यंग्यार्थाच्या प्रतीतीच्या वेळीही वाच्य अर्थाची प्रतीति नष्ट होत नाही असे जे वृत्तिकार म्हणणार आहेत, त्याच्याशी प्रस्तुत कारिकेचा (म्हणजे या कारिकेतील पदार्थ-वाक्यार्थ दृष्टांताचा) विरोध नाही. ।।१२।।

टीपा

१. म्हणजे वाच्यार्थ कळूनही तृप्ति न होणाऱ्या.
२. ते सहृदय आहेत, म्हणूनच वाच्यार्थाकडे पाठ फिरवितात!
३. म्हणजे काव्यालाही सहृदयांइतकेच महत्त्व आहे, कारण त्या काव्यात व्यंग्यार्थ असावाच लागतो. तो असतो, म्हणूनच ते काव्य उत्कृष्ट असते.
४. ध्वन्यालोक, काशी आवृत्ति, पृ. ४२०

ध्वन्यालोकः

एवं वाच्यव्यतिरेकिणो व्यङ्ग्यस्यार्थस्य सद्भावं प्रतिपाद्य प्रकृत उपयोजनमाह–

यत्रार्थः शब्दो वा तमर्थमुपसर्जनीकृतस्वार्थौ ।
व्यङ्क्तः, काव्यविशेषः स ध्वनिरिति सूरिभिः कथितः ॥१३॥

ध्वन्यालोक

अशा रीतीने वाच्यार्थाहून निराळ्या असलेल्या व्यंग्य अर्थाचा सद्भाव म्हणजे अस्तित्व, सौंदर्य आणि प्राधान्य[1] सिद्ध करून त्याचा प्रस्तुत विषयाशी म्हणजे ध्वनिकाव्याच्या स्वरूपाशी संबंध जोडण्यासाठी ( कारिकाकार ) सांगत आहेत की—

ज्या ठिकाणी वाच्य अर्थ स्वतःकडे व वाचक शब्द आपल्या वाच्य अर्थाकडे गौणपणा घेऊन त्या व्यंग्य अर्थालाच ( प्रधान म्हणून ) सूचित करितात, त्या काव्य प्रकाराला जाणकार 'ध्वनि' ( नावाचा काव्यप्रकार ) असे म्हणतात. ॥१३॥

ध्वन्यालोकः

यत्रार्थो वाच्यविशेषः वाचकविशेषः शब्दो वा तमर्थं व्यङ्क्तः, स काव्यविशेषो ध्वनिरिति ।

अनेन वाच्यवाचकचारुत्वहेतुभ्य उपमादिभ्योऽनुप्रासादिभ्यश्च विभक्त एव ध्वनेर्विषय इति दर्शितम् । यदप्युक्तम् – 'प्रसिद्धप्रस्थानातिक्रमिणो मार्गस्य काव्यत्वहानेर्ध्वनिर्नास्ति' इति, तदप्ययुक्तम् । यतो लक्षणकृतामेव स केवलं न प्रसिद्धः, लक्ष्ये तु परीक्ष्यमाणे स एव सहृदयहृदयाह्लादकारि काव्यतत्त्वम् ततोऽन्यच्चित्रमेवेत्यग्रे दर्शयिष्यामः। यदप्युक्तम् – 'कामनीयकमनतिवर्तमानस्य तस्योक्तालङ्कारादिप्रकारेष्वन्तर्भावः' इति, तदप्यसमीचीनम्, वाच्यवाचकमात्राश्रयिणि प्रस्थाने व्यङ्ग्यव्यञ्जकसमाश्रयेण व्यवस्थितस्य ध्वनेः कथमन्तर्भावः, वाच्यवाचकचारुत्वहेतवो हि तस्याङ्गभूताः, स त्वङ्गिरूप एवेति प्रतिपादयिष्यमाणत्वात् ।

परिकरश्लोकश्चात्र-

> व्यङ्ग्यव्यञ्जकसम्बन्धनिबन्धनतया ध्वनेः ।
> वाच्यवाचकचारुत्वहेत्वन्तःपातिता कुतः ॥




ध्वन्यालोक

ज्या काव्यात अर्थ म्हणजे विशेष स्वरूपाचा वाच्यार्थ किंवा शब्द म्हणजे विशेष प्रकारचा वाचक शब्द त्या ( व्यंग्य ) अर्थाला सूचित करितात, ते विशेष प्रकारचे काव्य म्हणजे 'ध्वनि' होय. असे म्हटल्यामुळे वाच्यार्थाच्या सौंदर्यास कारणीभूत असणारे उपमा वगैरे ( अर्थालंकार ) व शब्दांच्या सौंदर्यास कारणीभूत असणार अनुप्रास वगैरे ( शब्दालंकार ) यांहून ध्वनीचे क्षेत्र वेगळेच आहे, असे दाखविले गेले.

आणि ( अभाववाद्यांच्या दुसऱ्या गटाकडून ) असेही जे म्हटले गेले होते की, 'प्रसिद्ध म्हणजे आतापर्यंतच्या काव्यशास्त्रकारांनी घालून दिलेले निकष ज्या वाङ्मयप्रकाराला लागू शकत नाहीत, त्या वाङ्मयप्रकारात 'काव्य'-पणा नसतो, म्हणून ध्वनि नाही;[२] ते म्हणणेदेखील योग्य नाही. कारण तो ध्वनि आतापर्यंतच्या काव्यशास्त्रकारांनाच तेवढा अपरिचित होता. पण आतापर्यंतचे काव्यग्रंथ जर बारकाईने पाहिले, तर मात्र तोच 'ध्वनि' हे सहृदयांना आनंद देणारे काव्याचे मर्म होय, असे आढळून येते. याहूनही जे निराळे असेल, ते केवळ 'चित्र[३]' होय हे आम्ही पुढे दाखवू.

आणि ( अभाववाद्यांच्या ३ ऱ्या गटाकडून ) असेही म्हटले गेले होते की— 'ध्वनि हा रमणीयतेच्या क्षेत्राबाहेरचा नसल्याने त्याचा अंतर्भाव ( आतापर्यंतच्या काव्यशास्त्रकारांनी ) सांगितलेल्या अलंकारादि प्रकारातच होतो.[४]'

पण तेही अयोग्य होय; कारण आतापर्यंतचे निकष केवळ वाच्यार्थ व वाचक शब्द यांच्याच आधारावर घालून दिलेले होते. आणि ध्वनि हा तर व्यंग्य व व्यंजक यांच्या आश्रयाने रहाणारा आहे! तेव्हा ध्वनीचा अंतर्भाव पूर्वीच्या सौंदर्यहेतूंमध्ये कसा होणार? वाच्यवाचकांच्या सौंदर्याचे हेतु ही ध्वनीची 'अंग' म्हणजे ध्वनीला उपकारक आहेत, आणि तो ध्वनि मात्र 'अंगी' स्वरूपाचाच ( म्हणजे उपकार्य ) आहे, असे आम्ही पुढे[५] प्रतिपादन

करणार आहोत.

आणि या विषयीचा सारांशात्मक श्लोक असा :– ध्वनि हा व्यंग्य – व्यंजक संबंधावर अवलंबून असल्यामुळे त्याचा वाच्य– वाचकांच्या सौंदर्यहेतूं-मध्ये अंतर्भाव कोठून होणार ?

लोचनम्

सद्भावमिति । सत्तां साधुभावं प्राधान्यं चेत्यर्थः । द्वयं हि प्रतिपिपादयिषितम् । प्रकृत इति लक्षणे । उपयोजयन् उपयोगं गमयन् । तमर्थमिति चायमुपयोगः । स्वशब्द आत्मवाची । स्वश्चार्थश्च तौ स्वार्थौ; तौ गुणीकृतौ याभ्याम्; यथासंख्येन तेनार्थो गुणीकृतात्मा, शब्दो गुणीकृताभिधेयः । तमर्थमिति । ' सरस्वती स्वादु तदर्थवस्तु ' इति यदुक्तम् । व्यङ्क्तः द्योतयतः । व्यङ्क्त इति द्विवचनेनेदमाह–यद्यप्यविवक्षितवाच्ये शब्द एव व्यञ्जकस्तथाप्यर्थस्यापि सहकारिता न त्रुट्यति । अन्यथा अज्ञातार्थोऽपि शब्दस्तद्व्यञ्जकः स्यात् । विवक्षितान्यपरवाच्ये च शब्दस्यापि सहकारित्वं भवत्येव, विशिष्टशब्दाभिधेयतया विना तस्यार्थस्याव्यञ्जकत्वादिति सर्वत्र शब्दार्थयोरुभयोरपि ध्वननं व्यापारः । तेन यद्भट्टनायकेन द्विवचनं दूषितं तद्गजनिमीलिकयैव । अर्थः शब्दो वेति तु विकल्पाभिधानं प्राधान्याभिप्रायेण । काव्यं च तद्विशेषश्चासौ काव्यस्य वा विशेषः । काव्यग्रहणाद्गुणालङ्कारोपस्कृतशब्दार्थपृष्ठपाती ध्वनिलक्षण ' आत्मे 'त्युक्तम् । तेनैतन्निरवकाशं श्रुतार्थापत्तावपि ध्वनिव्यवहारः स्यादिति । यच्चोक्तम्– ' चारुत्वप्रतीतिस्तर्हि काव्यस्यात्मा स्यात् ' इति, तदङ्गीकुर्म एव । नाम्नि खल्वयं विवाद इति । यच्चोक्तम्– ' चारुणः प्रतीतिर्यदि काव्यात्मा प्रत्यक्षादिप्रमाणादपि सा भवन्ती तथा स्यात् ' इति । तत्र शब्दार्थमयकाव्यात्माभिधानप्रस्तावे क एष प्रसङ्ग इति न किञ्चिदेतत् । स इति । अर्थो वा शब्दो वा, व्यापारो वा । अर्थोऽपि वाच्यो वा ध्वनतीति, शब्दो ऽप्येवम् । व्यङ्ग्यो वा ध्वन्यत इति व्यापारो वा शब्दार्थयोर्ध्वननमिति । कारिकया तु प्राधान्येन समुदाय एव काव्यरूपो मुख्यतया ध्वनिरिति प्रतिपादितम् । विभक्त इति । गुणालङ्काराणां वाच्यवाचकभावप्राणत्वात्, अस्य च तदन्यव्यङ्ग्यव्यञ्जकभावसारत्वान्नास्य तेष्वन्तर्भाव इति । अनन्यत्र भावो विषय-

शब्दार्थः । एवं तद्व्यतिरिक्तः कोऽयं ध्वनिरिति निराकृतम् । लक्षण-कृतामेवेति । लक्षणकाराप्रसिद्धता विरुद्धो हेतुः, तत एव हि यत्नेन लक्षणीयता । लक्ष्ये त्वप्रसिद्धत्वमसिद्धो हेतुः । यच्च नृत्तगीतादिकल्पं, तत्काव्यस्य न किञ्चित् । चित्रमिति । विस्मयकृद्वृत्तादिवशात्, न तु सहृदयाभिलषणीयचमत्कारसारसनिःष्पन्दमयमित्यर्थः । काव्यानुकारि-त्वाद्वा चित्रम्, आलेख्यमात्रत्वाद्वा, कलामात्रत्वाद्वा । अग्र इति ।

प्रधानगुणभावाभ्यां व्यङ्ग्यस्यैवं व्यवस्थितम् ।
द्विधा काव्यं, ततोऽन्यद्यत्तच्चित्रमभिधीयते ॥

इति तृतीयोद्द्योते वक्ष्यति । परिकरार्थं कारिकार्थस्याधिकावापं कर्तुं श्लोकः परिकरश्लोकः ।

लोचन

सद्भाव– या शब्दाचे दोन अर्थ :– १. अस्तित्व, २. सौंदर्य व तन्मूलक प्राधान्य[६] हे दोन्हीही अर्थ सांगण्याचा (ग्रंथकाराचा) हेतु आहेच. प्रस्तुत विषयाशी म्हणजे प्रस्तुत जो ध्वनि, 'संबंध जोडण्या-साठी' म्हणजे व्यंग्यार्थाच्या सद्भावाला म्हणजे अस्तित्वाचा आणि प्राधान्याचा संबंध वाचकाचा लक्षात यावा. म्हणून. तम् अर्थम् ( आणि उपसर्जनीकृतस्वार्थौ) हे तेराव्या कारिकेत शब्द वापरले, हाच ' सद्भाव ' या शब्दाच्या दोन अर्थांचा उपयोग.[७]

स्व या शब्दाचा अर्थ ' आपण स्वतः'. ' स्वार्थ ' (हा द्वंद्व समास). याचा अर्थ ' आपण स्वतः आणि वाच्य अर्थ ' असा आहे. स्वतःला आणि वाच्य अर्थाला ज्यांनी गौणपणा, दुय्यमपणा दिला आहे असे अनुक्रमे वाच्यार्थ व शब्द. त्यामुळे ' वाच्यार्थ स्वतःकडे दुय्यमपणा घेतो आणि शब्द स्वतःच्या वाच्य अर्थाला गौणपणा देतो ' असा अर्थ झाला. त्या अर्थाला म्हणजे ' अर्थामधील ते सारभूत तत्त्व ' म्हणून सहाव्या कारिकेत ज्याविषयी सांगितले, त्या तत्त्वाला व्यङ्क्तः म्हणजे सूचित करितात म्हणजेच प्रकाशित करितात. व्यङ्क्तः द्विवचनाने कारिका कार असे सुचवितात की– ध्वनीच्या 'अविवक्षितवाच्य'[८] प्रकारामध्ये जरी शब्द व्यञ्जक म्हणजे सूचित करणारा असला, तरी त्याला त्या कामी मदत करण्याने अर्थाचे जे कार्य असते, ते खंडित होत नाही. नाहीतर

शब्दाचा वाच्य अर्थ न कळताही शब्द व्यंजक झाला असता ![९] आणि ध्वनीच्या 'विवक्षितान्यपरवाच्य[१०]' प्रकारामध्ये ('अर्थ' मुख्यत: व्यंजक असला तरी) शब्दही (त्या अर्थाचा) सहकारी असतोच ! कारण तो वाच्यार्थ विशिष्ट (म्हणजे शब्दगुण व शब्दालंकार यांनी युक्त) अशा शब्दाच्या द्वारा अभिधेने प्रकट झाल्याशिवाय व्यंजक होऊ शकणार नाही. म्हणून जेथे जेथे व्यंग्यार्थ असतो, तेथे तेथे 'व्यंजना' हा व्यापार शब्द व अर्थ या दोघांचाही[११] असतो. त्यामुळे भट्टनायकाने 'व्यङ्क्त: हा द्विवचनाचा उपयोग चुकीचा आहे' असे जे म्हटले आहे, ते हत्ती जसा डोळे झाकून आपल्या गुर्मीत चाललो तसे, म्हणजे अविचारानेच म्हटलेले होय.[१२] आता कारिकेत (अर्थ आणि शब्द असे न म्हणता) अर्थ किंवा शब्द असा जो विकल्प योजिला आहे, तो त्या त्या उदाहरणात अर्थ किंवा शब्द यांपैकी कोणता तरी मुख्यतया व्यंजक असतो (व दुसरा गौणत्वाने व्यंजक असतो) याला अनुलक्षून योजिला आहे. **काव्यविशेषः** या समासाची फोड (तो कर्मधारय समास मानिल्यास) 'काव्य असून ते विशेष म्हणजे उत्कृष्ट प्रकारचे असलेले' अशी, किंवा (तो षष्ठी तत्पुरुष समास मानिल्यास) 'काव्याचा विशेष म्हणजे उत्कृष्ट प्रकार' अशी.[१३] 'काव्य' हा शब्द वापरून असे सुचविले आहे की, जो ध्वनिस्वरूपी आत्मा असतो, तो गुण व अलंकार यांनी संस्कारित झालेल्या शब्द व अर्थ यांच्या प्रतीतीच्या मागून ध्यानात येणारा असतो.[१४] असे असल्यामुळे श्रुतार्थापत्तीलाही[१५] ध्वनिकाव्य म्हणावे लागेल' या आक्षेपाला जागाच नाही. आणि 'तर मग सौंदर्याची प्रतीति हाच काव्याचा आत्मा होईल !' असे जे कोणीतरी म्हटले आहे,[१६] ते आम्ही मान्यच करितो, कारण हे भांडण केवळ ('सौंदर्याची प्रतीति' व ध्वनि) या नावाच्या बाबतीतच आहे. आणि असेही जे म्हटले आहे की, सौंदर्याची प्रतीति हीच जर काव्याचा आत्मा असली, तर ती सौंदर्याची प्रतीति प्रत्यक्ष इ. प्रमाणांनी झाली,[१७] तरी ती काव्याचा आत्मा होईल !' तर त्या बाबतीत आमचे उत्तर असे आहे की, शब्दार्थमय काव्याचा आत्मा कोणता ते सांगणे हा प्रस्तुत विषय असताना इतर, म्हणजे सौंदर्याच्या प्रत्यक्षादि प्रमाणांनी होणाऱ्या प्रतीतीला काव्याचा आत्मा म्हणण्याचा प्रश्नच कोठे येतो ?

म्हणून या आक्षेपात काहीच तथ्य नाही.

'त्या काव्यप्रकाराला '...इ. (व्यंग्य) किंवा (व्यञ्जक) शब्द किंवा (व्यञ्जना) व्यापार यांनाही (ध्वनि म्हणणे इष्ट होईल). वाच्य अर्थालाही ध्वनि म्हणणे इष्ट, कारण तो 'ध्वनित करतो.' शब्दही ध्वनी, कारण तोही 'ध्वनित करितो.' व्यंग्य अर्थाला ध्वनि म्हणण्याचे कारण 'तो ध्वनित केला जातो.' आणि (शब्दांच्या व अर्थाच्या व्यञ्जना) व्यापारालाही ध्वनि म्हटले याचे कारण तो व्यापार म्हणजे 'ध्वनित करण्याची क्रिया'च. (अशा रीतीने हे चारही 'ध्वनि' होत, परंतु) कारिकेने मात्र या सर्वांचा काव्यरूपी समुदाय (घटकांपेक्षा) अधिक महत्त्वाचा, म्हणून तो समुदायच ध्वनि[१८] होय' असे मुख्यतः म्हटले आहे. 'वेगळेच'– गुण व अलंकार हे वाच्य–वाचक संबंधावरच (सर्वस्वी अवलंबून आहेत आणि हा 'ध्वनि' तर वाच्य–वाचक संबंधाहून) निराळचा, म्हणजे व्यंग्य–व्यंजकसंबंधावरच उभा असल्यामुळे या ध्वनीचा त्या गुणालंकारांमध्ये अंतर्भाव होणार नाही,[२०] (म्हणूनच याचे क्षेत्र 'वेगळेच' आहे). '(विभक्त) विषय' (म्हणजे वेगळे क्षेत्र) या शब्दाचा अर्थ ('ध्वनि' या संज्ञेचे व्यंग्य–व्यंजक संबंधाहून) 'दुसरीकडे अस्तित्व नसणे' हा होय.

याप्रमाणे ध्वनीचे स्पष्टपणे लक्षण केल्यामुळे 'हा ध्वनि नावाचा तथाकथित पदार्थ कोण आहे? या (अभाववाद्यांच्या पहिल्या वर्गाच्या,) आक्षेपाचे[२१] निराकरण झाले.

'आतापर्यंतच्या काव्यशास्त्रकारांनाच'– केवळ आतापर्यंतच्या काव्यशास्त्रकारांनाच तो ध्वनि अपरिचित असणे हा हेतु 'विरुद्ध[२२]' आहे, कारण त्यांना अपरिचित आहे, म्हणूनच तर आम्ही त्याचे प्रयत्नपूर्वक लक्षण करण्याची आवश्यकता आहे! पण 'लक्ष्या'चे म्हणजे उत्कृष्ट काव्यांचे ठिकाणी 'ध्वनि अपरिचित असणे' हा हेतु 'असिद्ध[२३]' आहे.

आणि ज्या नृत्य, गीत वगैरेसारख्या (काव्यबाह्य) कल्पना असतील,[२४] त्यांचा काव्याशी काहीही संबंध नाही– (पण ध्वनीचा आहेच). 'चित्र'–म्हणजे (१) वृत्त वगैरेमुळे[२५] जे आश्चर्यकारक असते, पण सहृदयांना हवासा वाटणारा अलौकिक आनंद हेच ज्याचे

सार आहे, अशा रसप्रवाहाने जे निर्भर नसते. किंवा (२) श्रेष्ठ काव्याची ती वरपांगी नक्कल असते,[२६] म्हणून त्याला 'चित्र' म्हणावयाचे, किंवा (३) ते काव्याची केवळ चित्ररूप प्रतिकृति असते, म्हणजे काव्याचा केवळ आभास असे त्याचे स्वरूप असते, म्हणून, किंवा (४) ते पूर्णतया काव्य नसून त्यात काव्याचा केवळ अंश असतो, म्हणून त्याला 'चित्र' अशी संज्ञा दिली आहे असे म्हणा.[२७] पुढे तिसऱ्या उद्योतात–

'याप्रमाणे व्यंग्यार्थ मुख्य की गौण यावर 'ध्वनि' व गुणीभूतव्यंग्य ही दोन प्रकारची काव्ये उभारलेली आहेत. याहून निराळे जे असेल, त्याला 'चित्र' म्हटले जाते[२८] -- (उद्योत ३, कारिका ४१ बी).'

असे (ग्रंथकार) सांगतील. 'परिकरा'साठी म्हणजे मूळ कारिकामध्ये अधिक अर्थाची भर घालण्यासाठी लिहिलेला श्लोक[२९] म्हणजे परिकरश्लोक होय.

टीपा

१. 'सद्भाव' याचा एक अर्थ आला 'अस्तित्व' हा. पण अभिनवगुप्तांनी 'लोचना'त सत् म्हणजे चांगला हाही अर्थ लक्षात घेऊन सद्भाव म्हणजे सौंदर्य व तन्मूलक प्राधान्य असेही अर्थ होतात हे रसिकपणे नजरेस आणले आहे.

२. मागील पृ. ३० वरील वृत्तीचा 'दुसरे (कोणी) म्हणतील–' इ. भाग पाहा.

३. उद्योत ३, कारिका ४१ पहा.

४. मागे पृ. ३५ पाहा.

५. उद्योत २, कारिका ६ पाहा.

६. पाहा, श्रीमद्भगवद्गीता, १७–२६ ची पहिली ओळ–**सद्भावे साधुभावे च सदित्येतत् प्रयुज्यते ।**

७. तो व्यंग्यार्थ अस्तित्वात आहे व सुंदर असल्यामुळे प्रधानही आहे हे गृहीत धरूनच '**तम् अर्थम्**' (व **उपसर्जनीकृतस्वार्थौ**) 'हे शब्द कारिकेत ध्वनिकाव्याची व्याख्या करिताना वापरले.

८. पाहा, काशी आवृत्ति, पृ. १३६ व पृ. १३७.

९. पण वाच्यार्थाचे ज्ञान झाल्याशिवाय शब्द कधीही व्यंजक होत नाही.

१०. पाहा, काशी आवृत्ति, पृ. १३६ वरील शेवटचे वाक्य व पृ. १३८ वरील उदाहरण.

११. पाहा. पृ. ९७वरील टीप १२ वी.

१२. कारिकेतील व्यङ्क्तः या द्विवचनाचे अभिनवगुप्तानी हे जे समर्थन केले आहे, त्यावर महिमभट्टाने आपल्या दृष्टीने आक्षेप घेतला आहे. (पाहा, व्यक्तिविवेक, रेवाप्रसाद द्विवेदी संपादित, पृ..९६, प्रथम विमर्श).

१३. अर्थात कोणत्याही प्रकारे फोड केली, तरी शेवटी अर्थ एकच.

१४. यावरून अभिनवगुप्तांना असे सांगावयाचे आहे की, गुणालंकारयुक्त शब्द व अर्थ यांमधून मुख्यतया प्रतीत होणारा व्यंग्यार्थच काव्याचा आत्मा होऊ शकतो. कारिका १ व ५ मध्ये निर्देश केलेला आत्मा तो हाच. हा मुद्दा अभिनवगुप्तांनी पुनः पुनः आवर्जून सांगितला आहे. पाहा पृ. ६८, ९०, १४७, इ.).

१५. पृ. २० वरील १२ वी टीप पाहा. ' धष्टपुष्ट देवदत्त दिवसा जेवीत नाही ' हे वाक्य ऐकल्यावर मग तो रात्री जेवीत असलाच पाहिजे ' अशी प्रतीति झाल्यावाचून राहात नाही, याला ' श्रुत ' अर्थापत्ति म्हणतात. असा देवदत्त धष्टपुष्ट आहे हे प्रत्यक्ष पाहून ' तो रात्री जेवीत असला पाहिजे ' अशी प्रतीति होणे ही ' दृष्ट ' अर्थापत्ति होय. ही प्रतीति ' ध्वनित ' होते असे जरी मानले, तरी ' धष्टपुष्ट देवदत्त दिवसा जेवीत नाही ' हे वाक्य गुणालंकारयुक्त नाही, म्हणून हे वाक्य ध्वनीचे उदाहरण होणार नाही.
' श्रुतार्थापत्तीलाही ध्वनिकाव्य म्हणावे लागेल ' हा आक्षेप भट्टनायकाचा असेल की काय नकळे. कारण काहीशा अशाच प्रकारच्या त्याच्या आक्षेपाचा उल्लेख पृ. १४७ वर त्याच्या ' हृदयदर्पणा 'तील एक अवतरण देऊन केला आहे

१६. अभिनवगुप्तांच्या मते सौंदर्याची प्रतीति ही दोन गोष्टींवर अवलंबून आहे- (१) व्यंग्यार्थाचा सद्भाव व (२) तो व्यंग्यार्थ गुणालंकारसंपन्न शब्दार्थांच्या द्वारा व्यक्त होणे. ' या दोन्हीमुळे होणारी सौंदर्यप्रतीति म्हणजे काव्याचा आत्मा ' असे जर प्रतिपक्षाचे म्हणणे असेल, तर ते अभिनवगुप्तांना मान्यच आहे. फक्त प्रतिपक्षी अशी सौंदर्यप्रतीति म्हणजे काव्याचा आत्मा असे म्हणेल, तर अशा सौंदर्यप्रतीतीला अभिनवगुप्त ' ध्वनि ' हे नाव देतील, इतकेच.

१७. प्रत्यक्षादि प्रमाणांनी म्हणजे एखादे सुंदर दृश्य पाहून, मधुर गीत ऐकून, चवदार पदार्थ चाखून, फुलांचा सुगंध सेवून, किंवा उन्हाळ्यात चंदनादिकांची उटी लावून होणारी सौंदर्यप्रतीति. हिलाही काव्याचा आत्मा म्हणावे लागेल, हा आक्षेपकाच्या म्हणण्याचा आशय.

१८. पाहा, काशी आवृत्ति, लोचन, पृ. १२५. तेथे अभिनवगुप्तांनी या म्हणण्या-चाच पुनरुल्लेख केला आहे.

१९. म्हणजे 'ध्वनि' शब्दाचा १३ व्या कारिकेत सांगितलेला 'विशिष्ट प्रकारचे काव्य' हा रूढ व म्हणूनच मुख्य अर्थ होय. व्यंग्यार्थ–इ. चार घटकांना 'ध्वनि' ही संज्ञा यौगिक म्हणजे व्युत्पत्तीने मिळणाऱ्या अर्थाविरून दिली आहे. (मीमांसक लिङ्गप्रमाणाला म्हणजेच रूढ अर्थाला समाख्येपेक्षा म्हणजे यौगिक अर्थापेक्षा कितीतरी प्रबल मानितात.)

२० वस्तुत: वृत्तीमध्ये केवळ अनुप्रासादि व उपमादि अलंकारांचाच उल्लेख आहे, गुणांचा नाही. तरीही अभिनवगुप्तांनी लोचनात गुणांचाही उल्लेख केला आहे. कारण गुण हे जरी रसाचे धर्म असले, तरी लक्षणेने ते शब्द आणि अर्थ यांचे ठिकाणीही मानले जातात, असे अभिनवगुप्तांनी २ऱ्या उद्द्योतात (काशी आवृत्ति, पृ. २०६ ते २०९ वर) म्हटले आहे.

२१. पाहा, पृ. २२.

२२. पाहा पृ. १५९, टीप २. येथे पूर्वपक्षाचे म्हणणे असे कल्पिले आहे–'ध्वनीचे लक्षण करण्याची जरूर नाही, कारण आतापर्यंतच्या काव्यशास्त्रकारांना ध्वनि माहीत नाही' या विधानातील हेतु 'विरुद्ध' आहे, कारण तो साध्याच्या, म्हणजे 'लक्षण करण्याची जरूरी नाही' याच्या उलट, म्हणजे 'जरूरी आहे' हे सिद्ध करतो! अशाच तऱ्हेचा युक्तिवाद मागे अभिनव-गुप्तांनी पृ. ३३ वर केला आहे.

२३. पाहा, पृ. ६९, टीप २ व पृ. १००, टीप ३०. प्रस्तुत उदाहरणात 'असिद्धा'चा 'स्वरूपासिद्ध' हा प्रकार आहे, कारण रामायण, महा-भारत इ. उत्कृष्ट काव्ये या 'पक्षा' वर ध्वनि असतो व तो सहृदयांना माहीत आहे. तेव्हा ध्वनि अपरिचित असणे हा हेतु 'पक्षा' वर नाहीच. म्हणून तो 'स्वरूपासिद्ध' होय.

२४. 'ध्वनि हा नृत्यगीतादींप्रमाणेच शब्दार्थरूप ही नाही आणि काव्यसौंदर्याचा हेतुही नाही, म्हणून ध्वनीचा काव्याशी काहीही संबंध नाही' असे अभाव-वाद्यांच्या दुसऱ्या वर्गाने म्हटल्याचे. पृ. ३२ वर म्हटले, त्याला उत्तर म्हणून अभिनवगुप्तांनी वरील वाक्य म्हटले आहे. अभिनवगुप्तांचे म्हणणे असे की, नृत्य, गीत वगैरेंचा काव्याशी संबंध नसला, तरी ध्वनि हा काव्याचा प्राण असल्याने त्याचा काव्याशी संबंध आहेच आहे!

२५. वगैरेमुळे म्हणजे उपमा–अनुप्रासादि अलंकारामुळे.

२६. म्हणजे ज्यात काव्याचे गुणालंकारादि बाह्यरूप असते, पण काव्याचा रसरूप गाभा नसतो.

२७. अशा रीतीने अभिनवगुप्तांनी 'चित्र' या शब्दाचे 'आश्चर्यकारक,'

'आकृति दाखविणारे रेखाचित्र,' 'मूळ वस्तूचा आभास उत्पन्न करणारे रंगविलेले चित्र' व मूळ वस्तूचे अंशतः दर्शन घडविणारे चित्र' असे चार अर्थ केले आहेत.

२८ अभिनवगुप्तांनी येथे उद्धृत केलेल्या कारिकेत व मूळ ग्रंथातल्या कारिकेत किरकोळ शब्दभेद आहेत.

२९. असे 'परिकरश्लोक' ध्वन्यालोकात अनेक ठिकाणी आढळतात. निरनिराळ्या ठिकाणी ते वेगळ्या कारणांसाठी (उदा. अतिदेश, अनुवाद, दृढीकरण, संक्षेप इ. साठी) घातलेले आहेत. या श्लोकांचे कर्तृत्व वृत्तिकाराकडेच जाते असे काही विद्वानांचे मत, तर यःउलट हे श्लोक ध्वनिवाद्यांच्या वर्तुळात पूर्वापार चालत आलेले असून ते आनंदवर्धनांनी केवळ उद्धृत केले आहेत असे इतरांचे मत.

ध्वन्यालोकः

ननु यत्र प्रतीयमानस्यार्थस्य वैशद्येनाप्रतीतिः स नाम मा भूद् ध्वनेर्विषयः। यत्र तु प्रतीतिरस्ति, यथा – समासोक्त्याक्षेपानुक्तनिमित्तविशेषोक्तिपर्यायोक्तापह्नुतिदीपकसङ्करालङ्कारादौ, तत्र ध्वनेरन्तर्भावो भविष्यतीत्यादि निराकर्तुमभिहितम् – 'उपसर्जनीकृतस्वार्थौ' इति। अर्थो गुणीकृतात्मा, गुणीकृताभिधेयः शब्दो वा यत्रार्थान्तरमभिव्यनक्ति स ध्वनिरिति। तेषु कथं तस्यान्तर्भावः। व्यङ्ग्यप्राधान्ये हि ध्वनिः। न चैतत्समासोक्त्यादिष्वस्ति।

समासोक्तौ तावत्.—

उपोढरागेण विलोलतारकं तथा गृहीतं शशिना निशामुखम्।
यथा समस्तं तिमिरांशुकं तया पुरोऽपि रागाद्गलितं न लक्षितम्॥

इत्यादौ व्यङ्ग्येनानुगतं वाच्यमेव प्राधान्येन प्रतीयते, समारोपितनायिकानायकव्यवहारयोर्निशाशशिनोरेव वाक्यार्थत्वात्।

ध्वन्यालोक

"पण काय हो, ज्या उदाहरणात व्यंग्य अर्थ स्पष्टपणे प्रतीत होत नसेल, ते वाटल्यास ध्वनीचे उदाहरण न होऊ द्या, पण समासोक्ति,[१] आक्षेप, अनुक्तनिमित्त विशेषोक्ति, पर्यायोक्त, अपह्नुति, दीपक, संकरालंकार वगैरेसारख्या

ज्या ठिकाणी व्यंग्यार्थ असल्याचे स्पष्ट दिसून येते त्या ठिकाणी, म्हणजे त्या-सारख्या ( पूर्वीच प्रसिद्ध असलेल्या ) अलंकारांत ( तुमच्या ) ध्वनीचा अन्तर्भाव होईल की!" असा मुद्दा कोणी पुढे केला, तर त्याचे खंडन करण्यासाठीच कारिकेत 'स्वतःला आणि आपल्या वाच्यार्थाला गौणत्व देऊन' हे शब्द मुद्दाम घातले आहेत. 'वाच्यार्थ स्वतःकडे गौणत्व घेऊन आणि शब्द आपल्या वाच्यार्थाला गौणत्व देऊन ज्या उदाहरणात दुसरा अर्थ (प्रधान म्हणून) सुचवितो, तो ध्वनि' असे म्हटले आहे. तेव्हा वरील अलंकारांमध्ये त्या ध्वनीचा अन्तर्भाव कसा होईल? कारण व्यंग्यार्थ प्रधान असेल तरच तो 'ध्वनि' होतो. असे काही 'समासोक्ति' वगैरेंमध्ये नसते. प्रथम समासोक्ती[2]मध्येच पाहा ना—

राग ( १. रक्तिमा २. अनुराग ) धारण करणाऱ्या चन्द्राने, विलोल ( १. चमचम करणाऱ्या, २. चंचल ) तारकांनी ( १. चांदण्यांनी २. बुबुळा-तील बाहुल्यांनी ) युक्त असलेले निशेचे मुख ( १. प्रारंभ २. वदन ) असे (१. इतक्या झटकन् २. इतक्या प्रेमभराने) ग्रहण केले ( १. प्रकाशित केले २. चुंबनासाठी पकडले) की, त्यायोगे तिचे सगळेच्या सगळेच चांदण्याच्या अंधुक प्रकाशाने मिश्रित असे दाट अंधकारपटल ( दुसरा अर्थ—सगळेच्या सगळे अंधकाराप्रमाणे कृष्णवर्ण असलेले रेशमी जाळीदार अवगुंठन ) पूर्वेकडे ( दुसरा अर्थ – आपल्यापुढे ) नष्ट झालेले ( दुसरा अर्थ – गळून पडलेले ) देखील रागाच्या योगाने ( १. संध्याकाळच्या रक्तिम्यानंतर २. तिचेही प्रेम उद्दीपित झाल्यामुळे ) तिच्यामुळे लोकांच्या ( दुसरा अर्थ – तिच्या ) ध्यानात आले नाही!

यासारख्या उदाहरणात व्यंग्यार्थाने सजलेला वाच्यार्थच मुख्य म्हणून प्रतीत होतो, कारण या ठिकाणी ज्याच्यांवर नायक-नायिकांच्या कृतीचा आरोप केला आहे, असे चन्द्र व निशा हेच वर्ण्य विषय आहेत.[3]

### लोचनम्

यत्रेत्यलङ्कारे। वैशद्येनेति। चारुतया स्फुटतया चेत्यर्थः। अभि-हितमिति। भूतप्रयोग आदौ व्यङ्क्त इत्यस्य व्याख्यातत्वात्। गुणी-कृतात्मेति। आत्मेत्यनेन स्वशब्दस्यार्थो व्याख्यातः। न चैतदिति। व्यङ्ग्यस्य प्राधान्यम्। प्राधान्यं च यद्यपि ज्ञप्तौ न चकास्ति; 'बुद्धौ तत्त्वावभासिन्याम्' इति नयेनाखण्डचर्वणाविश्रान्तेः, तथापि विवेच-

कैर्जीवितान्वेषणे क्रियमाणे यदा व्यङ्ग्योऽर्थः पुनरपि वाच्यमेवानुप्राणयन्नास्ते तदा तदुपकरणत्वादेव तस्यालङ्कारता। ततो वाच्यादेव तदुपकृताच्चमत्कारलाभ इति। यद्यपि पर्यन्ते रसध्वनिरस्ति, तथापि मध्यकक्षानिविष्टोऽसौ व्यङ्ग्योऽर्थो न रसोन्मुखीभवति स्वातन्त्र्येण, अपि तु वाच्यमेवार्थं संस्कर्तुं धावतीति गुणीभूतव्यङ्ग्यतोक्ता। समासोक्ताविति।

> यत्रोक्तौ गम्यतेऽर्थस्तत्समानैर्विशेषणैः।
> सा समासोक्तिरुदिता संक्षिप्तार्थतया बुधैः॥

इत्यत्र समासोक्तेर्लक्षणस्वरूपं हेतुर्नाम तन्निर्वचनमिति पादचतुष्टयेन क्रमादुक्तम्। उपोढो रागः सान्ध्योऽरुणिमा प्रेम च येन। विलोला तारका ज्योतींषि नेत्रत्रिभागाश्च यत्र। यथेति। झटित्येव प्रेमरभसेन च। गृहीतमाभासितं परिचुम्बितुमाक्रान्तं च। निशाया मुखं प्रारम्भो वदनकोकनदं चेति। यथेति। झटिति ग्रहणेन प्रेमरभसेन च। तिमिरं चांशुकाश्च सूक्ष्मांशवस्तैस्तिमिरांशुकं रश्मिशबलीकृतं तमःपटलं, तिमिरांशुकं नीलजालिका नवोढाप्रौढवधूचिता। रागाद्रक्तत्वात् सन्ध्याकृतादनन्तरं प्रेमरूपाच्च हेतोः। पुरोऽपि पूर्वस्यां दिशि अग्रे च। गलितं प्रशान्तं पतितं च। रात्र्या करणभूतया समस्तं मिश्रितम्, उपलक्षणत्वेन वा। न लक्षितं रात्रिप्रारम्भोऽसौ इति न ज्ञातम्। तिमिरसंवलितांशुदर्शने हि रात्रिमुखमिति लोकेन लक्ष्यते न तु स्फुटे आलोके। नायिकापक्षे तु तयेति कर्तृपदम्। रात्रिपक्षे तु अपिशब्दो लक्षितमित्यस्यानन्तरः। अत्र च नायकेन पश्चाद्गतेन चुम्बनोपक्रमे पुरो नीलांशुकस्य गलनं पतनम्। यदि वा 'पुरोऽग्रे नायकेन तथा गृहीतं मुखमि'ति सम्बन्धः। तेनात्र व्यङ्ग्ये प्रतीतेऽपि न प्राधान्यम्। तथाहि नायकव्यवहारो निशाशशिनावेव शृंगारविभावरूपौ संस्कुर्वाणोऽलङ्कारतां भजते, ततस्तु वाच्याद्विभावीभूताद्रसनिःष्यन्दः। यत्तु व्याचष्टे— 'तया निशयेति कर्तृपदं, न चाचेतनायाः कर्तृत्वमुपपन्नमिति शब्देनैवात्र नायकव्यवहार उक्तोऽभिधेय एव, न व्यङ्ग्य इत्यत एव समासोक्तिः' इति। स प्रकृतमेव ग्रन्थार्थमत्यजद्व्यङ्ग्येनानुगतमिति। एकदेशविवर्ति चेत्थं रूपकं स्यात् 'राजहंसैरवीज्यन्त शरदैव सरोनृपाः' इतिवत्, न तु समासोक्तिः, तुल्यविशेषणाभावात्। गम्यत इति चानेनाभिधाव्यापार-

निरासादित्यलमवान्तरेण बहुना । नायिकाया नायके यो व्यवहारः स निशायां समारोपितः, नायिकायां नायकस्य यो व्यवहारः स शशिनि समारोपित इति व्याख्याने नैकशेषप्रसङ्गः ।

लोचन

'ज्या उदाहरणात'—म्हणजे ज्या अलंकारात. 'स्पष्टपणे' म्हणजे सुंदरपणे व सुबोधपणे. '(हे शब्द मुद्दाम) घातले आहेत' यातील भूतकाळाचा उपयोग व्यङ्क्तः (म्हणजे सूचित करितात) याचे विवरण आधी केले गेले, म्हणून.[१] 'स्वतःकडे गौणत्व घेऊन' यात 'स्वतः' या शब्दाने कारिकेतल्या स्व या शब्दाचे विवरण केले आहे. 'असे काही ... नसते' म्हणजे व्यंग्य अर्थाचे प्राधान्य नसते. आणि अंतिम रसप्रतीतीचे वेळी जरी वाच्यार्थ व अवान्तर व्यंग्यार्थ यांपैकी कोणता प्रधान याची जाणीव झाल्याचा अनुभव येत नाही, कारण 'सारभूत अर्थाचाच वेध घेणाऱ्या सहृदयांच्या अन्तःकरणात तो रसरूपी व्यंग्यार्थ तत्क्षणीच प्रकाशित होतो' या (१२ व्या कारिकेतील) उक्तीप्रमाणे अखण्डपणे रसास्वादन करण्यामध्येच (सहृदयाचे मन) एकाग्र झालेले असले तरी चिकित्सक जेव्हा (अवान्तर व्यंग्यार्थ व रसरूप व्यंग्यार्थ यांपैकी ) कोणता व्यंग्यार्थ काव्याचे जीवित असेल याचे विश्लेषण करू लागतात, तेव्हा ज्या ज्या काव्यात (अवांतर) व्यंग्यार्थ वाच्यार्थालाच सजीव करणारा असतो, त्या त्या काव्यात (अवांतर) व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाचेच अंग असल्याने (अवांतर) व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाचा अलंकार होतो. म्हणून (अवांतर) व्यंग्यार्थाने भूषित झालेल्या वाच्यार्थामुळेच काव्याला मुख्यतः शोभा प्राप्त होते. आता (समासोक्ति इ. अलंकाराच्या स्थळी) शेवटी जरी रसाची प्रतीती होत असली, तरी मधल्या टप्प्यात ज्ञात होणाऱ्या त्या (अवांतर) व्यंग्यार्थाचे रसध्वनीमध्ये स्वतंत्रपणे पर्यवसान होत नाही, तर तो (अवांतर) व्यंग्यार्थ वाच्य अर्थाला रमणीय करण्यासाठी प्रथम वाच्यार्थाकडेच धाव घेतो, म्हणून ते काव्य 'गुणीभूतव्यङ्ग्य' म्हणजे '(अवांतर) व्यंग्यार्थ ज्यात वाच्यार्थापेक्षा गौण असतो.' असे म्हटले आहे.

' समासोक्तीमध्ये '—

'ज्या उदाहरणात प्रस्तुत वर्णनातून अप्रस्तुत अर्थ 'समान' म्हणजे दोन्हीकडे लागू पडणाऱ्या विशेषणांमुळे सुचविला जातो, त्या वर्णनाला जाणकार लोक 'समासोक्ति' म्हणतात, कारण तिच्यात दोन अर्थ संक्षेपाने म्हणजे एकाच वाक्यातून प्रकट झालेले असतात.[५]

(वरील श्लोकामध्ये समासोक्तीच्या लक्षणाचे स्वरूप, तिचे कारण, तिचे नाव व त्या नावाचे स्पष्टीकरण या चार गोष्टी क्रमाने चार चरणातून सांगितल्या आहेत.) 'उपोढ' म्हणजे धारण केला आहे 'राग' म्हणजे (१) सायंकालीन रक्तिमा आणि (२) अनुराग (म्हणजे प्रीति) ज्याने, असा.[६] ज्यामध्ये चंचल म्हणजे चमचमणाऱ्या (१) तारका म्हणजे चांदण्या आणि (२) डोळ्यांतील (चंचल अशा) बाहुल्या आहेत, असे. 'तथा' म्हणणे 'तसे' म्हणजे (१) इतक्या झटकन् आणि (२) इतक्या प्रेमभराने 'ग्रहण केले' म्हणजे (१) प्रकाशित केले, आणि (२) 'चुंबनासाठी पकडले.' निशेचे 'मुख' म्हणजे (१) 'प्रारंभ' आणि (२) 'मुखकमल'. 'ज्यायोगे' म्हणजे (१) अतिशय लवकर प्रकाशित केल्याच्या योगे आणि (२) प्रेमाच्या अतिशय आवेगाच्या योगे. तिमिर आणि अंशुक (म्हणजे मंद किरण) = तिमिरांशुक म्हणजे (१) तारकांच्या (मंद) किरणांमुळे धूसर झालेले अंधकारपटल. तसेच 'तिमिरांशुक' म्हणजे (२) नवविवाहित अप्रौढ वधूने धारण करावयाचे अंधकारासारखे कृष्णवर्ण जाळीदार अवगुंठन. 'रागा'मुळे म्हणजे (१) संध्याकाळच्या रक्तिम्यानंतर आणि (२) नायिकेलाही आलेल्या प्रेमाच्या उमाळ्यामुळे.[७] पुरः अपि म्हणजे (१) पूर्वदिशेला आणि (२) पुढे, समोर. गळलेले म्हणजे (१) नष्ट झालेले आणि (२) खाली गळून पडलेले. तया म्हणजे (१) तिमिर आणि (तारकांचे) किरण यांच्या संमिश्रणाला कारण झालेल्या रात्रीमुळे किंवा त्या संमिश्रणाची निदर्शक असलेल्या रात्रीमुळे. समस्त म्हणजे (चांदण्यांच्या अंधुक प्रकाशाने) मिश्रित.[८] लक्षात आले नाही, म्हणजे (१) हा रात्रीचा प्रारंभ आहे हे (लोकांना) समजले नाही, कारण अंधारात (तारकांचे) किरण मिसळलेले पाहिल्यावर (त्या अंधुक प्रकाशामुळे) हा रात्रीचा प्रारंभ आहे हे जगाला कळते, (पण चंद्रोदय झाल्यानंतरच्या)

स्पष्ट प्रकाशात (तो रात्रीचा प्रारंभच आहे हे) कळत नाही. नायिके-कडे घेताना मात्र **तया** हे पद कर्तृवाचक समजावे. रात्रीकडे लावताना अपि (म्हणजे देखील) हा शब्द (न) लक्षितम् नंतर जोडावा (म्हणजे तिच्या ध्यानातदेखील आले नाही असा अर्थ). नायकाने नायिकेच्या मागे उभे राहून तिचे चुंबन घ्यावयास प्रारंभ केला असताना तिचे निळे रेशमी अवगुंठन पुढे गळले म्हणजे पडते. किंवा पुरः (म्हणजे समोर उभे राहून नायकाने तिचे मुख असे पकडले असा पुरः (म्हणजे पुढे) चा संबंध जोडावा. तेव्हा अशा रीतीने या पद्यात (नायक-नायिकावृत्तांतरूपी) व्यंग्यार्थ प्रत्ययास येत असला, तरी तो मुख्य नाही. कारण, तो (व्यंग्य) नायक-नायिकाव्यवहार निशा व शशी यांचेच रूपान्तर शृंगाराच्या विभावांत करीत असल्याने तो (वाच्यार्थाचा) अलंकार होतो. त्यानंतर अशा प्रकारे विभावांत रूपान्तर झालेल्या (नायकनायिकाव्यवहार या) वाच्यार्थापासून रसनिष्पत्ति होते.

पण या श्लोकाचे विवरण कोणीतरी असे केले आहे–

रात्रीकडे **तया** हे पद जोडताना ते कर्तृवाचक समजावे[9] आणि त्या अचेतन असलेल्या रात्रीच्या ठिकाणी पाहण्याच्या क्रियेचे कर्तृत्व असणे संभवत नाही, म्हणून (तया या) शब्दामुळेच अनुमित होणारा नायक-नायिकाव्यवहार येथे 'वाच्यच' होय, व्यंग्य नाही. म्हणूनच येथे 'समासोक्ति' म्हणजे दोन्ही व्यवहारांची संक्षपाने उक्ति[10] (म्हणजे वाच्यत्वाने वर्णन) आहे.

या विवरणकाराने (तर ज्या वृत्तीचे विवरण करावयाचे, तिच्यातलेच) '**व्यङ्ग्येन अनुगतम्**' (म्हणजे व्यंग्यार्थामुळे सजलेला) हे शब्द सोडून दिले आहेत ! आणि शिवाय या टीकाकाराचे म्हणणे मान्य केल्यास "सरोवररूपी राजांना 'शरद्' नेच (म्हणजे शरद्रूपी चामरधारिणीने) राजहंसांनी (म्हणजे राजहंसरूपी चवऱ्यांनी) वारा घातला"[11] या उदाहरणाप्रमाणे वरील उदाहरणही एकदेशविवर्ति रूपकाचे[12] होईल, पण ती समासोक्ति होणार नाही. कारण समासोक्तीत फक्त विशेषणेच द्व्यर्थी हवीत, ती राहणार नाहीत.[13] शिवाय समासो-क्तीच्या लक्षणात असलेला '**गम्यते**' हा शब्द दुसरा अर्थ व्यंग्यच हवा,

असे सांगत असल्याने नायक–व्यवहार हा प्रस्तुत पद्यात अभिधाव्यापाराचा विषय आहे, या मुद्द्याचे निराकरण होते. अशा रीतीने हा (मुख्य विषयाखेरीज) दुसऱ्याच विषयाचा विस्तार पुरे. 'नायिकेच्या नायकाच्या बाबतीतल्या व्यवहाराचा या ठिकाणी निशेवर आरोप केला आहे व नायिकेच्या बाबतीत नायकाचा जो व्यवहार, त्याचा आरोप चंद्रावर केला आहे' असे विवरण केले म्हणजे येथे वृत्तीतल्या 'नायिकानायक' या शब्दप्रयोगाऐवजी 'नायक' अशी एकशेषवृत्ति[४] करण्याचा प्रसंग येणार नाही.

टीपा

१. यापुढील विवेचनात या अलंकारांची लक्षणे व उदाहरणं दिलेली आहेतच.
२. विशेष्याखेरीज इतर काही शब्द द्व्यर्थी वापरून ज्या उदाहरणात प्रस्तुताखेरीज दुसरे चित्र त्या त्या शब्दांच्या दुसऱ्या (अप्रस्तुत) अर्थामुळे सूचित केले जाते, ते समासोक्ति अलंकाराचे उदाहरण होय. वरील उदाहरणात चन्द्र व निशा ही विशेष्ये द्व्यर्थी नाहीत, पण मुख, राग इ. शब्द द्व्यर्थी वापरल्यामुळे केवळ चंद्र-निशा यांच्या वर्णनाखेरीज नायक–नायिकांच्या काही कृति सूचित केल्या आहेत.
३. नायक-नायिकांच्या कृति हा व्यंग्यार्थ येथे जरी अधिक सुंदर वाटला, तरी तो वाच्यार्थाला म्हणजे चन्द्रनिशावृत्तान्ताला खुलविण्यासाठीच खर्ची पडत असल्यामुळे तो व्यंग्यार्थ या ठिकाणी मुख्य नाही. व्यंग्यार्थाने सजवलेला वाच्यार्थ नुसत्या व्यंग्यार्थापेक्षा अधिक सुंदर असल्यामुळेसुद्धा त्या वाच्यार्थाला प्राधान्य प्राप्त होते.
४. वस्तुतः **अभिहितम्** हा शब्द भूतकाळात का वापरला, याचे समर्थन करण्याची जरूरी दिसत नाही आणि तरीही अभिनवगुप्तांनी केलेल्या समर्थनापासून समाधानकारक असा अर्थ निष्पन्न होत नाही. कारिकेत **उपसर्जनीकृतस्वार्थौ** याच्या नंतर वापरलेल्या व्यङ्क्तः या पदाचे व्याख्यान 'उपसर्जनीकृतस्वार्थौ या पदाच्या व्याख्यानापूर्वी केले गेले. म्हणून उपसर्जनीकृतस्वार्थौ हे शब्द घातले गेले' यातील भूतकाळाचा उपयोग केला आहे असे अभिनवगुप्त म्हणतात पण ते विशेष प्रत्ययकारी वाटत नाही. त्यापेक्षा 'दीधिति'काराने 'अभिहितम्' यातील भूतकाळाचे केलेले समर्थन अधिक ग्राह्य वाटते, ते असे :– कारिका ही वृत्तीच्या पूर्वी लिहिली होती व उपसर्जनीकृतस्वार्थौ हे पद वृत्तीच्या आधी लिहिलेल्या कारिकेतले असल्यामुळे 'ते पद घातले गेले' असा भूतकाळ वृत्तीत वापरला आहे

५. भामह, काव्यालंकार, २–७९.

६. येथील प्रत्येक स्पष्टीकरणातील (१) हा अर्थ प्रस्तुत असलेल्या निशा-शशि-वृत्तांताला लागू पडणारा असून (२) हा अर्थ, अप्रस्तुत असलेल्या नायक-नायिका वृत्तांताला लागू पडणारा आहे.

७. यातील (१) मध्ये पंचमीचा अर्थ 'नंतर' असा असून (२) मध्ये पंचमीचा अर्थ 'मुळे' असा आहे,

८. 'समस्त' याचा दुसरा अर्थ अभिनवगुप्तांनी दिलेला नाही, पण 'सगळे' असा घेणे अवश्य आहे,

९. म्हणजे तया याचा अर्थ 'तिने' म्हणजे 'रात्रीने' असा होईल.

१०. समासोक्ती, विशेषोक्ती, व्याजोक्ती, पर्यायोक्त इ. संज्ञांमधील 'उक्ती' 'उक्त' हे शब्द केवळ वाच्यार्थापुरतेच वापरले जात नसून वाच्यार्थाच्या द्वारा दुसरा कोणता तरी अर्थ सूचित करणे या अर्थीही वापरले जातात. वरील उदाहरणात आनन्दवर्धन व अभिनवगुप्त या दोघांच्याही मते निशा-शशिव्यवहार वाच्य असून नायक-नायिका-व्यवहार व्यङ्ग्यच आहे. पण प्रस्तुत टीकाकाराने तया = तिने (म्हणजे रात्रीने आणि नायिकेने) असा अर्थ घेऊन दोन्ही व्यवहार वाच्यच म्हटले आहेत. नायक–नायिका–व्यवहाराला त्या टीकाकाराने 'अनुमित' म्हणून त्यालाच 'वाच्य' म्हणावे हे पटत नाही. वरील श्लोकाचे हे विवरण चन्द्रिकाकार, भट्टनायक, किंवा अन्य कोणी केले होते हे कळणे कठीण आहे. मात्र हा टीकाकार व्यंग्यार्थ न मानणारा असावा.

११. उद्भट, काव्यालंकारसारसंग्रह, १–१२.

१२. 'टीकाकाराचे म्हणणे मान्य केल्यास हे उदाहरण एकदेशविवर्ति रूपकाचे 'होईल' हा अभिनवगुप्तांचा आक्षेप तितकासा समाधानकारक वाटत नाही, याचे कारण असे–एकदेशविर्ति रूपकामध्ये काही रूपके 'शाब्द' व काही 'आर्थ' असतात. वरील 'उपोढरागेण' इ. उदाहरणात तिमिरांशुकम् हा समास तिमिरम् एव अंशुकम् (म्हणजे अंधार हेच रेशमी वस्त्र) असा सोडवून यातील रूपक 'शाब्द' आहे असे मानिले, तरी तो टीकाकार शशिना = शशिनायकेन व निशा = निशानायिका या आर्थ रूपकांनाही शाब्दच मानीत असल्यामुळे, म्हणजे त्याच्या मते येथील सर्वच रूपके शब्दच असल्यामुळे तो हे उदाहरण 'एकदेशविवर्ति' रूपकाचे मानणार नाही.

१३. म्हणजे तया याचे दोन अर्थ मानल्यास टीकाकाराच्या म्हणण्याप्रमाणे येथे विशेष्यही श्लिष्ट म्हणजे द्व्यर्थी होऊन मग तो 'समासोक्ती' अलंकार न राहता 'श्लेष' अलंकार होईल ! भामहाच्या (समासोक्तीच्या) लक्षणात (तत्समानविशेषणैः याचा अर्थ केवलं समानैः विशेषणैः एव, न तु समानैः

विशेष्य : अपि असा आहे

१४. पाहा, पाणिनीचे ' पुमान् स्त्रिया (१-२-६७), हे सूत्र. शिवाय वक्त्याच्या विवक्षेनुसार एकशेषवृत्ति ही वापरली नाही तरी चालते.

ध्वन्यालोकः

आक्षेपेऽपि व्यङ्ग्यविशेषाक्षेपिणोऽपि वाच्यस्यैव चारुत्वम् । प्राधान्येन वाक्यार्थ आक्षेपोक्तिसामर्थ्यादेव ज्ञायते । तथाहि– तत्र शब्दोपारूढो विशेषाभिधानेच्छया प्रतिषेधरूपो य आक्षेपः स एव व्यङ्ग्यविशेषमाक्षिपन्मुख्यं काव्यशरीरम् । चारुत्वोत्कर्षनिबन्धना हि वाच्यव्यङ्ग्ययोः प्राधान्यविवक्षा । यथा—

अनुरागवती सन्ध्या दिवसस्तत्पुरस्सरः ।
अहो दैवगतिः कीदृक्तथापि न समागमः ॥

अत्र सत्यामपि व्यङ्ग्यप्रतीतौ वाच्यस्यैव चारुत्वमुत्कर्षवदिति तस्यैव प्राधान्यविवक्षा ।

यथा च दीपकापह्नुत्यादौ व्यङ्ग्यत्वेनोपमायाः प्रतीतावपि प्राधान्येनाविवक्षितत्वान्न तया व्यपदेशस्तद्वदत्रापि द्रष्टव्यम् ।

ध्वन्यालोक

आक्षेप[1] अलंकारातदेखील वैशिष्ट्यपुक्त व्यंग्यार्थ सुचवणारा वाच्यार्थच रमणीय असतो. ( येथे ) वाच्यार्थच मुख्य असतो, हे मुख्यतः आक्षेप अलंकाराच्या ' निषेध ' या स्वरूपावरूनच कळते.[2] कारण त्या ठिकाणी विशेष अर्थ सांगण्याच्या म्हणजे सुचविण्याच्या इच्छेने शब्दस्वरूप दिलेला म्हणजे ' वाच्य ' झालेला जो निषेधरूपी आक्षेप असतो, तेच विशिष्ट प्रकारचा व्यंग्यार्थ सुचवणारे काव्याचे मुख्य शरीर होय. वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांतील कोणता अर्थ कवीला मुख्य म्हणून अभिप्रेत आहे, हे त्या दोहोंपैकी अधिक सुंदर अर्थ कोणता आहे यावर ठरवावयाचे असते.[3] जसे—

संध्या ही अनुरागाने ( १. रक्तिम्याने २. प्रीतीने ) निर्भर आहे, आणि दिवस तिचा पुरस्सर [ १. तिच्यासमोर ( म्हणजे सन्मुख ) २. तिच्यापुढे ( म्हणजे आधी ) निघून जाणारा ] उभा ठाकलेला आहे, पण तरीदेखील ( त्यांचा ) समागम होत नाही, ही दैवघटना किती आश्चर्यकारक आहे !

या ठिकाणी 'नायक–नायिका–व्यवहार' हा व्यंग्यार्थ प्रत्ययाला येत असला, तरी ( त्या व्यवहाराने अलंकृत असा ) वाच्यार्थच अधिक सुंदर असल्याने[४] कवीला तो वाच्यार्थच प्रधान म्हणून अभिप्रेत आहे ( असे समजले पाहिजे ).

आणि ज्याप्रमाणे दीपक, अपह्नुति वगैरे अलंकारांमध्ये व्यंग्य म्हणून उपमेची ( म्हणजे साम्याची ) प्रतीति होत असली, तरी तो व्यंग्यार्थ प्रधान म्हणून विवक्षित नसल्याने त्या अलंकारांना तिचे ( उपमेचे ) नाव देत नाहीत ( त्याला दीपक,[५] अपह्नुति[६] असेच म्हणतात ), त्याचप्रमाणे येथेही समजावे. ( म्हणजे 'आक्षेप' अलंकारात आक्षेप = निषेध हा वाच्यार्थच रमणीय अत एव प्रधान असल्याने या अलंकाराला 'आक्षेप' हे नाव दिले असे समजावे. )

लोचनम्

आक्षेप इति ।
प्रतिषेध इवेष्टस्य यो विशेषाभिधित्सया ।
वक्ष्यमाणोक्तविषयः स आक्षेपो द्विधा मतः ॥
तत्राद्यो यथा–
अहं त्वां यदि नेक्षेय क्षणमप्युत्सुका ततः ।
इयदेवास्त्वतोऽन्येन किमुक्तेनाप्रियेण ते ॥

इति वक्ष्यमाणमरणविषयो निषेधात्माक्षेपः । तत्रेयदस्त्वित्येतदेवात्र म्रिये इत्याक्षिपत्सच्चारुत्वनिबन्धनमित्याक्षेप्येणाक्षेपकमलङ्कृतं सत्प्रधानम् । उक्तविषयस्तु यथा ममैव—

भो भोः किं किमकाण्ड एव पतितस्त्वं पान्थ कान्या गतिः ।
तत्तादृक्तृषितस्य मे खलमतिः सोऽयं जलं गूहते ।
अस्थानोपनतामकालसुलभां तृष्णां प्रति क्रुध्य भो –
स्त्रैलोक्यप्रमितप्रभावमहिमा मार्गः पुनर्मारवः ॥

अत्र कश्चित्सेवकः प्राप्तः प्राप्तव्यमस्मात्किमिति न लभ इति प्रत्याशाविशीर्यमानहृदयः केनचिदमुनाक्षेपेण प्रतिबोध्यते । तत्राक्षेपेण निषेधरूपेण वाच्यस्यैवासत्पुरुषसेवातद्वैफल्यतत्कृतोद्वेगात्मनः शान्तरसस्थायिभूतनिर्वेदविभावरूपतया चमत्कृतिदायित्वम् । वामनस्य तु 'उपमानाक्षेपः' इत्याक्षेपलक्षणम् । उपमानस्य चन्द्रादेराक्षेपः,

अस्मिन्सति किं त्वया कृत्यमिति । यथा—

तस्यास्तन्मुखमस्ति सौम्यसुभगं किं पार्वणेनेन्दुना
सौन्दर्यस्य पदं दृशौ यदि च तैः किं नाम नीलोत्पलैः ।
किंवा कोमलकान्तिभिः किसलयैः सत्येव तत्राधरे
ही धातुः पुनरुक्तवस्तुरचनारम्भेष्वपूर्वो ग्रहः ॥

अत्र व्यङ्ग्योऽप्युपमार्थो वाच्यस्यैवोपस्कुरुते । किं तेन कृत्यमिति त्वपह्नुतनारूप आक्षेपो वाच्य एव चमत्कारकारणम् । यदि चोपमानस्याक्षेपः सामर्थ्यादाकर्षणम् । यथा—

ऐन्द्रं धनुः पाण्डुपयोधरेण शरद्दधानार्द्रनखक्षताभम् ।
प्रसादयन्ती सकलङ्कमिन्दुं तापं रवेरभ्यधिकं चकार ॥

इत्यत्रेर्ष्याकलुषितनायकान्तरमुपमानमाक्षिप्तमपि वाच्यार्थमेवालङ्करोतीत्येषा तु समासोक्तिरेव । तदाह— चारुत्वोत्कर्षेति । अत्रैव प्रसिद्धं दृष्टान्तमाह— अनुरागवतीति । तेनाक्षेपप्रमेयसमर्थनमेवापरिसमाप्तमिति मन्तव्यम् । तत्रोदाहरणत्वेन समासोक्तिश्लोकः पठितः । अहो दैवगतिरिति । गुरुपारतन्त्र्यादिनिमित्तोऽसमागम इत्यर्थः । तस्यैवेति । वाच्यस्यैवेति यावत् । वामनाभिप्रायेणायमाक्षेपः, भामहाभिप्रायेण तु समासोक्तिरित्यमुमाशयं हृदये गृहीत्वा समासोक्त्याक्षेपयोः युक्तमिदमेकमेवोदाहरणं व्यतरद् ग्रन्थकृत् । एषापि समासोक्तिर्वाऽस्तु आक्षेपो वा, किमनेनास्माकम् । सर्वथालङ्कारेषु व्यङ्ग्यं वाच्ये गुणीभवतीति नः साध्यमित्याशयोऽत्र ग्रन्थेऽस्मद्गुरुभिर्निरूपितः ।

एवं प्राधान्यविवक्षायां दृष्टान्तमुक्त्वा व्यपदेशोऽपि प्राधान्यकृत एव भवतीत्यत्र दृष्टान्तं स्वपरप्रसिद्धमाह । यथा चेति । उपमाया इति । उपमानोपमेयभावस्येत्यर्थः । तत्त्वयुपमया । दीपके हि 'आदिमध्यान्तविषयं त्रिधा दीपकमिष्यते' इति लक्षणम् ।

मणिः शाणोल्लीढः समरविजयी हेतिदलितः
कलाशेषश्चन्द्रः सुरतमृदिता बाललना ।
मदक्षीणो नागः शरदि सरिदाश्यानपुलिना
तनिम्ना शोभन्ते गलितविभवाश्चार्थिषु जनाः ॥

इत्यत्र दीपनकृतमेव चारुत्वम् । 'अपह्नुतिरभीष्टस्य किञ्चिदन्तर्गतोपमा' इति । तत्रापह्नुत्यैव शोभा । यथा—

नेयं विरौति भृङ्गाली मदेन मुखरा मुहुः ।
अयमाकृष्यमाणस्य कन्दर्पधनुषो ध्वनिः ।। इति ।।

लोचन

'आक्षेपामध्ये' – 'सांगावी असे वाटत असलेली गोष्ट काही विशेष आशय प्रकट करण्याच्या इच्छेने वरकरणी नाकारणे, हा 'आक्षेप' अलंकार होय. निषेधाचा विषय (म्हणजे जो विषय बोलून दाखवणे नाकारावयाचे आहे, तो) अजून सांगावयाचा असतानाच तो सांगण्याचे नाकारणे, किंवा तो सांगून झाल्यावर त्याविषयी 'मी काही सांगणार नाही' अशासारखे बोलणे, यामुळे त्या आक्षेपाचे दोन प्रकार होतात.

त्यांपैकी पहिल्या प्रकाराचे उदाहरण– 'तुला पाहावयास आतुर असलेल्या मला तू एक क्षणभर जरी दिसला नाहीस, तरी... इतकेच राहू दे. याहून वेगळे, तुला अप्रिय वाटेल असे बोलण्याची काय गरज आहे ?[८]

निषेध हे स्वरूप असणारा आक्षेप वरील उदाहरणात 'वक्ष्यमाण-विषय' आहे, कारण येथे 'मरण' हा विषय 'वक्ष्यमाण' म्हणजे अद्यापि सांगावयाचा आहे. तो सांगण्यापूर्वीच सांगण्याचा निषेध केला आहे. या उदाहरणात 'इतकेच राहू दे' हे येवढेच (शब्द) 'मी नक्कीच मरणार' असे सुचविणारे असून ते शब्दच सौन्दर्य निर्माण करणारे आहेत. म्हणूनच ('मी मरणार' ह्या) सुचविलेल्या अर्थानें अलंकृत झालेला ('इतकेच राहू दे' या) शब्दांचा सूचक वाच्यार्थच येथे मुख्य आहे (आणि व्यंग्यार्थ हा गौण आहे.)

ज्याचा निषेध करावयाचा, तो विषय सांगून झाल्यावर मग त्यासंबंधी काही सांगावयाचे नाकारणे या प्रकारच्या 'आक्षेपा'चें उदाहरण जसे माझाच पुढील श्लोक–

'अरे, अरे ! पान्था ! तू असा एकाएकी कोमळून काय पडला आहेस ?' 'खाली पडण्याशिवाय मी दुसरे काय करणार बाबा ? मी आत्यंतिक तहानेने व्याकुळ झालेला असताना हा निष्ठुर (वालुकामय प्रदेश) माझ्यापासून पाणी दडवून ठेवीत आहे !' 'अरे, भलत्याच

ठिकाणी उत्पन्न झालेल्या आणि नको त्या वेळी सहज उपस्थित होणाऱ्या तहानेबर तू रागाव, परंतु त्या बाळवंटामधील मार्गाचा (दुष्टपणाचा) असाधारण मोठेपणा[९] तर त्रैलोक्यातही प्रसिद्ध आहे ! '

या उदाहरणात कोणी एक सेवक सेवा करावयासाठी एका मालकाकडे गेला आहे. 'या मालकापासून मिळावयाचे असलेले (धन इ.) मला काय म्हणून मिळत नाही ? ' अशा प्रकारच्या खोट्या आशेमुळे त्याचे हृदय विदीर्ण होत आहे. (त्या मालकाचा अनुभव असलेल्या) कोणाकडून तरी तो सेवक वरील श्लोकातील निषेधाच्या द्वारे जागा केला जात आहे. या उदाहरणात पर्यवसानी शांत रस असून 'निर्वेद' हा त्याचा स्थायिभाव आहे. सूचित निषेधस्वरूपी आक्षेपाने विशिष्ट असलेला, दुष्ट माणसाच्या सेवेचा निष्फळपणा, त्यामुळे उत्पन्न झालेली खिन्नता इ. सुचविणारा (वाटसरू, बाळवंट, इ.) वाच्यार्थच शांत रसाचा स्थायिभाव असलेल्या निर्वेदाच्या विभाव–अनुभावांमध्ये परिणत होत असल्याने तो वाच्यार्थच सौंदर्य निर्माण करणारा आहे.[१०]

पण वामनाने आक्षेपाचे लक्षण 'उपमानाचा आक्षेप (म्हणजे तिरस्कार)' असे केले आहे.[११] उपमानाचा, म्हणजे चन्द्र इत्यादींचा तिरस्कार 'हे (म्हणजे उपमेय) असल्याबर तुझी (म्हणजे उपमानाची) काय गरज ? ' या प्रकारचा. उदा. 'तिचे ते प्रसन्न, मोह पाडणारे मुख असताना[१२] पौर्णिमेच्या चंद्राची काय गरज आहे ? तसेच सौन्दर्याचे निधान असलेले तिचे डोळे जर असतील, तर त्या सुप्रसिद्ध निळ्या कमळांची काय आवश्यकता ? किंवा तिचा तो अधरोष्ठ असताना सौम्य तजेला धारण करणारे पल्लव तरी कशाला हवेत ? अरेरे, पुनरुक्त म्हणजे अनावश्यक वस्तु निर्मिण्याविषयीचा विधात्याचा सोस अजब खराच ! '

या उदाहरणात व्यंग्य असलेला 'साम्य' हा आशय वाच्यार्थाचीच शोभा वाढविणारा आहे. 'त्याच्याशी (म्हणजे उपमानाशी) काय करावयाचे आहे ?' अशा प्रकारे उपमानाची हेटाळणी या स्वरूपाचा वाच्य आक्षेप हा अलंकार हाच सौंदर्यप्रतीतीचे कारण होय, किंवा आक्षेप अलंकार म्हणजे वाच्यार्थाच्या सामर्थ्याने उपमान खेचून आणणे, म्हणजे उपमान 'सूचित' करणे.[१३] उदा. नुकत्याच

उमटविलेल्या नखक्षताप्रमाणे शोभणारे इंद्रधनुष्य शुभ्र 'पयोधरा'-वर (१ मेघावर २. स्तनावर) धारण करणारी 'शरद्' ही 'सकलंक' (१. काळ्या डागाने युक्त २. दुराचारी) चंद्राला प्रसन्न (१. उज्ज्वल कांतीने युक्त २. संतुष्ट) करू लागली आणि (त्यामुळे) सूर्याचा ताप (१. उष्णता, २. मनस्ताप) अधिकच वाढू लागली.'

या उदाहरणात 'मत्सराने जळणारा एक नायक' हे उपमान सुचविलेले असले, तरी ते वाच्यार्थालाच अलंकृत करणारे असल्यामुळे ही तर 'समासोक्ति'च आहे.[१४] तेच[१५] (वृत्तिकार) 'अधिक सुंदर' इ. वाक्याने सांगतात. याच मुद्द्याच्या स्पष्टीकरणासाठी वृत्तिकार '(संध्या ही) अनुरागाने निर्भर-' इ. प्रसिद्ध उदाहरण देतात. म्हणून (म्हणजे वाच्यार्थ व व्यंग्यार्थ या दोहोंमध्ये प्रधान कोणता इ. सिद्धान्ताच्या स्पष्टीकरणार्थ हे उदाहरण पुढे केले असल्यामुळे) आक्षेपाच्या विषयाचे विवेचन करण्याचे काम अजून चालूच आहे असे समजावे. त्याचे (म्हणजे आक्षेपाचे) विवेचन चालू असताना वृत्तीमधील त्या (म्ह. प्रधान कोणता इ.) सिद्धांताच्या समर्थनासाठी उदाहरण म्हणून हा समासोक्तीचाच श्लोक दिला गेला.[१६] 'किती आश्चर्यकारक दैव-घटना इ. :– समागम होत नाही या (आश्चर्यकारक घटनेचे) कारण वडील माणसांवर अवलंबून असणे, वगैरे अडचणी. त्यालाच म्हणजे वाच्यार्थालाच (प्राधान्य देण्याची इच्छा) हा आशय. वामनाच्या मते हे उदाहरण 'आक्षेप'अलंकाराचे, पण भामहाच्या मतानुसार समासोक्तीचे, ही परिस्थिती लक्षात घेऊन दोन्ही अलंकार ज्यात संभवतात असे वृत्तिकाराने एकच उदाहरण दिले. आणि अशा रीतीने समासोक्ति असो, नाहीतर आक्षेप असो, त्याच्याशी आम्हाला काय करावयाचे आहे? अशा अलंकारांमध्ये सर्वत्र (अवान्तर वस्तुरूप किंवा अलंकाररूप) व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाला दुय्यम असतो हेच आम्हाला सिद्ध करावयाचे आहे. हाच आशय येथे वृत्तिकारांना अभिप्रेत आहे, असे आमच्या गुरूंनी सांगितले आहे.

याप्रमाणे वाच्य व व्यंग्य अर्थांमध्ये कवीला प्रधान म्हणून कोणता अभिप्रेत असतो हे सांगण्यासाठी 'संध्या ही...' इ. उदाहरण दिल्या-वर काव्यप्रकाराला नावसुद्धा त्या काव्यातील वाच्य व व्यङ्ग्य अर्थांपैकी

प्रधान कोणता यावरूनच दिले आहे.[१७] या बाबतीत आपल्याला (म्हणजे ध्वनिवाद्यांना) व इतरांनाही मान्य होण्यासारखा दाखला (वृत्तिकार) 'आणि ज्याप्रमाणे–' इ. वाक्याने देतात. उपमेची म्हणजे उपमान–उपमेय–संबंधाची. तिचे म्हणजे उपमेचे (नाव). उदा. दीपकाच्या बाबतीत व्याख्या पुढीलप्रमाणे केलेली आहे —

साधारणधर्म वाक्यात प्रारंभी असणे, मध्ये असणे किंवा शेवटी असणे यामुळे 'दीपक' तीन प्रकारचे होते.[१८]

'सहाणेवर घासून पैलू पाडलेले रत्न,[१९] शस्त्रांनी घायाळ झालेला पण युद्धात विजयी झालेला योद्धा, केवळ एकच कला शिल्लक राहिलेला (कृष्णचतुर्दशीचा) चंद्र, रतिक्रीडेचे वेळी सवीस रगडले गेलेली नवयौवना, मदावस्थेने रोड झालेला हत्ती, शरद ऋतूमध्ये पात्र काहीसे कोरडे पडलेली नदी आणि याचकांना दान देऊन निष्कांचन झालेले (बाणदत्तासारखे) पुरुष, (हे सर्वजण आपल्याला आलेल्या) कृशपणामुळे अधिकच खुलून दिसतात.

या पद्याला 'दीपना'मुळेच[२०] सौंदर्य प्राप्त झालेले आहे. 'जिच्यामध्ये वर्ण्य विषयाचा निषेध केलेला असून जिच्या पोटात काही प्रमाणात[२१] साम्य दडलेले असते' असे अपह्नुतीचे लक्षण.[२२] हिच्या उदाहरणात शोभा उत्पन्न होते, ती (उपमेयाच्या) निषेधामुळेच. उदा. 'हा आनंदाच्या धुंदीमुळे पुन: पुन: वाचाळ होणाऱ्या भ्रमरतींचा गुंजारव नाही. ज्याची प्रत्यंचा (कानापर्यंत) खेचली जात आहे, अशा मदन-धनूचा हा टणत्कार आहे[२३]'

टीपा

१. काही सांगायचे आहे, पण ते सांगणे अधिक परिणामकारक व्हावे म्हणून 'पण नाहीच सांगत' किंवा 'सांगून काय करायचे आहे?' असे निषेधस्वरूपाचे वाक्य वक्ता म्हणतो. अशा ठिकाणी आक्षेप हा अलंकार होतो. उदा. भव-भूतीच्या 'उत्तररामचरित' नाटकात वासंती ही वनदेवता सीतात्यागानंतर काही काळाने दण्डकारण्यात आलेल्या रामाला म्हणते– 'तू माझे जीवित आहेस. तू माझे दुसरे हृदय आहेस, तू माझ्या डोळ्यांना चन्द्रिकेप्रमाणे व माझ्या गात्रांना अमृताप्रमाणे सुखवणारा आहेस, अशा तऱ्हेच्या शेकडो गोड गोड वचनांनी त्या सरळ स्वभावाच्या सीतेला पूर्वी तू प्रसन्न केलेस. पण

पुढे तिलाच ... किंवा बस्स झाले. या बाबतीत आणखी बोलून काय फायदा ?' (उत्तररामचरित, ३-२६)

'या उदाहरणात ( पण पुढे तिलाच ) तू टाकलेस' हे न सांगता सुचवले आहे, पण त्या सूचित अर्थापेक्षा 'अधिक बोलून काय उपयोग' ? असे म्हणून ते प्रत्यक्ष न सांगण्यानेच अधिक परिणाम होतो, म्हणून अधिक परिणामकारक असलेला वाच्यार्थच येथे व्यंग्यार्थापेक्षा अधिक रम्य होय.

२. मूळ वृत्तीत 'आक्षेपोक्ति' असा शब्द आहे. त्याचा अनुवाद वर 'आक्षेपाच्या निषेध या स्वरूपावरून' असा केला आहे. जर्मन संस्कृत पंडित याकोबी आक्षेपोक्ति (अलंकाराचे) आक्षेप हे नाव.' असा अनुवाद करतो. आक्षेप = निषेध. निषेध हा या अलंकारात वाच्यार्थ असतो. ते नाव या अलंकाराला दिले, म्हणून तो (निषेध किंवा आक्षेप) या अलंकारात मुख्य समजावयाचा. (**प्राधान्येन व्यपदेशाः भवन्ति**)

३. पाहा—उद्द्योत २, कारिका ३०.

४. या उदाहरणात द्व्यर्थी विशेषणे वापरून नायक-नायिका—व्यवहार सूचित केला असल्याने 'समासोक्ति' अलंकार आहे. म्हणून व्यंग्यार्थाने मंडित असा वाच्यार्थ, केवळ व्यंग्यार्थाहून अधिक सुंदर आहे. पृ.... वरील ३ री टीप पाहा. शिवाय 'कारणे घडली तरी कार्य घडत नाही' असे वर्णन असले, की, 'विशेषोक्ति' नावाचा अलंकार होतो तोही येथे 'तरीही त्यांचा समागम होत नाही' असे वर्णन असल्याने आहे. ती विशेषोक्ति येथे 'वाच्य' आहे, म्हणूनही वाच्यार्थ अधिक सुंदर व्हायला मदत झाली आहे. अशा रीतीने वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांपैकी जे अधिक सुंदर ते (या ठिकाणी वाच्यार्थच) प्रधान समजावयाचे. भामहाच्या मते या श्लोकात समासोक्ति असली, तरी वामन हा समासोक्तीलाच 'आक्षेप' (अर्थसामर्थ्याने उपमानाचे चित्र खेचून आणणे) म्हणतो. पण वरील उदाहरणात समासोक्ती असो की आक्षेप असो, प्रस्तुत ठिकाणी मुद्दा इतकाच की, यासारख्या अलंकारांमध्ये व्यंग्यार्थ असला, तरी तो वाच्यार्थाहून गौण असतो येवढेच आम्हाला सिद्ध करावयाचे आहे, असे अभिनवगुप्त म्हणतात.

५. अनेक गोष्टींमध्ये (त्यांपैकी काही प्रस्तुत असतात आणि काही अप्रस्तुत असतात) असणाऱ्या साधारण धर्माचा एकदाच उल्लेख करून त्याचा त्या अनेक गोष्टींशी संबंध जोडला असल्यास तेथे 'दीपक' अलंकार होतो. दीपकात साम्य म्हणजे उपमा व्यंग्य असली, तरी ती गौण असते. कवि त्या अलंकाराची दीपक म्हणूनच मांडणी करतो. म्हणून येथेही वाच्यच व्यंग्याहून प्रधान असते. (उद्द्योत २, कारिका २७ नंतरचे 'चंद्रकिरण रात्रीचे...' इ.

उदाहरण व त्यावरील टीप पाहा.)

६. 'मुख हे मुख नाही, कमलच आहे' असे वर्णन असल्यास तेथे अपह्नुति अलंकार होतो. असे वर्णन करणेदेखील मुख व कमल यांतील साम्यामुळेच शक्य होत असल्याने येथेही उपमा व्यंग्य असतेच. पण कवि उपमेसारखी मांडणी न करिता ती अपह्नुतीच्या स्वरूपातच करतो, म्हणून त्यालाही तेथे अपह्नुतीच प्रधान म्हणून विवक्षित आहे, उपमा नाही. म्हणून येथेही वाच्यार्थ हा व्यंग्यार्थाहून मुख्य होय.

७. भामह, काव्यालंकार, २–६७ व ६८.

८. भामह, काव्यालंकार, २–६९.

९. 'असाधारण मोठेपणा' हे शब्द येथे अर्थातच–उपरोधात्मक आहेत.

१०. 'अरे, अरे पान्था!'......इ. श्लोकाचे अभिनवगुप्तांनी केलेले विवरण वाचकाला संभ्रमात टाकणारे आहे. खरे म्हटले, तर हे उदाहरण अप्रस्तुत-प्रशंसेचे वाटते, आक्षेपाचे वाटत नाही. तरीही अभिनवगुप्तांनी हा स्वतःचा श्लोक आक्षेपाचे उदाहरण म्हणून पुढे केला आहे. आक्षेप अलंकारामध्ये वक्त्याला जे सांगावे असे वाटत असते, त्या गोष्टीचा निषेध 'वाच्य' असतो. तो निषेध खराखुरा निषेध नसून केवळ वरपांगी असतो. तरीही असा निषेध करण्यामागील हेतु, जे सांगण्याची इच्छा असते ते अधिक वैशिष्टयपूर्ण म्हणजे परिणामकारक व्हावे असा असतो.

पण प्रस्तुत उदाहरणात कोठेही 'वाच्य' निषेधच नाही. 'तृष्णेवर रागाव' यातून वाळवंटावर रागावू नकोस' असा निषेध — स्वरूपी अर्थ निघू शकतो, पण तो निषेध वाच्य नसून गर्भित आहे. शिवाय तो निषेध बोलणाराला जे सांगावयाची इच्छा आहे, त्याचा नाही. कारण पांथाने वाळवंटावर राग न धरणे हेच वक्त्याला इष्ट आहे. वाच्य निषेधच जेथे नाही, तेथे त्यामुळे सांगावयाचा विषय अधिक परिणामकारक होण्याचा प्रश्नच उत्पन्न होत नाही.

आक्षेपाची जी लक्षणे सांगितली, त्यांच्याशी पूर्णपणे जुळणारे 'उक्त-विषय' प्रकाराचे उदाहरण अभिनवगुप्तांना आपल्या पूर्वीच्या ग्रंथात न आढळल्यामुळे त्यांनी वरील स्वकृत उदाहरण पुढे केले असावे. पण ते 'आक्षेपा'च्या लक्षणांशी जुळणारे कसे नाही याचे स्पष्टीकरण वर केलेच आहे.

११. पाहा, वामन, काव्यालंकारसूत्रवृत्ति, ४–३–२७ व त्यावरील वृत्ति. वामनाच्या आक्षेपाचा हा प्रकार म्हणजे मम्मटादि आलंकारिकांच्या 'प्रतीप' अलंकाराचा पहिला प्रकार होय.

१२. हे उदाहरण, वरील (४–३–२७) या सूत्रानंतर वामनानेच उद्धृत केले आहे. मात्र तेथे २ ऱ्या ओळीतील तैः ऐवजी ते असा पाठ आहे.

१३. म्हणजे वामनाने 'आक्षेप' या शब्दाचे (१) तिरस्कार व (२) सूचन असे दोन अर्थ मानून 'आक्षेप' या अलंकाराचे दोन प्रकार केले आहेत.

१४. येथे शरदृतूमध्ये चंद्राला वेगळीच कांति प्राप्त होते व सूर्याची उष्णता अधिक वाढते हा प्रस्तुत, वाच्य अर्थ आहे व नायिकेने उपपतीचा अनुनय केल्यामुळे नायक मत्सराने जळतो, हा अप्रस्तुत, व्यंग्य अर्थ आहे. 'शरद्' हा शब्द संस्कृतात स्त्रीलिंगी असल्यामुळेच त्या शब्दावरून (स्वैरिणी) नायिका हे उपमान सूचित होते. चंद्र व सूर्य हे शब्द पुल्लिंगी असल्यामुळे त्यांवरून अनुक्रमे नायक आणि प्रतिनायक या उपमानांचा सूचना होते असे वामनाचे मत. परंतु येथे चंद्राला 'सकलंक' हे विशेषण दिलेले असल्यामुळे त्याला उपपति व सूर्याला पति मानणे अधिक उचित होईलसे वाटते. या ठिकाणी नायिका इत्यादींना वामनाने 'उपमाने' म्हटले आहे. म्हणजे त्याच्या मते येथे उपमानोपमेयसंबंध सूचित होतो. अभिनवगुप्त व इतर आलंकारिक या श्लोकाला समासोक्तीचे उदाहरण मानितात. पण तसे मानण्यास 'नखक्षताप्रमाणे' यातील 'प्रमाणे' या औपम्यवाचक शब्दाची अडचण होते. म्हणून या श्लोकात...समासोक्ति नसून एकदेशविवर्तिनी उपमा आहे असे विश्वनाथ म्हणतो (पाहा, साहित्यदर्पण, १०–५६ वरील वृत्ति).

१५. 'तेच' म्हणजे जो अधिक सुंदर तो प्रधान व जो कमी सुंदर तो गौण, हा मुद्दा

१६. 'संध्या ही'...इ. श्लोकात 'समासोक्ति' अलंकार आहे. समासोक्तीबद्दलचे विवेचन मागेच संपून आता आक्षेपाचे विवेचन चालू असताना त्या विवेचनात पुन्हा समासोक्तीचा श्लोक कशाला दिला? तो अनवधानाने तर दिला गेला नाही? या शंकेचे उत्तर असे :– हा श्लोक येथे समासोक्तीचे उदाहरण म्हणून दिलेला नसून तो केवळ वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यात प्रधान कोणता... इ. सिद्धांताला बळकटी आणण्यासाठी दिला आहे. हा सिद्धांत आक्षेपाचे विवेचन चालू असताना दिला असल्याने त्या सिद्धांताचे स्पष्टीकरण संपे-पर्यंत 'आक्षेपा'चे विवेचन चालूच आहे

१७. तुल्यार्थ–प्राधान्येन व्यपदेशाः भवन्ति। (म्हणजे एखाद्या गोष्टीला नाव दिले जाते, ते तीमध्ये प्रधान काय यावर दिले जाते)–हा न्याय.

१८. भामह, काव्यालंकार, २–२५.

१९. भर्तृहरि, नीतिशतक, ४४.

२०. 'दीपन' म्हणजे गुणरूप किंवा क्रियारूप साधारण धर्माचा एकदाच उल्लेख करून त्याचा अनेक धर्मींशी संबंध जोडणे. वरील 'सहाणेवर'...इ. उदाहरणात 'कृशपणामुळे शोभतात' या धर्माचा एकदाच उल्लेख करून त्याचा रत्न, योद्धा, चंद्र इ. अनेक धर्मींशी संबंध जोडला आहे. हे दीपन जरी व्यंग्य

असलेल्या साम्यावर आधारलेले असले, तरी येथे सौंदर्य दीपनातच आहे, साम्यात नाही. पृ. १९०, ५ वी टीप पाहा.

२१. काही प्रमाणात म्हणजे अगदी स्पष्टपणे, किंवा वाच्यतेने नव्हे, तर 'सूचन' या स्वरूपात. पुढे (काशी आवृत्ति, पृ. २४० वर 'लोचना'त) अभिनवगुप्तांनी अल्पीभवनं हि सूचनमेव। असा अल्पीभवनम् चा अर्थ केला आहे.

२२. भामह, काव्यालंकार, ३–२१. शिवाय पाहा, वरील पृ. १९१ वरील ६ वी टीप. अपह्नुति ही साम्यावर आधारलेली असावी, हा विचार प्रथम भामहानेच मांडलेला दिसतो, व तीच कल्पना सर्व आलंकारिकांनी स्वीकारली आहे. दण्डीच्या मते मात्र अपह्नुति ही साम्यावरच आधारलेली असावी अशी आवश्यकता नाही. पाहा, दण्डी, काव्यादर्श, २–३०४ ते ३०८.

२३. भामह, काव्यालङ्कार, ३–२२ येथे 'भृंगततीचा गुंजारव मदनाच्या धनुष्याच्या टणत्कारासारखा आहे' अशी उपमा व्यंग्य असली तरी या पद्यात 'हा भृंगततीचा गुंजारव नव्हे' या वाच्य निषेधातच सौंदर्य आहे.

ध्वन्यालोकः

अनुक्तनिमित्तायामपि विशेषोक्तौ–

आहूतोऽपि सहायैरोमित्युक्त्वा विमुक्तनिद्रोऽपि।

गन्तुमना अपि पथिकः सङ्कोचं नैव शिथिलयति॥

इत्यादौ व्यङ्ग्यस्य प्रकरणसामर्थ्यात्प्रतीतिमात्रं न तु तत्प्रतीतिनिमित्ता काचिच्चारुत्वनिष्पत्तिरिति न प्राधान्यम्। पर्यायोक्तेऽपि यदि प्राधान्येन व्यङ्ग्यत्वं तद्भवतु नाम तस्य ध्वनावन्तर्भावः। न तु ध्वनेस्तत्रान्तर्भावः। तस्य महाविषयत्वेनाङ्गित्वेन च प्रतिपादयिष्यमाणत्वात्। न पुनः पर्यायोक्ते भामहोदाहृतसदृशे व्यङ्ग्यस्यैव प्राधान्यम्। वाच्यस्य तत्रोपसर्जनीभावेनाविवक्षितत्वात्*

अपह्नुतिदीपकयोः पुनर्वाच्यस्य प्राधान्यं व्यङ्ग्यस्य चानुयायित्वं प्रसिद्धमेव।

---

* ध्वन्यालोकाच्या काशी संस्करणामध्ये उपसर्जनाभावेन असा पाठ आहे, तो मुद्रणदोष वाटतो.

अनुक्तनिमित्त विशेषोक्तीमध्ये देखील —

"सोबत्यांनी ('चल' म्हणून) हाक मारली, (त्यांना) त्याने 'होय' असे म्हटले, त्याची झोप संपली आहे, आणि त्याला जाण्याची इच्छाही आहे, तरीदेखील प्रवासी आपली आखडलेली गात्रे शिथिल करीत नाही."

या ठिकाणी संदर्भामुळे व्यंग्यार्थाची केवळ प्रतीति[१] होते, पण ती प्रतीति झाल्याने काही सौंदर्यनिर्मिति होत नाही, म्हणून व्यंग्यार्थाला येथे प्राधान्य नाही.

'पर्यायोक्त'[२] अलंकारातही जर (काही उदाहरणांत) व्यंग्यार्थाचे प्राधान्य असेल, तर ती उदाहरणे ध्वनीची समजण्यास आमची काही हरकत नाही; पण ध्वनीचा मात्र पर्यायोक्तात अन्तर्भाव होणार नाही (म्हणजे व्यंग्यार्थ-प्रधान असलेली उदाहरणे पर्यायोक्ताची मानणे शक्य नाही), कारण, ध्वनीचे क्षेत्र (पर्यायोक्तापेक्षा) फार मोठे आहे व तो ध्वनि 'अंगी' असतो असे आम्ही पुढे[३] सांगणार आहोत. आणि शिवाय भामहाने उदाहरण दिले, तसल्या पर्यायोक्त अलंकारात[४] व्यंग्यार्थाचे प्राधान्य नसतेच. कारण तेथे वाच्यार्थाला गौणत्व देण्याची कवीची इच्छा नसते. अपह्नुति व दीपक यांमध्ये तर वाच्यार्थाचे प्राधान्य आणि व्यंग्यार्थाचे अनुयायित्व (म्हणजे उपकारकत्व किंवा अंगत्व) सुप्रसिद्धच आहे.[५]

## लोचनम्

एवमाक्षेपं विचार्योद्देशक्रमेणैव प्रमेयान्तरमाह— अनुक्तनिमित्तायामिति ।

एकदेशस्य विगमे या गुणान्तरसंस्तुतिः ।
विशेषप्रथनायासौ विशेषोक्तिरिति स्मृता ॥

यथा—

स एकस्त्रीणि जयति जगन्ति कुसुमायुधः ।
हरतापि तनुं यस्य शम्भुना न हृतं बलम् ॥

इयं चाचिन्त्यनिमित्तेति नास्यां व्यङ्ग्यस्य सद्भावः । उक्तनिमित्तायामपि वस्तुस्वभावमात्रत्वे पर्यवसानमिति तत्रापि न व्यङ्ग्यसद्भावशङ्का । यथा—

कर्पूर इव दग्धोऽपि शक्तिमान् यो जने जने।
नमोऽस्त्ववार्यवीर्याय तस्मै कुसुमधन्वने ।।

तेन प्रकारद्वयमवधोर्य तृतीयं प्रकारमाशङ्कते। अनुक्तनिमित्तायामपीति । व्यङ्ग्यस्येति । शीतकृता खल्वार्तिरत्र निमित्तमिति भट्टोद्भटः, तदभिप्रायेणाह—न त्वत्र काचिच्चारुत्वनिष्पत्तिरिति । यत्तु रसिकैरपि निमित्तं कल्पितम् – 'कान्तासमागमे गमनादपि लघुतरमुपायं स्वप्नं मन्यमानो निद्रागमबुद्ध्या सङ्कोचं नात्यजत्' इति, तदपि निमित्तं चारुत्वहेतुतया नालङ्कारविद्भिः कल्पितम्, अपि तु विशेषोक्तिभाग एव न शिथिलयतीत्येवम्भूतोऽभिव्यज्यमाननिमित्तोपस्कृतश्चारुत्वहेतुः। अन्यथा तु विशेषोक्तिरेवेयं न भवेत्। एवमभिप्रायद्वयमपि साधारणोक्त्या ग्रन्थकृन्न्यरूपयन्न त्वौद्भटेनैवाभिप्रायेण ग्रन्थो व्यवस्थित इति मन्तव्यम्। पर्यायोक्तेऽपीति ।

पर्यायोक्तं यदन्येन प्रकारेणाभिधीयते ।
वाच्यवाचकवृत्तिभ्यां शून्येनावगमात्मना ।।
इति लक्षणम् । यथा –
शत्रुच्छेददृढेच्छस्य मुनेरुत्पथगामिनः ।
रामस्यानेन धनुषा देशिता धर्मदेशना ।। इति ।

अत्र भीष्मस्य भार्गवप्रभावाभिभावी प्रभाव इति यद्यपि प्रतीयते, तथापि तत्सहायेन देशिता धर्मदेशनेत्यभिधीयमानेनैव काव्यार्थोऽलंकृतः। अत एव पर्यायेण प्रकारान्तरेणावगमात्मना व्यङ्ग्येनोपलक्षितं सद्यदभिधीयते तदभिधीयमानमुक्तमेव सत्पर्यायोक्तमित्यभिधीयत इति लक्षणपदम्, पर्यायोक्तमिति लक्ष्यपदम्, अर्थालङ्कारत्वं सामान्यलक्षणं चेति सर्वं युज्यते । यदि त्वभिधीयत इत्यस्य बलाद्व्याख्यानमभिधीयते प्रतीयते प्रधानतयेति, उदाहरणं च 'भम धम्मिअ' इत्यादि, तदालङ्कारत्वमेव दूरे सम्पन्नमात्मतायां पर्यवसानात्। तदा चालङ्कारमध्ये गणना न कार्या। भेदान्तराणि चास्य वक्तव्यानि। तदाह—यदि प्राधान्येनेति । ध्वनाविति। आत्मन्यन्तर्भावादात्मैवासौ नालङ्कारः स्यादित्यर्थः। तत्रेति। यादृशोऽलङ्कारत्वेन विवक्षितस्तादृशे ध्वनिर्नान्तर्भवति, न तादृगस्माभिर्ध्वनिरुक्तः। ध्वनिर्हि महाविषयः सर्वत्र भावाद्व्यापकः समस्तप्रतिष्ठास्थानत्वाच्चाङ्गी। न चालङ्कारो व्यापकोऽन्यालङ्कारवत्। न चाङ्गी

अलङ्कार्यतन्त्रत्वात्। अथ व्यापकत्वाङ्गित्वे तस्योपगम्येते, त्यज्यते चालङ्कारता, तर्ह्यात्मनय एवायमवलम्ब्यते केवलं मात्सर्यग्रहात्पर्यायोक्तवाचेति भावः। न चेयदपि प्राक्तनैर्दृष्टमपि त्वस्माभिरेवोन्मीलितमिति दर्शयति—न पुनरिति। भामहस्य यादृक्तदीयं रूपमभिमतं तादृगुदाहरणेन दर्शितम्। तत्रापि नैव व्यङ्ग्यस्य प्राधान्यं चारुत्वाहेतुत्वात्। तेन तदनुसारितया तत्सदृशं यदुदाहरणान्तरमपि कल्प्यते, तत्र नैव व्यङ्ग्यस्य प्राधान्यमिति सङ्गतिः।

यदि तु तदुक्तमुदाहरणमनादृत्य 'भम धम्मिअ' इत्याद्युदाह्रियते, तदस्मच्छिष्यतैव। केवलं तु नयमनवलम्ब्यापश्रवणेनात्मसंस्कार इत्यनार्यचेष्टितम्। यदाहुरैतिहासिकाः— 'अवज्ञयाप्यवच्छाद्य शृण्वन्नरकमृच्छति' इति। भामहेन ह्युदाहृतम्—

गृहेष्वध्वसु वा नान्नं भुञ्ज्महे यदधीतिनः।

विप्रा न भुञ्जते' इति। एतद्धि भगवद्वासुदेववचनं पर्यायेण रसदानं निषेधति। यत् स एवाह— 'तच्च रसदाननिवृत्तये' इति। न चास्य रसदाननिषेधस्य व्यङ्ग्यस्य किञ्चिच्चारुत्वमस्ति, येन प्राधान्यं शङ्क्येत। अपि तु तद्व्यङ्ग्योपोद्बलितं विप्रभोजनेन विना यन्नभोजनं तदेवोक्तप्रकारेण पर्यायोक्तं सत्प्राकरणिकं भोजनार्थमलङ्कुरुते। न ह्यस्य निर्विषं भोजनं भवत्विति विवक्षितमिति पर्यायोक्तमलङ्कार एवेति चिरन्तनानामभिमत इति तात्पर्यम्। अपह्नुतिदीपकयोरिति। एतत्पूर्वमेव निर्णीतम्। अत एवाह— प्रसिद्धमिति। प्रतीतं प्रसाधितं प्रामाणिकं चेत्यर्थः। पूर्वं चैतदुपमादिव्यपदेशभाजनमेव तद्यथा न भवतीत्यमुया छायया दृष्टान्ततयोक्तमप्युद्देशक्रमपूरणाय ग्रन्थशय्यां योजयितुं पुनरप्युक्तं 'व्यङ्ग्यप्राधान्याभावान्न ध्वनिरि'ति छायान्तरेण वस्तु पुनरेकमेवोपमाया एव व्यङ्ग्यत्वेन ध्वनित्वाशङ्कनात्। यत्तु विवरणकृत्—दीपकस्य सर्वत्रोपमान्वयो नास्तीति बहुनोदाहरणप्रञ्चेन विचारितवांस्तदनुपयोगि निस्सारं सुप्रतिक्षेपं च।

मदो जनयति प्रीतिं सानङ्गं मानभञ्जनम्।

स प्रियासङ्गमोत्कण्ठां सासह्यां मनसः शुचम्॥ इति,

अत्राप्युत्तरोत्तरजन्यत्वेऽप्युपमानोपमेयभावस्य सुकल्पत्वात्। न हि क्रमिकाणां नोपमानोपमेयभावः। तथा हि—

राम इव दशरथोऽभूद्दशरथ इव रघुरजोऽपि रघुसदृशः ।
अज इव दिलीपवंशश्चित्रं रामस्य कीर्तिरियम् ।।

इति न न भवति । तस्मात्क्रमिकत्वं समं वा प्राकरणिकत्वमुपमां निरुणद्धीति कोऽयं त्रास इत्यलं गर्दभीदोहानुवर्तनेन ।

लोचन

याप्रमाणे 'आक्षेप' अलंकाराचा विचार करून झाल्यावर प्रस्तुत विषयाच्या (पूर्वी पृष्ठ १७५ वर ३ व ४ या ओळीत) निर्देशिलेल्या क्रमानुसार प्राप्त होणारा पुढच्या म्हणजे 'अनुक्तनिमित्त विशेषोक्ति' या विषयाचा निर्देश (वृत्तिकार) 'अनुक्तनिमित्त विशेषोक्तीमध्ये–देखील' या शब्दांनी करितात.

"काही विशेष आशय प्रत्ययास आणण्याच्या उद्देशाने जर 'कारणाचा अभाव असताही कार्य घडले,' असे वर्णन केलेले असले, तर तो 'विशेषोक्ति' अलंकार मानिला गेला आहे.[६] "

उदा.–

'तो पुष्पबाण मदन एकटा असूनही तिन्ही जगांवर प्रभुत्व गाजवितो. शंकराने त्याचे शरीर नष्ट केले, तरी त्याची शक्ति हिरावून घेतलेली नाही.'[७]

ही विशेषोक्ति 'अचिन्त्यनिमित्ता' असल्यामुळे तिच्यात व्यंग्यार्थाचे[८] अस्तित्व नाही. विशेषोक्तीच्या 'उक्तनिमित्ता' प्रकारामध्येही निसर्गक्रमामध्येच पर्यवसान होत असल्याने[९] तेथेही व्यंग्यार्थाच्या अस्तित्वाची शंकासुद्धा उपस्थित होत नाही. उदा–

'कापराप्रमाणे जळाला, तरी जो सर्व प्राणिमात्रांवर आपले वर्चस्व गाजवतो व ज्याच्या पराक्रमाला कोणीही अटकाव करू शकत नाही, अशा त्या पुष्पबाण मदनाला नमस्कार असो.'[१०]

असे असल्यामुळे विशेषोक्तीच्या वरील दोन्ही प्रकारांकडे दुर्लक्ष करून (वृत्तिकार)[११] फक्त तिसऱ्याच प्रकारात सुंदर व्यंग्यार्थ असू शकेल अशी पूर्वपक्षाची शंका कल्पून ती 'अनुक्तनिमित्त विशेषोक्तीमध्येदेखील'....इ. वाक्याने मांडून 'व्यंग्यार्थाची (केवळ प्रतीति होते)' इ. शब्दांनी त्या शंकेला उत्तर देत आहेत. 'थंडीमुळे होणारा त्रास हे या

ठिकाणी प्रवाशाने आपली गात्रे शिथिल न करण्याचे (खरे) कारण आहे' असे भट्टोद्भटाने म्हटले आहे. ते त्याचे म्हणणे[१२] विचारात घेऊन (वृत्तिकारांनी) म्हटले आहे– 'पण या निमित्तामध्ये कसलेही सौंदर्य भासत नाही.' आणि 'कांतेची भेट होण्यासाठी तिच्याकडे जाण्यापेक्षाही स्वप्न हाच शीघ्र उपाय आहे असे मानून तो प्रवासी झोप यावी या इच्छेने आपली आखडलेली गात्रे सैल सोडीत नाही' हे जे निमित्त काही रसिकांनी कल्पिले आहे, तेही निमित्त अलंकार-शास्त्रकारांनी सौंदर्यहेतु म्हणून मान्य केलेले नाही. तर सूचित होणाऱ्या निमित्ताने भूषित झालेला 'सैल सोडीत नाही' हा विशेषोक्तीचाच वाच्य भाग (मुख्य) सौंदर्यहेतु मानिला आहे. नाहीतर या अलंकाराची 'विशेषोक्ति' ही संज्ञाच सार्थ झाली नसती.[१३] अशा रीतीने ग्रंथ-कारांनी (म्हणजे वृत्तिकारांनी) उद्भटाच्या व रसिकांच्या—दोघांच्याही अभिप्रायांना अनुलक्षून (येथे संदर्भाच्या सामर्थ्याने व्यंग्यार्थ केवळ प्रत्ययास येतो, असे) निरूपण केले. केवळ उद्भटाच्या मताला अनुसरून वृत्तिकारांनी विवेचन केले, असे मानू नये.

'पर्यायोक्त अलंकारामध्ये सुद्धा—'

'जे सांगणे इष्ट आहे, ते निराळ्या प्रकाराने सांगितले गेले, तर तो 'पर्यायोक्त' अलंकार होय. 'निराळ्या प्रकाराने' म्हणजे जे सांगणे इष्ट, त्याचे वाचक शब्द न वापरता त्याचे व्यंजक शब्द वापरून[१४]" ही 'पर्यायोक्ताची व्याख्या होय. उदा.–

'शत्रूंचा उच्छेद करण्याचा दृढ निश्चय केलेल्या व म्हणूनच मुनीला न शोभणाऱ्या मार्गाने जाणाऱ्या परशुराम ऋषीला या (भीष्माच्या) धनुष्याने आपल्या कर्तव्याची शिकवण दिली (म्हणजे त्याला शस्त्रास्त्रांचा त्याग करून वनात निघून जावयास लावले.).' या श्लोकात भीष्माचा प्रभाव परशुरामाच्या प्रभावावर ताण करणारा आहे असे जरी सूचित होत असले, तरी त्या व्यंग्यार्थाच्या मदतीने 'योग्य मार्गाची शिकवण दिली' हा वाच्य अर्थच या श्लोकात मुख्य असणाऱ्या 'वीररसा'ला भूषवीत आहे. म्हणूनच 'पर्यायाने म्हणजे निराळ्या प्रकाराने (म्हणजे व्यंजनेने) ज्ञात करून दिलेल्या अशा व्यंग्यार्थाने विशिष्ट असलेले (म्हणजे भूषविलेले) असे जे वाचक

शब्दांनी सांगितले जाते, त्याला पर्यायोक्त म्हणतात' हे पर्यायोक्ताची विशिष्ट व्याख्या सांगणारे वाक्य होय. त्या व्याख्येतला 'पर्यायोक्त' हा शब्द ज्याची व्याख्या करावयाची, त्या अलङ्काराचा वाचक शब्द आहे. आणि अर्थालङ्कार असणे हे पर्यायोक्ताचे सामान्य लक्षण आहे. या सर्व गोष्टी आम्हाला अभिप्रेत असलेल्या पर्यायोक्ताच्या कल्पनेशी जुळणाऱ्या आहेत.[15] परंतु जर **अभिधीयते** म्हणजे 'सांगितले जाते' याचा अर्थ ओढाताण करून 'प्राधान्याने सुचविले जाते' असा लावला, आणि त्याचे उदाहरण जर 'हे धार्मिका ! तू हिंड...' इ. दिले, तर व्यंग्यार्थ हा तेथे काव्याचा आत्माच असल्याने तो 'अलंकार' होण्याचा प्रश्नच उत्पन्न होत नाही. आणि तसाच पर्यायोक्त तुम्हाला अभिप्रेत असला, तर पर्यायोक्ताची गणना तुम्ही अर्थालंकारांमध्ये करू नये आणि ह्याचे म्हणजे ह्या पर्यायोक्ताचे इतर अनेक प्रकारही[16] तुम्हाला सांगावे लागतील ! हाच आशय वृत्तिकारांनी 'जर (व्यंग्यार्थाचे) प्राधान्य,' 'ध्वनीच्या (उदाहरणात),' इत्यादि शब्दांनी सांगितला आहे. म्हणजे पर्यायोक्ताचा समावेश काव्याच्या आत्म्यामध्येच होत असल्याने तो आत्माच होईल, 'अलंकार' होणार नाही, असा आशय. त्यात (म्हणजे पर्यायोक्तात ध्वनीचा अन्तर्भाव होणार नाही ) – आम्हाला 'अलंकार' म्हणून ज्या तऱ्हेचा पर्यायोक्त अभिप्रेत आहे, त्या प्रकारच्या पर्यायोक्तात (व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाचा उपकारक म्हणून गौण असल्याने ) ध्वनीचा अन्तर्भाव होत नाही व तशा म्हणजे अलंकार असलेल्या व्यंग्यार्थाला आम्ही 'ध्वनि' अशी संज्ञाही दिलेली नाही. ध्वनीचे क्षेत्र खरोखर मोठे आहे, व तो सर्वत्र (म्हणजे पर्यायोक्त इ. अलंकार असतील तेथे व ते नसतील तेथेही) असल्याने व्यापक आहे. आणि गुण, अलंकार इत्यादींचा आधार ध्वनि हाच असल्यामुळे तो ध्वनि 'अंगी' म्हणजे मुख्यही आहे. आणि (काव्यातील) अलंकार हा काही व्यापक (म्हणजे सर्व काव्यांत आढळणारा) असत नाही, जसे (लौकिक व्यवहारांतील) अलंकार व्यापक (म्हणजे सर्वच मनुष्यांच्या अंगावर आढळणारे नसतात, त्याप्रमाणेच. किंवा अलंकार हा 'अंगी'ही असू शकत नाही, कारण तो (व्यंग्यार्थरूपी) 'अलंकार्या'वर म्हणजे ज्याला अलंकृत करावयाचे, त्यावर अवलंबून असतो. आता 'पर्यायोक्त'

(म्हणजे पर्यायोक्तातील व्यंग्यार्थ) हा तुम्ही व्यापक व अंगीही मानिला आणि त्याच्या ठिकाणी अलंकारत्व असते हा आग्रह तुम्ही सोडून दिला तर तुम्ही आमचीच विचारसरणी स्वीकारीत आहात. फक्त तुम्ही ध्वनिवाद्यांविषयीच्या मत्सरामुळे त्याला 'ध्वनि' हे नाव देण्याऐवजी 'पर्यायोक्त' हे नाव देत आहात, इतकेच. आणि हे इतके[१८] सुद्धा प्राचीनांच्या लक्षात आले नाही, तर आम्हीच (म्हणजे ध्वनिसिद्धान्त मांडणारांनीच) प्रकट केले, हे (वृत्तिकार) 'आणि शिवाय'...इ. शब्दांनी दाखवितात. भामहाला पर्यायोक्ताचे जे स्वरूप मान्य होते, ते त्याने दिलेल्या उदाहरणावरून[१९] स्पष्ट झाले आहे. तेथेही व्यंग्यअर्थ मुख्य नाहीच, कारण तो (स्वतः सुंदर नसल्याने) त्या उदाहरणातील सौंदर्याला कारणीभूत नाही.[२०] तेव्हा भामहाने दिलेल्या उदाहरणास अनुसरून पर्यायोक्ताचे आणखी कोणतेही उदाहरण कल्पिले, तरी त्या उदाहरणात व्यंग्यार्थ प्रधान नसतोच, असा एकंदर वृत्तिकारांच्या ह्या वाक्यातील युक्तिवाद आहे.[२१]

परंतु जर भामहांनी दिलेले (वेदाध्ययनसंपन्न इ.) उदाहरण बाजूला सारून 'हे धार्मिका !....इ. पद्य तुम्ही पर्यायोक्ताचे उदाहरण म्हणून दिले आणि अलंकार म्हणण्याचे सोडले, तर तुम्ही आमचेच शिष्यत्व पत्करलेत म्हणावयाचे. पण आमचेकडून गुरुमुखाने यथाशास्त्र उपदेश न घेता चोरून मारून ऐकून शिक्षण घ्यावयाचे, हे वागणे शिष्टाचाराला सोडून आहे. गुरु शिष्यपरंपरेचा इतिहास जाणणारांनी म्हटले आहे की–

'(विद्या व गुरु यांबद्दल) अनादराची भावना ठेवून चोरून शिकणाराही नरकाप्रत जातो.'

भामहाने पर्यायोक्ताचे पुढील उदाहरण दिले आहे–

'वेदाध्ययनसंपन्न ब्राह्मण जोपर्यंत अन्नसेवन करीत नाहीत, तोपर्यंत आम्हीही घरी काय, किंवा प्रवासात काय, भोजन करीत नाही'

हे भगवान श्रीकृष्णाचे बोलणे पर्यायाने म्हणजे आडवळणाने शिशुपालाकडून होणारा संभाव्य विषप्रयोग आम्ही टाळू इच्छितो, असे सुचवीत आहे. कारण लगेच भामहानेच म्हटले आहे–" हे श्रीकृष्णाचे

बोलणे (संभाव्य) विषप्रयोग टाळण्यासाठी आहे" आणि 'विषप्रयोग टाळणे' या व्यंग्यार्थात सौंदर्य मुळीच नाही, आणि म्हणून तो व्यंग्यार्थ या पद्यात मुख्य असेल, अशी शंकाही घेण्याचे कारण नाही. उलट, त्या व्यंग्यार्थाने पुष्ट म्हणजे अलंकृत झालेला, 'ब्राह्मण जेवल्यावाचून आम्ही जेवीत नाही' हा जो वाच्यार्थ, तोच वर (पृ. २०० वर) सांगितलेल्या पद्धतीने 'पर्यायोक्त' अलंकार होऊन प्रस्तुत जो 'वेदाध्ययनसंपन्न ब्राह्मणांनी खाल्ल्यानंतर उरलेले अन्नच आम्ही सेवन करतो,' हा अर्थ,[२२] त्याला अलंकृत करितो. कारण 'आम्हाला विषरहित जेवण हवे आहे' असे शिशुपालाला सांगावे, हा काही श्रीकृष्णाचा वरील वाक्य बोलण्यातील मुख्य हेतु नाही. तेव्हा अशा रीतीने व्यंग्यार्थ सुंदर नसल्याने आणि विवक्षितही नसल्याने 'पर्यायोक्त' हा अलंकार म्हणूनच प्राचीन आलंकारिकांना इष्ट आहे हे (वरील सर्व विवेचनाचे) तात्पर्य.

'अपह्नुति आणि दीपक यांमध्ये' इ. –याचे (म्हणजे वाच्यार्थाचे प्राधान्य व व्यंग्यार्थाचे अंगत्व याचे) पूर्वीच (पृ. १८९ वर दृष्टान्त म्हणून) विवरण केले. म्हणूनच (वृत्तिकार) 'प्रसिद्धच आहे' असे म्हणतात. 'प्रसिद्ध' याचा सर्वांना ज्ञात असलेले, सिद्ध केलेले आणि बळकट पुराव्यावर आधारलेले[२५] असा अर्थ. याचा पूर्वी 'या (म्हणजे अपह्नुति व दीपक या) अलंकारांना उपमा वगैरे नावे देण्यात येत नाहीत.' अशा रीतीने अपह्नुति व दीपक या अलंकारांचा 'आक्षेप' अलंकाराच्या बाबतीत दृष्टान्त म्हणून जरी निर्देश केला होता, तरी पूर्वी वृत्तीत (पृ. १७५ वर) पर्यायोक्तानंतर अपह्नुति व दीपक यांचा उल्लेख केला होता. म्हणून तोच क्रम कायम ठेविला जाईल अशीच ग्रंथाची मांडणी करण्याच्या दृष्टीने त्या अलंकारांबद्दल 'या अलंकारांत व्यंग्यार्थाला प्राधान्य नसल्यामुळे हे अलंकार ध्वनीची उदाहरणे नाहीत' असे आता निराळ्या रीतीने पुन्हा सांगितले. पण दोन्ही ठिकाणी सांगावयाचा मुद्दा एकच आहे व तो म्हणजे या दोन्ही अलंकारांमध्ये उपमा हीच (गौणत्वाने) व्यंग्य असल्याने ह्या अलंकारात ध्वनीची शंकाही घेणे शक्य नाही, हाच होय.

पण 'विवरण'[२६] कारानं दीपक अलंकाराच्या सर्वच उदाहरणांमध्ये उपमेचा संबंध असतो असे नाही याचे खूप उदाहरणे देऊन

विवेचन केले आहे, ते प्रस्तुताला निरुपयोगी, सारहीन व ज्याचे सहज खंडन करिता येईल असे आहे. उदा.–

'उपभोगामुळे आनंद, आनंदामुळे मान विसरावयास लावणारा कामविकार, कामविकारामुळे प्रियेच्या सहवासाची ओढ व त्या ओढी-मुळे मनाला असह्य दुःख उत्पन्न होते.'

या उदाहरणातही जरी आधीआधीच्या गोष्टीपासून नंतर-नंतरची गोष्ट उत्पन्न होते अशी साखळीसारखी मांडणी केलेली असली, तरी त्यांमध्ये उपमान–उपमेय–संबंध म्हणजे मनोविकारजनकत्व हे साम्य कल्पिणे सहज शक्य आहे. एकामागून एक निर्दिष्ट केलेल्या, शृंखला-क्रमाने बांधलेल्या गोष्टींमध्ये उपमानोपमेयसंबंध म्हणजे साम्य नसते असे नाही. उदा.– 'दशरथ रामासारखाच, दशरथाप्रमाणेच रघु आणि अजही रघूसारखाच होता. अजाप्रमाणेच दिलीपाचा वंश होता. अशी रामाची कीर्ति (म्हणजे परंपरा) अद्भुत आहे.'

असे (साम्य)[२७] असू शकत नाही असे नाही. म्हणून (माला-दीपकाप्रमाणे) एकामागून एक साखळीप्रमाणे निर्देश केलेला असणे किंवा (कारकदीपक व तुल्ययोगिता यांप्रमाणे) सर्व गोष्टी सारख्याच 'प्रस्तुत' असणे यामुळे त्यांमध्ये औपम्य असण्याला बाध येतो ही भीती कोठून असणार? म्हणून हे गर्दभीची[२८] अधिक धार काढीत बसणे पुरे झाले!

टीपा

१. पृ. १९० वरील ४ या टीपेतील विशेषोक्तीचे लक्षण पाहा. इतकी कारणे घडली, तरी नेमक्या ज्या कारणामुळे कार्य घडत नाही (म्हणजे जे कारण कार्याला प्रतिबंधक असते), ते सांगितले नसले की, तो विशेषोक्तीचा 'अनुक्तनिमित्त' (निमित्त उक्त नसलेला) प्रकार होतो. (पण ते कारण सांगितले असल्यास तो विशेषोक्तीचा उक्तनिमित्त प्रकार होतो.)

२. 'पर्यायोक्त' अलंकार—
जे सुचवायचे, त्याचेच वाचक शब्द न वापरता ती गोष्ट दुसरे शब्द वापरून सुचवणे याला 'पर्यायोक्त' अलंकार म्हणतात. (पाहा, उद्द्योत २ रा, कारिका १९ नंतरचा 'ज्या (विष्णू) ने आपल्या चक्राला'... इ. श्लोक व त्यावरील टीप). कालिदासाच्या शाकुंतलाच्या ४ थ्या अंकात शकुंतलेची

एक सखी अनसूया दुष्यन्ताला विचारते—

' आपण कोणत्या राजर्षींचा वंश अलंकृत करिता आहात, कोणत्या देशच्या लोकांना आपण आपल्या विरहाने हुरहूर लावली ?'... वगैरे.

यात ' आपण कुठल्या घराण्यातले व कोणत्या देशचे ' असे विचारावयाचे आहे, ते व्यंग्य आहे. पण ते त्या अर्थाचे वाचक शब्द न वापरता दुसरे शब्द वापरून विचारले आहे. पण ज्या तऱ्हेने विचारले आहे ती तऱ्हा, म्हणजे वाच्यार्थच अधिक चमत्कृतिजनक वाटतो. जे सुचवले आहे, ते साधे व्यावहारिक आहे. म्हणून पर्यायोक्ताच्या पुष्कळ उदाहरणांत वाच्यार्थच अधिक सुंदर, अतएव प्रधान म्हणून विवक्षित असतो.

३. पाहा ध्वन्यालोक, काशी आवृत्ति, पृ. १३२, १३५ व ४४३.

४. " जे निराळ्या प्रकाराने म्हणजे सूचित होईल अशा रीतीने वर्णिले जाते, ते ' पर्यायोक्त ' होय " असे भामहाने (काव्यालंकार, ३–८ मध्ये) पर्यायोक्त अलंकाराचे लक्षण केले आहे. त्याचे उदाहरण म्हणून त्याने शिशुपालाला उद्देशून कृष्णाने म्हटलेले पुढील वाक्य दिले आहे–' जे अन्न वेदपारंगत ब्राह्मणांनी खाल्लेले नसते, ते अन्न आम्ही घरी किंवा मार्गात म्हणजे प्रवासात खात नाही. ' या वाक्यात ' कोणी विष घालून देऊ नये यासाठी असे अन्न आम्ही खात नाही ' असे सुचविले आहे. पण तो व्यंग्यार्थ सरळ न सांगता ज्या दुसऱ्या शब्दात सांगितला आहे, ते दुसरे शब्द म्हणजे ' अशा ब्राह्मणांनी जे खाल्लेले नाही ते आम्ही खात नाही ' हेच अधिक चमत्कृतिजनक आहे, म्हणून येथे वाच्यार्थच व्यंग्यार्थाहून सुन्दर अतएव प्रधान होय.

५. पृ. १९० व १९१ वरील ५ व ६ या टीपा पाहा.

६. भामह, काव्यालंकार, ३–२३. भामहाने विशेषोक्ती 'चे हे जे लक्षण केले आहे, ते ' विभावने ' च्या लक्षणासारखेच ' वाटते. ' कारणाच्या अभावी कार्य घडते अशा वर्णनाला विशेषोक्ति म्हणावे ' हा त्याच्या विशेषोक्तीच्या लक्षणाचा आशय आणि विभावनेच्या त्याने केलेल्या लक्षणाचा आशय आणि अर्थही तोच आहे !

७. भामह, काव्यालंकार, ३–२४. भामहाने विशेषोक्तीचे दिलेले हे उदाहरण मात्र त्याच्या विशेषोक्तीच्या लक्षणाशी जुळणारे नसून नंतरच्या विशेषोक्तीच्या लक्षणाशी जुळणारे आहे. ' कारण घडले तरी कार्य घडत नाही ' हे नंतरच्या विशेषोक्तीचे लक्षण. मदनाचे शरीर नष्ट होणे हे कारण आहे आणि ते घडल्यावर त्याचे बळ नष्ट होणे हे त्या कारणाचे कार्य घडावयास पाहिजे होते. पण शंकराने त्याचे बळ नष्ट केले नाही म्हणजे कार्य घडले नाही असे वर्णन असल्याने हे विशेषोक्तीचे योग्य उदाहरण आहे.

८. ज्या नेमक्या निमित्तामुळे ( म्हणजे कारणामुळे) कार्य घडून येते, ते निमित्त

'चिन्त्य' म्हणजे समजण्याजोगे असते, तर ते व्यंग्य आहे असे मानिता आले असते. पण ते निमित्त लक्षातच येण्याजोगे नसले, तर ते व्यंजनेने सुचविताही येणार नाही; म्हणून 'अचिन्त्यनिमित्त प्रकारामध्ये व्यंग्यार्थ नसतो' असे म्हटले आहे.

९. वर्णन जर निसर्गक्रमाला सोडून असते, तर काही तरी व्यंग्यार्थ कल्पून त्याची संगती लावावी लागली असती. पण जेथे सर्व निसर्गक्रमाला धरूनच उक्त म्हणजे 'वाच्य' आहे, तेथे व्यंग्यार्थाच्या अस्तित्वाचा संभवच नाही.

१०. राजशेखर, बालरामायण, ३–११.

११. आनंदवर्धनांनी अनुक्तनिमित्त विशेषोक्तीचे 'सोबत्यांनी...' इ. जे उदाहरण दिले आहे, ते 'कारणे घडली तरी कार्य घडत नाही' या स्वरूपाचे आहे, म्हणजे भामहानंतरच्या आलंकारिकांनी दिलेल्या लक्षणाशी मिळते जुळते आहे. हे उदाहरण भामहाच्या 'काव्यालंकारात' नाही. ते आनंदवर्धनांनी भट्टोद्भटाच्या 'भामहविवरणा'वरून घेतले असावे व विशेषोक्तीच्या लक्षणाबाबतही ते 'भट्टोद्भटालाच अनुसरतात, हे स्पष्ट आहे. ( पाहा, उद्भट, काव्यालंकारसंग्रह, ५—४)

'सोबत्यांनी...इ. उदाहरण जरी उद्भटाच्या उपलब्ध 'काव्यालंकारसारसंग्रहा'त सापडत नसले, तरी ते 'भामहविवरण' या अनुपलब्ध ग्रंथात असलेच पाहिजे, कारण 'सोबत्यांनी इ उदाहरणाबाबत भट्टोद्भटाचे मत असे असे आहे' असा स्पष्ट हवाला अभिनवगुप्तांनीच 'लोचनात'त 'थंडीमुळे होणारा त्रास..' इ. वाक्यात दिला आहे.

उद्भटाच्या काव्यालंकारसारसंग्रहामध्ये विशेषोक्तीचे 'दर्शितनिमित्ता' व 'अदर्शितनिमित्ता ( म्हणजेच उक्तनिमित्ता व अनुक्तनिमित्ता ) असे दोनच प्रकार दिले आहेत. 'अचिन्त्यनिमित्ता' हा प्रकार त्याने दिलेलाच नाही. आनंदवर्धनांच्या दृष्टीसमोरही तो असेलच असे मानण्यास काही प्रमाण नाही. अभिनवगुप्तांनी मात्र आनंदवर्धनांना हा तिसराही प्रकार माहीत होता असे गृहीत धरून 'तो माहीत असूनही आनंदवर्धनांनी या दोन्ही प्रकारांकडे (त्यांत व्यंग्यार्थ नसल्यामुळे) दुर्लक्ष केले' असे म्हटले आहे.

जगन्नाथपंडिताने-(पाहा, रसगंगाधर, काव्यमाला आवृत्ति, पृ. ५८६) विशेषोक्तीचे उक्तनिमित्ता व अनुक्तनिमित्ता हे दोन प्रकार देऊन 'काही लोक अचिन्त्यनिमित्ता असा तिसराही प्रकार मानतात' असे म्हटले आहे, व 'अचिन्त्यनिमित्ता' हा वेगळा प्रकार न मानिता त्याचा अनुक्तनिमित्ता या प्रकारातच अन्तर्भाव करावा असे दुसऱ्यांचेही मत असल्याचे सांगितले आहे.

'अचिन्त्यनिमित्ता' हा प्रकार काही लोकांनी मानिला आहे व स एक-स्त्रीणि ..हे त्या प्रकारचे उदाहरण आहे असे म्हणताना जगन्नाथापुढे 'काही' म्हणजे 'मम्मट' असावा असे प्रा. रा. ब. आठवले यांनी म्हटले आहे. (पाहा, रसगंगाधर, आठवले आवृत्ति, द्वितीय खंड, पृ. ७७५), पण मम्मटापूर्वीच अभिनवगुप्तांनी 'अचिन्त्यनिमित्ता' या प्रकाराचा उल्लेख करून स एकस्त्रीणि.. हेच उदाहरण दिले आहे, हे लक्षात घेणे आवश्यक आहे.

१२. उद्भटाच्या काव्यालंकारसारसंग्रहामध्ये वरील म्हणणे आढळत नाही, तेव्हा ते त्याच्या 'भामहविवरण' या अनुपलब्ध ग्रंथात असावे

१३. 'विशेषोक्ति' या नावाचा अर्थ विशेषाची उक्ति म्हणजे वाच्यत्वाने केलेले वर्णन. आता हा 'विशेष' कोणता? तर कारणे घडून कार्य न घडणे हाच होय. कार्य घडत नाही असे तेथे अभिधेनेच म्हटलेले असल्यामुळें म्हणजे त्या विशेषाची तेथे उक्ति असल्यामुळेच त्या अलंकाराला 'विशेषोक्ति' ही संज्ञा देण्यात आली आहे, त्या अलंकारात व्यंग्यार्थ असतो म्हणून नव्हे आणि प्राधान्येन व्यपदेशाः भवन्ति हा मागे पृ. १९२ वरील १७ व्या टीपेत उद्धृत केलेला न्याय लक्षात घेता वाच्य असलेला 'विशेष'च या अलंकारात प्रधान आहे, 'व्यंग्यार्थ' प्रधान नाही. म्हणूनच हा अलंकार-प्रकार 'ध्वनि' नाही. पाहा, या नंतर पृ. १९८ वर 'पर्यायोक्त' या संज्ञेचे अभिनवगुप्तांनी केलेले विश्लेषण.

१४. पाहा. भामह, काव्यालंकार, ३-८ व उद्भट, काव्यालंकारसारसंग्रह, ४-६. वरील श्लोकापैकी पहिलीच ओळ भामहाने आपल्या काव्यालंकारात दिलेली आहे. उद्भटाने मात्र पहिल्या ओळीच्या जोडीला दुसरी ओळही समाविष्ट केली आहे.

१५. एकूण आनंदवर्धन व अभिनवगुप्त यांच्या मते पर्यायोक्त अलंकारामध्ये वाच्यार्थ हा प्रधान व व्यंग्यार्थ हा 'गुणीभूत' म्हणजे त्याचे अंग असतो. याचे कारण हेच की पर्यायोक्तामध्ये वाच्यार्थ हाच व्यंग्यार्थापेक्षा अधिक सुंदर असतो. पर्यायोक्ताच्या व्याख्येच्या अभिनवगुप्तांनी केलेल्या विवर-णाचे तात्पर्य असे की वाच्यार्थ हा व्यंग्यार्थाने विशिष्ट म्हणजे भूषित झालेला असतो, म्हणून वाच्यार्थ हा प्रधान व व्यंग्यार्थ हा गुणीभूत होय. 'पर्यायोक्त' हे 'लक्ष्य' पद (म्हणजे ज्या अलंकाराची व्याख्या करा-वयाची त्याचा वाचक शब्द) विचारात घेतल्यास 'पर्यायाने' म्हणजे अन्य अर्थाचे व्यंजक होतील, अशा शब्दांनी जे साक्षात् उक्त म्हणजे बोलून दाखविलेले असते, ते 'पर्यायोक्त' म्हणजेयेथेही वाच्य वर्णन हे 'साध्य' असल्यामुळे मुख्य असते व व्यंग्य अर्थ हा त्याचे साधन असल्यामुळे गौण

असतो. आता 'अर्थालङ्कार असणे' हे पर्यायोक्ताचे सामान्यस्वरूप असल्याने व्यङ्ग्यच अर्थ हा अलंकार व वाच्य अर्थ हा 'अलंकार्य' म्हणून प्रधान असतो. अशा रीतीने या तिन्ही गोष्टी अभिनवगुप्तांच्या पर्यायोक्ताच्या कल्पनेशी जुळणाऱ्या आहेत.

१६. म्हणजे निषेधरूपी व्यंग्यार्थात पर्यवसित होणारा विधिरूपी वाच्यार्थ, विधिरूपी व्यंग्यार्थात पर्यवसित होणारा निषेधरूपी वाच्यार्थ, वगैरे स्वरूपाचे प्रकार (पाहा, पृ. ७५ वरील वृत्तीच्या काही ओळी,

१७. पाहा, उद्द्योत २, कारिका ६ वी.

१८ हे इतके म्हणजे पर्यायोक्तादि अलंकारांमध्ये वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांमधील मुख्य कोण व गौण कोण याचा विवेक.

१९. पाहा, पुढच्याच परिच्छेदानंतर दिलेले 'वेदाध्ययनसंपन्न ब्राह्मण...इ.' उदाहरण.

२०. या उदाहरणातील सौंदर्य वाच्यार्थावर (म्हणजे कृष्णाने ज्या तऱ्हेने शिशुपालाकडे भोजन करण्याचे टाळले त्या तऱ्हेवर) अवलंबून आहे, व्यंग्यार्थावर नाही.

२१. भामहाने पर्यायोक्ताचे जे उदाहरण दिले, त्यामध्ये ज्याप्रमाणे व्यंग्यार्थ मुख्य नाही, त्याप्रमाणेच पर्यायोक्ताच्या इतर उदाहरणात व्यंग्यार्थ मुख्य नसतो असा वृत्तिकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.

२२. 'विषप्रयोग टाळणे' या व्यंग्यार्थामुळे बळकटी आलेला, 'ब्राह्मण जेवल्यावाचून आम्ही जेवीत नाही' हा वाच्यार्थच 'पर्यायोक्त' (अलंकार) असून तो 'प्रस्तुत भोजनार्था'ला अलंकृत करितो, असे 'लोचना'त म्हटले आहे. 'प्रस्तुत भोजनार्थ' याचा अनुवाद आम्ही 'बालप्रिये'ला अनुसरून 'प्रस्तुत जो वेदाध्ययनसंपन्न ब्राह्मणांनी खाल्ल्यानंतर उरलेले अन्नच आम्ही सेवन करितो, हा अर्थ' असा केला आहे. पण ब्राह्मण जेवल्यावाचून आम्ही जेवीत नाही. हा अर्थ 'ब्राह्मण जेवल्यावर राहिलेले अन्नच आम्ही खातो' या अर्थाला भूषित करितो. असा अर्थ लावण्यात त्या दोन अर्थात विशेष फरक नसल्यामुळे 'तो आपणा स्वतःलाच भूषवितो' असे काहीतरी म्हटल्यासारखे होते. ही विसंगती टाळण्याचे दृष्टीने 'प्रस्तुत भोजनार्थ म्हणजे प्रस्तुत जो शिशुपालाचे घरी जेवण्याचा उपस्थित झालेला प्रश्न' असा काहीतरी अर्थ करिता येणे शक्य आहे.

२३ पर्यायोक्त वगैरे अलंकारांमध्ये व्यंग्यार्थ असतो येवढी जाणीव प्राचीनांना होती, पण अलंकाराचा विचार येवढाच त्यांचा उद्देश असल्याने त्यांनी व्यंग्यार्थ प्रधान आहे की गौण आहे या निकषाचा वापर न करिता अशा सर्व ठिकाणी व्यंग्यार्थाला 'अलंकाराचा भाग' इतकेच मानिले. येवढेच

नव्हे, तर रस हाही काव्यात प्रधान आहे की अप्रधान आहे याचा विचार न करिता सर्व ' रसयुक्त ' काव्यांना त्यांनी ' रसवदलंकार 'च लेखिले.

२४. ' सिद्ध केलेले ' म्हणजे चारुत्वोत्कर्ष (व्यंग्यार्थ व वाच्यार्थ यांतील जो अधिक सुंदर तो प्रधान) या निकषानुसार सिद्ध झालेले.

२५. बळकट पुरावा म्हणजे चारुत्वोत्कर्षाचा निकष लावणे हाच.

२६. म्हणजे ' भामहविवरण ' हा ग्रंथ लिहिणाऱ्या उद्भटाने.

२७. म्हणजे रघुवंशामधील या राजामध्ये असलेले लोकोत्तर शौर्य, औदार्य, सत्य-प्रतिज्ञत्व इ. समान गुण.

२८. येथे ' लोचना 'त ' गर्दभीदोह ' असे शब्द आहेत. पण ' निष्फळ प्रयास ' हे त्यातील तात्पर्य लक्षात घेता ' गर्दभदोह ' असा शब्दप्रयोग असणे व लेखनिकाच्या प्रमादामुळे ' गर्दभीदोह ' लिहिले गेले असणेही शक्य आहे. कारण अशाच दुसऱ्या एका संदर्भात ' अभिनवभारती 'मध्ये अभिनव-गुप्तांनी वृथादुग्धोऽनड्वान्...इ. श्लोक उद्धृत केलेला आहे. (पाहा, रसभाव-विचार, कंगले आवृत्ति, पृ. ३३१). त्या श्लोकांत अनड्वान् म्हणजे बैल असा पुल्लिंगी शब्द आहे. बैलाचे दूध काढणे सर्वस्वी निष्फळ. म्हणून या ठिकाणी ' गर्दभदोह ' असा मूळात शब्द असणे अशक्य नाही.

ध्वन्यालोकः

सङ्करालङ्कारेऽपि यदालंकारोऽलङ्कारान्तरच्छायामनुगृह्णाति, तदा व्यङ्ग्यस्य प्राधान्येनाविवक्षितत्वान्न ध्वनिविषयत्वम्। अलङ्कारद्वय-सम्भावनायां तु वाच्यव्यङ्ग्ययोः समं प्राधान्यम्। अथ वाच्योपस-र्जनीभावेन व्यङ्ग्यस्य तत्रावस्थानं तदा सोऽपि ध्वनिविषयोऽस्तु, न तु स एव ध्वनिरिति वक्तुं शक्यम्। पर्यायोक्तनिर्दिष्टन्यायात्। अपि च सङ्करालङ्कारेऽपि च क्वचित् सङ्करोक्तिरेव ध्वनिसम्भावनां निराकरोति। अप्रस्तुतप्रशंसायामपि यदा सामान्यविशेषभावान्निमित्त-निमित्तिभावाद्वा अभिधीयमानस्याप्रस्तुतस्य प्रतीयमानेन प्रस्तुतेनाभि-सम्बन्धः, तदाभिधीयमानप्रतीयमानयोः सममेव प्राधान्यम्। यदा तावत्सामान्यस्याप्रस्तुतस्याभिधीयमानस्य प्राकरणिकेन विशेषेण प्रतीयमानेन सम्बन्धस्तदा विशेषप्रतीतौ सत्यामपि प्राधान्येन तत्सामान्येनाविनाभावात्सामान्यस्यापि प्राधान्यम्। यदापि विशेषस्य सामान्यनिष्ठत्वं तदापि सामान्यस्य प्राधान्ये सामान्ये सर्वविशेषाणा-मन्तर्भावाद्विशेषस्यापि प्राधान्यम्। निमित्तनिमित्तिभावे चायमेव

न्यायः। यदा तु सारूप्यमात्रवशेनाप्रस्तुतप्रशंसायामप्रकृतप्रकृतयोः सम्बन्धस्तदाप्यप्रस्तुतस्वरूपस्याभिधीयमानस्य प्राधान्येनाविवक्षायां ध्वनावेवान्तःपातः। इतरथा त्वलङ्कारान्तरमेव। तदयमत्र सङ्क्षेपः—

व्यङ्ग्यस्य यत्राप्राधान्यं वाच्यमात्रानुयायिनः।
समासोक्त्यादयस्तत्र वाच्यालङ्कृतयः स्फुटाः॥
व्यङ्ग्यस्य प्रतिभामात्रे वाच्यार्थानुगमेऽपि वा।
न ध्वनिर्यत्र वा तस्य प्राधान्यं न प्रतीयते॥
तत्परावेव शब्दार्थौ यत्र व्यङ्ग्यं प्रति स्थितौ।
ध्वनेः स एव विषयो मन्तव्यः सङ्करोज्झितः॥
तस्मान्न ध्वनेरन्यत्रान्तर्भावः।

ध्वन्यालोक

संकरालंकारामध्येही जेव्हा एक (व्यंग्य) अलंकार दुसऱ्या (वाच्य) अलंकाराची शोभा वाढवतो,[१] तेव्हा कवीला व्यंग्य अलंकार, प्रधान म्हणून अभिप्रेत नसल्याने ते ध्वनीचे उदाहरण नव्हे. संकराच्या ज्या प्रकारामध्ये दोन्ही अलंकार[२] विकल्पाने संभवू शकतात, त्यात वाच्य व व्यंग्य[३] या दोन्ही अलंकारांचे प्राधान्य सारखेच असते. आणि संकराच्या एखाद्या प्रकारात जर व्यंग्य अलंकाराने वाच्य 'अलंकाराला गौणत्व दिले असेल, तर तोही ध्वनीचा 'अलंकार–ध्वनि' नावाचा प्रकार होऊ द्या, पण म्हणून तो प्रकार म्हणजेच ( सगळा ) ध्वनि होय असे मात्र नव्हे; कारण पर्यायोक्ताच्या बाबतीत जे कारण सांगितले, तेच येथेही लागू[४] होते. आणखी असे की, संकरालं-काराच्या बाबतीत त्याला दिलेले 'संकर' हे नावच ते ध्वनि असण्याची शक्यता बाजूला सारते.[५]

अप्रस्तुत – प्रशंसेतदेखील[६] जेव्हा अप्रस्तुत वाच्यार्थाचा प्रस्तुत व्यंग्यार्थाशी एक 'सामान्य' व दुसरा 'विशेष' असा किंवा एक कारण व एक कार्य असा संबंध असतो, तेव्हा वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांचे प्राधान्य सारखेच असते. कारण ज्यावेळी सामान्य स्वरूपाचे अप्रस्तुत 'वाच्य' असताना त्याचा विशेष स्वरूपाच्या व्यंग्य प्रस्तुताशी संबंध असतो, त्यावेळी विशेषाची ( व्यंग्यत्वाने) प्रतीति प्राधान्याने होत असली, तरी त्या विशेषाला त्याच्या सामान्याहून वेगळे अस्तित्व नसल्याने वाच्य सामान्यही प्रधान होय. आणि

ज्यावेळी विशेष स्वरूपाचे अप्रस्तुत हे वाच्य असताना त्याचे प्रस्तुत व्यंग्य सामान्यात पर्यवसान होते, त्यावेळी सामान्य हे प्रस्तुत असल्यामुळे प्रधान असताना सामान्यात सर्व विशेषांचा अंतर्भाव होत असल्यामुळे विशेषदेखील सामान्याइतकेच प्रधान होय. आणि अप्रस्तुत व प्रस्तुत यांमध्ये कारण–कार्य असा संबंध असताना प्राधान्याच्या बाबतीत हाच न्याय असतो ( म्हणजे दोघांचेही समप्राधान्य असते ). पण जेव्हा अप्रस्तुतप्रशंसेमध्ये अप्रस्तुत ( वाच्य ) व प्रस्तुत ( व्यंग्य ) यांचा संबंध केवळ सादृश्यामुळेच असतो, तेव्हादेखील ( प्रस्तुताशी ) तुल्य असलेले वाच्य अप्रस्तुत जेव्हा प्रधान म्हणून विवक्षित नसेल, तेव्हा ते उदाहरण ध्वनीत अंतर्भूत होईल. पण तसे नसेल ( म्हणजे अप्रस्तुत वाच्यार्थ प्रधान असेल व प्रस्तुत व्यंग्यार्थ गौण असेल ) तेव्हा तो 'अप्रस्तुतप्रशंसा' नावाचा अलंकारच समजावा तेव्हा या बाबतीत सारांश असा :–

ज्या ठिकाणी व्यंग्यार्थाला प्राधान्य नसते, तो केवळ वाच्यार्थाचा अनुयायी म्हणजेच त्याला अंगभूत असतो, त्या ठिकाणी 'समासोक्ति' वगैरे वाच्यार्थाचे अलंकारच असतात, हे उघड आहे.

ज्या ठिकाणी व्यंग्यार्थाची जाणीव अगदी अस्पष्टपणे होते,[७] किंवा व्यंग्यार्थ वाच्यार्थाला अनुसरणारा असतो, किंवा ज्या ठिकाणी व्यंग्यार्थ हा प्रधान म्हणून प्रत्ययाला येत नाही.[८] त्या ठिकाणी 'ध्वनी' नसतो. ज्या उदाहरणात शब्द व वाच्यार्थ हे व्यंग्यार्थपरच म्हणजे व्यंग्यार्थाला प्राधान्य देऊन त्याला व्यक्त करण्यासाठीच ( योजलेले ) असतात, तेच ध्वनीचे क्षेत्र समजावे. तेथे समासोक्ति, आक्षेप, इत्यादींसारख्या अलंकाराची शंका घेऊ नये.

म्हणून ध्वनीचा इतरत्र ( म्हणजे गुण, अलंकार, वगैरेंमध्ये ) अंतर्भाव होत नाही.

लोचनम्

सङ्कराल‍ङ्कारेऽपीति ।
विरुद्धालंक्रियोल्लेखे समं तद्वृत्त्यसम्भवे ।
एकस्य च ग्रहे न्यायदोषाभावे च सङ्करः ॥
इति लक्षणादेकः प्रकारः । यथा ममैव—
शशिवदनासितसरसिजनयना सितकुन्ददशनपङ्क्तिरियम् ।

गगनजलस्थलसम्भवहृद्याकारा कृता विधिना ॥ इति ।

अत्र शशी वदनमस्याः, तद्वद्वा वदनमस्या इति रूपकोपमोल्लेखायुगपद्द्वयासम्भवादेकतरपक्षत्यागग्रहणे प्रमाणाभावात्सङ्कर इति व्यङ्ग्यवाच्यताया एवानिश्चयात्का ध्वनिसम्भावना। योऽपि द्वितीयः प्रकारः – शब्दार्थालङ्काराणामेकत्रभाव इति, तत्रापि प्रतीयमानस्य का शङ्का। यथा—

स्मर स्मरमिव प्रियं रमयसे यमालिङ्गनात्। इति।

अत्रैव यमकमुपमा च। तृतीयः प्रकारः – यत्रैकत्र वाक्यांशेऽनेकोऽर्थालङ्कारस्तत्रापि द्वयोः साम्यात्कस्य व्यङ्ग्यता ? यथा—

तुल्योदयावसानत्वाद्गतेऽस्तं प्रति भास्वति।

वासाय वासरः क्लान्तो विशतीव तमोगुहाम् ॥ इति।

अत्र हि स्वामिविपत्तिसमुचितव्रतग्रहणहेवाकिकुलपुत्रकरूपणमेकदेशविवर्तिरूपकं दर्शयति। उत्प्रेक्षा चेवशब्देनोक्ता। तदिदं प्रकारद्वयमुक्तम्।

शब्दार्थवर्त्यलङ्कारा वाक्य एकत्र वर्तिनः।

सङ्करश्चैकवाक्यांशप्रवेशाद्वाभिधीयते ॥ इति च।

चतुर्थस्तु प्रकारः, यत्रानुग्राह्यानुग्राहकभावोऽलङ्काराणाम्। यथा—

प्रवातनीलोत्पलनिर्विशेषमधीरविप्रेक्षितमायताक्ष्या।

तया गृहीतं नु मृगाङ्गनाभ्यस्ततो गृहीतं नु मृगाङ्गनाभिः ॥

अत्र मृगाङ्गनावलोकनेन तदवलोकनस्योपमा यद्यपि व्यङ्ग्या, तथापि वाच्यस्य सा सन्देहालङ्कारस्याभ्युत्थानकारिणीत्वेनानुग्राहकत्वाद्गुणीभूता, अनुग्राह्यत्वेन हि सन्देहे पर्यवसानम्। यथोक्तम् –

परस्परोपकारेण यत्रालङ्कृतयः स्थिताः।

स्वातन्त्र्येणात्मलाभं नो लभन्ते सोऽपि सङ्करः ॥

तदाह – यदालङ्कार इत्यादि। एवं चतुर्थेऽपि प्रकारे ध्वनिता निराकृता। मध्यमयोस्तु व्यङ्ग्यसम्भावनैव नास्तीत्युक्तम्। आद्ये तु प्रकारे 'शशिवदने'त्याद्युदाहृते कथञ्चिदस्ति सम्भावनेत्याशङ्क्य निराकरोति – अलङ्कारद्वयेति। समामिति। द्वयोरप्यान्दोल्यमानत्वादिति भावः। ननु यत्र व्यङ्ग्यमेव प्राधान्येन भाति तत्र किं कर्तव्यम्। यथा –

होइ ण गुणाणुराओ जडाणँ णवरं णसिद्धिसरणाणं।

किर पण्हुवइ ससिमणी चन्दे, ण पिआमुहे दिट्ठे ॥

अत्रार्थान्तरन्यासस्तावद्वाच्यत्वेनाभाति, व्यतिरेकापह्नुती तु व्यङ्ग्यत्वेन प्रधानतयेत्यभिप्रायेणाशङ्कते – अथेति । तत्रोत्तरम् – तदा सोऽपीति । सङ्करालङ्कार एवायं न भवति, अपि त्वलङ्कारध्वनिनामायं ध्वनेर्द्वितीयो भेदः । यच्च पर्यायोक्ते निरूपितं तत्सर्वमत्राप्यनुसरणीयम् । अथ सर्वेषु सङ्करप्रभेदेषु व्यङ्ग्यसम्भावनानिरासप्रकारं साधारणमाह– अपि चेति । 'क्वचिदपि सङ्करालङ्कारे चे'ति सम्बन्धः, सर्वभेदभिन्न इत्यर्थः । सङ्कीर्णता हि मिश्रत्वं लोलीभावः, तत्र कथमेकस्य प्राधान्यं क्षीरजलवत् ?

अधिकारादपेतस्य वस्तुनोऽन्यस्य या स्तुतिः ।
अप्रस्तुतप्रशंसा सा त्रिविधा परिकीर्तिता ॥

अप्रस्तुतस्य वर्णनं प्रस्तुताक्षेपिण इत्यर्थः । स चाक्षेपस्त्रिविधो भवति – सामान्यविशेषभावात्, निमित्तनिमित्तिभावात्, सारूप्याच्च । तत्र प्रथमे प्रकारद्वये प्रस्तुताप्रस्तुतयोस्तुल्यमेव प्राधान्यमिति प्रतिज्ञां करोति – अप्रस्तुतेत्यादिना प्राधान्यमित्यन्तेन । तत्र सामान्यविशेषभावेऽपि द्वयी गतिः – सामान्यमप्राकरणिकं शब्देनोच्यते, गम्यते तु प्राकरणिको विशेषः, स एकः प्रकारः । यथा–

अहो संसारनैर्घृण्यमहो दौरात्म्यमापदाम् ।
अहो निसर्गजिह्मस्य दुरन्ता गतयो विधेः ॥

अत्र हि दैवप्राधान्यं सर्वत्र सामान्यरूपमप्रस्तुतं वर्णितं सत्प्रकृते वस्तुनि क्वापि विनष्टे विशेषात्मनि पर्यवस्यति । तत्रापि विशेषांशस्य सामान्येन व्याप्तत्वाद्व्यङ्ग्यविशेषवद्वाच्यसामान्यस्यापि प्राधान्यम्, न हि सामान्यविशेषयोर्युगपत्प्राधान्यं विरुध्यते । यदा तु विशेषोऽप्राकरणिकः प्राकरणिकं सामान्यमाक्षिपति तदा द्वितीयः प्रकारः ।

एतत्तस्य मुखात्कियत्कमलिनीपत्रे कणं पाथसो
यन्मुक्तामणिरित्यमंस्त स जडः शृण्वन्यदस्मादपि ।
अङ्गुल्यग्रलघुक्रियाप्रविलयिन्यादीयमाने शनैः
कुत्रोड्डीय गतो हहेत्यनुदिनं निद्राति नान्तःशुचा ॥

अत्रास्थाने महत्त्वसम्भावनं सामान्यं प्रस्तुतम्, अप्रस्तुतं तु जलबिन्दौ मणित्वसम्भावनं विशेषरूपं वाच्यम् । तत्रापि सामान्यविशेषयोर्युग-

पत्प्राधान्ये न विरोध इत्युक्तम् । एवमेकः प्रकारो द्विभेदोऽपि विचारितः, यदा तावदित्यादिना विशेषस्यापि प्राधान्यमित्यन्तेन । एतमेव न्यायं निमित्तनैमित्तिकभावेऽतिदिशंस्तत्रापि द्विप्रकारतां दर्शयति– निमित्तेति । कदाचिन्निमित्तमप्रस्तुतं सदभिधीयमानं नैमित्तिकं प्रस्तुतमाक्षिपति । यथा –

ये यान्त्यभ्युदये प्रीतिं नोज्झन्ति व्यसनेषु च ।

ते बान्धवास्ते सुहृदो लोकः स्वार्थपरोऽपरः ।

अत्राप्रस्तुतं सुहृद्बान्धवरूपत्वं निमित्तं सज्जनासक्तया वर्णयति नैमित्तिकीं श्रद्धेयवचनतां प्रस्तुतात्मामनोऽभिव्यङ्क्तुम्; तत्र नैमित्तिकप्रतीतावपि निमित्तप्रतीतिरेव प्रधानीभवत्यनुप्राणकत्वेनेति व्यङ्ग्यव्यञ्जकयोः प्राधान्यम् । कदाचित्तु नैमित्तिकमप्रस्तुतं वर्ण्यमानं सत्प्रस्तुतं निमित्तं व्यनक्ति । यथा सेतौ –

सग्गं अपारिजाअं कोत्थुहलच्छिरहिअं महुमहस्स उरं ।

सुमरामि महणपुरओ अमुद्धअन्दं च हरजडापब्भारं ।।

अत्र जाम्बवान् कौस्तुभलक्ष्मीविरहितहरिवक्षःस्मरणादिकमप्रस्तुतनैमित्तिकं वर्णयति प्रस्तुतं वृद्धसेवाचिरजीवित्वव्यवहारकौशलादिनिमित्तभूतं मन्त्रितायामुपादेयमभिव्यङ्क्तुम् । तत्र निमित्तप्रतीतावपि नैमित्तिकं वाच्यभूतम्; प्रत्युत तन्निमित्तानुप्राणितत्वेनोद्धुरकन्धरीकरोत्यात्मानमिति समप्रधानतैव वाच्यव्यङ्ग्ययोः । एवं द्वौ प्रकारौ प्रत्येकं द्विविधौ विचार्य तृतीयः प्रकारः परीक्ष्यते सारूप्यलक्षणः । तत्रापि द्वौ प्रकारौ – अप्रस्तुतात्कदाचिद्वाच्याच्चमत्कारः, व्यङ्ग्यं तु तन्मुखप्रेक्षम् । यथास्मदुपाध्यायभट्टेन्दुराजस्य –

प्राणा येन समर्पितास्तव बलाद्येन त्वमुत्थापितः

स्कन्धे यस्य चिरं स्थितोऽसि विदधे यस्ते सपर्यामपि ।

तस्यास्य स्मितमात्रकेण जनयन् प्राणापहारक्रियां

भ्रातः प्रत्युपकारिणां धुरि परं वेताल लीलायसे ।।

अत्र यद्यपि सारूप्यवशेन कृतघ्नः कश्चिदन्यः प्रस्तुत आक्षिप्यते, तथाप्यप्रस्तुतस्यैव वेतालवृत्तान्तस्य चमत्कारकारित्वम्; न ह्यचेतनोपालम्भवदसम्भाव्यमानोऽयमर्थो न च न हृद्य इति वाच्यस्यात्र प्रधानता । यदि पुनरचेतनादिनात्यन्तासम्भाव्यमानतदर्थविशेषणेनाप्रस्तुतेन वर्णितेन

अस्तुतमाक्षिप्यमाणं चमत्कारकारि तदा वस्तुध्वनिरसौ । यथा ममैव –

> भावव्रात हठाज्जनस्य हृदयान्याक्रम्य यन्नर्तयन्
> भङ्गीभिर्विविधाभिरात्महृदयं प्रच्छाद्य संक्रीडसे ।
> स त्वामाह जडं ततः सहृदयम्मन्यत्वदुःशिक्षितो
> मन्येऽमुष्य जडात्मता स्तुतिपदं त्वत्साम्यसम्भावनात् ॥

कश्चिन्महापुरुषो वीतरागोऽपि सरागवदिति न्यायेन गाढविवेकालोकतिरस्कृततिमिरप्रतानोऽपि लोकमध्ये स्वात्मानं प्रच्छादयल्ँलोकं च वाचालयन्नात्मन्यप्रतिभासमेवाङ्गीकुर्वंस्तेनैव लोकेन मूर्खोऽयमिति यदवज्ञायते तदा तदीयं लोकोत्तरं चरितं प्रस्तुतं व्यङ्ग्यतया प्राधान्येन प्रकाश्यते । जडोऽयमिति हचुद्यानेन्दूदयादिर्भावो लोकेनावज्ञायते, स च प्रत्युत कस्यचिद्विरहिण औत्सुक्यचिन्तादूयमानमानसतामन्यस्य प्रहर्षपरवशतां करोतीति हठादेव लोकं यथेच्छं विकारकारणाभिर्नर्तयति । न च तस्य हृदयं केनापि ज्ञायते कीदृगयमिति, प्रत्युत महागम्भीरोऽतिविदग्धः सुष्ठुगर्वहीनोऽतिशयेन क्रीडाचतुरः स यदि लोकेन जड इति तत एव कारणात्प्रत्युत वैदग्ध्यसम्भावननिमित्तात्सम्भावितः, आत्मा च यत एव कारणात्प्रत्युत जाड्येन सम्भाव्यस्तत एव सहृदयः सम्भावितस्तदस्य लोकस्य जडोऽसीति यदुच्यते तदा जाड्यमेवंविधस्य भावव्रातस्याविदग्धस्य प्रसिद्धमिति सा प्रत्युत स्तुतिरिति । जडादपि पापीयानयं लोक इति ध्वन्यते । तदाह यदा त्विति । इतरथा त्विति । इतरथैव पुनरलंकारान्तरत्वमलङ्कारविशेषत्वं न व्यङ्ग्यस्य कथंचिदपि प्राधान्य इति भावः । उद्देशे यद्यादिग्रहणं कृतं समासोक्तीत्यत्र द्वन्द्वे तेन व्याजस्तुतिप्रभृतिरलङ्कारवर्गोऽपि सम्भाव्यमानव्यङ्ग्यानुवेशः सम्भावितः । तत्र सर्वत्र साधारणमुत्तरं दातुमुपक्रमते तदयमत्रेति । कियद्वा प्रतिपदं लिख्यतामिति भावः । तत्र व्याजस्तुतिर्यथा –

> किं वृत्तान्तैः परगृहगतैः किन्तु नाहं समर्थ –
> स्तूष्णीं स्थातुं प्रकृतिमुखरो दाक्षिणात्यस्वभावः ।
> गेहे गेहे विपणिषु तथा चत्वरे पानगोष्ठ्या –
> मुन्मत्तेव भ्रमति भवतो वल्लभा हन्त कीर्तिः ॥

अत्र व्यङ्ग्यं स्तुत्यात्मकं यत्तेन वाच्यमेवोपस्क्रियते । यत्तूदाहृतं केनचित् –

आसीन्नाथ पितामही तव मही जाता ततोऽनन्तरं
माता सम्प्रति साम्बुराशिरशना जाया कुलोद्भूतये ।
पूर्णे वर्षशते भविष्यति पुनः सैवानवद्या स्नुषा
युक्तं नाम समग्रनीतिविदुषां किं भूपतीनां कुले ।।

इति, तदस्माकं ग्राम्यं प्रतिभात्यत्यन्तासभ्यस्मृतिहेतुत्वात् । का चानेन स्तुतिः कृता ? त्वं वंशक्रमेण राजेति हि किमदिदम् ? इत्येवंप्राया व्याजस्तुतिः सहृदयगोष्ठीषु निन्दितेत्युपेक्ष्यैव ।

यस्य विकारः प्रभवन्नप्रतिबन्धस्तु हेतुना येन ।
गमयति तमभिप्रायं तत्प्रतिबन्धं च भावोऽसौ ।। इति ।

अत्रापि वाच्यप्राधान्ये भावालङ्कारता । यस्य चित्तवृत्तिविशेषस्य सम्बन्धी वाग्व्यापारादिविकारोऽप्रतिबन्धो नियतः प्रभवंस्तं चित्तवृत्तिविशेषरूपमभिप्रायं येन हेतुना गमयति स हेतुर्यथेष्टोपभोग्यत्वादिलक्षणोऽर्थो भावालङ्कारः । यथा –

एकाकिनी यदबला तरुणी तथाह–
मस्मिन्गृहे गृहपतिश्च गतो विदेशम् ।
किं याचसे तदिह वासमियं वराकी
श्वश्रूर्ममान्धबधिरा ननु मूढ पान्थ ।।

अत्र व्यङ्ग्यमेकैकत्र पदार्थे उपस्कारकारीति वाच्यं प्रधानम् । व्यङ्ग्यप्राधान्ये तु न काचिदलङ्कारतेति निरूपितमित्यलं बहुना ।।

यत्रेति काव्ये । अलङ्कृतय इति । अलङ्कृतित्वादेव च वाच्योपस्कारकत्वम् । प्रतिभामात्र इति । यत्रोपमादौ श्लिष्टार्थप्रतीतिः । वाच्यार्थानुगम इति । वाच्येनार्थेनानुगमः समं प्राधान्यमप्रस्तुतप्रशंसायामिवेत्यर्थः । न प्रतीयत इति । स्फुटतया प्राधान्यं न चकास्ति, अपि तु बलात्कल्प्यते, तथापि हृदये नानुप्रविशति । यथा–

'देआ पसिअणिअत्तसु' इत्यत्रान्यकृतासु व्याख्यासु । तेन चतुर्षु प्रकारेषु न ध्वनिव्यवहारः सद्भावेऽपि व्यङ्ग्यस्य अप्राधान्ये श्लिष्टप्रतीतौ वाच्येन समप्राधान्येऽस्फुटे प्राधान्ये च । क्व तर्ह्यसावित्याह–तत्परावेवेति सङ्करेणालङ्कारानुप्रवेशसम्भावनया उज्झित इत्यर्थः । सङ्करालङ्कारेणेति त्वसत्, अन्यालङ्कारोपलक्षणत्वे हि क्लिष्टं स्यात् ।

संकरालंकारामध्येही –

परस्परविरुद्ध असे दोन अलंकार (एकाच उदाहरणात) स्वतंत्रपणे संभवत असताना ते दोन्ही अलङ्कार एकाच वेळी असणे अशक्य व त्यांपैकी एकाचाच स्वीकार करावयास साधकप्रमाण किंवा त्याग करावयाचा म्हटल्यास बाधकप्रमाण नसले, तर 'संकर' अलंकार होतो.[९]

या लक्षणाप्रमाणे 'संकरा'चा एक (म्हणजे संदेहसंकर हा) प्रकार होतो. उदा. माझेच पुढील पद्य–

'विधात्याने हिला चंद्रवदना, नीलकमलनयना, आणि शुभ्रकुंददन्तपंक्तीने युक्त अशी निर्मून आकाश, पाणी व जमीन या तिन्हींपासून तिचे रमणीय रूप घडवून[१०] तिला उत्पन्न केली आहे.'

या उदाहरणात 'हिचे मुख म्हणजे चंद्रच' किंवा 'हिचे मुख चंद्रासारखे आहे' अशा रूपक व उपमा या दोहोंचे अस्तित्व स्वतंत्रपणे संभवत असल्यामुळे व ते दोन्ही अलंकार एकाच वेळी असू शकत नाहीत म्हणून व दोघांपैकी एका अलंकाराचा स्वीकार करण्यास अनुकूल किंवा त्याग करावयाचा म्हटल्यास प्रतिकूल प्रमाण मिळत नाही, म्हणून 'संकर' आहे. त्यामुळे व्यंग्य अलंकार कोणता (व वाच्य अलंकार कोणता) हेच ठरविणे अशक्य असल्याने येथे ध्वनी असण्याची कल्पना तरी कोठली उद्भवणार?[११] आणि संकराचा दुसराही एक प्रकार आहे, तो म्हणजे शब्दालंकार व अर्थालंकार दोन्ही एकाच ठिकाणी असणे.[१२] त्या प्रकारातही (दोन्ही अलंकार 'वाच्य' असल्यामुळे) एक अलंकार सूचित असण्याची शंका कोठली असावयाला? उदा.–

'ज्याला तू आलिंगन देऊन रमवितेस, त्या स्मरतुल्य प्रियकराचे तू स्मरण कर.'

या एकाच उदाहरणात यमक व उपमाही आहे.[१३]

(संकराचा) तिसरा प्रकार म्हणजे ज्यातील वाक्याच्या एका भागात अनेक अर्थालंकार असतात, तो. तेथेही दोन्ही अलंकार सारखेच

वाच्य (म्हणजे दोहोंमध्ये वाच्यत्व हा समानधर्म) असल्यामुळे त्यातला कोणता व्यंग्य असणार ? उदा –

(सूर्य व दिवस या दोहोंचे) उदय (१. उगवणे २. उत्कर्ष) व अस्त (१. मावळणे २. संकटकाल) हे सारखेच म्हणजे एकाच वेळी घडून येणारे असल्यामुळे सूर्य अस्तास गेला असताना दिवस हा दुःखी-कष्टी होऊन वास्तव्यासाठी जणू काय अंधकाररूपी गुहेत प्रवेश करीत आहे.'[१४]

या उदाहरणात स्वामीच्या संकटकालाला साजेसे व्रत धारण करण्यास उन्मुक झालेल्या कुलपुत्राचा (म्हणजे घरंदाज सेवकाचा) दिवसावर केलेला (आर्थ) आरोप हे एकदेशविवर्ति रूपकाचे उदाहरण आहे असे दाखविलो[१५] आणि 'जणू काय' या शब्दाने उत्प्रेक्षा वाच्य झाली आहे. हे दोन प्रकार पुढील कारिकेने सांगितले आहेत–

'शब्दालंकार व अर्थालंकार जर एकाच वाक्यात असले, किंवा ते वाक्याच्या एका अंशात वास्तव्य करीत असले, तर त्या अलंकाराला 'संकर' म्हणण्यात येते.'[१६]

पण संकराचा चौथा प्रकार म्हणजे ज्या ठिकाणी अलंकारांमध्ये एक उपकार्य व दुसरा त्याला उपकारक असा संबंध असतो, तो. उदा.– 'जोराचा वारा असलेल्या ठिकाणच्या नीलकमलाप्रमाणे चंचल असणारा कटाक्ष त्या विशालनयना पार्वतीने हरिणींपासून घेतला, किंवा हरिणींनी तिच्यापासून घेतला'[१७] ?

या उदाहरणात हरिणींच्या कटाक्षाची तिच्या (म्हणजे पार्वतीच्या) कटाक्षांना दिलेली उपमा जरी व्यंग्य असली, तरी वाच्य असलेला संदेहालंकार त्या उपमेमुळेच उभा राहात असल्याने ती संदेहालंकाराचे अंग अत एव गौण आहे. आणि उपकार्य असलेल्या संदेहातच तिचे पर्यवसान होते. कारण म्हटले आहे–

'ज्या उदाहरणात अलंकार परस्परांना उपकारक[१८] होऊन राहिलेले असतात आणि त्यांपैकी कोणताही अलंकार स्वतंत्रपणे म्हणजे दुसऱ्यावर अवलंबून न राहता उभा राहू शकत नाही, ते उदाहरणही संकराचे होय.'[१९]

हाच आशय (वृत्तिकार) 'जेव्हा एक (व्यंग्य) अलंकार'... इ. वाक्यात सांगतात. याप्रमाणे चौथ्याही प्रकारामध्ये ध्वनीच्या अस्तित्वाचे निराकरण केले (म्हणजे त्या प्रकारात व्यंग्य अलंकाराचे प्राधान्य नसते हे दाखविले). पण मधल्या दोन (म्हणजे 'एकवाक्यानुप्रवेश' संकर व 'एकवाक्यांशानुप्रवेश' संकर या) प्रकारांमध्ये तर व्यंग्यार्थाचा संभवही नाही हे (आम्ही आताच पृ. २१५ व २१६ वर) सांगितलेच आहे. पण 'विधात्याने हिला चंद्रवदना'.... हे ज्याचे उदाहरण दिले आहे, त्या पहिल्या प्रकारात मात्र कसातरी (म्हणजे आलटून पालटून) एक अलंकार प्रधानत्वाने व्यंग्य असण्याचा संभव आहे अशी शंका कल्पून तिचे (वृत्तिकार) 'दोन्ही अलंकार (विकल्पाने)....' इ. वाक्याने निरसन करितात. 'सारखेच (प्राधान्य)'.... इ.––दोन्हींपैकी हा अलंकार व्यंग्य की तो अशी अनिश्चितता उत्पन्न होते म्हणून, हा आशय.

पण काय हो, जेथे व्यंग्य अलंकारच मुख्य आहेसे वाटते, तेथे काय करावे?[२०] उदा.–

मंदबुद्धी लोक हे केवळ लोकांत परंपरेने जे रूढ असेल, तेच डोळे मिटून मान्य करणारे असतात. त्यांना गुणांबद्दल यत्किंचितही प्रेम वाटत नाही. चंद्रकांतमणि हा चंद्र दिसल्यावरच पाझरतो; (माझ्या) प्रियेच्या मुखाच्या दर्शनाने नाही.'

या पद्यात प्रथम 'अर्थान्तरन्यास' अलंकार वाच्य असल्याचे ध्यानात येते, पण व्यतिरेक[२१] आणि अपह्नुति[२२] हे अलंकार व्यंग्य रूपाने आणि मुख्य म्हणून प्रत्ययास येतात, अशी शंका वृत्तिकार 'आणि (संकराच्या एखाद्या प्रकारात) जर'... इ. शब्दांच्या द्वारे घेतात आणि त्या शंकेचे उत्तर 'तर तोही'... इ. शब्दांनी देतात. त्या परिस्थितीत हे पद्य मुळी संकरालंकाराचे उदाहरणच होत नाही, तर ध्वनीच्या 'अलंकारध्वनि' नावाच्या दुसऱ्या प्रकाराचे होते.[२३] आणि जी विचारसरणी आम्ही पर्यायोक्ताच्या संदर्भात[२४] (पृ. १९९ व २०० वर) स्पष्ट करून सांगितली, ती सगळी या संकरालंकाराच्या बाबतीतही अवलंबावी. आता संकरालंकाराच्या कोणत्याही प्रकारामध्ये व्यंग्यार्थाच्या प्राधान्याची कल्पनाच करिता येत नाही याचे वृत्तिकार एक सर्वसामान्य कारण

'अपि च...' इ. शब्दांनी सांगतात. (यातील अपि (सुद्धा) याचा संबंध क्वचित् (म्हणजे कोठे) याच्याशी जोडून 'संकरालंकाराच्या कोठल्याही प्रकारात' असा करावा.[२५]) 'संकराच्या सर्व प्रकारांत' असा अर्थ, कारण (संकर म्हणजे) संकीर्णता म्हणजे मिसळून जाणे, म्हणजे एकमेकांत पूर्णपणे गुंतून जाणे. तेथे त्यांपैकी एक मुख्य कसा असणार ? दूध व पाणी यांच्या (समप्रमाणात केलेल्या) मिश्रणा-प्रमाणेच याही बाबतीत समजावे.[२६]

'प्रस्तुताहून वेगळ्या अशा दुसऱ्या वस्तूचे जे वर्णन, ती अप्रस्तुत-प्रशंसा होय ती तीन प्रकारची म्हणून सांगितली आहे–'[२७]

'अप्रस्तुताचे वर्णन म्हणजे प्रस्तुताचे सूचन करणाऱ्या अप्रस्तुताचे वर्णन' असा अर्थ. ते सूचन तीन प्रकारांनी होते– (१) प्रस्तुत व अप्रस्तुत यांमधील एक 'सामान्य' व एक 'विशेष' अशा संबंधामुळे होणारे (२) त्या दोहोंमधील एक 'कारण' व एक 'कार्य' या संबंधामुळे होणारे आणि (३) त्या दोन्हींमध्ये 'सादृश्य' असल्यामुळे होणारे (सूचन). त्यांपैकी पहिल्या दोन प्रकारांमध्ये प्रस्तुत व अप्रस्तुत हे दोन्ही सारखेच मुख्य असतात असे सर्वसामान्य स्वरूपाचे विधान वृत्तिकार 'अप्रस्तुतप्रशंसेमध्येदेखील'.... पासून 'प्राधान्य सारखेच असते' येथपर्यंतच्या वाक्याने करितात. त्यांपैकी (प्रस्तुत व अप्रस्तुत यांमध्ये) एक सामान्य व एक विशेष असा संबंध असेल, तेव्हा त्यात दोन प्रकार असतात– (१) 'सामान्य' हे अप्रस्तुत असून ते शब्दांनी वाच्य झालेले असते व 'विशेष' हे प्रस्तुत असून ते सुचविलेले असते, हा पहिला प्रकार. उदा.–

'हा संसार किती निष्ठुर आहे ! ही संकटे तरी किती दुष्ट स्वभावाची आहेत ! स्वभावतःच कुटिल असलेल्या दैवाच्या करणीचा शेवट किती अनर्थकारक होतो !'

या उदाहरणात सगळीकडेच, सामान्य स्वरूपाचे व अप्रस्तुत असलेले दैवाचे वर्चस्व वर्णिलेले असून त्या वर्णनाचे पर्यवसान कोणी-तरी नाश पावलेली प्रिय व्यक्ती या प्रस्तुत आणि 'विशेष' स्वरूपाच्या विषयांमध्ये होत आहे. आणि यातही विशेष स्वरूपाच्या अंशाला सामान्य हे नेहमीच व्यापून टाकीत असल्यामुळे[२८] व्यंग्य असलेल्या

विशेष प्रस्तुताप्रमाणे वाच्य असलेले अप्रस्तुत सामान्यदेखील प्रधान होय. कारण सामान्य व विशेष हे दोन्ही एकाच वेळी सारखेच प्रधान असणे यामध्ये तर्कदृष्ट्या कोणताही दोष वाटत नाही. या उलट जेव्हा विशेषस्वरूपी (वाच्य) असलेले अप्रस्तुत हे प्रस्तुत असलेल्या 'सामान्या'ला सुचविणारे असते, तेव्हा तो अप्रस्तुतप्रशंसा अलंकाराचा दुसरा प्रकार होय. उदा.–

'त्या अडाण्याने[२९] कमलवेलीच्या पानावरील जलबिन्दुला मौक्तिक मानले' हे तू तुझ्या मित्राच्या तोंडून ऐकलेस, ते काहीच नाही. आता याहूनही वरचढ असलेला दुसराही (त्याच्या मूर्खपणाचा) नमुना ऐक. त्या मूढाने तो मोती वाटलेला जलबिन्दू हळूच घेण्यासाठी त्याला थरथरत्या बोटाच्या टोकांनी जरा स्पर्श करताच तो दिसेनासा झाला व त्याबरोबर 'हाय हाय! माझा मोती कुठे उडून गेला?' असे तो म्हणतो, व स्वतःच्या अन्तःकरणाला झालेल्या व्यथेमुळे दररोज त्याच्या डोळ्याला डोळा लागेनासा झाला आहे!

या श्लोकात अगदी क्षुल्लक गोष्ट फार महत्त्वाची मानणे हा 'सामान्य' स्वरूपाचा अर्थ प्रस्तुत (व व्यंग्य) असून जलबिन्दूच्या ठिकाणी मौक्तिकाची कल्पना करणे हा अप्रस्तुत असलेला 'विशेष' स्वरूपाचा अर्थ 'वाच्य' आहे. याही ठिकाणी सामान्य व विशेष हे दोन्ही एकाच वेळी प्रधान असणे ही गोष्ट विरोधी नाही, असे आम्ही नुकतेच, याच पृष्ठाचे प्रारंभी म्हटले आहे. याप्रमाणे,'कारण ज्या वेळी'– येथपासून 'विशेषदेखील सामान्याइतकेच प्रधान होय' येथपर्यंतच्या (वृत्तीमधील) वाक्यात पहिल्या प्रकाराचा त्याच्या दोन्ही पोटभेदांसह विचार केला गेला. हाच (समान प्राधान्याचा) युक्तिवाद (अप्रस्तुत व प्रस्तुत यांमध्ये) कारण–कार्य संबंध असतानाही अतिदेशाने[३०] लागू करून त्याही प्रकाराचे दोन पोटभेद असतात हे (वृत्तिकार) 'आणि अप्रस्तुत व प्रस्तुत यांमध्ये कारणकार्य'... इ. वाक्याने दर्शवितात. काही वेळा कारण हे अप्रस्तुत असूनसुद्धा वाच्य असते व ते प्रस्तुत असलेल्या 'कार्या'ला सूचित करते. उदा.– '(आपल्या आप्तेष्टांचा) उत्कर्ष झाला की, जे हर्ष पावतात व जे संकटांचे वेळी त्यांना सोडून जात नाहीत, तेच खरे नातलग व तेच खरे मित्र होत. याहून

निराळे लोक केवळ स्वार्थसाधू असतात.'

या श्लोकातील वक्ता, सज्जनांवरील प्रेमामुळे मित्र व आप्त यांचे खरे स्वरूप हे अप्रस्तुत असलेले कारण वाचक शब्दांनी वर्णीत आहे. त्यामुळे 'स्वतःचे बोलणे विश्वसनीय आहे' हे प्रस्तुत 'कार्य' सुचविले जात आहे.[31] येथे 'कार्या'ची प्रतीती (ते प्रस्तुत असल्यामुळे) प्रामुख्याने) होत असली, तरी ती 'कारणा'च्या प्रतीतीवरच अवलंबून असल्याने ती कारणाची प्रतीतीसुद्धा मुख्य आहे व म्हणून व्यंजक असलेले कारण व व्यंग्य असलेले कार्य--दोघेही सारखीच मुख्य आहेत. पण काही वेळा अप्रस्तुत असलेले 'कार्य' वर्णिलेले म्हणजे वाच्य असते व ते प्रस्तुत असलेल्या 'कारणा'ला सूचित करते. उदा. 'सेतुबन्ध' काव्यात—

'समुद्रमंथनाच्या पूर्वीचा, पारिजातवृक्षविरहित असलेला स्वर्ग, कौस्तुभ आणि लक्ष्मी यांनी अजून भूषित न झालेले मधुसूदनाचे वक्ष:स्थल व सुंदर चन्द्रकलेने अद्यापि मंडित व्हावयाचा असलेला शंकराचा जटाभार यांची मला आठवण आहे.[32]'

या पद्यात कौस्तुभमणि किंवा लक्ष्मी यांविरहित असलेल्या श्री-विष्णूच्या वक्ष:स्थलाची आठवण असणे इ. अप्रस्तुत 'कार्या'चे वर्णन जाम्बवान् करीत आहे. ते वर्णन प्रस्तुत असलेले 'कारण' सुचवीत आहे. ते कारण म्हणजे वृद्धांची सेवा, चिरंजीवित्व, व्यवहारकुशलता इ. मन्त्र्याच्या ठिकाणी आवश्यक असणारे गुण.[33] येथे सुचविलेल्या प्रस्तुत कारणाची प्रतीती (प्रधानत्वाने) होत असली, तरी दुसऱ्या दृष्टीने म्हणजे त्या व्यंग्य कारणामुळे 'कार्याला' सजीवत्व येत असल्या-मुळे ते कार्यही आपल्या मुख्यत्वाची जाणीव करून देत आहे. म्हणून येथे वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांना सारखेच प्राधान्य आहे.[34] याप्रमाणे प्रत्येकी दोन दोन पोटभेद असलेल्या अप्रस्तुतप्रशंसेच्या दोन प्रकारांचे विवेचन केल्यावर तिसऱ्या 'सादृश्य' संबंधावर आधारलेल्या प्रकाराचे परीक्षण केले जात आहे. त्या प्रकारातही दोन उपप्रकार आहेत. काही वेळा अप्रस्तुत असलेल्या वाच्यार्थातच विशेष सौंदर्य असते आणि व्यंग्य प्रस्तुत हे अप्रस्तुताच्या तोंडाकडे पाहणारे, अतएव गौण असते. उदा. आमचे गुरु भट्टेन्दुराज यांचा पुढील श्लोक पाहा—

'ज्याने तुझ्यामध्ये प्राण घालून तुला जिवंत केले व आपल्या सामर्थ्याने तुला आपल्या पायावर उभे केले, ज्याच्या खांद्यावर तू दीर्घकाळ बसलास, इतकेच नव्हे तर ज्याने तुझी पूजासुद्धा केली त्या (उपकारकर्त्या) चे प्राण तू केवळ आपल्या स्मिताने हरण करतोस ! बाबा वेताळा ! तू उपकार करणाऱ्यांच्या अग्रभागी झळकतोस खरा !

या उदाहरणातून सादृश्याच्या जोरावर जरी प्रस्तुत असलेल्या कृतघ्न अशा दुसऱ्या कोणाचा वृत्तांत सूचविला जात असला, तरी यात अप्रस्तुत जो वेताळाचा वृत्तांत, तोच सौंदर्य निर्माण करणारा आहे. आणि एखाद्या निर्जीव वस्तूची निंदा करण्यामध्ये जशी असंभवनीयता असते तसा या उदाहरणातील (वाच्य) अर्थ असंभवनीय कोटीतला नाही. आणि तो रम्य नाही असेही नाही. म्हणून तो वाच्यार्थ येथ प्रधान आहे. पण जर अप्रस्तुत असलेल्या निर्जीव वस्तू वगैरेचे वर्णन त्यांच्या बाबतीत सर्वस्वी असंभवनीय असणारी विशेषणे लावून केले आणि त्यातून सूचित होणारा प्रस्तुत वृत्तांत जर रम्यता निर्माण करीत असेल, तर ते वस्तुध्वनीचेच उदाहरण होय. जसे माझाच पुढील श्लोक-

हे (चंद्र, उद्यान इ.) सर्व पदार्थांनो ! तुम्ही स्वतःचे वास्तव, चैतन्यमय स्वरूप झाकून जबरदस्तीने लोकांच्या हृदयावर आक्रमण करता व त्यांना आपल्या इच्छेनुसार निरनिराळ्या तऱ्हांनी नाचावयास लावून त्यांच्याशी खेळता. आता ते लोक आपण सहृदय आहोत अशी समजूत करून घेऊन व त्यामुळे गर्वित होऊन तुम्ही आपले चैतन्यमय स्वरूप लपविता. या कारणाने तुम्हाला ते 'अचेतन' म्हणून म्हणतात. तेव्हा मला वाटले की, या लोकांना जड (म्हणजे अचेतन) म्हणणे म्हणजे त्यांची प्रशंसाच करणे होय. कारण त्यामुळे त्यांचे तुमच्याशी सादृश्य आहे असे प्रकट केले जाते (व तुमच्या स्वयंभू मोठेपणाचा त्यांच्यावर आरोप केला जातो.)

'विरागी माणसानेही संसारी लोकांप्रमाणे वागावे' या न्यायाने कोणा एक महापुरुषाने प्रबल विवेकाच्या प्रकाशाने आपल्या भोवतीचे अंधकारपटल नाहीसे केले असले तरीही लोकांमध्ये तो आपले खरे स्वरूप दडवून ठेवीत असल्याने तो लोकांना आपल्याविषयी हेटाळ-णीने बोलावयास प्रवृत्त करतो. तो लोकांनी आपल्यावर केलेला

अडाणीपणाचा आरोप मान्य केल्यासारखेच दाखवून वावरत असल्याने तेच लोक 'हा मूर्ख आहे' म्हणून त्याची जेव्हा अवहेलना करतात, तेव्हा त्या महात्म्याचे, प्रस्तुत श्लोकाचा वर्ण्य विषय असलेले अलौकिक वर्तनच प्राधान्याने सूचित होते.

उद्यान, चन्द्रोदय इ. गोष्टींना लोक अचेतन समजून त्यांची हेटाळणी करतात. पण उलट त्या गोष्टी मात्र कोणातरी विरही जीवाला उत्कंठा, चिंता, इत्यादींनी अस्वस्थ करून सोडतात, तर अन्य कोणाला आनंदाने धुंद करून टाकतात. अशा रीतीने लोकांच्या विकारांना बळेच चाळवून त्या गोष्टी लोकांना हवे तसे नाचवितात. त्या गोष्टींचे खरे (चैतन्यमय) स्वरूप कसे आहे हे लोकांना कळत नाही, उलट अत्यंत गंभीर, अतिशय ज्ञानी, पूर्णपणे गर्वाने विरहित आणि लोकांना खेळविण्यात कमालीच्या चतुर असलेल्या त्या गोष्टींची लोकांनी वस्तुत: ज्ञानी म्हणून प्रशंसा करण्यास हवी, पण त्याऐवजी त्याच गोष्टींना लोक त्याच कारणास्तव (म्हणजे त्या आपले खरे स्वरूप लपवितात म्हणून) निर्जीवच मानू लागतात व ज्या कारणास्तव (म्हणजे त्या वस्तूंचे खरे स्वरूप आपल्याला कळत नाही यास्तव) लोकांनी स्वत:ला मूर्ख मानावयास पाहिजे, त्याच कारणास्तव ते स्वत:ला सहृदय, जाणते समजतात. तेव्हा अशा प्रकारचा अत्यंत ज्ञानी वस्तुसमूह या सामान्य लोकांना जड म्हणजे अचेतनच वाटत असल्यामुळे या लोकांना त्या वस्तुसमूहाप्रमाणे जड, मूर्ख म्हणणे म्हणजेही या लोकांची मोठी स्तुतीच होईल. अशा रीतीने 'हे जग (तथाकथित) जड वस्तूंपेक्षाही निंद्य आहे' असा अर्थ ध्वनित होतो.[३५] हाच आशय वृत्तिकार 'पण जेव्हा'....वगैरे शब्दांनी सांगतात. 'पण तसे असेल तर'...पण तसे नसल्यास (म्हणजे अप्रस्तुत वाच्यार्थ सुंदर असल्याने प्रधान असून, प्रस्तुत व्यंग्यार्थ गौण असेल तरच) तो अलंकारांपैकी एक म्हणजे 'अप्रस्तुतप्रशंसा' नावाचा एक विशिष्ट प्रकारचा अलंकारच होय आणि व्यंग्यार्थाचे प्राधान्य असल्यास तो अप्रस्तुतप्रशंसा अलंकार होणारच नाही (तर 'वस्तुध्वनि'च होईल) हा आशय. वृत्तीत 'पण समासोक्ति'...या वाक्यात अलंकारांची जी नावनिशी दिली आहे, त्या द्वंद्व समासाच्या शेवटी 'वगैरे' असा शब्द घातला आहे. त्या 'वगैरे' शब्दामुळे

(ज्याप्रमाणे अप्रस्तुतप्रशंसेचा, त्याचप्रमाणे) व्याजस्तुति वगैरे ज्या अलंकारवर्गामध्ये व्यंग्यार्थ असू शकतो त्या अलंकारवर्गांचा अंतर्भाव झाला आहे असे समजावे. अशा सर्वच (म्हणजे व्यंग्यार्थयुक्त) अलंकारांना लागू होईल असे सर्वसाधारण उत्तर देण्यास 'तेव्हा या बाबतीत सारांश असा' – या शब्दांनी वृत्तिकार आरम्भ करतात. प्रत्येक अलंकाराच्या बाबतीत मी किती लिहीत बसणार ? हे तात्पर्य. तेव्हा त्या अलंकारवर्गामधील व्याजस्तुतीचे उदाहरण पुढीलप्रमाणे—

'मला दुसऱ्याच्या घरातील भानगडींशी काय करावयाचे आहे ? पण मी पडलो दक्षिणेकडील माणस. स्वभावतःच बडबड्या असल्यामुळे मी गप्प राहू शकत नाही. अरेरे, काय दुःखाची गोष्ट आहे की, तुझी कीर्तिरूपी प्रेयसी एखाद्या कामांध, बेताल झालेल्या स्त्रीप्रमाणे प्रत्येक घरातून, बाजारातून, चौकातून, मदिरापानगृहातून भटकते आहे !'[36]

या उदाहरणात जो स्तुतिरूप व्यंग्यार्थ आहे, तो वाच्यार्थालाच सूचवितो (म्हणजे वाच्यार्थाचेच समर्थन करण्यासाठी खर्ची पडतो). पण कोणीतरी व्याजस्तुतीचे पुढीलप्रमाणे उदाहरण दिले आहे.–

'हे राजा ! पूर्वी (म्हणजे तुझे आजोबा राजपदी असताना) ही पृथ्वी तुझी आजी (पित्याची आई) होती. काही दिवसांनी (म्हणजे तुझे पिताजी राजपदावर आल्यावर) ती तुझी आई झाली. आता (तू स्वतः राजा झाल्यावर) समुद्ररूपी कमरपट्ट्याने भूषित अशी ती तुझ्या कुलाच्या उत्कर्षासाठी तुझी पत्नी झाली आहे. तुझ्या आयुष्याची शंभर वर्षे पूर्ण होऊन (तुझा मुलगा गादीवर आल्यावर) तीच निष्कलंक पृथ्वी पुनः तुझी सून (म्हणजे तुझ्या मुलाची साध्वी पत्नी) होईल. हे सगळे नीतिमत्ता संपूर्णपणे जाणणाऱ्या राजांच्या कुळामध्ये शोभणारे आहे काय ?'

हे उदाहरण आम्हांला 'ग्राम्य' वाटते, कारण ते अत्यंत असभ्य[37] गोष्टीची आठवण करून देणारे आहे. आणि शिवाय या वर्णनामुळे (राजाची) स्तुती ती काय झाली आहे ? 'तू केवळ वंशपरंपरेने राजा झालास' असे म्हटल्याने राजाचा कोणता मोठेपणा वर्णिला ? अशा प्रकारची व्याजस्तुति सहृदयांच्या वर्तुळात निंद्य मानली जाते, म्हणून तिच्याकडे सर्वस्वी दुर्लक्षच करावयास पाहिजे.

'एखाद्या चित्तवृत्तीचा परिणाम (त्या चित्तवृत्तीमुळे) हमखास उत्पन्न होतो व वक्त्याच्या मनातील ज्या उद्देशामुळे ती चित्तवृत्ती सुचविली जाते, तो उद्देश म्हणजेच भावालंकार होय.[३८]

येथेही वाच्यार्थ (त्यातील सौंदर्यामुळे) प्रधान असल्यास 'भाव' हा अलंकार होतो. ज्या विशिष्ट चित्तवृत्तीमुळे उत्पन्न होणारा बोलणे वगैरे परिणाम अडथळा न होता म्हणजे अटळपणे उत्पन्न होतो; आणि तो परिणाम ज्या उद्देशामुळे त्या चित्तवृत्तीला सूचित करतो, तो (म्हणजे उदा. एकणाऱ्या व्यक्तीने बोलणाऱ्या व्यक्तीचा) 'हवा तसा उपभोग घ्यावा' यासारखा उद्देशरूपी अर्थ म्हणजेच 'भावालंकार' होय. उदा.–

'ज्या अर्थी या घरात मी तरुण व एकटीच बाईमाणूस आहे, आणि ज्या अर्थी माझा घरधनी परगावी गेला आहे, त्या अर्थी हे खुळचा पांथस्था ! तू येथे राहण्यासाठी (माझी) विनवणी करण्याची काय गरज आहे ? अरे, ही माझी सासू बिचारी आंधळी आणि बहिरी पण आहे[३९] !'

या पद्यात जे सूचित आहे, ते[४०] एकेका शब्दाच्या वाच्य अर्थाला भूषित करणारे आहे[४१] आणि म्हणूनच येथे वाच्य अर्थच प्रधान होय. आणि व्यंग्य अर्थच मुख्य मानल्यास येथे किंवा अशा कोणत्याही पद्या-मध्ये) कोठलाही अलंकार नाही. हे आम्ही पूर्वी[४२] सांगितलेच असल्या-मुळे याबद्दल फार लिहिणे नको झाले.

'**ज्या ठिकाणी**' म्हणजे ज्या काव्यात. '**अलंकारच**'– ते (म्हणजे समासोक्ति इ ) 'अलंकार' असतात म्हणूनच[४३] तर त्यांम-धील व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाचे अंग (म्हणजे त्याला भूषित करणारा) असतो. '**जाणीव अस्पष्टपणे**[४४]'– ज्या उपमा वगैरे[४५] अलंकारात व्यंग्यार्थाची अंधूकपणेच प्रतीति होते. '**वाच्यार्थाला अनुसरणारा**' – वाच्य अर्थाकडून व्यंग्यार्थाचा प्राधान्याच्या बाबतीत 'अनुगम' (म्हणजे अनुकरण) केला जातो, म्हणजे दोघांना सारखेच प्राधान्य असते–जसे अप्रस्तुतप्रशंसेत (प्रस्तुत व अप्रस्तुत दोन्ही अर्थांना सारखेच प्राधान्य), त्याप्रमाणे.[४६] '**प्रत्ययाला येत नाही**'– प्राधान्य उघडपणे म्हणजे सहजपणे दिसून येत नाही, तर ते बळेच (म्हणजे

बराच विचार करून) कल्पावे लागते व ते तसे कल्पिले तरी ते सहृदयाच्या मनात भरत नाही. जसे 'हे वघ, माझी तुला विनंती आहे' ...इ. गाथेवर दुसऱ्या विवरणकारांनी केलेल्या (१,२, व ४ या) विवरणांमध्ये.[४७] तेव्हा या चार प्रकारांपैकी कोणत्याही प्रकाराला 'ध्वनि' हे नाव देता येत नाही. ते चार प्रकार म्हणजे त्या काव्यात व्यंग्यार्थ असूनही (१) तो व्यंग्यार्थ (वाच्यार्थाला) गौणच असताना (२) त्या व्यंग्यार्थाची प्रतीती अस्पष्टपणे होत असताना (३) तो व्यंग्यार्थ व वाच्यार्थ यांना सारखेच प्राधान्य असताना व (४) त्या व्यंग्यार्थाचे प्राधान्य सहजपणे कळून येणारे नसताना. 'मग' ध्वनी असतो तरी कोठे ? ' असे विचारल्यास त्याचे उत्तर (वृत्तिकार) 'ज्या उदाहरणात शब्द व वाच्यार्थ हे व्यंग्यार्थपरच '...इ. श्लोकाद्वारे देतात. 'अलंकाराच्या मिश्रणाची शंका घेऊ नये' याचे विवरण– 'मिश्रणापासून म्हणजे कोणताही अलंकार मानण्याच्या शक्यतेपासून जे उदाहरण अलिप्त असेल, तेच (ध्वनीचे उदाहरण समजावे), असा अर्थ. पण येथे ('संकर' याचा अर्थ 'मिश्रण' असा न करिता) 'संकरालंकाराने' (विरहित) असा अर्थ करणे चुकीचे आहे. कारण येथे संकरालंकार हा शब्द इतर कोणत्याही अलंकाराचे उपलक्षण (म्हणजे निदर्शक) म्हणून वापरला आहे असे तुम्ही मानिले, तर ती कल्पना क्लेशकारकच होईल.[४८]

टीपा

१. संकराच्या या प्रकाराला 'अंगांगिसंबंधावर आधारलेला' संकर म्हणतात. यात एक अलंकार दुसऱ्याचे अंग असल्यामुळे तो 'अंग' असलेला अलंकारच जेव्हा व्यंग्य असेल, व 'अंगी' असलेला अलंकार वाच्य असेल, तेव्हा तेथे व्यंग्यार्थ प्रधान असणे शक्यच नाही. आणि व्यंग्य अलंकारच प्रधान असून जेव्हा वाच्य अलंकार त्याचे अंग असेल, तेव्हा ते ध्वनीच्या एका, म्हणजे 'अलंकारध्वनि' या प्रकाराचे उदाहरण होईल.

२. हा संकराचा 'संदेहसंकर' नावाचा प्रकार. याच्या उदाहरणात 'येथे हा अलंकार आहे की तो,' असा संदेह वाटतो, म्हणून त्याला 'संदेहसंकर' म्हणतात. यात दोन्हीही अलंकार विकल्पाने सारखेच संभवू शकतात, म्हणून त्यांचे प्राधान्यही सारखेच असते.

३. विकल्पाने संभवू शकणाऱ्या त्या दोन्ही अलंकारांपैकी कोणताही एक वाच्य धरला, तर दुसरा व्यंग्य समजायचा.

४. पाहा, पृ. १९८ वरील 'पर्यायोक्त' अलंकारामध्येसुद्धा... वगैरे परिच्छेद.

५. 'संकर' म्हणजे पाणी व दूध यांच्या मिश्रणाप्रमाणे एकजीव झालेले मिश्रण. अशा एकरूप झालेल्या मिश्रणात त्याचे दोन घटक वेगळे कसे करावयाचे व त्यातला एक प्रधान व एक गौण हे कसे ठरवावयाचे ?

६. अप्रस्तुत असलेल्या गोष्टीचे वर्णन वाच्य असणे व त्यावरून प्रस्तुत गोष्ट सुचविली जाणे असे जेथे असेल, तेथे 'अप्रस्तुतप्रशंसा' हा अलंकार होतो. अर्थात् वाच्य अप्रस्तुताचा व्यंग्य प्रस्तुताशी काहीतरी संबंध असतोच. हा संबंध ज्या प्रकारचा असेल, त्यावर अप्रस्तुतप्रशंसेचे पाच प्रकार केले आहेत. प्रस्तुत 'सामान्य' स्वरूपाचे असताना (वाच्य) अप्रस्तुत 'विशेष' स्वरूपाचे असणे; याउलट प्रस्तुत 'विशेष' असताना वाच्य अप्रस्तुत 'सामान्य' स्वरूपाचे असणे; 'कारण' प्रस्तुत असताना अप्रस्तुत 'कार्य' वाच्य असणे व याउलट 'कार्य' प्रस्तुत असताना अप्रस्तुत 'कारण' वाच्य असणे व शेवटी एक गोष्ट प्रस्तुत असताना वाच्य वर्णन 'त्यासारख्या' पण दुसऱ्या अप्रस्तुत गोष्टीचे केलेले असणे; असे ते पाच प्रकार होत.

७. पाहा – उद्द्योत २, कारिका ३१.

८. या श्लोकांचे विवरण करताना अभिनवगुप्तांनी 'व्यङ्ग्यस्य वाच्यार्थानुगमे' याचा अर्थ व्यंग्यार्थ आणि वाच्यार्थ यांचे प्राधान्य (जेथे) सारखेच असते, असा केला आहे. 'यत्र व्यङ्ग्यस्य प्राधान्यं न प्रतीयते' याचा अर्थ त्यांनी 'जेथे व्यंग्यार्थाला खरे प्राधान्य नसून ते त्याच्यावर कोठलातरी युक्तिवाद पुढे करून बळाने लादले जाते, म्हणजे व्यंग्यार्थाची जाणीव अस्पष्ट असते' असा लावला आहे.

९. उद्भट, काव्यालंकारसारसंग्रह, ५–११.
मूळ ग्रंथात **अनेकालंक्रियोल्लेखे** असा पाठ आहे.

१०. म्हणजे आकाशातील चंद्रापासून तिचे वदन, पाण्यातील नीलकमलापासून तिचे नेत्र आणि जमिनीवरील कुंदलतेच्या कळ्यांपासून तिचे दन्त घडवून.

११. दोन संभाव्य अलंकारांपैकी एक वाच्य आहे असे निश्चित झाले, म्हणजेच दुसरा व्यंग्य आहे असे मानता येते. पण संदेहसंकर अलंकारात दोन्हींपैकी अमुकच वाच्य आहे असे ठरविता येत नसल्यामुळे दुसऱ्याला व्यंग्य म्हणणे शक्य नाही.

१२. या प्रकाराला 'एकाश्रय' किंवा 'एकानुप्रवेश' प्रकार म्हणतात.

१३. 'स्मरतुल्य' ही उपमा व '**स्मर**' '**स्मर**' अशी पुनरावृत्ती हे यमक.

१४. भामह, काव्यालंकार, ३–४८, हे उदाहरण भामहाने संकरालंकाराचे म्हणून

दिले नसून 'उत्प्रेक्षावयवा'चे म्हणून दिले आहे. भामहाने संकरालंकाराचा उल्लेखही केला नाही. अभिनवगुप्तांनी मात्र भामहाचे हे उदाहरण घेऊन त्यांत 'संकर' असल्याचे दाखविले आहे. याचे कारण अर्थात हेच असावे की 'उत्प्रेक्षावयव' म्हणजे अंगागिभावसंकरच आहे. पाहा, वामन, काव्यालंकारसूत्रवृत्ति, ४-३-३३. अभिनवगुप्तांनी हे उदाहरण वाक्याच्या एका अंशात दोन अलंकारांच्या संकराचे म्हणून दिले आहे. **वासाय वासरः क्लान्तो विशतीव तमोगुहाम्** । हा जो सर्व वाक्याचा एक अंश आहे, त्यात **तमोगुहाम्** व **वासरः** हे एकदेशविवर्ति रूपक असून त्यातच **विशतीव** ही उत्प्रेक्षाही आहे.

१५. या उदाहरणात उदय, अवसान, भास्वत् (१. सूर्य २. वैभवसंपन्न स्वामी) इ. शब्द श्लिष्ट आहेत. तसेच तमोगुहा (१. अंधार हीच गुहा, २. अंधारमय गुहा) हाही शब्द श्लिष्ट आहे, म्हणून ही सर्व वाच्य रूपकेच आहेत. पण **वासर** हा शब्द श्लिष्ट नसल्यामुळे त्याच्यावरील सेवकाचे रूपक वाच्य नसून 'आर्थ' आहे, म्हणून हे एकदेशविवर्ति रूपक आहे. एकदेशविवर्ति रूपकाच्या लक्षणासाठी पाहा, उद्भट, काव्यालंकारसारसंग्रह, बडोदा आवृत्ति, १-२२.

१६. पाहा, उद्भट, काव्यालंकारसंग्रह, बडोदा आवृत्ति, ५-२२.

१७. **कुमारसंभवम्**, 1-४६.

१८. उपकारक अलंकार हा कोणीतरी 'उपकार्य' अलंकार असेल तेव्हाच उपकारक होऊ शकतो. पण उपकार्याशिवाय दुसऱ्या कोणावर उपकारक उपकार करणार व उपकारक तरी कसा होणार ?

१९. उद्भट, ५-१३. अभिनवगुप्तांनी संकरालंकाराचे जे चार प्रकार दिले आहेत, ते उद्भटाला अनुसरून दिले आहेत. कारण इतर प्राचीन ग्रंथकारांनी (म्हणजे भामह, दण्डी, वामन व रुद्रट यांनी) संकर अलंकाराचे पद्धतशीर विवेचन कोठेही केले नाही. आनंदवर्धनांनी मात्र संकराच्या चार प्रकारांपैकी प्रस्तुत विवेचनाशी संबद्ध असे दोनच प्रकार विचारात घेतलेले दिसतात. एकवाचकानुप्रवेशाचे दोनही प्रकार त्यांनी विचारात न घेण्याचे कारण त्यांमध्ये दोन्ही अलंकार वाच्य असल्यामुळे तेथे व्यंग्यत्वाचा व म्हणून ध्वनीचा संबंधच येत नाही, हे असावे.

२०. म्हणजे जेथे व्यंग्य अलंकार प्रधान व वाच्य अलंकार गौण अशी परिस्थिती असते, त्या उदाहरणात 'ध्वनि' मानावयाचा की नाही, ही शंका.

२१. '(माझ्या) प्रियेचे मुख हे चंद्राहूनही अधिक गुणसंपन्न आहे' असा व्यतिरेक अलंकार येथे सूचित होतो. 'व्यतिरेक' अलंकाराची माहिती पूर्वी पृ. ९ वरील ५ व्या टीपेत दिलीच आहे.

२२. 'चंद्र हा खरा चंद्र नव्हे, तर प्रियेचे मुख हाच खरा चंद्र होय' अशी अपह्नुति येथे सूचित होत आहे. 'अपह्नुति' अलंकाराच्या माहितीसाठी पृ. ९. वरील ७ वी टीप पाहा.

२३. म्हणजे या पद्यात 'व्यतिरेकध्वनि' व 'अपह्नुतिध्वनि' असे अलंकार-ध्वनीचे प्रकार आहेत

२४. म्हणजे 'हे धार्मिका'... इ. गाथेच्या अनुषंगाने.

२५. म्हणजे अभिनवगुप्तांनी वृत्तीमधील क्वचित् याचा अर्थ 'काही ठिकाणी' असा न करिता 'कोणत्याही प्रकारात' म्हणजे 'सर्व ठिकाणी' असा लाविला.

२६. दूध व पाणी यांच्या (समप्रमाण) मिश्रणात पाण्याचा अंश जास्त हे लोकांच्या लक्षात येत नाही, असे अभिनवगुप्तांना म्हणावयाचे आहे. 'नीरक्षीरवत् संकर' ह्या संकराच्या बाबतीत देण्यात येणारा प्रसिद्ध दृष्टांत प्रथम अभिनवगुप्तांनीच उघडपणे वापरला असे दिसते. आनंद-वर्धनांनी २ ऱ्या उद्द्योतात (काशी आवृत्ति, पृ. २२८ वर) संकरालंकाराला उद्देशून 'नरसिंहवत्' असा दृष्टांत दिला आहे.

२७. भामह, काव्यालंकार, ३–२९ येथील लक्षणामधील (अप्रस्तुतप्रशंसेचे तीन प्रकार असतात, असे सांगणारा) ४ था चरण भामहाच्या किंवा उद्-भटाच्या ग्रंथात आढळत नाही. तो चरण अभिनवगुप्तांनी स्मरणाच्या आधारे किंवा नवीन रचून घातलेला दिसतो. अप्रस्तुतप्रशंसेचे भिन्न प्रकार वामनानेही दिलेले नाहीत. उद्भटाच्या लक्षणात अप्रस्तुताचा प्रस्तुताशी कोणतातरी संबंध असतो' इतकेच म्हटले आहे. त्या संबंधाचे निरनिराळे प्रकार त्याने सांगितले नाहीत. आनंदवर्धनांनी हे प्रकार प्रथमच स्पष्टपणे उल्लेखिलेले दिसतात.

२८. म्हणजे विशेष अंश आणि सामान्य अंश हे (सागर व तरंग याप्रमाणे) एकरूपच असल्यामुळे.

२९. भल्लटशतकम्, ९४.

३०. एका बाबतीत लागू पडणारा युक्तिवाद (किंवा दृष्टांत वगैरे) दुसऱ्या तत्समान बाबतीला लागू करणे याला 'अतिदेश' म्हणतात.

३१. या श्लोकातील वक्त्याला शेवटी 'माझ्या बोलण्यावर विश्वास ठेव' हाच प्रस्तुत असलेला अर्थ सुचवावयाचा आहे व तो अर्थ 'कार्य' रूप आहे. या 'कार्या'चे कारण 'मीच तुझा खरा मित्र किंवा नातलग (म्हणजे हित-चिंतक) आहे' हे आहे. कारण वस्तुतः 'विशेष' स्वरूपाचे आहे व तशा स्वरूपातच ते वाच्य असावयास पाहिजे होते. पण येथे तसे न करिता ते (' जे आपल्या आप्तेष्टांच्या उत्कर्षाने हर्ष पावतात व आप्तेष्टांच्या संकटात

सोडून जात नाहीत तेच खरे मित्र ' अशा)' सामान्य स्वरूपाने वाच्य केलेले आहे.

३२. सेतुबन्ध, ४–२०.

३३. या ठिकाणी ' चिरजीवित्व इ. (मन्त्रिपदास आवश्यक असलेले) गुण माझ्या मध्ये आहेत ' हा अर्थ प्रस्तुत असून तो व्यंग्य आहे. तो कारणरूप असून ' फार पूर्वीच्या गोष्टींचे स्मरण होणे ' हे त्याचे कार्य आहे (मी चिरजीवी असल्यामुळेच इतक्या जुन्या गोष्टी मला आठवतात हा कारण–कार्यभाव होय). हे ' कार्य ' येथे अप्रस्तुत असून वाच्य आहे.

३४. सारांश, सामान्य–विशेषभाव व कार्यकारणभाव यांवर आधारलेल्या अप्रस्तुत-प्रशंसेमध्ये व्यंग्य प्रस्तुत अर्थ व वाच्य अप्रस्तुत अर्थ हे दोन्ही सारखेच प्रधान असतात. म्हणून येथे वाच्यार्थाहून व्यंग्यार्थाला प्राधान्य अशी परिस्थिति नसल्यामुळे येथे ' ध्वनित्व ' नाही.

३५. या उदाहरणात उद्यान, चन्द्रोदय इत्यादींचा वृत्तांत अप्रस्तुत असून ' वाच्य ' आहे व त्यामुळे महापुरुषाचा वृत्तांत हा प्रस्तुत अर्थ सुचविला जातो. या प्रस्तुत अर्थामधून ' सामान्य संसारी लोक हे तथाकथित अचेतन वस्तूंहून अधिक निन्द्य आहेत हा आणखी अर्थ सुचविला जात आहे. अशा रीतीने एका वस्तुध्वनीतून दुसरा वस्तुध्वनि असे हे उदाहरण आहे. अशा प्रकारचे ' पश्य निश्चलनिष्पन्दा '...इ. उदाहरण मम्मटाने काव्यप्रकाशातील दुसऱ्या उल्लासात सातव्या कारिकेच्या पूर्वार्धावरील वृत्तीच्या शेवटी दिले आहे.

३६. भाट राजाची निंदा करावयास कसा धजेल ? तेव्हा येथे वाच्यार्थ प्रस्तुत संदर्भाशी जुळणारा नाही. म्हणून स्तुतिरूप व्यंग्यार्थाने वाच्यार्थाचे समर्थन करणे अवश्य होते. अशा रीतीने हा ' वाच्यसिद्ध्यंगव्यंग्या ' चा प्रकार आहे. अभिनवगुप्त नेहमी अलंकाराचे लक्षण उद्धृत करून त्याचे उदाहरण देतात पण ' व्याजस्तुति ' अलंकाराचे लक्षण मात्र त्यांनी दिलेले नाही. उद्भटाने केलेले ' व्याजस्तुती ' चे लक्षण असे–

' अभिधेने निंदा केलेली वाटली, तरी वस्तुतः ती स्तुति असणे.' पाहा, उद्भट काव्यालंकार. ५–१६.

अभिनवगुप्तांनी व्याजस्तुतीचे जे उदाहरण दिले आहे, तो श्लोक ' मातंग-दिवाकरा ' चा आहे असे ' शाङ्र्गधरपद्धति ' व ' सुभाषितावलि ' यांमध्ये म्हटले आहे.

व्याजस्तुतीच्या या उदाहरणात राजाची ( कीर्तिरूपी ) प्रेयसी बेताल होऊन जागोजाग भटकते, ही वरकरणी निंदा होते, पण ' तुझी कीर्ति सर्वत्र पसरली आहे ' हा सुचविला जाणारा अर्थ स्तुतिपर आहे.

३७. आजीने आपल्या पुत्राशी, मग त्याच्या पुत्राशी, मग त्याच्या पुत्राशी

अशा क्रमाने व्यभिचार करीत राहणे हे अत्यंत हीन अभिरुचीचे द्योतक आहे. 'व्याजस्तुतीमध्ये' दरवर निंदा असावी लागते, पण त्या निंदेने इतकी खालची पायरी गाठणे योग्य नव्हे.

३८. रुद्रट, काव्यालंकार, ७–३८. रुद्रटाच्या या व्याख्येचा अनुवाद आम्ही अभिनवगुप्तांच्या विवरणास अनुसरून केला आहे. या कारिकेतील **तत्प्रतिबन्धम्** हा पाठ अभिनवगुप्तांनी स्वीकारला नसल्यामुळे त्या पाठाप्रमाणे विवरण अभिनवगुप्तांनी केलेले नाही. रुद्रटाच्या ग्रंथावर टीका लिहिणारा नमिसाधु ( ११ व्या शतकाच्या उत्तरार्धात, म्हणजे अभिनवगुप्तांच्या लगेच नंतर झालेला ) याने **तत्प्रतिबन्धम्** याचा अर्थ वक्त्याच्या मनातील अभिप्राय व त्याचे बोलणे यांमधील कारण-कार्यसंबंध, असा केला आहे. त्याच्या आधाराने प्रस्तुत व्यंजनेच्या संदर्भात **तत्प्रतिबन्धम्** याचा अर्थ 'वक्त्याचा उद्देश व बोलणे यांमधील व्यंग्य–व्यंजक संबंध' असा करावा असे आम्हास वाटते. **यस्य विकारः** यामधील **यस्य** याचा अर्थ अभिनवगुप्तांनी 'ज्या विशिष्ट चित्तवृत्तीचा' असा केला आहे, तर नमिसाधूने 'ज्या म्हणजे बोलणाऱ्या व्यक्तीचा' असा केला आहे. **विकारः** याचा अर्थ अभिनवगुप्त व नमिसाधु या दोघांनीही एकच, म्हणजे 'बोलणे इत्यादि परिणाम' असा केला आहे. रुद्रटाने भावालंकाराचे दोन प्रकार करून त्यांची लक्षणे व उदाहरणे दिली आहेत, पण अभिनवगुप्तांनी येथे पहिल्या प्रकारचे लक्षण उद्धृत करून उदाहरण मात्र २ ऱ्या प्रकारचे दिले आहे. हे असे करण्याचे कारण या दोन प्रकारांमध्ये फारसा फरक नाही, हेच होय.

३९. रुद्रट, काव्यालंकार, ७–४१ अभिनवगुप्तांनी उद्धृत केलेल्या उदाहरणात **कं याचसे** (कोणाला विनंती करितोस) असा पाठ आहे पण मूळ रुद्रटाच्या ग्रंथात '**किं याचसे**' (विनवणी करण्याची काय गरज) असा पाठ असून तो निश्चितपणे सरस असल्यामुळे आम्ही तो पाठ स्वीकारून त्याला अनुसरूनच अनुवाद केला आहे.

४०. या पद्यातील तरुण, एकटीच इ. शब्दांतून तू माझा उपभोग घेण्यास परिस्थिती कशी अनुकूल आहे हे सुचविले जात आहे

४१. याची अधिक स्पष्ट कल्पना येण्यासाठी पाहा, ध्वन्यालोक, काशी आवृत्ति, पृ. ४८५ वरील वृत्तीमधील **तस्माद् वाक्यं तत्र ध्वनिः, पदानि तु गुणीभूतव्यङ्ग्यानि**' हे वाक्य.

४२. 'पूर्वी' म्हणजे उदा. पृ. १९९ वर. पर्यायोक्त अलंकाराच्या संदर्भात व्यंग्यार्थ हा प्रधान असल्यास हे वस्तुध्वनीचे उदाहरण होईल, अलंकाराचे होणार नाही, असा अभिनवगुप्तांचा अभिप्राय.

४३. पाहा, पृ. १८०

४४. पाहा. पृ. २२६ वरील ७ वी टीप.

४५. रूपक, दीपक इ. अलंकारांत औपम्य ( म्हणजे साम्य ) व्यंग्य असते, पण उपमेत ती जेव्हा 'धर्मलुप्ता' ( म्हणजे उपमान व उपमेय यांतील साधारण धर्माचा उल्लेख केलेला नसलेली असते, तेव्हाच तीतील साधारण धर्म व्यंग्य असतो.

४६. पाहा. पृ. २०८.

४७. पाहा, पृ. ११४–११६.

४८. 'संकार' याचा अर्थ 'संकरालंकार' असा घेतला, तर संकरोज्झितः याचा अर्थ 'फक्त संकरालंकाराचेच' मिश्रण असता कामा नये, इतर अलंकाराचे मिश्रण चालेल,' असा होईल. पण हे मत वृत्तिकारांना तर मुळीच अभिप्रेत नाही. म्हणून पूर्वपक्ष्याने 'संकरालंकार' याचा अर्थ 'संकरालंकार व तत्सम कोणताही अलंकार' असा समजावा असे म्हटले, तर ही कल्पना क्लिष्ट आहे. म्हणजे संकर या शब्दाचा ( कोणत्याही अलंकाराशी ) 'मिश्रण' असा सरळ, सुटसुटीत अर्थ न करिता प्रथम 'संकरालंकार' असा अर्थ करणे व मग संकरालंकाराला इतर अलंकारांचेही उपलक्षण मानून अर्थ लावणे यामध्ये कल्पनागौरव दोष आहे असे अभिनवगुप्तांचे म्हणणे.

ध्वन्यालोकः

इतश्च नान्तर्भावः, यतः काव्यविशेषोऽङ्गी ध्वनिरिति कथितः। तस्य पुनरङ्गानि – अलंकारा गुणा वृत्तयश्चेति प्रतिपादयिष्यन्ते। न चावयव एव पृथग्भूतोऽवयवीति प्रसिद्धः। अपृथग्भावे तु तदङ्गत्वं तस्य। न तु तत्त्वमेव। यत्रापि वा तत्त्वं तत्रापि ध्वनेर्महाविषयत्वान्न तन्निष्ठत्वमेव। 'सूरिभिः कथित' इति विद्वदुपज्ञेयमुक्तिः, न तु यथाकथञ्चित्प्रवृत्तेति प्रतिपाद्यते। प्रथमे हि विद्वांसो वैयाकरणाः, व्याकरणमूलत्वात्सर्वविद्यानाम्। ते च श्रूयमाणेषु वर्णेषु ध्वनिरिति व्यवहरन्ति।

तथैवान्यैस्तन्मतानुसारिभिः सूरिभिः काव्यतत्त्वार्थदर्शिभिर्वाच्यवाचकसंमिश्रः शब्दात्मा काव्यमिति व्यपदेश्यो व्यञ्जकत्वसाम्याद् ध्वनिरित्युक्तः। न चैवंविधस्य ध्वनेर्वक्ष्यमाणप्रभेदतद्भेदसंकलनया महाविषयस्य यत्प्रकाशनं तदप्रसिद्धालंकारविशेषमात्रप्रतिपादनेन तुल्यमिति तद्भावितचेतसां युक्त एव संरम्भः। न च तेषु

कथञ्चिदीर्ष्यया कलुषितशेमुषीकत्वमाविष्करणीयम् । तदेवं ध्वनेस्तावद्-भाववादिनः प्रत्युक्ताः ।

ध्वन्यालोक

असा अंतर्भाव होत नाही याला आणखी एक कारण असे की, ध्वनि हे एक विशेष प्रकारचे काव्य आहे, ध्वनि हा 'अंगी' आहे, असे सांगण्यात आले आहे आणि त्याची अंगे म्हणजे अलंकार, गुण, वृत्ति ही होत, हे पुढे[1] सांगितले जाईल. आणि (अवयवीचा) बाजूला काढलेला अवयव म्हणजेच अवयवी अशी काही प्रसिद्धी नाही. आणि तो अवयव बाजूला काढला नसेल, तर तो अवयवीचे केवळ एकच अंग असतो. अवयवी आणि तो यांचे काही तादात्म्य नसते. आणि ज्या एखाद्या अलंकारात ध्वनित्व[2] असेल, तेथेही ध्वनीची व्याप्ती मोठी असल्याने ध्वनि काही फक्त त्या उदाहरणातच असतो, असे मुळीच नाही.

'विद्वानांनी सांगितलेला' या (कारिकेतल्या) शब्दांनी (ध्वनि) ही संज्ञा विद्वानांनी (जाणून बुजून) सुरू केलेली आहे, (तिला परंपरा आहे), ती अकस्मात् कोणीतरी अलवत्या-गलवत्याने प्रचारात आणलेली नाही, असे प्रकट केले आहे. सर्व विद्यांचा पाया व्याकरण हाच असल्याने विद्वानांचे अग्रणी वैयाकरण हेच होत, आणि ते, कानांवर पडणाऱ्या वर्णांना 'ध्वनि' असे म्हणतात. त्याचप्रमाणे त्यांच्या मताला अनुसरणाऱ्या, काव्याचे खरे स्वरूप जाणणाऱ्या इतर विद्वानांनी (म्हणजे आम्ही, ध्वनिकाव्यशास्त्रकारांनी) वाच्यार्थ व वाचक शब्द यांचे परस्परानुरूप (व्यंग्यार्थानुकूल) मिश्रण असलेल्या व म्हणून काव्य या संज्ञेस पात्र असलेल्या वाङ्मयप्रकाराला, त्या प्रकारामध्ये आणि वैयाकरणांच्या ध्वनीमध्ये व्यंजकत्व हे साम्य असल्याने 'ध्वनि' असे नाव दिले.[3]

आणि अशा प्रकारच्या ध्वनीचे पुढे सांगितले जाणार असलेले मोठे प्रकार आणि त्यांचे उपप्रकार यांची मोजदाद केल्यास त्याचे क्षेत्र फार मोठे असल्याचे दिसून येईल. असा ध्वनि लोकांच्या नजरेस आणणे हे केवळ एखादा अप्रसिद्ध बारीकसा अलंकार उजेडात आणण्याइतके किरकोळ नाही. म्हणून ध्वनीमुळे आमच्यासारख्यांचे मन प्रभावित होऊन त्यांनी इतक्या अभि-निवेशाने हा खटाटोप करावा, हे अगदी योग्यच आहे. आणि कोणीही

उगाचच ईर्ष्येच्या आहारी जाऊन आमची बुद्धी विकृत झाल्याचा आरोप आमच्यावर कुठून तरी, कसा तरी लादणे योग्य नव्हे. तेव्हा अशा प्रकारे, 'ध्वनि नाही' असे म्हणणारांचे तर खंडन झाले.

लोचनम्

इतश्चेति। न केवलमन्योन्यविरुद्धवाच्यवाचकभावव्यङ्ग्यव्यञ्जकभावसमाश्रयत्वान्न तादात्म्यमलङ्काराणां ध्वनेश्च यावत्स्वामिभृत्यवदङ्गिरूपाङ्गरूपयोर्विरोधादित्यर्थः। अवयव इति। एकैक इत्यर्थः। तदाह– पृथग्भूत इति। अथ पृथग्भूतस्तथा मा भूत्, समुदायमध्यनिपतितस्तर्ह्यस्तु तथेत्याशङ्क्याह–अपृथग्भावे त्विति। तदापि न स एक एव समुदायः, अन्येषामपि समुदायिनां तत्र भावात्; तत्समुदायिमध्ये च प्रतीयमानमप्यस्ति, न च तदलङ्काररूपं, प्रधानत्वादेव। यत्त्वलङ्काररूपं तदप्रधानत्वान्न ध्वनिः। तदाह– न तु तत्त्वमेवेति। नन्वलङ्कार एव कश्चित्त्वया प्रधानताभिषेकं दत्त्वा ध्वनिरित्यात्मेति चोक्त इत्याशङ्क्याह– यत्रापि वेति। न हि समासोक्त्यादीनामन्यतम एवासौ तथास्माभिः कृतः, तद्विविक्तत्वेऽपि तस्य भावात्, समासोक्त्याद्यलङ्कारस्वरूपस्य समस्तस्याभावेऽपि तस्य दर्शितत्वात् 'अत्ता एत्थ' इति, 'कस्स वा ण' इत्यादि। तदाह– न तन्निष्ठत्वमेवेति। विद्वदुपज्ञेति। विद्वद्भ्य उपज्ञा प्रथम उपक्रमो यस्या उक्तेरिति बहुव्रीहिः। तेन 'उपज्ञोपक्रमम्' इति तत्पुरुषाश्रयं नपुंसकत्वं निरवकाशम्। श्रूयमाणेष्विति। श्रोत्रशष्कुलीं सन्तानेनागता अन्त्याः शब्दाः श्रूयन्त इति प्रक्रियायां शब्दजाः शब्दाः श्रूयमाणा इत्युक्तम्। तेषां घण्टानुरणनरूपत्वं तावदस्ति; ते च ध्वनिशब्देनोक्ताः; यथाह भगवान् भर्तृहरिः —

यः संयोगवियोगाभ्यां करणैरुपजन्यते।
स स्फोटः, शब्दजाः शब्दा ध्वनयोऽन्यैरुदाहृताः॥ इति॥

एवं घण्टादिनिर्ह्रादस्थानीयोऽनुरणनात्मोपलक्षितो व्यङ्ग्योऽप्यर्थो ध्वनिरिति व्यवहृतः। तथा श्रूयमाणा ये वर्णा नादशब्दवाच्या अन्त्यबुद्धिनिर्ग्राह्यस्फोटाभिव्यञ्जकास्ते ध्वनिशब्देनोक्ताः। यथाह भगवान् स एव—

प्रत्ययैरनुपाख्येयैर्ग्रहणानुगुणैस्तथा ।
ध्वनिप्रकाशिते शब्दे स्वरूपमवधार्यते ॥ इति ॥

तेन व्यञ्जकौ शब्दार्थावपीह ध्वनिशब्देनोक्तौ । किञ्च वर्णेषु तावन्मात्रपरिमाणेष्वपि सत्सु, यथोक्तम्—

अल्पीयसापि यत्नेन शब्दमुच्चारितं मतिः ।
यदि वा नैव गृह्णाति वर्णं वा सकलं स्फुटम् ॥ इति ।

तेषु तावत्स्वेव श्रूयमाणेषु वक्तुर्योऽन्यो द्रुतविलम्बितादिवृत्तिभेदात्मा प्रसिद्धादुच्चारणव्यापारादभ्यधिकः स ध्वनिरुक्तः । यदाह स एव—

शब्दस्योर्ध्वमभिव्यक्तेर्वृत्तिभेदे तु वैकृताः ।
ध्वनयः समुपोहन्ते स्फोटात्मा तैर्न भिद्यते ॥ इति ।

अस्माभिरपि प्रसिद्धेभ्यः शब्दव्यापारेभ्योऽभिधातात्पर्यलक्षणारूपेभ्योऽतिरिक्तो व्यापारो ध्वनिरित्युक्तः । एवं चतुष्कमपि ध्वनिः । तद्योगाच्च समस्तमपि काव्यं ध्वनिः । तेन व्यतिरेकाव्यतिरेकव्यपदेशोऽपि न न युक्तः । वाच्यवाचकसंमिश्र इति । वाच्यवाचकसहितः संमिश्र इति मध्यमपदलोपी समासः । 'गामश्वं पुरुषं पशुम्' इतिवत्समुच्चयो ऽत्र चकारेण विनापि । तेन वाच्योऽपि ध्वनिः, वाचकोऽपि शब्दो ध्वनिः, द्वयोरपि व्यञ्जकत्वं ध्वनतीति कृत्वा । संमिश्र्यते विभावानुभावसंवलनयेति व्यङ्ग्योऽपि ध्वनिः, ध्वन्यत इति कृत्वा । शब्दनं शब्दः शब्दव्यापारः, न चासावभिधादिरूपः, अपि त्वात्मभूतः, सोऽपि ध्वननं ध्वनिः । काव्यमिति व्यपदेश्यश्च योऽर्थः सोऽपि ध्वनिः, उक्तप्रकारध्वनिचतुष्टयमयत्वात् । अत एव साधारणहेतुमाह —व्यञ्जकत्वसाम्यादिति । व्यङ्ग्यव्यञ्जकभावः सर्वेषु पक्षेषु सामान्यरूपः साधारण इत्यर्थः। यत्पुनरेतदुक्तं 'वाग्विकल्पानामानन्त्यात्' इत्यादि, तत्परिहरति—न चैवंविधस्येति । वक्ष्यमाणः प्रभेदो यथा — मुख्ये द्वे रूपे । तद्भेदा यथा-अर्थान्तरसंक्रमितवाच्यः अत्यन्ततिरस्कृतवाच्य इत्यविवक्षितवाच्यस्य, असंलक्ष्यक्रमव्यङ्ग्यः इति विवक्षितान्यपरवाच्यस्येति । तत्रापि अवान्तरभेदाः । महाविषयस्येति — अशेषलक्ष्यव्यापिन इत्यर्थः । विशेषग्रहणेनाव्यापकत्वमाह । मात्रशब्देनाङ्गित्वाभावम् । तत्र ध्वनिस्वरूपे भावितं प्रणिहितं चेतो येषां तेन वा चमत्काररूपेण भावितमधिवासितमत

एव मुकुलितलोचनत्वादिविकारकारणं चेतो येषामिति । अभाववादिन इति । अवान्तरप्रकारत्रयभिन्ना अपीत्यर्थः ।

लोचन

'आणखी एक कारण असे' – अलंकार हे वाच्य–वाचकसंबंधावर आधारलेले असतात व ध्वनि हा त्या संबंधाहून सर्वस्वी वेगळ्या अशा व्यंग्य–व्यंजकसंबंधावर आधारलेला असतो, येवढ्यामुळेच ध्वनि व अलंकार एकच नाहीत असे नाही, तर ध्वनि व अलंकार यांमध्ये मालक व सेवक यांच्याप्रमाणे अनुक्रमे मुख्य व गौण असा निराळेपणा असतो, म्हणूनही (ते एक नव्हेत) असा अर्थ. 'अवयव म्हणजेच'....इ. 'एकेक वेगवेगळा अवयव' असा आशय. तेच वृत्तिकार 'बाजूला काढलेला' या शब्दांनी सांगतात. यावर कोणी म्हणेल की, 'अवयव (अवयवीपासून) वेगळा काढला, तर त्याला तुम्ही 'अवयवी' समजू नका वाटले तर, पण तो अवयव, समुदायाचा घटक असल्यामुळे तो अवयव 'अवयवी' होऊ शकेल ! तर या शंकेला वृत्तिकार 'आणि तो बाजूला काढला नसेल तर' इ. शब्दांनी उत्तर देतात. तरीदेखील (म्हणजे तो अवयव समुदायातच राहिला, तरीसुद्धा) तो एकटा अवयव म्हणजेच समुदाय नव्हे, कारण आणखीही अवयव त्या समुदायात असतात (म्हणून त्याला एकट्यालाच समुदाय समजणे योग्य होणार नाही). शिवाय ध्वनिकाव्याच्या त्या (म्हणजे गुण, अलंकार इ.) घटक अवयवांमध्ये व्यंग्यार्थ हाही एक अवयव असतो. आणि तो व्यंग्यार्थ काही 'अलंकार' स्वरूपाचा असत नाही, याचे कारण तो व्यंग्यार्थ मुख्य (म्हणजे 'अलंकार्य') असतो, हेच होय. आणि जो व्यंग्यार्थ अलंकारस्वरूपी असतो, तो प्रधान नसल्यामुळे तो 'ध्वनि' नसतो. म्हणून (वृत्तिकार) म्हणतात– 'तो अवयव आणि अवयवी यांचे तादात्म्य नसते.'

'पण काय हो, तुम्ही (समासोक्ति वगैरेसारखा) कोठला तरी अलंकारच घेऊन त्याची मुख्य म्हणून प्रतिष्ठापना करीत आहात आणि त्यालाच 'ध्वनि' आणि 'काव्याचा आत्मा' म्हणत आहात, दुसरे काय ?' अशी कोणी शंका घेतली, तर तिला वृत्तिकार 'आणि ज्या एखाद्या अलंकारात 'ध्वनित्व असेल' ....इ. शब्दांनी उत्तर देतात.

वस्तुत: आम्ही काही समासोक्ति वगैरेपैकीच एखादा अलंकार घेऊन त्यावर 'ध्वनि' म्हणून शिक्कामोर्तब केले नाही, कारण ज्या उदाहरणात (समासोक्ति, इ.) अलंकाराचा स्पर्शही नसतो, तेथेही ध्वनि असू शकतो. समासोक्ति वगैरे अलंकारवर्गापैकी कोणताही अलंकार नसलेल्या ठिकाणीही ध्वनि असतो, हे आम्ही पूर्वी 'सासूबाई येथे....' या (पृ. १०८ वरील) आणि 'आपल्या प्रियेच्या अधरोष्ठावर....' या (पृ. ११८ वरील). उदाहरणांच्या द्वारे दाखविले आहे. म्हणून वृत्तिकार म्हणतात – 'ध्वनि फक्त त्या उदाहरणातच असतो, असे मुळीच नाही.'

'विद्वानांनी सुरू केलेली'–'विद्वानांकडून ज्या संज्ञेचा ('उपज्ञा' म्हणजे) प्रथम वापर करण्यात आला, अशी' असा हा (व्यधिकरण-) बहुव्रीहि समास आहे. पाणिनीच्या 'उपज्ञोपक्रमं...' इ. सूत्राप्रमाणे[४] उपज्ञा व उपक्रम हे शब्द तत्पुरुष समासाच्या शेवटी असतील, तरच तो समास नपुंसकलिंगी असावा लागतो. पण हा समास आम्ही वर सांगितल्याप्रमाणे बहुव्रीहि असल्याने 'तो नपुंसकलिंगी असावयास पाहिजे होता,' या आक्षेपाला अवसरच नाही.

'कानांवर पडणाऱ्या' ... इ. –पहिला आवाज उत्पन्न झाल्यावर त्याच्यामुळे दुसरा, त्याच्यामुळे तिसरा, अशा तऱ्हेने वीचीतरंगन्यायाने अविच्छिन्नपणे येऊन श्रोत्याच्या कानातील पोकळीमध्ये प्रवेश करणारे शेवटचे आवाज म्हणजे 'ध्वनि' असे (वैयाकरण इ. नी) म्हटले आहे. ते (शेवटचे आवाज) घण्टेवर टोला मारल्यानंतर (आघातामुळे उत्पन्न होणाऱ्या) पहिल्या आवाजापासून निर्माण होणाऱ्या झंकाराप्रमाणे असतात, यात शंका नाही. त्या शेवटच्या (शब्दज) आवाजांना 'ध्वनि' ही संज्ञा दिली जाते. कारण भगवान् भर्तृहरीने म्हटले आहे की–

'आवाज उच्चारण्याच्या मौखिक साधनांकडून स्पर्श व विभाग यांमुळे जो आद्य आवाज उत्पन्न होतो, तो 'स्फोट' होय. त्या आद्य आवाजापासून दुसरा, तिसरा अशा उत्पन्न होणाऱ्या आवाजांना इतर काही विद्वान् 'ध्वनि' म्हणतात.[५]

त्याचप्रमाणे घण्टा वगैरेंच्या अनुरणना (म्हणजे आद्य आवाजा-

मुळे उत्पन्न होणाऱ्या झंकारा) च्या ठिकाणी असणाऱ्या, म्हणजे अनु-रणनासारखे स्वरूप असलेल्या व्यंग्य अर्थालाही (काव्यतत्त्वाचे जाण-कार) 'ध्वनि' च म्हणतात. तसेच कानांवर पडणारे, वैयाकरणांनी 'नाद' अशी संज्ञा दिलेले, शेवटच्या आवाजांच्या ग्रहणामुळे ज्याचे स्वरूप स्पष्ट होते, अशा 'स्फोटा' ची अभिव्यक्ति करणारे, जे आवाज, त्यांना वैयाकरणांनी 'ध्वनि' हे नाव दिलेले आहे. जसे त्यान भगवान् भर्तृहरीने म्हटले आहे—

'शब्द उच्चारला जात असताना त्यातील प्रत्येक वर्णाच्या ज्ञानामुळे संपूर्ण शब्दस्फोटाच्या ज्ञानाला जरी मदत होत असली, तरी एकेकट्या वर्णाच्या उच्चारणामुळे शब्दस्फोटाच्या संपूर्ण स्वरूपापैकी किती भाग ध्यानात येतो हे सांगणे कठीण आहे. तरीही त्या शब्दातील सर्व वर्णांच्या उच्चारणामुळे संपूर्ण शब्दाचे स्वरूप प्रकट झाल्यावर मगच स्फोटाचे स्वरूप स्पष्ट होते.'[८]

त्यामुळे येथेही (म्हणजे साहित्यशास्त्रातही) व्यंजक शब्द व अर्थ या दोघांनाही 'ध्वनि' म्हणण्यात येते. आणि निदान श्रोत्यांना ऐकू येईल इतक्या मोठ्याने जर शब्द उच्चारले असतील, तरच पुढील श्लोकात म्हटल्याप्रमाणे–

'श्रोत्याला ऐकू येईल त्यापेक्षा कमी प्रयत्न करून जर शब्द उच्चारला, तर त्या शब्दाचे किंवा वर्णाचे ग्रहण बुद्धीला एकतर मुळीच होत नाही, किंवा (पुरेशा प्रयत्नाने शब्द उच्चारल्यास त्याचे ग्रहण) समग्रपणे व स्पष्टपणे होते.[९]'

–तरच ते श्रोत्याला ऐकू येतात अशी परिस्थिती असताना बोलण्यामध्ये बोलणाऱ्याच्या नेहमीच्या स्वाभाविक उच्चारण–प्रयत्नाहून वेगळा असा जो द्रुतलय, 'विलंबितलय इ. निरनिराळे धर्म निर्माण–करणारा प्रयत्न, त्या प्रयत्नालाही वैयाकरण 'ध्वनि' म्हणतात. कारण त्या भर्तृहरीनेच म्हटले आहे की —

'शब्दातील एकेक वर्ण उच्चारल्यानंतर[९] त्या उच्चारणामध्ये द्रुत वगैरे वृत्तींचा वेगळेपणा उत्पन्न करणारे 'ध्वनि' नामक प्रयत्न कार्यान्वित होतात. त्या विकृतिजनक प्रयत्नांमुळे स्फोटाचे स्वरूप बदलत नाही.[१०]'

आम्हीसुद्धा शब्दाच्या अभिधा, तात्पर्य लक्षणा या स्वरूपाच्या

प्रसिद्ध व्यापारांहून अगदी वेगळ्या अशा (व्यंजना या) व्यापारालाच 'ध्वनि' असे नाव दिले. याप्रमाणे व्यंजक शब्द, व्यंजक अर्थ, व्यंग्य अर्थ व व्यंजनाव्यापार हे चारीही 'ध्वनि' होत.[११] आणि या चारींचाही काव्यात समावेश असतो, म्हणून (१३ व्या कारिकेत म्हटल्याप्रमाणे) ते सगळे काव्यही 'ध्वनि' होय. त्यामुळे 'काव्याचा आत्मा ध्वनि' अशासारखे, म्हणजे काव्य आणि ध्वनि या दोन गोष्टी 'भिन्न' आहेत असा आशय असलेले (कारिका १ मधील) बोलणे काय किंवा 'काव्य म्हणजेच ध्वनि' अशासारखे, म्हणजे काव्य आणि ध्वनि एकच हा अभिप्राय असलेले (कारिका १३ मधील) बोलणे काय, दोन्ही प्रकारचे बोलणे बरोबर नाही असे नाही.

'वाच्य-वाचक-संमिश्र' –हा समास मध्यमपदलोपी, कर्मधारय आहे. वाच्यार्थ व वाचक(शब्द) यांच्या सहवर्तमान असा जो संमिश्र म्हणजे (रसभावादि व्यंग्यार्थ) (हा त्या समासाचा विग्रह). या ठिकाणी 'गाईला, घोड्याला, माणसाला, पशूला' या उदाहरणाप्रमाणे[१२] 'आणि' या शब्दाचा प्रत्यक्ष उपयोग न करिताही 'समुच्चय' हा अर्थ दाखविला जात आहे. त्यामुळे वाच्यार्थही ध्वनि (व) वाचक शब्दही ध्वनि. कारण ते दोघेही व्यंग्यार्थाला ध्वनित करीत असल्यामुळे दोघांच्याही ठिकाणी 'व्यंजकत्व' आहे. विभाव, अनुभाव (व व्यभिचारिभाव) यांचे काव्यात मिश्रण झालेले असल्यामुळे जो प्रकाशित होतो, तो (रसादिरूप) व्यंग्यार्थही 'ध्वनि', कारण तो 'ध्वनित केला जातो'. 'शब्द' म्हणजे शब्दन-क्रिया म्हणजे शब्द-व्यापार. पण तो व्यापार अभिधा वगैरेंच्या स्वरूपाचा नव्हे, तर काव्याचा आत्मा असलेला (व्यंजना हा) व्यापार, म्हणून तोही 'ध्वनि' च, कारण तो 'ध्वनन' या स्वरूपाचा असतो. आणि 'काव्य' या संज्ञेला पात्र होणारी जी (शब्दार्थसमूहरूपी) वस्तु, तीही ध्वनि, कारण ती वर सांगितलेल्या चारही प्रकारच्या ध्वनींची बनलेली असते. म्हणूनच या पाचांनाही 'साधारण' असलेला हेतु वृत्तिकार (त्यां-मध्ये) 'व्यंजकत्व हे साम्य असल्यामुळे' या शब्दांनी सांगतात. व्यंग्य-व्यंजकसंबंध हा 'ध्वनि' शब्दाच्या सर्व अर्थांना साधारण म्हणजे सारखाच लागू पडणारा आहे, हा आशय.[१३]

आता पूर्वी[१४] (अभाववाद्यांच्या तिसऱ्या वर्गाने) 'भाषेमध्ये बोलण्याचे प्रकार अनंत असल्याने ' वगैरे जे म्हटले होते, त्याचे वृत्तिकार 'आणि अशा प्रकारच्या '... इ. वाक्याने खंडन करीत आहेत. आता पुढे सांगितले जाणारे ध्वनीचे प्रमुख भेद म्हणजे (अविवक्षितवाच्य' व 'विवक्षितान्यपरवाच्य' हे ) मुख्य दोन प्रकार आणि त्यांचे पोटभेद म्हणजे अर्थान्तरसंक्रमितवाच्य व अत्यन्ततिरस्कृतवाच्य हे अविवक्षितवाच्य या ध्वनिप्रकाराचे उपप्रकार व असंलक्ष्यक्रमव्यंग्य व संलक्ष्यक्रमव्यङ्ग्य हे विवक्षितान्यपरवाच्य या ध्वनिप्रकाराचे उपप्रकार. या उपप्रकारांमध्येही आणखी पुष्कळ पोटभेद आहेत.[१५] 'त्याचे क्षेत्र फार मोठे' याचा अर्थ 'तो ध्वनि सर्व काव्यवाङ्मयाला व्यापणारा आहे' असा होय. (वृत्तीत) 'एखादा' ('विशेष') हा शब्द (अलंकाराचे विशेषण म्हणून) वापरून (वृत्तिकार) 'अलंकार हा ध्वनीच्या क्षेत्राला व्यापू शकत नाही' हे सुचवितात. आणि 'केवळ' हा शब्द वापरण्यामागे तो (अलंकार) 'अंगी' (म्हणजे मुख्य) नसतो, हे सांगण्याचा (वृत्तिकारांचा हेतु आहे. (वृत्तीतल्या **तद्भावितचेतसाम्** या शब्दाचे विवरण–) त्या ध्वनीच्या स्वरूपाचे ठिकाणी 'भावित' म्हणजे गुंतलेले आहे मन ज्यांचे, असा किंवा अलौकिक आनंद देणे हा स्वभाव असलेल्या त्या ध्वनीमुळे ज्यांचे मन प्रभावित झाले आहे आणि म्हणूनच ते मन ज्यांना डोळे मिटून नाचावयास कारणीभूत झाले आहे, असा आशय. 'ध्वनि नाही' म्हणणारे म्हणजे तिन्ही प्रकारचे अभाववादी, असा अर्थ.

**टीपा**

१. पाहा, उद्द्योत २, कारिका ६.

२. म्हणजे व्यंग्यार्थाचे प्राधान्य. पर्यायोक्त, अप्रस्तुतप्रशंसा अशा अलंकारांच्या काही उदाहरणांत व्यंग्यार्थ प्रधान असलेला दिसला, तर त्यांचा ध्वनीत समावेश करावा, ध्वनीची व्याप्ती त्यांच्यापुरतीच मर्यादित समजू नये; त्याची व्याप्ती फार मोठी आहे.

३. **वैयाकरणांचा ध्वनि —**

विद्वानांचे अग्रणी जे वैयाकरण, ते आपल्या व्याकरणशास्त्रात 'ध्वनि' ही संज्ञा वापरतात. त्यांच्या त्या ध्वनीमध्ये आम्हांला म्हणजे ध्वनिकाव्यशास्त्रकारांना

एक असे वैशिष्टय दिसले की, जे वैशिष्टय आम्हाला उत्तम काव्यातही दिसते. म्हणून या साम्यामुळे आम्हांला उत्तम काव्यालाही ' ध्वनि ' ही संज्ञा देणे योग्य वाटले तेव्हा ध्वनि ' हे नाव वैयाकरणांसारखे विद्वान परंपरेने वापरीत आलेले आहेत. म्हणून तेच नाव आम्हीही वापरीत आहोत. ' ध्वनि ' हे नाव विनपरंपरेचे, कोणीतरी लंगड्यासुंग्याने केवळ आपल्या लहरीमुळे प्रचारात आणलेले नाही.

' स्फोट –' सिद्धान्त –

ध्वनि काव्य–स्वरूपाच्या विवेचनात वैयाकरणांच्या ' स्फोट ' सिद्धान्ताला फार महत्त्व आहे. उत्कृष्ट काव्याला ' ध्वनिकाव्यशास्त्रकारांनी ' ध्वनि ' ही संज्ञा दिली. त्या संज्ञेचा पायाच मुळी वैयाकरणांचा स्फोटसिद्धान्त हा आहे. म्हणून स्फोट-सिद्धान्ताची सविस्तर, यथार्थ कल्पना असणे ध्वनिकाव्यशास्त्राच्या अभ्यासकाला आवश्यकच आहे. ती कल्पना आम्ही येथे थोडक्यात देत आहोत —

आपण वेळोवेळी शब्द उच्चारीत असतो. प्रत्येक वर्ण उच्चारताना आपल्या जिभेचे टोक वगैरे अवयवांचा आपल्या मुखातल्या कोणत्यातरी भागाला स्पर्श होत असतो. मुखातल्या त्या त्या भागांना (स्थानांना) कंठ, तालु, मूर्धन्, दंत, ओष्ठ अशा संज्ञा देण्यात आल्या आहेत. अशा रीतीने बोलणाऱ्यांच्या जिव्हादि अवयवांचा मुखातल्या स्थानांशी स्पर्श व विभाग झाल्याने वर्णांच्या उच्चाराची उत्पत्ती होते. या वर्णोच्चारामुळे ' वीचीतरंग ' न्यायाने दुसरा, तिसरा, असे आवाज एकामुळे एक व एकामागून एक असे उत्पन्न होत राहातात. ऐकणाऱ्यांच्या कानांवर तो प्रथम झालेला वर्णोच्चार पडत नाही, तर त्यामुळे एकामागून एक आवाज उत्पन्न होत होत, त्यांपैकी पंचविसावा, पन्नासावा, जो कोणता त्याच्या कानाजवळ उत्पन्न होईल, तो त्याला ऐकू येतो. वर्णोच्चारानंतरच्या, या, त्याला ऐकू येणाऱ्या शेवटच्या, आवाजाला वैयाकरणांनी ' ध्वनि ' अशी संज्ञा दिली आहे.

भाषेतील निरनिराळया वर्णांची ज्ञानरूप, प्रकाशमय जाणीव आपल्या मनात आधीपासून असतेच. समजा, ' ग ' म्हणावयाचे आहे, तर त्या ' ग ' ची प्रकाशमय जाणीव आधी आपल्या मनात असतेच. ' ग ' च्या त्या जाणिवेला आपण ' ग ' हा वर्ण उच्चारून प्रकट स्वरूप देतो. त्या ' ग ' च्या उच्चारामुळे आवाज उत्पन्न होत जातात व त्यांपैकी कोठलातरी ध्वनि ऐकणाराच्या कानी पडतो. तो कानी पडल्यावर त्याच्याही मनात आधीपासून असलेली ' ग ' या वर्णाची जाणीव जागृत होते. ध्वनीमुळे ती जाणीव निर्माण होत नाही; कारण ती जाणीव आपल्या मनात आधीपासून असतेच. ध्वनीमुळे त्या वेळी ती जागृत होते. म्हणजे सुप्त, अव्यक्त असलेली ' व्यक्त ' होते. ही, मनात आधीपासून असलेली (वर्णाची) जाणीव व्यक्त करणाऱ्या प्रतिभेला किंवा चित्‌शक्तीला वैयाकरण स्फोटाचा ' वर्णस्फोट ' हा प्रकार म्हणतात. म्हणजे ध्वनीमुळे स्फोट ' अभिव्यक्त ' होतो, म्हणजेच स्फोट हा व्यंग्य असून ध्वनि त्याचा व्यंजक असतो.

हे झाले एका वर्णाच्या उच्चाराच्या बाबतीत. पण बोलताना आपण शब्द व त्यांनी बनलेले वाक्य किंवा वाक्ये उच्चारीत असतो. या शब्दांचीही जाणीव आपल्या मनात आधीपासून असतेच. (उदा. 'कमल' हा शब्द आपणांला माहीत आहेच). शब्दांच्या या, आधी असलेल्या, जाणिवेला प्रकट करण्याच्या हेतूने बोलणारा ते ते शब्द उच्चारतो. पण एक एक शब्द अनेक वर्णांचा बनलेला असल्यामुळे बोलणारा, शब्दातील एक एक वर्ण एकामागून एक उच्चारतो. तेव्हा प्रत्येक वर्णोच्चाराचे ध्वनिदेखील ऐकणाऱ्याच्या कानांवर एकामागून एक असेच पडतात. पहिला ध्वनि कानी पडताच विरून जातो मग दुसरा ध्वनि कानी पडतो, तोही नष्ट होतो व तिसरा ध्वनि कानी पडतो. प्रत्येक ध्वनि याप्रमाणे नष्ट झाला, तरी तो कानी पडल्यावर त्याचा ऐकणाऱ्याच्या मनावर संस्कार उमटतो. तेव्हा शब्दातील शेवटच्या वर्णाचा ध्वनि कानी पडला, की शब्दातील आधीआधीच्या प्रत्येक वर्णोच्चारांच्या ध्वनींचे संस्कार व शेवटच्या ध्वनीचा अनुभव म्हणजे शेवटचा ध्वनि ऐकणे यांमुळे शब्दाचा स्फोट अभिव्यक्त होतो, म्हणजे ऐकणाऱ्याच्या मनात आधीपासून असलेल्या (शब्दाच्या सुप्त) जाणिवेची अभिव्यक्ति करणारी चित्‌शक्ती जागृत होते. ती जागृत झाली की, मग त्या शब्दाचा अर्थ श्रोत्यांच्या ध्यानात येतो. या संपूर्ण शब्दाची श्रोत्याच्या मनात आधीपासून असलेली जाणीव जागृत करणारे चित्‌शक्तीचे स्फुरण म्हणजे 'शब्दस्फोट' होय. श्रोत्याच्या कानी पडणाऱ्या ध्वनींच्यामुळे हा शब्दस्फोट अभिव्यक्त होतो, म्हणजेच येथेही ध्वनि हे स्फोटाचे 'व्यंजक' असतात व स्फोट हा 'व्यंग्य' असतो.

काव्यातील व्यंजक शब्द व अर्थ यांना 'ध्वनि' ही संज्ञा देण्याचे कारण—

उत्कृष्ट काव्यातले वाचक शब्द व वाच्यार्थ हे देखील 'व्यंजक' असतात. तेव्हा वैयाकरणांचा ध्वनि व उत्कृष्ट काव्यातले वाचक शब्द व वाच्यार्थ या दोहोंमध्ये व्यंजकत्व हे साम्य असल्यामुळेच काव्याच्या जाणकारांनीदेखील उत्तम काव्यातल्या व्यंजक शब्दार्थांना 'ध्वनि' अशी संज्ञा दिली.

अनुरणनरूप व्यंग्यार्थ —

घंटेचा टोला देणाराने टोला दिला, की त्या टोल्याच्या पहिल्या आवाजामागोमाग एकामागून एक त्याचे पडसाद उत्पन्न होत राहातात. यालाच ध्वनिकाव्यशास्त्रज्ञांनी 'अनुरणन,' 'अनुस्वान' असे म्हटले आहे. टोल्याचा पहिला आवाज आपल्या कानी पडत नाही, तर त्यामुळे उत्पन्न होणाऱ्या अनुनादांपैकी कोणता तरी अनुनाद आपल्या कानी पडतो. या, आपल्या कानी पडणाऱ्या अनुनादाला वैयाकरणांनी 'ध्वनि' म्हटले आहे. आणि टोल्याचा पहिला आवाज म्हणजे स्फोट, असे नैयायिक म्हणतात. त्याचे कारण असे असावे की, एखादी वस्तु फुटली असताना जसा आवाज होतो, तसा काहीसा घंटेच्या टोल्याचा पहिला आवाज असतो. वैयाकरणांच्या मते 'स्फोट' म्हणजे काय हे वर याच टीपेत सांगितले

आहे. ध्वनीच्या 'विवक्षितान्यपरवाच्य' प्रकारामध्ये वाच्यार्थ समजल्यावर मग विशिष्ट परिस्थितीमुळे वस्तु किंवा अलंकार या स्वरूपाचा व्यंग्यार्थ आपल्या लक्षात येतो; तेव्हा काव्यातले शब्द वाचणे किंवा ते कानी पडणे, त्यांचा वाच्यार्थ समजणे हा झाला वैयाकरणांच्या 'ध्वनी'सारखा, आणि हळूहळू ध्यानात येणारा व्यंग्यार्थ हा स्फोटासारखा समजावयाचा. रसादिरूप व्यंग्यार्थ हा वाच्यार्थ समजताच तत्क्षणी प्रतीत होतो, म्हणून तेथे असलेला वाच्यार्थ व व्यंग्यार्थ समजण्याचा 'क्रम' लक्षात येत नाही. पण वस्तुरूप किंवा अलंकाररूप व्यंग्यार्थ हळूहळू, क्रमाने लक्षात येतो, म्हणून त्याला घंटेच्या अनुरणनासारखा, म्हणजे क्रमाने लक्षात येणारा असे म्हटले आहे. या प्रकाराची संपूर्ण कल्पना पुढे उद्योत २, कारिका २० व तीवरील वृत्तीवरून येईल.

ध्वनिकाव्य व काव्यातील 'ध्वनि'—

सत्कवि जेव्हा काव्य रचतो, तेव्हा त्याला काही विशेष अभिप्राय, काही विशेष सुंदर अर्थ रसिक वाचकांच्या प्रत्ययाला आणून द्यावयाची इच्छा असते. तो इष्ट परिणाम घडून यावा, यासाठी तो विशेष शब्द व व्यंजक अर्थ यांची जुळणी करतो. रसिकाने ते शब्द वाचून त्यांचा वाच्यार्थ त्याला समजला की, त्या काव्यातला व्यंग्यार्थ म्हणजेच कवीच्या मनातील मूळचा 'विशेष अभिप्राय' त्या रसिकाच्या लक्षात येतो. काव्यात कवीने काही विशिष्ट लयीचा उपयोग केला असला किंवा 'काकु' म्हणजे आवाजातील विशिष्ट प्रकारचे बदल यांचा उपयोग केलेला असला, तर त्यामुळेही विशिष्ट व्यंग्यार्थ सूचित होण्यास मदत होते. कवीने निवडलेले व्यंजक शब्द, व्यंजक अर्थ, शब्दलालित्य, काकु, शब्दाची लय इत्यादींमुळे व्यंग्यार्थ सुंदर होत असतो, व त्याने वापरलेल्या उपायांमुळे रसिकाच्या हृदयातही तो व्यंग्यार्थ तशाच सुंदर स्वरूपात प्रकाशित होतो. आनंदवर्धनांनी विशिष्ट प्रकारच्या काव्याला ध्वनि असे म्हटले आहे, पण अभिनवगुप्तांनी अशा ( सुंदर व्यंग्यार्थ प्रधान असलेल्या ) काव्यातला व्यंग्यार्थ 'ध्वनित होतो' म्हणून त्यालाही ध्वनि मानावे असे म्हटले आहे. अशा काव्यातील शब्द व वाच्यार्थ हे व्यंजक असतात म्हणून त्या काव्यातले शब्द व अर्थ या दोघांनाही ध्वनि मानावे असे ते म्हणतात. हे व्यंजक शब्द व अर्थ 'ध्वननव्यापाराने' व्यंग्यार्थ सूचित करतात. म्हणून तो व्यापारही 'ध्वनि' व सर्व काव्य हेही 'ध्वनि'. अशा रीतीने व्यंजक शब्द व अर्थ, ध्वननव्यापार, प्रधान व्यंग्यार्थ व सर्व काव्य या पाचांनाही अभिनवगुप्त 'ध्वनि' ही संज्ञा देतात.

४. हे सबंध सूत्र पुढीलप्रमाणे आहे—

**उपज्ञोपक्रमं तदाद्याचिख्यासायाम् ।**– ( अष्टाध्यायी, २-४-२१ ). या सूत्राचा अर्थ:– उपज्ञा (म्हणजे ज्ञान) आणि उपक्रम ( म्हणजे आरंभ ) हे शब्द षष्ठी तत्पुरुष समासाच्या शेवटी असतील आणि जाणणारा व

आरंभ करणारा जर अनुक्रमे 'प्रथम' जाणणारा व 'प्रथम' आरंभ करणारा असतील तर तो तत्पुरुष समास नपुंसकलिंगी होतो. उदा. **पाणिनेः उपज्ञा पाणिन्युपज्ञं** ( व्याकरणम् । )

५. **वाक्यपदीयम्** १–१०२/१७१. येथे 'स्फोट' हा शब्द 'उच्चारणाच्या मौखिक साधनांच्या संयोग–विभागांमुळे उत्पन्न होणारा पहिला आवाज' या अर्थी वापरला आहे. 'स्फोट' शब्दाचा हा अर्थ शब्दाला अनित्य मानणाऱ्या म्हणजे ( 'शब्द उत्पन्न होतो' असे समजणाऱ्या ) नैयायिकांच्या मतानुसार आहे. वैयाकरण या पहिल्या आवाजाला 'स्फोट' म्हणत नाहीत, तर श्रोत्याच्या मनात आद्योपासूनच संस्काररूपाने असलेली, पण शेवटचे आवाज म्हणजे ध्वनि ऐकल्यानंतर जागृत होणारी शब्दाची जाणीव अभिव्यक्त करणाऱ्या चित् शक्तीच्या स्फुरणाला ते 'स्फोट' मानितात.

६. **वाक्यपदीयम्** १–८३.

७. कुमारिलभट्ट, श्लोकवार्तिक स्फोटवाद, कारिका १० वी.

८. 'द्रुतलय' म्हणजे जलद बोलणे व 'विलंबितलय' म्हणजे सावकाश बोलणे. 'इत्यादीं' मध्ये 'काकु' म्हणजे (शोक, भय वगैरे) विकारांचे दर्शक स्वर-विकार यांचाही समावेश करावा.

९. मुळातल्या 'शब्द' याचा अर्थ आम्ही 'एकेक वर्ण' असा केला आहे, त्याचे कारण असे की, 'एकेक वर्ण उच्चारल्यावर' याऐवजी 'संपूर्ण शब्द उच्चारल्यानंतर' असा अर्थ केल्यास त्यानंतर (ऊर्ध्वम्) द्रुतलय वगैरे धर्म त्या शब्दात उत्पन्न करणे अशक्य आहे. एकेक वर्ण उच्चारल्यानंतर मात्र लय हवी तशी कमी अधिक करिता येईल

१०. **वाक्यपदीयम्**, १–७७.

११ वैयाकरण हे 'शब्दज' शब्दाला ध्वनि म्हणतात, तर आम्ही साहित्यशास्त्रकार ( व्यंजक शब्दापासून प्रकट होणाऱ्या ) व्यंग्य अर्थाला 'ध्वनि' म्हणतो. वैयाकरण स्फोटाची अभिव्यक्ति करणाऱ्या वर्णांना 'ध्वनि' म्हणतात, तर आम्ही व्यंजक शब्द व व्यंजक अर्थ यांना 'ध्वनि' म्हणतो. वैयाकरण शब्दाच्या शुद्ध रूपामध्ये द्रुतलय इ. धर्म उत्पन्न करणाऱ्या प्रयत्नांना 'ध्वनि' म्हणतात, तर आम्ही अभिधा इत्यादींहून निराळ्या अशा व्यंजनाव्यापाराला 'ध्वनि' म्हणतो.

१२. 'वाच्य–वाचक–संमिश्र,' 'शब्दात्मा', 'काव्य हे नाव देण्यास योग्य,' यांपैकी प्रत्येकापुढे किंवा शेवटी 'आणि' हा शब्द जरी प्रत्यक्ष वापरलेला नसला, तरी गाईला, घोड्याला, इ. उदाहरणांप्रमाणे 'आणि' हा शब्द येथेही अध्याहृत समजावा. '**गामश्वं पुरुषं पशुम्**' हा चरण अथर्ववेद, ८–७–११ मध्ये आहे. पतञ्जलीने २–२–२९ या पाणिनिसूत्रावरील भाष्यात

जे पद्य उद्धृत केले आहे, त्यामध्येही हा चरण आहे.

१३. वृत्तीमध्ये **वाच्यवाचकसंमिश्रः शब्दात्मा काव्यमिति व्यपदेश्यः व्यंजकत्व-साम्याद् ध्वनिरित्युक्तः** असे शब्द आहेत. ते वाचून ज्या सरळ अर्थाचा बोध होतो, तो असा:– वाच्य–वाचकसंबंधाने युक्त असणारा, ( व्यंजकत्व या धर्माने युक्त असल्यामुळे ) ' काव्य ' या संज्ञेस पात्र असणारा जो शब्दसमूह, त्याला ( तो शब्दसमूह आणि वैयाकरणांच्या ध्वनि यामध्ये ) ' व्यंजकत्व ' हे साम्य असल्याकारणाने ' ध्वनि ' असे म्हटले आहे, " या सरळ अर्थाला अनुसरूनच आम्ही वृत्तीतल्या वरील शब्दांचा अनुवाद केला आहे. अभिनव-गुप्तांनी मात्र या शब्दांतून जो अर्थ काढला आहे, तो एकंदरीत जरी वृत्ति-कारांच्या मताला विरोधी नसला, तरी अभिनवगुप्तांनी ' ध्वनि ' या शब्दाचे जे पाच अर्थ केले आहेत, ते वृत्तिकारांनाही अभिप्रेत आहेत असे गृहीत धरून त्यांनी वृत्तीतल्या शब्दांची ओढाताण करूनच काढल्यासारखा वाटतो.

१४. पृ. ३५, ' वृत्ति ' पाहा.

१५. पाहा, उद्योत २ रा, १२ वी कारिका, व तीवरील वृत्ति.

ध्वन्यालोकः

अस्ति ध्वनिः। स चाऽसावविवक्षितवाच्यो विवक्षितान्यपर-वाच्यश्चेति द्विविधः सामान्येन ।

तत्राद्यस्योदाहरणम् --

सुवर्णपुष्पां पृथिवीं चिन्वन्ति पुरुषास्त्रयः ।
शूरश्च कृतविद्यश्च यश्च जानाति सेवितुम् ॥

द्वितीयस्यापि —

शिखरिणि क्व नु नाम कियच्चिरं किमभिधानमसावकरोत्तपः ।
तरुणि येन तवाधरपाटलं दशति बिम्बफलं शुकशावकः ॥

ध्वन्यालोक

तेव्हा ध्वनि आहे ( हे आता सिद्ध झाले ). तो स्थूल मानाने दोन प्रकारचा :-

( १ ) अविवक्षितवाच्य[१] आणि ( २ ) विवक्षितान्यपरवाच्य.[२]

त्यांपैकी ( पहिल्या म्हणजे ' अविवक्षितवाच्य ' ) प्रकारचे उदाहरण :–

सोन्याची नाणी फुलविणाऱ्या पृथ्वीची फुले, तिथे पुरुष गोळा

करितात:–[3] शूर असलेला, विद्यापारंगत असलेला आणि सेवा कशी करावी हे जाणणारा.

आता दुसऱ्या ( म्हणजे विवक्षितान्यपरवाच्य ) प्रकारचे उदाहरण :—

हे तरुणी ! खरेच, त्या तरुण पोपटाने कोणत्या नावाचे तप कोणत्या नावाच्या पर्वतावर आणि किती दीर्घकाळ केले बरे की, ज्यामुळे तो तुझ्या अधरोष्ठाप्रमाणे रक्तवर्ण असणाऱ्या बिंबफळाला टोच्या मारून त्याचा मोठ्या चवीने आस्वाद घेत आहे ?[४]

लोचनम्

तेषां प्रत्युक्तौ फलमाह– अस्तीति । उदाहरणपृष्ठे भाक्तत्वं सुशङ्कं सुपरिहरं च भवतीत्यभिप्रायेणोदाहरणदानावकाशार्थं भाक्तत्वा-लक्षणीयत्वे प्रथमं परिहरणयोग्ये अप्रप्रतिसमाधाय भविष्यदुद्द्योतानु-वादानुसारेण वृत्तिकृदेव प्रभेदनिरूपणं करोति– स चेति । पञ्चधापि ध्वनिशब्दार्थे येन यत्र यतो यस्य यस्मै इति बहुव्रीह्यर्थाश्रयेण यथोचितं सामानाधिकरण्यं सुयोज्यम् । वाच्येऽर्थे तु ध्वनौ वाच्यशब्देन स्वात्मा तेनाविवक्षितोऽप्रधानीकृत: स्वात्मा येनेत्यविवक्षितवाच्यो व्यञ्जकोऽर्थ: । एव विवक्षितान्यपरवाच्येऽपि । यदि वा कर्मधारयेणार्थपक्षे अविवक्षित-श्चासौ वाच्यश्चेति । विवक्षितान्यपरश्चासौ वाच्यश्चेति । तत्रार्थ: कदा-चिदनुपपद्यमानत्वादिना निमित्तेनाविवक्षितो भवति, कदाचिदुपपद्यमान इति कृत्वा विवक्षित एव, व्यङ्ग्यपर्यन्तां तु प्रतीतिं स्वसौभाग्यमहिम्ना करोति । अत एवार्थोऽत्र प्राधान्येन व्यञ्जक:, पूर्वत्र शब्द: । ननु च विवक्षा चान्यपरत्वं चेति विरुद्धम् । अन्यपरत्वेनैव विवक्षणात्को विरोध: ? सामान्येनेति । वस्त्वलङ्काररसात्मना हि त्रिभेदोऽपि ध्वनि-रुभाभ्यामेवाभ्यां सङ्गृहीत इति भाव: । ननु तन्नामपृष्ठे एतन्नामनिवेश-नस्य किं फलम् ? उच्यते–अनेन हि नामद्वयेन ध्वननात्मनि व्यापारे पूर्व-प्रसिद्धाभिधातात्पर्यलक्षणात्मकव्यापारत्रितयावगतार्थप्रतीते: प्रतिपत्तृ-गताया: प्रयोक्त्रभिप्रायरूपायाश्च विवक्षाया: सहकारित्वमुक्तमिति ध्वनिस्वरूपमेव नामभ्यामेव प्रोज्जीवितम् ।

सुवर्णपुष्पामिति । सुवर्णानि पुष्प्यतीति सुवर्णपुष्पा । एतच्च वाक्यमेवासंभवत्स्वार्थमिति कृत्वाविवक्षितवाच्यम् । तत एव पदार्थ-

अभिधायान्वयं च तात्पर्यशक्त्यावगमय्यैव बाधकवशेन तमुपहृत्य सादृश्यात्सुलभसमृद्धिसंभारभाजनतां लक्षयति। तल्लक्षणाप्रयोजनं शूरकृतविद्यसेवकानां प्राशस्त्यमशब्दवाच्यत्वेन गोप्यमानं सभ्याधिकाकुचकलशयुगलमिव महार्घतामुपयद् ध्वन्यत इति। शब्दोऽत्र प्रधानतया व्यञ्जकः, अर्थस्तु तत्सहकारितयेति चत्वारो व्यापाराः।

शिखरिणीति। न हि निर्विघ्नोत्तमसिद्धयोऽपि श्रीपर्वतादय इमां सिद्धिं विदध्युः। दिव्यकल्पसहस्रादिश्चात्र परिमितः कालः। न चैवंविधोत्तमफलजनकत्वेन पञ्चाग्निप्रभृत्यपि तपः श्रुतम्। तवेति भिन्नं पदम्। समासेन विगलिततया प्रतीयेत, तव दशतीत्यभिप्रायेण। तेन यदाहुः – 'वृत्तानुरोधात्त्वदधरपाटलमिति न कृतम्' इति, तदसदेव। दशतीत्यास्वादयति, अविच्छिन्नप्रबन्धतया, न त्वौदरिकवत्परं भुङ्क्ते; अपि तु रसज्ञोऽत्रेति तत्प्राप्तिवदेव रसज्ञताप्यस्य तपःप्रभावादेवेति। शुकशावक इति तारुण्यादुचितकाललाभोऽपि तपस एवेति। अनुरागिणश्च प्रच्छन्नस्वाभिप्रायव्यापनवैदग्ध्यचाटुविरचनात्मकविभावोद्दीपनं व्यङ्ग्यम्।

अत्र च त्रय एव व्यापारा :—अभिधा, तात्पर्यं, ध्वननं चेति। मुख्यार्थबाधाद्यभावे मध्यमकक्ष्यायां लक्षणायास्तृतीयस्या अभावात्। यदि वाकस्मिकविशिष्टप्रश्नार्थानुपपत्तेर्मुख्यार्थबाधायां सादृश्याल्लक्षणा भवतु मध्ये। तस्यास्तु प्रयोजनं ध्वन्यमानमेव, तत्तुर्यकक्ष्यानिवेशि। केवलं पूर्वत्र लक्षणैव प्रधानं ध्वननव्यापारे सहकारि, इह त्वभिधातात्पर्यशक्ती। वाक्यार्थसौन्दर्यादेव व्यङ्ग्यप्रतिपत्तेः केवलं लेशेन लक्षणाव्यापारोपयोगोऽप्यस्तीत्युक्तम्। असंलक्ष्यक्रमव्यङ्ग्ये तु लक्षणासमुन्मेषमात्रमपि नास्ति। असंलक्ष्यत्वादेव क्रमस्येति वक्ष्यामः। तेन द्वितीयेऽपि भेदे चत्वार एव व्यापाराः॥ १३॥

लोचन

त्या अभाववाद्यांचे खंडन करण्यापासून फायदा काय, ते वृत्तिकार 'तेव्हा ध्वनि आहे (हे सिद्ध झाले)' इ. शब्दांनी सांगतात. अभाववाद्यांच्या खंडनानंतर प्रथम ध्वनीला लक्षणारूप मानणाऱ्या व (मग) ध्वनीला अवर्णनीय म्हणणाऱ्या पक्षांचे खंडन करणे योग्य होते. तरीही वृत्तिकारांनी त्या पक्षांचे खंडन लगेच केलेले नाही. याचे

कारण असे की, ध्वनीच्या दोन्ही प्रकारांची उदाहरणे आधी दिल्यानंतर मगच ध्वनि लक्षणारूप आहे अशी शंका घेणे व तिचे निरसन करणे ही दोन्ही कामे सुकर होतात. याच विचाराने (मध्ये) उदाहरणे द्यावयास अवसर मिळावा म्हणून वृत्तिकार ध्वनीच्या मुख्य दोन प्रकारांचे निरूपण (आधी) करावयास घेत आहेत. पुढील २ ऱ्या उद्द्योतातील कारिका १ व २ मध्ये ध्वनीच्या दोन प्रमुख प्रकारांचा जो अनुवादरूपाने निर्देश केला आहे, त्याला अनुसरून वृत्तिकारच ध्वनीच्या मुख्य प्रकारांचे स्पष्टीकरण 'आणि तो' . . . इ. शब्दांनी करितात. वर जे 'ध्वनि' शब्दाचे पाच अर्थ सांगितले, त्यांच्या बाबतीत 'अविवक्षितवाच्य' हे विशेषण लावताना तो बहुव्रीहि समास समजून त्याचा विग्रह 'ज्याने,' 'ज्यामध्ये,' 'ज्यामुळे,' 'ज्याचा' 'ज्यासाठी' यांपैकी योग्य तो शब्द वापरून[6] करणे व त्या विशेषणाचे 'ध्वनि' या विशेष्याशी समानविभक्तिकत्व दाखविणे सहज शक्य आहे. 'ध्वनि' ही संज्ञा जेव्हा (ध्वनिकाव्यातील) वाच्य अर्थाला लावली असेल, तेव्हा वाच्य शब्दांचा अर्थ 'स्वत:' असा घ्यावा. त्यामुळे 'अविवक्षितवाच्य' म्हणजे 'अविवक्षित म्हणजे गौण केले आहे स्वत:ला ज्याने असा' म्हणजे व्यंजक (वाच्य) अर्थ. असेच 'विवक्षितान्यपरवाच्य' या विशेषणाचा अर्थ लावतानाही करावे. किंवा 'ध्वनि' शब्दाचा अर्थ 'वाच्यार्थ' हा घेतल्यास (अविवक्षितवाच्य व विवक्षितान्यपरवाच्य) ही दोन्ही विशेषणे ते 'कर्मधारय' समास समजून त्यांचे विग्रह अनुक्रमे 'जो अविवक्षित असून वाच्यही आहे असा' व जो 'विवक्षितान्यपर असून वाच्यही आहे असा' असे करावेत.

आता ध्वनीच्या उदाहरणांमध्ये काही वेळा (म्हणजे अविवक्षितवाच्य या प्रकारामध्ये) वाच्य अर्थाची उपपत्ति (म्हणजे संगति) लावणे शक्य नसणे वगैरेसारख्या कारणामुळे तो वाच्य अर्थ (कवीला) अ–विवक्षित असतो, म्हणजे तो वाच्य अर्थ रसिकाने लक्षात घ्यावा अशी कवीची इच्छा नसते. पण काही वेळा (म्हणजे विवक्षितान्यपरवाच्य या प्रकारामध्ये ) वाच्य अर्थाची संगति लागत असल्यामुळे तो विवक्षितच असतो, म्हणजे वाचकाने तो लक्षात घ्यावा असाच कवीचा हेतु असतो; पण तो वाच्यार्थ व्यंग्यार्थामध्ये पर्यवसान होणारे

ज्ञान करून देतो, ते स्वत:च्या सौंदर्यामुळे. म्हणूनच या दुसऱ्या 'विवक्षितान्यपरवाच्य' या प्रकारामध्ये वाच्यार्थ हा प्रामुख्याने व्यंजक असतो, तर पहिल्या 'अविवक्षितवाच्य' या प्रकारामध्ये शब्द हा मुख्यतया व्यंजक असतो.[७]

पण काय हो, श्रोत्याने वाच्यार्थ लक्षात घ्यावा अशी वक्त्याची इच्छाही असणे आणि (त्याच वेळी) तो वाच्यार्थ अन्यार्थपर (म्हणजे व्यंग्यार्थाला महत्त्व देणारा) ही असणे, या दोन गोष्टी परस्परविरुद्ध नाहीत काय? तर याचे उत्तर हेच की, वाच्यार्थ वक्त्याला जर 'अन्य-पर' म्हणूनच विवक्षित असला तर त्यात कोठला विरोध ? (म्हणजे तो वाच्यार्थ श्रोत्याने दुसरा अर्थ समजावयाचे साधन म्हणूनच विचारात घ्यावा अशीच वक्त्याची इच्छा असली, तर त्यात कोणताही विरोध असणार नाही. वाच्यार्थ स्वतंत्रपणे विवक्षित असून शिवाय तो अन्यपर असेल, तरच विरोध येईल.)

'स्थूलमानाने'—म्हणजे या दोन मुख्य प्रकारांमध्ये वस्तु, अलंकार व रसादि या ध्वनीच्या तिन्ही प्रकारांचा अंतर्भाव झाला, असा आशय.[८]

'पण काय हो, ('ध्वनि आहे' या वाक्यात) 'ध्वनि' या नावाचा निर्देश केल्यानंतर मग अविवक्षितवाच्य व विवक्षितान्यपरवाच्य या दोन्ही नावांचा उल्लेख करण्याचा उपयोग काय ? या प्रश्नाचे उत्तर असे की—ही दोन नावे ध्वननव्यापाराचे सहकारी कोण कोण असतात हे सांगतात. पूर्वी माहीत असलेल्या अभिधा, तात्पर्य व लक्षणा या स्वरूपाच्या तीन व्यापारांमुळे समजणाऱ्या (अनुक्रमे वाच्यार्थ, वाक्यार्थ व लक्ष्यार्थ या) अर्थाची श्रोत्याला झालेली प्रतीति आणि (अविवक्षित-वाच्य प्रकारामध्ये व्यंग्यार्थाची व विवक्षितान्यपरवाच्य या प्रकारामध्ये वाच्यार्थ व व्यंग्यार्थ या दोहोंची) बोलणाराला असणारी विवक्षा या दोन्ही ध्वननव्यापाराला सहकारिणी असतात. अशा रीतीने या दोन नावांमुळे ध्वनीचे स्वरूपच स्पष्ट केले गेले.[९]

सोन्याची नाणी फुलविणाऱ्या—जी सोन्याची नाणी फुलविते, ती 'सुवर्णपुष्पा.' या वाक्याचा अर्थच असंभवनीय असल्याने या वाक्यातील वाच्यार्थ अ-विवक्षित आहे. म्हणूनच पदांचा अर्थ अभिधेच्या

द्वारे सांगितल्यावर व तात्पर्य-शक्तीच्या द्वारे त्या पदार्थांच्या परस्पर–संबंधाचा बोध करून दिल्यावर मगच बाधकामुळे म्हणजे तो संबंध जुळविताना प्रमाणांशी येणाऱ्या विरोधामुळे 'सोन्याची नाणी फुलविणाऱ्या'...इ. वाक्य त्या अन्वयाचा बाध करिते व वाच्यार्थाशी सादृश्य संबंधाने निगडित असलेल्या 'पृथ्वी हे सहज मिळू शकणाऱ्या समृद्धीच्या साधनांचे आगर आहे' या लक्ष्यार्थाकडे बोट दाखविते. अशी लक्षणा वापरण्यामागील प्रयोजन हेच आहे की, 'शूर असलेला, विद्यापारंगत असलेला व सेवा करण्यात निपुण असलेला असे तिघे विशेष प्रशंसनीय आहेत.' हे प्रयोजन येथे शब्दांनी वाच्य झालेले नसल्यामुळे गूढ आहे व त्यामुळे उत्तम नायिकेच्या (वस्त्राच्छादित) स्तनभाराप्रमाणे[10] त्या प्रयोजनाला अपूर्व सौंदर्य प्राप्त होऊन ते ध्वनित केले जाते. या 'अविवक्षित–वाच्य' ध्वनीच्या उदाहरणात शब्द हेच प्रामुख्याने व्यंजक असतात व वाच्य अर्थ हा त्यांचा मदतनीस या नात्याने व्यंजक असतो. याप्रमाणे (येथे) अभिधा, तात्पर्य, लक्षणा व व्यंजना हे चार व्यापार कार्य करतात.

'(कोणत्या नावाच्या) पर्वतावर – कारण जेथे (तप केल्याने) निर्विघ्नपणे सर्वोत्कृष्ट सिद्धि प्राप्त होते, ती श्रीपर्वत[11] वगैरे स्थानेसुद्धा ही सिद्धि प्राप्त करून देऊ शकणार नाहीत. आणि अशा सिद्धीला हजारो दिव्य कल्पांइतका काळसुद्धा तोकडाच पडणार. आणि पंचाग्निसाधन[12] वगैरेसारखे तपही अशा तऱ्हेने उत्तम फळ प्राप्त करून देण्यास समर्थ असते, असेही ऐकिवात नाही. तव (तुझ्या) हे वेगळे पद आहे (म्हणजे त्याचा **अधरपाटलम्** याच्याशी समास केलेला नाही). ते समासान्तर्गत असते, तर त्याचे व्यंजकत्व – सामर्थ्य नष्ट झाले असते, कारण मग **दशति** या क्रियापदाशी त्याचा संबंध जोडता आला नसता.[13] 'तुझा आस्वाद घेतो' हा अभिप्राय येथे व्यंग्य आहे. त्यामुळे 'वृत्त सांभाळण्यासाठी **त्वदधरपाटलम्** असा समास कवीने योजिला नाही' असे जे कोणी तरी म्हटले आहे ते चुकीचेच आहे.[14] 'टोच्या मारतो आहे' म्हणजे अव्याहतपणे एकसारखा आस्वाद घेतो आहे खादाड व्यक्तीसारखा नुसता खाऊन टाकीत नाही. तर तो या फळाची गोडी चाखण्यात मोठा रसिक आहे आणि त्या फळाच्या लाभा-

प्रमाणेच याला जी रसिकता प्राप्त झाली आहे, तीदेखील तपश्चर्येच्या सामर्थ्यामुळेच, हा भावार्थ. तरुण पोपट-तारुण्यामुळे योग्य (म्हणजे उपभोगक्षम) [१५] काळी याला हे फळ प्राप्त होणे हेही तपामुळेच होय. आणि एका प्रेमी ववत्याने (तिच्या अधरास्वादासंबंधीचा) आपला गूढ अभिलाष तिला कळविण्यासाठी वरीलप्रमाणे चतुराईने तिची जी खुशामत केली आहे, तिच्याद्वारा त्याच्या अभिलाषरतीचा आलंबन-विभाव जी ती तरुणी, तिला उद्दीपित करणे हा येथे व्यंग्यार्थ आहे.

मात्र या (विवक्षितान्यपरवाच्या प्रकाराचे उदाहरण म्हणून दिलेल्या) श्लोकात तीनच व्यापार आहेत – अभिधा, तात्पर्य आणि ध्वनन. कारण येथे मुख्यार्थाचा बाध वगैरे नसल्यामुळे मधल्या अवस्थेत तिसरा 'लक्षणा' हा व्यापार येथे नाहीच. किंवा अकल्पितपणेच 'पोपटाने कोणते तप केले' अशासारखा प्रश्न विचारणे हे व्यवहाराला अनुसरून नसल्याने मुख्यार्थाचा म्हणजे वाच्यार्थाचा बाध होतो असे मानून 'सादृश्य' संबंधाच्या आधारावर येथे मधल्या टप्प्यात लक्षणा आहे असेही समजानात का! पण त्या लक्षणेचे प्रयोजन मात्र व्यंग्यच आहे आणि ते चौथ्या टप्प्यात प्रतीत होणारे आहे. फरक केवळ इतकाच की, पहिल्या (सोन्याच्या फुलांनी इ.) उदाहरणात ध्वननव्यापाराला मुख्यत्वाने मदत करणारी 'लक्षणाच' असते आणि या दुसऱ्या उदाहरणात मात्र (ध्वननव्यापाराला) अभिधा व तात्पर्य या दोन शक्तींचे प्रामुख्याने सहकार्य आहे. (या दुसऱ्या उदाहरणात) वाच्यार्थाच्या सौंदर्यामुळेच व्यंग्यार्थाची प्रतीति होत असल्याने 'लक्षणा' या व्यापाराचा केवळ अंशतःच उपयोग होतो, असा ('लक्षणा आहे असेही समजानात का ?' असे म्हणण्यात) आमचा अभिप्राय आहे. [१६]

ध्वनीच्या 'असंलक्ष्यक्रम' म्हणजे रसादि प्रकारात मात्र लक्षणेचा नुसता स्पर्श म्हणजे तिचे अंधुक अस्तित्वदेखील नसते. कारण वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांच्या ज्ञानांमधील एक आधी व एक मागून हा क्रम लक्षातही येत नाही, हेच तेथे लक्षणेचा स्पर्शसुद्धा होत नाही याचे कारण होय [१७] हे आम्ही पुढे [१८] सांगणार आहोत. त्यामुळे दुसऱ्या म्हणजे विवक्षितान्यपरवाच्य या प्रकारातही (वस्तु किंवा अलंकार व्यंग्य असताना

लक्षणा असते असे मानिल्यास अभिधा, तात्पर्य, लक्षणा व व्यंजना हे) चार व्यापार असतात.[१९] ॥१३॥

टीपा

१. म्हणजे ज्यातील वाच्यार्थ संभवनीय नसल्याने टाकून द्यावा लागतो. मागे दिलेली पृ. ४४ वरची 'लक्षणे' वरील टीप पाहा. ज्या काव्यात प्रयोजनवती लक्षणा असते, इतकेच नव्हे, तर जेथे ते व्यंग्य प्रयोजनच मुख्य व रम्य असते, ते 'अविवक्षितवाच्य' ध्वनीचे उदाहरण होय. पुढे उद्द्योत २, कारिका १ व तीनंतरची उदाहरणे पाहा.

२. ज्यातील वाच्यार्थ संभवनीय असतो; तो टाकून तर द्यावा लागत नाहीच, पण तो 'अन्यपर' असतो म्हणजे त्याचे कार्य मुख्य असलेला दुसरा व्यंग्यार्थ ध्यानात आणून देणे हेच असते, असा हा ध्वनीचा प्रकार होय. याची सविस्तर कल्पना येण्यासाठी उद्द्योत २, कारिका २ री व त्यानंतरच्या काही कारिका पहा.

३. 'पृथ्वी सोन्याची नाणी फुलविणारी' असणे हा वाच्यार्थच मुळी असंभवनीय आहे, म्हणून या बोलण्यात संभवनीयता येण्यासाठी वाच्यार्थाचा त्याग करून 'पृथ्वी ही सहज मिळू शकणाऱ्या समृद्धीच्या साधनांची खाण असणे' हा लक्ष्यार्थ घ्यावा लागतो. असा लक्षणायुक्त शब्दप्रयोग करण्यामागील प्रयोजन शूर, विद्यापारंगत व सेवा करू जाणणारा यांचे भाग्य अवर्णनीय आहे हे सुचविणे हे होय. या श्लोकात प्रथम अभिधेने पदांच्या अर्थाचे ज्ञान होते. मग तात्पर्यवृत्तीने त्यांचा अन्वय कळतो. त्यानंतर वाच्यार्थाचा बाध झाल्यामुळे लक्षणेने लक्ष्यार्थ समजतो. आणि शेवटी चौथ्या टप्प्यात व्यंजनेने प्रयोजन ध्यानात येते.

४. 'तुझ्या अधरोष्ठासारखे बिम्बफळ चाखायलाही असामान्य तप करावे लागते' असे म्हणून बोलणाराने तिच्या अधरोष्ठाचा आस्वाद घेण्यासंबंधीचा स्वतःचा अभिलाष चतुराईने सुचवणे व अशा तऱ्हेने तिची स्तुति करून तिच्याही मनात आपल्या इच्छेला अनुकूल असा अभिलाष उद्दीपित करणे, हा या श्लोकातला प्रधान व्यंग्यार्थ आहे. पहिल्या (सोन्याच्या फुलांनी... ...इ.) उदाहरणाप्रमाणे येथे लक्षणा नाही. म्हणून येथे तीनच व्यापार काम करतात :-अभिधेने प्रथम पदांचा अर्थ कळतो, मग तात्पर्यवृत्तीने त्यांच्या अन्वयाचा बोध होतो व शेवटी तिसऱ्या टप्प्यात व्यंजनेने व्यंग्यार्थ समजतो.

५. 'अनुवाद' याचा येथे अर्थ एखादा विषय वाचकांना आधीच माहीत आहे असे गृहीत धरून एकदम त्याचे विवरण करू लागणे.

६. उदा. ' ध्वनि ' या शब्दाचा अर्थ ' व्यंजक-शब्द ' असा घेतला तर ' अविवक्षित आहे वाच्य ज्याने, '. ' अविवक्षित आहे वाच्यार्थ ज्यामधील ', ' अविवक्षित आहे वाच्यार्थ ज्यामुळे ', ' अविवक्षित आहे वाच्यार्थ ज्याचा आणि ' अविवक्षित आहे वाच्यार्थ ज्यासाठी ' अशा पाच प्रकारांनी ' अविवक्षित-वाच्य ' हा समास सोडविता येईल. ' विवक्षितान्यपरवाच्य ' ( ध्वनि ) या समासामधील ' ध्वनि ' शब्दाचा अर्थही जर ' व्यंजक शब्द ' असाच घेतला, तर वरीलप्रमाणेच पाच विग्रह ( विवक्षित व अन्यपर आहे वाच्यार्थ ज्याने, ज्याचा इ. ) होऊ शकतील. तसेच ध्वनि शब्दाचा अर्थ ' व्यंजक वाच्य अर्थ ', ' व्यंग्य अर्थ ', ' व्यंजनाव्यापार ' व ' ध्वनिसंज्ञक संपूर्ण काव्य ' यांपैकी कोणताही घेतला, तरीही वरीलप्रमाणे ' अविवक्षितवाच्य ' या समासाचे प्रत्येकी पाच व विवक्षितान्यपरवाच्य ' या समासाचे प्रत्येकी पाच असे दहा-दहा प्रकारचे विग्रह होतील अशा तऱ्हेने एकंदर पन्नास विग्रह-प्रकार अभिनवगुप्तांना अभिप्रेत आहेत असे बालप्रिया व उत्तुंगोदय या टीकांतील विवरणे सांगतात. ते मान्य केल्यास इतका सूक्ष्म कीस काढण्यात केवळ पांडित्य-प्रदर्शन हाच हेतू आहे असे म्हणावे लागेल.

तथापि लोचनातील **यथोचितम्** हा शब्द विचारात घेतल्यास ' ध्वनि ' शब्दाच्या एकेक अर्थाशी ज्याने, ज्याचा इ. पैकी एकेका (योग्य त्या) शब्दाचा संबंध जोडल्यास पन्नासाऐवजी प्रत्येकी एकेक असे पाचच प्रकार होतील व ते अधिक सुटसुटीत होईल. व्यंजक शब्दाशी जोडताना ' ज्याचा, ' व्यंजक वाच्य अर्थाशी जोडताना ' ज्याने ', व्यंजना-व्यापाराशी जोडताना ' ज्यामुळे, ' व्यंग्य अर्थाशी जोडताना ज्यासाठी व ध्वनिकाव्याशी जोडताना ' ज्यामध्ये ' या शब्दांचा वापर करिता येईल.

७. म्हणूनच अविवक्षितवाच्य ध्वनीमध्ये ' शाब्दी ' व्यंजना असते असे म्हणतात व ' विवक्षितान्यपरवाच्य ' ध्वनीमध्ये ' आर्थी ' व्यंजना असते असे म्हणतात. विवक्षितान्यपरवाच्यांच्या ' शब्दशक्तिमूल ' प्रकारामध्ये मात्र ' शाब्दी ' व्यंजनाच असते, याचे कारण तेथे शब्द हा मुख्यतया व्यंजक असतो व वाच्यार्थ हा त्याचा सहकारी असतो.

८. वस्तुध्वनि हा जर लक्षणामूल असेल, तर तेथे वाच्यार्थ हा ' अविवक्षित ' असतो. पण तो वस्तुध्वनि जर लक्षणामूल नसेल, तर त्यातील वाच्यार्थ विवक्षितच असतो. तसेच अलंकारध्वनि व रसादिध्वनि यांमध्येही वाच्यार्थ विवक्षितच असतो. म्हणून वस्तु, अलंकार व रसादि हे पूर्वी सांगितलेले ध्वनीचे प्रकार अविवक्षितवाच्य व विवक्षितान्यपरवाच्य या दोन प्रकारांमध्ये अंतर्भूत होतात

९. म्हणजे ही नावे केवळ नावेच नाहीत, तर ती अन्वर्थक नावे आहेत. त्यांच्या-

मुळे या दोन प्रकारांतील ध्वनींच्या स्वरूपावर चांगलाच प्रकाश पडतो. अविवक्षितवाच्य प्रकारामध्ये वाच्यार्थ, वाक्यार्थ व लक्ष्यार्थ यांचे श्रोत्याला होणारे ज्ञान आणि वक्त्याची व्यंग्यार्थविषयक विवक्षा हे ध्वननव्यापाराचे सहकारी असतात, तर विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीमध्ये वाच्यार्थ व वाक्यार्थ यांचे श्रोत्याला झालेले ज्ञान आणि वक्त्याची वाच्यार्थविषयक विवक्षा आणि व्यंग्यार्थविषयक विवक्षा ही ध्वननव्यापाराची सहकारी होत.

१०. पाहा, मम्मट, काव्यप्रकाश, उल्लास ५ वा, पृ. १९१ (झळकीकर आवृत्ति).

११. 'श्रीपर्वत' या शब्दाने नेमका कोणता पर्वत अभिप्रेत आहे हे सांगणे कठीण आहे.

१२. या पंच अग्नींचा तपशील कुमारसंभव, ५–२० यामध्ये सांगितला आहे. प्रज्वलित केलेल्या चार अग्नींच्या मध्यभागी उभे राहून उन्हाळ्यातील सूर्याकडे एकटक पाहात राहणे हे पंचाग्निसाधन होय.

१३. **तव अधरपाटलं बिम्बफलं दशति।** याचा वाच्यार्थ 'तुझ्या अधरोष्ठाप्रमाणे रक्तवर्ण असलेल्या बिम्बफळाला टोच्या मारीत आहे' हा आहे. परंतु **तव** हे पद समासात न घालता स्वतंत्रपणे वापरल्याने त्याचा **दशति** याकडेही अन्वय होऊ शकतो व त्यामुळे व्यंजनेने 'तो (बिम्बफळाला टोच्या मारतो आहे' म्हणजे पर्यायाने 'तुला' म्हणजे) तुझ्या अधराला टोच्या मारीत आहे' असा अर्थ सूचित होऊ शकतो.

१४. वृत्त सांभाळूनसुद्धा समास करिता आला असता (उदा. **त्वदधरारुणमम्बुरुहाक्षि यत्** .. इ.); तरीपण कवीने तसा समास केला नाही याचे कारण अभिनवगुप्तांनी वर सांगितले आहे. यामध्ये जसा कवीचा, तसा अभिनवगुप्तांचाही रसिकपणा प्रत्ययास येतो.

१५. तारुण्यामुळे हाही उपभोग घडू शकतो व बिम्बफळ हेही पिकलेल्या अवस्थेतच म्हणजे योग्य काळीच त्या पोपटाला प्राप्त झालेले आहे असा दुहेरी अर्थ 'उचितकाल' या शब्दाचा होऊ शकतो.

१६. वस्तुतः या उदाहरणात विवक्षितान्यपरवाच्य ध्वनि असल्याने लक्षणा नाही. तरी **तुष्यतु दुर्जनः** या न्यायाने लक्षणा घटकाभर मानिली, तरी ती प्रधान नसल्याने हे अविवक्षितवाच्य ध्वनीचे उदाहरण होऊ शकणार नाही. अविवक्षितवाच्य ध्वनीमध्ये लक्षणेचा आश्रय केल्याविना व्यंग्यार्थाकडे जाताच येत नाही, म्हणून लक्षणा ही ध्वननव्यापाराला मुख्यतः सहायक असते. विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीच्या उदाहरणात लक्षणा न मानिता केवळ वाच्यार्थामुळे व्यंग्यार्थाची प्रतीति होऊ शकते आणि काही उदाहरणांत लक्षणा मानिली तरी ती सौंदर्य वाढविण्यास थोडीशीच मदत करिते, मुख्यत्वाने नाही. पूर्वी सांगितलेल्या 'हे धार्मिका! ...' इ. उदाहरणातही लक्षणा

नाही, पण ती मानिली तरी व्यंग्यार्थ-प्रतिपादनाचे कामी तिचे महत्त्व नगण्य आहे.

१७. ध्वनीच्या ज्या प्रकारात लक्षणा असते, त्यात अभिधा, तात्पर्य, लक्षणा व व्यंजना या एकामागून एक अशा क्रमाने प्रतीत होतात आणि त्यांमधील क्रम लक्षात येणारा असतो. पण 'असंलक्ष्यक्रम' प्रकारामध्ये वाच्यार्थ समजताक्षणी रसादि व्यंग्यार्थाची प्रतीति होत असल्यामुळे त्या दोन प्रतीतींमध्ये लक्षणेला प्रवृत्त होण्याला वावच नसतो.

१८. पुढे म्हणजे काशी आवृत्ति पृ. १८० वर. पण पूर्वी (पाहा, हेच पुस्तक पृ. १३१, १६१ व १६३) हा क्रम लक्षात येत नाही असे अभिनवगुप्तांनी 'लोचना'त म्हटले आहे.

१९. अर्थात् प्रतिपक्ष्याचे मत क्षणभर मान्य केल्यासच हे शक्य आहे. म्हणजे विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीच्या वस्तु व अलंकार या प्रकारांमध्ये लक्षणा मान्य केली नाही, तर तीनच व्यापार ( अभिधा, तात्पर्य व व्यंजना ) व असंलक्ष्यक्रम प्रकारामध्येही अर्थात् तीनच व्यापार असतात.

ध्वन्यालोकः

यदप्युक्तं भक्तिर्ध्वनिरिति, तत्प्रतिसमाधीयते --
भक्त्या बिभर्ति नैकत्वं रूपभेदादयं ध्वनिः ।

अयमुक्तप्रकारो ध्वनिर्भक्त्या नैकत्वं बिभर्ति, भिन्नरूपत्वात् । वाच्यव्यतिरिक्तस्यार्थस्य वाच्यवाचकाभ्यां तात्पर्येण प्रकाशनं यत्र व्यङ्ग्यप्राधान्ये स ध्वनिः । उपचारमात्रं तु भक्तिः ।

ध्वन्यालोक

आता हेही जे इतरांनी म्हटले की, 'लक्षणा म्हणजे ध्वनि,' त्याचे निराकरण पुढीलप्रमाणे—

**ध्वनीचे स्वरूप लक्षणेच्या स्वरूपाहून वेगळे असल्याने हा 'ध्वनि' लक्षणेशी एकरूप नव्हे.**

हा म्हणजे नुकतेच ज्याचे दोन प्रकार सांगितले तो ध्वनि लक्षणेहून भिन्न स्वरूपाचा असल्याने लक्षणा व तो एकच नव्हेत. ( कवीकडून ) वाच्यार्थ व वाचक शब्द यांच्याद्वारा वाच्यार्थाहून वेगळा ( व्यंग्य ) अर्थ

सुचवण्याच्या हेतूनेच तो वेगळा ( व्यंग्य ) अर्थ जेथे प्रकाशित केला जातो व जेथे त्या व्यंग्यार्थाचे प्राधान्य असते, तो ध्वनि होय. पण लक्षणा म्हणजे केवळ 'उपचार', म्हणजे गौण अर्थाने शब्दप्रयोग करणे होय.

लोचनम्

अत एवोभयोदाहरणपृष्ठ एव भाक्तमाहुरित्यनुभाष्य दूषयति । अयं भावः – भक्तिश्च ध्वनिश्चेति किं पर्यायवत्ताद्रूप्यम् ? अथ पृथिवीत्वमिव पृथिव्या अन्यतो व्यावर्तकधर्मरूपतया लक्षणम् ? उत काक इव देवदत्तगृहस्य सम्भवमात्रादुपलक्षणम् ? तत्र प्रथमं पक्षं निराकरोति–

भक्त्या बिभर्तीति । उक्तप्रकार इति पञ्चस्वर्थेषु योज्यम्– शब्देऽर्थे व्यापारे व्यङ्ग्ये समुदाये च । रूपभेदं दर्शयितुं ध्वनेस्तावद्रूपमाह– वाच्येति । तात्पर्येण विश्रान्तिधामतया प्रयोजनत्वेनेति यावत् । प्रकाशनं द्योतनमित्यर्थः । उपचारमात्रमिति । उपचारो गुणवृत्तिर्लक्षणा । उपचरणमतिशयितो व्यवहार इत्यर्थः । मात्रशब्देनेदमाह– यत्र लक्षणाव्यापारात् तृतीयादन्यश्चतुर्थः प्रयोजनद्योतनात्मा व्यापारो वस्तुस्थित्या सम्भवन्नप्यनुपयुज्यमानत्वेनानाद्रियमाणत्वाद् सत्कल्पः – 'यमर्थमधिकृत्य' इति हि प्रयोजनलक्षणम्– तत्रापि लक्षणास्तीति कथं ध्वननं लक्षणा चेत्येकं तत्त्वं स्यात् ।

लोचन

म्हणूनच[१] ध्वनीच्या दोन्ही प्रकारांची उदाहरणे दिल्यावर मगच 'दुसरे कोणी त्याला लाक्षणिक म्हणतात' या (कारिका १ मधील) वाक्याचा (वृत्तीमध्ये 'जे इतरांनी म्हटले की लक्षणा म्हणजेच ध्वनि' या शब्दांनी) अनुवाद करून त्या मताचे आता वृत्तिकार खंडन करीत आहेत. ते खंडन करिताना त्यामागील विचारसरणी अशी : (१) दोन समानार्थक शब्दांमध्ये असते तसे भक्ति (म्हणजे लक्षणा) व ध्वनि यांमध्ये तादात्म्य आहे (असे तुम्ही म्हणता) काय ? किंवा (२) पृथिवीत्व हा धर्म जसा पृथिवीला इतरांपासून वेगळी काढणारा असतो, तसे 'लक्षणा' हे ध्वनीचे लक्षण (म्हणजे असाधारण धर्म) होय असे तुमचे म्हणणे आहे काय ? किंवा (३) देवदत्ताच्या घरावर एखादा

वेळी कावळा बसलेला असू शकतो व तेवढ्या वेळापुरता तो ते घर दाखविता येण्याचे निदर्शक चिन्ह होतो, तशी लक्षणा ही एखाद्या वेळी ध्वनीची केवळ निदर्शक होऊ शकते असे तुम्हांला म्हणावयाचे आहे ?[२]
आता या तिहींपैकी पहिल्या पक्षाचे (म्हणजे तादात्म्यपक्षाचे) खंडन करण्यात येत आहे :—

'(हा ध्वनि) लक्षणेशी एकरूप (नाही)' — 'नुकतेच ज्या ध्वनीचे दोन प्रकार सांगितले तो' या शब्दाचा (व्यंजक) शब्द, (वाच्य) अर्थ, व्यंजनाव्यापार, व्यंग्य अर्थ व समग्र काव्य या, 'ध्वनी'च्या पाचही अर्थांशी संबंध जोडावा.[३] लक्षणा व ध्वनि यांची स्वरूपे वेगवेगळी आहेत हे दाखविण्यासाठी प्रथम 'ध्वनी' चे स्वरूप कसे असते ते वृत्तिकार 'वाच्यार्थाहून'.. इ. शब्दांनी सांगतात. 'सुचविण्याच्या हेतूनेच' म्हणजे शेवटी त्या व्यंग्यार्थावर गेल्यानेच. रसिकाला तृप्ति लाभणे हेच (कवीचे) उद्दिष्ट असल्यामुळे 'प्रकाशित केला जातो' याचा अर्थ 'त्याचे सूचन केले जाते.' 'केवळ उपचार' — 'उपचार' म्हणजे (सादृश्य-संबंधावर आधारलेली) 'गुणवृत्ति' व (सादृश्येतर सबंधावर आधारलेली) 'लक्षणा'[४] म्हणजे 'आपल्या प्रसिद्ध (म्हणजे 'वाच्य') अर्थाखेरीज वेगळ्या अर्थाने शब्द वापरणे,' हा अर्थ. 'केवळ' या शब्दाने वृत्तिकारांना असे सांगावयाचे आहे की, एखाद्या उदाहरणात तिसऱ्या 'लक्षणा' व्यापाराहून निराळा असलेला, चवथा, प्रयोजन सूचित करणारा व्यापार हा लक्षणा वापरावयाचे कारण म्हणून खरोखर संभवत असला, तरी सौंदर्यनिर्मिति करण्यासाठी त्याचा उपयोग नसल्याने त्या व्यापाराला किंमत दिली जात नाही व म्हणून तो असूनही नसल्यासारखा असतो, अशा उदाहरणात 'केवळ' लक्षणाच असते. 'प्रयोजनाचे' लक्षण पुढीलप्रमाणे केले गेले आहे—

"मनुष्य ज्या उद्देशाने कोणतीही कृति करावयास प्रवृत्त होतो, ते 'प्रयोजन' होय."[५] वरील प्रकारच्या ज्या उदाहरणात प्रयोजन सूचित करणारा चवथा व्यापार असून नसल्यासारखा असतो, तेथेही लक्षणा' असते.[६] तेव्हा 'लक्षणा' व 'ध्वनन' हे एकच कसे असतील ?

टीपा

१. 'म्हणूनच' म्हणजे विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीच्या वस्तु (व अलंकार) या प्रकारांमध्ये तुष्यतु दुर्जनः या न्यायाने का होईना. पण लक्षणा ही अल्प प्रमाणात असू शकते, म्हणूनच.
२. 'लक्षण' म्हणजे एखाद्या वस्तूच्या ठिकाणी नेहमीच असणारा स्वाभाविक धर्म व 'उपलक्षण' म्हणजे केव्हातरी, परिस्थितीने, आगंतुकपणे उत्पन्न होणारा धर्म.
३. म्हणजे ध्वनीचा या पाचांपैकी कोणताही अर्थ घेतला, तरी ध्वनि हा लक्षणेशी एकरूप नाही असे अभिनवगुप्तांना म्हणावयाचे आहे. मात्र ध्वनि या शब्दाचे हे पाच अर्थ अभिनवगुप्तांनीच सांगितले आहेत, वृत्तीमध्ये ते कोठेही दाखविलेले नाहीत.
४. 'उपचार' या शब्दाचे हे अर्थ अभिनवगुप्तांनी 'लोचना'त पुढे (पाहा, काशी आवृत्ति, पृ. १४७ व १५१) सांगितले आहेत.
५. पाहा. गौतम न्यायसूत्र, १–१–२४. 'प्रयोजन' शब्दाचा हा अर्थ अभिनवगुप्तांनी पूर्वी पृ. ५४ व ५५ वर सांगितला होता.
६. म्हणजे व्यंजना जवळजवळ नसूनही लक्षणा मात्र स्पष्टपणे असते, असे असल्यावर व्यंजना म्हणजेच लक्षणा असे कसे मानिता येईल ?

ध्वन्यालोकः

सा चैतस्याङ्क्तिर्लक्षणं ध्वनेरित्याह–
अतिव्याप्तेरथाव्याप्तेर्न चासौ लक्ष्यते तया ॥ १४ ॥

नैव भक्त्या ध्वनिर्लक्ष्यते। कथम्? अतिव्याप्तेरव्याप्तेश्च। तत्रातिव्याप्तिर्ध्वनिव्यतिरिक्तेऽपि विषये भक्तेः सम्भवात्। यत्र हि व्यङ्ग्यकृतं महत्सौष्ठवं नास्ति तत्राप्युपचरितशब्दवृत्त्या प्रसिद्ध्यनुरोध-प्रवर्तितव्यवहाराः कवयो दृश्यन्ते। तथा–

परिम्लानं पीनस्तनजघनसङ्गादुभयत–
स्तनोर्मध्यस्यान्तः परिमिलनमप्राप्य हरितम्।
इदं व्यस्तन्यासं श्लथभुजलताक्षेपवलनैः
कृशाङ्ग्याः सन्तापं वदति बिसिनीपत्रशयनम् ॥

तथा–

चुंबिज्जइ सअहुत्तं अवरुंडिज्जइ सहस्सहुत्तंपि।
रमिअ पुणो रमिज्जइ पिए जणे णत्थि पुनरुत्तं ॥

चुम्ब्यते शतकृत्वोऽवरुध्यते सहस्रकृत्वः ।
विरम्य पुना रम्यते प्रियो जनो नास्ति पुनरुक्तम् ॥
इति च्छाया)

तथा–

कुविआओ ँ पसण्णाओ ओरुण्णमुहीओ ँ विहसमाणाओ ।
जह गहिआ तह हिअअं हरंति उच्छिण्ण महिलाओ ॥

तथा–

अज्जाएँ पहारो णवलदाएँ दिण्णो पिएण थणवट्ठे ।
मिउओ वि दूसहो च्चिअ जाओ हिअए सवत्तीणं ॥
भार्यायाः प्रहारो नवलतया दत्तः प्रियेण स्तनपृष्ठे ।
मृदुकोऽपि दुःसह एव जातो हृदये सपत्नीनाम् ॥
इति च्छाया)

ध्वन्यालोक

आता ‘ लक्षणा हे ध्वनीचे लक्षण ( असाधारण धर्म ) असेल ’ असेही मत [१] होऊ नये, म्हणून सांगितले जात आहे की—

अतिव्याप्ति आणि त्याचप्रमाणे अव्याप्ति ( हे दोष ) उद्भवत असल्यामुळे ती लक्षणा त्या ( ध्वनी ) चे लक्षण ( म्हणजे व्यवच्छेदक, असाधारण धर्म ) ही होऊ शकत नाही ।। १४ ।।

भक्ति ( म्हणजे लक्षणा ) हे ध्वनीचे लक्षण होऊच शकत नाही. ते कसे ? तर अतिव्याप्तीमुळे आणि अव्याप्तीमुळे. त्यांपैकी अतिव्याप्ति यामुळे की, ध्वनीहून वेगळ्या ठिकाणीही लक्षणा असू शकते. कारण, ज्या ठिकाणी व्यंग्यार्थामुळे विशेष सौंदर्य उत्पन्न झालेले नसते, तेथेही केवळ परंपरेला अनुसरून [२] कवि वृत्तीने म्हणजे लक्षणेने शब्दाचा प्रयोग करिताना दिसतात. जसे [३]

‘ पुष्ट स्तन व नितंबभाग यांच्या संपर्कामुळे दोन ठिकाणी दबून म्लान झालेली, कृश कटिभागाचा संपर्क न झाल्याने त्या दोहोंच्या मध्यभागी हिरवी राहिलेली, दुर्बल झालेल्या बाहुलतांच्या आघातामुळे आणि अस्वस्थपणाने सारखी कूस बदलल्यामुळे विस्कटलेली ही कमलिनीपत्रांची शय्या त्या तन्वंगीला झालेला विरहताप सांगत [४] आहे. ’

तसेच—

'प्रिय माणसाची शंभरवेळा चुंबने घेतली जातात, हजारदा त्याला आलिंगन दिले जाते. थांबून थांबून पुन: त्याच्याशी प्रणयक्रीडा केली जाते. त्या बाबतीत कधी पुनरुक्ति[५] होत नाही.

तसेच—

'रागावलेल्या, खुशीत असलेल्या, रडवेले तोंड केलेल्या, हसणाऱ्या कोणत्याही स्थितीत घ्या,[६] उच्छृंखल स्त्रिया मन हरण[७] करितातच.

तसेच—

'(कनिष्ठ) भार्येच्या उरोजावर प्रिय पतीने वेलीच्या ताज्या डहाळीने दिलेला[८] तडाखा सौम्य असला तरी सवतींना दुःसहच झाला.'

लोचनम्

द्वितीयं पक्षं दूषयति– अतिव्याप्तेरिति। असाविति ध्वनिः। तथेति भक्त्या। ननु ध्वननमवश्यम्भावीति कथं तद्व्यतिरिक्तोऽस्ति विषय इत्याह–महत्सौष्ठवमिति। अत एव प्रयोजनस्यानादरणीयत्वाद्-व्यञ्जकत्वेन न कृत्यं किञ्चिदिति भावः। महद्ग्रहणेन गुणमात्रं तद्भवति। यथोक्तम्– 'समाधिरन्यधर्मस्य क्वाप्यारोपो विवक्षितः' इति दर्शयति। ननु प्रयोजनाभावे कथं तथा व्यवहार इत्याह– प्रसिद्ध्यनुरोधेति। परम्परया तथैव प्रयोगात्। वयं तु ब्रूमः –प्रसिद्धिर्या प्रयोजनस्यानिगूढ-तेत्यर्थः। उत्तानेनापि रूपेण तत्प्रयोजनं चकासन्निगूढतां निधानवदपेक्षत इति भावः। वदनीत्युपचारे हि स्फुटीकरणप्रतिपत्तिः प्रयोजनम्। यद्यगूढं स्वशब्देनोच्येत, किमचारुत्वं स्यात्? गूढतया वर्णने वा किं चारुत्व-मधिकं जातम्? अनेनैवाशयेन वक्ष्यति– यत उक्त्यन्तरेणाशक्यं यदिति। अवरुंधिज्जइ आलिङ्ग्यते। पुनरुक्तमित्यनुपादेयता लक्ष्यते, उक्तार्थस्या-सम्भवात्।

कुपिताः प्रसन्ना अवरुदितवदना विहसन्त्यः।

यथा गृहीतास्तथा हृदयं हरन्ति स्वैरिण्यो महिलाः॥

अत्र ग्रहणेनोपादेयता लक्ष्यते। हरणेन तत्परतन्त्रतापत्तिः। तथा अज्जेति। कनिष्ठभार्यायाः स्तनपृष्ठे नवलतया कान्तेनोचितक्रीडा-योगेन मृदुकोऽपि प्रहारो दत्तः सपत्नीनां सौभाग्यसूचकं तत्क्रीडासंवि-

भागमप्राप्तानां हृदये दुःसहो जातः, मृदुकत्वादेव। अन्यस्य दत्तो मृदुः प्रहारोऽन्यस्य च सम्पद्यते। दुस्सहश्च मृदुरपीति चित्रम्। दानेनात्र फलवत्त्वं लक्ष्यते।

लोचन

दुसऱ्या (म्हणजे लक्षणा हे ध्वनीचे 'लक्षण' आहे, या) मताचे खंडन 'अतिव्याप्तीमुळे' ...इ. शब्दांनी केले जात आहे.(असौ म्हणजे) 'तो' म्हणजे 'ध्वनि,' तया म्हणजे तिच्याकडून म्हणजे लक्षणेकडून.

पण काय हो, जेथे (प्रयोजनमूलक लक्षणा असते, तेथे (प्रयोजनाचे) ध्वनन असणारच, मग ध्वननाचे क्षेत्र लक्षणेच्या क्षेत्राहून वेगळे कसे असणार? याचे उत्तर (वृत्तीतल्या) 'विशेष सौंदर्य' (नसल्यामुळे) इ. शब्दांनी दिले जात आहे. म्हणूनच, म्हणजे (व्यंग्य प्रयोजन असले तरी त्यात) विशेष सौंदर्य नसल्यामुळेच कवीला व वाचकालाही त्या प्रयोजनाचे काहीही महत्त्व वाटत नाही व म्हणून तेथे व्यंजकत्वाची काहीही गरज नसते, हा आशय.

'विशेष' शब्दाने इतके दाखविले गेले आहे की, अशा (म्हणजे व्यंजनेला महत्त्व नसलेल्या) उदाहरणात व्यंग्य प्रयोजन हा त्या काव्याचा (आत्मा न होता) केवळ एक गुणधर्म होतो. उदा. म्हटलेच आहे की— "एकाच्या गुणधर्माचा दुसऱ्या कोणावर तरी आरोप करण्याचा इरादा असल्यास तो 'समाधि' नावाचा गुण असतो."[९]

पण काय हो, प्रयोजन नसताना (किंवा ते नगण्य असताना) लक्षणेचा वापर केला जाईलच कसा?' अशी शंका कोणी उपस्थित करील, म्हणून 'केवळ परंपरेला अनुसरून' असे वृत्तिकारांनी म्हटले आहे. कारण वहिवाटीने तसाच (म्हणजे लक्षणायुक्त) शब्दप्रयोग केला जातो.

परंतु आम्ही (वृत्तीतल्या) 'प्रसिद्धि' या शब्दाचा अर्थ असा लावतो—

प्रयोजनाची प्रसिद्धि म्हणजे प्रयोजन 'गूढ' नसणे.[१०] प्रयोजन जरी अतिशय स्पष्टपणे प्रतीत होणारे असले, तरी एखाद्या (सोन्याच्या किंवा रत्नांच्या) खजिन्याप्रमाणे ते प्रयोजन ध्वनिकाव्यात जरा

झाकलेले, लपलेले असावे लागते, हा आशय. ' सांगत आहे ' या लाक्षणिक शब्दप्रयोगामागे (बोलून दाखवावे इतक्या) ' उघडपणे प्रकट करीत आहे ' असे सुचविणे, हे प्रयोजन आहे. हे प्रयोजन गुप्त न ठेविता (बोलून दाखवावे इतक्या स्पष्टपणे प्रकट करीत आहे असे) वाचक शब्दांनी सांगितले, तरी त्यामुळे वरील उदाहरणात कोणता असुंदरपणा उत्पन्न होईल ? किंवा ' सांगत आहे ' अशा प्रकारे ते प्रयोजन आडवळणाने (लक्षणा वापरून) वर्णन करण्यामुळे तरी काय विशेष सौंदर्य निर्माण झाले आहे ? ह्याच अभिप्रायाने (ग्रंथकार) पुढे [११] म्हणणार आहेत–' कारण जे बोलण्याच्या दुसऱ्या कोणत्याही पद्धतीने प्रकाशित होऊ शकत नाही....'इ.

अवरुंडिज्जइ म्हणजे आलिंगिला जातो. ' पुनरुक्ति ' (म्हणजे एकदा बोललेले पुन्हा बोलणे) याचा वाच्यार्थ येथे असंभवनीय असल्यामुळे त्याचा ' स्वीकारार्ह नसणे ' (म्हणजे कंटाळवाणे असणे) हा लक्ष्यार्थ स्वीकारावा लागतो.

**कुपिताः प्रसन्नाः इ.** – येथे (गृहीताः यातील) ' ग्रहण ' याचा लक्ष्यार्थ ' स्वागतार्ह असणे ' हा घ्यावा. ' हरण करितात ' याचा लक्ष्यार्थ ' वश करून घेतात. '

तसेच–भार्येच्या–कनिष्ठ भार्येच्या – उरोजांवर प्रिय पतीने क्रीडेच्या वेळी नेहमीप्रमाणे केलेला वेलीच्या कोवळ्या डहाळीचा हलकासा प्रहार, तो सौम्य होता म्हणूनच इतर सवतींच्या हृदयाला असह्य झाला, कारण मोहकपणाचे फळ असणारे त्या क्रीडेमध्ये सहभागी होण्याचे भाग्य त्या सवतींच्या वाट्याला आले नव्हते. एकाला दिलेल्या सौम्य तडाख्याचे दुःख दुसऱ्याला मिळते, तो सौम्यही असतो आणि असह्यही होतो, हे आश्चर्य [१२] खरेच. ' दिला ' या शब्दाचा येथे ' दानाचा मोबदला मिळवला ' हा लक्ष्यार्थ घ्यावयाचा. [१३]

टीपा

१. या वाक्याचा अर्थ पुढीलप्रमाणे (दुसऱ्या तऱ्हेने) ही लावता येईल :– ' आणि लक्षणा ही ध्वनीशी एकरूप नसेना का, पण तिला ध्वनीचे ' लक्षण ' तर माना !

२. प्रसिद्धि याचा अर्थ वर ' परंपरा ' असा केला आहे. अभिनवगुप्त ' प्रसिद्धि ' म्हणजे ' लक्षणेमागील प्रयोजन फारच प्रसिद्ध असणे ' असा दुसराही अर्थ करितात.

३. पाहा, रत्नावली, २–११.

४. ' सांगत ' याचा वाच्यार्थ अशक्य, कारण ' शय्या ' सांगू शकत नाही. म्हणून ' सांगत ' याचा लक्ष्यार्थ ' प्रकट करीत ' असा घ्यावा लागतो. लक्ष्यार्थाच्या वाचकशब्दाऐवजी ' सांगत ' हा शब्द वापरण्यामागील प्रयोजन अगदीच साधे व स्पष्ट आहे. ते म्हणजे ' अगदी उघडपणे ' (प्रकट करीत आहे) हे होय.

५. ' पुनरुक्ति ' हा शब्द येथे लाक्षणिक आहे. त्याचा वाच्यार्थ उपयोगी पडत नाही, कारण चुंबनालिंगनादि कृति या ' बोलण्या 'चा विषय नसतात. म्हणून लक्षणेने ' पुनरुक्ति ' याचा अर्थ ' कंटाळवाणेपणा ' असा होतो. ही लक्षणा फार रुळलेली असल्यामुळे तीत सूचित होणारे विशेष असे सौंदर्य नाही.

६. येथेही ' घ्या ' शब्दाचा ' धरा, ' ' पकडा ' अशा तऱ्हेचा वाच्यार्थ बाधित होतो, म्हणूनच हा शब्द लाक्षणिक आहे. पण या शब्दप्रयोगाने विशेष सौंदर्य सूचित होते असे नाही. येथे ' घ्या ' याचा लक्ष्यार्थ ' पाहा ' अशासारखा आहे.

७. ' हरण करितात ' याचाही शब्दशः अर्थ ' पळवून नेतात ' असा होईल, व लक्ष्यार्थ ' आपल्या अधीन करितात ' असा घ्यायचा. ' हरण करितात ' या शब्दप्रयोगातही काहीही सौंदर्य सूचित होत नाही.

८. ' दिलेला ' म्हणजे ' मारलेला '. येथेही तडाखा हा ' देण्याच्या ' क्रियेचा विषय होणे असम्भवनीय, म्हणून त्याचा वाच्यार्थ बाधित होतो. याही शब्दात सौंदर्य असे मुळीच नाही. या श्लोकात ' सौम्य ' तडाखा ' दुस्सह ' होणे हा विरोधालंकार व कनिष्ठ भार्येला दिलेला तडाखा सवतींना दुस्सह झाला हा असंगति अलंकार, यांमुळे चमत्कृति निर्माण होते ' दिलेला ' या शब्दात काहीही चमत्कृति नाही.

९. हे लक्षण अभिनवगुप्तांनी कोठून घेतले, ते समजत नाही. कारण अभिनवगुप्तांच्या पूर्वीच्या ग्रंथांत ते आढळत नाही. मात्र दण्डीने काव्यादर्श, १–९१ मध्ये ' समाधि ' गुणाचे जे लक्षण दिले आहे, त्याच्याशी या लक्षणाचे बरेच साम्य आहे.

१०. पहिल्या मताप्रमाणे ' प्रसिद्धि 'म्हणजे (प्रयोजन नसूनही) लाक्षणिक शब्दप्रयोग करण्याची वहिवाट आणि अभिनवगुप्तांच्या मताप्रमाणे ' प्रसिद्धि ' म्हणजे प्रयोजन असले, तरीही ते फारच उघड, अत एव सौंदर्यहीन असणे.

११. ' पुढे ' म्हणजे कारिका १५ मध्ये.

१२. ' लोचना 'तल्या चित्रम् या शब्दाचा अर्थ ' आश्चर्य ' हा आम्ही घेतला

आहे, तो योग्यच आहे, पण या पद्यात 'असंगति' व 'विरोध' हे दोन अर्थालंकार विशेष चमत्कृतिजनक असल्यामुळे 'चित्र' याचा 'चित्र प्रकारचे काव्य' असाही अर्थ घेता येणे शक्य आहे.

१३. येथे 'दान करणे' ह्याचा देय वस्तूचा म्हणजे प्रहाराचा तो स्वीकारणाऱ्या वस्तूशी संबंध घडवून आणणे हा लक्ष्यार्थ स्वीकारणें आवश्यक आहे, कारण 'दान' याचा देय वस्तूवरील स्वतःचे स्वामित्व सोडून दुसऱ्याचे स्वामित्व उत्पन्न करणे हा वाच्यार्थ येथे प्रहाराच्या बाबतीत लागू पडत नाही. लोचनातील तत्फलवत्त्वम् हा पाठ आम्ही कल्पलताविवेक (पृ. १२३)वरील पाठाला अनुसरून घेतला आहे. लोचनाच्या इतर संस्करणांमध्ये फलवत्त्वम् हा पाठ आढळतो.

ध्वन्यालोकः

तथा –

परार्थे यः पीडामनुभवति भङ्गेऽपि मधुरो
यदीयः सर्वेषामिह खलु विकारोऽप्यभिमतः ।
न सम्प्राप्तो वृद्धिं यदि स भृशमक्षेत्रपतितः
किमिक्षोर्दोषोऽसौ न पुनरगुणाया मरुभुवः ॥

इत्यत्रेक्षुपक्षेऽनुभवतिशब्दः । न चैवंविधः कदाचिदपि ध्वनेर्विषयः ।

ध्वन्यालोक

त्याचप्रमाणे—

'दुसऱ्यांसाठी जो पीडा (१. दाब, पिळले जाणे २. दुःख) अनुभवतो; मोडला तरी (दुसरा अर्थ-मानभंग झाला तरी) जो गोडच (दुसरा अर्थ-स्नेहपूर्णच) असतो; या जगात ज्याचा विकार (१. त्यापासून बनवलेले गूळ, साखर इ. पदार्थ, २. क्रोध इ. मनोविकार) देखील सर्वांना खरोखर आवडतो, तो (ऊस) नापीक जमिनीत (दुसरा अर्थ-प्रतिकूल परिस्थितीत) पडल्यामुळे वाढला (दुसरा अर्थ-उत्कर्ष पावला) नाही, तर तो काय त्या उसाचा दोष? आणि त्या गुणहीन, रेताड जमिनीचा नाही?

या (शेवटच्या उदाहरणातल्या) 'अनुभवतो' या शब्दाचा उसाशी अन्वय करिताना लक्षणा दिसली, तरी तीमुळे सुंदर प्रयोजन सूचित होत नाही. अशा तऱ्हेचे शब्दप्रयोग ही ध्वनीची उदाहरणे केव्हाच होत नाहीत.

लोचनम्

तथा – परार्थेति । यद्यपि प्रस्तुतमहापुरुषापेक्षयानुभवतिशब्दो मुख्य एव, तथाप्यप्रस्तुते इक्षौ प्रशस्यमाने पीडाया अनुभवनेनासम्भवता पीडाबत्त्वं लक्ष्यते; तच्च पीड्यमानत्वे पर्यवस्यति । नन्वस्त्यत्र प्रयोजनं तत्किमिति न ध्वन्यत इत्याशङ्कयाह – न चैवंविध इति ॥१४॥

लोचन

त्याचप्रमाणे (आणखी एक उदाहरण) – 'दुसऱ्यासाठी '....इ.– (या श्लोकातील) प्रस्तुत जो 'सज्जन,' त्याच्याकडे जोडताना 'अनुभवतो' हा शब्द मुख्यार्थानेच म्हणजे वाच्यार्थानेच घ्यावयाचा आहे. तरी अप्रस्तुत जो ऊस, त्याचे गुणवर्णन करिताना (ऊस हा अचेतन असल्यामुळे) त्याला पीडेचा 'अनुभव' येणे अशक्य असल्याने (चरकात घातल्यामुळे) 'पिळले जाणे' हा लक्ष्यार्थ घ्यावा लागतो व तो लक्ष्यार्थ 'पूर्णपणे (म्हणजे चिपाड होईपर्यंत) पिळले जाणे' या अर्थात परिणत होतो.

'पण काय हो, येथे प्रयोजन आहे की ! मग ते काय म्हणून 'ध्वनित' होणार नाही ? ' अशी शंका आल्यास (वृत्तिकार) तिचे उत्तर 'आणि अशा तऱ्हेचे शब्दप्रयोग'. ...इ. वाक्याने देतात. ॥१४॥

टीपा

१. हा श्लोक जरी रम्य असला, तरी यातला 'अनुभवतो' हा शब्द ध्वनीचे उदाहरण नाही. उसाकडे लावताना ऊस हा निर्जीव, म्हणून 'अनुभवणे' त्याच्या ठिकाणी संभवनीय नाही. त्यामुळे वाच्यार्थ बाधित होतो. म्हणून 'अनुभवतो' हा शब्द उसाकडे लावताना लक्षणायुक्त म्हणायचा. अर्थात केवळ या शब्दप्रयोगात थोडेसे सौंदर्य आहे, पण अलौकिक सौंदर्य म्हणजे ध्वनित्व नाही. या श्लोकात 'अप्रस्तुतप्रशंसा' हा अलंकार आहे. अप्रस्तुत उसावरून प्रस्तुत '(प्रतिकूल परिस्थितीत सापडलेला) सज्जन' सूचित होत आहे. मोडला, गोड, इत्यादि अनेक शब्दांत श्लेष आहे.

यतः —

उक्त्यन्तरेणाशक्यं यत्तच्चारुत्वं प्रकाशयन् ।
शब्दो व्यञ्जकतां बिभ्रद्ध्वन्युक्तेर्विषयी भवेत् ॥ १५ ॥
अत्र चोदाहृते विषये नोक्त्यन्तराशक्यचारुत्वव्यक्तिहेतुः शब्दः ।

ध्वन्यालोक

कारण —

जो शब्द व्यंजक असून असा सुंदर अर्थ प्रकाशित करतो की, अर्थाचे ते सौंदर्य त्याखेरीज दुसऱ्या कोणत्याही शब्दाने प्रकाशित होऊ शकत नाही, तोच शब्द 'ध्वनि–काव्य' या संज्ञेला पात्र होईल ॥ १५ ॥

आणि या वर दिलेल्या पाचही उदाहरणांतले ( लाक्षणिक ) शब्द काही दुसऱ्या शब्दांनी न सांगता येण्याजोगे सौंदर्य निर्माण करणारे नाहीत.

लोचनम्

यत उक्त्यन्तरेणेति । उक्त्यन्तरेण ध्वन्यतिरिक्तेन स्फुटेन शब्दार्थ-व्यापारविशेषेणेत्यर्थः । शब्द इति पञ्चस्वर्थेषु योज्यम् । ध्वन्युक्तेर्विषयी-भवेदिति– ध्वनिशब्देनोच्यत इत्यर्थः । उदाहृत इति । वदतीत्यादौ ।।१५।।

लोचन

'कारण बोलण्याच्या दुसऱ्या कोणत्याही पद्धतीने'– म्हणजे 'ध्वनि' सोडून शब्दाच्या इतर प्रसिद्ध अशा (अभिधा किंवा लक्षणा या) अर्थबोधक व्यापाराने, हा आशय. 'शब्दः' हा शब्द (ध्वनीच्या वर सांगितलेल्या) पाचही अर्थांनी घ्यावा. 'ध्वनि' या संज्ञेला पात्र होईल– याचा "त्या शब्दाला 'ध्वनि' म्हणतात," हा अर्थ. दिलेल्या उदाहरणांत म्हणजे 'सांगत आहे' वगैरे (पाच) उदाहरणांत, हा अर्थ ।।१५।।

टीपा

१. दुसऱ्या 'उक्तीने' असे मूळ कारिकेत आहे. त्याचा 'शब्दाने' असा आम्ही अनुवाद केला आहे. महाकवि व्यंजक शब्द योजून असा काही सुंदर अर्थ प्रत्ययास आणतो की, त्याऐवजी दुसरा शब्द वापरला की ते सौंदर्य नष्ट झालेच म्हणून समजावे. अभिनवगुप्तांनी उक्तीने = 'ध्वनिव्यतिरिक्त दुसऱ्या शब्दार्थव्यापाराने (उदा. अभिधेने)' असा अर्थ केला आहे. आणि त्या अर्थात व आमच्या अनुवादात निराळेपणा नाही.

ध्वन्यालोकः

किं च —

रूढा ये विषयेऽन्यत्र शब्दाः स्वविषयादपि ।
लावण्याद्याः प्रयुक्तास्ते न भवन्ति पदं ध्वनेः ॥ १६ ॥

तेषु चोपचरितशब्दवृत्तिरस्तीति । तथाविधे च विषये क्वचित्सम्भवन्नपि ध्वनिव्यवहारः प्रकारान्तरेण प्रवर्तते । न तथाविधशब्दमुखेन ।

ध्वन्यालोक

आणखी असे की —

आणि लावण्य[3] वगैरेंसारखे शब्द की, जे स्वतःच्या यौगिक ( म्ह. व्युत्पत्तिलभ्य ) अर्थापेक्षा निराळ्या अर्थाने रूढ झालेले आहेत, ते वापरल्यामुळे त्यांना काही 'ध्वनि' हे नाव मिळणार नाही ॥ १६ ॥

आणि अशा शब्दांच्या बाबतीत त्या शब्दांचा केवळ गौण अर्थाने प्रयोग केलेला असतो. तथापि असे शब्द असलेल्या काही काही उदाहरणांना जरी 'ध्वनि' हे नाव देता येणे शक्य असले, तरी ते निराळ्या कारणांमुळे[2] शक्य होते. त्यांसारखे ( लाक्षणिक ) शब्द वापरल्यामुळे नव्हे.

लोचनम्

एवं यत्र प्रयोजनं सदपि नादरास्पदं तत्र को ध्वननव्यापार इत्युक्त्वा यत्र मूलत एव प्रयोजनं नास्ति, भवति चोपचारस्तत्रापि को ध्वननव्यापार इत्याह — किञ्चेति । लावण्याद्या ये शब्दाः स्वविषयाल्लवणरसयुक्तत्वादेः स्वार्थादन्यत्र हृद्यत्वादौ रूढाः, रूढत्वादेव त्रितयसन्निध्यपेक्षणव्यवधानशून्याः । यदाह —

निरूढा लक्षणाः काश्चित्सामर्थ्यादभिधानवत् ।

इति । ते तस्मिन् स्वविषयादन्यत्र प्रयुक्ता अपि न ध्वनेः पदं भवन्ति; न तत्र ध्वनिव्यवहारः । उपचरिता शब्दस्य वृत्तिर्गौणी, लाक्षणिकी चेत्यर्थः । आदिग्रहणेनानुलोम्यं प्रातिकूल्यं सब्रह्मचारीत्येवमादयः शब्दा लाक्षणिका गृह्यन्ते । लोम्नामनुगतमनुलोमं मर्दनम्, कूलस्य प्रतिपक्षतया स्थितं स्रोतः प्रतिकूलम्, तुल्यगुरुः सब्रह्मचारी इति मुख्यो विषयः । अन्यः पुनरुपचरित एव । न चात्र प्रयोजनं किञ्चिदुद्दिश्य लक्षणा प्रवृत्तेति न तद्विषयो ध्वननव्यवहारः ।

'सनु देवडि तेल्ल णाहि पलु, द्रम्मि गमिट्ठा । लावण्णुज्जलंगु घरि ढोल्लु पइट्ठा ।' इत्यादौ लावण्यादिशब्दसन्निधानेऽस्ति प्रतीयमानाभिव्यक्तिः । सत्यम्, सा तु न लावण्यशब्दात्, अपि तु समग्रवाक्यार्थप्रतीत्यनन्तरं ध्वननव्यापारादेव । अत्र हि प्रियतमामुखस्यैव समस्ताशाप्रकाशकत्वं ध्वन्यत इत्यलं बहुना । तदाह – प्रकारान्तरेणेति । व्यञ्जकत्वेनैव । न तूपचरितलावण्यादिशब्दप्रयोगादित्यर्थः ।। १६ ।।

लोचन

याप्रमाणे जेथे प्रयोजन असूनही ते विचारात घेण्याइतक्या महत्त्वाचे नसते, तेथे ध्वननव्यापाराला कोठला अवकाश असणार ? असे म्हणून जेथे मुळातच प्रयोजन नसते आणि केवळ (रूढिमूल) लक्षणाच असते, तेथे कोठला आला आहे ध्वननव्यापार ? या आशयाने (ग्रंथकार) 'आणखी असे की'... इ. म्हणतात. 'लावण्य' वगैरेसारखे जे शब्द 'खारट चवीने युक्त असणे' या आपल्या व्युत्पत्तिलभ्य अर्थाहून निराळ्या (रमणीयत्व इ.) अर्थाने रूढ झालेले आहेत, असे. (आणि) ते रूढ झालेले असतात म्हणूनच त्यांच्या बाबतीत (मुख्यार्थ हा पूर्णपणे विसरला गेला असल्यामुळे) मुख्यार्थाचा बाध इ. तीन लक्षणाबीजे अस्तित्वात असण्याचा प्रश्न नसतो. जसे म्हटलेच आहे की–

'काही लक्षणा वारंवार वापरल्या गेल्यामुळे निरूढ म्हणजे पूर्णपणे रूढ झालेल्या असतात. त्यामुळे त्या अभिधेसारख्याच होऊन राहतात.'[३]

असे शब्द आपल्या वाच्य म्हणजे यौगिक अर्थाखेरीज दुसऱ्या

(म्हणजे रूढ) अर्थाने वापरले तरी ते ध्वनि या संज्ञेला पात्र होत नाहीत, म्हणजे ते व्यंजक आहेत असे म्हटले जात नाही. 'उपचरित' (म्हणजे दुय्यम अर्थाने) या शब्दाचा प्रयोग दोन प्रकारांचा असतो. (१) गौण (म्हणजे सादृश्य संबंधावर आधारलेला) व (२) लाक्षणिक (म्हणजे सादृश्येतर संबंधावर आधारलेला). 'लावण्य वगैरे' यातील 'वगैरे' शब्दाने 'आनुलोम्य,' 'प्रातिकूल्य,' 'सब्रह्मचारी' यांसारख्या 'उपचार' युक्त शब्दांचा समावेश झाला आहे असे समजावे. 'अनुलोम' म्हणजे केस ज्या दिशेने वाढतात त्या दिशेने केले जाणारे अंगमर्दन. कूलाला म्हणजे तीराला विध्वंसक असणारा (म्हणजे त्याला ढासळायास लावणारा) जो जलप्रवाह, तो 'प्रतिकूल.' 'सब्रह्मचारी' म्हणजे दुसऱ्या विद्यार्थ्याचा जो गुरु असतो, त्याच गुरूपासून विद्यार्जन करणारा. हे झाले या शब्दांचे मुख्य म्हणजे वाच्य (म्हणजे व्युत्पत्तीने होणारे) अर्थ. त्यांचे यांहून दुसरे म्हणजे अनुक्रमे 'अनुकूल', 'विरोधी' व 'सारखा' हे जे अर्थ, ते लक्ष्यार्थ होत. या शब्दांच्या बाबतीत वापरली जाणारी लक्षणा कोठलेही प्रयोजन प्रकट करण्याच्या उद्देशाने वापरली जात नाही, म्हणून त्या प्रयोजनाच्या प्रतीतीसाठी ध्वननव्यापार (म्हणजे व्यंजनाव्यापार) असण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाही.

शंका– "पण काय हो, देवडि तेल्ल णाहि पल्लु, इम्मि गमिट्ठा। लावण्णुज्जलंगु धरि ढोल्लु पइट्ठा[४] ।। इ. पद्यामध्ये 'लावण्य' हा शब्द वापरलेला असून त्यामध्ये 'अत्यंत मोहकपणा' यासारख्या व्यंग्य अर्थाची अभिव्यक्ति होत आहे. नाही का ?" उत्तर– "खरे आहे, पण व्यंग्यार्थ 'लावण्य' या शब्दाने प्रकट होत नाही, तर सर्व वाक्याचा तात्पर्यार्थ समजल्यावर मग (वाक्याच्या अर्थाच्या ठिकाणी असणाऱ्या) व्यंजनाव्यापारानेच व्यंग्यार्थ प्रत्ययास येतो. कारण येथे 'प्रियतमेचे मुखच सर्व दिशा उजळविते' हा अर्थ सूचित होतो." तेव्हा याविषयी फार चर्चा करणे पुरे. हाच आशय ग्रंथकार 'निराळ्या कारणांमुळे' या शब्दांनी सांगतात. 'निराळ्या कारणांमुळे' म्हणजे संपूर्ण वाक्याच्या अर्थाचे ठिकाणी असणाऱ्या) व्यंजनाव्यापारामुळेच, 'लावण्य' इ. शब्द वापरल्यामुळे नव्हे, हा आशय. ।।१६।।

टीपा

१. 'लावण्य' हे 'लवण' या शब्दापासून बनलेले भाववाचक नाम. त्या दृष्टीने विचार केल्यास 'लावण्य' याचा शब्दशः अर्थ 'खारटपणा' असा होईल. पण हा व यासारखे कित्येक शब्द आपण व्यवहारात वाच्यार्थाने म्हणजे व्युत्पत्तिलभ्य अर्थाने कधीच वापरीत नाही. ते शब्द 'सौंदर्य' वगैरे-सारख्या अर्थाने, म्हणजे त्यांच्या वाच्यार्थाहून निराळ्या अर्थानेच वापरण्याची वहिवाट आहे. असल्या शब्दप्रयोगामागे केवळ रूढीच असते. व्यंग्य प्रयोजन नसतेच, किंवा नसल्यासारखेच असते. (पाहा, तन्त्रवार्तिक, ३–१–६–१२). याचा आशय असा की, काही शब्द मुख्य अर्थाखेरीज इतर अर्थानेच इतके रूढ झालेले असतात की, तो दुसरा अर्थच त्यांचा वाच्यार्थ बनतो. त्यांचा मूळ अर्थ कधी कोणाच्या लक्षातच येत नाही. म्हणून तो मूळ अर्थ बाधित होण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. म्हणून तेथे लक्षणा असू शकत नाही. म्हणून असे शब्द 'ध्वनी'ची उदाहरणे नव्हेतच.
२. म्हणजे अर्थाच्या व्यंजकतेमुळे, लाक्षणिक शब्दांमुळे नव्हे.
३. **कुमारिलभट्ट**, तन्त्रवार्तिक, ३–१–६–१२.
४. अहमदाबाद येथे १९६८ साली प्रकाशित झालेल्या 'कल्पलताविवेक' या ग्रंथामध्ये पृ. १२३ वर वरीलप्रमाणे या अपभ्रंश पद्याचा पाठ दिला आहे, तोच आम्ही घेतला आहे. कारण 'लोचना'च्या उपलब्ध प्रतीमध्ये आढळ-णारा पाठ अत्यंत अशुद्ध असून त्यापासून काहीही अर्थबोध होत नाही. 'कल्पलताविवेका'मध्ये अभिनवगुप्तांच्या 'लोचन' टीकेतील सलग उतारे पुष्कळदा उद्‌धृत केलेले आढळतात. या पद्याचा कल्पलताविवेकात दिलेला पाठ शुद्ध व सुगम आहे. त्याची संस्कृत छाया अशी – **दीपके तैलं नास्ति पलमात्रं, द्रव्यं गवेषितम् । लावण्योज्ज्वलाङ्गः गृहे प्रियः प्रविष्टः ॥**

   याचा अर्थ 'दिव्यात थेंबभरही तेल नाही. बाहेरून तेल विकत आणण्या-साठी दमडी तरी आहे काय हे शोधून पाहिले. आणि इकडे तर लावण्याच्या झळाळीने शरीर उजळून निघालेला प्रियकर घरात येऊन ठाकला आहे!'

   'कल्पलताविवेक' या ग्रंथातील हा पाठ डॉ. वा. म. कुलकर्णी यांनी आमच्या नजरेस आणून दिला. या पाठाला ज्याप्रमाणे 'कल्पलता-विवेका'चा आधार आहे, त्याप्रमाणे काव्यप्रकाशावरील सोमेश्वराच्या 'संकेत' नामक टीकेचाही आधार मिळतो. ध्वन्यालोकावरील 'बालप्रिया' टीकेतही **प्रियतमागुणस्य एव** याबरोबर **प्रियतमस्य एव** असा वैकल्पिक पाठ दिला आहे. शिवाय अपभ्रंश पद्यातील **लावण्णुज्जलंगु** या पुंलिंगी रूपाने **प्रियतमस्य एव** या पाठालाच दुजोरा मिळतो.

अर्थात् 'लावण्य' ही कल्पना पुरुषापेक्षा स्त्रियांना अधिक उचित असली,

तरी नायिकेने तिच्या प्रियकराचे मुखही लावण्याच्या झळाळीने युक्त आहे असे म्हणणे यात अस्वाभाविक काही नाही.

५. या पद्याचा वाच्यार्थ असा आहे– 'दिव्यात तेल नाही, ते आणावयास जवळ दमडीही नाही आणि प्रियतमा तर आली आहे; तिचे स्वागत करावे कसे ही पंचाईत आली !' पण जरा विचार केल्यावर 'त्याने आपल्या लावण्यकान्तीनेच आसमंत उजळवून टाकल्यामुळे दिव्याची जरूरच काय?' असा व्यंग्यार्थ लक्षात येतो. मागे पृ. ११३ वर 'हे अघ, माझी तुला विनंती आहे.' इ. गाथेमध्ये मुखशशिज्योत्स्नाविलुप्ततमोनिवहे । यातील कल्पने-सारखीच ही कल्पना आहे. शिवाय या उद्द्योतातीलच ४ थ्या कारिकेमध्ये विभाति लावण्यमिवाङ्गनासु । असे म्हटले आहे,

**ध्वन्यालोकः**

अपि च–

मुख्यां वृत्तिं परित्यज्य गुणवृत्त्यार्थदर्शनम् ।
यदुद्दिश्य फलं तत्र शब्दो नैव स्खलद्गतिः ॥१७॥

तत्र हि चारुत्वातिशयविशिष्टार्थप्रकाशनलक्षणे प्रयोजने कर्तव्ये यदि शब्दस्यामुख्यता तदा तस्य प्रयोगे दुष्टतैव स्यात् । न चैवम् ।

**ध्वन्यालोक**

आणखी असेही आहे की —

मुख्य व्यापार (म्हणजे अभिधाव्यापार) बाजूला सारून गुणवृत्तीने (लक्षणेने) लक्ष्य अर्थाचा बोध करून देण्याचे काम ज्या फलाची (म्हणजे प्रयोजनाची) प्रतीति करून देण्याच्या उद्देशाने केले जाते, त्या (फलाचा बोध करून देण्याचे) कामी त्या शब्दाची गति (म्हणजे सामर्थ्य) मुळीच खुंटत नाही ॥ १७ ॥[१]

कारण अशा उदाहरणात, अतिशय सौंदर्याने युक्त असा अर्थ प्रकट करणे अशा स्वरूपाच्या[२] 'प्रयोजनाचा' बोध करून देण्यासाठी एखादा शब्द वापरूनही तो शब्द त्या कामी कोठल्यातरी (बाधक) कारणाने असमर्थच ठरत असेल, तर तो शब्द वापरणे हा दोषच होईल ! पण तो शब्दप्रयोग असा, म्हणजे सदोष ठरत नाही.[३]

एवं यत्र यत्र भक्तिस्तत्र तत्र ध्वनिरिति तावन्नास्ति। तेन यदि ध्वनेर्भक्तिर्लक्षणं तदा भक्तिसन्निधौ सर्वत्र ध्वनिव्यवहारः स्यादित्यतिव्याप्तिः। अभ्युपगम्यापि ब्रूमः – भवतु यत्र यत्र भक्तिस्तत्र तत्र ध्वनिः। तथापि यद्विषयो लक्षणाव्यापारो न तद्विषयो ध्वननव्यापारः। न च भिन्नविषययोर्धर्मधर्मिभावः, धर्म एव च लक्षणमित्युच्यते। तत्र लक्षणा तावदमुख्यार्थविषयो व्यापारः। ध्वननं च प्रयोजनविषयम्। न च तद्विषयोऽपि द्वितीयो लक्षणाव्यापारो युक्तः, लक्षणासामग्र्यभावादित्यभिप्रायेणाह–अपि चेत्यादि। मुख्यां वृत्तिमभिधाव्यापारं परित्यज्य परिसमाप्य गुणवृत्त्या लक्षणारूपयार्थस्यामुख्यस्य दर्शनं प्रत्यायना, सा यत्फलं कर्मभूतं प्रयोजनरूपमुद्दिश्य क्रियते, तत्र प्रयोजने तावद्द्वितीयो व्यापारः। न चासौ लक्षणैव; यतः स्खलन्ती बाधकव्यापारेण विधुरीक्रियमाणा गतिरवबोधनशक्तिर्यस्य शब्दस्य तदीयो व्यापारो लक्षणा। न च प्रयोजनमवगमयतः शब्दस्य बाधकयोगः। तथाभावे तत्रापि निमित्तान्तरस्य प्रयोजनान्तरस्य चान्वेषणेनानवस्थानात्। तेनायं लक्षणलक्षणाया न विषय इति भावः। दर्शनमिति ण्यन्तो निर्देशः। कर्तव्य इति। अवगमयितव्य इत्यर्थः। अमुख्यतेति। बाधकेन विधुरीकृततेत्यर्थः। तस्येति शब्दस्य। दुष्टतैवेति। प्रयोजनावगमस्य सुखसम्पत्तये हि स शब्दः प्रयुज्यते तस्मिन्नमुख्यार्थे। यदि च 'सिंहो बटुः' इति शौर्यातिशयेऽप्यवगमयितव्ये स्खलद्गतित्वं शब्दस्य तर्हि तत्प्रतीतिं नैव कुर्यादिति किमर्थं तस्य प्रयोगः। उपचारेण करिष्यतीति चेत्तत्रापि प्रयोजनान्तरमन्वेष्यं, तत्राप्युपचार इत्यनवस्था। अथ न तत्र स्खलद्गतित्वं, तर्हि प्रयोजनेऽवगमयितव्ये न लक्षणाख्यो व्यापारः, तत्सामग्र्यभावात्। न च नास्ति व्यापारः। न चासावभिधा, समयस्य तत्राभावात्। यद्व्यापारान्तरमभिधालक्षणातिरिक्तं स ध्वननव्यापारः। न चैवमिति। न च प्रयोगे दुष्टता काचित्, प्रयोजनस्याविघ्नेनैव प्रतीतेः। तेनाभिधैव मुख्येऽर्थे बाधकेन प्रविवृत्सुर्निरुध्यमाना सती अचरितार्थत्वादन्यत्र प्रसरति। अत एव अमुख्योऽस्यायमर्थ इति व्यवहारः। तथैव चामुख्यतया सङ्केतग्रहणमपि तत्रास्तीत्यभिधापुच्छभूतैव लक्षणा ॥१७॥

याप्रमाणे ' जेथे जेथे लक्षणा असते, तेथे तेथे ध्वनि असतो ' असे तर नाहीच. त्यामुळे लक्षणा हे जर ध्वनीचे ' लक्षण ' (म्हणजे असाधारण धर्म) आहे असे मानिले, तर लक्षणा असेल त्या त्या सर्व ठिकाणी ध्वनि ही संज्ञा द्यावी लागेल. परंतु अशा तऱ्हेने मानिलेले ' लक्षणा ' हे ध्वनीचे लक्षण ' अतिव्याप्ति ' या दोषाने युक्त होईल. (कारण ध्वनि नसलेल्या ठिकाणीही लक्षणा असेल ! ) आणि इतक्या उपरही तुमच्या समाधीनासाठी क्षणभर असे मान्य केले की, ' बरे, जेथे जेथे लक्षणा असते तेथे तेथे ध्वनि असूही द्या, ' तरीसुद्धा लक्षणा–व्यापार जो अर्थ प्रकट करितो, तो अर्थ प्रकट करण्याचे काम ध्वनन-व्यापार करीत नाही. आणि ज्यांचे विषय म्हणजे अर्थ वेगवेगळे असतात, त्यांमध्ये एक धर्मी व दुसरा धर्म असा संबंध[४] असू शकत नाही, आणि जो (असाधारण) ' धर्म ' असतो, त्यालाच ' लक्षण ' म्हणण्यात येते. आता त्या दोन व्यापारांपैकी लक्षणा म्हणजे तर मुख्य नसलेल्या अर्थांचा बोध करून देणारा व्यापार होय आणि ध्वननव्यापाराने ज्याचा बोध करून दिला जातो, तो अर्थ त्या लक्षणेचे ' प्रयोजन ' हा आहे (व प्रयोजन हा अर्थ अमुख्य नसून मुख्यच असतो ! याच संदर्भात पाहा, काशी आवृत्ति, पृ. ४२४) आणि त्या प्रयोजनाचा बोध करून देण्याच्या बाबतीत (पहिल्या लक्षणा–व्यापाराच्या जोडीला) आणखी एक लक्षणाव्यापार कल्पिणे योग्य नाही, कारण त्या प्रयोजनाच्या बाबतीत लक्षणेला आवश्यक असणारी (मुख्यार्थ–बाध इ.) सामग्री नसते. या आशयाने (ग्रंथकार) म्हणतात– ' आणखी असेही आहे की '–इ.

मुख्य व्यापार (म्हणजे अभिधाव्यापार) टाकून (म्हणजे त्याला गुंडाळून ठेवून) गौण व्यापाराने म्हणजे लक्षणेने अ-मुख्य अर्थाचे (म्हणजे ' लक्ष्य ' अर्थाचे) दर्शन म्हणजे बोध करून दिला जातो, तो बोध ज्या ' कर्म[५] ' असलेल्या फळाला उद्देशून करून दिला जातो, त्या फळाच्या (म्हणजे प्रयोजनाच्या) बोधाच्या बाबतीत तर (शब्दाचा) अभिधेहून दुसरा म्हणजे वेगळाच व्यापार असतो असे मानणे भाग आहे. तो

व्यापार म्हणजे लक्षणाव्यापार नव्हे, कारण लक्षणाव्यापार हा अशाच शब्दाच्या ठिकाणी असतो की, ज्या शब्दाची गती म्हणजे वाच्य अर्थाचा बोध करून देण्याची (अभिधा) शक्ती ही अडखळणारी म्हणजे बाधक प्रमाणामुळे कुंठित केली जाणारी असते—आणि जेव्हा एखादा (लाक्षणिक) शब्द प्रयोजनाचा बोध करून देतो, तेव्हा त्या प्रयोज-नाचा बोध करून देण्याचे बाबतीत बाधक प्रमाणाचे अस्तित्व नसतेच. कारण तसे झाले, म्हणजे बाधक प्रमाण अडथळा आणते असे मानिले, व म्हणून द्वितीय लक्षणा प्रवृत्त होते अशी कल्पना केली, तर मग या नवीन लक्ष्यार्थाचा म्हणजे प्रयोजनाचा, शब्दाच्या वाच्यार्थाशी म्हणजे पहिल्या लक्ष्यार्थाशी काहीतरी संबंध कल्पावा लागेल व शिवाय या दुसऱ्या लक्षणेचा आश्रय करण्यासाठी आणखी एक प्रयोजन शोधावे लागेल व अशा रीतीने 'अनवस्थाप्रसंग'[६] उद्भवेल. त्यामुळे प्रयोजन हा लक्षणलक्षणेचा[७] (म्हणजे लक्षित लक्षणेचा) विषयच नव्हे, हे तात्पर्य. कारिकेतील **दर्शनम्** या शब्दात प्रयोजकाचा अर्थ[८] आहे. '(प्रयोजन) करून देण्यासाठी' म्हणजे '(प्रयोजनाचा) बोध करून देण्यासाठी' असा अर्थ. 'अमुख्यता' म्हणजे 'असमर्थता' म्हणजे 'बाधक प्रमाणाने शक्ति कुंठित करून टाकलेली असणे'. 'त्या' चा म्हणजे 'त्या (गंगा इ.) शब्दाचा वापर. 'दोषच होईल'—कारण तो (म्हणजे उदा. 'गंगा' हा) शब्द त्या (म्हणजे उदा. 'तीर' या) अमुख्य (म्हणजे दुय्यम, लक्ष्य) अर्थाने वापरण्याचा हेतूच मुळी प्रयोजनाचा बोध श्रोत्यांना सहजपणे, सुखाने व्हावा, हा असतो. आणि 'तो छोकरा सिंह आहे' इ. उदाहरणात 'कमालीचा शूरपणा' (व्यंजनेने) प्रत्ययास आणावयाच्या बाबतीतही जर 'सिंह' शब्दाची शक्ति कुंठित होत असेल, तर त्या शब्दाने त्या अर्थाची प्रतीति केव्हाच होऊ शकणार नाही, आणि मग तुम्ही तो शब्द वापरता तरी कशाला ? दुय्यम अर्थाने म्हणजे दुसऱ्या लक्षणेचा अवलंब करून तो शब्द त्या अर्थाचा बोध करून देईल असे तुमचे म्हणणे असेल, तर त्या लक्षणेसाठीही (जे) दुसरे प्रयोजन मानावयाचे, ते प्रयोजनही लक्षणेनेच ज्ञात होणार, (मग त्या लक्षणेसाठी आणखी एक प्रयोजन), अशा रीतीने अनवस्थाप्रसंग ओढवणार! बरे! (हा

अनवस्थाप्रसंग टाळण्यासाठी) 'सिंह' शब्दाचे सामर्थ्य ('शौर्यातिशय' या) प्रयोजनाचे बाबतीत कुंठित होत नाही असे जर (लक्षणावादी) म्हणेल, तर त्या प्रयोजनाचे ज्ञान करून देण्याचे कामी लक्षणा हा व्यापारही मानण्याची आवश्यकता नाही, कारण लक्षणा कार्य करू लागण्यासाठी (मुख्यार्थबाध इ.) जी सामग्री लागते, ती येथे नाही. आणि प्रयोजनाचे ज्ञान कोणत्या तरी शब्दव्यापारावाचूनच होते, असेही म्हणणे शक्य नाही. तो शब्दव्यापार म्हणजे 'अभिधा' नव्हे, कारण प्रयोजन या अर्थावर काही त्या शब्दाचा संकेत[९] झालेला नसतो.[१०] (तो शब्दव्यापार लक्षणाही नव्हे हे नुकतेच सिद्ध केले आहे) आणि अभिधा किंवा लक्षणा यांहून जर तो निराळा असेल, तर तो ध्वनन-व्यापार होय. 'पण तो शब्दप्रयोग असा नाही'—म्हणजे 'सिंह इ. शब्दांचा प्रयोग करण्यात दोष तर कोणताच नाही, कारण त्या शब्दांपासून (शौर्यातिशय इ.) प्रयोजनाचा बोध कोठलाही अडथळा न येता होतो. त्यामुळे अभिधा हीच मुख्य (म्हणजे वाच्य) अर्थ ज्ञात करून देण्यास प्रवृत्त[११] होऊ इच्छीत असताना बाधक प्रमाणाने ती अडविली जाते व मुख्य अर्थाचा निर्विघ्नपणे बोध करून देण्याचे कार्य तिच्या हातून होऊ न शकल्याने ती दुसऱ्या (म्हणजे लक्ष्य) अर्थापर्यंत हातपाय पसरते. म्हणूनच 'हा या शब्दाचा अमुख्य[१२] (म्हणजे आपद्धर्म म्हणून स्वीकारलेला) अर्थ होय' असे म्हटले जाते, त्याच-प्रमाणे त्या अमुख्य अर्थावर (अमुख्यत्वाने) संकेतही मानिला जातो[१३] व त्यामुळे लक्षणा म्हणजे अभिधेच्या शेपटासारखीच[१४] आहे ।।१७।।

टीपा

१. मागे पृ. १०१ वरील ३७ वी टीप पाहा. 'गंगा' शब्द वापरल्यामुळेच तर अतिशीतलता, अतिपवित्रता इ. अर्थ सूचित होतो. तेव्हा या सूचितार्थाचा बोध 'गंगा' या शब्दामुळेच होतो. त्या अर्थाचे बाबतीत तो शब्द मुळीच अडत नाही. मग अडला नाही, तर मुख्यार्थबाध वगैरे (लक्षणेच्या) अटी येथे नसल्याने प्रयोजनाचा बोध करून देणारा व्यापार 'लक्षणा' कसा असेल ? तो (म्हणजे व्यंजना) लक्षणेहून वेगळाच असणार !
२. पाहा, पृ. १०१, ३७ ही टीप.
३. कारण त्या (उदा. गंगा) शब्दामुळे शैत्य, पावनत्व या प्रयोजनांची प्रतीति

निर्विघ्नपणाने होते.

४. म्हणजे लक्षणा हा 'धर्म' आणि व्यंजना हा लक्षणेचा धर्मी, म्हणून त्यांच्यामध्ये धर्म–धर्मि–संबंध उत्पन्न होईल! तो संबंध भिन्न (म्हणजे आश्रय-स्थान) असलेल्या पदार्थांमध्ये संभवत नाही.

५. 'फळ' हे वाक्यातील 'उद्देशून' यातील क्रियेचे कर्म, असा आशय.

६. 'अनवस्थाप्रसंगा'च्या स्पष्टीकरणासाठी पृ. १०१ वरील ३८ वी टीप पाहा. २७३ पानावरही अभिनवगुप्तांनीच या 'अनवस्थाप्रसंगा'चे स्पष्टीकरण केले आहे. नंतरच्या काळात मम्मटानेही काव्यप्रकाशाच्या दुसऱ्या उल्लासात १६ व १७ या कारिकांमध्ये व त्यांवरील वृत्तीमध्ये या अनवस्थाप्रसंगाचे सविस्तर विवरण केले आहे.

७. या 'लक्षणलक्षणे'बद्दल मागे पृ. ८९ वर 'लक्षितलक्षणा' असा शब्द वापरला आहे. तेव्हा ही 'लक्षणलक्षणा' म्हणजे 'लक्षितलक्षणा' म्हणजेच 'द्वितीय लक्षणा' असा अर्थ.

८. 'दर्शन' हा शब्द येथे 'दृश्' धातूच्या प्रयोजक रूपाला अन हा क्रियावाचक 'कृत्' प्रत्यय लागून बनला आहे, म्हणून येथे दर्शनम् याचा अर्थ 'पाहणे' असा नसून 'दाखविणे' असा (प्रयोजक) आहे.

९. पाहा, पृ. २०, टीप ९ वी

१०. व्यंजनेची सिद्धि करिताना हाच युक्तिवाद मम्मटाने काव्यप्रकाश, २–१५ मध्ये केला आहे.

११. मूळ पाठ प्रतिवित्सु असा आहे, पण तो प्रविवृत्सु असा दुरुस्त करणे आवश्यक आहे; म्हणून 'लोचना'च्या संहितेमध्ये आम्ही दुरुस्त पाठच दिला आहे. हा दुरुस्त पाठ आम्ही कल्पलताविवेकातील पृ. १२४ वरील पाठाला अनुसरून दिला आहे.

१२. पूर्वी पृ. ४७ वर 'लक्षणा हा अभिधेचा अमुख्य असलेला व्यापार' असे म्हटले आहेच.

१३. लक्षणा वारंवार वापरली गेल्यास लाक्षणिक शब्दाचा लक्ष्य अर्थही वाच्यार्थासारखाच समजला जातो व म्हणून त्या लक्ष्य अर्थावरही त्याचा संकेत झाल्यासारखेच होते.

१४ लक्षणेला अभिधेचे शेपूट मानावयाचे कारण ती अभिधेच्या मागोमाग लगेच प्रवृत्त होते. शिवाय अभिधेच्या हातून पुरे होऊ न शकलेले योग्य अर्थबोधनाचे कार्य पूर्ण करण्यासाठीच ती प्रवृत्त होते. अशा रीतीने लक्षणा ही अभिधेला पूरक अशीच असल्यामुळे तिला 'अभिधेचे पुच्छ' म्हटलेले दिसते.

ध्वन्यालोकः

तस्मात्—

वाचकत्वाश्रयेणैव गुणवृत्तिर्व्यवस्थिता ।
व्यञ्जकत्वैकमूलस्य ध्वनेः स्याल्लक्षणं कथम् ॥ १८ ॥

तस्मादन्यो ध्वनिरन्या च गुणवृत्तिः । अव्याप्तिरप्यस्य लक्षणस्य । न हि ध्वनिप्रभेदो विवक्षितान्यपरवाच्यलक्षणः, अन्ये च बहवः प्रकारा भक्त्या व्याप्यन्ते; तस्माद्भक्तिरलक्षणम् ।

ध्वन्यालोक

म्हणून—

लक्षणा ही वाचकत्वाच्या ( अभिधेच्या ) आश्रयानेच राहाणारी[1] आहे. ती लक्षणा, केवळ व्यंजकत्व हाच ज्याचा पाया असतो, अशा 'ध्वनी'चे लक्षण ( असाधारण धर्म ) होईलच कशी ? ॥ १८ ॥

म्हणून ध्वनि वेगळा आणि गुणवृत्ति ( म्हणजे लक्षणा ) वेगळी.[2] आता, लक्षणा हे ध्वनीचे लक्षण मानण्यात 'अव्याप्ति' दोषही आहे. तो असा की, 'विवक्षितान्यपरवाच्य' स्वरूपाचा जो ध्वनीचा प्रकार आहे तो आणि ध्वनीचे इतर ( उदा. वाचक नसलेले गाण्याचे सूर, हावभाव वगैरे ) कित्येक प्रकार लक्षणेच्या प्रांतात येऊच शकत नाहीत. म्हणून भक्ति ( लक्षणा ) हे ध्वनीचे लक्षण नव्हे.

लोचनम्

उपसंहरति – तस्मादिति । यतोऽभिधापुच्छभूतैव लक्षणा, ततो हेतोर्वाचकत्वमभिधाव्यापारमाश्रिता तद्बाधनेनोत्थानात्तत्पुच्छभूतत्वाच्च गुणवृत्तिः, गौणलाक्षणिकप्रकार इत्यर्थः । सा कथं ध्वनेर्व्यञ्जनात्मनो लक्षणं स्यात् ? भिन्नविषयत्वादिति । एतदुपसंहरति – तस्मादिति । यतोऽतिव्याप्तिरुक्ता तत्प्रसङ्गेन च भिन्नविषयत्वं तस्माद्धेतोरित्यर्थः । एवम् ' अतिव्याप्तेरथाव्याप्तेर्न चासौ लक्ष्यते तया ' इति कारिकागतातिव्याप्तिं व्याख्यायाव्याप्तिं व्याचष्टे – अव्याप्तिरप्यस्येति । अस्य गुणवृत्तिरूपस्येत्यर्थः । यत्र यत्र ध्वनिस्तत्र तत्र यदि भक्तिर्भवेन्न स्यादव्याप्तिः । न चैवम्; अविवक्षितवाच्येऽस्ति भक्तिः ' सुवर्णपुष्पाम् '

इत्यादौ । ' शिखरिणि ' इत्यादौ तु सा कथम् । ननु लक्षणा तावद्गौण-मपि व्याप्नोति । केवलं शब्दस्तमर्थं लक्षयित्वा तेनैव सह सामानाधिकरण्यं भजते – ' सिंहो बटुः ' इति । अर्थो वार्थान्तरं लक्षयित्वा स्ववाचकेन तद्वाचकं समानाधिकरणं करोति । शब्दार्थौ वा युगपत्तं लक्षयित्वा अन्याभ्यामेव शब्दार्थाभ्यां मिश्रीभवत इत्येवं लाक्षणिकाद्-गौणस्य भेदः । यदाह – ' गौणे शब्दप्रयोगः, न लक्षणायाम् ' इति । तत्रापि लक्षणास्त्यैवेति सर्वत्र सैव व्यापिका । सा च पञ्चविधा । तद्यथा – अभिधेयेन संयोगात्; द्विरेफशब्दस्य हि योऽभिधेयो भ्रमरशब्दः द्वौ रेफौ यस्येति कृत्वा, तेन भ्रमरशब्देन यस्य संयोगः सम्बन्धः षट्पद-लक्षणस्यार्थस्य सोऽर्थो द्विरेफशब्देन लक्ष्यते, अभिधेयसम्बन्धं व्याख्यात-रूपं निमित्तीकृत्य । सामीप्यात् ' गङ्गायां घोषः ' । समवायादिति सम्बन्धादित्यर्थः, ' यष्टीः प्रवेशय ' इति यथा । वैपरीत्यात् यथा – शत्रुमुद्दिश्य कश्चिद्ब्रवीति— ' किमिवोपकृतं न तेन मम ' इति । क्रिया-योगादिति कार्यकारणभावादित्यर्थः । यथा अन्नापहारिणि व्यवहारः प्राणानयं हरति, इति । एवमनया लक्षणया पञ्चविधया विश्वमेव व्याप्तम् । तथाहि – ' शिखरिणि ' इत्यत्राकस्मिकप्रश्नविशेषादि-बाधकानुप्रवेशे सादृश्याल्लक्षणास्त्येव । ' नन्वत्राङ्गीकृतैव मध्ये लक्षणा ' । ' कथं तर्ह्युक्तं विवक्षितान्यपर ' इति ? तद्भेदोऽत्र मुख्योऽसंलक्ष्य-क्रमात्मा विवक्षितः । तद्भेदशब्देन च रसभावतदाभासतत्प्रशमभेदास्त-दवान्तरभेदाश्च, न च तेषु लक्षणाया उपपत्तिः । तथाहि – विभावानु-भावप्रतिपादके काव्ये मुख्येऽर्थे तावद्बाधकानुप्रवेशोऽप्यसम्भाव्य इति को लक्षणावकाशः ?

ननु किं बाधया, इयदेव लक्षणास्वरूपम् –

' अभिधेयाविनाभूतप्रतीतिर्लक्षणोच्यते ' इति ।

इह चाभिधेयानां विभावानुभावादीनामविनाभूता रसादय इति लक्ष्यन्ते, विभावानुभावयोः कारणकार्यरूपत्वात्, व्यभिचारिणां च तत्सहकारित्वादिति चेत् – नैवम्; धूमशब्दाद्धूमे प्रतिपन्ने ह्यग्नि-स्मृतिरपि लक्षणाकृतैव स्यात्, ततोऽग्नेः शीतापनोदस्मृतिरित्यादिर-पर्यवसितः शब्दार्थः स्यात् । धूमशब्दस्य स्वार्थविश्रान्तत्वान्न तावति व्यापार इति चेत्, आयातं तर्हि मुख्यार्थबाधो लक्षणाया जीवितमिति,

सति तस्मिन्स्वार्थविश्रान्त्यभावात्। न च विभावादिप्रतिपादने बाधकं किञ्चिदस्ति।

नन्वेवं धूमावगमनानन्तराग्निस्मरणवद्विभावादिप्रतिपत्त्यनन्तरं रत्यादिचित्तवृत्तिप्रतिपत्तिरिति शब्दव्यापार एवात्र नास्ति। इदं तावदयं प्रतीतिस्वरूपज्ञो मीमांसकः प्रष्टव्यः— किमत्र परचित्तवृत्तिमात्रे प्रतिपत्तिरेव रसप्रतिपत्तिरभिमता भवतः? न चैवं भ्रमितव्यम्; एवं हि लोकगतचित्तवृत्त्यनुमानमात्रमिति का रसता? यस्त्वलौकिक-चमत्कारात्मा रसास्वादः काव्यगतविभावादिचर्वणाप्राणो नासौ स्मरणानुमानादिसाम्येन खिलीकारपात्रीकर्तव्यः। किं तु लौकिकेन कार्यकारणानुमानादिना संस्कृतहृदयो विभावादिकं प्रतिपद्यमान एव न ताटस्थ्येन प्रतिपद्यते, अपि तु हृदयसंवादापरपर्यायसहृदयत्वपरवशीकृत-तया पूर्णीभविष्यद्रसास्वादाङ्कुरीभावेनानुमानस्मरणादिसरणिमनारुह्यैव तन्मयीभवनोचितचर्वणाप्राणतया। न चासौ चर्वणा प्रमाणान्तरतो जाता पूर्वं, येनेदानीं स्मृतिः स्यात्। न चाधुना कुतश्चित्प्रमाणान्तरादुत्पन्ना, अलौकिके प्रत्यक्षाद्यव्यापारात्। अत एवालौकिक एव विभावादि-व्यवहारः। यदाह— 'विभावो विज्ञानार्थः लोके कारणमेवाभिधीयते न विभावः'। अनुभावोऽप्यलौकिक एव। 'यदयमनुभावयति वागङ्गसत्त्व-कृतोऽभिनयस्तस्मादनुभाव' इति। तच्चित्तवृत्तितन्मयीभवनमेव ह्यनु-भवनम्। लोके तु कार्यमेवोच्यते नानुभावः। अत एव परकीया न चित्तवृत्तिर्गम्यत इत्यभिप्रायेण 'विभावानुभावव्यभिचारिसंयोगाद्रस-निष्पत्तिः' इति सूत्रे स्थायिग्रहणं न कृतम्। तत्प्रत्युत शल्यभूतं स्यात्। स्थायिनस्तु रसीभाव औचित्यादुच्यते, तद्विभावानुभावोचितचित्तवृत्ति-संस्कारसुन्दरचर्वणोदयात्। हृदयसंवादोपयोगिलोकचित्तवृत्तिपरिज्ञाना-वस्थायामुद्यानपुलकादिभिः स्थायिभूतरत्याद्यवगमाच्च। व्यभिचारी तु चित्तवृत्त्यात्मत्वेऽपि मुख्यचित्तवृत्तिपरवश एव चर्व्यत इति विभावानु-भावमध्ये गणितः। अत एव रस्यमानताया एषैव निष्पत्तिः, यत्प्र-बन्धप्रवृत्तबन्धुसमागमादिकारणोदितहर्षादिलौकिकचित्तवृत्तिन्यग्भावेन चर्वणारूपत्वम्, अतश्चर्वणात्राभिव्यञ्जनमेव, न तु ज्ञापनम्, प्रमाण-व्यापारवत्। नाप्युत्पादनम्, हेतुव्यापारवत्।

ननु यदि नेयं ज्ञप्तिर्न वा निष्पत्तिः, तर्हि किमेतत्? नन्वयमसाव-

लौकिको रसः। ननु विभावादिरत्र किं ज्ञापको हेतुः, उत कारकः? न ज्ञापको न कारकः, अपि तु चर्वणोपयोगी। ननु क्वैतद्दृष्टमन्यत्र। यत एव न दृष्टं तत एवालौकिकमित्युक्तम्। नन्वेवं रसोऽप्रमाणं स्यात्; अस्तु, किं ततः? तच्चर्वणात एव प्रीतिव्युत्पत्तिसिद्धेः किमन्यदर्थनीयम्। नन्वप्रमाणकमेतत्, न, स्वसंवेदनसिद्धत्वात्। ज्ञानविशेषस्यैव चर्वणात्मत्वात्, इत्यलं बहुना। अतश्च रसोऽयमलौकिकः, येन ललितपरुषानुप्रासस्यार्थाभिधानानुपयोगिनोऽपि रसं प्रति व्यञ्जकत्वम्; का तत्र लक्षणायाः शङ्कापि? काव्यात्मकशब्दनिष्पीडनेनैव तच्चर्वणा दृश्यते। दृश्यते हि तदेव काव्यं पुनः पुनः पठंश्चर्व्यमाणश्च सहृदयो लोकः। न तु काव्यस्य तत्र 'उपादायापि ये हेया' इति न्यायेन कृतप्रतीतिकस्यानुपयोग एवेति शब्दस्यापीह ध्वननव्यापारः। अत एवालक्ष्यक्रमता। यत्तु वाक्यभेदः स्यादिति केनचिदुक्तम्, तदनभिज्ञतया। शास्त्रं हि सकृदुच्चारितं समयबलेनार्थं प्रतिपादयद्युगपद्विरुद्धानेकसमयस्मृत्ययोगात्कथमर्थद्वयं प्रत्याययेत्। अविरुद्धत्वे वा तावानेको वाक्यार्थः स्यात्। क्रमेणापि विरम्य व्यापारायोगः। पुनरुच्चारितेऽपि वाक्ये स एव, समयप्रकरणादेस्तादवस्थ्यात्। प्रकरणसमयप्राप्यार्थतिरस्कारेणार्थान्तरप्रत्यायकत्वे नियमाभाव इति। तेन "अग्निहोत्रं जुहुयात्स्वर्गकामः" इति श्रुतौ खादेच्छ्वमांसमित्येष नार्थ इत्यत्र का प्रमेति प्रसज्यते। तत्रापि न काचिदियत्तेत्यनाश्वासता, इत्येवं वाक्यभेदो दूषणम्। इह तु विभावाद्येव प्रतिपाद्यमानं चर्वणाविषयतोन्मुखमिति समयाद्युपयोगाभावः। न च नियुक्तोऽहमत्र करवाणि, कृतार्थोऽहमिति शास्त्रीयप्रतीतिसदृशमदः। तत्रोत्तरकर्तव्यौन्मुख्येन लौकिकत्वात्। इह तु विभावादिचर्वणाद्भुतपुष्पवत्तत्कालसारैवोदिता न तु पूर्वापरकालानुबन्धिनीति लौकिकादास्वादाद्योगिविषयाच्चान्य एवायं रसास्वादः। अत एव 'शिखरिणि' इत्यादावपि मुख्यार्थबाधादिक्रममनपेक्ष्यैव सहृदया वक्त्रभिप्रायं चाटुप्रीत्यात्मकं संवेदयन्ते। अत एव ग्रन्थकारः सामान्येन विवक्षितान्यपरवाच्ये ध्वनौ भक्तेरभावमभ्यधात्। अस्माभिस्तु दुर्दुरूढं प्रत्याययितुमुक्तम्– 'भवत्वत्र लक्षणा', अलक्ष्यक्रमे तु कुपितोऽपि किं करिष्यसीति। यदि तु न कुप्यते 'सुवर्णपुष्पाम्' इत्यादावविवक्षितवाच्येऽपि मुख्यार्थबाधादिलक्षणासामग्रीमनपेक्ष्यैव व्यङ्ग्यार्थविश्रान्ति-

रित्यलं बहुना। उपसंहरति–तस्माद्‌भक्तिरिति ॥१९॥

**लोचन**

या सर्व विवेचनाचा (म्हणजे लक्षणा ही ध्वनीचा असाधारण धर्म नव्हे या विषयाचा) समारोप वृत्तिकार 'म्हणून'–इ. शब्दांनी करितात. ज्या अर्थी लक्षणा ही अभिधेच्या शेपटाप्रमाणेच आहे, त्या अर्थी ती वाचकत्वाच्या म्हणजे अभिधाव्यापाराच्या आश्रयाने असते व त्या अभिधाव्यापाराचा बाध आल्यामुळेच ती उभी राहते म्हणजे कार्य करू लागते म्हणून, आणि ती त्या अभिधेच्या पुच्छाप्रमाणे असल्यामुळेही ती 'गुणवृत्ति' म्हणजे दुय्यमच व्यापार आहे. त्या व्यापाराचे गौण (सादृश्यसंबधावर आधारित) व लाक्षणिक (सादृश्येतर संबंधावर आधारित) असे दोन प्रकार आहेत. ती गुणवृत्ति, 'व्यंजना' हे स्वरूप असलेल्या ध्वनीचे लक्षण (म्हणजे असाधारण धर्म) कशी असेल? कारण ध्वनि व लक्षणा यांची क्षेत्रे वेगवेगळी आहेत. याचाच उपसंहार (वृत्तिकार) 'म्हणून (ध्वनि वेगळा),' इ. शब्दांनी करितात. या उपसंहाराचा अर्थ असा की, ज्या अर्थी अतिव्याप्तिदोष दाखविला[३] व त्यानिमित्ताने दोघांची क्षत्रे वेगवेगळी दर्शविली, त्याअर्थी. अशा रीतीने 'अतिव्याप्ति व त्याचप्रमाणे अव्याप्ति(हे दोष) उद्‌भवत असल्यामुळे ती लक्षणा त्या ध्वनीचे लक्षणही होऊ शकत नाही' या १४ व्या कारिकेच्या उत्तरार्धातील 'अतिव्याप्ती' चे विवरण करून (वृत्तिकार) या लक्षणातील अव्याप्तीचे बिवरण 'हे ध्वनीचे लक्षण मानण्यात अव्याप्तिदोषही'– इ. शब्दांनी करितात. हे लक्षण म्हणजे ध्वनीचे 'लक्षणा हे लक्षण' हा अर्थ. जेथे जेथे ध्वनि असतो, तेथे तेथे जर लक्षणा असती तर अव्याप्तिदोष उद्‌भवला नसता, पण तशी (म्हणजे जेथे जेथे ध्वनि तेथे तेथे लक्षणा) अशी परिस्थिति नाही; कारण 'सोन्याची नाणी फुलविणाऱ्या...' इ. 'अविवक्षितवाच्य' ध्वनीच्या उदाहरणांत लक्षणा असते खरी, पण 'हे तरुणि!' इ. (विवक्षितान्यपरवाच्य) ध्वनीच्या उदाहरणांत ती लक्षणा कोठे आहे?'

पण काय हो, लक्षणा तर गौण (म्हणजे सादृश्यसंबंधावर आधारलेल्या) उपचाराच्या उदाहरणांतही असतेच. मात्र या गौण उपचाराच्या

बाबतीत तीन मते प्रचलित आहेत, ती अशी–

(१) (सिंह इ. लाक्षणिक) शब्द त्या (म्हणजे सिंहासारखा असलेला छोकरा या लक्ष्य) अर्थाचा बोध करून दिल्यानंतर (छोकरा इ.) वर्ण्य विषयाच्या वाचक शब्दाशी तादात्म्य पावतो[४]– 'छोकरा सिंह आहे' याप्रमाणे, किंवा

(२) 'सिंह' सारख्या लाक्षणिक शब्दाचा (वाच्य) अर्थ दुसऱ्या (म्हणजे 'सिंहासारखा शूर असलेला छोकरा' या लक्ष्य) अर्थाचा बोध करून दिल्यानंतर 'सिंह' या आपल्या (म्हणजे वाच्य अर्थाच्या) वाचक शब्दाचे ('छोकरा' या) लक्ष्य अर्थाचा वाचक असलेल्या ('छोकरा' या) शब्दाशी असलेले तादात्म्य सयुक्तिक करितो. किंवा

(३) शब्द आणि (वाच्य) अर्थ एकाच वेळी त्या (लक्ष्य) अर्थाचा बोध करून देऊन अनुक्रमे दुसरा शब्द व (त्याचा वाच्य) अर्थ यांशी एकरूप होतात (म्हणजे 'सिंह' या शब्दाचे 'छोकरा' या शब्दाशी तादात्म्य सयुक्तिक होते व 'सिंह' या शब्दाच्या वाच्य अर्थाचे 'छोकरा' या शब्दाच्या वाच्य अर्थाशी तादात्म्य सयुक्तिक होते).

अशा तऱ्हेने 'गौण' हा प्रकार 'लाक्षणिक' या प्रकाराहून वेगळा आहे.[५] कारण, असे म्हटलेच आहे की—

'गौण' प्रकारामध्ये लक्ष्य अर्थाच्या म्हणजे वर्ण्यविषयाच्या वाचक शब्दाचा प्रयोग केलेला असतो. लाक्षणिक प्रकारात त्या वाचक शब्दाचा प्रयोग केला जात नाही.[६] तेथेही म्हणजे गौण प्रकारातसुद्धा (नुकतेच दाखविल्याप्रमाणे) लक्षणा असतेच, म्हणून ती लक्षणाच सर्व वाङमयाला व्यापणारी असते. आणि ती लक्षणा पाच प्रकारची असते. ते पाच प्रकार असे– (१) वाच्य अर्थाशी लक्ष्य अर्थाचा संयोग (वाच्य-वाचक) संबंध असल्यामुळे (वापरली जाणारी लक्षणा). उदा. 'द्विरेफ' या शब्दाचा वाच्यार्थ 'भ्रमर' हा शब्द होय, कारण 'भ्रमर' शब्दात दोन रेफ (म्हणजे दोनदा 'र्' हे अक्षर) आहेत. त्या 'भ्रमर' शब्दाशी ज्याचा 'संयोग'[७] म्हणजे (वाच्य-वाचक) 'संबंध' आहे, तो 'षट्पद' (म्हणजे भुंगा हा कीटक) हा 'द्विरेफ' शब्दाचा 'लक्ष्य' अर्थ होय. त्या लक्षणेमध्ये 'षट्पद' (हा कीटक)

या अर्थाचा 'भ्रमर' या शब्दाशी आम्ही आताच स्पष्ट करून सांगितलेला वाच्य-वाचक-संबंध हे 'निमित्त' आहे.

(२) 'गंगेवर गवळीवाडा' यातील लक्षणा ही वाच्य व लक्ष्य अर्थ यांमधील 'सामीप्य' या संबंधामुळे कार्य करिते.

(३) 'समवाय' याचा अर्थ (संयोग-[८]) संबंध इतकाच घ्यावा. वाच्यार्थ व लक्ष्यार्थ यांमध्ये समवाय (म्हणजे संयोग हा) 'संबंध' असल्यामुळे होणाऱ्या लक्षणेचे उदाहरण 'लाठ्यांना' आत येऊ दे' हे.

(४) 'वैपरीत्य' म्हणजे वाच्यार्थ व लक्ष्यार्थ हे परस्परांच्या बरोबर विरुद्ध असणे. त्यामुळे होणाऱ्या लक्षणेचे उदाहरण म्हणजे शत्रूला उद्देशून एखादा म्हणतो- 'त्याने माझ्यावर कोणता उपकार केला नाही बरे ?' हे.

(५) 'क्रियेच्या योगाने' म्हणजे वाच्यार्थ व लक्ष्यार्थ यांमध्ये 'कार्य-कारण-संबंध असल्यामुळे' असा अर्थ. जसे 'अन्न' हरण करणाऱ्या माणसाबद्दल 'हा माझे प्राण[१०] हरण करितो आहे' असे म्हणणे. याप्रमाणे या पाच प्रकारच्या 'लक्षणे' ने[११] सगळे वाङ्मयविश्व व्यापले आहे.[१२] उदा. 'हे तरुणि !' (पृ. २४५) इ. उदाहरणांत एका-एकीच विशिष्ट प्रश्न विचारणे[१३], इ. 'बाधक,' वाचकाच्या ध्यानात आल्यामुळे वाच्यार्थाचा बाध होतो, म्हणून सादृश्यसंबंधाच्या[१४] आधाराने लक्षणा काम करितेच !"

'पण काय हो, या उदाहरणात (मागे, पृ. २५० वर) मधल्या टप्प्यात आम्ही लक्षणा मान्यच केली आहे !' (यावर पूर्वपक्षी म्हणतो-) "मग असे असताना वृत्तीमध्ये 'विवक्षितान्यपरवाच्य हा ध्वनीचा प्रकार लक्षणेच्या प्रांतात येऊ शकत नाही' असे कसे म्हटले ?"

(याचे उत्तर असे-) 'विवक्षितान्यपरवाच्य' या शब्दाने येथे विवक्षितान्यपरवाच्याचा मुख्य प्रकार जो 'असंलक्ष्यक्रम' म्हणजे रसादिध्वनि, तो अभिप्रेत आहे. (वृत्तीतल्या पृ. २३२ वरील) 'आणि त्याचे उपप्रकार' या शब्दांनी रस, भाव, रसाभास, भावाभास, भाव-प्रशम आणि त्यांचे पोटभेद[१५] विवक्षित असून त्या ठिकाणी लक्षणेचे अस्तित्व दाखविणे शक्य नाही. कारण विभाव, अनुभाव, यांचे वर्णन

करणाऱ्या काव्यामध्ये वाच्य अर्थाचे बाबतीत आधी बाधक प्रमाणाचा विचारही वाचकाच्या मनात येणे असंभवनीय असते, मग लक्षणेला थाराच कुठून मिळणार ?

'पण काय हो', (लक्षणा प्रवृत्त होण्यासाठी) मुख्यार्थाचा बाध होण्याची काय गरज आहे ?[१६] (कारण) 'लक्षणे'चे स्वरूप इतकेच आहे की–

'वाच्यार्थाशी संबद्ध अशा दुसऱ्या अर्थाच्या प्रतीतीला लक्षणा म्हणतात.'[१७]

आणि 'या (म्हणजे ज्याला तुम्ही असंलक्ष्यक्रम म्हणता, त्या) प्रकारात विभाव, अनुभाव हे वाच्यार्थ होत. रस इ. हे त्या वाच्यार्थाशी संबद्ध असल्यामुळे रसादि हे लक्ष्यार्थच नव्हेत काय ? कारण विभाव ही ( स्थायिभाव जागृत होण्याची) कारणे, अनुभाव ही (स्थायिभाव जागृत झाल्याची) कार्ये म्हणजे परिणाम व व्यभिचरिभाव हे (त्या स्थायिभावांचे) सहकारी होत.' अशी शंका कोणी घेतल्यास तिचे उत्तर असे–

'असे म्हणू नका. कारण अशा विचारसरणीप्रमाणे 'धूम' शब्दावरून धूर या वाच्यार्थाचे ज्ञान झाल्यावर (त्या धुराशी जन्यजनक-संबंधाने निगडित असलेल्या) अग्नीची आठवण होते, तीही लक्षणेनेच होते असे मानावे लागेल, (इतकेच नव्हे, तर) अग्नीची आठवण झाल्यावर त्या अग्नीच्या थंडीचे निवारण करणे इ. धर्मांची स्मृतिदेखील लक्षणेनेच होऊ लागेल. अशा रीतीने शब्दाच्या (लक्ष्य) अर्थाला अंतच राहणार नाही,[१८] आणि यावर 'धूम हा शब्द आपल्या वाच्यार्थाचा बोध करून दिल्यावर विश्रांत होत असल्यामुळे (म्हणजे सुसंगत अर्थाचा बोध करून देत असल्यामुळे) अग्नि, थंडी दूर करणे वगैरे अर्थाचा बोध करून देण्यासाठी लक्षणा प्रवृत्त होत नाही' असे जर तुमचे म्हणणे असेल, तर मग मुख्यार्थबाध (म्हणजे वाच्यार्थ अडणे हा लक्षणेचा प्राण आहे) हे तुमच्या गळ्यात पडलेच की ! कारण मुख्यार्थ अडला, तरच तो शब्द आपल्या वाच्यार्थात विश्रांति पावत नाही व जर तो विश्रांति पावत असेल, तर तेथे मुख्यार्थबाध होत नाही. आणि काव्यातील विभाव, अनुभाव इत्यादींच्या वर्णनामध्ये बाधक म्हणजे विसंगत असे काहीही

नसते.

पण काय हो, अशा प्रकारे ज्याप्रमाणे धुराचे ज्ञान झाल्यावर अग्नीचे स्मरण होते, त्याप्रमाणेच विभाव इत्यादींचे ज्ञान झाल्यावर रति वगैरे स्थायिभावांचे स्मृतिरूप ज्ञान होते व म्हणून या म्हणजे रत्यादि स्थायिभावांचे ज्ञान करून देण्याच्या बाबतीत (स्मृतिरूप मानसव्यापाराचे काम असल्यामुळे) शब्दाचा व्यापारच नसतो! (आणि मग व्यंजनाव्यापाराने रत्यादींचे ज्ञान करून देण्याचा प्रश्न दूरच!)

आता रसप्रतीतीच्या स्वरूपाचा तज्ज्ञ असल्याची ऐट मिरविणाऱ्या मीमांसकाला प्रथम हे विचारले पाहिजे– 'काव्याच्या बाबतीत केवळ दुसऱ्याच्या चित्तवृत्तीचे (स्मृतीनें किंवा अनुमानानें) ज्ञान होणे यालाच तुम्ही रसप्रतीति मानिता की काय?' आणि असे असल्यास तुम्ही स्वतःची अशी चुकीची समजूत करून घेऊ नका, कारण तुमच्या समजुतीप्रमाणे दुसऱ्याच्या चित्तवृत्तीच्या केवळ अनुमानाला रसप्रतीति मानण्यासारखे होईल; आणि तसे झाल्यास त्या रसप्रतीतीमध्ये 'रस'–पणा म्हणजे आस्वाद्यता ती कोणती असणार?[१९] पण जो (रसास्वाद) 'लोकोत्तर चमत्कार' या स्वरूपाचा असतो, आणि काव्यातील (स्थायिभाव) विभाव, अनुभाव व व्यभिचारिभाव यांचे आस्वादन हाच ज्याचा प्राण असतो, अशा रसास्वादाला तुम्ही स्मरण, अनुमान वगैरे (बौद्धिक प्रक्रियांच्या) पंक्तीला बसवून त्याचे इतके अवमूल्यन करू नये. परंतु व्यवहारातील स्थिर चित्तवृत्तींच्या परिणामावरून त्या चित्तवृत्तींच्या जागृतीचे अनुमान करण्याचा रसिकाला सराव असल्यामुळे[२०] (काव्य-नाटकांतील) विभावादिकांचे ज्ञान त्याला तिऱ्हाईतपणे होत नाही[२१], तर ते विभावादिकांचे ज्ञान त्याला तन्मयीभवनाचे स्वाभाविक कार्य असलेल्या चर्वणेचा विषय या स्वरूपात व लवकरच पूर्णावस्थेला पोहोचू पाहणाऱ्या त्या रसचर्वणेचा अंकुर (म्हणजे कारण) म्हणून होते. हे ज्ञान त्या रसिकाला त्याच्या ठिकाणी असलेल्या, 'हृदयसंवाद' या दुसऱ्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या 'सहृदयते'च्या सर्वस्वी अधीन झाल्यामुळे होते, व ते होताना अनुमान, स्मरण इ. पायऱ्या त्याला चढाव्याच लागत नाहीत. आणि ती चर्वणा पूर्वी दुसऱ्या

कोणत्याही प्रमाणाने उत्पन्न झालेली नसते व म्हणूनच आता त्या चर्वणेला ' स्मृति ' म्हणता येणार नाही. तशीच ती चर्वणा आताही (म्हणजे चालू क्षणीही) दुसऱ्या प्रमाणाने उत्पन्न झालेली नाही, कारण ती अलौकिक असल्यामुळे तिच्या बाबतीत प्रत्यक्ष वगैरे लौकिक प्रमाणे कामी येत नाहीत. म्हणूनच म्हणजे रसचर्वणा ही अलौकिक असल्या-मुळे तिची कारणे असणारे विभाव वगैरे अलौकिकच (म्हणजे काव्य-सृष्टीतच आढळणारे) म्हटले जातात. जसे (भरत–) मुनीने म्हटले आहे–

' विभाव ' या शब्दाचा अर्थ विशिष्ट ज्ञानाचे साधन[२२] (म्हणजे स्थायी व व्यभिचारी भावांच्या जागृतीचे ज्ञान रमणीय स्वरूपात करून देणारे साधन) असा आहे. जीवनात अशा गोष्टींना ' कारण 'च म्हटले जाते, ' विभाव ' म्हटले जात नाही. (विभावांप्रमाणेच) अनुभावही अलौकिकच होत. ' ज्या अर्थी हा वाचेने, कायेने व सात्त्विक भावांनी केलेला अभिनय प्रेक्षकाला स्थायी व व्यभिचारी यांचा अनुभव घडवितो, त्या अर्थी त्याला ' अनुभाव ' म्हणण्यात येते. ' कारण पात्राच्या चित्तवृत्तीशी तन्मय होणे हेच स्थायिभावाचे प्रेक्षकाला होणारे ' अनुभवन ' होय. लौकिक जीवनात अशा गोष्टीला ' कार्य 'च म्हणतात, ' अनुभाव ' म्हणत नाहीत. (स्थायी व व्यभिचारी यांच्या अनुभवाचे स्वरूप असे आगळे आहे व ते केवळ ' दुसऱ्याच्या चित्तवृत्तीचे अनुमान ' या स्वरूपाचे नाही) म्हणूनच तर रसिक रसास्वाद घेतो, तेव्हा त्याला दुसऱ्याच्या चित्तवृत्तीचा अनुभव येत नाही या अभिप्रायाने ' विभाव, अनुभाव व व्यभिचारी यांच्या संयोगाने रसनिष्पत्ति होते ' या सूत्रात भरतांनी ' स्थायी 'चा निर्देश केलाच नाही तो केला असता, तर तो उलट (अनिष्ट अर्थाचा बोध करून देण्यामुळे) अडचणीचाच झाला असता.[२३] आता ' स्थायिभावाचे रसीभवन होते ' असे जे म्हटले आहे,[२४] ते केवळ औचित्यामुळे म्हणजे उपचारामुळे[२५] कारण पात्राच्या विभाव-अनुभावांना योग्य अशी जी चित्तवृत्ति सहृदयाच्या अन्तःकरणात संस्कार-रूपाने असते, ती जागृत होऊन तिचा रम्य असा आस्वाद सहृदयाला मिळतो. (स्थायीचे रसीभवन होते असे म्हणण्याचे) दुसरे कारण असे की, हृदयसंवादाला आवश्यक असलेले लोकांच्या रत्यादि चित्तवृत्तीचे यथार्थ

ज्ञान होत असताना उद्यान इ. कारणे, रोमांच इ. कार्ये यांमुळे लोकांच्या ठिकाणी रत्यादि स्थायिभाव उदित झाले आहेत असे ज्ञान (रसिकाला) होते.[३६] आता व्यभिचारी भाव हा जरी (स्थायीप्रमाणेच) चित्तवृत्तीच्या स्वरूपाचाच असला, तरी मुख्य असलेल्या चित्तवृत्तीचे (म्हणजे स्थायिभावाचे) अंग म्हणूनच त्याचा आस्वाद घेतला जात असल्याने त्याचा निर्देश विभाव-अनुभाव या अंगांच्या बरोबरच केला आहे. म्हणूनच (रससूत्रात) जी रसाची म्हणजे 'आस्वादिले जाणे' या अवस्थेची निष्पत्ति सांगितली आहे, ती हीच की, प्रबंधात म्हणजे काव्यनाटकांत रेखाटलेल्या आप्तांची भेट वगैरे कारणांमुळे मूळ पात्रांच्या ठिकाणी उदित होणाऱ्या हर्ष वगैरे लौकिक भावना बाजूला सारून (जागृत झालेल्या स्वगत चित्तवृत्तींचे) होणारे आस्वादन. म्हणून रसाची चर्वणा म्हणजे केवळ अभिव्यक्ति (किंवा साक्षात्कार) होय. ती (रसाच्या) प्रत्यक्ष, अनुमान इ. प्रमाणांनी होणाऱ्या लौकिक ज्ञानासारखी नव्हे, किंवा दंड, चक्र वगैरे 'निमित्त' कारणांच्या व्यापाराने (होणाऱ्या घटादि पदार्थांच्या उत्पादनाप्रमाणे ती अभिव्यक्ति म्हणजे रसाचे) 'उत्पादन'-ही नव्हे.

(शंका-) पण काय हो, ही चर्वणा म्हणजे जर 'ज्ञान होणे' किंवा 'उत्पन्न होणे' या स्वरूपाची नसेल, तर हिचे स्वरूप आहे तरी काय? (उत्तर-) अहो, हेच तर त्या रसाच्या स्वरूपाचे 'अलौकिकत्व' (म्हणजे त्या रसाची निष्पत्ति ज्ञापनरूप किंवा उत्पादनरूप नसणे) होय! (शंका-) पण काय हो, विभाव वगैरे रसाच्या निष्पत्तीची कारणे 'ज्ञापक' आहेत की 'उत्पादक'? (उत्तर-) ती ज्ञापकही नाहीत व उत्पादकही नाहीत. ती चर्वणा घडवावयास साहाय्य करणारी आहेत. (शंका-) पण काय हो, असे (म्हणजे एखादी वस्तु कारक म्हणजे उत्पादक हेतु किंवा ज्ञापक हेतु नसली तरीही ती दुसऱ्या वस्तूला उपकारक होणे) दुसरीकडे कोठे झालेले दिसून येते? (उत्तर-) ज्या अर्थी कोठेही दिसून येत नाही, त्या अर्थीच या रसचर्वणेला 'अलौकिक' म्हटले गेले आहे. (शंका-) पण यामुळे म्हणजे रसाला 'अलौकिक' म्हटल्यामुळे रस ही प्रमाणभूत (म्हणजे विश्वसनीय) वस्तु होणार नाही!' (उत्तर-) 'न होईना का! त्यामुळे काय बिघडणार

आहे ? कारण त्या रसाच्या आस्वादामुळेच आनंद आणि ज्ञान यांची प्राप्ति होते, ही तर सहृदयांच्या अनुभवाने सिद्ध असलेली गोष्ट आहे ! आणि (आनंद व ज्ञान यांची प्राप्ति होत असल्यामुळे याहून) आणखी दुसरे काय पाहिजे ?

(शंका–) 'पण काय हो, हा आनंद व ज्ञान यांचा लाभ होतो, याला कोणतेही प्रमाण नाही !' (उत्तर) 'असे नाही, कारण (आनंद व ज्ञान यांचा) सहृदयांना अनुभव येतो, यावरूनच त्यांची प्राप्ति ही सिद्ध आहे. कारण चर्वणा म्हणजे तरी विशिष्ट असे म्हणजे अलौकिक प्रकारचे ज्ञानच होय !'[२७] तेव्हा आता यावर फार बोलणे पुरे.

याशिवाय आणखी एका कारणानेही रस हा 'अलौकिक' आहे; कारण ललित व परुष अनुप्रास[२८] हे जरी वाच्यार्थ–बोधाच्या कामी निरुपयोगी असले, तरीही ते रसाचे व्यंजक असतात. तेथे लक्षणेचा संशयदेखील कोठून यावयाचा ?[२९] काव्यमय (म्हणजे अनुप्रासयुक्त) असलेले शब्द मनात पुन्हा पुन्हा घोळवल्यामुळे रसाचा आस्वाद मिळतो, असे दिसते. कारण रसिक लोक तेच काव्य पुन्हा पुन्हा म्हणतात व तेवढ्यामुळेच त्यांना रसाचा आस्वाद मिळतो, असे आढळून येते.[३०] मात्र 'जे एकदा वापरण्यासाठी घेतले, तरी त्यानंतर जे त्याज्यच असतात[३१]' या न्यायानुसार काव्यातील (अनुप्रासयुक्त) शब्दांनी वाच्यार्थाची प्रतीती घडवून दिली, तरी त्यांचा रसप्रतीतीसाठी उपयोगच नसतो, असे नाही, तर अवश्यमेव उपयोग असतो, म्हणून या म्हणजे रसव्यंजक काव्यात (अर्थाचा विचार बाजूला ठेवला, तरी) केवळ शब्दाचे (स्वनात्मक) स्वरूप देखील व्यंजक असते. म्हणूनच या म्हणजे 'अनुप्रासयुक्त ध्वनिकाव्य' या प्रकाराला 'अलक्ष्यक्रम' (म्हणजे ज्यातील शब्द ऐकल्यावर फार झपाट्याने रसप्रतीति होते असा) म्हटले आहे. आता (म्हणजे शब्द हाच वाच्यार्थाचा व व्यंग्यार्थाचाही बोध करून देतो असे मानिल्यास) 'वाक्यभेद[३२] हा दोष उत्पन्न होईल' असे जे कोणीतरी म्हटले आहे, ते अयोग्य आहे, कारण ते त्याने अजाणपणाने म्हटले आहे, कारण शास्त्र (म्हणजे काव्याखेरीज इतर ग्रंथातील वाक्य) हे एकदा उच्चारल्यावर संकेताच्या सामर्थ्याने (व तात्पर्यवृत्तीमुळे) अर्थाचा बोध करून देत असताना त्या एकाच

वाक्याने एकाच वेळी परस्परभिन्न अशा अनेक संकेतांचे स्मरण करून देणे अशक्य असल्याने ते वाक्य (एकाच वेळी, दोन भिन्न अर्थांचे बोधक कसे होईल ? आणि ते दोन्ही अर्थ जर परस्पर–विरुद्ध नसतील, तर ते दोन्ही मिळून एकच (सुसंबद्ध असा) वाक्यार्थ बनेल ! आता या दोन अर्थांचे ज्ञान शब्द हे एकामागून एक अशा क्रमाने करून देतात असे मानले, तरी एक अर्थ प्रकट केल्यावर अभिधाशक्ति नष्ट होते व तिचे पुनरुज्जीवन होणे शक्य नाही.[33] ते वाक्य एकदा उच्चारल्यावर पुन्हा उच्चारले तरी त्याच अर्थाचा बोध होईल, कारण संकेत, संदर्भ वगैरे अगदी पहिल्या वेळेप्रमाणेच राहिलेले असणार. संदर्भ व संकेत यांच्या सामर्थ्याने ज्ञात होणारा अर्थ बाजूला सारून वाक्य दुसऱ्या निराळ्याच अर्थाचा बोध करून देते असे मानिले, तर वाक्य अमुकच अर्थाचा बोध करून देईल याबाबत काहीही नियम राहणार नाही व मग त्यामुळे ' स्वर्गाची इच्छा असणाऱ्याने अग्निहोत्र–होम करावा ' या श्रुतिवचनाचा अर्थ '(स्वर्गाची इच्छा असणाऱ्याने) कुत्र्याचे मांस खावे '[34] हा निघणार नाही याला तरी प्रमाण काय, असे म्हणण्याचा प्रसंग येईल. आणि त्या दुसऱ्या अर्थाच्या बाबतीतही काही नियम म्हणजे निश्चित व्यवस्था राहणार नाही. अशा रीतीने शास्त्रातील (म्हणजे काव्य-व्यतिरिक्त दुसऱ्या ग्रंथातील) वाक्यांवर विश्वास ठेवणे अशक्य होईल. अशा परिस्थितीत ' वाक्यभेद ' हा दोष उत्पन्न होतो.[35] पण येथे म्हणजे (रसप्रधान) काव्यामध्ये वर्णिले जाणारे विभावादिक हे तावडतोब चर्वणेचे विषय होतात. त्या विभावादिकांपासून रसादींची अभिव्यक्ति होण्यामध्ये पुन्हा ' संकेत ' वगैरेंचा उपयोग नसतो.[36] आणि शास्त्रीय ग्रंथांतून विधिवाक्यांचे ज्ञान प्राप्त होताना प्रथम ' मला हे काम करावयास शास्त्र आज्ञा करीत आहे ' अशी प्रतीति होते (बोधदशा). (मग ते काम प्रत्यक्ष करताना) ' मी हे काम करीत आहे ' अशी प्रतीति (अनुष्ठानदशा) व (त्यानंतर म्हणजे ते काम पूर्ण झाल्यावर) ' आता हे काम मी पार पाडले आहे ' अशी प्रतीति (कृतकृत्यतादशा) वगैरे अनुभव येतात, त्या प्रकारचा काव्य वाचून येणारा रसास्वादाचा अनुभव नसतो. त्या म्हणजे शास्त्रीय ग्रंथांतील विविध वाक्यांचे बाबतीत ' यानंतर काय करावयाचे ' याविषयी उत्सुकता वाटते, म्हणून त्या

ज्ञानाचे स्वरूप लौकिक म्हणजे व्यावहारिक असते.[३७] पण या, म्हणजे काव्याचे बाबतीत विभावादिकांची चर्वणा त्यावेळेशीच म्हणजे वर्तमानकाळाशीच संबद्ध असते, असे म्हटले गेले[३८] आहे. जादूगाराने दाखविलेल्या अपूर्व फुलाप्रमाणे त्या चर्वणेचा आधीच्या किंवा नंतरच्या काळाशी काहीही संबंध नसतो, म्हणून लौकिक म्हणजे व्यवहारातील विषयांच्या आस्वादाहून किंवा योग्याला होणाऱ्या ब्रह्मास्वादाहून हा 'रसास्वाद' काही निराळाच[३९] असतो. म्हणूनच[४०] (पृ. २४५ वरील) 'हे तरुणि ! '...इ. उदाहरणांतसुद्धा मुख्यार्थबाध इत्यादींचा विचार करण्याची गरजही न भासता उदाहरण वाचल्याबरोबर नायिकेची स्तुति करावी (व तिच्याबद्दल आपल्याला वाटणारे प्रेम तिला कळावे) हा बोलणाऱ्याच्या मनातील उद्देश सहृदयाच्या तावडतोब ध्यानात येतो. म्हणूनच वृत्तिकारांनी 'ध्वनीच्या विवक्षितान्यपरवाच्य प्रकारामध्ये लक्षणा नसते' असे (विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीच्या दोन्ही उपप्रकारांना लागू पडणारे) सर्वसाधारण विधान केले.[४१] आम्ही मात्र, दुराग्रहाने पछाडलेल्या मीमांसकाला चुचकारण्यासाठीच 'हे तरुणि !'.... इ. (विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीच्या संलक्ष्यक्रम प्रकारच्या) उदाहरणात 'लक्षणा असेना का ?' असे[४२] म्हटले होते. पण त्या मीमांसकाला हवा तेवढा राग आला, तरी ध्वनीच्या अलक्ष्यक्रम (म्हणजे रसादि) प्रकाराच्या बाबतीत तो काय करू शकणार ? पण तो मीमांसक जर न रागावता शांतपणे विचार करण्याचे ठरवील, तर 'सोन्याची नाणी फुलविणाऱ्या ...' यासारख्या 'अविवक्षितवाच्य' ध्वनीच्या प्रकारातसुद्धा सहृदयाला (व्यंजनाव्यापाराने व्यंग्यार्थप्रतीति होते, त्या वेळी) लक्षणेच्या मुख्यार्थबाध इ. सामग्रीचा विचारही करावा न लागता त्याला व्यंग्यार्थाची प्रतीति होते. म्हणून या विषयाची आता अधिक चर्चा नको. म्हणून (वृत्तिकार या विषयाचा) 'म्हणून लक्षणा हे ध्वनीचे लक्षण (म्हणजे असाधारण धर्म) नव्हे,' या शब्दांनी समारोप करितात.

टीपा

१. म्हणजे अभिधा ही संभवनीय अर्थ प्रकट करण्याचे बाबतीत बाधक कारणांनी असमर्थ झाल्यामुळे तिला मदत करण्यासाठीच येणारी.

२. व्यंजनावृत्ति ही लक्षणेहून निराळी नाही, हे भक्तिवाद्यांचे मत स्वीकारावयाचे, तर तीन पक्ष संभवतात :— (१) लक्षणा व व्यंजना एकमेकींचे पर्याय म्हणजे १०० टक्के एकरूप आहेत; (२) त्या एकमेकींहून निराळ्या असल्या, तरी लक्षणा व्यंजनेचे 'लक्षण' म्हणजे व्यवच्छेदक धर्म आहे; (३) लक्षणा ही व्यंजनेचे 'उपलक्षण' म्हणजे काही वेळा दिसणारे चिह्न आहे. या तीन पर्यायांपैकी तिसरा ध्वनिवाद्यांनाही मान्य आहे. कारण त्यांच्या मतेसुद्धा 'अविवक्षितवाच्य' हा ध्वनिप्रकार लक्षणामूलकच असतो, पण हा ध्वनिप्रकार जरी प्रयोजनमूलक लक्षणेवर आधारलेला असला, तरी त्या लक्षणेच्या प्रयोजनाचे ज्ञान होण्यासाठी व्यंजनाव्यापार मानणे भागच आहे. प्रयोजनाचे ज्ञान होण्याचे कामी अभिधा व लक्षणा या दोन्ही वृत्ती असमर्थ ठरतात. 'लक्षणा' ही व्यंजनेचे लक्षण आहे या पर्यायाचे दोन अर्थ होतात :–(१) जेथे जेथे लक्षणा असते, तेथे तेथे व्यंजनाही असते. (२) जेथे जेथे व्यंजना असते, तेथे तेथे लक्षणाही असते. पण यांपैकी पहिला प्रकार रूढिमूल लक्षणेच्या बाबतीत संभवत नाही; कारण तेथे लक्षणा असूनही व्यंजना नसते. दुसरा प्रकार 'विवक्षितान्यपरवाच्य' ध्वनीच्या बाबतीत संभवत नाही, कारण तेथे व्यंजना असूनही लक्षणा नसते. म्हणून लक्षणा ही व्यंजनेचे लक्षण म्हणजे व्यवच्छेदक धर्म नव्हे. लक्षणा व व्यंजना यांचे स्वरूप, कार्य व पूर्वपीठिका अगदी भिन्न असल्यामुळे त्या पूर्णपणे एकरूप असणे हा पहिला पर्यायही संभवत नाही. यावरून या तीनपैकी पहिले दोन पर्याय असंभवनीय आहेत व तिसरा ध्वनिवाद्यांनाही मान्य असला, तरी तेथेसुद्धा प्रयोजनाचे ज्ञान लक्षणेने न होता व्यंजनेनेच होते, अशी ध्वनिवाद्यांची ठामपणे भूमिका आहे.

३. म्हणजे लक्षणा ही ध्वनि नसलेल्या उदाहरणांतसुद्धा आढळून येत असल्याने तिचे क्षेत्र काही बाबतीत ध्वनीच्या क्षेत्राहून अधिक व्यापक आहे.

४. जेथे जेथे वस्तुवाचक किंवा व्यक्तिवाचक दोन शब्द एकाच विभक्तीमध्ये वापरलेले असतात, तेथे तेथे त्या दोन शब्दांच्या अर्थांमध्ये तादात्म्य किंवा अभेद हा संबंध आहे असा अर्थ होतो. उदा. 'तो छोकरा सिंह आहे' याचा 'सिंह आणि छोकरा हे अभिन्न आहेत' असा (वाच्य) अर्थ होतो. पण तो व्यवहारातल्या अनुभवाशी जुळत नाही. कारण सिंह म्हणजे एक विशिष्ट वन्य पशु. तर छोकरा (म्हणजे अल्पवयी माणूस) आणि सिंह हे अभिन्न कसे असू शकतील ? म्हणून 'सिंह' या शब्दाच्या 'विशिष्ट वन्य पशु'

या वाच्य अर्थाचा बाध होतो. म्हणून ' सिंह ' या शब्दावर लक्षणा मानून त्याचा लक्ष्यार्थ ' सिंहासारखा शूर असलेला छोकरा ' हा स्वीकारला, म्हणजे तो बाध दूर होतो व दोन्ही शब्दांचे तादात्म्य सयुक्तिक ठरते.

(या उदाहरणात) ' सिंह ' व ' छोकरा ' हे शब्द दोन असले, तरी ते दोघे मिळून एकाच व्यक्तीचे वर्णन करितात. म्हणजे एकाच वैशिष्ट्ययुक्त अर्थाचा बोध करून देतात. म्हणजे त्या दोहोंपैकी प्रत्येक शब्दाने ज्ञात करून दिलेल्या अर्थाचा आश्रय असलेली व्यक्ति एकच आहे. मात्र ती व्यक्ति ' सिंह ' या लाक्षणिक शब्दाच्या ' लक्ष्य ' अर्थाचा आश्रय आहे, तर ' छोकरा ' या वाचक शब्दाच्या ' वाच्य ' अर्थाचा आश्रय आहे. म्हणूनच वर (२) हे मत मांडताना (सिंह या शब्दाच्या) ' लक्ष्य अर्थाचा वाचक असलेल्या छोकरा या शब्दाशी असलेले तादात्म्य ' असे म्हटले आहे. अशा रीतीने ' सिंह ' शब्दाच्या ' लक्ष्य ' अर्थाचा व ' छोकरा ' शब्दाच्या ' वाच्य ' अर्थाचा आश्रय म्हणजे ' अधिकरण ' एकच व्यक्ति असल्याने त्या दोन शब्दांची विभक्ति एकच असणे अगदी योग्य आहे.

५. गौण प्रकारामध्ये वर्ण्यविषयवाचक शब्द व लाक्षणिक शब्द हे दोन्हीही उच्चारलेले असतात व समानविभक्तिक असतात. (अर्थात त्यांच्या समान-विभक्तिकत्वाचे समर्थन लक्षणेचा आश्रय केल्यामुळे होते.) परंतु लाक्षणिक प्रकारामध्ये (म्हणजे ' गंगेवर गवळीवाडा ' इ. उदाहरणामध्ये) वर्ण्य-विषयाचा वाचक शब्द (उदा. तीर) वापरलेला नसतो.

मात्र पूर्वपक्ष्याचे हे विधान संपूर्णतया बरोबर नाही. कारण आयुर्घृतम् (तूप हे आयुष्यच) इ. लाक्षणिक प्रकाराच्या उदाहरणांतसुद्धा घृतम् यासारखे वर्ण्यविषयाचे वाचक शब्द वापरलेले असतात. हे उदाहरण लाक्षणिक प्रकाराचे आहे, कारण आयुः हा शब्द आयुःकारणम् या (लक्ष्य) अर्थाने वापरला आहे व आयुः शब्दाच्या वाच्य व लक्ष्य अर्थामध्ये ' कार्यकारणसंबंध ' हा ' सादृश्येतर ' संबंध आहे.

६. हे अवतरण कोणत्या ग्रंथातून घेतले आहे ते समजत नाही.

७. येथे ' संयोग ' हा शब्द ' वाच्यवाचकसंबंध ' या अर्थी वापरला आहे. उदा. ' भ्रमर ' हा वाचक शब्द व ' भुंगा हा कीटक ' हा त्याचा वाच्यार्थ होय. मात्र ' द्विरेफ ' या शब्दाचा ' भ्रमर हा शब्द ' हा वाच्यार्थ होय व ' भुंगा हा कीटक ' हा ' द्विरेफ ' या शब्दाचा लक्ष्यार्थ होय. म्हणजे ' द्विरेफ ' शब्दाचा वाच्यार्थ व लक्ष्यार्थ यांमध्ये ' वाचक – वाच्य ' संबंध आहे.

८. म्हणजे मागे ' संयोग ' याचा अर्थ ' वाच्यवाचकसंबंध ' असा केला होता, तर येथे ' समवाय ' याचा अर्थ ' वास्तविक संयोग ' म्हणजे ' संश्लेष ' असा घेतला आहे. म्हणजे हा समवाय व वैशेषिकांचा समवाय हे भिन्न आहेत.

९. येथे 'लाठ्या' हा वाच्यार्थ व 'लाठीधारी पुरुष' हा लक्ष्यार्थ होय. या दोन अर्थांमध्ये 'संश्लेष' (म्हणजे स्पर्शयुक्त संयोग) हा संबंध आहे.

१०. येथे 'प्राण' या शब्दाचा वाच्यार्थ 'जीवित' व लक्ष्यार्थ 'अन्न' असा आहे. जीवित व अन्न यांमध्ये कार्यकारण संबंध आहे.

११. मागे पृ. ४१ वर अभिनवगुप्तांनी 'भक्ती'च्या संदर्भात अभिधेयेन सामीप्यात्... इ. भर्तृमित्राचा श्लोक उद्धृत केला होता. तेथे त्याचे विवरण केले नव्हते किंवा उदाहरणेही दिली नव्हती. त्याच श्लोकाचे येथे पूर्वपक्षाचे मत मांडताना उदाहरणांसह विवरण केले आहे. पण तेथील सामीप्यात् हा शब्द गाळून येथे अभिनवगुप्तांनी संयोगात् हा पाठ घेतलेला आहे.

१२. पाहा, काव्यादर्श, १–१०० :– तदेतत् काव्यसर्वस्वं समाधिर्नाम यो गुणः।
**कविसार्थः समग्रोऽपि तमेनमनुगच्छति।**
दण्डीचा 'समाधि' गुण म्हणजे 'गौणी लक्षणा'च होय.

१३ पाहा, पृ. २५०, व पृ. २५३ वरील टीप १६ वी.

१४. बिम्बफल व तरुणीचा अधर यांमधील 'सादृश्य' संबंधामुळे बिंबफळाला म्हणजे 'तिच्या अधरालाच' टोच्या मारतो असा लक्ष्यार्थ निष्पन्न होतो.

१५. त्यांचे पोटभेद म्हणजे उदा. रसाचे शृंगार, वीर इ. पोटभेद; भावाचे (म्हणजे व्यभिचारिभावाचे) निर्वेद इ. प्रकार आणि त्या त्या रस-भावांचे आभास. इ.

१६. वस्तुतः कुमारिलभट्टाच्या मते लक्षणा प्रवृत्त होण्यास मुख्यार्थाला बाध होणे अवश्यच आहे. ते त्याने पुढील अवतरणाच्या लगेच आधी **मानान्तर-विरुद्धे तु मुख्यार्थस्य परिग्रहे।** या शब्दांनी स्पष्टपणे म्हटले आहे. परंतु पूर्वपक्ष्याने मात्र जाणूनबुजून ते दृष्टीआड केले आहे.

१७. पाहा, तन्त्रवार्तिक, पूर्वमीमांसासूत्र, १–४–२२ वरील वार्तिक. या अवतरणातील **अविनाभूत** या शब्दाचा अर्थ केवळ ('कोणत्या तरी संबंधाने) संबद्ध' एवढाच घ्यावयाचा. 'नियत-साहचर्याने संबद्ध' असा घ्यावयाचा नाही, हे मम्मटाने काव्यप्रकाश, उल्लास २ मध्ये पृ. ५० वर (झळकीकर आवृत्ति) म्हटले आहे.

१८. पण हे बरोबर नाही. कारण, 'धूम' या शब्दाचा वाच्य अर्थ अभिधा या शब्दव्यापाराने ध्यानात आल्यावर अग्नीचे होणारे स्मरण हे 'मानस' व्यापाराने होते, 'शाब्द' व्यापाराने नव्हे. म्हणून अग्नीचे स्मरण हे लक्षणा या शब्दव्यापाराने होते असे म्हणणे योग्य नाही.

१९. पाहा, अभिनवभारती (कंगले आवृत्ति), पृ. १७४ – **तथाहि लौकिक–चित्तवृत्त्यनुमाने का रसता ? तेनालौकिकचमत्कारात्मा रसास्वादः स्मृत्यनु–मानलौकिकस्वसंवेदनविलक्षण एव।**

२०. अशाच तऱ्हेची विचारसरणी अभिनवगुप्तांनी पूर्वी पृ. १३९ व १४० वर

मांडली आहे.

२१. म्हणजे धुरावरून होणाऱ्या अग्नीच्या ज्ञानाप्रमाणे विभावादिकांचे व त्यावरून होणाऱ्या स्थायिभावांचे ज्ञान अलिप्तपणे होत नाही, तर आस्वादरूपाने होते.

२२. पाहा, भरत, नाट्यशास्त्र, ७–३ नंतरचा गद्यभाग (कंगले आवृत्ति), पृ. ३७५.

२३. स्थायीचा उल्लेख अडचणीचा का झाला असता हे अभिनवगुप्तांनी स्पष्ट केले नाही. तो अडचणीचा होण्याचे कारण पुढील दोन-तीन कारणांपैकी एक असावे :— (१) तो स्थायी कोणाचा, म्हणजे पात्राचा की कवीचा की रसिकाचा याबद्दल वाचकांना संभ्रम उत्पन्न झाला असता. (२) विभाव, अनुभाव व व्यभिचारी हे जसे प्रेक्षकाच्या दृष्टीने 'बाह्य' असतात, तसा प्रेक्षक ज्याचा आस्वाद घेतो तो स्थायिभावही स्वगत नसून परगतच असतो अशी वाचकाची कल्पना होऊन बसली असती. (३) विभाव व अनुभाव हे जसे 'स्वशब्दवाच्य' असतात व व्यभिचारीही काही वेळा स्वशब्दवाच्य केले जातात, तसा स्थायीही स्वशब्दवाच्य असलेला चालतो असा काहींचा समज झाला असता.

२४. पाहा, भरत, नाट्यशास्त्र, ६–४५ नंतरच्या गद्यभागातील पुढील वाक्य – **स्थायिभावांश्च रसत्वमुपनेष्यामः ।**

२५. वस्तुतः प्रेक्षकाच्या ठिकाणी जागृत होणाऱ्या स्थायिभावाचे रसीभवन होते. पण तो स्थायिभाव मूळ पात्राच्या ठिकाणी उदित झालेल्या स्थायीच्या वर्णनामुळेच जागृत होतो म्हणून मूळ पात्राच्या स्थायी भावाचे (परंपरेने) रसीभवन होते, म्हणून त्या 'स्थायिभावाचे रसीभवन होते' असे दूरान्वयाने म्हटले, तरी त्यात फारशी अनुचितता नाही.

२६. पाहा, पृ. १३९–४० व पृ. २८४. एकंदरीत रसास्वादाच्या प्रक्रियेमध्ये अभिनवगुप्तांनी सांगितलेल्या अवस्था अशा :— (१) सहृदय दैनंदिन जीवनात करीत असलेले लोकांच्या चित्तवृत्तींचे निरीक्षण (२) ते निरीक्षण वारंवार केल्याने त्याच्या मनाला लागत असलेले वळण. (३) काव्य-नाटकांतील विभाव–अनुभावांमुळे अनुकार्य पात्राच्या ठिकाणी स्थायिभाव उदित झाले आहेत असे त्याला होणारे ज्ञान (४) त्यामुळे त्याच्या स्वतःच्या ठिकाणी वासनारूपाने असलेल्या स्थायिभावाचे उद्बोधन म्हणजे जागृति आणि (५) त्या जागृतीमुळे त्याला त्या स्थायिभावाचा रसरूपात मिळणारा आस्वाद.

२७. तुलनार्थ पाहा, अभिनवभारती ६–१७५ (कंगले आवृत्ति) वरील पुढील वाक्य–**रसना च बोधरूपा एव । किंतु बोधान्तरेभ्यः विलक्षणा एव । उपायानां विभावादीनां लौकिकवैलक्षण्यात् ।**

२८. पाहा, पृ. २९. वर्णांचा अर्थ लक्षात आला नाही, तरी ते सहकारित्वाने रसाचे व्यंजक असतात हा मुद्दा पुढे ध्वन्यालोक, काशी आवृत्ति पृ. ३०४–३०५ व 'लोचना'त आला आहे.

२९. अशा ठिकाणी 'अभिधा' ही पुढे केव्हा प्रवृत्त होत असेल ती होवो, पण ती प्रवृत्त होण्याच्या आधीच अनुप्रासांमुळे रसप्रतीति होऊ लागते. यावर 'अभिधा प्रवृत्त न झाली, तर न होवो, पण लक्षणा प्रवृत्त व्हावयास काय हरकत आहे, व लक्षणा प्रवृत्त होत असली, तर मग रसचर्वणेचे अलौकिकत्व ते काय राहिले ?" असे पूर्वपक्षी म्हणेल, तर त्याला उत्तर असे की, जेथे अभिधाच प्रवृत्त होत नाही, तेथे लक्षणा प्रवृत्त होणे अशक्य आहे.

३०. येथे अभिनवगुप्तांच्या म्हणण्याचा एकंदर रोख असा दिसतो की, रसप्रधान काव्यामध्ये रसाला पोषक असा अनुप्रास वापरला असल्यास ते काव्य पहिल्याप्रथम वाचताना तो अनुप्रास रसाभिव्यक्ति करावयास वाच्यार्थाला मदत करितो. पण तेच काव्य रसिक जर स्वतःशी पुन्हा पुन्हा म्हणू लागला तर वाच्यार्थ पूर्वीच ध्यानात आलेला असल्याने आता प्रत्येक वेळी तो ध्यानात येण्याची जरूर न राहून केवळ अनुप्रासच रसप्रतीति घडवून आणण्यास पुरेसा होतो.

अभिनवगुप्तांचे हे म्हणणे आनंदवर्धनांना पूर्णपणे मान्य होते किंवा नाही, हा प्रश्नच आहे, कारण दुसऱ्या उद्द्योतातील कारिका १६ वरील वृत्तीमध्ये रसप्रधान काव्यात यमक वगैरे शब्दालंकार रसाला पोषक नसतात, व ज्या काव्यातून ती यमकालंकृत असूनही रसप्रतीति होते, तेथे यमकादि अलंकारच मुख्य असतात व रस वगैरे त्या अलंकारांना अंगभूत असतात असे आनंदवर्धनांनी म्हटले आहे. तेव्हा यमक, अनुप्रास वगैरे शब्दालंकार जेव्हा संयमाने, त्यांच्यासाठी वेगळा प्रयत्न न करिता वापरले गेले असतील अशाच काव्यात ते वाच्यार्थाला रसप्रतीति घडविण्याच्या कामी साहाय्य करणारे होतात, इतके आनंदवर्धनांच्या मतास अनुसरून म्हणता येईल. अभिनवगुप्तांनी अनुप्रासाच्या वापरातील संयमाचा उल्लेख येथे केला नाही व शिवाय **शब्दनिष्पीडनेनैव** यात योजिलेल्या एव शब्दामुळे वाच्यार्थ फारसा ध्यानात न येताच केवळ किंवा मुख्यतः अनुप्रासामुळेच रसप्रतीति होते अशी वाचकाची समजूत होणे शक्य आहे.

रसिकांच्या अनुभवाच्या दृष्टीनेही अभिनवगुप्तांच्या या म्हणण्याचे यथार्थ तात्पर्य लक्षात घेणे जरूर आहे. कालिदासादिकांची काव्ये रसिक जेव्हा पुन्हा पुन्हा स्वतःशी गुणगुणतो, त्या वेळी वाच्यार्थाची आठवण त्याला असतेच. त्यातील केवळ अनुप्रासयुक्त शब्दरचनेनेच त्याला रसास्वाद मिळतो, असे समजू नये. वाच्यार्थ

त्याच्या डोळ्यांसमोर इतक्या लवकर येतो की, त्या काव्यातील अनुप्रासयुक्त शब्द नुसते गुणगुणण्याचा अवकाश, की लगेच त्याला रसप्रतीति व्हावयास प्रारंभ होतो. असेच जवळजवळ होते, हा भावार्थ.

संगीताचे सूर मात्र वाच्यार्थ–ज्ञानाची गरज न पडू देता रसप्रतीति घडवू शकतात असे आनंदवर्धनांचे म्हणणे आहे. ( पाहा, उद्द्योत ३ रा, काशी आवृत्ति, पृ. ४२८ ) व ती रसिकांच्या अनुभवाचीही बाब म्हणता येईल.

३१. वाक्यपदीयम्, २–३–८. ही पूर्ण ओळ अशी आहे–उपादायापि ये हेयास्तानुपायान् प्रचक्षते । तिचा अर्थ–'जे फलप्राप्तीसाठी वापरावयास घेतले गेले असले, तरी फलप्राप्ति झाल्यावर ज्यांचा त्याग केला जातो, त्यांना 'उपाय' म्हणतात.'

३२. ज्या वाक्यातून दोन तुल्यबळ व स्वतंत्र असे अर्थ निष्पन्न होतात, तेथे 'वाक्य-भेद' हा दोष असतो, असे मीमांसक म्हणतात. प्रस्तुत ठिकाणी वाच्यार्थ व व्यंग्यार्थ अशा दोन अर्थांचा एकाच वाक्यातून बोध होत असल्यामुळे वाक्यभेद दोष संभवतो असे मीमांसकांचे म्हणणे. पण ते का बरोबर नाही हे अभिनवगुप्तांनी 'पण येथे म्हणजे'... ...इ. (पृ. २८८ वरील) शब्दांनी सांगितले आहे. विभावादि वाच्यार्थ हे रसप्रतीतीला पोषक, अंगभूत असल्यामुळे वाक्यभेद हा दोष येथे संभवत नाही हा त्यांच्या म्हणण्याचा सारांश.

३३. हाच युक्तिवाद पूर्वी अभिनवगुप्तांनी पृ. ८४, ८६ व ९१ वर मांडला आहे.

३४. हे उदाहरण धर्मकीर्तीच्या 'प्रमाणवार्तिक' या ग्रंथात १–३१८ येथे आले आहे, असे Professor Gnoli 'The Aesthetic experience according to अभिनवगुप्त' या ग्रंथात उपोद्‌घात, पृ. ३३ वर ) म्हणतात.

३५. एकाच वाक्यातून एक अर्थ समजल्यावर त्याच्याशी संबंध नसलेला दुसरा हवा तो अर्थ निष्पन्न होऊ लागला, तर त्यापैकी कोणत्याही अर्थावर विश्वास ठेवता येणार नाही. अशा परिस्थितीत 'वाक्यभेद' दोष उत्पन्न होतो.

३६. संकेत, प्रकरण ( म्हणजे संदर्भ ) इ. गोष्टी वाच्यार्थ समजावयास उपयोगी असतात तो वाच्यार्थ समजल्यावर त्यापासून रसादींची प्रतीति होताना त्या संकेत वगैरेंचे पुन्हा काम पडत नाही, हा भावार्थ.

३७. म्हणजे शास्त्रीय ग्रंथातील विधिवाक्यांचे ज्ञान हे कोणते तरी कर्म करावयास प्रवृत्त करिते, म्हणजेच त्याचे स्वरूप 'साधन' असे असते. रसास्वादासारखे 'अंतिम साध्य' असे नसते. म्हणूनच शास्त्रीय वाक्यांपासून होणाऱ्या ज्ञानाला 'लौकिक' व रसास्वादाला 'अलौकिक' म्हटले जाते.

३८. मुळातील उदिता याचा अर्थ 'उत्पन्न झालेली' असा न करिता 'म्हटली

गेलेली ' असा करणे आम्हांस या ठिकाणी उचित वाटते.

३९. रसास्वाद हा लौकिक असलेल्या विषयांच्या आस्वादाहून निराळा म्हणण्याचे एक कारण लौकिक विषय हे बाह्य व जडस्वरूप असतात. हे होय. त्या उलट रसास्वाद म्हणजे सहृदयाच्या अंतःकरणात जागृत झालेल्या त्याच्या स्वतःच्याच स्थायिभावाचा आस्वाद होय. दुसरे कारण विषयांचा आस्वाद घेताना अहंकाराची भावना जागृत असते, पण रसास्वादाचे वेळी तिचा विसर पडलेला असतो. रसास्वाद हा योग्याला समाधि-अवस्थेमध्ये प्राप्त होणाऱ्या ब्रह्मास्वादाहूनही निराळा, याचे कारण अभिनवगुप्तांनी ' अभिनव-भारती– ' त सांगितले आहे ते असे– रसास्वादामध्ये ज्याप्रमाणे एक प्रकारचा भावनात्मक ओलावा, सौंदर्य किंवा रंगदारपणा ( वैषयिक उपराग ) असतो, तसा ब्रह्मास्वादामध्ये नसतो. तो ब्रह्मास्वाद गंध, रंग, रूप यांनी विरहित, अत एव सौंदर्यहीन, रूक्ष ( विषयास्वादशून्यतेमुळे ' परुष ' ) असतो. ( या संदर्भात पाहा, अभिनवभारती, कंगले आवृत्ति, पृ. १९१ व १९४ )

रसास्वादाला ' ब्रह्मास्वाद–सहोदर ' म्हटले जाते. म्हणजे रसास्वाद हा काहीसा ब्रह्मास्वादासारखा आहे. पण तो व ब्रह्मास्वाद हे एकच म्हणता येत नाहीत. तो ' ब्रह्मास्वादासारखा ' म्हणण्याचे कारण दोन्ही आस्वादांचे वेळी आपल्या रोजच्या वैयक्तिक जीवनातील विवंचनांचा आपल्याला संपूर्णतया विसर पडतो. पण रसास्वाद व ब्रह्मास्वाद हे एकच नसतात याचे कारण ब्रह्मास्वादामध्ये ज्ञाता व व ज्ञेय या द्वैताचा मागमूसही नसतो–सर्वत्र एकच एक परब्रह्म असते. येथे म्हणजे रसास्वादामध्ये ' मी व विभावादिकांमुळे जागृत झालेला स्थायिभाव ' या द्वैताची जाणीव टिकून असते. म्हणूनच कै. तात्यासाहेब केळकरांनी ब्रह्मसाक्षात्काराला ' निर्विकल्पक समाधि ' व रसास्वादाच्या अवस्थेला ' सविकल्पक समाधि ' म्हटले आहे.

४०. म्हणजे पृ. २८२ वर सांगितल्याप्रमाणे ' अलक्ष्यक्रम ध्वनीमध्ये लक्षणेला वाव नसल्यामुळे. '

४१. कारिका १८ वरील वृत्तीमध्ये.

४२. पाहा, पृ. २५०, व पृ. २८२ शिवाय ' हे धार्मिका ! ' इ. पद्याच्या बाबतीत पृ. ८६ व ९० वर केलेले विवेचनही पाहावे.

ध्वन्यालोकः

कस्यचिद्ध्वनिभेदस्य सा तु स्यादुपलक्षणम् ।

ध्वन्यालोक

मात्र लक्षणा हे ध्वनीच्या एखाद्या प्रकाराचे उपलक्षण' असू शकेल.

ध्वन्यालोकः

सा पुनर्भाक्तिर्वक्ष्यमाणप्रभेदमध्यादन्यतमस्य भेदस्य यदि नामोपलक्षणतया सम्भाव्येत। यदि च गुणवृत्त्यैव ध्वनिर्लक्ष्यत इत्युच्यते तदभिधाव्यापारेण तदितरोऽलङ्कारवर्गः समग्र एव लक्ष्यत इति प्रत्येकमलङ्काराणां लक्षणकरणवैयर्थ्यप्रसङ्गः ।

ध्वन्यालोक

तथापि पुढे ध्वनीचे जे प्रकार सांगण्यात येणार आहेत, त्यांपैकी एखाद्या ( म्हणजे अविवक्षितवाच्य ) प्रकाराचे लक्षणा ही फार तर ' उपलक्षण ' म्हणून संभवू शकेल. आणि इतक्या उपरही लक्षणेनेच ध्वनीचेही स्वरूपविवरण केले जाते असे (जर) कोणी म्हणेल, तर अभिधाव्यापाराचे विवरण केले की, त्यामुळे वाच्यार्थाचीच विशिष्ट स्वरूपे असलेल्या सगळ्या अलंकारांचेही विवरण झाले असे होऊन मग एकेका अलंकाराचे (वेगवेगळे) लक्षण करण्याची जरूरच नाही अशासारखी आपत्ति ओढवेल !

लोचनम्

ननु मा भूद्ध्वनिरिति भक्तिरिति चैकं रूपम् । मा च भूद्भक्तिर्ध्वनेर्लक्षणम् । उपलक्षणं तु भविष्यति । यत्र ध्वनिर्भवति, तत्र भक्तिरप्यस्तीति भक्त्युपलक्षितो ध्वनिः । न तावदेतत्सर्वत्रास्ति । इयता च किं परस्य सिद्धम् ? किं वा नः त्रुटितम् ? इति तदाह कस्यचिदित्यादि । ननु भक्तिस्तावच्चिरन्तनैरुक्ता, तदुपलक्षणमुखेन च ध्वनिमपि समग्रभेदं लक्षयिष्यन्ति ज्ञास्यन्ति च । किं तल्लक्षणेनेत्याशङ्क्याह – यदि चेति । अभिधानाभिधेयभावो ह्यलङ्काराणां व्यापकः, ततश्चाभिधावृत्ते वैयाकरणमीमांसकैर्निरूपिते कुत्रेदानीमलङ्कारकाराणां व्यापारः । तथा हेतुबलात्कार्यं जायत इति तार्किकैरुक्ते किमिदानीमी-

श्वरप्रभृतीनां कर्तृणां ज्ञातृणां वा कृत्यमपूर्वं स्यादिति सर्वो निरारम्भः स्यात् । तदाह – लक्षणकरणवैयर्थ्यप्रसङ्ग इति ।

लोचन

(शंका–) " पण काय हो, लक्षणा आणि ध्वनि यांमध्ये तादात्म्य नसू द्या, आणि लक्षणा हे ध्वनीचे लक्षण म्हणजे असाधारण (आंतरिक) धर्मही नसू द्या. पण ते (सगळ्या) ध्वनीचे ' उपलक्षण ' म्हणजे बाह्य का होईना, पण निदर्शक चिह्न तर होऊ शकेलच की ! कारण जेथे जेथे ध्वनि असतो, तेथे तेथे लक्षणा सापडणारच ! म्हणून लक्षणा हे ध्वनीचे ' उपलक्षण ' म्हणजे बाह्य, निदर्शक चिह्न आहे."

त्या म्हणण्यावर आमचे उत्तर असे–) पहिली गोष्ट ही की, (लक्षणा ही ध्वनीचे उपलक्षण असणे) ही परिस्थितिदेखील सर्व ठिकाणी आढळत नाही. आणि केवळ यामुळे (म्हणजे लक्षणा हे ध्वनीचे उपलक्षण असे म्हटल्यामुळे) प्रतिपक्ष काय मिळवू शकणार आहे, किंवा आमचे तरी काय नुकसान होणार आहे ?[२] हेच ' मात्र एखाद्या प्रकाराचे '... इ. शब्दांनी सांगितले जात आहे.

' पण काय हो, लक्षणा तर प्राचीनांनी[३] सांगितलेलीच आहे, आणि ती ध्वनीचे निदर्शक चिह्न असे म्हणून त्या द्वारे ध्वनीच्या सर्व प्रकारांचे स्वरूपवर्णन लोक करू शकतील व ते प्रकार समजूनही घेऊ शकतील. म्हणून तुम्ही लक्षणेचे साहाय्य न घेता ध्वनीचे (शास्त्रीय) लक्षण करण्याची गरजच काय[४] ?" अशी शंका घेतली जाईल अशी कल्पना करून (वृत्तिकार) तिचे उत्तर ' आणि इतक्या उपरही '... इ. शब्दांनी देतात. वाच्य–वाचक संबंध हा तर सर्व अलंकारांमध्ये आढळ-णारा आहे. आणि म्हणून वैयाकरणांनी आणि मीमांसकांनी अभिधा-व्यापाराचे संपूर्णतया विवरण केल्यावर आता अलंकारशास्त्रकारांना विवरण करावयास वावच कोठे शिल्लक उरला आहे ? त्याचप्रमाणे 'कारणाच्या सामर्थ्यामुळे कार्य निर्माण होते ' असा (कार्य–कारण संबंधाबद्दलचा) नियम तर्कशास्त्रकारांनी एकदा सांगितल्यावर आता ईश्वर वगैरे ज्ञानपूर्वक निर्मिति करणाऱ्या कर्त्यांच्या कार्याबद्दल

इतिहासादि ग्रंथांमध्ये कोणी काही सांगणे, यात नावीन्य ते काय राहिले असते, व त्यामुळे सर्व शास्त्रांचे खटाटोप व्यर्थच ठरले असते![5] म्हणून वृत्तिकार 'लक्षण करण्याची जरूरच नाही अशी आपत्ति ओढवेल' असे म्हणतात.[6]

टीपा

१. 'उपलक्षण' म्हणजे ध्वनीच्या सर्व प्रकारांत असणारा धर्म नव्हे, तर त्याच्या एखाद्या (म्हणजे अविवक्षितवाच्य) प्रकारामध्ये उपस्थित असून ध्वनीच्या या प्रकाराला इतर प्रकारांहून वेगळा करायला उपयोगी पडणारे चिह्न.

२. 'लक्षणा आणि ध्वनि एकच' ही प्रतिपक्ष्याची पहिली भूमिका. त्यानंतर 'लक्षणा हा ध्वनीचा असाधारण आंतरिक धर्म समजा' ही त्याने घेतलेली दुसरी भूमिका. आता त्या दोन्ही भूमिका सोडून त्याने लक्षणेला ध्वनीचा बाह्य धर्म मानायास तयार होण्याइतक्या खालच्या पायरीवर येणे यामुळे त्याने मूळ भूमिकेचा पूर्णपणे त्याग केला व नवीन काहीच मिळविले नाही' असेच होते. आणि ध्वनीच्या काही प्रकारांमध्ये लक्षणा असू शकते हे आम्हालाही मान्य असल्यामुळे लक्षणेला ध्वनीचे उपलक्षण मानण्याने आमचेही काहीएक नुकसान नाही, असे अभिनवगुप्तांचे म्हणणे.

३. म्हणजे मीमांसक, नैयायिक व वैशेषिक यांनी. अशाच आशयाचे एक विधान अभिनवगुप्तांनी मागे पृ. ४२ वर केले आहे.

४. प्रतिपक्ष्याच्या म्हणण्याचा सूर असा की, लक्षणा या उपलक्षणावरून ध्वनीचे स्वरूप समजावून घेणे हे 'ज्ञाताकडून अज्ञाताकडे' या तत्त्वानुसार सोपे आहे. लक्षणेच्या साहाय्याशिवायच त्याचे शास्त्रीय लक्षण करणे हा अधिक क्लिष्ट, दुर्गम मार्ग आहे.

५. वस्तुतः प्रतिपक्ष्याच्या (याआधीच्या, ४ थ्या टीपेत मांडलेल्या) आक्षेपाचे उत्तर पुढीलप्रमाणे दिले पाहिजे– ध्वनीचे जे प्रकार लक्षणामूलक असतात, तेथे लक्षणा हे ध्वनीचे उपलक्षण मानून ध्वनीच्या त्या प्रकारांचे वर्णन करणे योग्य होईल असे एकवेळ मानिले, तरीही ध्वनीचे जे प्रकार लक्षणा-मूलक नसतात, तेथे लक्षणा हे ध्वनीचे उपलक्षणही होणार नाही व त्या लक्षणेच्या साहाय्याने ध्वनीचे वर्णन करण्याचा प्रश्नही उद्भवणार नाही.

पण वृत्तिकारांनी प्रत्यक्षात जे उत्तर दिले आहे, त्यामध्ये लक्षणा हे सर्व प्रकारच्या ध्वनीला आधारभूत असे सामान्य तत्त्व आहे या मताला त्यांनी मान्यता दिल्यासारखे होते व ते वास्तविक बरोबर नाही.

६. याच्याच अधिक स्पष्टीकरणार्थ पाहा, ध्वन्यालोक, काशी आवृत्ति, उद्योत ३, पृ. ४८७ व लोचन, पृ. ४५७–४५८.

ध्वन्यालोकः

किं च

लक्षणेऽन्यैः कृते चास्य पक्षसंसिद्धिरेव नः ॥ १९ ॥

ध्वन्यालोक

आणखी असे की —

आणि दुसऱ्या कोणी या ध्वनीचे लक्षण केले असेल, तर आमचा पक्ष म्हणजे आमचे म्हणणे उत्तमरीत्या सिद्धच झाले म्हणावयाचे ! ॥ १९ ॥

ध्वन्यालोकः

कृतेऽपि वा पूर्वमेवान्यैर्ध्वनिलक्षणे पक्षसंसिद्धिरेव नः, यस्माद्‌ध्वनिरस्तीति नः पक्षः । स च प्रागेव संसिद्ध इत्ययत्नसम्पन्नसमीहितार्थाः संवृत्ताः स्मः । येऽपि सहृदयहृदयसंवेद्यमनाख्येयमेव ध्वनेरात्मानमाम्नासिषुस्तेऽपि न परीक्ष्यवादिनः । यत उक्तया नीत्या वक्ष्यमाणया च ध्वनेः सामान्यविशेषलक्षणे प्रतिपादितेऽपि यद्यनाख्येयत्वं तत्सर्वेषामेव वस्तूनां तत्प्रसक्तम् । यदि पुनर्ध्वनेरतिशयोक्त्यानया काव्यान्तरातिशायि तैः स्वरूपमाख्यायते, तत्तेऽपि युक्ताभिधायिन एव ॥

ध्वन्यालोक

किंवा यापूर्वीच दुसऱ्या कोणी या ध्वनीचे लक्षण केले असले, तरी त्यामुळे आमचेच म्हणणे सिद्ध होईल. कारण 'ध्वनि आहे' हेच आमच्या पक्षाचे म्हणणे होय. ते आमचे म्हणणे आधीच सिद्ध झाले असे असल्यास आमची इष्ट कार्यसिद्धि अनायासेच झाली, असे झाले.

आता जे 'ध्वनिकाव्याचा आत्मा हा केवळ सहृदयांनी मनानेच जाणण्याजोगा व म्हणून शब्दांनी वर्णन न करिता येण्यासारखा' म्हणतात, तेही नीट विवेक करून बोलत नाहीत. कारण आतापर्यंत आम्ही सांगितलेल्या आणि पुढे सांगणार असलेल्या रीतीने (आतापर्यंत) ध्वनीचे सर्वसामान्य आणि (पुढे) विशिष्ट लक्षण करून दाखवल्यावरही ध्वनि जर शब्दांनी वर्णन करिता येण्याजोगा नाही असेच त्यांचे म्हणणे असेल, तर जगातली कोणतीच

वस्तु शब्दांनी वर्णन करिता येण्याजोगी नाही अशी आपत्ति पत्करावी लागेल![२]

मात्र 'ध्वनि अवर्णनीय आहे' असे अतिशयोक्तिपूर्ण विधान करण्यामध्ये त्यांचा हेतू जर ध्वनीचे स्वरूप इतर काव्यप्रकारांहून कितीतरी उत्कृष्ट आहे हे सांगण्याचा असला, तर त्यांचेही म्हणणे अगदी योग्यच होय!

लोचनम्

मा भूद्वाऽपूर्वोन्मीलनं पूर्वोन्मीलितमेवास्माभिः सम्यङ्‌निरूपितं, तथापि को दोष इत्यभिप्रायेणाह– किं चेत्यादि। प्रागेवेति। अस्मत्प्रयत्नादिति शेषः। एवं त्रिप्रकारमभाववादं, भक्त्यन्तर्भूततां च निराकुर्वता अलक्षणीयत्वमेतन्मध्ये निराकृतमेव। अत एव मूलकारिका साक्षात्तन्निराकरणार्था न श्रूयते। वृत्तिकृत्तु निराकृतमपि प्रमेयशय्यापूरणाय कण्ठेन तत्पक्षमनूद्य निराकरोति – येऽपोत्यादिना। उक्तया नीत्या 'यत्रार्थः शब्दो वा' इति सामान्यलक्षणं प्रतिपादितम्। वक्ष्यमाणया तु नीत्या विशेषलक्षणं भविष्यति 'अर्थान्तरे सङ्क्रमितं' इत्यादिना। तत्र प्रथमोद्द्योते ध्वनेः सामान्यलक्षणमेव कारिकाकारेण कृतम्। द्वितीयोद्द्योते कारिकाकारोऽवान्तरविभागं विशेषलक्षणं च विदधदनुवादमुखेन मूलविभागं द्विविधं सूचितवान्। तदाशयानुसारेण तु वृत्तिकृदत्रैवोद्द्योते मूलविभागमवोचत्– 'स च द्विविधः' इति। सर्वेषामिति। लौकिकानां शास्त्रीयाणां चेत्यर्थः। अतिशयोक्त्येति। यथा 'तान्यक्षराणि हृदये किमपि स्फुरन्ति' इतिवदतिशयोक्त्यानाख्येयतोक्ता साररूपतां प्रतिपादयितुमिति दर्शितमिति शिवम् ॥१९॥

**लोचन**

किंवा (आमचेकडून) नवीन काही सांगणे झाले नाही तर न होऊ द्या. पण पूर्वीच्या लोकांना लक्षणेच्या द्वारे आपल्या परीने उलगडलेल्या गोष्टीचेच आम्ही सुस्पष्ट व उत्तम विवरण केले असे होईल, आणि असे झाले तरी त्यात काय बिघडले? या आशयाने वृत्तिकार 'आणखी असे की ...' इ. म्हणतात. 'आधीच'– आम्ही प्रयत्न करण्याच्या आधीच, हे तात्पर्य. याप्रमाणे ध्वनीचे तीन प्रकारचे अभाववादी व 'ध्वनीचा भक्तीतच म्हणजे लक्षणेतच अन्तर्भाव होतो'

असे म्हणणारे लोक यांच्या मतांचे खंडन केल्याने त्या कामातच ' ध्वनीचे स्वरूप शब्दांनी वर्णन करिता येण्यापैकी नाही ' असे म्हणणाऱ्यांचेही खंडन केले गेल्यासारखेच आहे.[3] म्हणूनच (म्हणजे अभाववादी व लक्षणावादी यांच्या खंडनातच अवर्णनीयतावादाचेही खंडन झाले असल्यामुळे) प्रत्यक्ष त्या मताचे (म्हणजे अवर्णनीयतावादाचे) निराकरण करणारी मूलकारिका (म्हणजे वृत्तीला आधारभूत असणारी कारिका) कारिकाग्रंथात आढळत नाही. पण वृत्तिकार मात्र त्या (म्हणजे ' अवर्णनीयता ' या) पक्षाचे अप्रत्यक्षपणे खंडन होऊन गेले असले तरी १ ल्या उद्द्योतातील १ ल्याच कारिकेमधील ' अवर्णनीयता ' वादाच्या उल्लेखास अनुसरून ग्रंथातील विवेचनाची मांडणी व्हावी या हेतूने[4] त्या मताचा प्रत्यक्ष पुनरुच्चार करून त्याचे ' आता जे ... ' इ. शब्दांनी निराकरण करीत आहेत. आतापर्यंत सांगितलेल्या रीतीने म्हणजे ' ज्या ठिकाणी वाच्य अर्थ किंवा वाचक शब्द '... या (१३ व्या) कारिकेने ध्वनीचे सर्वसाधारण स्वरूप सांगितले. पुढे सांगण्यात येणार असलेल्या रीतीने म्हणजे ' अर्थान्तरसंक्रमित ' (उद्द्योत २, कारिका १) इ. कारिकांमध्ये ध्वनीच्या निरनिराळ्या प्रकारांचे विशिष्ट स्वरूप सांगण्यात येईल. त्यांपैकी म्हणजे सामान्य व विशेष लक्षण या दोहोंपैकी कारिकाकाराने १ ल्या उद्द्योतात ध्वनीचे केवळ ' सामान्य ' लक्षणच सांगितले. दुसऱ्या उद्द्योतात कारिकाकारांनी ध्वनीचे अवान्तर प्रकार व त्यांची खास लक्षणे करण्याचे वेळी ध्वनीचे दोन मुख्य प्रकार वाचकांना आधीच माहीत आहेत असे गृहीत धरून त्यांचा उद्द्योत २, कारिका १ व २ यांमध्ये जाता जाता उल्लेख केला आहे. व त्या द्वारे ध्वनि हा मूलतः दोन प्रकारचा आहे असे सुचविले आहे. (कारिकाकाराच्या) त्या अभिप्रायाला अनुसरून वृत्तिकाकाराने याच म्हणजे पहिल्याच उद्द्योतात पृ. २४४ वर ध्वनीचे मूळ दोन प्रकार ' तो (स्थूल मानाने) दोन प्रकारचा '.... या शब्दांनी सांगितले आहेत. ' कोणत्याही वस्तूला '– म्हणजे ' जीवनातील (वस्तूला) किंवा शास्त्रात विवेचिलेल्या वस्तूला ' हा आशय. ' असे अतिशयोक्तिपूर्ण विधान करण्यामध्ये '– म्हणजे उदा. ' ती अक्षरे माझ्या हृदयामध्ये काही अवर्णनीय रीतीने स्फुरत आहेत '[5] या म्हणण्याप्रमाणे ध्वनीचे

श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याच्या उद्देशाने 'ध्वनि खरोखर अवर्णनीय आहे' असे विधान त्यांनी अतिशयोक्तीचा अवलंब करून केले, असे वृत्तिकारांनी दाखविले.[६] असो. सर्वांचे मंगल होवो. ॥१९॥

टीपा

१. उद्द्योत २ व ३ मध्ये.

२. 'ध्वनि अवर्णनीय आहे' या मताचा उल्लेख पुढे उद्द्योत ३, कारिका ४७ वरील वृत्तीत झाला आहे.

३. 'ध्वनीचे स्वरूप वर्णन करिता येत नाही' असे म्हणणाऱ्यांचे खंडन, आतापर्यंत ध्वनिस्वरूप सांगण्यासाठी आनंदवर्धनांनी वेळोवेळी केलेल्या विधानांमुळे आपोआप झाले आहे. त्यांपैकी काही विधाने अशी–

(१) व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाहून सर्वस्वी भिन्न असा असतो. (२) तो वस्तु, अलंकार व रसादि असा तीन प्रकारचा असतो. (३) त्या व्यंग्यार्थामुळेच काव्याला सौंदर्य प्राप्त होते. (४) तो व्यंग्यार्थ प्रधान असताना तोच काव्याचा आत्मा असतो. (५) त्या व्यंग्यार्थाच्या ज्ञानाची सामग्री वाच्यार्थाच्या ज्ञानाच्या सामग्रीहून सर्वथैव भिन्न असते. (६) ध्वनिकाव्याचे अविवक्षितवाच्य व विवक्षितान्यपरवाच्य असे दोन प्रमुख भेद आहेत. इ. इतके सविस्तर वर्णन केल्यावरही 'ध्वनीचे वर्णन करता येत नाही' असे म्हणण्यात काहीच तथ्य उरत नाही.

४. पहिल्या कारिकेमध्ये अभाववाद व भाक्तवाद या मतांबरोबर 'अवर्णनीयतावादा'चाही उल्लेख केलेला होता. त्यामुळे त्या मताबद्दल ग्रंथकारास काय म्हणायचे आहे अशी जिज्ञासा वाचकांच्या मनामध्ये उत्पन्न होणे साहजिक आहे. ती पूर्ण करण्याच्या दृष्टीने ग्रंथाची मांडणी व्हावी, या हेतूने 'शय्या' हा शब्द पूर्वी पृ. १९६ वर येऊन गेला आहे. 'शय्यायोजन' किंवा 'शय्यापूरण' याचा मूळ अर्थ 'झोपण्यापूर्वी बिछान्याची व्यवस्थित मांडणी करणे' असा आहे. 'ग्रंथशय्यापूरण' किंवा 'योजन' म्हणजे 'ग्रंथातील विवेचनाची व्यवस्थित मांडणी' होय.

५. हा संपूर्ण श्लोक पुढीलप्रमाणे आहे–

**निद्रानिमीलितदृशो मदमन्थरायाः,**
**नाप्यर्थवन्ति न च यानि निरर्थकानि ।**
**अद्यापि मे वरतनोर्मधुराणि तस्या–**
**स्तान्यक्षराणि हृदये किमपि स्फुरन्ति ॥**

हा सर्व श्लोक 'कुन्तका' ने 'वक्रोक्तिजीविता' मध्ये (१-४९, 'सुशील कुमार दे' संस्करण) व दशरूपकावर 'धनिका' ने लिहिलेल्या

'अवलोक' नामक टीकेमध्ये (४–२३) उद्धृत केला आहे. अभिनवगुप्तांनी उद्धृत केलेल्या ४ थ्या ओळीतील 'किमपि' (काही अवर्णनीय रीतीने) या शब्दांत अतिशयोक्ति असून तिच्यामुळे त्या अक्षरांमधून व (त्यांच्या व्यंग्य अर्थामधून) कवीला प्रतीत होणारे लोकोत्तर सौंदर्य प्रकट होते.

६. म्हणजे अवर्णनीयतावाद्यांनाही 'ध्वनि अवर्णनीय आहे' असे म्हणताना 'ध्वनीमध्ये निरतिशय सौंदर्य आहे' असेच म्हणावयाचे असेल, तर त्यांचेही म्हणणे बरोबर आहे असे वृत्तिकारांना म्हणावयाचे आहे.

लोचनम्

किं लोचनं विनालोको भाति चन्द्रिकयापि हि ।
तेनाभिनवगुप्तोऽत्र लोचनोन्मीलनं व्यधात् ।।
यदुन्मीलनशक्त्यैव विश्वमुन्मीलति क्षणात् ।
स्वात्मायतनविश्रान्तां तां वन्दे प्रतिभां शिवाम् ।।

इति श्रीमहामाहेश्वराचार्यवर्याभिनवगुप्तोन्मीलिते सहृदयालोक-लोचने ध्वनिसङ्केते प्रथम उद्द्योतः ।

लोचन

चन्द्रिका (१. चांदणे २. ध्वन्यालोकावर अभिनवगुप्तांपूर्वी लिहिली गेलेली 'चन्द्रिका' नामक टीका) असली, तरी तिच्यामुळे 'लोचना' (१. दृष्टी, डोळे २. अभिनवगुप्तांची 'लोचन नामक टीका)-शिवायच 'आलोक' (१. ज्ञान २. ध्वन्यालोक' हा ग्रंथ) प्रकट होईल काय ? म्हणून अभिनवगुप्ताने या ग्रंथावर 'लोचन' टीका लिहून लोकांचे डोळे उघडण्याचे कार्य केले.[१]

(१) जिच्या स्पन्दनशक्तीमुळेच हे सर्व विश्व क्षणात उमलते म्हणजे विकसित होते, त्या, स्वतःच्या आत्मचिंतनात मग्न झालेल्या 'शिवा' नामक (ज्ञानरूप) आदिशक्तीला मी प्रणाम करतो.[२] (२) ज्या 'शिवा' म्हणजे शुभकारक प्रतिभेच्या केवळ स्फुरणाने संपूर्ण काव्यविश्व एका क्षणात फुलते, त्या, कवीच्या अन्तःकरणात वासना-रूपाने सतत वास करणाऱ्या कविप्रतिभेला मी वंदन करितो.[३]

(येथे) श्रीमहामाहेश्वराचार्यवर्य अभिनवगुप्तांनी उमलविलेल्या

' सहृदयालोकलोचना ' मधील '-ध्वनिसंकेत ' नावाचा पहिला उद्द्योत समाप्त झाला.

टीपा

१. तात्पर्य हे की, 'चंद्रिका' टीकेने ध्वन्यालोकाचे पुरेसे स्पष्टीकरण झाले नव्हते, ते कार्य अभिनवगुप्तांनी केले. पाहण्याचे सामर्थ्य नसलेल्या माणसाला एखाद्या सिद्ध पुरुषाने दिव्यदृष्टी द्यावी, तसेच अभिनवगुप्तांचे कार्य आहे. या संदर्भात 'लोचना'च्या प्रारंभीचाच २ रा श्लोक पाहा. पाणिनीच्या कार्याचे महत्त्व वर्णन करणारा पुढील श्लोकही बघण्यासारखा आहे—

अज्ञानान्धस्य लोकस्य ज्ञानाञ्जनशलाकया ।
चक्षुरुन्मीलितं येन, तस्मै पाणिनये नमः ।

'शिवा' नामक आदिशक्ति हे शंकराचेच स्त्रीरूप होय. शंकर जोपर्यंत ध्यानमग्न असतात, तोपर्यंत ते निष्कम्प, निःस्पन्द अशा अवस्थेत असतात. त्या समाधि अवस्थेतून ते खाली उतरले, म्हणजे त्यांची चित्शक्ति स्पन्दन पावू लागते व त्या स्पन्दनामुळेच संपूर्ण विश्व आकार घेते.

३. तुलनेसाठी पाहा, उद्द्योत ३ मधील (काशी आवृत्तीच्या) पृ. ४९८ वरील अपारे काव्यसंसारे......इ. श्लोक.

— पहिला उद्द्योत समाप्त —

## द्वितीय उद्द्योतः

ध्वन्यालोकः

एवमविवक्षितवाच्यविवक्षितान्यपरवाच्यत्वेन ध्वनिर्द्विप्रकारः प्रकाशितः। तत्राविवक्षितवाच्यस्य प्रभेदप्रतिपादनायेदमुच्यते–

अर्थान्तरे सङ्क्रमितमत्यन्तं वा तिरस्कृतम्।
अविवक्षितवाच्यस्य ध्वनेर्वाच्यं द्विधा मतम्॥ १॥

तथाविधाभ्यां च ताभ्यां व्यङ्ग्यस्यैव विशेषः।

ध्वन्यालोक

अशा रीतीने वाच्यार्थ सांगण्याची इच्छा नसणे (अविवक्षितवाच्य) किंवा तो सांगण्याची इच्छा असूनही तो दुसऱ्या (व्यंग्य) अर्थाचा बोध करून देण्याचे साधन असणे (विवक्षितान्यपरवाच्य) ह्यांमुळे ध्वनि दोन प्रकारचा असतो, असे पहिल्या उद्द्योतात स्पष्ट केले. त्या दोन प्रकारांपैकी पहिल्या, म्हणजे वाच्यार्थ सांगण्याची इच्छा नसलेल्या ध्वनीच्या उपप्रकारांचे प्रतिपादन करण्यासाठी असे सांगितले जात आहे की—

वाच्यार्थ विवक्षित नसलेल्या ध्वनीमधील वाच्यार्थ दोन प्रकारचा मानला जातो– (१) 'अर्थान्तरसंक्रमित,' म्हणजे ज्या वाच्यार्थामध्ये (तो कायम राहून त्यात) अधिक अर्थाची भर पडते, असा किंवा (२) 'अत्यन्ततिरस्कृत,' म्हणजे जो वाच्यार्थ सर्वस्वी सोडूनच दिला जातो, असा. ॥ १ ॥

अशा दोन प्रकारच्या वाच्यार्थांमुळे व्यंग्यार्थाचेच (म्हणजे अविवक्षित-वाच्य ध्वनीचेच) दोन प्रकार होतात.

लोचनम्

**या स्मर्यमाणा श्रेयांसि सूते ध्वंसयते रुजः।**
**तामभीष्टफलोदारकल्पवल्लीं स्तुवे शिवाम्॥**

वृत्तिकारः सङ्गतिमुद्द्योतस्य कुर्वाण उपक्रमते – एवमित्यादि। प्रकाशित इति। मया वृत्तिकारेण सतेति भावः। न चैतन्मयोत्सूत्र-मुक्तम्, अपि तु कारिकाकाराभिप्रायेणेत्याह–तत्रेति। तत्र द्विप्रकार–प्रकाशने वृत्तिकारकृते यन्निमित्तं बीजभूतमिति संबन्धः। यदि वा तत्रेति पूर्वशेषः। तत्र प्रथमोद्द्योते वृत्तिकारेण प्रकाशितः अविवक्षितवाच्यस्य यः प्रभेदोऽवान्तरप्रकारस्तत्प्रतिपादनायेदमुच्यते। तदवान्तरभेदप्रति-पादनद्वारेणैव चानुवादद्वारेणाविवक्षितवाच्यस्य यः प्रभेदो विवक्षितान्य-परवाच्यात्प्रभिन्नत्वं तत्प्रतिपादनायेदमुच्यते। भवति मूलतो द्विभेदत्वं कारिकाकारस्यापि सम्मतमेवेति भावः। सङ्क्रमितमिति णिचा व्यञ्जनाव्यापारे यः सहकारिवर्गः तस्यायं प्रभाव इत्युक्तं तिरस्कृतशब्देन च। येन वाच्येनाविवक्षितेन सताऽविवक्षितवाच्यो ध्वनिर्व्यपदिश्यते तद्वाच्यं द्विधेति संबन्धः। योऽर्थः उपपद्यमानोऽपि तावतैवानुपयोगाद्धर्मा-न्तरसंवलनयान्यतामिव गतो लक्ष्यमाणोऽनुगतधर्मी सूत्रन्यायेनास्ते स रूपान्तरपरिणत उक्तः। यस्त्वनुपपद्यमान उपायतामात्रेणार्थान्तर-प्रतिपत्तिं कृत्वा पलायत इव स तिरस्कृत इति। ननु व्यङ्ग्यात्मनो यदा ध्वनेर्भेदो निरूप्यते तदा वाच्यस्य द्विधेति भेदकथनं न सङ्गत-मित्याशङ्क्याह–तथाविधाभ्यां चेति। चो यस्मादर्थे। व्यञ्जकवैचित्र्याद्धि युक्तं व्यङ्ग्यवैचित्र्यमिति भावः। व्यञ्जके त्वर्थे यदि ध्वनिशब्दस्तदा न कश्चिद्दोष इति भावः।

लोचन

'शिवा' नामक आदिशक्तीचे मी स्तवन करितो. तिची आठवण करिताक्षणी ती कल्याणप्रद गोष्टी निर्माण करिते व दुःखे नष्ट करिते. ती म्हणजे हवी असलेली कोणतीही फळे विपुलतेने पुरविणारी कल्प-लताच !

दुसऱ्या उद्द्योताचा पहिल्या उद्द्योताशी तर्कदृष्ट्या असलेला संबंध स्पष्ट करण्यासाठी वृत्तिकार आपले विवेचन 'अशा रीतीने'– इ. शब्दांनी सुरू करीत आहेत. 'स्पष्ट केले'– माझ्या वृत्तिकार या भूमिकेतून, हे तात्पर्य. आणि हे जे (ध्वनीचे दोन प्रकार) मी पहिल्या उद्द्योतात[1] सांगितले, ते सूत्राच्या (म्हणजे कारिकेच्या) अभिप्रायाला

सोडून नव्हे, तर कारिकाकाराच्या अभिप्रायाला अनुसरूनच आहे,[२] असे वृत्तिकार 'त्या दोन प्रकारांपैकी....' इ. वाक्यात सांगतात. त्या दोन प्रकारांचा वृत्तिकारांनी पहिल्या उद्द्योतात निर्देश केल्यावर (त्यांपैकी पहिल्या प्रकाराचे उपप्रकार[३] करावयास) आधारभूत असलेले जे कारण, (ते आता पहिल्या कारिकेमध्ये सांगितले जात आहे) असा पूर्वीच्या सांगण्याशी आता जे सांगितले जात आहे त्याचा संबंध जोडावा किंवा तत्र या (वृत्तीतल्या) शब्दानंतर 'पूर्वीच्या (म्हणजे पहिल्या) उद्द्योतात' हे शब्द 'शेष' म्हणजे अध्याहृत[४] समजावे. 'त्या ठिकाणी' म्हणजे 'पहिल्या उद्द्योतात' वृत्तिकारांनी अविवक्षितवाच्याच्या ज्या प्रभेदाचे म्हणजे अवान्तरप्रकाराचे उदाहरण दिले[५], त्या अवान्तर प्रकाराचे (व त्याबरोबर अविवक्षितवाच्याच्या दुसऱ्याही अवान्तर-प्रकाराचे) स्वरूप सांगण्यासाठी आता हे सांगितले जात आहे. त्याचे (म्हणजे अविवक्षितवाच्याचे) अवान्तरप्रकार सांगून त्यांद्वारे आणि त्याचा (म्हणजे अविवक्षितवाच्याचा व त्याबरोबर विवक्षितवाच्याचा) जो 'प्रभेद' म्हणजे विवक्षितान्यपरवाच्याहून वेगळेपणा; तो दाखविण्या-साठी आता (कारिका १ व २ मध्ये) पुढीलप्रमाणे सांगितले जात आहे. ध्वनीचे मूळ म्हणजे मुख्य दोन प्रकार कारिकाकारालाही मान्यच आहेत, हा आशय.[६] 'संक्रमित' यातील प्रयोजकाने आणि 'तिरस्कृत' या शब्दाने असे सांगितले गेले आहे की, 'अविवक्षितवाच्य' या ध्वनिप्रकारात लक्षणा, बोलणाऱ्याचा अभिप्राय, इ. जी व्यंजनाव्यापाराची सहकारी कारण आहेत, त्यांचा हा म्हणजे पहिल्या प्रकारात वाच्य अर्थाचे लक्ष्य अर्थामध्ये रूपांतर होणे (म्हणजे मूळ अर्थ कायम राहून त्यात अधिक अर्थाची भर पडणे) आणि दुसऱ्या प्रकारात वाच्य अर्थ पूर्णपणे सोडून दिला जाणे हा परिणाम होय. जो वाच्यार्थ अविवक्षित असल्यामुळे ध्वनिकाव्याच्या त्या विशिष्ट प्रकाराला 'अविवक्षितवाच्य ध्वनि' असे म्हणण्यात येते, तो वाच्यार्थ दोन प्रकारचा असतो, असा पहिल्या कारिकेचा अभिप्राय आहे. ज्या (वाच्य) अर्थाची वाक्यात संगति लागते. पण तेवढ्यानेच काम भागत नसल्याने[७] तो वाच्यार्थ दुसऱ्या विशिष्ट धर्माने युक्त होतो व त्यामुळे पूर्वीच्या आपल्या रूपाहून निराळाच झाल्यासारखा दिसतो. पण माळेतल्या फुलांना दोरा ज्या-

प्रमाणे आधारभूत असतो[८], त्याप्रमाणे निरनिराळ्या धर्मांनाही तो वाच्यार्थ 'धर्मी' म्हणजे आधारभूत वस्तु होऊन राहतो, अशा उदाहरणातील त्या मूळ वाच्यार्थाला 'अर्थान्तरसंक्रमित' म्हणजे 'निराळ्या रूपात परिणत[८]* झालेला' असे म्हटले आहे. पण वाच्यार्थाची ज्या वाक्यात नीट संगति लागतच नसेल, तेथे जो वाच्यार्थ दुसऱ्या म्हणजे लक्ष्य अर्थाचा बोध करून देण्याचे केवल साधन असतो व तो बोध करून दिल्यावर जो स्वतः जणू दूर पळून जातो, तो वाच्यार्थ 'तिरस्कृत' होतो म्हणजे दूर फेकला जातो' असे म्हटले आहे.

लोचन

"पण काय हो, ध्वनीचे स्वरूप तर व्यंग्यार्थ हे आहे! मग त्या ध्वनीचे प्रकार जेव्हा (कारिका १ मध्ये) वर्णिले जात आहेत, तेव्हा 'वाच्यार्थ दोन प्रकारचा असतो' हे सांगणे ध्वनीच्या प्रकारांच्या वर्णनाशी सुसंगत वाटत नाही' अशी शंका कल्पून तिचे उत्तर वृत्तिकार 'अशा दोन प्रकारच्या....' इ. वाक्याने देतात. **तथाविधाभ्यां च....** यातल्या '**च**'चा अर्थ 'कारण' असा घ्यावा. व्यंजक (असलेल्या वाच्य) अर्थातील विविधतेमुळे व्यंग्य अर्थातही विविधता उत्पन्न होणे स्वाभाविक आहे, हे तात्पर्य. पण ('अविवक्षितवाच्य ध्वनि' या संज्ञेतील) 'ध्वनि' या शब्दाचा अर्थ जर ('व्यंग्यार्थ' असा न समजता) 'व्यंजक असलेला वाच्यार्थ' असा मानिला,[९] तर (व्यंजक असलेल्या वाच्य अर्थाचे प्रकार सांगण्यात) काहीही वावगे नाही, हा आशय.

टीपा

१. पाहा, पृ. २४४ व २४५.
२. पाहा, पृ. ३०२ वरील '(कारिकाकाराच्या) त्या अभिप्रायाला अनुसरून' हे, व 'कारिकाकारालाही मान्यच आहेत' हे (लोचनाच्या अनुवादातील पृ. ३०९ वरील शब्द.)
३. 'पहिल्या प्रकाराचे उपप्रकार करावयास' हे शब्द आम्ही 'लोचना'त अध्याहृत समजून त्यांचा अनुवाद वर कंसात दिला आहे. हे शब्द अध्याहृत न समजल्यास अभिनवगुप्तांचे हे विवरण वृत्तीतल्या आशयाशी सुसंगत होणार नाही. कारण वृत्तीमध्ये 'अविवक्षितवाच्याच्या उपप्रकारांचे प्रतिपादन करण्यासाठी' असे शब्द आहेत. तेव्हा **निमित्तं बीजभूतम्** याचा अर्थ

अनेकांनी 'त्या दोन प्रकारांना आधारभूत असलेले कारण' असा जो केला आहे, तो वृत्तीतल्या 'अविवक्षितवाच्याच्या दोन उपप्रकारांचे प्रतिपादन' याच्याशी विसंगत आहे.

४. एकंदर वाक्याचा अर्थ 'लोचना'तील 'पूर्वशेष' हा बहुव्रीहि समास आहे असे समजून केला आहे. तो षष्ठी तत्पुरुष मानिल्यास या वाक्याचा अर्थ असा करावा— तत्र हा शब्द (अनुक्त असलेल्या) 'पहिला उद्द्योत' या शब्दांचे 'शेष' म्हणजे विशेषण समजावे.

५. पाहा, पृ. २४४. 'लोचना'तील या वाक्याचे वरील भाषांतर करिताना प्रकाशित: याचा अर्थ उदाहृत: म्हणजे 'उदाहरणाने स्पष्ट केलेला' असा घेतला आहे, कारण पहिल्या उद्द्योतात वृत्तिकारांनी अविवक्षितवाच्याच्या अवान्तरप्रकाराचा निर्देश केलेला नाही, पण एका (म्हणजे अत्यन्ततिरस्कृत-वाच्य' या) अवान्तरप्रकाराचे 'सोन्याची नाणी फुलविणाऱ्या—' हे फक्त उदाहरणच दिले आहे. म्हणून 'पूर्वी म्हणजे १ ल्या उद्द्योतात ज्या अवान्तरप्रकाराचे उदाहरण दिले' असा अनुवाद केला आहे. प्रकाशित: याचा अर्थ उदाहृत: असा न घेता निर्दिष्ट: असा घेतल्यास 'अविवक्षितवाच्यस्य प्रभेद:' येथे 'राहो: शिर:' यातल्याप्रमाणेच षष्ठीचा तादात्म्य असा अर्थ घेऊन 'अविवक्षितवाच्य हाच (ध्वनीचा) अवान्तरप्रकार' असा अर्थ करावा लागेल. 'प्रभेद' याचा येथे अर्थ अभिनवगुप्तांनी 'अवान्तरप्रकार' असा केला आहे व ध्वनीच्या दृष्टीने अविवक्षितवाच्य हा ध्वनीचा अवान्तरप्रकार मानणे शक्य आहे.

६. पाहा, पृ. ३१० वरील २ री टीप.

७. काम भागत नसल्याने म्हणजे विशेष सौंदर्य उत्पन्न होत नसल्याने.

८. 'सूत्रन्याय' म्हणजे 'स्रक्सूत्रन्याय'. याचा निर्देश पुढे २२ व्या कारिकेवरील 'लोचना'त (त्यावरील टीप १४ वी पाहा) येणार आहे. शिवाय अभिनवभारती, अध्याय ६ (रसभावविचार,) कंगले, पृ. ३२१ व ३४५) पाहा. श्रीमद्भगवद्गीता, ७, ७ या श्लोकातही **सूत्रे मणिगणा इव** असा दृष्टांत आहे.

८ अ. 'परिणत' हा शब्द वृत्तिकारांनी पुढे लगेच, 'स्निग्धश्यामल' ... या श्लोकावरील विवरणात उपयोजिलेला आहे.

९. 'ध्वनि' या शब्दाचे जे अनेक अर्थ होऊ शकतात, ते अभिनवगुप्तांनी यापूर्वी अनेक ठिकाणी सांगितले आहेत. त्यांपैकी 'व्यंजक वाच्यार्थ' हाही एक अर्थ आहे. उदा. पाहा, पृ. २३४ वरील '**वाच्योऽपि ध्वनि:**' हे शब्द. तेव्हा त्या अर्थाने 'अविवक्षितवाच्य ध्वनि' या शब्दांमधील 'ध्वनि' हा शब्द घेतला, तर वाच्य अर्थाचे दोन प्रकार सांगण्यामध्ये काहीही अनौचित्य नाही, कारण

वाच्य अर्थाचे दोन प्रकार सांगितल्यामुळे त्यावर आधारित असलेल्या व्यंग्यार्थाचेही दोन प्रकार ओघानेच होतात



ध्वन्यालोकः

तत्रार्थान्तरसङ्क्रमितवाच्यो यथा—
स्निग्धश्यामलकान्तिलिप्तवियतो वेल्लद्बलाका घना
वाताः शीकरिणः पयोदसुहृदामानन्दकेकाः कलाः।
कामं सन्तु दृढं कठोरहृदयो रामोऽस्मि सर्वं सहे
वैदेही तु कथं भविष्यति हहा हा देवि धीरा भव॥

इत्यत्र रामशब्दः। अनेन हि व्यङ्ग्यधर्मान्तरपरिणतः संज्ञी प्रत्याय्यते, न संज्ञिमात्रम्।

ध्वन्यालोक

त्यांपैकी ( ध्वनीच्या ) ज्या प्रकारात वाच्यार्थामध्ये अधिक अर्थाची भर पडते, त्या प्रकाराचे उदाहरण :—

' मेघांनी आपल्या तजेलदार सावळ्या कान्तीचा आकाशाला लेप दिला आहे. बगळ्या त्या मेघांच्या आसपास आनंदाने उडत आहेत. वारे जलकणांनी भारावलेले आहेत, आणि मेघांचे मित्र जे मयूर त्यांनी आनंदाने केलेला केकारव कर्णमधुर वाटत आहे. ही सर्व परिस्थिति असू दे. मला त्याची पर्वा नाही. मी अत्यंत कठोर हृदयाचा ' राम ' सर्व सहन करू शकतो, पण वैदेहीची ( सीतेची ) अवस्था काय होणार ? हाय ! हाय ! हे देवि ! तू धीर धर. '[१]

या उदाहरणातल्या ' राम ' या शब्दाचा वाच्यार्थ अर्थान्तरसंक्रमित आहे. हा शब्द केवळ ' राम नावाची व्यक्ति ' इतक्याच अर्थाचा बोध करून देत नाही, तर ' साक्षात् बोलून न दाखवलेल्या अनेक गुणधर्मांनी[२] युक्त असलेली राम नावाची व्यक्ति ' इतका अर्थ या शब्दामुळे सूचित होतो.

लोचनम्

भेदप्रतिपादकेनैवान्वर्थनाम्ना लक्षणमपि सिद्धमित्यभिप्रायेणोदाहरणमेवाह – अर्थान्तरसङ्क्रमितवाच्यो यथेति। अत्र श्लोके रामशब्द इति सङ्गतिः। स्निग्धया जलसम्बन्धसरसया श्यामलया द्रविडवनितोचितासितवर्णया कान्त्या चाकचक्येन लिप्तमाच्छुरितं

विप्रलम्भो यैः। वेल्लन्त्यो विजृम्भमाणास्तथा चलन्त्यः परभागवशात्प्रहर्षवशाच्च बलाकाः सितपक्षिविशेषा येषु त एवंविधा मेघाः। एवं नभस्तावद्दुरालोकं वर्तते। दिशोऽपि दुःसहाः। यतः सूक्ष्मजलकणोद्गारिणो वाता इति मन्दमन्दत्वमेषामनियतदिगागमनं च बहुवचनेन सूचितम्। तर्हि गुहासु क्वचित्प्रविश्यास्यतामित्यत आह – पयोदानां ये सुहृदस्तेषु च सत्सु ये शोभनहृदया मयूरास्तेषामानन्देन हर्षेण कलाः षड्जसंवादिन्यो मधुराः केकाः शब्दविशेषाः। ताश्च सर्वं पयोदवृत्तान्तं दुस्सहं स्मारयन्ति; स्वयं च दुस्सहा इति भावः। एवमुद्दीपनविभावोद्बोधितविप्रलम्भः परस्पराधिष्ठानत्वाद्रतेः विभावानां साधारणतामभिमन्यमानः इति एव प्रभृति प्रियतमां हृदये निधायैव स्वात्मवृत्तान्तं तावदाह – कामं सन्त्विति। दृढमिति सातिशयम्। कठोरहृदय इति। रामशब्दार्थध्वनिविशेषावकाशदानाय कठोरहृदयपदम्। यथा 'तद्गेहं' इत्युक्तेऽपि 'नतभित्ति' इति। अन्यथा रामपदं दशरथकुलोद्भवत्वकौसल्यास्नेहपात्रत्वबाल्यचरितजानकीलाभादिधर्मान्तरपरिणतमर्थं कथं ध्वनेदिति। अस्मीति। स एवाहं भवामीत्यर्थः। भविष्यतीतिन क्रियासामान्यम्। तेन किं करिष्यतीत्यर्थः। अथ च भवनमेवास्या असम्भाव्यमिति। उक्तप्रकारेण हृदयनिहितां प्रियां स्मरणशब्दविकल्पपरम्परया प्रत्यक्षीभावितां हृदयस्फोटनोन्मुखीं ससंभ्रममाह–हहा हेति। देवीति। युक्तं तव धैर्यमित्यर्थः। अनेनेति। रामशब्देनानुपयुज्यमानार्थेनेति भावः। व्यङ्ग्यं धर्मान्तरं प्रयोजनरूपं राज्यनिर्वासनाद्यसङ्ख्येयम्। तच्चासङ्ख्यत्वादभिधाव्यापारेणाशक्यसमर्पणम्। क्रमेणार्प्यमाणमप्येकधीविषयभावाभावान्न चित्रचर्वणापदमिति न चारुत्वातिशयकृत्। प्रतीयमानं तु तदसङ्ख्यमनुद्भिन्नविशेषत्वेनैव किं किं रूपं न सहत इति चित्रपानकरसापूपगुडमोदकस्थानीयविचित्रचर्वणापदं भवति। यथोक्तम्– 'उक्त्यन्तरेणाशक्यं यत्' इति। एष एव सर्वत्र प्रयोजनस्य प्रतीयमानत्वेनोत्कर्षहेतुर्मन्तव्यः। मात्रग्रहणेन संज्ञी नात्र तिरस्कृत इत्याह।

लोचनम्

(अविवक्षितवाच्य ध्वनीच्या दोन प्रकारांची) नावेच त्या दोन

प्रकारांमधील फरक स्पष्ट करणारी, अतएव अन्वर्थक आहेत. तेव्हा त्या प्रकारांची लक्षणे (त्यांच्या नावांमुळे) सांगितल्यासारखीच आहेत. म्हणून वृत्तिकार (त्यांची लक्षणे करीत न बसता) एकदम 'त्यांपैकी अर्थान्तरसंक्रमितवाच्य प्रकारचे उदाहरण जसे'— असा प्रस्ताव करून (दोहोंचीही क्रमाने) उदाहरणेच देतात. पहिल्या श्लोकातील 'राम हा शब्द (अर्थान्तरसंक्रमितवाच्य प्रकाराचे उदाहरण होय)' अशी वृत्तीतल्या 'जसे' या शब्दाची 'या उदाहरणातील राम हा शब्द' या शब्दांशी संगति लावावी.

स्निग्ध (म्हणजे तजेलदार) म्हणजे (मेघ) पाण्याने निर्भर असल्यामुळे ओलसर असा. **श्यामल** म्हणजे द्रविड स्त्रियांच्या स्वाभाविक कांतीप्रमाणे सावळ्या रंगाच्या कांतीने म्हणजे चकचकीतपणाने लिप्त म्हणजे लेप दिला आहे[3] **वियत्**ला म्हणजे आकाशाला ज्यांनी (असे मेघ). **वेल्लन्त्यः** म्हणजे (स्वतःचा शुभ्र व मेघांचा कृष्ण या दोन वर्णांतील) विरोधामुळे उठावदार दिसणाऱ्या व (मेघसंयोगामुळे) हर्षभरित होऊन इतस्ततः उडत वागडत असणाऱ्या **बलाका** म्हणजे एकप्रकारच्या शुभ्रवर्णाच्या पक्षिणी आहेत ज्यांच्या आसपास,[4] अशा प्रकारचे मेघ. अशा रीतीने आकाशाचे दर्शनसुद्धा मला तापदायक झाले आहे. दिशांकडेही बघणे असह्य झाले आहे. कारण, 'वारे पाण्याच्या सूक्ष्म तुषारांचे फवारे सोडीत आहेत' यामुळे ते वारे अगदी मन्द मन्द वाहात आहेत व वारे या बहुवचनाने ते वारे निरनिराळ्या दिशांनी वाहात येत आहेत, असे सुचविले आहे. 'मग असे असल्यास (त्या वाऱ्यांचा त्रास चुकविण्यासाठी) कोठेतरी गुहेत शिरून बसून राहावे' असा विचार केला, तर (तसे करण्यातील अडचण अशी) सांगितली आहे— जे मेघांचे जिवलग मित्र असून त्या मेघांच्या आकाशातील संचारामुळे ज्यांची अंतःकरणे उल्हसित झाली आहेत त्या मयूरांनी आनन्दाने म्हणजे हर्षाने काढलेले **कल** म्हणजे षड्जाशी जुळणारे[5] कर्णमधुर केकारव म्हणजे विशिष्ट प्रकारचे आवाज. ते आवाज मेघांच्या वर वर्णिलेल्या दुःसह अस्तित्वाची आठवण करून देतात. व ते केकारव स्वतःही दुःसह आहेत हा आशय. अशा रीतीने या सर्व उद्दीपन[6] विभावांमुळे रामाचा विप्रलंभ म्हणजे विरहावस्थेतील रति चेतवली गेली आहे व प्रेम ही नायक व

नायिका या दोघांनाही एकमेकांबद्दल वाटणारी भावना असल्यामुळे हे उद्दीपनविभाव आपल्याप्रमाणे सीतेलाही दुःसह होणार याची खात्री पटल्यामुळे राम आपल्या प्रियतमेची मूर्ति आपल्या मनश्चक्षूपुढे आणून या उद्दीपनविभावांमुळे होणारी आपलीच प्रतिक्रिया प्रथम ३ ऱ्या चरणापासून **कामम्** इ. शब्दांनी सांगण्यास सुरवात करितो. ही सर्व परिस्थिति असू दे. 'दृढ' म्हणजे अत्यंत. **कठोरहृदयाचा** – 'राम' शब्दाच्या अर्थामध्ये जो विशेष प्रकारचा ध्वनि आहे, तो सूचित होण्यास मदत व्हावी म्हणून 'कठोरहृदयाचा' हे विशेषण योजिले आहे. ज्याप्रमाणे 'ते घर' असे शब्द उच्चारल्यावरही 'भिती वाकलेले' असे आणखी शब्द वापरले, त्याप्रमाणेच[७] नाहीतर, (म्हणजे कठोर-हृदयाचा' हे विशेषण वापरले नाही, तर) 'राम' हा शब्द दशरथाच्या कुळात जन्मलेला असणे,' कौसल्येच्या वात्सल्याचा विषय असणे', 'बालपणीच ताटकावध वगैरे महान कृत्ये केलेली असणे,' 'सीतेची प्राप्ति होणे,' इ. वैशिष्टये काय म्हणून सूचित करणार नाही ?[८] **अस्मि**– 'मी तोच (म्हणजे ज्याने आजवर अनंत दुःखे सोसली, तोच) आहे' हा अर्थ. **भविष्यति** हा शब्द सर्वसामान्यपणे कोणत्याही क्रियेचा वाचक आहे. त्यामुळे त्याचा अर्थ '(सीता) काय करील' असा घ्यावा. शिवाय 'ती जिवंत राहणेही अशक्यच' (हाही अर्थ आहेच). वर सांगितलेल्या प्रकारे (मेघ वगैरे उद्दीपकांमुळे प्रियेची होणारी) आठवण, (वैदेही या) शब्दाने तिचा झालेला निर्देश, (ती, जिवंत तरी कशी राहील हा) वितर्क, इ. व्यापारांमुळे (आजवर) हृदयामध्ये असलेल्या प्रियेला रामाने डोळ्यांसमोर जणू प्रत्यक्ष उभी केली, आणि तिचे काळीज आता फुटणार अशी खात्री झाल्यामुळे गोंधळून जाऊन (राम) तिला उद्देशून 'हाय! हाय! हाय!' इ. उद्‌गार काढतो! '(तू रामाची राणी असल्याने) तू या प्रसंगाला धीराने तोंड देणेच योग्य आहे' हा आशय. 'ह्यामुळे' म्हणजे ज्याचा ('केवळ राम ही व्यक्ति' हा) वाच्यार्थ घेऊन कार्यभाग होत नाही' (म्हणजे विशेष सौंदर्यनिष्पत्ति होत नाही) अशा 'राम' ह्या शब्दा-मुळे, असा भावार्थ. ('राम') या शब्दातील लक्षणेचे प्रयोजन असलेले) सुचविलेले म्हणजे साक्षात् बोलून न दाखविलेले अनेक गुणधर्म म्हणजे

राज्यातून हद्दपार केले जाणे इ. अगणित (गुणधर्म). आणि ते अगणित असल्यामुळे अभिधाव्यापाराने त्यांचा बोध एकाच वेळी करून देणे अशक्य आहे. आणि त्या गुणधर्मांचा अभिधाव्यापाराने क्रमाक्रमाने म्हणजे एकामागून एक अशा प्रकाराने बोध करून दिला जाईल असे मानिले, तरी ते (असंख्य धर्म) मिळून एकाच ज्ञानाचा विषय होणारे नसल्यामुळे वाचकास चमत्कृतीचा आस्वाद घावयास कारण होणार नाहीत व त्यामुळे विशेष सौंदर्यही प्रत्ययास येणार नाही. परंतु प्रयोजन असलेल्या त्या असंख्य धर्मांचा जेव्हा व्यंजनेच्या द्वारे बोध होतो, तेव्हा त्या असंख्य गुणधर्मांमधल्या अनेकत्वाची जाणीव स्पष्टपणाने होत नाही व त्या सर्वांचा अनुभव सहृदयाला अविभाज्यपणेच येतो, व सहृदयाच्या प्रतिभेनुसार ते प्रयोजन असंख्य रूपांनी नटू शकते. त्यामुळे ज्याप्रमाणे पन्हे किंवा सार यासारखे लज्जतदार पेय किंवा वडे,[१०] गुळाचे मोदक इ. खाद्य पदार्थांची चव अद्भुत, विविधस्वरूपी असते, त्याप्रमाणे ते व्यंग्य प्रयोजनही विस्मयकारक आस्वादाचा विषय होते. जसे (उद्द्योत १, कारिका १५ मध्ये) म्हटले आहे– 'दुसऱ्या कोणत्याही शब्दाने जे सौंदर्य प्रकाशित होऊ शकत नाही' ...इ.[११] कोणत्याही प्रयोजनमूलक लक्षणायुक्त काव्यामध्ये प्रयोजन हे विशेष महत्त्वाचे असते, याचे कारण ते व्यंग्य असल्यामुळे एकाच वेळी अनेक धर्मांचा बोध करून देते व त्यामुळे ते चमत्कृतिपूर्ण आस्वादाचा विषय होते.

('केवळ राम नावाची व्यक्ति' यात) 'केवळ' हा शब्द योजून 'अर्थान्तरसंक्रमितवाच्य' प्रकाराच्या उदाहरणामध्ये 'संज्ञी' (म्हणजे राम हे नाव धारण करणारी व्यक्ति) या अर्थाचा त्याग करावा लागत नाही (व शिवाय त्यामध्ये अनेक धर्मांची भर पडून 'त्या अनेक धर्मांनी युक्त असलेली राम ही व्यक्ति' हा अर्थ लक्षात येतो) असा वृत्तिकारांचा आशय आहे.

टीपा

१. हनुमन्नाटक, अंक ५, श्लोक ७. हा श्लोक डॉ. राघवन् यांच्या मते यशोवर्मन् यांच्या 'रामाभ्युदय' नाटकातील आहे.

२. हे गुणधर्म म्हणजे राज्यापासून भ्रष्ट केले जाणे, वनात राहणे, पितृनिधन,

अप्रियवियोग इ. मला सहन करावी लागलेली असंख्य दुःखे, की जी सगळी शब्दांनी सरळ वर्णन करणे अशक्य आहेत.

३. 'लेप दिला आहे' म्हणजे त्यांनी आकाशाला झाकून टाकले आहे

४. पाहा, मेघदूतम्, १–९ मधील ३ व ४ हे चरण. बालकवींच्या 'श्रावणमासी हर्ष मानसी' इ. कवितेतील 'बलाकमाला उडता भासे कल्पसुमांची माळचि ते ।' ही ओळही यावेळी आठवते.

५. तुलनार्थ पाहा, रघुवंशम्, १–३९ मधील षड्जसंवादिनीः केकाः हे शब्द.

६. हे उद्दीपनविभाव म्हणजे मेघ, मयूरांचा केकारव व जलकणांनी भारावलेल्या मंद वायुलहरी.

७. पहा, उद्द्योत ३, पृ. ३५६ (काशी आवृत्ति) वरील नतभित्ति या शब्दावरचे 'लोचना'तील विवरण. 'ते घर' यातील 'ते' या शब्दाने मोडकळीस आलेले, उंदरांच्या बिळांनी भरलेले इ. अर्थ सुचविला जातो.

८. राम या व्यक्तीमध्ये गुणधर्म असंख्य होते. (उदा. तो दशरथकुलोद्भव असणे. इ.) त्यांपैकी 'राम' या शब्दाने अमुकच धर्म सूचित होतो, हे कसे समजावे ? तर 'कठोरहृदयाचा' हे विशेषण वापरल्याने 'अत्यंतदुःख-सहिष्णुत्व' हाच धर्म येथे विवक्षित आहे असे समजावयास मदत होते. हा व्यंग्य अर्थ 'मी सर्व सहन करितो' या शब्दांनी वाच्यच आहे अशी कल्पना करू नये, कारण 'सहन करितो' हे वर्तमानकाळाला अनुलक्षून आहे, तर अत्यंतदुःखसहिष्णुत्व हा त्याच्या ठिकाणचा तिन्ही काळी असणारा धर्म आहे (उद्द्योत २ मधील २३ वी कारिका व तीवरील विवरण यात सांगितलेल्या परिस्थितीहून ही परिस्थिति वेगळी आहे.)

९. पाहा पृ. ३११ वरील ७ वी टीप.

१०. हा अनुवाद मूळातल्या समासामध्ये चित्रपानकरस व अपूप असे विभाग करून केला आहे. तो चित्रपानक व रसापूप (म्हणजे पाकातील चिरोटा वगैरेसारखे पक्वान्न) असे विधान करूनही करिता येईल. अशी फोड केल्याने चित्रपानक, रसापूप व गुडमोदक असा या खाद्यपदार्थांच्या नावां-मध्ये एकप्रकारचा समतोलपणाही साधला जातो.

११. ही कारिका अभिनवगुप्तांनी येथे मुद्दाम उद्धृत करण्याचे कारण, व्यंजक शब्द वापरल्यास थोडक्या शब्दांत काम होते. त्याऐवजी त्या अर्थाचे वाचक शब्द वापरावयाचे म्हटल्यास कैक शब्द वापरावे लागतील व त्यांचा अर्थ क्रमाक्रमाने प्रकट झाल्याने व्यंजकत्वामध्ये असलेले सौंदर्य नष्ट होईल. पाहा, उद्द्योत २ (काशी आवृत्ति, पृ. २४०), 'लोचना'तील 'अल्पीभवनं हि सूचनमेव'। हे शब्द अभिधेने वर्णन करण्यामध्ये पाल्हाळ अटळ असून त्यामुळे स्वारस्य कमी होते. तेच व्यंजनेने सुचविल्यास कार्य थोडक्यात

होते व त्यामुळे सौंदर्य खुलते. रामोऽस्मि या उदाहरणात व्यंजनायुक्त अशा 'रामः' या एका शब्दामध्ये असंख्य धर्मांचा बोध सुंदर रीतीने करून देण्याचे जे सामर्थ्य आहे, ते, ते सगळे धर्म वाचक शब्दांनी बोलून दाखविण्यात मुळीच नाही.

ध्वन्यालोकः

यथा च ममैव विषमबाणलीलायाम् –
ताला जाअंति गुणा जाला दे सहिअएहिं घेप्पंति ।
रइकिरणाणुग्गहिआइँ होंति कमलाइँ कमलाइं ॥
( तदा जायन्ते गुणा यदा ते सहृदयैर्गृह्यन्ते ।
रविकिरणानुगृहीतानि भवन्ति कमलानि कमलानि ॥
इति च्छाया ।
इत्यत्र द्वितीयः कमलशब्दः ।

ध्वन्यालोक

त्याचप्रमाणे माझ्याच 'विषमबाणलीले' तले पुढील उदाहरण ( पहा ) :—

'गुण हे तेव्हा (च) गुण होतात की, जेव्हा सहृदय त्यांचे ग्रहण करितात. कमलांवर जेव्हा सूर्यकिरणांचा अनुग्रह होतो, तेव्हाच ती 'कमले' होतात.' यातला दुसरा 'कमले' हा शब्द.'

लोचनम्

यथा चेत्यादि । ताला तदा । जाला यदा । घेप्पंति गृह्यन्ते । अर्थान्तरन्यासमाह--रविकिरणेति । कमलशब्द इति । लक्ष्मीपात्रत्वादिधर्मान्तरशतचित्रतापरिणतं संज्ञिनमाहेत्यर्थः । तेन शुद्धेऽर्थे मुख्ये बाधा, निमित्तं तत्रार्थे तद्धर्मसमवायः । तेन निमित्तेन रामशब्दो धर्मान्तरपरिणतमर्थं लक्षयति व्यङ्ग्यान्यसाधारणान्यशब्दवाच्यानि धर्मान्तराणि । एवं कमलशब्दः । गुणशब्दस्तु संज्ञिमात्रमाहेति तत्र यद्बलात्कैश्चिदारोपितं तदप्रातीतिकम् । अनुपयोगबाधितो ह्यर्थोऽस्य ध्वनेर्विषयो लक्षणा मूलं ह्यस्य ।

यत्तु हृदयदर्पण उक्तम्--'हहा हेति संरम्भार्थोऽयं चमत्कारः' इति। तत्रापि संरम्भः आवेगो विप्रलम्भव्यभिचारीति रसध्वनिस्तावदुपगतः। न च रामशब्दाभिव्यक्तार्थसाहायकेन विना संरम्भोल्लासोऽपि। अहं सहे तस्याः किं वर्तत इत्येवमात्मा हि संरम्भः। कमलपदे च कः संरम्भ इत्यास्तां तावत्। अनुपयोगात्मिका च मुख्यार्थबाधात्रास्तीति लक्षणामूलत्वादविवक्षितवाच्यभेदताभ्योपपत्तैव शुद्धार्थस्याविवक्षणात् न च तिरस्कृतत्वं, धर्मिरूपेण तस्यापि तावत्यनुगमात्। अत एव च परिणतवाच्योयुक्त्या व्यवहृतम्।

लोचन

'आणि त्याचप्रमाणे....' इ.- 'ताला' म्हणजे 'तेव्हा', 'जाला' म्हणजे 'जेव्हा.' 'घेप्पंति' म्हणजे 'ग्रहण केले जातात' (म्हणजेच त्यांचे कौतुक केले जाते). अर्थान्तरन्यास (म्हणजे प्रथमार्धातील सामान्य विधानाचे समर्थन करणारे द्वितीयार्धातील विशेष विधान) 'सूर्यकिरणांचा'.... इ. शब्दांनी सांगण्यात येत आहे. 'कमले हा शब्द' (म्हणजे दुसरा 'कमले' हा शब्द) 'कांतीचे म्हणजे टवटवीतपणाचे निधान असणे' इ. शेकडो आश्चर्यकारक गुणधर्मांनी युक्त अशा कमले या वस्तूचा बोधक आहे, हा भावार्थ.

म्हणून (म्हणजे 'राम' हा शब्द 'राज्यातून हद्दपार केले जाणे इ. अनेक धर्मांनी युक्त असलेली राम ही व्यक्ति' इतक्या अर्थाचा बोधक असल्याने) "केवळ राम ही व्यक्ति हा जो वाच्यार्थ, त्याचा बाध होतो. (बोलणारी व्यक्ति राम ही आहे, हे प्रेक्षकांना माहीत असल्याने तिने 'मी राम आहे, हे सांगण्याची आवश्यकता नाही, म्हणून बाध). त्या वाच्यार्थाच्या ठिकाणी म्हणजे राम या व्यक्तीचे ठिकाणी त्या गुणधर्मांचा असलेला समवायसंबंध हे लक्षणेचे निमित्त होय. त्या निमित्तामुळे रामः हा शब्द 'अनेक गुणधर्मांनी युक्त असलेली राम ही व्यक्ति' हा अर्थ लक्षणेने दाखवितो. शब्दांनी वाच्य होऊ न शकणारे राज्यनिर्वासनादि दुसरे खास गुणधर्म हे व्यंग्य होत. याप्रमाणेच 'कमले' शब्दाच्या बाबतीतही समजावे. 'गुण' हा शब्द मात्र 'गुण' या वाच्य अर्थाचाच बोधक आहे" असे म्हणून वरील

दोन उदाहरणांचे बाबतीत काहींनी स्वतःचेच मत लादले आहे, ते पटण्यासारखे नाही. कारण (या उदाहरणात) अनुपयोगाने बाधित[3] झालेला अर्थ ध्वनीचा विषय होय. लक्षणा हे त्या ध्वनीचे कारण आहे, इतकेच.[4]

परंतु 'हृदयदर्पणा'त जे म्हटले आहे की– "(या श्लोकातील) 'हहा हा' हा उद्‍गार '(मनाची) व्याकुलता' या अर्थाचा असून तो अर्थच[5] चमत्कारजनक आहे." (असे भट्टनायकाचे म्हणणे असले) तरी-सुद्धा संरम्भ म्हणजे आवेग (व्याकुलता) हा विप्रलम्भाचा व्यभिचारि-भाव असल्याने (भट्टनायकाला ध्वनि मान्य नसूनही त्याने) रसध्वनि मानल्यासारखेच झाले आहे! आणि 'राम' शब्दाने सूचित झालेल्या (राज्यातून हद्दपार होणे इ.) अर्थांच्या मदतीशिवाय मनाच्या त्या व्याकुलतेचाही प्रत्यय येणे (आणि त्यानंतर विप्रलंभ शृंगाराचा प्रत्यय येणेही) शक्य नाही. कारण 'मी सहन करू शकतो, पण तिची काय अवस्था होणार ?' हे त्या व्याकुलतेचे स्वरूप आहे. आणि ('मेघांनी आपल्या तजेलदार....' या उदाहरणाच्या बाबतीत हहा हा या उद्‍गारांमुळे रसप्रतीतीचा चमत्कार उत्पन्न होतो असे भट्टनायक म्हणू तरी शकला, पण) 'कमले' या शब्दात व्याकुलतेचा किंवा तसल्या कोणत्याही भावाचा कोठला संभव ? (आणि रसप्रतीतीचा चमत्कार तरी कोठून ? म्हणून तूर्त हा मुद्दा येथेच राहू द्या. **रामोऽस्मि** या उदा-हरणात **राम** शब्दाच्या मुख्य म्हणजे वाच्य अर्थाचा येथे '(सौंदर्य निर्माण करण्याचे बाबतीत) उपयोग नसणे' या स्वरूपाचा बाध होतो व म्हणून **राम** या शब्दात लक्षणा असल्यामुळे हे अविवक्षितवाच्य ध्वनीच्या ('अर्थान्तरसंक्रमित' या) प्रकाराचे उदाहरण म्हटले आहे, ते योग्यच आहे; कारण येथे **राम** शब्दाचा निव्वळ वाच्यार्थ अभिप्रेत नाही. आणि येथे वाच्यार्थ जो 'राम ही व्यक्ति', त्या अर्थाचा त्यागही केला जात नाही, कारण लक्ष्य व व्यंग्य अर्थांमध्ये 'राम ही व्यक्ति' हा अर्थ अंतर्भूत आहेच.[6] यामुळेच आम्ही 'परिणत' या शब्दाचा उपयोग केला आहे.[7]

टीपा

१. 'विषमबाणलीला' हे आनंदवर्धनांनी प्राकृत भाषेत लिहिलेल्या एका काव्याचे नाव आहे.

२. 'तेव्हाच ती कमले होतात' यातल्या 'कमले' शब्दाचा अर्थ 'कांतीचे निधान' (म्हणजे चमकदार व टवटवीत असणे, विकसित व सुगंधमय असणे) इ. शेकडो गुणधर्मांची भर पडलेली कमले ही वस्तु.

३. **बाधित** असा 'लोचना'त पाठ आहे. 'ध्वनीचा विषय' या शब्दांचा अर्थ 'व्यंग्यार्थ' असा घेतला, तर **बाधित** याऐवजी **बोधित** हा पाठ अधिक योग्य होईल. मूळात वस्तुतः **बोधित** असे असून लेखनिकाच्या हस्तदोषामुळे 'बाधित' असे लिहिले गेले असणे शक्य आहे. मग 'अनुपयोगाने बोधित' म्हणजे वाच्यार्थ उपयोगी न पडल्याने अभिप्रेत असलेला जो एकूण अर्थ बोधित होतो तो, असा अर्थ होईल.

'बाधित' असा पाठ घेऊन वाक्याचा अर्थ लावावयाचा म्हटल्यास 'ध्वनीचा विषय' याचा अर्थ व्यंग्यार्थाचा आधार, व्यंग्यार्थाचा बोधक म्हणजेच 'व्यंजक (असणारा वाच्यार्थ)' असा करावा लागेल. मग 'वाच्यार्थ बाधित झाल्याने तो व्यंग्यार्थाचा व्यंजक होतो' असा एकूण अर्थ होईल.

४. ध्वनीच्या 'अर्थान्तरसंक्रमितवाच्य' प्रकाराच्या (म्हणजे 'राम' शब्द व दुसरा 'कमले' हा शब्द यांसारख्या) उदाहरणांचे बाबतीत अभिनवगुप्तांनी पूर्वपक्षाचे मत नाकारून स्वतःचे ज मत सांगितले आहे, त्याचा व या विषयावरील एकंदर विवेचनाचा योग्य अर्थ समजावून घेणे अवश्य आहे. **रामोऽस्मि, कमलानि कमलानि** अशा उदाहरणात ज्या शब्दात अर्थान्तरसंक्रमितवाच्य ध्वनि असतो, त्या शब्दांचा वाच्यार्थ स्पष्ट असतो. पण लक्ष्यार्थ व व्यंग्यार्थ हे स्पष्टपणे वेगळे दाखविणे कित्येक उदाहरणांत कठीणच होते. (म्हणूनच काही विरोधक ध्वनीचा अंतर्भाव लक्षणेमध्येच करितात). **रामः** याचा वाच्यार्थ 'राम ही व्यक्ति', लक्ष्यार्थ 'पुष्कळ दुःखे सहन करू शकणारा राम.' कारण नुसता वाच्यार्थ घेतल्यास बोलणारी व्यक्ति 'राम' आहे हे प्रेक्षकांना माहीत असल्यामुळे पुनरुक्ति होते व त्यामुळे विशेष उपयुक्त असे कार्यही होत नाही, म्हणून तो वाच्यार्थ बाधित होतो. 'पुष्कळ दुःखे सहन करू शकणारा राम' असा लक्ष्यार्थ घेतला, म्हणजे वाक्याचा अर्थ नीट लागतो. 'मी सर्व सहन करितो' या विधानाची त्या लक्ष्यार्थाच्या साहाय्याने उपपत्ति लागते. पण मग व्यंग्यार्थ कोणता? तर 'राज्यातून हद्दपार केले जाणे, इ. असंख्य संकटे. (अभिनवगुप्तही म्हणतात **व्यङ्ग्यं धर्मान्तरं प्रयोजनरूपं राज्यनिर्वासनादि असंख्येयम्।**) ती सगळी संकटे शब्दांनी वाच्य केली, तर त्यांचा बोध क्रमाक्रमाने होईल

व त्यामुळे सौंदर्यनिर्मिति होणार नाही. पण रामः या शब्दाने ती सूचित केल्यास त्यांचा बोध एका वेळी होतो व त्यांत सौंदर्यही प्रत्ययास येते. पण शेवटी रामोऽस्मि याचा एकूण अर्थ मी 'राज्यातून हद्दपार केले जाणे इ. अनेक संकटे सहन केलेली राम ही व्यक्ति आहे' असाच घ्यावा लागतो. यात लक्ष्यार्थही आहे व व्यंग्यार्थही आहे. पण तरीही या एकूण अर्थाला व्यंग्यार्थच म्हणावयाचे, कारण त्यातला व्यंग्यार्थ हाच सुंदर अतएव मुख्य आहे. म्हणून प्राधान्येन व्यपदेशाः भवन्ति या न्यायाने त्या एकूण अर्थाला व्यंग्यार्थच म्हणावयाचे.

'गंगालहरी' या प्रसिद्ध काव्याच्या ४७ व्या श्लोकातली ४ थी ओळ पाहा; तिचे मराठी भाषांतर असे आहे —

असे घ्यायाचा हा उचलुनि 'जगन्नाथ' पदरी ! ॥ ( प्रा. वीरकरकृत 'अनुवादमंजूषा', पृ. ७१)

यातला 'जगन्नाथ' हा शब्द घ्या. हे 'अर्थान्तरसंक्रमितवाच्य' ध्वनीचेच उदाहरण आहे. येथे 'जगन्नाथ' याचा अर्थ केवळ जगन्नाथ नावाचा कवि किंवा पंडित असा नाही, तर 'ती ती अगणित पापे केलेली, अत एव इतरांहून अधिक पतित असलेली जगन्नाथ नावाची व्यक्ति' इतका आहे. ती अगणित पापे शब्दांनी सरळ सांगण्याच्या पलीकडे आहेत. आणखी एक सुप्रसिद्ध उदाहरण म्हणजे "काकः काकः पिकः पिकः ।" हा एका सुभाषिताचा चरण. या ओळीतल्या दुसऱ्या काकः शब्दाचा व्यंग्यार्थ 'अतिकर्कश स्वर असलेला कावळा' व दुसऱ्या पिकः चा व्यंग्यार्थ 'अतिमधुर आलाप करणारा कोकिळ.'

५. म्हणजे भट्टनायकाच्या मते 'राम' या शब्दावरील लक्षणेच्या मागचे तथाकथित व्यंग्य प्रयोजन हे चमत्कारकारी नसून (हहा हा या उद्गारवाचकांचा) 'संरम्भ' हाच अर्थ चमत्कृतिजनक आहे. अशाच प्रकारचे मत भट्टनायकाने 'हे धार्मिका !' . व 'सासूबाई येथे' .... या गाथांचे विवरण करिताना मांडले असल्याचे अभिनवगुप्तांनी पृ. ९४ व पृ. १०९-११० वर म्हटले आहे. या सगळ्याचे कारण अर्थात् भट्टनायक (रस मानितो, पण) वस्तुध्वनि मानीत नाही, हे होय. त्याच्या मते या तीनही उदाहरणांमध्ये विशिष्ट शब्दांमुळेच रसप्रतीति होते, 'व्यंजने' मुळे होत नाही.

६. पाहा, पृ. ३२१ वरील टीप ४ थी. 'पुष्कळ दुःखे सहन करू शकणारा राम' या लक्ष्यार्थामध्ये व 'राज्यातून हद्दपार केले जाणे इ. ती ती असंख्य दुःखे ज्यावर कोसळली होती असा राम' या व्यंग्यार्थातही राम ही व्यक्ति अंतर्भूत झालेली आहेच.

७. पाहा, लोचन, पृ. ३०८, रूपान्तरपरिणतः उक्त ; पृ. ३१३, धर्मान्तर-

परिणतमर्थं कथं न ध्वनेत्; पृ. ३१२, वृत्ति. व्यङ्ग्यधर्मान्तरपरिणतः संज्ञी, वगैरे. या प्रकारात धर्मान्तरपरिणतः असे म्हटल्याने वाच्यार्थ ( धर्मी ) लक्ष्य व व्यंग्य अर्थांमध्ये कायम राहून बुद्धिगत होतो ( टाकून दिला जात नाही ) हे स्पष्ट होते व 'अर्थान्तरसंक्रमितवाच्य' या संज्ञेचा अर्थही तोच आहे.

ध्वन्यालोकः

अत्यन्ततिरस्कृतवाच्यो यथादिकवेर्वाल्मीकेः—
रविसंक्रान्तसौभाग्यस्तुषारावृतमण्डलः ।
निःश्वासान्ध इवादर्शश्चन्द्रमा न प्रकाशते ॥ इति ॥
अत्रान्धशब्दः ।
गअणं च मत्तमेहं धारालुलिअज्जुणाइँ अ वणाइं ।
णिरहङ्कारमिअंका हरंति णीलाउ नि णिसाओ ॥
अत्र मत्तनिरहङ्कारशब्दौ ।

ध्वन्यालोक

ज्यातला वाच्यार्थ पूर्णपणे दृष्टीआड केलेला असतो, अशा प्रकाराचे उदाहरण आदिकवि वाल्मीकींचे पुढील पद्य आहे.[1] :—

" चन्द्राने आपले सर्व वैभव सूर्याच्या हवाली केले आहे. त्याचे बिम्ब दवबिंदूंनी झाकळलेले आहे. निःश्वासांनी आंधळ्या झालेल्या आरशाप्रमाणे तो चन्द्र तेजस्वी ( दिसत ) नाही. '

या उदाहरणातला ' आंधळा ' हा शब्द.[2]

" आकाशात ( धिंगाणा घालणारे ) मत्त मेघ, वनात मुसळधार पावसाने झोडपले जाणारे अर्जुनवृक्ष आणि अहंकार गळून गेलेला चन्द्र असलेल्या रात्री काळ्या असल्या, तरी मन वेधून घेतात. "[3]

यातले ' मत्त ' आणि ' अहंकार गळून गेलेला ' हे शब्द.[4]

लोचनम्

आदिकवेरिति ध्वनेर्लक्ष्यप्रसिद्धतामाह । रवीति । हेमन्तवर्णने पञ्चवट्यां रामस्योक्तिरियम् । अन्ध इति चोपहतदृष्टिः । जात्यन्धस्यापि

गर्भे दृष्ट्युपघातात्। अन्धोऽयं पुरोऽपि न पश्यतीत्यत्र तिरस्कारोऽन्धार्थस्य न त्वत्यन्तम्। इह त्वादर्शस्यान्धत्वमारोप्यमाणमपि न सह्यमिति। अन्धशब्दोऽत्र पदार्थस्फुटीकरणाशक्तत्वं नष्टदृष्टिगतं निमित्तीकृत्यादर्शे लक्षणया प्रतिपादयति। असाधारणविच्छायत्वानुपयोगित्वादिधर्मजातमसंख्यं प्रयोजनं व्यनक्ति। भट्टनायकेन तु यदुक्तम्– 'इवशब्दयोगाद्गौणताप्यत्र न काचित्' इति, तच्छ्लोकार्थमपरामृश्य। आदर्शचन्द्रमसोर्हि सादृश्यमिवशब्दो द्योतयति। निःश्वासान्ध इति चादर्शविशेषणम्। इवशब्दस्यान्धार्थेन योजने आदर्शश्चन्द्रमा इत्युदाहरणं भवेत्। योजनं चैतदिवशब्दस्य क्लिष्टम्। न च निःश्वासेनान्ध इवादर्शः स इव चन्द्र इति कल्पना युक्ता। जैमिनीयसूत्रे ह्येवं योज्यते न काव्येऽपीत्यलम्। गअणं इति।

गगनं च मत्तमेघं धारालुलितार्जुनानि च वनानि।
निरहङ्कारमृगाङ्का हरन्ति नीला अपि निशाः॥

इति च्छाया। चशब्दोऽपिशब्दार्थे। गगनं मत्तमेघमपि न केवलं तारकितम्। धारालुलितार्जुनवृक्षाण्यपि वनानि न केवलं मलयमारुतान्दोलितसहकाराणि। निरहङ्कारमृगाङ्का नीला अपि निशा न केवलं सितकरकरधवलिताः। हरन्ति उत्सुकयन्तीत्यर्थः। मत्तशब्देन सर्वथैवेहासम्भवत्स्वार्थेन बाधितमद्योपयोगक्षीबात्मकमुख्यार्थेन सादृश्यान्मेघाल्ँलक्षयताऽसमञ्जसकारित्वदुर्निवारत्वादिधर्मसहस्रं ध्वन्यते। निरहङ्कारशब्देनापि चन्द्रं लक्षयता तत्पारतन्त्र्यविच्छायत्वोज्जिगमिषारूपजिगीषात्यागप्रभृतिः॥ १॥

लोचन

'आदिकवीचे' या शब्दाचा (मुद्दाम) उल्लेख करून 'ध्वनि हा काव्यांमध्ये अनादिकालापासून वापरात आहे' असे वृत्तिकार सुचवीत आहेत. 'सूर्याने'.... इ.– हेमंत ऋतूचे वर्णन करिताना पंचवटीमध्ये असलेल्या रामाने म्हटलेले हे वाक्य आहे. अंध या शब्दाचा वाच्यार्थ 'ज्याच्या दृष्टीला अपाय झालेला आहे असा' हा होय. कारण जन्मांध असणाऱ्याच्या दृष्टीलाही गर्भावस्थेमध्ये अपाय

झालेलाच असतो. इतरवेळी (म्हणजे डोळस माणसाच्या बाबतीत एखादे वेळी) 'हा आंधळा आहे, याला समोरचेही दिसत नाही, अशा-सारख्या उदाहरणात 'आंधळा' या शब्दाचा वाच्यार्थ टाकावा लागतो (कारण तो खराखुरा आंधळा नसतो), पण तो (वाच्यार्थ) पूर्णपणे टाकला जात नाही (कारण तेवढ्या वेळेपुरताच तो मनुष्य आपल्या नेत्रेंद्रियाचा योग्य वापर करीत नसल्याने त्याचे त्यावेळचे वर्णन आंधळ्यासारखेच असते). पण प्रस्तुत उदाहरणात आंधळेपणा हा धर्म आरशावर लादावयाचा म्हटले तरी ते सहन होणे शक्य नाही. कारण आरशाला डोळे नसल्याने तो आंधळा असणे अशक्य आहे. म्हणून या उदहारणात आंधळा हा शब्द, पदार्थ स्पष्टपणे ग्रहण कर-ण्यास[५] असमर्थ असणे हे आंधळा व आरसा यांमधील सादृश्य लक्षात घेऊन '(तशा गुणधर्मांनी युक्त असलेला) आरसा' या अर्थाचा बोध लक्षणेने करून देतो आणि या लक्षणेमागील व्यंग्य प्रयोजन 'कमालीचा फिकट झालेला, सर्वथैव निरुपयोगी असलेला, इ. असंख्य धर्मांचा बोध करून देणे' हे आहे.

पण भट्टनायकाने म्हटले आहे की, या श्लोकात (इव हा शब्द उत्प्रेक्षावाचक[६] असल्याने यात) कोठेही लक्षणाही नाही. हे त्याने प्रस्तुत श्लोकाच्या अर्थाचा नीट विचार न करिताच म्हटलेले आहे. कारण इव शब्द आरसा आणि चन्द्र यांच्या 'सादृश्या'चा[७] बोध करून देतो. आता 'निःश्वासांनी अंध झालेला' हे तर आरशाचे विशेषण आहे. इव शब्दाचा संबंध जर अंध शब्दाच्या अर्थाशी जोडला, तर 'चन्द्र आरसा आहे' हे (अत्यंत-तिरस्कृतवाच्याचे) उदाहरण होईल.[८] आणि इव शब्दाचा असा अन्वय क्लिष्टही आहे.[९] आणि 'आरसा निःश्वासांमुळे जणू काही अंध झालेला आहे आणि चन्द्र त्या आरशाप्रमाणे आहे' अशी कल्पनाही योग्य दिसत नाही,[१०] कारण असा (दोन प्रकारांनी) अन्वय जैमिनिसूत्रात केला जातो, तो काव्यात-तही केला जात नाही. बस्स, याहून अधिक विवरण नको.

'गअणं' इ. —

गगनं च मत्तमेघं धारालुलितार्जुनानि च वनानि ।
निरहङ्कारमृगाङ्का हरन्ति नीला अपि निशाः ॥

अशी या प्राकृत पद्याची संस्कृत छाया. यातील च हा शब्द अपि (सुद्धा) या अर्थी वापरला आहे. (वसंतादि ऋतूंमध्ये) आकाश हे तारकांकित असतानाच नव्हे, तर ते वर्षा ऋतूत मत्त मेघांनी व्यापलेले असतानाही ( ते मनुष्यमात्राला उत्कंठित करिते). वनांमधील आम्र-वृक्ष वसंतऋतूत मलयपर्वताकडील वाऱ्यामुळे दोलायमान होत असता-नाच नव्हे, तर त्या वनातील अर्जुन वृक्ष वर्षाऋतूमध्ये जलधारांनी झोडपले जात असतानाही (मनाला उत्कंठित करितात). रात्री (वसंतादि-ऋतूंमध्ये) चंद्रकिरणांनी उजळलेल्या असतानाच नव्हे, तर पावसाळयात चंद्राचा अहंकार गळून गेल्याने त्या रात्री कृष्णवर्ण झालेल्या असतानाही (मन हरण करितात). ' हरण करितात ' याचा अर्थ ' उत्कंठित करून सोडतात. '

'मत्त' या विशेषणाचा वाच्यार्थ या उदाहरणात केव्हाच संभवनीय नाही. ' मद्यपानाने बेहोष झालेले ' हा जो मत्त शब्दाचा वाच्यार्थ, त्याचा येथे बाध होतो. व म्हणून सादृश्य या संबंधाच्या आधारावर तो म्हणजे ' मत्त ' हा शब्द ' मेघ ' हा अर्थ लक्षणेने दाखवितो[११] व त्या मत्त शब्दामुळे अविचारीपणाने वागणे, अनावर असणे इ. हजारो धर्म लक्षणेचे प्रयोजन म्हणून ध्वनित होतात. ' गर्वरहित ' हे विशेषणही (सादृश्यसंबंधामुळे) (गर्वरहित व्यक्तीसारखा) ' चंद्र ' हा अर्थ दाखविते आणि मग त्या चंद्राचे मेघांवर सर्वस्वी अवलंबून असणे, फिकट झालेले असणे, मेघांवर मात करून विजयी होण्याची महत्त्वाकांक्षा सोडून दिलेली असणे इ. धर्म प्रयोजन म्हणून व्यंजनेने ध्वनित होतात.

टीपा

१. रामायण, अरण्यकांड, १६–१३
२. ' आंधळा ' हे विशेषण निर्जीव आरशाला लावणे अशक्य आहे. ' पाहू न शकणारा ' हा त्याचा वाच्यार्थ टाकून द्यावा लागतो. ' कोणत्याही पदार्थाचे प्रतिबिम्ब ज्यात स्पष्टपणे उमटत नाही असा ' हा लक्ष्यार्थ घ्यायचा. तरीही ' आंधळा ' हा शब्द वापरण्यामागील ( व्यङ्ग्य) प्रयोजन ' तो कमालीचा मलिन झालेला असणे, निरुपयोगी असणे इ. अनेक गुणधर्मांनी युक्त आहे ' हे प्रत्ययाला आणणे, हे होय.
३. गउडवहो, ४०६.

४. मेघ व चन्द्र हे निर्जीव असल्याने ते अनुक्रमे 'मत्त' व 'निरहंकार' असणे संभवत नाही. या वाच्यार्थांचा त्यागच करून मग अनुक्रमे 'मर्यादा' सुट-लेले व 'फिकट, कान्तिहीन' असा लक्ष्यार्थ घ्यायचा. अशा लक्ष्यार्थाने हेच शब्द वापरण्यामागील व्यङ्ग्य प्रयोजने अनुक्रमे 'अनुचित कर्मे करणे, अनादर असणे' व चन्द्राचा परतंत्रपणा म्हणजे तो सर्वस्वी मेघांच्या ताब्यात असणे, त्याचा फिकटपणा इ. अनेक धर्म प्रत्ययास आणून देणे, ही होत.

५. आंधळ्याच्या बाबतीत 'ग्रहण करण्यास' म्हणजे ज्ञान होण्यास व आरशाच्या बाबतीत 'प्रतिबिंब उमटविण्यास' असा अर्थ.

६. इव हा शब्द उपमेचा वाचक व उत्प्रेक्षेचा वाचक अशा दोन्ही प्रकारचा असू शकतो. आनन्दवर्धनांनी वरील श्लोकात इव हा शब्द उपमावाचक घेतला असल्यामुळे 'निःश्वासांनी अन्ध झालेल्या आरशाप्रमाणे चन्द्र तेजस्वी दिसत नाही' असा एकूण वाक्याचा अर्थ होतो. भट्टनायकाने मात्र इव शब्द उत्प्रेक्षावाचक घेऊन त्याचा संबंध अंध या विशेषणाकडे जोडला आहे. त्या-मुळे वाक्याचा अर्थ 'निःश्वासांनी जणूकाही आंधळा झालेला आरसाच असा 'चन्द्र', असा होतो. भट्टनायकाच्या मते इव शब्द बोलूनचालून 'उत्प्रेक्षे'चा वाचक असल्यामुळे 'अन्ध' या शब्दात लक्षणा मानण्याची जरूर पडत नाही, म्हणून **नात्र गौणता काचित्** । असे त्याचे म्हणणे.

७. म्हणजे प्रस्तुत श्लोकातील **इव** हा शब्द उपमावाचक आहे, उत्प्रेक्षावाचक नाही, असे अभिनवगुप्तांचे म्हणणे.

८. आनन्दवर्धनांनी 'अन्ध' हा शब्द अत्यंततिरस्कृतवाच्याचे उदाहरण आहे असे वृत्तीत स्पष्ट म्हटले आहे. पण भट्टनायकाचे मत घेतल्यास 'चन्द्र आरसा आहे' यातील आरसा हा शब्द लाक्षणिक होऊन अत्यंततिरस्कृतवाच्याचे उदाहरण होईल. 'अन्ध' हा शब्द ( तसे उदाहरण ) होणार नाही.

९. **भट्टनायकाच्या** मतानुसार 'चंद्र हा आरसाच' ही कल्पना क्लिष्ट वाटते याचे कारण 'चंद्र हा आरसा' असे म्हणणे प्रचारातही नाही व तशी कल्पना करण्यात येथे काही स्वारस्यही दिसत नाही.

१०. कारण अशी कल्पना करण्यात **इव** शब्दाचे 'जणू काही' व 'प्रमाणे' असे दोन वेगळे अर्थ घेऊन दोन वेळा अन्वय करावा लागतो.

११. वास्तविक येथे 'मत्त' याचा लक्ष्यार्थ 'मत्तसदृश ( मेघ ) असा घ्यावयास पाहिजे, पण तसे स्पष्टपणे न म्हणता **अभिनवगुप्तांनी** 'मेघ' हाच लक्ष्यार्थ असे म्हटलेले दिसते. वर 'अंध' शब्दाचे बाबतीतही त्यांनी असेच करून 'अंध' शब्दाचा लक्ष्यार्थ 'आरसा' असे म्हटले आहे.

ध्वन्यालोकः

असंलक्ष्यक्रमोद्द्योतः क्रमेण द्योतितः परः।
विवक्षिताभिधेयस्य ध्वनेरात्मा द्विधा मतः॥ २॥

मुख्यतया प्रकाशमानो व्यङ्ग्योऽर्थो ध्वनेरात्मा। स च वाच्यार्थापेक्षया कश्चिदलक्ष्यक्रमतया प्रकाशते, कश्चित्क्रमेणेति द्विधा मतः।

ध्वन्यालोक

ज्यातील वाच्यार्थ विवक्षित असतो, अशा ध्वनीचा आत्मा ( म्हणजे प्रधान असणारा व्यङ्ग्यार्थ ) दोन प्रकारचा मानलेला आहे; जो ( प्रधान असणारा व्यङ्ग्यार्थ ) प्रकाशित होताना त्याचा क्रम ( म्हणजे वाच्यार्थ व त्याचे पौर्वापर्य ) नीट लक्षात येत नाही असा एक व ज्याच्या बाबतीत तो ( क्रम ) लक्षात येतो, असा दुसरा. ॥ २ ॥

मुख्यत्वाने प्रकाशित होणारा व्यङ्ग्यार्थ हा ध्वनीचा आत्मा होय. तो काही ठिकाणी वाच्यार्थाच्या दृष्टीने असलेला त्याचा क्रम नीट लक्षात न येता प्रकाशित होतो, तर काही ठिकाणी क्रमासह, म्हणून तो दोन प्रकारचा मानलेल आहे.

लोचनम्

**अविवक्षितवाच्यस्य प्रभिन्नत्वमिति यदुक्तं तत्कुतः? न हि स्वरूपादेव भेदो भवतीत्याशङ्क्य विवक्षितवाच्यादेवास्य भेदो भवति, विवक्षातदभावयोर्विरोधादित्यभिप्रायेणाह– असंलक्ष्येति। सम्यङ् न लक्षयितुं शक्यः क्रमो यस्य तादृश उद्द्योत उद्द्योतनव्यापारोऽस्येति बहुव्रीहिः। ध्वनिशब्दसांनिध्याद्विवक्षिताभिधेयत्वेनान्यपरत्वमत्राक्षिप्त-मिति स्वकण्ठेन नोक्तम्। ध्वनेरिति। व्यङ्ग्यस्येत्यर्थः। आत्मेति। पूर्व-श्लोकेन व्यङ्ग्यस्य वाच्यमुखेन भेद उक्तः। इदानीं तु द्योतनव्यापार-मुखेन द्योत्यस्य स्वात्मनिष्ठ एवेत्यर्थः। व्यङ्ग्यस्य ध्वनेर्द्योतने स्वात्मनि कः क्रम इत्याशङ्क्याह– वाच्यार्थापेक्षयेति। वाच्योऽर्थो विभा-वादिः॥ २॥**

लोचन

'अविवक्षितवाच्याचा वेगळेपणा'[1] असे (पृ. ३०८ वर) म्हटले. तो वेगळेपणा कोणाहून? कारण तो निराळेपणा अविवक्षितवाच्याच्या स्वतःच्या स्वरूपाहून तर काही असू शकत नाही' अशी शंका कल्पून 'तो अविवक्षितवाच्य हा प्रकार विवक्षितवाच्य या प्रकाराहूनच वेगळा असणार, कारण वाच्यार्थ विवक्षित असणे व नसणे या दोन गोष्टी परस्परविरुद्ध आहेत' या अभिप्रायाने कारिकाकार 'ज्यातील वाच्यार्थ विवक्षित असतो' इ. कारिका सांगतात. 'ज्याच्या 'उद्योतातील' म्हणजे व्यंजनाव्यापारातील वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांतील पौर्वापर्य स्पष्टपणे लक्षात येऊ शकत नाही' असा हा बहुव्रीहि समास आहे 'विवक्षितवाच्य' हा शब्द 'ध्वनि' शब्दाच्या सांनिध्यात योजिला असल्याने यातील वाच्यार्थ 'अन्यपर' आहे हे सूचित होते व म्हणून या कारिकेत 'अन्यपर' हा शब्द प्रत्यक्ष बोलून दाखविलेला नाही.[2] 'ध्वनी'चा याचा अर्थ 'व्यंग्यार्था'चा. आत्मा— पहिल्या कारिकेमध्ये वाच्यार्थ हा अत्यंततिरस्कृत किंवा अर्थान्तरसंक्रमित असल्यामुळे अविवक्षितवाच्य ध्वनीचे होणारे दोन प्रकार सांगितले. आता कारिका २ मध्ये विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीचे जे दोन प्रकार सांगितले जात आहेत, ते व्यंजनाव्यापाराच्या दृष्टिकोनातून सांगितले जात आहेत व ते खुद्द व्यंग्य अर्थाचेच प्रकार आहेत.[3]

ध्वनीचे प्रकाशन करण्याचा व्यापार अखंड असल्यामुळे त्या व्यापारामध्येच क्रम कोठला असणार अशी शंका कल्पून 'वाच्यार्थाच्या' दृष्टीने (असणारा क्रम) असे वृत्तिकार सांगतात. वाच्य अर्थ म्हणजे विभाव वगैरे.[4] ॥ २ ॥

टीपा

१. अविवक्षितवाच्यस्य प्रभेदप्रतिपादनाय यातील प्रभेद या शब्दाचे अभिनवगुप्तांनी 'लोचना'त तीन अर्थ केले. त्यांपैकी 'वेगळेपणा' हा तिसरा अर्थ होय. (पाहा, पृ. ३०८). या तिसऱ्या अर्थाला अनुलक्षून हे विवेचन केले जात आहे.

२. ध्वनीच्या या प्रकाराचे खरे नाव 'विवक्षितान्यपरवाच्य' असे आहे. पण

कारिकेत 'अन्यपर' हा शब्द न वापरता 'विवक्षिताभिधेय' इतकेच म्हटले आहे. ह्याचे कारण एक तर वृत्तात 'अन्यपर' हा शब्द वसत नाही. आणि 'विवक्षिताभिधेय' हा शब्द ध्वनीचे म्हणजे व्यंग्यार्थाचे विशेषण असल्यामुळे विवक्षिताभिधेय एवढे म्हटले तरी त्या वाच्यार्थाचे व्यंग्यार्थामध्ये पर्यवसान होते, म्हणजे तो वाच्यार्थ अन्यपर असतो हे न सांगताही कळण्यासारखे आहे.

३. म्हणजे वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांमधील पौर्वापर्यक्रम लक्षात येण्यासारखा असणे किंवा नसणे यामुळे उत्पन्न होणारे खुद्द व्यंग्यार्थाचेच ते प्रकार आहेत.

४. 'वगैरे' म्हणजे अनुभाव व सात्त्विक भाव. व्यभिचारिभावांचा यात समावेश होत नाही. कारण व्यभिचारिभाव हे नेहमी स्वशब्दवाच्य नसून व्यंग्य असावे लागतात.

नाट्यदर्पणा' मध्ये पृ. १५६ वर पुढील वाक्य आहे :–

**केचित्तु व्यभिचारिरसस्थायिनो स्वशब्दवाच्यत्वं रसदोषमाहुः, तद – युक्तम्। व्यभिचार्यादीनां स्ववाचकपदप्रयोगेऽपि विभावपुष्टेः।**

आनंदवर्धन, अभिनवगुप्त, मम्मट, विश्वनाथ, जगन्नाथ या सर्वांच्या मते व्यभिचारिभाव वगैरे हे व्यंग्य असले तरच रसप्रतीति घडवितात, वाच्य असल्यास घडवीत नाहीत. या संदर्भात पृ. १२८ व हाच उद्द्योत, कारिका २२ वरील लोचनातील विधाने पाहण्यासारखी आहेत. शिवाय पुढे (काशी आवृत्ति, पृ. ५२८ वर) अभिनवगुप्तांनी कोठल्याही व्यभिचारिभावाच्या बाबतीत शब्दस्पृष्टे अर्थे का रम्यता ? असे स्पष्टपणे म्हटले आहे. यावरून आनंदवर्धन, अभिनवगुप्त इत्यादींचे मत लक्षात घेता नाट्यदर्पणाचे वरील मत योग्य वाटत नाही.

**ध्वन्यालोकः**

तत्र

रसभावतदाभासतत्प्रशान्त्यादिरक्रमः ।
ध्वनेरात्माङ्गिभावेन भासमानो व्यवस्थितः ॥३॥

रसादिरर्थो हि सहैव वाच्येनावभासते। स चाङ्गित्वेनाव-भासमानो ध्वनेरात्मा।

**ध्वन्यालोक**

त्यापैकी : —

रस[१], भाव[२], त्यांचे (म्हणजे रस किंवा भाव यांचे) आभास[३], भाव-शान्ति[४] इत्यादि स्वरूपाचा व्यङ्ग्यार्थ 'अङ्गी' (म्हणजेच मुख्य) म्हणून

प्रतीत होत असेल, तेव्हा तो ध्वनीचा आत्मा ( म्हणजे प्रकार ) अ-क्रम ( म्हणजे असंलक्ष्यक्रम ) मानला जातो. || ३ ||

कारण रस वगैरे प्रकारचा व्यङ्ग्यार्थ वाच्यार्थाच्या बरोबर प्रतीत झाल्या-सारखा वाटतो.[४] तो जेव्हा अंगी ( प्रधान ) म्हणून भासमान होत असेल, तेव्हाच तो ध्वनीचा आत्मा म्हणजे प्रकार असतो.

लोचनम्

तत्रेति । तयोर्मध्यादित्यर्थः । यो रसादिरर्थः स एवाक्रमो ध्वने-रात्मा न त्वक्रम एव सः । क्रमवत्त्वमपि हि तस्य कदाचिद्भवति । तदा चार्थशक्त्युद्भवानुस्वानरूपभेदतेति वक्ष्यते । आत्मशब्दः स्वभाव-वचनः प्रकारमाह । तेन रसादिर्योऽर्थः स ध्वनेरक्रमो नाम भेदः । असंलक्ष्यक्रम इति यावत् । ननु किं सर्वदैव रसादिरर्थो ध्वनेः प्रकारः ? नेत्याह; किं तु यदाङ्गित्वेन प्रधानत्वेनावभासमानः । एतच्च सामान्यलक्षणे ' गुणीकृतस्वार्थावि 'त्यत्र यद्यपि निरूपितम्, तथापि रस-वदाद्यलङ्कारप्रकाशनावकाशदानायानूदितम् । स च रसादिर्ध्वनिर्व्यव-स्थित एव । न हि तच्छून्यं काव्यं किञ्चिदस्ति । यद्यपि च रसेनैव सर्वं जीवति काव्यम्, तथापि तस्य रसस्यैकघनचमत्कारात्मनोऽपि कुतश्चि-दंशात्प्रयोजकीभूतादधिकोऽसौ चमत्कारो भवति । तत्र यदा कश्चिदु-द्रिक्तावस्थां प्रतिपन्नो व्यभिचारी चमत्कारातिशयप्रयोजको भवति, तदा भावध्वनिः । यथा

तिष्ठेत्कोपवशात्प्रभावपिहिता दीर्घं न सा कुप्यति ।
स्वर्गायोत्पतिता भवेन्मयि पुनर्भावार्द्रमस्या मनः ।
तां हर्तुं विबुधद्विषोऽपि न च मे शक्ताः पुरोवर्तिनीं
सा चात्यन्तमगोचरं नयनयोर्यातेति कोऽयं विधिः ॥

अत्र हि विप्रलम्भरससद्भावेऽपीयति वितर्काख्यव्यभिचारिचम-त्क्रियाप्रयुक्त आस्वादातिशयः । व्यभिचारिण उदयस्थित्यपायत्रिधर्मकाः । यदाह– ' विविधमाभिमुख्येन चरन्तीति व्यभिचारिणः ' इति । यत्रो-दयावस्थाप्रयुक्तः कदाचित् । यथा

याते गोत्रविपर्यये श्रुतिपथं शय्यामनुप्राप्तया
निर्ध्यातं परिवर्तनं पुनरपि प्रारब्धुमङ्गीकृतम् ।
भूयस्तत्प्रकृतं कृतं च शिथिलक्षिप्तैकदोर्लेखया
तन्वङ्ग्या न तु पारितः स्तनभरः क्रष्टुं प्रियस्योरसः ॥

अत्र हि प्रणयकोपस्योज्जिगमिषयैव यदवस्थानं न तु पारित इत्युदयावकाशनिराकरणात्तदेवास्वादजीवितम् । स्थितिः पुनरुदाहृता –'तिष्ठेत्कोपवशात्' इत्यादिना । क्वचित्तु व्यभिचारिणः प्रशमावस्थया प्रयुक्तश्चमत्कारः । यथोदाहृतं प्राक् 'एकस्मिन् शयने पराङ्मुखतया' इति । अयं तत्प्रशम इत्युक्तः । अत्र चेर्ष्याविप्रलम्भस्य रसस्यापि प्रशम इति शक्यं योजयितुम् । क्वचित्तु व्यभिचारिणः सन्धिरेव चर्वणास्पदम् । यथा–

ऊसुरुसुंभियाएँ मुहु चुंबिउ जेण ।
अमिअरसघोंटाणं पडिजाणिउ तेण ॥

इत्यत्र श्रुत्युक्ते तु कोपे कोपकषायगद्गदमन्दरुदितायाः येन मुखं चुम्बितं तेनामृतरसनिगरणविश्रान्तिपरम्पराणां तृप्तिर्ज्ञातेति कोप-प्रसादसन्धिश्चमत्कारस्थानम् । क्वचिद्व्यभिचार्यन्तरशबलतैव विश्रान्ति-पदम् । यथा–

क्वाकार्यं शशलक्ष्मणः क्व च कुलं, भूयोऽपि दृश्येत सा ।
दोषाणां प्रशमाय मे श्रुतमहो कोपेऽपि कान्तं मुखम् ।
किं वक्ष्यन्त्यपकल्मषाः कृतधियः, स्वप्नेऽपि सा दुर्लभा ।
चेतः स्वास्थ्यमुपैहि, कः खलु युवा धन्योऽधरं धारयति ॥

अत्र हि वितर्कौत्सुक्ये मतिस्मरणे शङ्कादैन्ये धृतिचिन्तने परस्परं बाध्यबाधकभावेन द्वन्द्वशो भवन्ती, पर्यन्ते तु चिन्ताया एव प्रधानतां ददती परमास्वादस्थानम् । एवमन्यदप्युत्प्रेक्ष्यम् । एतानि चोदय-सन्धिशबलत्वादिकानि कारिकायामादिग्रहणेन गृहीतानि ।

नन्वेवं विभावानुभावमुखेनाप्यधिकश्चमत्कारो दृश्यत इति विभावध्वनिरनुभावध्वनिश्च वक्तव्यः । मैवम्; विभावानुभावौ ताव-त्स्वशब्दवाच्यावेव । तच्चर्वणापि चित्तवृत्तिष्वेव पर्यवस्यतीति रस-भावेभ्यो नाधिकं चर्वणीयम् । यदा तु विभावानुभावावपि व्यङ्ग्यौ भवतस्तदा वस्तुध्वनिरपि किं न सह्यते । यदा तु विभावाभासाद्रत्या –

भासोदयस्तदा विभावानुभासाच्चर्वणाभास इति रसाभासस्य विषयः। यथा रावणकाव्याकर्णने शृङ्गाराभासः। यद्यपि 'शृङ्गारानुकृतिर्या तु स हास्यः' इति मुनिना निरूपितं तथाप्यौत्तरकालिकं तत्र हास्यरसत्वम्।

दूराकर्षणमोहमन्त्र इव मे तन्नाम्नि याते श्रुतिं
चेतः कालकलामपि प्रकुरुते नावस्थितिं तां विना।

इत्यत्र तु न हास्यचर्वणावसरः। ननु नात्र रतिः स्थायिभावोऽस्ति। परस्परास्थाबन्धाभावात्। केनैतदुक्तं रतिरिति। रत्याभासो हि सः। अतश्चाभासता येनास्य सीता मय्युपेक्षिका द्विष्टा वेति प्रतिपत्तिर्हृदयं न स्पृशत्येव। तत्स्पर्शे हि तस्याप्यभिलाषो विलीयेत। न च मयीयमनुरक्तेत्यपि निश्चयेन कृतं, कामकृतान्मोहात्। अत एव तदाभासत्वं वस्तुतस्तत्र स्थाप्यते शुक्तौ रजताभासवत्। एतच्च शृङ्गारानुकृतिशब्दं प्रयुञ्जानो मुनिरपि सूचितवान्। अनुकृतिरमुख्यता आभास इति ह्येकोऽर्थः। अत एवाभिलाषे एकतरनिष्ठेऽपि शृङ्गारशब्देन तत्र तत्र व्यवहारस्तदाभासतया मन्तव्यः। शृङ्गारेण वीरादीनामप्याभासरूपतोपलक्षितैव। एवं रसध्वनेरेवामी भावध्वनिप्रभृतयो निष्यन्दाः। आस्वादे प्रधानं प्रयोजकमेवमंशं विभज्य पृथग्व्यवस्थाप्यते। यथा गन्धयुक्तिज्ञैरेकरससम्मूर्च्छितामोदोपभोगेऽपि शुद्धमांस्यादिप्रयुक्तमिदं सौरभमिति। रसध्वनिस्तु स एव योऽत्र मुख्यतया विभावानुभावव्यभिचारिसंयोजनोदितस्थायिप्रतिपत्तिकस्य प्रतिपत्तुः स्थाय्यंशचर्वणाप्रयुक्त एवास्वादप्रकर्षः। यथा–

कृच्छ्रेणोरुयुगं व्यतीत्य सुचिरं भ्रान्त्वा नितम्बस्थले।
मध्येऽस्यास्त्रिवलीतरङ्गविषमे निष्पन्दतामागता।
मद्दृष्टिस्तृषितेव सम्प्रति शनैरारुह्य तुङ्गौ स्तनौ
साकाङ्क्षं मुहुरीक्षते जललवप्रस्यन्दिनी लोचने॥

अत्र हि नायिकाकारानुवर्ण्यमानस्वात्मप्रतिकृतिपविचित्रितचित्रफलकावलोकनाद्वत्सराजस्य परस्परास्थाबन्धरूपो रतिस्थायिभावो विभावानुभावसंयोजनवशेन चर्वणारूढ इति। तदलं बहुना। स्थितमेतत्– रसादिरर्थोऽङ्गित्वेन भासमानोऽसंलक्ष्यक्रमव्यङ्ग्यस्य ध्वनेः प्रकार इति। सहेवेति। इवशब्देनासंलक्ष्यता विद्यमानत्वेऽपि क्रमस्य व्याख्याता। वाच्येनेति। विभावानुभावादिना॥ ३॥

तत्र म्हणजे (विवक्षितवाच्य ध्वनीच्या) त्या दोन उपप्रकारांपैकी. रसादिरूप अर्थ जेव्हा (प्रधान म्हणून प्रत्ययास येणारा असून) 'अलक्ष्य-क्रम' असतो, तेव्हा तो ध्वनिकाव्याचा आत्मा (म्हणजे पहिला प्रकार) असतो. पण तो रसादिरूप अर्थ नेहमीच असंलक्ष्यक्रम असतो असे मात्र नाही. कारण काही वेळा तो 'संलक्ष्यक्रम'ही असतो व त्यावेळी तो ध्वनीचा 'अर्थशक्त्युद्भव अनुस्वानरूपी' प्रकार असतो हे पुढे[6] सांगण्यात येईल. (कारिकेतील) 'आत्मा' हा शब्द 'स्वभाव' या अर्थाचा वाचक असून या ठिकाणी 'प्रकारा'चा बोध करून देणारा आहे. त्यामुळे जो अर्थ रसादिस्वरूपाचा असतो, तो ध्वनीचा 'अक्रम' नावाचा प्रकार होय. 'अ–क्रम' म्हणजे ज्या रसादिरूपी व्यंग्य अर्थाची प्रतीति व वाच्यार्थाची प्रतीति यांमधील आधी कोणती व नंतर कोणती होते हे वाचकाच्या लक्षात येत नाही, असा.

(शंका–) पण काय हो, रसादिरूप अर्थ हा नेहमीच ध्वनि असतो काय ? (उत्तर–) 'नाही' असे वृत्तीत ('मुख्यत्वाने प्रकाशित होणारा व्यंग्यार्थ' इ शब्दांनी) सांगितले आहे. ज्यावेळी तो 'अंगी' म्हणजे प्रधान म्हणून प्रत्ययास येतो, त्यावेळीच तो ध्वनीचा प्रकार असतो. आणि हा मुद्दा पहिल्या उद्द्योतातील १३ व्या कारिकेत ध्वनीचे सर्वसामान्य लक्षण करतेवेळी **गुणीकृतस्वार्थौ** या शब्दाने जरी सांगितला गेला होता, तरी पुढे[7] जे रसवदलंकार वगैरेंचे स्वरूप सांगण्यात येणार आहे, त्याला योग्य पार्श्वभूमि मिळावी या हेतूने या मुद्द्याचा येथे पुनरुल्लेख केला आहे. आता तो रसादिरूपी ध्वनि सर्व उत्कृष्ट काव्यांत असतोच, कारण त्या रसादिरूप ध्वनीशिवाय[8] कोणतेही काव्यच असू शकत नाही.[9] आणि जरी सर्व काव्यांना रसामुळेच सजीवता येत असली, व रसप्रतीति जरी एकजिनसी, अखंड, विस्मयकारक आनंद या स्वरूपाची असली, तरीसुद्धा निरनिराळ्या काव्यांमध्ये त्य रसाच्या सविस्मय आनंदरूपी प्रतीतीला, अंगभूत (म्हणजे उपकारक) असणाऱ्या कोणत्यातरी विशिष्ट अंशामुळे उत्कटता प्राप्त होते. त्या अंशांपैकी एखादा व्यभिचारिभावरूपी अंश जेव्हा

प्रकर्षाला पोहोचतो व विशेष चमत्कृति निर्माण करावयास कारणीभूत होतो,[१०] त्यावेळी ते 'भावध्वनी'चे उदाहरण म्हणावयाचे. उदा.–

'ती माझ्यावर रागावल्यामुळे आपल्या दैवी शक्तीने कोठतरी अदृश्य होऊन तर राहिली नसेल ना ? पण ( हे शक्य नाही, कारण) तिचा माझ्यावरील राग फार वेळ टिकून राहात नाही. मग, ती उड्डाण करून स्वर्गाला तर गेली नसेल ? पण ( तेही संभवनीय नाही, कारण) तिचे मन माझ्याविषयीच्या प्रीतीने ओथंबलेले आहे ! देवांचे शत्रु जे असुर त्यांचीदेखील माझ्या डोळ्यांदेखत तिला हरण करण्याची हिम्मत नाही, आणि तरीही ती माझ्या डोळ्यांना कोठेही दिसत नाही, हा प्रकार तरी काय म्हणावयाचा ? "

येथे शेवटी जरी विप्रलंभशृंगार–रसाची प्रतीति होत असली, तरी या श्लोकापुरता विचार केल्यास यात वितर्क नावाच्या व्यभिचारिभावामुळे जो चमत्कार वाटतो तोच सहृदयांना पराकाष्ठेचा आनंद प्राप्त करून देणारा[१२] आहे. व्यभिचारिभावांचे तीन धर्म (म्हणजे अवस्था) असतात–(१) उदय (म्हणजे उदय पावणे) (२) 'स्थिति' (म्हणजे काही वेळ टिकून राहणे) (३)' अपाय ' (म्हणजे शांत होणे). कारण भरताने म्हटले आहे की –जे ( उदय, स्थिति व प्रशम या) निरनिराळ्या रूपांनी (म्हणजे अवस्थांनी) रसानुकूल होण्याचे कार्य करीत असतात, ते 'व्यभिचारी' (वि + अभि + चारी) होत. त्या प्रकारांपैकी एक प्रकार म्हणजे काही वेळा एखाद्या व्यभिचारिभावाची उदयावस्था रसिकांना विशेष चमत्कृतिजनक होते. उदा.

ती तनुगात्री (प्रियकराला आलिंगून) शय्येवर पहुडली असताना त्याच्या तोंडून बाहेर पडलेले दुसऱ्या प्रेयसीचे नाव तिच्या कानांवर पडले. त्याबरोबर तिने त्याच्याकडे पाठ फिरवण्याचे मनात आणले, व आपले मुख विरुद्ध दिशेला वळविण्यास प्रारंभही केला. त्यानंतर ती आपले मुख वळविण्याचा अधिक प्रयत्न करू लागली आणि प्रियकराभोवतीची आपल्या बाहुलतेची पकड सैल करून तिने आपले मुख दुसऱ्या बाजूला केले देखील ! पण आपले वक्ष:स्थल मात्र ती प्रियकराच्या वक्ष:स्थलापासून अलग करू शकली नाही.[१३]

या उदाहरणात प्रेमाचा रुसवा उदय पावण्याच्या बेतात

असलेलाच दाखविला आहे. 'अलग करू शकली नाही' या शब्दांनी तो रुसवा पूर्णपणे उदित होण्याइतका त्याला अवसर मिळाला नाही असे दर्शविले आहे.[१४] म्हणून प्रणयकोपाची (म्हणजे 'अमर्ष' या व्यभिचारिभावाची) उदयावस्थाच आस्वादाचा विषय झालेली आहे.

'ती माझ्यावर रागावल्यामुळे........' या पृ. ३३४ वरील उदाहरणात[१५] व्यभिचारिभाव उदित होऊन काही काळ टिकलेला दाखविला आहे. काही ठिकाणी व्यभिचारिभाव हा शांत झाल्याच्या म्हणजे ओसरल्याच्या वर्णनामुळे चमत्कृति वाटते. याचे उदाहरण पूर्वी (पृ. १२७ वर) दिलेले 'पति व पत्नी एकाच शय्येवर....' हे होय. कारिकेमध्ये या अवस्थेला व्यभिचारिभावाचा 'प्रशम' (प्रशान्ति) म्हटले आहे. आणि उदाहरणात 'ईर्ष्याविप्रलंभरसाचा प्रशम आहे' असेही म्हणणे शक्य आहे[१६] काही ठिकाणी दोन व्यभिचारिभावांचा 'संधि'[१७] हाच आस्वादाचा विषय होतो. जसे —

ऊसुरु सुंभियाएँ मुहु चुंबिउ जेण ।
अमिअरसघोंटाणं पडिजाणिउ तेण ।।

कण्ठ दाटून येऊन रडणाऱ्या नायिकेच्या मुखाचे ज्याने चुम्बन घेतले, त्याला अमृतरसाच्या घोटांतील गोडी पूर्णपणे समजली.

या उदाहरणात कोप हा वाच्य (व्यंजित ?)[१८] झाला असल्यामुळे 'त्या कोपाने मन गढूळ झालेल्या आणि गद्गद व मन्दमन्द रोदन करणाऱ्या नायिकेच्या मुखाने ज्याने चुंबन घेतले त्याला अमृतरसाचे थांबून थांबून घुटके घेत घेत पुन: पुन: पान करीत राहण्याचे समाधान कसे असते ते कळले.' असा या पद्याचा अर्थ असल्यामुळे कोप (अमर्ष) व प्रसन्नता (हर्ष) या दोन व्यभिचारिभावांचा 'संधि' येथे चमत्कृति निर्माण करणारा आहे. काही वेळा अनेक व्यभिचारि-भावांचा मिलाफ हा आनंदानुभवाचा विषय होतो. उदा.

'कोठे माझे हे गैरकृत्य आणि कोठे तो चंद्रवंश ?– ती मला पुन्हा दिसेल काय ? मी शास्त्राध्ययन केले, ते माझ्या मनातील हीन वासना काढून टाकण्यासाठी केले आहे. तिचे मुख कोपामध्येही किती रमणीय दिसत होते ! पापापासून अलिप्त असणारे विचारवंत लोक माझ्याबद्दल काय बरे म्हणतील ? पण ती मला स्वप्नातही दर्शन देत

नाही. बा मना ! तू धीर धर.– खरेच, कोणा भाग्यशाली तरुणाला तिचे अधरपान करावयास मिळेल बरे ?'[२०]

या उदाहरणातील चार ओळींमध्ये अनुक्रमे वितर्क व औत्सुक्य, मति व स्मरण, शंका व दैन्य, धृति व चिंता[२१] या व्यभिचारिभावांच्या प्रत्येक जोडीमधील दुसरा भाव पहिल्याचा बाध करितो पण श्लोकाच्या शेवटी ते (सर्व व्यभिचारिभाव) चिंता या व्यभिचारिभावाला प्राधान्य देऊन चमत्कृतीस कारणीभूत होतात. या सर्व प्रकारांची आणखी उदाहरणेही वाचकांनी शोधून काढावीत. कारिकेमधील 'इत्यादि' शब्दाने व्यभिचारिभावांच्या उदय, संधि, शबलत्व वगैरेंचा अंतर्भाव झाला आहे (असे समजावे).

(शंका - ) पण काय हो, अशा रीतीने विभाव आणि अनुभाव यांच्या द्वारेही चमत्कार अनुभवास येत असल्यामुळे विभावध्वनि आणि अनुभावध्वनि यांचीही उदाहरणे तुम्ही सांगावयास पाहिजेत ! (उत्तर–) असे म्हणू नका. कारण आधी विभाव व अनुभाव हे तर आपल्या वाचक शब्दांनी वाच्यच झालेले असतात (ते काही सुचविले जात नाहीत). आणि त्यांच्या चर्वणेचे पर्यवसानही चित्तवृत्तींच्या (म्हणजे स्थायी किंवा व्यभिचारी भावांच्या) आस्वादातच होत असल्यामुळे (विभाव व अनुभाव यांच्या बाबतीत) रस-भावांहून वेगळे असे काहीही आस्वादनीय नसते. आणि ज्या काही उदाहरणांत विभाव व अनुभाव हेदेखील व्यंग्यच होतात, तेथे 'वस्तुध्वनि' मानावयास तुम्हाला काय हरकत आहे ? मात्र ज्यावेळी विभावाभासामुळे (म्हणजे अनुचित विभावामुळे) रत्याभासाचा (म्हणजे अनुचित रतीचा[२२]) उदय होत असेल, त्यावेळी अनुचित विभावांच्या प्रतीतीमुळे अनुचित रतीच्या आस्वादाचा अनुभव येत असतो, म्हणून ते रसाभासाचेच उदाहरण होय ज्याप्रमाणे रावणकाव्य[२३] ऐकल्याने शृंगाररसाभासाचा अनुभव येतो.[२४] आणि 'शृंगाराची जी नक्कल असेल, तो हास्यरस होय'[२५] असे जरी भरतमुनींनी म्हटले असले, तरी अशा उदाहरणात हास्यरसाची प्रतीती येते ती शृंगाराभासाच्या अनुभवानंतरच[२६] येते.

'दुरून आकृष्ट करणाऱ्या मोहिनीमंत्राप्रमाणे असणारे तिचे नाव माझ्या कानी पडल्यापासून माझ्या मनाला क्षणभर सुद्धा तिच्या

चिंतनाशिवाय चैन पडू शकत नाही.'[२६]

या वाक्यांमध्ये हास्यरसाच्या आस्वादाला बाधच नाही. (येथे प्रथम विप्रलंभरतीचीच प्रतीति होते व हास्यरस अनुभवाला येतो, तो मागाहून, म्हणजे अनौचित्य ध्यानात आल्यावरच.)

(शंका–) पण काय हो, या वाक्यात रति या स्थायिभावाचा प्रत्यय येत नाही; कारण दोघांनाही एकमेकांबद्दल (मनापासून) प्रेम वाटले पाहिजे ते तर येथे नाही !

(उत्तर–) पण 'येथे रति आहे' असे कोण म्हणाले ? कारण तो खरोखर रतीचा आभास आहे (रति नव्हे).

आणि हा रसाचा 'आभास' असण्याचे आणखी एक कारण असे की, सीता माझ्या बाबतीत उदासीन किंवा माझा द्वेष करणारी आहे ही जाणीव रावणाच्या मनाला शिवतच नाही. कारण ती जाणीव जर रावणाला झाली असती, तर रावणाचाही अभिलाष विरून गेला असता ! आणि 'ही माझ्यावर अनुरक्त आहे' असा निश्चय त्याच्या ठिकाणी नाही असेही नाही, कारण (येथे) कामासक्त झाल्यामुळे रावण वेडा होऊन गेला आहे.[२८] म्हणूनच रावणाचा सीतेविषयीचा अभिलाष रतीच्या आभासाच्या स्वरूपाचा आहे असेच खरोखर प्रस्थापित केले जाते – शिंपल्यामध्ये चांदीचा भास प्रस्थापित केला जातो, त्याप्रमाणेच.[२९] आणि ही गोष्ट 'शृंगारानुकृति' (म्हणजे शृंगाराचे अनुकरण) हा शब्द वापरून भरतमुनींनीही सूचित केली आहे. कारण अनुकृति, मुख्य (म्हणजे अस्सल) नसणे, आणि आभास असणे या शब्दांचा अर्थ एकच होय.[३०] म्हणूनच अभिलाष हा जरी दोघांपैकी एकाच्याच ठिकाणी असला तरी त्याला 'शृंगार' असे जे अनेक वेळा म्हणण्यात येते, ते 'शृंगाराचा आभास' या अर्थानेच म्हणण्यात येते, असे समजावे. (भरतमुनींनी जरी केवळ शृंगाराभासाचाच निर्देश केला असला, तरी) शृंगाराच्या निर्देशामध्ये वीर वगैरे रसांच्याही आभासांचा अंतर्भाव होतो, असे समजावे.[३१] अशा रीतीने हे भाव-ध्वनि इत्यादि[३२] वस्तुतः रसध्वनीचेच आविष्कार आहेत. पण त्यातला जो अंश मुख्यत्वेकरून आस्वादाला कारणीभूत वाटत असेल, त्याला बाजूला काढून तो (आविष्कार) अशा रीतीने म्हणजे त्याला वेगळे नाव देऊन शास्त्रात

विवेचिला जातो.[३३] सुगंधी द्रव्यांचे जाणकार ज्याप्रमाणे एखाद्या संमिश्र सुगंधाचा आस्वाद ( तो अनेक गंधांचा व स्वादांचा मिळून बनलेला असला तरी ) एकजिनसीपणानेच घेतात, पण त्यातला अमुक गंध (आणि स्वाद) हा जटामांसीचाच[३४] गंध आणि स्वाद आहे असे ओळखतात, त्याप्रमाणेच. मात्र या सर्व प्रकारांमधील रसध्वनि हा तोच प्रकार की, विभाव, अनुभाव, व्यभिचारिभाव यांच्या संयोगामुळे स्थायिभावाची ज्याला प्रतीति झाली आहे अशा रसिकाला मुख्यत्वाने स्थायिभाव या विशिष्ट अंशाच्या चर्वणेमुळे जो श्रेष्ठ प्रतीचा आस्वाद प्राप्त होतो, तो. जसे ––

" माझी नजर[३५] मोठ्या अनिच्छेनेच (म्हणजे कष्टानेच) तिच्या मांड्या ओलांडून पुढे गेली. मग तिच्या जघनस्थलावर दीर्घकाळ घुटमळल्यावर ती नजर तिच्या तीन वळ्यांच्या तरंगसदृश ठेवणीमुळे उंचसखल झालेल्या तिच्या उदरप्रदेशावर निश्चल झाली. पण आता ती दृष्टि हळूहळू तिच्या उन्नत स्तनांवर आरूढ झाल्यानंतर जणू तहानलेली होऊन ज्यांतून जलबिंदु वाहत आहेत अशा तिच्या डोळ्यांकडे साभिलाषपणे पुन्हा पुन्हा पाहात आहे ! "[३६]

या उदाहरणात नायिकेच्या तसबिरीजवळ काढलेल्या स्वतःच्या प्रतिकृतीने पवित्र झालेल्या चित्रफलकाच्या अवलोकनामुळे वत्सराज उदयनाचा 'एकमेकांविषयी वाटणारे हार्दिक प्रेम' या स्वरूपाचा[३७] 'रति' हा स्थायिभाव (अनुरूप) विभाव, अनुभाव इत्यादींच्या योग्य योजनेमुळे[३८] रसिकांच्या आस्वादाचा विषय होतो. तेव्हा आता याचे अधिक विवेचन नको. ही गोष्ट निश्चितपणे सिद्ध आहे की, ज्या उदाहरणांत रसरूप, भावरूप इ. अर्थ प्रधान आहे असे प्रत्ययास येत असेल, ती उदाहरणे ध्वनीच्या 'असंलक्ष्यक्रम' प्रकाराची होत. (वाच्यार्थाच्या) 'बरोबरच प्रतीत झाल्यासारखा' –– इव (सारखा) या शब्दाने वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांच्या प्रतीतींमध्ये पौर्वापर्यक्रम असूनही तो लक्षात येत नाही, हे दाखविले. 'वाच्यार्थाच्या बरोबर' म्हणजे विभाव, अनुभाव वगैरेंच्या (म्हणजे सात्विक भावांच्या) बरोबर. ।।३।।

१. या कारिका ३ वरील टीकेमध्ये अभिनवगुप्तांनी रसादिध्वनि हाच काव्याचा आत्मा आहे असे सांगून भावोदय, भावसंधि, भावशबल व भावप्रशम या चार प्रकारचा भावध्वनि, तसेच रसाभासध्वनि व रसध्वनि यांच्या स्वरूपाचा विचार करून त्यांची उदाहरणे दिली आहेत. रसध्वनीसंबंधी थोडीशी कल्पना उद्द्योत १ मध्ये पृ. ८२ व ८३ वर दिलीच आहे.

२. देव, गुरु, मुनि, पुत्र, राजा इत्यादिकांविषयीची रति (प्रेमभाव) जेव्हा एखाद्या काव्यात प्रमुख असेल, तसेच एखादा व्यभिचारी भाव (पृ. ८ वरील २ री टीप पाहा) प्राधान्याने अभिव्यक्त होत असेल, तेव्हा ते काव्य 'भावध्वनिकाव्य' म्हणावचे. लोचनातही पृ. ३३४ वर 'ती माझ्यावर रागावल्यामुळे' हे भावध्वनीचे व पृ. १२७ वर 'पति व पत्नी'... हे भावप्रशमाचे उदाहरण येऊन गेले आहे.

३. रसांचे स्थायी भाव आणि वरील २ ऱ्या टीपेत सांगितलेले (भाव) जेव्हा अनुचित व्यक्तीच्या ठिकाणी प्रवृत्त होत असतील (उदा. धर्मपत्नी सोडून परस्त्रीविषयीचा अभिलाष हा शृंगाररस नव्हे, तर 'शृंगाररसाभास' होय. तसेच मनुष्येतर प्राण्यांमधील रतिदेखील रसाभासातच जमा होईल), तेव्हा त्यांना अनुक्रमे 'रसाभास' व 'भावाभास' म्हणतात.

४. एखाद्या 'भावा' चा प्रशम (उदा. नायिकेचा कोप शान्त होणे) एखाद्या काव्यात प्राधान्याने अभिव्यक्त होत असेल, तर ते 'भावशान्तिध्वनि' काव्याचे उदाहरण होय. या सर्वांची (भाव, रसाभास, भावशान्ति इत्यादींची) उदाहरणे मम्मटाच्या काव्यप्रकाशात ४ थ्या उल्लासात कारिका ३५ व ३६ यानंतरच्या वृत्तीत दिलेली आढळतील.

५. तुलना : उद्द्योत १, पृ. १२३, वृत्तीतील शेवटचे वाक्य.

६. 'पुढे' म्हणजे काशी आवृत्ति, पृ. २४९ वर.

७. पुढे म्हणजे उद्द्योत २, कारिका ५ मध्ये.

८. म्हणजे प्रधानत्वाने प्रतीत होणाऱ्या रसादिरूपी व्यंग्यार्थाशिवाय.

९. तुलनार्थ पाहा, नाटचशास्त्र, अध्याय ६, कारिका ३१ नंतरच्या गद्यभागातील पुढील वाक्य– **न हि रसादृते कश्चिदर्थः प्रवर्तते ।**

१०. पाहा, व्यभिचारी तथाञ्जितः । भावः प्रोक्तः । –– मम्मटाचा काव्यप्रकाश, उल्लास ४, कारिका ३५ वी.

११. विक्रमोर्वशीयम्, ४–२

१२. 'वितर्क' म्हणजे संदेह उत्पन्न झाल्याने मनात एकामागून एक कल्पनातरंग उठत जाणे. एक कल्पनातरंग उत्पन्न झाल्यावर काहीतरी कारणाने त्याचे निरसन होऊन दुसरा कल्पनातरंग उत्पन्न होतो. याप्रमाणे अनेक कल्पना-

तरंग 'निश्चयगर्भ ससंदेह' अलंकारामध्येही असतात. मात्र ससंदेह अलंकार हा साम्यावर अधिष्ठित असतो. पण प्रस्तुत श्लोकामध्ये साम्याचा प्रश्न नसल्यामुळे 'ससंदेह अलंकार' नाही.

१३. 'अमरुशतका' चे शेवटी जे 'अधिक' श्लोक दिले आहेत, त्यांमध्ये हा श्लोक आहे.

१४. येथे हे उदाहरण उदयावस्थेचे म्हणून दिले आहे. तेव्हा व्यभिचारिभावाचा उदय झाला असे समजले पाहिजे. उदित होण्याला अवसर मिळाला नाही असे मानण्यापेक्षा त्या व्यभिचारिभावाला (त्याचा उदय झाला, पण) टिकून राहण्यास वाव मिळाला नाही असे म्हणणे अधिक बरे झाले असते.

१५. पृ. ३३४ वर हे उदाहरण 'भावध्वनी' चे म्हणून दिले होते. तेच व्यभिचारिभावाच्या 'स्थिती' चेही आहे हे आता सांगितले जात आहे.

१६. रसगंगाधर (काव्यमाला संस्करण), पृ. १२९ वर जगन्नाथाने म्हटले आहे की, रसांचा प्रशम संभवत नाही, कारण रसास्वादाचा विषय असणारा 'स्थायिभाव' हा सतत टिकून राहणारा असल्याने त्याचा प्रशम होणे अशक्य आहे. परंतु अभिनवगुप्तांनी येथे केलेले विधान रति या स्थायिभावाच्या ईर्ष्याविप्रलंभ या अवस्थेला अनुलक्षून केलेले आहे. त्या विशिष्ट अवस्थेचा प्रशम होणे शक्य असल्यामुळे अभिनवगुप्तांचे म्हणणे आक्षेपार्ह वाटत नाही.

१७. 'भाव-संधी'चे स्वरूप जगन्नाथाने पुढीलप्रमाणे सांगितले आहे– दोन व्यभिचारिभावांमध्ये परस्परांवर वर्चस्व गाजविण्याचे सामर्थ्य असूनही त्यांनी तसे वर्चस्व न गाजवता तुल्यबलत्वाने एकत्र राहणे म्हणजे 'भाव–संधि' होय.

१८. **रुद्धगलं रुदत्या मुखं चुम्बितं येन ।**
**अमृतरसगण्डूषाणां परिज्ञातं तेन ॥**

मूळ पद्यातील पहिल्या चरणाचा पाठ काशी आवृत्तीमध्ये अत्यंत अशुद्ध व दुर्बोध असलेला आढळला. तो आम्ही कल्पलताविवेक, पृ. १२७ वरील पाठाला अनुसरून दुरुस्त केला आहे.

१९. वास्तविक या पद्यात कोप किंवा प्रसन्नता यांपैकी एकही व्यभिचारिभाव वाच्य झालेला नाही, कारण कोप किंवा प्रसाद यांचा वाचक शब्द येथे कोठेही वापरलेला नाही. तरीही अभिनवगुप्तांनी 'कोप हा श्रुतीने उक्त झाला आहे' असे का म्हणावे, ते कळत नाही. हे पद्य ऐकल्यामुळे कोप हा उक्त (म्हणजे व्यंजित) झाला आहे, अशा अर्थाने अभिनवगुप्तांनी **उक्त** म्हटले असणे शक्य आहे. आणि या पद्याचे विवरण करिताना अभिनवगुप्तांनी **कोपकषाय** हा जो शब्द वापरला आहे, तो केवळ व्यंग्यार्थ स्पष्ट करण्यासाठी वापरला आहे.

२०. हा श्लोक ' विक्रमोर्वशीया ' तला आहे असे जयंत, महेश्वर, नागोजीभट्ट इ. (काव्यप्रकाशाच्या) टीकाकारांचे म्हणणे आहे, पण तो विक्रमोर्वशीयाच्या प्रकाशित पुस्तकात कोठेही सापडत नाही. देवयानीला पाहून ययाति राजाने काढलेले हे उद्‌गार आहेत असेही काहींचे म्हणणे आहे.

२१. ' वितर्का 'चे विवरण पृ. ३३८ वरील १२ व्या टीपेत येऊन गेले आहे. ' औत्सुक्य ' म्हणजे उत्कंठा. ' मति ' म्हणजे शास्त्राध्ययनामुळे भ्रांति दूर होऊन तत्त्वाचे ज्ञान होणे. ' स्मृति ' म्हणजे स्मरण. ' शंका ' म्हणजे भीति. ' दैन्य ' म्हणजे नैराश्य. ' धृति ' म्हणजे ज्ञानामुळे किंवा सामर्थ्यामुळे होणारे समाधान. ' चिंता ' म्हणजे एखादी गोष्ट प्राप्त न झाल्यामुळे तिचा एकसारखा विचार करीत राहणे. ' कोठे माझे हे गैरकृत्य '... इ. उदाहरणातील पहिल्या ओळीतील पहिल्या व्यभिचारिभावाला अभिनवगुप्तांनी ' वितर्क ' असे म्हटले आहे. पण ' वितर्का 'च्या, काव्यशास्त्रकारांनी दिलेल्या लक्षणाशी ते जुळत नाही.

२२. रसाभास व भावाभास यांचे विवरण मागे पृ. १२६ वर येऊन गेले आहे.

२३. ' रावणकाव्य ' या नावासंबंधी पृ. १३१ वरील ९ वी टीप पाहा.

२४. रावणाला सीतेविषयी वाटणाऱ्या रतीचे अनौचित्य अभिनवगुप्तांनी अभिनवभारतीमध्ये पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे— सीता ही परस्त्री, म्हणून तो आलंबनविभाव अनुचित होय. चिंता, दैन्य, मोह इ. व्यभिचारिभाव रावणाच्या वयाला व स्वभावाला अनुचित आहेत. अश्रुपात वगैरे अनुभवांच्या बाबतीतही तसेच. शिवाय रावणाचे सीतेविषयीचे प्रेम एकतर्फी असल्यानेही तो रतिभावसुद्धा अनुचित ठरतो असे अभिनवगुप्तांनी लोचनातील यापुढच्याच विवेचनात दाखविले आहे.

२५. नाट्यशास्त्र, अ. ६, कारिका ४०. भरतांनी या ठिकाणी हे केवळ शृंगाराच्या अनुकरणाला अनुलक्षून म्हटले असले, तरी इतर रसांच्या नकलेमुळेही हास्यरस उत्पन्न होऊ शकतो,

२६. म्हणजे स्थायिभावांचे अनौचित्य ध्यानात आल्यानंतरच हास्यरसाची प्रतीति येते. त्या आधी शृंगाररसाचीच प्रतीति होत असते. पाहा, पृ. १२६.

२७ ' लोचना ' मध्ये प्रकुरुते असा पाठ आहे, तर प्रा. कंगले यांनी ' रसभावविचारा 'मध्ये पृ. २१४ वर ' हेमचंद्रा ' ने उद्धृत केलेला संपूर्ण श्लोक दिला असून त्यात प्रसहते असा पाठ आहे. तो अधिक बरा वाटतो. ' अभिनवभारती ' मध्ये या श्लोकाची पहिलीच ओळ उद्धृत केली आहे.

२८ लोचनामध्ये पृ. २१६ वर (काशी आवृत्ति) अभिनवगुप्तांनी दोघांनाही जर परस्परांविषयी ' हे माझे जीवितसर्वस्व आहे ' अशा स्वरूपाची प्रीति वाटत असेल तरच तिला ' रति ' म्हणावे, अन्यथा म्हणजे एकाच व्यक्तीला प्रेम वाटते

पण दुसरीला वाटत नाही असे असल्यास ती रति नसून केवळ कामवासना होय असे म्हटले आहे. आणि अशा ( म्हणजे नकली ) रतिभावनेला ' रसाभास ' असे नाव आहे.

'अभिनवभारती ' मध्ये ( रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. २११ ) या श्लोकावरील हेच विवेचन जवळजवळ याच शब्दांमध्ये दिलेले आढळते.

२९. हा शिंपल्यावरच्या चांदीच्या आभासाचा दृष्टांत यापूर्वी पृ. ७३ व ८७ यांवर अभिनवगुप्तांनी निराळ्या संदर्भात का होईना, पण दिला आहे.

३०. आनन्दवर्धनांनी पुढे ( काशी आवृत्ति, पृ. ४९५ वर ) चित्रकाव्याबाबत ' न तन्मुख्यं काव्यम् । काव्यानुकारो ह्यसौ । ' असेच उद्गार काढले आहेत.

३१. म्हणजे त्याही रसांच्या आभासांचे पर्यवसान शेवटी हास्यरसात होते. ' अभिनवभारती ' मध्येही (' रस–भावविचार ', कंगले आवृत्ति, पृ. २११–२१२ ) विभावादिकांच्या अनौचित्यामुळे सर्वच रसांच्या बाबतीत हास्यरसाची निष्पत्ति होते, हे सांगितले आहे.

३२. ' इत्यादि ' म्हणजे भावोदय, भावप्रशम, रसाभास, भावाभास, इत्यादींचे ध्वनि.

३३. ' अशा रीतीने ' हा अनुवाद आम्ही मूळातील एवम् या शब्दाचा केला आहे. त्यापेक्षा एकम् हा पाठभेद स्वीकारल्यास तो अधिक बरा होईल असे आम्हांस वाटते. मग या वाक्याचा अर्थ ' जो एक अंश मुख्यत्वेकरून आस्वाद्य असेल, त्याप्रमाणे ते आविष्कार शास्त्रात वेगवेगळे मानण्यात येतात ' असा होईल. या आमच्या मताच्या समर्थनार्थ पृ. ३३३ वरील ' एखादा व्यभिचारिभावरूपी अंश जेव्हा ' ... इ. (लोचनातील) शब्दयोजना पाहा.

३४. लोचनात मांसी असा शब्द वापरला आहे. मांसी ही एक सुगंधी वनस्पति असून जटामांसी गंधमांसी इ. तिचे पर्यायवाचक शब्द आहेत. काश्मीरकडे ही वनस्पति खाद्य पदार्थांना स्वादिष्टपणा आणण्यासाठी वापरली जाते, असे दिसते.

३५. ' रत्नावली ' नाटिका, २–९. नाटिकेचा नायक वत्सराज उदयन याला तो प्रमदोद्यानात गेला असताना सागरिकेच्या वेषात असलेल्या ' रत्नावली ' या नायिकेचे चित्र सापडते. त्या चित्राचे वर्णन तो आपला मित्र विदूषक याचेजवळ वरीलप्रमाणे करीत आहे.

३६. यात प्रस्तुत असलेल्या नायक-दृष्टीच्या वृत्तान्तावरून अप्रस्तुत अशा वाटसराच्या भ्रमणाचा वृत्तान्त ( समासोक्तीच्या पद्धतीने ) सूचित होत आहे. त्यानंतर शेवटी या श्लोकातून अभिलाष– विप्रलम्भरति ह्या स्थायिभावाचे सूचन होत असल्यामुळे प्रस्तुत श्लोक हे रसध्वनीचे उदाहरण होय.

३७. चित्रात रत्नावलीच्या डोळ्यांतून अश्रू वाहात आहेत असे दाखविले असल्या-मुळे तिचा राजाबद्दलचा अनुराग व्यक्त होत आहेच, पण शिवाय राजाला तिच्या चित्राकडे पुन्हा पुन्हा साभिलाषपणे पाहावेसे वाटते, ह्यावरून त्याच्याही मनातील तिजविषयीचे आकर्षण व्यक्त होत आहे.

३८. या उदाहरणात 'रत्नावली' हा आलंबनविभाव, तिच्या चित्राचे अवलोकन हा उद्दीपन विभाव, दृष्टि निश्चल होणे इ. अनुभाव व औत्सुक्य इ. व्यभि-चारिभाव होत.

ध्वन्यालोकः

इदानीं रसवदलङ्कारादलक्ष्यक्रमद्योतनात्मनो ध्वनेर्विभक्तो विषय इति प्रदर्श्यते—

वाच्यवाचकचारुत्वहेतूनां विविधात्मनाम् ।
रसादिपरता यत्र स ध्वनेर्विषयो मतः ॥ ४ ॥

रसभावतदाभासतत्प्रशमलक्षणं मुख्यमर्थमनुवर्तमाना यत्र शब्दार्थालङ्कारा गुणाश्च परस्परं ध्वन्यपेक्षया विभिन्नरूपा व्यवस्थिता-स्तत्र काव्ये ध्वनिरिति व्यपदेशः ।

ध्वन्यालोक

आता या, क्रम लक्षात न येता प्रकाशित होणाऱ्या ध्वनीचा विषय 'रसवदलंकारा' हून वेगळाच आहे, हे (पुढीलप्रमाणे) दाखविले जात आहे–

वाच्यार्थ व वाचकशब्द यांच्या सौंदर्यास कारणीभूत होणारी निरनिराळ्या प्रकारची अंगे जेव्हा 'रसादिपर' असतात, (म्हणजे जेव्हा काव्यात 'रसादि' प्रधान असून इतर गोष्टी त्याला उपकारक असतात), तेव्हा ते काव्य ध्वनिकाव्याच्या क्षेत्रात येते.[१] ॥४॥

एकमेकांहून आणि (मुख्य अशा) ध्वनित अर्थाहून भिन्न असलेले शब्दार्थालंकार आणि गुण हे ज्या काव्यामध्ये रस, भाव, त्यांचे आभास, भावप्रशम इत्यादि स्वरूपाच्या त्या, मुख्य असलेल्या, ध्वनित अर्थाचे पोषक असतात, त्या काव्याला 'ध्वनि' असे नाव दिले जाते.

नन्वङ्गित्वेनावभासमान इत्युच्यते; तत्राङ्गत्वमपि किमस्ति रसादेर्येन तन्निराकरणायैतद्विशेषणमित्यभिप्रायेणोपक्रमते— इदानीमित्यादिना। अङ्गत्वमस्ति रसादीनां रसवत्प्रेयऊर्जस्विसमाहितालङ्काररूपतायामिति भावः। अनया च भङ्ग्या रसवदादिष्वलङ्कारेषु रसादिध्वनेर्नान्तर्भाव इति सूचयति। पूर्वं हि समासोक्त्यादिषु वस्तुध्वनेर्नान्तर्भाव इति दर्शितम्। वाच्यं च वाचकं च तच्चारुत्वहेतवश्चेति द्वन्द्वः। वृत्तावपि शब्दाश्चालङ्काराश्चार्थाश्चालङ्काराश्चेति द्वन्द्वः। मत इति। पूर्वमेवैतदुक्तमित्यर्थः।

ननूक्तं भट्टनायकेन— 'रसो यदा परगततया प्रतीयते तर्हि ताटस्थ्यमेव स्यात्। न च स्वगतत्वेन रामादिचरितमयात्काव्यादसौ प्रतीयते। स्वात्मगतत्वेन च प्रतीतौ स्वात्मनि रसस्योत्पत्तिरेवाभ्युपगता स्यात्। सा चायुक्ता सीतायाः सामाजिकं प्रत्यविभावत्वात्। कान्तात्वं साधारणं वासनाविकासहेतुर्विभावतायां प्रयोजकमिति चेत्— देवतावर्णनादौ तदपि कथम्। न च स्वकान्तास्मरणं मध्ये संवेद्यते। अलोकसामान्यानां च रामादीनां ये समुद्रसेतुबन्धादयो विभावास्ते कथं साधारण्यं भजेयुः। न चोत्साहादिमान् रामः स्मर्यते, अननुभूतत्वात्। शब्दादपि तत्प्रतिपत्तौ न रसोपजनः। प्रत्यक्षादिव नायकमिथुनप्रतिपत्तौ। उत्पत्तिपक्षे च करुणस्योत्पादाद्दुःखित्वे करुणप्रेक्षासु पुनरप्रवृत्तिः स्यात्। तन्न उत्पत्तिरपि, नाप्यभिव्यक्तिः। शक्तिरूपस्य हि शृङ्गारस्याभिव्यक्तौ विषयार्जनतारतम्यप्रवृत्तिः स्यात्। तत्रापि किं स्वगतोऽभिव्यज्यते रसः परगतो वेति पूर्ववदेव दोषः। तेन न प्रतीयते नोत्पद्यते नाभिव्यज्यते काव्येन रसः। किं त्वन्यशब्दवैलक्षण्यं काव्यात्मनः शब्दस्य त्र्यंशताप्रसादात्। तत्राभिधायकत्वं वाच्यविषयम्, भावकत्वं रसादिविषयम्, भोगकृत्त्वं सहृदयविषयमिति त्रयोंऽशभूता व्यापाराः। तत्राभिधाभागो यदि शुद्धः स्यात्तत्तन्त्रादिभ्यः शास्त्रन्यायेभ्यः श्लेषाद्यलङ्काराणां को भेदः ? वृत्तिभेदवैचित्र्यं चाकिञ्चित्करम्। श्रुतिदुष्टादिवर्जनं च किमर्थम् ? तेन रसभावनाख्यो द्वितीयो व्यापारः; यद्वशादभिधा विलक्षणैव। तच्चैतद्भावकत्वं नाम रसान् प्रति यत्काव्यस्य तद्विभावादीनां साधारणत्वापादनं नाम। भाविते च रसे तस्य भोगः योऽनुभवस्मरणप्रतिपत्तिभ्यो विलक्षण

एव द्रुतिविस्तरविकासात्मा रजस्तमोवैचित्र्यानुविद्धसत्त्वमयनिजचित्स्वभावनिर्वृतिविश्रान्तिलक्षणः परब्रह्मास्वादसविधः। स एव च प्रधानभूतोंऽशः सिद्धरूप इति। व्युत्पत्तिर्नामाप्रधानमेव ' इति।

अत्रोच्यते– रसस्वरूप एव तावद्विप्रतिपत्तयः प्रतिवादिनाम्। तथाहि– पूर्वावस्थायां यः स्थायी स एव व्यभिचारिसम्पातादिना प्राप्तपरिपोषोऽनुकार्यगत एव रसः। नाट्ये तु प्रयुज्यमानत्वान्नाट्यरस इति केचित्। प्रवाहधर्मिण्यां चित्तवृत्तौ चित्तवृत्तेः चित्तवृत्त्यन्तरेण कः परिपोषार्थः ? विस्मयशोकक्रोधादेश्च क्रमेण तावन्न परिपोष इति नानुकार्ये रसः। अनुकर्तरि च तद्भावे लयाद्यननुसरणं स्यात्। सामाजिकगते वा कश्चमत्कारः ? प्रत्युत करुणादौ दुःखप्राप्तिः। तस्मान्नायं पक्षः। कस्तर्हि ? इहानन्त्यान्नियतस्यानुकारो न शक्यः, निष्प्रयोजनश्च विशिष्टताप्रतीतौ ताटस्थ्येन व्युत्पत्त्यभावात्।

तस्मादनियतावस्थात्मकं स्थायिनमुद्दिश्य विभावानुभावव्यभिचारिभिः संयुज्यमानैरयं रामः सुखीति स्मृतिविलक्षणा स्थायिनि प्रतीतिगोचरतयास्वादरूपा प्रतिपत्तिरनुकर्त्रालम्बना नाट्यैकगामिनी रसः। स च न व्यतिरिक्तमाधारमपेक्षते। किं त्वनुकार्याभिन्नाभिमते नर्तके आस्वादयिता सामाजिक इत्येतावन्मात्रमदः। तेन नाट्य एव रसः, नानुकार्यादिष्विति केचित्।

अन्ये तु– अनुकर्तरि यः स्थाय्यवभासोऽभिनयादिसामग्र्यादिकृतो भित्ताविव हरितालादिना अश्वावभासः, स एव लोकातीततयास्वादापरसंज्ञया प्रतीत्या रस्यमानो रस इति नाट्याद्रसा नाट्यरसाः। अपरे पुनर्विभावमात्रमेव विशिष्टसामग्र्या समर्प्यमाणं तद्विभावनीयानुभावनीयस्थायिरूपचित्तवृत्त्युचितवासनानुषक्तं स्वनिर्वृतिचर्वणाविशिष्टमेव रसः। तन्नाट्यमेव रसाः। अन्ये तु शुद्धं विभावम्, अपरे शुद्धमनुभावम्, केचित्तु स्थायिमात्रम्, इतरे व्यभिचारिणम्, अन्ये तत्संयोगम्, एकेऽनुकार्यम्, केचन सकलमेव समुदायं रसमाहुरित्यलं बहुना।

काव्येऽपि च लोकनाट्यधर्मिस्थानीयेन स्वभावोक्तिवक्रोक्तिप्रकारद्वयेनालौकिकप्रसन्नमधुरौजस्विशब्दसमर्प्यमाणविभावादियोगादियमेव रसवार्ता। अस्तु वात्र नाट्याद्विचित्ररूपा रसप्रतीतिः उपायवैलक्षण्यात्; इयमेव तावदत्र सरणिः। एवं स्थिते प्रथमपक्ष एवैतानि

दूषणानि प्रतीतेः स्वपरगतत्वादिविकल्पनेन। सर्वपक्षेषु च प्रतीतिरपरिहार्या रसस्य। अप्रतीतं हि पिशाचवदव्यवहार्यं स्यात्। किं तु यथा प्रतीतिमात्रत्वेनाविशिष्टत्वेऽपि प्रात्यक्षिकी आनुमानिकी आगमोत्था प्रतिभानकृता योगिप्रत्यक्षजा च प्रतीतिरुपायवैलक्षण्यादन्यैव, तद्वदियमपि प्रतीतिश्चर्वणास्वादनभोगापरनामा भवतु। तन्निदानभूताया हृदयसंवादाद्युपकृताया विभावादिसामग्र्या लोकोत्तररूपत्वात्। रसाः प्रतीयन्त इति ओदनं पचतीतिवद्व्यवहारः, प्रतीयमान एव हि रसः। प्रतीतिरेव विशिष्टा रसना। सा च नाट्ये लौकिकानुमानप्रतीतेर्विलक्षणा; तां च प्रमुखे उपायतया सन्दधाना। एवं काव्ये अन्यशाब्दप्रतीतेर्विलक्षणा, तां च प्रमुखे उपायतयापेक्षमाणा।

तस्मादनुत्थानोपहतः पूर्वपक्षः। रामादिचरितं तु न सर्वस्य हृदयसंवादीति महत्साहसम्। चित्रवासनाविशिष्टत्वाच्चेतसः। यदाह — "तासामनादित्वम् आशिषो नित्यत्वात्। जातिदेशकालव्यवहितानामप्यानन्तर्यं स्मृतिसंस्कारयोरेकरूपत्वात्" इति। तेन प्रतीतिस्तावद्रसस्य सिद्धा। सा च रसनारूपा प्रतीतिरुत्पद्यते। वाच्यवाचकयोस्तत्राभिधादिविविक्तो व्यञ्जनात्मा ध्वननव्यापार एव। भोगीकरणव्यापारश्च काव्यस्य रसविषयो ध्वननात्मैव, नान्यत्किञ्चित्। भावकत्वमपि समुचितगुणालङ्कारपरिग्रहात्मकमस्माभिरेव वितत्य वक्ष्यते। किमेतदपूर्वम्? काव्यं च रसान् प्रति भावकमिति यदुच्यते, तत्र भवतैव भावनादुत्पत्तिपक्ष एव प्रत्युज्जीवितः। न च काव्यशब्दानां केवलानां भावकत्वम्, अर्थापरिज्ञाने तदभावात्। न च केवलानामर्थानाम्, शब्दान्तरेणार्प्यमाणत्वे तदयोगात्। द्वयोस्तु भावकत्वमस्माभिरेवोक्तम्। 'यत्रार्थः शब्दो वा तमर्थं व्यङ्क्तः' इत्यत्र। तस्माद्व्यञ्जकत्वाख्येन व्यापारेण गुणालङ्कारौचित्यादिकयेतिकर्तव्यतया काव्यं भावकं रसान् भावयति, इति त्र्यंशायामपि भावनायां करणांशे ध्वननमेव निपतति। भोगोऽपि न काव्यशब्देन क्रियते, अपि तु घनमोहान्ध्यसङ्कटतानिवृत्तिद्वारेणास्वादापरनाम्नि अलौकिके द्रुतिविस्तरविकासात्मनि भोगे कर्तव्ये लोकोत्तरे ध्वननव्यापार एव मूर्धाभिषिक्तः। तच्चेदं भोगकृत्त्वं रसस्य ध्वननीयत्वे सिद्धे दैवसिद्धम्। रस्यमानतोदितचमत्कारानतिरिक्तत्वाद्भोगस्येति। सत्त्वादीनां चाङ्गाङ्गिभाववैचित्र्यस्यानन्त्याद्द्रुत्यादित्वेना-

स्वादगणना न युक्ता । परब्रह्मास्वादसब्रह्मचारित्वं चास्त्वस्य रसास्वादस्य । व्युत्पादनं च शासनप्रतिपादनाभ्यां शास्त्रेतिहासकृताभ्यां विलक्षणम् । यथा रामस्तथाहमित्युपमानातिरिक्तां रसास्वादोपायस्व-प्रतिभाविजृम्भारूपां व्युत्पत्तिमन्ते करोतीति कमुपालभामहे । तस्मात्स्थितमेतत् – अभिव्यज्यन्ते रसाः प्रतीत्यैव च रस्यन्त इति । तत्राभिव्यक्तिः प्रधानतया भवत्वन्यथा वा । प्रधानत्वे ध्वनिः, अन्यथा रसाद्यलङ्काराः । तदाह – मुख्यमर्थमिति । व्यवस्थिता इति । पूर्वोक्त-युक्तिभिर्विभागेन व्यवस्थापितत्वादिति भावः ॥ ४ ॥

लोचन

(शंका–) पण काय हो, 'अंगी म्हणून प्रत्ययास येणारा (रस-भावादि)' असे तुम्ही (तिसऱ्या कारिकेमध्ये व तीवरील वृत्तीमध्ये) म्हणता, तेव्हा रसादि हे काव्यामध्ये काही वेळा अंग म्हणूनहि असू शकतात काय व असू शकल्यास त्यांचे निराकरण करण्यासाठी 'अंगी म्हणून प्रत्ययास येणारा' हे विशेषण वापरण्यात आले आहे की काय?' अशी शंका कल्पून त्या शंकेचे समाधान व्हावे या हेतूने वृत्तिकार 'आता...' इ. शब्दांनी विवेचनास प्रारम्भ करितात. रसवत्, प्रेयस्, ऊर्जस्वि, समाहित या अलङ्कारांच्या रूपात जर रसादि हे येत असतील, तर ते अंगभूत असतात, हा आशय; आणि या वाक्याच्या द्वारा 'रसवत्' वगैरे अलंकारांमध्ये रसध्वनीचा अन्तर्भाव होत नाही हे वृत्तिकार सुचवितात. कारण, समासोक्ति वगैरे अलंकारांमध्ये ध्वनीचा समावेश होऊ शकत नाही हे पूर्वी[२] दाखविलेच आहे. वाच्यार्थ आणि वाचक शब्द आणि त्यांच्या सौंदर्यास कारणीभूत होणारी अंगे असा हा द्वंद्व समास आहे. वृत्तीत देखील शब्द आणि (शब्दांचे) अलंकार आणि (वाच्य) अर्थ आणि (त्याचे) अलंकार असा द्वंद्व समास समजावा.[३] 'असे मानले गेले आहे' म्हणजे हे पूर्वीच[४] सांगितले गेले आहे, असा आशय.

(शंका–) पण काय हो, (रसप्रतीतीच्या बाबतीत) भट्टनायकाने म्हटले आहे की– 'रस हा जर (सहृदयाचा स्वतःचा म्हणून प्रत्ययास न येता) दुसऱ्या कोणाचा तरी (म्हणजे अनुकार्य पात्र किंवा नट यांचा)

म्हणून प्रत्ययास येत असता, तर रसिक त्या रसाचे बाबतीत अलिप्तच राहिला असता ! आणि रामादिकांची कृत्ये ज्यात वर्णिलेली असतात अशा काव्यांच्या वाचनाने तो रस काही वाचकाला स्वतःचा म्हणून प्रत्ययास येत नाही.[5] शिवाय तो स्वतःच्या ठिकाणी असलेला म्हणून प्रतीत होत असता, तर ' रस (म्हणजे रत्यादिभाव) स्वतःच्या ठिकाणी उत्पन्न होतो ' असे मान्य केल्यासारखे होईल ! आणि असे मान्य करणे योग्य नाही, कारण सीता ही काही रसिकाचा ' विभाव ' होऊ शकत नाही.[6] यावर तुम्ही जर असे म्हणाल की, ' रसिकाच्या ठिकाणी रत्यादि वासनांची जागृति करावयास कारण असलेला विभाव म्हणजे ' रमणीत्व ' हा साधारण धर्म होय,' तर आम्ही असे विचारतो की, देवतादिकांच्या वर्णनाच्या बाबतीत तो (म्हणजे रमणीत्व हा) धर्मदेखील सर्वसामान्य रसिकाचा विभाव कसा होईल?[७] आणि (काव्य – नाटक वाचत असताना) मध्येच रसिकाला स्वतःच्या कान्तेची आठवण होते, असेही नाही.

आणि रामादि लोकोत्तर वीर पुरुषांचे समुद्रावर सेतु बांधणे वगैरे पराक्रम हे जे (वीररसाचे उद्दीपन) विभाव, त्यांचे ' साधारणीभवन '[८] (सामान्य मानव असलेल्या रसिकांच्या बाबतीत) कसे होऊ शकणार ? आता उत्साह वगैरेंनी संपन्न अशा रामाची रसिकांना आठवण होते (व त्यामुळे वीररसाची प्रतीति होते) असे म्हणावे, तर तेही शक्य नाही, कारण राम ही व्यक्ति रसिकांनी पूर्वी कधीच अनुभवलेली नसते. आणि (काव्यातील) शब्दांवरून (रामाच्या) उत्साहाचे जे ज्ञान होते, त्यामुळे काही रसिकाला (वीरादि) रसांचा आस्वाद मिळत नाही (लौकिक व्यवहारात) नायक – नायिकांचे विलास प्रत्यक्ष पाहून ज्याप्रमाणे प्रेक्षकाला रसाचा आस्वाद मिळणार नाही, त्याप्रमाणेच[९] आणि (रसिकाच्या मनात) ' रसाची उत्पत्ति होते ' या (लोल्लटाच्या) पक्षी[१०] करुणरसाची उत्पत्ति झाली असता रसिक दुःखी होतील[११] व मग करुणरसपूर्ण नाटक पाहावे अशी प्रेक्षकांना पुन्हा इच्छाच होणार नाही.[१२] म्हणून (लोल्लट म्हणतो त्याप्रमाणे) रसाची उत्पत्ति होत नाही. तसेच (व्यंजनावादी म्हणतो त्याप्रमाणे) रसाची अभिव्यक्तिसुद्धा होत नाही, कारण वासनारूपाने

असलेल्या शृंगाराची म्हणजे रतीची अभिव्यक्ति होते असे मानल्यास त्या रतीला कारणीभूत असलेले कांतादि विषय मिळविण्यासाठी[१३] रसिकांची अधिकाधिक धडपड सुरू होणार. त्यातही पुन्हा रसिकाच्या स्वत:च्याच अन्त:करणातील रस अभिव्यक्त होतो की दुसऱ्याच्या अंत:करणातील हा दोष पूर्वीप्रमाणेच[१४] कायम राहतो. म्हणून काव्या-मुळे रस हा 'प्रतीत' होत नाही, किंवा (लोल्लटमतानुसार) 'उत्पन्न' होत नाही, किंवा (व्यञ्जनावादी म्हणतो तसा) अभिव्यक्तही होत नाही. तर काव्यातील काव्यमय शब्द इतर (म्हणजे व्यवहारातील किंवा शास्त्रातील) शब्दांहून वेगळे असतात, ते त्या शब्दांमधील तीन प्रकारच्या सामर्थ्यांमुळे. त्या तीन सामर्थ्यांपैकी 'अभिधा' या शक्तीने (होणाऱ्या ज्ञानाचा) विषय 'वाच्यार्थ' हा होय. 'भावकत्व' या अंशाचा विषय रस वगैरे (म्हणजे स्थायिभाव, विभाव, अनुभाव इ.) व 'भोगकृत्व' (म्हणजे भोजकत्व) या व्यापाराचा आश्रय 'रसिक' हा होय.[१५] अशा रीतीने काव्यमय शब्दांचे व्यापार तीन प्रकारचे असतात. (आता) त्यांपैकी काव्यामध्ये जर 'अभिधा' हा एकच अंश असतो असे मानिले व (इतर म्हणजे भावकत्व व भोजकत्व या) दोन अंशांचे अस्तित्व मानिलेच नाही, तर शास्त्रीय ग्रंथांतून उपयोजिले जाणारे 'तन्त्र' वगैरे उपाय[१६] आणि काव्यात वापरले जाणारे श्लेष वगैरे अलंकार यांमध्ये वेगळेपणा तो काय राहिला? तसेच काव्यात उपनागरिकादि वृत्ति (म्हणजे अनुप्रासाचे प्रकार) वापरण्याचा काहीही उपयोग होणार नाही.[१७] आणि (काव्यामध्ये भावकत्व व भोजकत्व हे दोन व्यापार नसतील व सौंदर्यनिर्मिति हा हेतु नसेल, तर काव्यात) श्रुतिदुष्ट वगैरे दोष टाळावयाचे, ते कशासाठी?[१८] त्यामुळे रसांचे भावन (म्हणजे स्थायिभावांचे भावन) या नावाचा दुसरा व्यापार मानावाच लागतो. त्या व्यापारामुळे काव्यातील अभिधेला शास्त्रातील अभिधेहून वेगळेच स्वरूप प्राप्त होते. आणि स्थायिभावांच्या बाबतीतला काव्याचा तो 'भावकत्व' नावाचा व्यापार म्हणजे विभावादिकांचे 'साधारणीकरण' होणे, हाच.[१९] आणि रसाचे (म्हणजे स्थायिभावाचे) 'भावन' (म्हणजे साधारणीकरण) झाल्यावर त्या रसाचा 'भोग' घेतला जातो. तो भोग 'अनुभव', 'स्मरण' इत्यादि ज्ञानांहून[२०] अगदी निराळा, चित्ताची द्रुति[२१],

विस्तार व विकास या स्वरूपाचा असतो. रजस्, तमस्, यांच्या कमी अधिक प्रमाणाशी मिश्रित अशा सत्त्वगुणाच्या प्राचुर्याने युक्त असलेल्या, रसिकाच्या आनंदमय चैतन्यस्वरूपात विश्रांति पावणे असे त्या ‘भोगा ’चे स्वरूप असते.[२२] तो आस्वाद परब्रह्मानंदाच्या जवळपास जाणारा (म्हणजे त्याच्यासारखा) असतो. तोच म्हणजे भोजकत्व हा व्यापार काव्यामध्ये प्रधान व्यापार होय. तो ‘भोगकृत्त्व ’ व्यापार सिद्ध स्वरूपाचा असतो (कारण आनन्दरूपी आत्मा सिद्धस्वरूपी आहे.[२३]), साध्यस्वरूपी नाही. आणि व्युत्पत्ति (म्हणजे काव्यामुळे प्राप्त होणारे चार पुरुषार्थांसंबंधीचे मार्गदर्शन) हे (प्रधान अंशाच्या मानाने) गौणच प्रयोजन होय.[२४]

या मतावर आमचे उत्तर असे :— पहिला मुद्दा हा की, रसाच्या स्वरूपाच्या बाबतीतच विद्वानांची मते वेगवेगळी आहेत. कारण (१) काही लोक[२५] असे म्हणतात ,की— रस हा अनुकार्य पात्राच्याच ठिकाणी असतो. आधी (म्हणजे परिपोष होण्यापूर्वी) त्याला ‘स्थायी ’ असे म्हटले जाते. आणि विभाव, अनुभाव, व्यभिचारिभाव यांच्याशी संयोग पावल्यामुळे तो परिपुष्ट होतो. (आणि असा तो परिपुष्ट झाला, म्हणजे त्याला ‘रस ’ म्हणतात.) नाट्यात त्याचे चित्रण केले जात असल्यामुळे त्याला ‘नाट्यरस ’ अशी संज्ञा दिली गेली आहे.[२६]

(२) दुसरे काही असे म्हणतात की– स्थायी काय किंवा व्यभिचारिभाव काय, दोन्ही ‘चित्तवृत्ति ’ च होत. चित्तवृत्ति ह्या प्रवाहस्वरूपाच्या असल्यामुळे (म्हणजे टिकून राहणाऱ्या नसल्यामुळे) एक चित्तवृत्ति दुसऱ्या चित्तवृत्तीचा परिपोष कसा करणार ? (कारण त्यांपैकी कोणतीही चित्तवृत्ति स्थिर स्वरूपाची नसल्याने ती दुसरीमुळे परिपुष्ट कशी होणार ?[२७]) शिवाय, विस्मय, शोक, क्रोध या भावना अशा नाहीत की, ज्यांचा परिपोष क्रमाने होत जातो (म्हणजे त्या भावना प्रथम सौम्य असतात आणि मग त्या अधिकाधिक उत्कट होत जातात असे नसून उलट त्या प्रथम तीव्र आणि मग मन्द होत जाणाऱ्या असतात[२८]). म्हणून अनुकार्य पात्राच्या ठिकाणी रस असणे शक्य नाही. आणि अनुकर्ता म्हणजे अनुकरण करणारा जो नट, त्याच्या

ठिकाणी (दुय्यमपणाने) रस असतो असे (भट्टलोल्लटाचे मत) मान्य केले, तर नटाचे लक्ष (नाटचधर्मी म्हणून त्याने करावयाच्या असलेल्या हालचालीतील व गाणे वगैरेमधील) लय इत्यादींकडे लागणारच नाही. आणि तो रस (म्हणजे स्थायिभाव) सामाजिकाच्या ठिकाणी उत्पन्न होतो असे मानिले, तर त्यात चमत्कार (म्हणजे विस्मयकारक आनन्द) तो कोठून असणार ? उलटपक्षी करुणप्रसंग वगैरेंच्या[२९] वेळी सामाजिकाला दुःखच मिळणार ! म्हणून हे (म्हणजे भट्टलोल्लटाचे) मत बरोबर नाही. मग कोणते मत बरोबर आहे ? याच्या म्हणजे स्थायिभावाच्या अवस्था अनन्त[३०] असू शकतात. म्हणून त्यांपैकी विशिष्ट, ठराविक अशा एका अवस्थेचे (बिनचूक) अनुकरण करणे (नटाला) शक्य नाही. व (ते त्याला करिता आले असे मानिले तरी) त्यापासून (मूळ पात्राच्या व सामाजिकाच्या ठिकाणी रस असतो हे सिद्ध करण्याच्या दृष्टीने) काही फायदाही होणार नाही, कारण राम वगैरे विशिष्ट व्यक्तीच्या स्थायिभावाचे हे अनुकरण आहे ही जाणीव प्रेक्षकाला झाल्यास तो नाटचप्रयोगाच्या बाबतीत उदासीनच राहील व त्यामुळे प्रेक्षकाला त्यापासून काही जीवनोपयोगी ज्ञान प्राप्त होणार नाही.

म्हणून क्षणाक्षणाला ज्याच्या अवस्था बदलत जातात, अशा स्थायिभावाशी विभाव, अनुभाव व व्यभिचारिभाव हे संयुक्त होऊन हा राम सुखी आहे' (म्हणजे या नटरूपी रामाच्या मनात सीतेविषयी रतिभाव आहे) असे जे स्मृतीहून वेगळे ज्ञान सहृदयाला अनुमानाने होते, व ज्यामुळे सहृदयाला आनंद प्राप्त होतो त्या ज्ञानालाच 'रस' म्हणतात.[३१] हा रतिभाव रामाचे अनुकरण करणाऱ्या नटाचे ठिकाणी आहे असे या ज्ञानाचे स्वरूप असते व ते ज्ञान केवळ नाटकाच्या संदर्भातच होते. अशा रीतीने जाणल्या जाणाऱ्या रसाला म्हणजे स्थायिभावाला एकाच गोष्टीची आवश्यकता असते व ती गोष्ट म्हणजे मूळ पात्राहून निराळा न मानिला गेलेला नट आणि अशा नटाच्या ठिकाणी रसाचा म्हणजे स्थायिभावाचा आस्वाद घेणारा सामाजिक, ही होय. त्यामुळे रस हा नाटकातच असतो,[३२] अनुकार्यपात्र वगैरेंमध्ये (म्हणजे अनुकार्यपात्र व सामाजिक यांचे ठिकाणी) कधीच नसतो असे काहींचे

मत आहे.

(३) पण दुसरे कोणी म्हणतात–

भिंतीवर ज्याप्रमाणे 'हरिताल'[३३] वगैरे रंगद्रव्यांच्या साहाय्याने घोड्याचा आभास उत्पन्न करावा, त्याप्रमाणे मूळ पात्राचे अनुकरण करणाऱ्या नटाच्या अभिनय वगैरे साधनांमुळे त्या नटाच्या ठिकाणी स्थायी भावाचा जो आभास होतो तोच लौकिक जीवनातील स्थायी भावापेक्षा आगळा[३४] असतो, म्हणून आस्वाद नावाच्या प्रतीतीने सामाजिकाकडून आस्वादिला जाऊ लागला, म्हणजे त्याला 'रस' म्हणतात. म्हणून 'नाट्यामुळे रस' असे नाट्यशास्त्रातील 'नाट्यरस' या समासाचे विवरण करावे.[३५]

(४) पण आणखी काहीजण म्हणतात –[३६] केवळ विभाव, अनुभाव हेच जर अभिनय वगैरे विशिष्ट साधनसामग्रीच्या द्वारे सामाजिकापुढे मांडले गेले व त्यांनी विभावित (म्हणजे विभावांमुळे जागृत) केली जाणारी व अनुभावित (म्हणजे अनुभावामुळे सामाजिकांना प्रतीत) होणारी जी (अनुकार्यपात्रामधील) रत्यादिस्वरूपी स्थायी चित्तवृत्ति, तिला उचित असलेल्या सामाजिकाच्या अंतःकरणातील वासनेशी (म्हणजे संस्काररूपाने असणाऱ्या स्थायी चित्तवृत्तींशी) ते विभाव - अनुभाव संबद्ध[३७] होतात. असे ते विभाव–अनुभाव सामाजिकाच्या आनन्दरूपी चर्वणेचा विषय झाले, म्हणजे त्यांनाच 'रस' म्हणावे. म्हणून (या मतानुसार) नाट्य हाच रस होय (५) आणखी दुसरे केवळ विभावाला,[३८] (६) इतर कोणी केवळ अनुभावाला[३९] (७) तर कोणी केवळ स्थायिभावाला,[४०] (८) तर आणखी कोणी व्यभिचारिभावाला,[४१] (९) तर आणखी काहीजण त्यांच्या संयोगाला,[४२] (१०) कोणी अनुकार्यपात्राला,[४३] (११) तर कोणी या सर्वांच्या समुदायालाच 'रस' म्हणतात[४४] असो, आता याहून अधिक विवरण पुरे.

आणि काव्यामध्येसुद्धा स्वभावोक्ति व वक्रोक्ति हे जे दोन वर्णनाचे प्रकार असतात, ते नाट्यातील अनुक्रमे 'लोकधर्मी' व 'नाट्यधर्मी'[४५] या दोहोंसारखे असतात. ह्या दोन प्रकारांमुळे आणि अलौकिक[४६] अशा प्रसन्न, मधुर किंवा ओजस्वी (म्हणजे प्रसाद, माधुर्य

व ओज या गुणांनी युक्त असलेल्या) शब्दांनी विभावादिक हे वाचका-पुढे मांडले जात असल्यामुळे काव्यातही रसप्रतीतीचा प्रकार असाच म्हणजे नाटचातल्यासारखाच असतो. किंवा काव्यातून होणाऱ्या रस-प्रतीतीचे स्वरूप नाटचातून होणाऱ्या रसप्रतीतीच्या स्वरूपापेक्षा निराळे आहे असे मानिले तरी चालेल, कारण काव्यातून अवलंबिली जाणारी रसप्रतीति घडविण्याची साधने नाटचातील साधनांपेक्षा वेगळी असतात.[४७] पण काव्याच्या बाबतीतला रसप्रतीतीचा प्रकार ह्याच (म्हणजे पुढे सांगितल्याप्रमाणे) असतो.

असे असल्यामुळे भट्टनायकाने आधीच्या तीन पक्षांच्या बाबतीत रसाची प्रतीति, उत्पत्ति आणि अभिव्यक्ति या सामाजिकाच्या स्वतःच्या ठिकाणी असतात की दुसऱ्याच्या ठिकाणी असा विकल्प उत्पन्न करून जे दोष दाखविले ते पहिल्याच म्हणजे भट्टनायकाच्याच[४८] पक्षाला लागू पडतात. आणि कोणत्याही पक्षाचे मत घेतले, तरी त्यात सामाजिकाला रसाची प्रतीति होते ही गोष्ट कोणालाही नाकबूल करिता येणार नाही. कारण, एखाद्या गोष्टीचे ज्ञानच झाले नाही, तर त्या गोष्टीसंबंधी काही विधान करणे शक्य नसते, जसे पिशाचाचे प्रत्यक्ष ज्ञान होणे शक्य नसल्याने त्याच्याविषयी काही बोलणे अशक्य असते, तसे.

परंतु ज्याप्रमाणे प्रत्यक्ष प्रमाणाने होणारे, अनुमानाने प्राप्त होणारे, शास्त्रांपासून मिळणारे, अंतःप्रेरणेमुळे लाभणारे[४९] व योग्यांना योग-सामर्थ्याने[५०] मिळणारे प्रत्यक्ष ज्ञान ही सर्व 'ज्ञान' या दृष्टीने एकच असली तरी त्यांची साधने निरनिराळी असल्याने ती ज्ञाने वेगवेगळी मानण्यात येतात, त्याप्रमाणे ही म्हणजे रसाची प्रतीति देखील चर्वणा, आस्वादन किंवा भोग[५१] या नावांनी ओळखली जाणारी, प्रात्यक्षिक इ. प्रतीतींहून आगळी असली, तर त्यात काय बिघडले? त्या रसप्रतीतीला कारणीभूत असणाऱ्या, हृदयसंवाद इत्यादींच्या सहकार्याने कार्य करणाऱ्या विभावादि सामग्रीचे स्वरूप अलौकिकच असते. 'रस प्रतीत होतात' हे म्हणणे 'भात शिजवला जातो' या स्वरूपाचेच आहे[५३], कारण स्थायिभाव हा प्रतीत झाला, म्हणजेच त्याला 'रस' म्हणा-वयाचे. आणि विशिष्ट प्रकारची[५४] प्रतीति म्हणजेच 'आस्वाद' होय.

आणि नाट्यामध्ये ती रसनारूप प्रतीति जरी प्रारंभी व्यवहारात अनुमानाने होणाऱ्या ज्ञानावर (आणि शब्दांमुळे होणाऱ्या वाच्यार्थ इत्यादींच्या ज्ञानावर) आपले साधन म्हणून अवलंबून असली,[५५] तरी त्या ज्ञानांहून ती वेगळीच होय. नाट्यातल्याप्रमाणे काव्यातून होणाऱ्या रसप्रतीतीलासुद्धा जरी सुरवातीस शब्दांमुळे होणाऱ्या इतर प्रतीतींचे[५६] सहकार्य आवश्यक असले, तरी ती त्या इतर प्रतीतींहून वेगळीच होय.[५७]

म्हणून पूर्वपक्षाला [५८] उभे राहावयास जागाच नाही व म्हणूनच त्याचे निराकरण झाले. रामादिक लोकोत्तर पात्रांच्या कृत्यांशी सर्व-जणांच्या हृदयांचा मेळ बसू शकत नाही हे (भट्टनायकाने[५९]) विधान फारच अविचारीपणाचे आहे, कारण मानवी मन हे (असंख्य पूर्व-जन्मांतील) नानाविध संस्कारांनी समृद्ध झालेले असते.[६०] म्हटलेच आहे[६१] –'इच्छा ही नित्य असल्यामुळे वासना ह्या अनादि असतात.[६२] त्यांच्यामध्ये (असंख्य) जन्म, स्थल, काल यांमुळे चालू जीवनक्रमातील परिस्थितीहून पुष्कळ अंतर असले तरी, त्या ( योग्य कारण मिळताच ) जागृत होऊन लगेच कार्य करितात, कारण संस्कार आणि स्मृति यांमध्ये अत्यंत निकटचा संबंध असतो.[६३] त्यामुळे (म्हणजे वासना या नित्य असल्यामुळे) रसाची प्रतीति होते, हे तर नाकबूल करिता येणार नाही. आणि ती रस-प्रतीति चर्वणा या स्वरूपात सहृदयांच्या ठिकाणी उत्पन्न[६४] होते. त्या प्रतीतीचा विषय जो सामाजिकाच्या मनातील स्थायिभाव, तो अभिव्यक्त करण्याचे काम वाच्य अर्थ आणि वाचक शब्द यांचाच पण अभिधा, लक्षणा व तात्पर्य यांहून वेगळा असलेला व्यंजनाव्यापारच करितो. आणि तुम्ही ज्याला काव्याच्या ठिकाणी असणारा व रसाचा (म्हणजे स्थायिभावाचा) भोग घडविणारा व्यापार म्हणता, त्या व्यापाराचे स्वरूप ध्वनन हेच[६५] आहे, दुसरे कोणतेही नाही. तुमचे 'भावकत्व' सुद्धा रसाला उचित अशा गुणा-लंकारांची योजना करणे हेच होय, हे आम्ही स्वतःच पुढे विस्ताराने सांगू.[६६] म्हणून (तुमच्या) या भावकत्वात नवीन काय आहे ? आणि काव्य हे रसांचे 'भावक' असते असे जे तुम्ही म्हणता, त्यात 'भावन म्हणजे उत्पन्न करणे' असे म्हणून तुम्हीच भट्टलोल्लटाच्या

'उत्पत्ति' पक्षाचेच पुनरुज्जीवन केले आहे.[६७] आणि (तुम्ही म्हणता त्याप्रमाणे) काव्यातील केवळ शब्दांचे ठिकाणी काही 'भावकत्व' असू शकत नाही,[६८] कारण त्या शब्दांचा जर अर्थच समजला नाही, तर भावकत्व शब्दांचे ठिकाणी उत्पन्न होऊ शकणार नाही. तसेच, केवळ अर्थही भावक असू शकत नाहीत, कारण त्या शब्दांशिवाय दुसऱ्या शब्दांनी ते अर्थ सांगितले गेले, तर त्या अर्थांचे ठिकाणी भावकत्व राहात नाही.[६८] ते भावकत्व शब्द व अर्थ या दोन्ही ठिकाणी असते हे आम्हीच (उद्द्योत १, १३ व्या कारिकेत) 'ज्या ठिकाणी वाच्य अर्थ स्वतःकडे व वाचक शब्द आपल्या वाच्य अर्थाकडे'....या शब्दांनी सांगितले आहे. म्हणून 'भावक' म्हणजे 'घडवून आणणारे' काव्य हे व्यंजकत्व नावाच्या व्यापाराच्या योगाने व गुण, अलंकार औचित्य, इत्यादींच्या योजनेचे सहकार्य लाभल्याने रसाची चर्वणा उत्पन्न करिते, म्हणून तीन अंशांनी युक्त असणाऱ्या 'भावने' मध्येही 'करण' हा जो अंश असतो, तो अंश म्हणजे 'व्यंजकत्व' हाच व्यापार होय.[६९] 'भोग' हाही काही काव्यातील फक्त शब्दांनी (म्हणजे अभिधेने) घडवून आणिला जात नाही; तर निबिड अज्ञानाचे आवरण दूर करून,[७०] आस्वाद हे ज्याचे दुसरे नाव आहे असा, अलौकिक असलेला, द्रुति, विस्तार व विकास या स्वरूपाचा 'भोग' घडवितांना काव्याचा ध्वनन हाच व्यापार अग्रगण्य असतो. अशा रीतीने रस हा ध्वनितच होतो हे सिद्ध झाल्यावर भोगकृत्त्व म्हणजे काव्याचे आस्वादजनकत्व हे आपोआपच म्हणजे अटळपणे सिद्ध होते,[७१] कारण स्थायिभाव आस्वादिला जाण्यामुळे सामाजिकाच्या मनात जो आनंदमय विस्मय निर्माण होतो, त्याहून 'भोग' हा निराळा नाही. आणि सत्त्व, रज, तम यांमध्ये अंगप्रधान-संबंध अनन्त प्रकारांनी संभवू शकत असल्यामुळे आस्वादाच्या चित्तवृत्तिरूपी अवस्था अनंत होतील, म्हणून द्रुति वगैरे मोजक्याच चित्तवृत्तींच्या रूपात आस्वादाचे मोजकेच प्रकार मानणे योग्य होणार नाही.[७२] मात्र हा रसाचा आस्वाद परब्रह्माच्या आस्वादासारखा असतो (हे जे वर भट्टनायकाने पृ. ३५० वर म्हटले आहे) ते मान्य करावयास आमची हरकत नाही. काव्यापासून मिळणारे ज्ञान मात्र वेदादि शास्त्रांनी दिलेले आदेश किंवा इतिहासादि ग्रंथांनी दिलेली विषयाची

माहिती देणे याहूनही आगळेच असते. (ते अगदी कमी महत्त्वाचे असते असे तुम्ही समजू नका.) "जसा राम वागला तसेच मी वागावयास पाहिजे" या उपमेने प्राप्त होणाऱ्या मार्गदर्शनाखेरीज रसास्वादाचे साधन असलेल्या सहृदयाच्या प्रतिभेला विकास या स्वरूपाचा लाभही सहृदयाला अटळपणे होतो,[७३] याबद्दल आम्ही कोणाला नावे ठेवावी ?

म्हणून आता हे निश्चित झाले की, रस हे अभिव्यक्तच केले जातात व त्यांची प्रतीति म्हणजे त्यांच्या आस्वादाहून भिन्न काहीही नसते.[७४] मग ती रसांची अभिव्यक्ति (काव्यात) प्राधान्याने होवो किंवा अप्रधानपणे होवो. प्राधान्याने झाली, तर त्या काव्याला रसादि-ध्वनि म्हणावयाचे व प्राधान्याने होत नसली तर तेथे 'रसवत्' इ. अलंकार आहेत असे म्हणावयाचे (व ते काव्य गुणीभूतव्यंग्य होय, असे मानावयाचे) हाच आशय वृत्तिकारांनी ('शब्दालंकार व अर्थालंकार हे) मुख्य असलेल्या रसभावादि व्यंग्य अर्थाचे पोषक असतात' या शब्दांनी व्यक्त केला आहे. '(ध्वनीहून) भिन्न असलेले (शब्दार्थालंकार व गुण) असे म्हणण्याचे कारण शब्दालंकार व गुण हे ध्वनीहून भिन्न आहेत हे पूर्वी मांडलेल्या युक्तिवादाने सिद्ध केले आहे.[७५]

**टीपा**

१. तुलना : उद्द्योत १, पृ. १३४.

२. पाहा, पृ. १७५ ते २४४

'त्यांमध्ये ध्वनीचा अंतर्भाव होत नाही' असे म्हणण्याचा हेतु इतकाच की, ती उदाहरणे 'गुणीभूत- व्यङ्ग्याची' आहेत, ध्वनीची नाहीत.

३. 'वाच्यवाचकचारुत्वहेतु' याचे विवरण वृत्तीत 'शब्दार्थालङ्काराः (गुणाश्च)' या शब्दांनी केले आहे. या दोन्ही द्वंद्व समासांचा विग्रह वर अभिनवगुप्तांनी करून दाखविला आहे.

४. उद्द्योत १, कारिका १३ मध्ये.

५. कारण रामादि व्यक्ति भूतकाळात होऊन गेलेल्या, किंवा प्रेक्षकाशी संबंध नसलेल्या अशा असतात. तेव्हा त्यांच्या जीवनातील प्रसंगांच्या वाचनाने रसिकाला आपल्याच ठिकाणी रसाचा अनुभव कसा येणार ?

६. कारण सीतेसारख्या व्यक्तीचा प्रेक्षकाशी कसलाही संबंध येऊ शकत नाही.

७. कारण प्रेक्षक हा देवतादिकांकडे पूज्यबुद्धीने पाहात असतो, सुंदर स्त्रिया या बुद्धीने पाहात नाही. म्हणून देवता या साधारणीकृत रूपातही प्रेक्षकाचा

विभाव होऊ शकणार नाहीत.

८. लोचनातील 'साधारण्य' या शब्दाचा अर्थ आम्ही 'साधारणीभवन' असा असा केला आहे. या शब्दाचा अभिनवगुप्तांनी तीन निरनिराळ्या प्रकारांनी अर्थ लाविला आहे— (१) पहिला म्हणजे मूळ पात्रांच्या ठिकाणची देश, काल, इ. वैशिष्ट्ये नाहीशी होऊन (म्हणजे प्रेक्षकाला त्यांचा विसर पडून) त्या पात्रांचे व त्यांच्या मानसिक स्थितीचे सर्वांना आकलन होणे. (२) मूळ पात्रांच्या भावनांचे आवाहन सर्व प्रेक्षकांपर्यंत पोहोचणे व त्यांनी त्यांच्याशी समरस होणे. (३) तो आनंद एकाच प्रेक्षकाचा न राहता सर्व प्रेक्षकांचा होऊन त्यामुळे तो शतगुणित झालासा वाटणे. यांपैकी १ ला व २ रा अर्थ भट्टनायकास अभिप्रेत असावेत. साधारणीकरणाचा सिद्धांत जरी उपलब्ध साहित्यात भट्टनायकानेच प्रथम विवेचिलेला दिसतो, तरी त्याचे बीज भरताच्या नाट्यशास्त्राच्या ७ व्या अध्यायातील ६ व्या कारिकेनंतरच्या गद्यभागामध्ये एभ्यश्च (भावेभ्यः) '**सामान्यगुणयोगेन' रसा निष्पद्यन्ते।** या वाक्यात स्पष्टपणे सापडते. प्रा. कंगले मात्र 'साधारणीकरणाच्या या सिद्धांताला भरताच्या नाट्यशास्त्रात आधार नाही' असे 'रसभावविचार', उपोद्घात, पृ. ६० वर म्हणतात.

९. प्रत्यक्षात जर एखादा प्रणयप्रसङ्ग दिसला तर उलट लज्जा, उबग इ. भावनाच निर्माण होण्याचा संभव असल्याने रसप्रतीति होण्याचा प्रश्नच उरत नाही. पाहा, अभिनवभारती, रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. १४७.

१०. रस हा पात्राच्या ठिकाणी उत्पन्न होतो असे भट्टलोल्लटाचे म्हणणे. म्हणजे रस हा 'परगत' व 'उत्पन्न' होणारा, असे त्याचे मत. यांपैकी रस परगत असतो या अंशाचे खंडन पृ. ३४७ व ३४८ वर भट्टनायकाचे मत मांडताना प्रारंभीच केले आहे

११. भट्टनायकाचे हे म्हणणे तितकेसे समर्पक वाटत नाही, कारण लोल्लटाच्या मते रस हा पात्राच्या ठिकाणी उत्पन्न होतो; रसिकाच्या मनात उत्पन्न होतो असे तो म्हणत नाही. करुणरसासंबंधीची जी अडचण येथे उपस्थित केली आहे तिचा उल्लेख अभिनवभारतीत भट्टनायकाचे मत मांडताना केलेला आढळत नाही, हे मुद्दाम लक्षात घेण्यासारखे आहे.

१२. या संबंधात पाहा, दशरूपक, ४–४४ वरील 'अवलोक' टीका; साहित्यदर्पण, ३–९, व रसगङ्गाधर, काव्यमाला आवृत्ति, पृ. ३१.

१३. मूळातल्या 'विषयार्जनतारतम्यप्रवृत्ति' याचा आम्ही वर केलेला अनुवाद 'बालप्रिया' टीकेला अनुसरून केला आहे. Gnoli व कंगले हे याचा अनुवाद निराळ्या तऱ्हेने म्हणजे 'विषयाचे (म्हणजे रसाचे) अधिकाधिक प्रमाणात होणारे आकलन' असा करितात. पण **अर्जन व प्रवृत्ति या** दोन शब्दांमुळे

'मिळविण्याचा प्रयत्न' हा आम्ही केलेला अनुवादच योग्य आहे असे आम्हाला वाटते.

१४. पूर्वीप्रमाणेच, म्हणजे भट्टनायकाच्या मताला (पृ. ३४७–३४८ वर) प्रारंभ करिताना मांडलेल्या विकल्पाप्रमाणेच.

१५. 'भावकत्व' व 'भोगकृत्त्व' या दोहोंच्या संबंधात 'विषय' हा एकच शब्द वापरला आहे. याचा अर्थ 'आस्वादनक्रियेचे अनुक्रमे प्रधानकर्म व गौणकर्म असा करणे भाग आहे. म्हणजे भोगकृत्त्व या व्यापारामुळे रसाच्या (म्हणजे प्रधान कर्माचा) रसिकाला (म्हणजे गौणकर्माला) आस्वाद मिळतो, हे तात्पर्य.

१६. वामनाच्या 'काव्यालंकारसूत्रा'मध्ये ४–३–७ येथे 'तन्त्र' हा शब्द वापरला असून त्यावरील 'कामधेनु' टीकेमध्ये अनेकोपकारकारि सकृदुच्चारणम् असे त्याचे विवरण केले आहे. म्हणजे 'तन्त्र' याचा अर्थ एकच शब्द किंवा शब्दसमूह दोन अर्थांनी वापरला जाणे हाच आहे. या उपायाचा अवलंब शास्त्रग्रंथात अनेकवेळा केला जातो. उदा. पाणिनीचे हलन्त्यम् (१–३–३) हे सूत्र. या सूत्रातील हल् या शब्दाचे (१) कोणतेही व्यंजन व (२) शिवसूत्रातील शेवटचे, हल् हे सूत्र असे दोन अर्थ केले जातात. तसेच शास्त्रामध्ये उपमा, दृष्टान्त, विरोध, व्यतिरेक वगैरे उपायांचाही अवलंब केला जातो. पण शास्त्रामध्ये हे उपाय केवळ व्यवहारोपयोगाच्या दृष्टीनेच वापरले जातात, सौंदर्यनिर्मितीसाठी नव्हे. उलट काव्यामध्ये तन्त्रादि उपाय केवळ सौंदर्यनिर्मितीसाठीच योजण्यात येतात, म्हणून त्यांना श्लेषादि 'अलंकार' म्हणजे काव्यशोभाकर धर्म असेच म्हणण्यात येते. म्हणूनच काव्यं ग्राह्यमलंकारात् । सौन्दर्यमलङ्कारः । असे वामनाने (१—१—१ व २), आणि वैचित्र्यं चालङ्कारः असे मम्मटाने १० व्या उल्लासात म्हटले आहे. पुत्रेण सह आगतः पिता । हे व्यवहारातील वाक्य सहोक्तीचे उदाहरण असेल, पण 'सहोक्ति अलंकारा'चे नाही. काव्यामध्ये सौन्दर्य उत्पन्न होते, ते शब्दांच्या 'भावकत्व' या व्यापारामुळेच होते असे भट्टनायक म्हणतो.

१७. अनुप्रासांचे सर्व प्रकार काव्यातच वापरले जातात व ते भावकत्व या व्यापाराला वाव देण्यासाठीच, म्हणजे सौन्दर्यनिर्मिति करण्यासाठीच वापरले जातात. शास्त्रीय ग्रंथात अनुप्रास वापरण्याचा प्रश्नच येत नाही, कारण तेथे सौंदर्यनिर्मिति हा उद्देशच नसतो.

१८. श्रुतिदुष्टादि दोष काव्यात टाळले जातात, ते 'भावकत्व' व्यापाराला वाव मिळून रसप्रतीति व्हावी, रसहानि होऊ नये, म्हणूनच.

१९. पृ. ३५७ वरील आठवी टीप पाहा. तेथे सांगितलेल्या 'साधारणीकरणा'च्या

तीन अर्थांपैकी पहिले दोनच भट्टनायकाला अभिप्रेत असावेत.

२०. न्यायशास्त्राप्रमाणे 'अनुभवा' मध्ये प्रत्यक्ष, अनुमिति, उपमिति व शब्दज्ञान या सर्वांचा समावेश होतो, म्हणून **प्रतिपत्तिभ्यः** असे बहुवचन वापरले आहे.

२१. द्रुति, विस्तार व विकास या शब्दांचा वापर ध्वन्यालोकातील कारिका किंवा वृत्ति यांमध्ये केलेला आढळत नाही. पण उद्द्योत २, कारिका ८ मधील आर्द्रतां याति याचा अर्थ 'द्रुति' हाच आहे. कारिका ९ मधील दीप्तीचा संबंध चित्ताच्या 'विस्तारा'शी आहे हे **ओजश्चित्तस्य विस्ताररूपं दीप्तत्वमुच्यते ।** या (साहित्यदर्पण, ८–४) वाक्यावरून स्पष्ट होते. 'विकास' या शब्दाचा संबंध 'प्रसाद' या गुणाशी आहे, असे रसगङ्गाधर, काव्यमाला आवृत्ति (१९३९), पृ. ६६ वरील **गुणानां चैषां द्रुतिदीप्तिविकाख्याः तिस्रः चित्तवृत्तयः क्रमेण प्रयोज्याः ।** या वाक्यावरून आणि काव्यप्रकाशाच्या आठव्या उल्लासावरील आपल्या टीकेत झळकीकरांनी म्हटले आहे (**प्रसादः स्वच्छतारूपः—विकासरूपः—गुणः**), त्यावरून स्पष्ट होते. यासंबंधी अधिक माहिती उद्द्योत २, कारिका ८ व ९ यांवरील आमच्या टीपेमध्ये पाहावी.

२२. पाहा, 'रसभावविचार' कंगले आवृत्ति, पृ. १४७, तसेच काव्यप्रकाश, झळकीकर आवृत्ति, पृ. ९० व साहित्यदर्पण, ३–२ व ३.

२३. येथे 'भोगकृत्त्व' या व्यापाराला भट्टनायकाने 'सिद्धरूप' असे म्हटले आहे. पण व्यापार (म्हणजे क्रिया) कधीही सिद्धरूप असू शकत नाही, तर साध्यरूपच असतो. म्हणून येथे 'भोगकृत्त्व' व्यापाराने 'भोग' (म्हणजे आस्वाद) लक्षित होतो असे मानिले पाहिजे. या आस्वादाला सिद्धरूप म्हणावयाचे कारण तो आत्मानंदाचा आविष्कार असतो व आत्मानंद ही सिद्धवस्तु आहे, साध्यरूप नाही.

उलट अभिनवभारतीमध्ये (पाहा, रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. १७४) अभिनवगुप्तांनी रसाच्या बाबतीत **न तु सिद्धस्वभावः** असे म्हटले आहे. म्हणजे रसानुभव हा सिद्धरूपी नसतो, तर तेवढ्या वेळापुरताच असतो. म्हणूनच अभिनवगुप्तांनी **चर्व्यमाणतैकसारः, न तु सिद्धस्वभावः, तात्कालिकः एव, न तु चर्वणातिरिक्तकालावलम्बी, स्थायिविलक्षणः एव रसः** असे रसाचे वर्णन केले आहे. पूर्वी (पृ. २७९ वर) **इह तु विभावादिचर्वणा अद्भुतपुष्पवत् तत्कालसारा एव उदिता, न तु पूर्वापरकालानुबन्धिनी इति लौकिकास्वादात् अन्य एव रसः** असे अभिनवगुप्तांनी म्हटले होते.

पृ. १२४ वर (**रसः**) **रस्यमानतैकप्राणः सिद्धस्वभावसुखादिविलक्षणः परिस्फुरति ।** असे शब्द आहेत. 'सिद्धस्वभाव' हे रसाचे विशेषण समजता येत नाही.

कारण तसे केल्यास अभिनवभारतीतील न तु सिद्धस्वभावः या विधानाशी विरोध येईल. म्हणून 'सिद्धस्वभाव' हे सुखादिकांचे विशेष समजून 'सिद्ध' या शब्दाचा 'प्रसिद्ध', 'लोकांना सुपरिचित असलेली' (लौकिक सुखे) असा अर्थ करणे प्राप्त आहे व तसाच आम्ही पूर्वी पृ. १२७ वर केला आहे.

पण भट्टनायकाने 'भोगकृत्त्व' व्यापाराला 'सिद्धरूप' म्हटले आहे. त्याचे कारण (चिदानंद हा सिद्धस्वरूप असतो, हे) वर दिलेच आहे. चिदानंद हा सिद्धरूपी आहे हे अभिनवगुप्तांनाही अमान्य नाही. तेव्हा रसाचा चिदानंद या स्वरूपाच्या दृष्टीने विचार केल्यास तोही सिद्धरूप आहे असे म्हणता येईल, व मग त्यादृष्टीने पृ. १२४ वरील 'सिद्धस्वभाव' हे विशेषण रसाला देखील लावणे शक्य आहे.

२४. काव्याचे मुख्य प्रयोजन 'प्रीति' हे आहे व 'व्युत्पत्ति' हे गौण प्रयोजन होय, हे अभिनवगुप्तांचेही मत आहे. पाहा, पृ. ५७ व काशी आवृत्ति पृ. ३३६.

२५. हे मत भट्टलोल्लटाचे आहे. हेच मत अभिनवगुप्तांनी अभिनवभारतीमध्येही भट्टलोल्लटाचे म्हणून मांडले आहे. पाहा, 'रसभावविचार' कंगले आवृत्ति, पृ. १२४ व शिवाय काव्यप्रकाश, झळकीकर आवृत्ति, पृ. ८७.

२६. पाहा, नाट्यशास्त्र, ६–३१ नंतरचा पुढील गद्य भाग—तस्मात् नाट्यरसाः इति अभिव्याख्याताः। याशिवाय ६–३३ मध्येही तस्मान्नाट्यरसाः स्मृताः। असे म्हटले आहे.

भट्टलोल्लटाचे मत असे की, रस हे वस्तुतः अनुकार्य व्यक्तीच्या (म्हणजे नट ज्याचे अनुकरण करतो, त्या मूळ पात्राच्या) ठिकाणी उत्पन्न झालेले असतात म्हणजे लोल्लटाच्या मते ते 'लोकगत'च होत. नाट्य हे लोक-वृत्तांताचे अनुकरण असल्यामुळे व लोकवृत्तांताचे चित्रण नाट्यामध्ये केले जात असल्यामुळे भरताने त्या लोकगत रसांना 'नाट्यरस' म्हटले आहे, असे भट्टलोल्लटाचे म्हणणे. पण रसांचा आस्वाद सामाजिकाला कसा मिळतो याचे स्पष्टीकरण भट्टलोल्लटाने केलेले दिसत नाही.

भट्टलोल्लटाचे हे मत 'उत्पत्तिवाद' या नावाने सामान्यतः ओळखले जाते. कारण त्याच्या मते रत्यादि स्थायिभाव हे अनुकार्य पात्राच्या ठिकाणी (विभावांमुळे) उत्पन्न होतात. 'तत्र विभावाः चित्तवृत्तेः स्थाय्यात्मिकायाः उत्पत्तौ कारणम्' असे शब्द अभिनवभारतीमध्ये भट्टलोल्लटाच्या तोंडी घातले आहेत (पाहा, पृ. १२४, रसभावविचार, कंगले आवृत्ति). भट्टलोल्लटाच्या या मताला 'उपचितिवाद' किंवा 'पुष्टिवाद' असेही म्हटले जाते, कारण त्याच्या मते उत्पन्न झालेल्या स्थायिभावाचा उपचय (किंवा परिपोष) व्यभिचारिभावांमुळे होतो.

२७. हा युक्तिवाद तितकासा पटण्यासारखा नाही, कारण स्थायी व व्यभिचारी चित्तवृत्ति या दोन्ही जरी अस्थिर असल्या, तरी स्थायी चित्तवृत्ति व्यभिचारी चित्तवृत्तीच्या मानाने अधिक स्थिर असल्यामुळे ती आहे तोवर व्यभिचारी चित्तवृत्तीमुळे तिचा परिपोष होण्यात अडचण दिसत नाही. नदीला ओढे, नाले मिळून तिचा परिपोष करीत नाहीत काय ?

२८. पाहा, अभिनवभारतीतील पुढील वाक्य (रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. १२८)–**शोकस्य प्रथमं तीव्रत्वम्, कालात् तु मान्द्यदर्शनम्, क्रोधोत्साहरतीनां ह्रासदर्शनम्, इति विपर्ययस्य दृश्यमानत्वात्**

२९. वगैरे म्हणजे भीतिदायक प्रसंग, जुगुप्साजनक प्रसंग वगैरे.

३०. अनन्त म्हणजे मंद, मंदतर, मंदतम, तीव्र, तीव्रतर, तीव्रतम, इ.

३१. ह्या क्रमाङ्क दोनच्या मताप्रमाणे अनुकार्यपात्र हे स्थलकालदृष्ट्या प्रेक्षकाला परोक्ष असल्यामुळे व नट हा त्या पात्राचा प्रतिनिधि म्हणून प्रेक्षकाच्या समोर असल्यामुळे हा स्थायिभाव नटाच्या ठिकाणी आहे असे प्रेक्षकांच्या ज्ञानाचे स्वरूप असते.

३२. या वाक्याचा रोख भट्टलोल्लटाच्या ' रस हा अनुकार्य पात्राच्याच ठिकाणी असतो, केवळ त्याचे चित्रण नाट्यात केले जाते म्हणून त्याला नाट्यरस म्हणतात', ह्या वाक्यावर आहे. श्रीशंकुकाच्या मते रस हा अनुकार्य पात्राच्या ठिकाणी नसतोच. नाटकातच आणि नटाच्या ठिकाणीच रस आहे असे सामाजिक अनुमान करितात, म्हणून त्याला ' नाट्यरस ' म्हणतात.

३३. ' हरिताल ' म्हणणजे पिवळे रंगद्रव्य.

३४. मुळात **लोकातीततया** असा पाठ आहे. ही तृतीया उपलक्षणवाचक घेऊन (म्हणजे नटाच्या ठिकाणी भासमान होणाऱ्या स्थायिभावाकडे त्या तृतीयेचा संबंध घेऊन ) आम्ही वर भाषान्तर केले आहे. परंतु **लोकातीततया** याचा संबंध ' प्रतीती ' कडेही जोडणे शक्य आहे. मग त्याचा अर्थ ' लोकोत्तर अशी प्रतीति ' असा होईल.

३५. हे क्रमाङ्क तीनचे मत श्रीशंकुकाचे आहे, कारण मम्मटाने हे मत श्रीशंकुकाचे म्हणूनच दिले असून येथे दिलेल्या अश्वावभासाच्या दृष्टांताचा निर्देशही केला आहे. अभिनवभारतीमध्येही श्रीशंकुकाच्या मताचे खंडन करिताना अभिनव-गुप्तांनी ह्याच दृष्टांत श्रीशंकुकाने वापरल्याचा निर्देश केला आहे. ( पाहा, रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ १४६ ). २ऱ्या व ३ ऱ्या मतामध्ये फरक इतकाच आहे की, दुसऱ्या मताप्रमाणे सामाजिकाला नटाच्या ठिकाणी अनुमानाने होणारी स्थायिभावाची प्रतीति ही खरी असते व ३ ऱ्या मता-प्रमाणे ती आभासरूप असते हे अश्वावभासाच्या दृष्टांतावरून स्पष्ट केले गेले. शिवाय भट्टलोल्लटाच्या मताचे खंडन करिताना (पृ. ३५१ पाहा) तर

नटाचे लक्ष लय इ. कडे लागणारच नाही ' इत्यादि वाक्य आहे ' नटाच्या ठिकाणचा स्थायिभाव जर खराखुरा असेल, तर नटाच्या अभिनयामध्ये विघ्न उत्पन्न होईल ' ही श्रीशंकुकाने दाखविलेली अडचण मत क्र. ३ मध्ये येत नाही, कारण श्रीशंकुकाच्या ह्या मताप्रमाणे नटाच्या ठिकाणचा स्थायिभाव वास्तविक नसून आभासरूपच असतो.

३६. हे चवथे मत कोणाचे हे अज्ञात आहे.

३७. मूळातील अनुषक्त याचा अर्थ आम्ही ' संबद्ध ' असा केला आहे. पण विभाव–अनुभाव हे सामाजिकाच्या स्थायिभावाशी कोणत्या संबंधाने संबद्ध झालेले असतात, हे मुळामध्ये स्पष्ट केलेले नाही. तथापि अनुकार्य पात्राचे विभाव–अनुभाव हे कारण व सामाजिकाच्या हृदयात स्थायिभाव जागृत होणे हे कार्य, असाच हा संबंध मानला पाहिजे. या कारण– कार्यभावाला पुढे अभिनवगुप्तांनी व्यंजक– व्यंग्यभाव म्हटले आहे.

३८. हे पाचवे मत वरीलप्रमाणेच अज्ञात आहे. विभाव हा अंश सर्वात महत्त्वाचा मानून हे मत मांडलेले दिसते उदा. कुमारसंभव, सर्ग ४, श्लोक ३ रा पाहा. त्याचा (प्रा. वीरकरकृत) मराठी अनुवाद असा आहे.—

' अजुनी प्रिय जीवितेश्वरा ! असशी ना ? ' वदुनी उठे रती ।
तिज भस्मचि भूवरी दिसे, हरकोपे पडले, नराकृती ॥

यात शंकराच्या क्रोधानलामुळे झालेले नराकृति भस्म रतीला दिसणे या केवळ उद्दीपन विभावामुळे करुणरसाचा परिपोष होत आहे.

३९. या ६ व्या (अज्ञात) मतात ' अनुभाव ' या अंशाला महत्त्व दिलेले आहे.

४०. हे सातवे मतही अज्ञातच. पण येथे स्थायी भावाचे उत्कट असलेले प्राधान्य लक्षात घेतलेले दिसते

४१. हे आठवे मतसुद्धा अज्ञातच. यात व्यभिचारिभावाचे महत्त्व मानलेले दिसते. पाहा, ' कुमारसंभवा ' तील पुढील (७–८४) श्लोक–

' एवंवादिनि देवर्षौ पार्श्वे पितुरधोमुखी ।
लीलाकमलपत्राणि गणयामास पार्वती ॥

हा श्लोक पुढे आनंदवर्धनांनी उद्धृत केला आहे. (पाहा, काशी आवृत्ति, पृ. २४८). या श्लोकातील पार्वतीच्या ' लज्जा ' या व्यभिचारिभावातच विशेष सौंदर्य आहे.

४२. हे नववे मत भरताच्या रससूत्राचा अनुवाद करणारे आहे. '५, ६, ७ व ८ ही मते एकेका अंशाला प्राधान्य देतात, तर हे दहावे मत सर्वांना प्राधान्य देते. मेघदूतातील पुढील श्लोक या मताला साजेसे उदाहरण म्हणून देता येईल–

त्वामालिख्य प्रणयकुपितां धातुरागैः शिलायाम्
आत्मानं ते चरणपतितं यावदिच्छामि कर्तुम् ।

अस्रैस्तावन्मुहुरुपचितैर्दृष्टिरालुप्यते मे
क्रूरस्तस्मिन्नपि न सहते संगमं नौ कृतान्तः ॥

या श्लोकात यक्षाची कान्ता हा आलम्बनविभाव, तिचे प्रणयात रुसणे हा उद्दीपनविभाव, यक्षाचे अश्रु व त्याची तिच्या पाया पडण्याची इच्छा हे अनुभाव व कृतान्ताबद्दलची असूया हा व्यभिचारिभाव, या सर्वांमुळे विप्रलम्भरति या स्थायिभावाचा विलक्षण परिपोष होत आहे.

४३. हे दहावे (अज्ञात) मत. विभाव, अनुभाव इ. सर्व अंश अनुकार्यपात्रामुळेच संभवतात, म्हणून या मतात अनुकार्यपात्राला ' रस ' म्हटले आहे. हेही मत एकांगीच म्हणावयाचे.

४४. हे अकरावे मतही अज्ञातच आहे. हे बरेचसे ९ व्या मतासारखेच आहे. त्यात दहाव्या मतातील अनुकार्य पात्राची भर घातली आहे, इतकेच. भरताच्या मतात स्थायीचा प्रत्यक्ष उल्लेख केलेला नसला, तरी हे स्पष्ट आहे की, त्याच्या मते विभाव इत्यादींनी स्थायीचाच आविष्कार केला जातो. तेव्हा स्थायीचा रसरूपाने आविष्कार हे साध्य असून विभाव वगैरे त्या आविष्काराची साधने आहेत.

भट्टनायक, भट्टलोल्लट व श्रीशंकुक यांची मते सांगून झाल्यावर अभिनवगुप्तांनी सांगितलेल्या आणखी एकूण ९ मतांपैकी ४ मतांचा उल्लेख जगन्नाथाने ' रसगंगाधरा ' त ७ ते ११ या क्रमांकानी केला आहे. (पाहा, काव्यमाला आवृत्ति, पृ. ३४)

४५. लोकधर्मी व नाट्यधर्मी यांचे विवरण भरतांनी नाट्यशास्त्र, अध्याय १३, श्लोक ७० ते ८५ यांमध्ये केले आहे. नाटक हे लोकव्यवहाराचेच चित्रण असल्यामुळे त्यात निरनिराळ्या लोकांच्या वास्तव जीवनातील बोलणे-चालणे, वेषभूषा, इत्यादींचे प्रतिबिंब अटळपणे दिसून येते. या व्यवहाराला ' लोकधर्मी ' म्हणावयाचे. याखेरीज नाटकामध्ये पाळावे लागणारे व वास्तविक जीवनात न आढळणारे कृत्रिम संकेत असतात. त्या संकेतांवर आधारलेल्या व्यवहाराला ' नाट्यधर्मी ' म्हणता येईल. उदा. स्वगत भाषण, आकाशभाषित, जनान्तिक, अपवारित, संगीत, पार्श्वसंगीत इ. काव्यामध्ये वरील प्रकारचे संकेत पाळण्याचा प्रश्नच उत्पन्न होत नाही. तेथे लोकधर्मी हा प्रकार स्वभावोक्तीच्या रूपात आढळतो व नाट्यधर्मी हा प्रकार (कविसंकेत, लक्षणा, अतिशयोक्ति, इ.) वक्रोक्तीच्या रूपात दिसून येतो.

' स्वभावोक्ति ' म्हणजे जीवनातील पदार्थांचे वर्णन अलंकारांचा वापर बिलकुल न करिता करणे आणि ' वक्रोक्ति ' म्हणजे अलंकार वापरून केलेले वर्णन. दंडीने वाङ्मयाचे स्वभावोक्ति आणि वक्रोक्ति असे दोन प्रकार मानिले आहेत. पाहा, काव्यादर्श, २– ३६३.

४६. वरील भाषांतरात ' अलौकिक ' या विशेषणाचा अन्वय ' शब्दा 'शी केला आहे, कारण मूळ समासात ' शब्द ' हा शब्द अलौकिक या विशेषणाच्या अधिक जवळ आहे. पण अलौकिक हे विभावादींचेही विशेषण मानणे शक्य आहे. कारण पृ. २८५ वर अभिनवगुप्तांनी नाटकातील विभाव व अनुभाव हे अलौकिक असतात असे म्हटले आहे.

४७. कारण नाटक हे मुख्यतः दृश्य अभिनयावर आधारलेले असते, तर काव्याची सर्व भदार श्रव्य वर्णनावर असते.

४८. मुळातल्या **प्रथमपक्षे** या शब्दाचा अर्थ आम्ही ' भट्टनायकाच्या पक्षाच्या बाबतीत ' असा केला आहे, कारण ' लोचना ' मध्ये पहिल्याने (पृ. ३४७ पाहा) भट्टनायकाचेच मत मांडले असून ते मांडताना भट्टनायकाने इतर पक्षांच्या बाबतीत जे दोष दाखविले, त्यांचा निर्देश केला आहे. परंतु ' बालप्रिया ' टीकेमध्ये व इतर काहींनी प्रथमपक्ष म्हणजे भट्टलोल्लटाचा पक्ष असे म्हटले आहे. हा अर्थ बरोबर वाटत नाही, कारण एकतर लोल्लटाचे मत लोचनात भट्टनायकाच्या मतानंतर मांडले आहे व दुसरे म्हणजे ' स्वगतत्व की परगतत्व ' हे दोष केवळ उत्पत्ति पक्षाच्या बाबतीतच लागू पडतात असे नव्हे तर प्रतीतिपक्ष व अभिव्यक्तिपक्ष यांच्यावरही ते दोष येतात असे भट्टनायकाने म्हटले आहे व हे दोष भट्टनायकाच्या पक्षालाही लागू पडतात असे अभिनवगुप्तांना म्हणावयाचे आहे. हे भट्टनायकाच्या पक्षाला कसे लागू पडतात हे अभिनवगुप्तांनी लगेच नंतरच्या वाक्यांत सांगितले आहे.

४९. म्हणजे प्रत्यक्ष, अनुमान इ. प्रमाणांचा आधार नसतानाही एखाद्या वस्तूच्या वैशिष्ट्याची कल्पना येणे. उदा. पूर्वी माहीत नसलेल्या एखाद्या व्यक्ती-विषयी ती दिसल्याबरोबर चांगला किंवा वाईट ग्रह होणे.

५०. योगसामर्थ्याने म्हणजे इंद्रियांचा वापर न करता होणारे दूरदर्शन, दूरश्रवण, दुसऱ्यांच्या मनातील विचार इत्यादींचे (ज्ञान).

५१. पाहा, रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. १५० वरील पुढील वाक्य—
**प्रतीत्याद्यिव्यतिरिक्तश्च संसारे को भोगः इति न विद्मः । रसना इति चेत्, साऽपि प्रतिपत्तिरेव ।**

५२. इत्यादींच्या म्हणजे तन्मयीभवन वगैरेंच्या.

५३. ' भात शिजविला जातो ' याचा वास्तविक अर्थ ' तांदूळ शिजविले जाऊन त्यांना भाताचे स्वरूप प्राप्त होते ' असा आहे. त्याचप्रमाणे ' रसांची प्रतीति होते ' याही म्हणण्याचा अर्थ स्थायिभावांची प्रतीति झाली. म्हणजेच त्या स्थायिभावांना रस स्वरूप प्राप्त होते. पृ. २८५ वर अभिनवगुप्तांनी ' स्थायि-भावाचे रसीभवन होते ' (संस्कृत वाक्य :—**स्थायिनस्तु रसीभाव औचित्या-दुच्यते** ...पृ २७८) हे म्हणणे लाक्षणिक आहे, असे म्हटले आहे.

५४. विशिष्ट प्रकारची प्रतीति म्हणजे विभाव, अनुभाव इ. सामग्रीमुळे सुंदर स्वरूपात होणारी प्रतीति. पाहा, रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. १७५ वरील पुढील वाक्य–रसना च बोधरूपा एव, किं तु बोधान्तरेभ्यो विलक्षणा एव। उपायानां विभावादीनां लोकवैलक्षण्यात्।

५५. रसप्रतीतीच्या पहिल्या टप्प्यामध्ये वाच्यार्थ कळल्यावर, अनुकार्य पात्रामध्ये रत्यादि स्थायिभाव उदित झाले आहेत असे अनुमान प्रेक्षकाला विभावादिकांमुळे होते, व ते ज्ञान पुढे होणाऱ्या रसप्रतीतीला उपकारक असते. अशा रीतीने (नाट्यापासून होणारे) रसनारूपी ज्ञान जसे अनुमानाहून भिन्न असते, तसेच ते ( म्हणजे काव्यवाचनापासून होणारे रसनारूपी ज्ञान ) इतर शाब्द ज्ञानांच्याहून ( म्हणजे वाच्यार्थ, तात्पर्यार्थ व लक्ष्यार्थ यांच्या ज्ञानाहून ) वेगळे असते.

५६. इतर प्रतीतींचे म्हणजे वाच्यार्थ, तात्पर्यार्थ व लक्ष्यार्थ यांच्या प्रतीतींचे, व वर्ण्य पात्रामध्ये रत्यादि भाव उदित झाले आहेत अशा स्वरूपाच्या अनुमानजन्य प्रतीतींचे.

५७. एकंदरीत रसप्रतीति ही नाट्यातील असो अथवा काव्यातील असो; ती पहिल्याने होणाऱ्या शब्दव्यापारजन्य किंवा अनुमानजन्य प्रतीतींचे सहकार्य घेत असली, तरी त्या प्रतीतीनंतर व्यंजनेने होत असल्यामुळे त्या प्रतीतीहून वेगळी आहे.

इतर प्रतीति या व्यंग्यार्थप्रतीतीची साधने असतात व तरीही व्यंग्यार्थप्रतीति ही त्या प्रतीतींहून वेगळी असते हे मागे पृ. ८८, ८९–९० १४१, १५८, २८४–८५ यांवर कारिकांतून किंवा लोचनांतून सांगितले गेले आहेच.

५८. पूर्वपक्षाला म्हणजे भट्टनायकाच्या पक्षाला. कारण भट्टनायकाने इतर पक्षांच्या बाबतीत स्वगतत्व की परगतत्व इ. दोष दाखविले, ते त्याच्या स्वतःच्याच पक्षावर येतात, म्हणून. पाहा, पृ. ३६४, टीप ४८ वी.

५९. पाहा, पृ. ३४८ वरील ' रामादि लोकोत्तर वीर पुरुषांचे…' इ. वाक्य.

६०. पाहा, रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. १६७ वरील पुढील वाक्ये—

जात एव हि जन्तुः इयतीभिः संविद्भिः परीतो भवति। …

न हि एतच्चित्तवृत्तिवासनाशून्यः प्राणी भवति।

६१. पतञ्जलि, योगसूत्र, ४–१०.

६२. इच्छा हा मानवी मनाचा उपजत धर्म आहे. पाहा, मनुस्मृति, २–४ :—
अकामस्य क्रिया काचिद् दृश्यते नेह कर्हिचित्। यद्यद् हि कुरुते किंचित् तत्तत् कामस्य चेष्टितम्॥

या इच्छेच्या पोटी मनुष्य जी जी कर्मे करितो, त्या त्या कर्मांचे संस्कार

मनामध्ये साचत जातात. या जन्मी जरी आपण रामादिकांच्या मानाने सामान्य असलो, तरी त्यांच्यासारखे पराक्रम आपण अनादि संसारामध्ये केव्हातरी केव्हातरी केलेले, निदान अनुभवलेले असतात. त्यांचे संस्कार आपल्या मनावर झालेले असतात म्हणूनच त्यांच्याशी आपला हृदयसंवाद होऊ शकतो.

६३. पाहा, योगसूत्र, ४–९. मूळ योगसूत्रामध्ये स्मृतिसंस्कारयोर्योगात् । असा पाठ आहे. त्याचा अर्थ संस्कार व स्मृति यांमध्ये 'योग' म्हणजे कारण–कार्यसंबंध असल्यामुळे. लोचनात योगात् याऐवजी एकरूपत्वात् असा पाठ आहे. त्याचा अर्थही वर दिल्याप्रमाणेच करावयास पाहिजे. या संदर्भात कालिदासाच्या अभिज्ञानशाकुंतल, ५ व्या अंकामधील तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम् । भावस्थिराणि जननान्तरसौहृदानि ।। या ओळी पाहण्यासारख्या आहेत.

६४. 'रसनारूप प्रतीति उत्पन्न होते' याचा भावार्थ असा– रसास्वादामध्ये दोन अंश असतात :–(१) सामाजिकाच्या मनात जागृत झालेला स्थायिभाव व (२) त्याची आनंदरूप प्रतीति. यांतील १ ला अंश जसा नव्याने उत्पन्न होणारा नाही, तसेच आनंदरूप ज्ञान हे आत्म्याचे स्वरूप असल्यामुळे तेही नव्याने उत्पन्न होणारे नाही. परंतु त्या दोन अंशांचा 'ज्ञेय विषय' व 'ज्ञान' हा संबंध मात्र नव्याने उत्पन्न होतो. या दृष्टीनेच 'रसनारूप प्रतीति उत्पन्न होते' असे अभिनवगुप्तांनी म्हटले आहे.

६५. भोगीकरण व्यापार म्हणजे सामाजिकाच्या आत्म्याला सामाजिकाच्या मनात अभिव्यक्त झालेल्या स्थायिभावाचा भोग घडविणारा व्यापार. हा भोग म्हणजे आस्वाद किंवा आनंदमय प्रतीतीच होय. ही प्रतीति होण्यासाठी तिच्या आड येणारी सर्व विघ्ने दूर झाली पाहिजेत. ही विघ्ने दूर करण्याचे काम ध्वननव्यापाराचे आहे. हा ध्वननव्यापार आत्म्याच्या ठिकाणी इतर कारणांमुळे आलेली व्यग्रता दूर करितो व सामाजिकाला अभिव्यक्त झालेल्या स्थायिभावाकडे आकृष्ट करितो, म्हणजेच त्या स्थायिभावाची प्रतीति करून घेण्यास समर्थ बनवितो. या संबंधात अभिनवभारतीतील पुढील वाक्ये (रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. १५९ व १६१) पाहण्यासारखी आहेत.– सर्वथा रसनात्मकवीतविघ्नप्रतीतिग्राह्यो भाव एव रसः । तत्र विघ्नापसारका विभावप्रभृतयः । तथाहि लोके सकलविघ्नविनिर्मुक्ता संवित्तिरेव चमत्कार-निर्वेशरसनास्वादनभोगसमापत्तिलयविश्रांत्यादिशब्दैरभिधीयते ।

६६. अभिनवगुप्तांच्या मते भट्टनायक ज्याला 'भावकत्व' म्हणतो, ते म्हणजे वस्तुतः समुचित गुण व अलंकार यांच्या योजनेमुळे उत्पन्न होणारे सामर्थ्यच होय. काव्य असे म्हणजे गुणालंकारांनी युक्त असले, तरच ते रसप्रतीति-

जनक होऊ शकते हा मुद्दा पूर्वी लोचनात पृ. ६७, ८८, १३९ व १७० वर आलेलाच आहे. शिवाय उद्द्योत २, कारिका ६ ते १० यांमध्ये व त्यांवरील वृत्तीमध्ये गुणांची रसानुकूल योजना व कारिका १८ व १९ व त्यांवरील वृत्ति यांमध्ये अलंकारांची रसानुकूल योजना यांची सविस्तर चर्चा आलेली आहे. तिसऱ्या उद्द्योतात संघटनेच्या संदर्भात गुणांचा व रसविषयक औचित्याचा विस्ताराने विचार केला आहे.

'भावकत्व याचा अर्थ साधारणीकरण घडवून आणणे' हे मागे पृ. ३४९ वर भट्टनायकाचे मत मांडताना सांगितले गेले आहे. पण ते भावकत्व नेमके कशामुळे उत्पन्न होते हे येथे अभिनवगुप्तांनी स्पष्ट केले आहे.

६७. वस्तुतः 'भावकत्व' हा शब्द भट्टनायकाने 'विभावादिकांचे साधारणीकरण' या अर्थाने वापरला आहे. (पाहा, पृ. ३४९.). हा शब्द योजिताना भट्टनायकाने भरताच्या भावयतीति भावः या व्युत्पत्तीचा आधार घेतलेला स्पष्ट दिसतो. भावयति याचे भरताने निष्पादयति आणि व्याप्नोति असे दोन अर्थ केले आहेत. (रसभावविचार, कंगले आवृत्ति पृ. ३६९). म्हणून अभिनव-गुप्तांच्या मते 'भावकत्व' हा शब्द संदिग्धार्थक आहे. त्यातून निष्पादकत्व (उत्पादकत्व) असाही अर्थ निघण्याची शक्यता असल्यामुळे त्या शब्दाच्या योजनेमुळे भट्टनायकाने लोल्लटाच्या उत्पत्तिवादालाच टेकू दिला असे होईल. याच अभिप्रायाने **भवतैव भावनादुत्पत्तिपक्षः प्रत्युज्जीवितः** असे अभिनव गुप्तांनी म्हटले असावे.

६८. भट्टनायकाने केवळ शब्दांच्या ठिकाणीच भावकत्व असते असे पृ. ३४९ वर सांगितले आहे.—'त्या शब्दांमधील तीन प्रकारच्या सामर्थ्यामुळे' ... ... इ. मजकूर पाहा.

६९. येथे अभिनवगुप्तांनी मीमांसकांच्या प्रसिद्ध 'भावना' सिद्धांताचा उल्लेख केला आहे. मीमांसकांच्या दृष्टीने भावना म्हणजे 'उत्पन्न होणाऱ्या गोष्टीच्या उत्पत्तीला अनुकूल असा उत्पत्तिकर्त्याचा व्यापार होय.' उदा. **दर्शपूर्ण-मासाभ्यां स्वर्गकामो यजेत ।** हे विधिवाक्य घ्या. यामध्ये यज्ञ करणारा मनुष्य हा स्वर्गरूपी फलाची उत्पत्ति करितो. हे कार्य दर्शपूर्णमास या साधनाने उत्पन्न होते व या साधनाचा प्रयोग करण्याची जी रीत शास्त्रात सांगितलेली असते, तिला अनुसरूनच यज्ञ केला म्हणजे स्वर्गरूपी फळ उत्पन्न होते, एरवी नाही. अशा तऱ्हेने मीमांसकांच्या भावनेचे साध्य, साधन व इतिकर्तव्यता (म्हणजे साधनाचा प्रयोग करण्याची रीत) असे तीन अंश असतात. **दर्शपूर्ण-मासाभ्याम्** इ. उदाहरणात स्वर्गप्राप्ति हे साध्य, दर्शपूर्णमास याग हे साधन व त्या यागाची प्रयाजादि अंगभूत कर्मे शास्त्रोक्त क्रमाने करणे ही इतिकर्तव्यता होय.

वस्तुतः रस उत्पन्न होतो हे अभिनवगुप्तांना मान्य नाही. (पाहा, पृ. ३६६ वरील टीप ६४ वी). स्थायिभावाची चर्वणा मात्र उत्पन्न होते. तिच्या उत्पत्तीला भावनेचे म्हणजे उत्पादनाचे तत्त्व लागू पडले, तरी त्या बाबतीत रसचर्वणेची उत्पत्ति या 'साध्याचे' 'साधन' म्हणून भट्टनायकाला ध्वनन-व्यापार स्वीकारावाच लागेल असे अभिनवगुप्तांचे म्हणणे आहे.

७०. हे आवरण म्हणजे रसप्रतीतीच्या मार्गात येणारी विघ्ने. या आवरणाचा उल्लेख भट्टनायकही करितो. पाहा, रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. १४७. यापूर्वीची पृ. ३६६ वरील ६५वी टीप पाहा. मात्र हा भोग द्रुति, विस्तार व विकास या तीनच प्रकारचा असतो हे भट्टनायकाचे मत आहे, अभिनवगुप्तांचे नव्हे, कारण पुढील पृष्ठावर त्यांनी या मताचे खंडन केले आहे.

७१. व्यंजनेचे कार्य द्विविध आहे— (१) सामाजिकाच्या मनातील स्थायी भावाची अभिव्यक्ति करणे व अज्ञानाचे आवरण दूर करून आत्म्याची अभिव्यक्ति करणे, म्हणजे त्याच्या ठिकाणचे ज्ञातृत्वसामर्थ्य कार्यप्रवण करणे.

७२. सत्त्व, रज, तम या सांख्यदर्शनातील तीन गुणांचा उल्लेख रसप्रक्रियेच्या संदर्भात मागे पृ. ३५० वर व रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. १४७ वर भट्टनायकाचे मत मांडताना केला आहे.

७३. म्हणजे अभिनवगुप्तांच्या मते काव्याच्या परिशीलनाने रसास्वाद, त्या द्वारा नैतिक उपदेश आणि त्याबरोबर सामाजिकाच्या भावयित्री प्रतिभेचा विकास (म्हणजे त्याचे रसग्रहणसामर्थ्य वाढविणे) असा तिहेरी फायदा होतो. मागे पृ. ५४ वर **तथापि तत्र प्रीतिरेव प्रधानम्** असे जे अभिनव-गुप्तांनी म्हटले आहे त्याचा अर्थ इतकाच की, नैतिक उपदेश हा वेदादि शास्त्रांपासून व इतिहास पुराणादि ग्रंथांपासूनही मिळत असला, तरी तो काव्यापासून रसास्वादाच्या द्वारेच मिळतो. म्हणून रसास्वादाचे महत्त्व व्युत्पत्तीपेक्षा अधिक मानले आहे. पुढे म्हणजे काशी आवृत्ति, पृ. ३३६ वर काव्यापासून मिळणाऱ्या प्रीति व व्युत्पत्ति ह्या एकमेकांपासून भिन्न नसून अविभाज्य आहेत असे अभिनवगुप्तांनी म्हटले आहे. म्हणजे प्रीति व व्युत्पत्ति या एकाच नाण्याच्या दोन बाजू होत. पाहा, अभिनवभारती, बडोदा संस्करण, अध्याय १ मधील पृ. ४१ वरील पुढील वाक्ये— — **ननु किं गुरुवदुपदेशं करोति ? नेत्याह । किं तु बुद्धिं विवर्धयति, स्वप्रतिभामिव तादृशीं वितरति ।**

७४. म्हणजे ती प्रतीति केवळ आस्वादरूपच असते; भट्टलोल्लटाच्या मताप्रमाणे उत्पत्ति या स्वरूपाची किंवा श्रीशंकुक म्हणतो त्याप्रमाणे अनुमिति या स्वरूपाचीही नसते.

७५. पाहा, उद्द्योत १, कारिका ७, ९ व १०, व 'लोचन' पृ. १७०, १७१ व १७२.

ध्वन्यालोकः

प्रधानेऽन्यत्र वाक्यार्थे यत्राङ्गं तु रसादयः ।
काव्ये तस्मिन्नलङ्कारो रसादिरिति मे मतिः ॥ ५ ॥

यद्यपि रसवदलङ्कारस्यान्यैर्दर्शितो विषयस्तथापि यस्मिन् काव्ये प्रधानतयान्योऽर्थो वाक्यार्थीभूतस्तस्य चाङ्गभूता ये रसादयस्ते रसादेरलङ्कारस्य विषया इति मामकीनः पक्षः । तद्यथा चाटुषु प्रेयोऽलङ्कारस्य वाक्यार्थत्वेऽपि रसादयोऽङ्गभूता दृश्यन्ते ।

ध्वन्यालोक

पण ज्या काव्यात दुसराच असलेला वाक्याचा अर्थ मुख्य असून रसादि अर्थ दुय्यम, म्हणजे त्याला अंगभूत असतात, त्या काव्यात रसादि हा अलंकार असतो, असे माझे मत आहे. ॥५॥

जरी इतरांनी रसवदलंकाराचा विषय ( निराळ्या पद्धतीने ) दाखवला असला, तरी ज्या काव्यात रसादि हे स्वतःहून भिन्न आणि मुख्य असलेल्या अशा संपूर्ण वाक्याच्या अर्थाचे अंग असतात, ते 'रसादि अलंकारा'चा विषय होत, असा माझा पक्ष आहे. ते रसादि 'अंगभूत' कसे असतात याचे उदाहरण म्हणजे स्तुतिपर काव्यांमध्ये प्रेयोऽलंकार हाच ( मुख्य ) वाक्यार्थ असला तरी 'रसादि' त्याला अंगभूत असलेले दिसतात, हे होय.

लोचनम्

अन्यत्रेति । रसस्वरूपे वस्तुमात्रेऽलङ्कारतायोग्ये वा । मे मतिरित्यन्यपक्षं दूष्यत्वेन हृदि निधायाभीष्टत्वात्स्वपक्षं पूर्वं दर्शयति – तथापीति । स हि परदर्शितो विषयो भाविनीत्या नोपपन्न इति भावः । यस्मिन् काव्ये इति स्पष्टत्वेनासङ्गतं वाक्यमित्थं योजनीयम् – यस्मिन् काव्ये ते पूर्वोक्ता रसादयोऽङ्गभूता वाक्यार्थीभूतश्चान्योऽर्थः, चशब्दस्तु-शब्दस्यार्थे, तस्य काव्यस्य सम्बन्धिनो ये रसादयोऽङ्गभूतास्ते रसादेर-

लङ्कारस्य रसवदाद्यलङ्कारशब्दस्य विषयाः; स एवालङ्कारशब्दवाच्यो भवति योऽङ्गभूतः, न त्वन्य इति यावत्। अत्रोदाहरणमाह – तद्यथेति। तदित्यङ्गत्वम्। यथात्र वक्ष्यमाणोदाहरणे, तथान्यत्रापीत्यर्थः। भामहाभिप्रायेण चाटुषु प्रेयोऽलङ्कारस्य वाक्यार्थत्वेऽपि रसादयोऽङ्गभूता दृश्यन्त इतीदमेकं वाक्यम्। भामहेन हि गुरुदेवनृपतिपुत्रविषयप्रीतिवर्णनं प्रेयोऽलङ्कार इत्युक्तम्। तत्र प्रेयानलङ्कारो यत्र स प्रेयोऽलङ्कारोऽलङ्करणीय इहोक्तः। न त्वलङ्कारस्य वाक्यार्थत्वं युक्तम्। यदि वा वाक्यार्थत्वं प्रधानत्वम्। चमत्कारकारितेति यावत्। उद्भटमतानुसारिणस्तु भङ्क्त्वा व्याचक्षते – चाटुषु चाटुविषये वाक्यार्थत्वे चाटूनां वाक्यार्थत्वे प्रेयोऽलङ्कारस्यापि विषय इति पूर्वेण सम्बन्धः। उद्भटमते हि भावालङ्कार एव प्रेय इत्युक्तः, प्रेम्णा भावानामुपलक्षणात्। न केवलं रसवदलङ्कारस्य विषयः यावत्प्रेयः-प्रभृतेरपीत्यपिशब्दार्थः। रसवच्छब्देन प्रेयःशब्देन च सर्व एव रसवदाद्यलङ्कारा उपलक्षिताः, तदेवाह – रसादयोऽङ्गभूता दृश्यन्त इति। उक्तविषय इति शेषः।

लोचन

दुसराच असलेला वाक्यार्थ–रसरूपी व्यंग्यार्थ किंवा केवळ वस्तुरूपी असणारा वाच्य किंवा व्यंग्य अर्थ किंवा अलंकार होण्याजोगा वाच्य किंवा व्यंग्य अर्थ. 'असे माझे मत आहे' या शब्दांनी 'याबाबत दुसरेही एक मत आहे व त्या मताचे खंडन करणे इष्ट आहे' हे मनात ठेवून वृत्तिकार प्रथम स्वतःचा पक्ष मांडतात:– तरी .... इ. (दुसऱ्यांनी आपले मत मांडले असले तरी स्वतःचे भिन्न मत मांडण्याचे) कारण दुसऱ्यांनी मांडलेले ते मत पुढे सांगितल्या जाणाऱ्या युक्तिवादामुळे बुद्धीला पटणारे नाही, हे तात्पर्य. 'ज्या काव्यात' इ. – या स्पष्टपणे म्हणजे उघडउघड तर्कसंगत न वाटणाऱ्या वाक्याची संगति पुढीलप्रमाणे लावावी– ज्या काव्यात ते, पूर्वी सांगितलेले, रसादि अंगभूत असतील आणि त्यांहून दुसरा (संपूर्ण वाक्याचा) अर्थ मुख्य (म्हणजे अंगी) असेल. 'आणि' हा शब्द 'परंतु' या अर्थी घ्यावा. त्या काव्याशी संबंध असणारे जे रसादि अंगभूत असतील ते रसादि (म्हणजे रसवत् इ.)

अलंकारांचे विषय होत. जो अंगभूत असेल त्यालाच अलंकार हे नाव देणे योग्य, दुसऱ्याला म्हणजे अंगी असणाऱ्याला नाही, हा भावार्थ. याचे उदाहरण वृत्तिकार 'उदाहृणार्थ' असा प्रस्ताव करून सांगतात. त्याचे म्हणजे रस वगैरे अंगभूत कसे असतात, याचे. ज्याप्रमाणे आता लगेच सांगण्यात येणार असलेल्या उदाहरणात[२] रसादि हे अंगभूत आहेत, त्याप्रमाणेच इतरही उदाहरणांमध्ये, हा अर्थ. भामहाच्या मतानुसार[३] 'स्तुतिपर वाक्यांमध्ये प्रेयोऽलंकाराचे प्रामुख्य असले तरी रसादि हे अंगभूत असलेले दिसतात' असे हे एकच वाक्य समजले जाते, कारण भामहाने 'गुरु, देवता, राजा, पुत्र यांच्याबद्दलच्या प्रेमाचे वर्णन म्हणजे प्रेयोऽलंकार' असे म्हटले आहे.[४] प्रेयोऽलंकार म्हणजे 'प्रेयान् अलंकार हा जेथे आहे असा अलंकरणीय असलेला वाक्यार्थ' असे तात्पर्य[५] पण (प्रेयोऽलंकार हा कर्मधारय समास मानून) 'प्रेयान् अलंकार हाच वाक्याचा मुख्य अर्थ असताना' हे म्हणणे योग्य नाही. किंवा वाक्यार्थ याचा अर्थ 'प्रधानत्व' असा समजावा.[६] प्रधानत्व म्हणजे 'विशेष विस्मयकारक आनन्द निर्माण करण्याचे सामर्थ्य' (प्रेयोऽलङ्काराचे ठिकाणी असते) हा आशय. उद्‌भटमताचे अनुयायी मात्र वरील वाक्य पुढीलप्रमाणे फोडून[७] विवरण करितात— 'प्रशंसेच्या बाबतीत वाक्यार्थत्व असताना म्हणजे प्रशंसा हेच वाक्याचे मुख्य उद्दिष्ट असताना ती प्रेयोऽलंकाराचेही उदाहरण असते, असा पूर्वीच्या 'विषय' या शब्दाशी[८] संबंध जोडावा. कारण उद्‌भटाच्या मते जो प्रेयोऽलंकार आहे तो 'भावालंकार'च[९] होय, कारण 'भाव' (म्हणजे देवादिकांच्या संबंधीची रति) याचे वैशिष्टच 'प्रीति' हे असते. (वृत्तीतील वाक्यात असलेल्या) **अपि** या शब्दाचा अर्थ (उद्‌भटाच्या अनुयायांच्या मते) असा की, प्रशंसापर काव्यातील स्तुति ही केवळ रसवत्[१०] अलङ्काराचाच विषय नसते, तर प्रेयः वगैरे अलंकारांचाही[११] विषय असते, (वृत्तीतल्या रसवत् व प्रेयस् (पृ. ३६९ पाहा) या शब्दांनी रसवत्, प्रेयस्, ऊर्जस्वि, समाहित, भावोदय इ. अलंकारांचाही बोध होतो असे समजावे. हाच आशय वृत्तीमध्ये 'रसादि त्याला (म्हणजे प्रधान वाक्यार्थाला) अंगभूत असलेले दिसतात' या शब्दांनी प्रकट केला आहे. येथे (म्हणजे 'रसादि त्याला'... इ. वाक्यात) 'पूर्वी सांगितलेल्या

बाबतीत ' (म्हणजे प्रशंसापर काव्याच्या बाबतीत) हे शब्द अध्याहृत घ्यावेत.

टीपा

१. पुढे म्हणजे (काशी आवृत्ति) पृ. २०७ वर.

२. म्हणजे स्तुतिप्रधान काव्यांच्या उदाहरणांत.

३. म्हणज भामहाच्या अनुयायांच्या मतानुसार. यावरून व पुढे उद्भटाच्या मताच्या अनुयायांचा उल्लेख केला आहे त्यावरून असे दिसते की, भामह व उद्भट यांच्या अनुयायांच्या अभ्यासाचा व मतप्रदर्शनाचा विषय 'ध्वन्यालोक' हा ग्रंथ झाला होता. त्यांनी ध्वन्यालोकावर स्वतंत्र टीका लिहिल्या होत्या किंवा नाही हे मात्र सांगता येणे कठीण आहे.

४. भामहाने 'काव्यालंकारा' मध्ये प्रेयोऽलंकाराचे लक्षण कोठेही सांगितलेले नाही. त्याने काव्यालंकार, ३–५ मध्ये प्रेयोऽलंकाराचे उदाहरण मात्र दिले आहे. ते असे—

**अद्य या मम गोविन्द जाता त्वयि गृहागते ।**
**कालेनैषा भवेत् प्रीतिस्तवैवागमनात् पुनः ।।**

या उदाहरणावरून प्रेयोऽलंकारासंबंधी भामहाचे मत काय असावे याबाबत अनुमान करून **आनंदवर्धन** व **अभिनवगुप्त** या दोघांनी प्रेयोऽलंकारासंबंधी भामहाचे मत मांडले आहे.

दण्डीने 'काव्यादर्श', २–२७५ यात प्रेयः प्रियतराख्यानम् असे प्रेयोऽलंकाराचे लक्षण करून उदाहरण मात्र **अद्य या मम गोविन्द** हेच दिले आहे. या उदाहरणावर दण्डीने पुढीलप्रमाणे विवरण केले आहे–' असे जे विदुर म्हणाला ते कारण योग्यच, कारण दुसऱ्या कोणत्याही कारणाने त्याला इतका आनंद झाला नसता.'

५. म्हणजे अभिनवगुप्तांच्या मताप्रमाणे प्रेयोऽलङ्कार हा 'प्रेयान् हा जेथे अलंकार आहे' असा बहुव्रीहि समास घ्यावयाचा. कारण अलंकार हा केव्हाही मुख्य असणार नाही, तर अलंकाराने भूषविला जाणारा वाक्यार्थच मुख्य असतो.

६. असा अर्थ समजल्यास 'प्रेयोऽलङ्कार म्हणजे प्रेयान् अलंकार हाच वाक्यार्थ (म्हणजे प्रधान अर्थ) असताना' असा कर्मधारय समास घेऊन वाक्याचा अर्थ लावावयाचा.

७. उद्भटाच्या अनुयायांच्या मते वरील वाक्याचे दोन भाग पुढीलप्रमाणे— 'स्तुतिपर काव्ये ही प्रेयोऽलङ्काराचीसुद्धा उदाहरणे असतात' आणि

'स्तुतिपर काव्यांमध्ये रसादि हे स्तुतीला अंगभूत झालेले असतात.'

८ म्हणजे कारिका ५ वरील वृत्तीच्या पृ. ३६९ वरील १० व्या ओळीतील 'विषय' या शब्दाशी.

९. 'भाव' म्हणजे काय हे पृ. ३३९ टीप २ मध्ये पाहा. प्रेयोऽलंकाराचे लक्षण उद्‌भटाने काव्यालंकारसारसंग्रह, ४-२ मध्ये दिले आहे. त्याप्रमाणे उद्‌भटाच्या मते ज्यात देवादिकांविषयी वाटणारी रति मुख्यत्वाने वर्णिलेली असते, ते प्रेयोऽलंकाराचे उदाहरण होय. अभिनवगुप्तांनी मात्र उद्‌भटाचा प्रेयोऽलंकार म्हणजे भावालंकारच असे म्हटले आहे. देवादिकांविषयींच्या रतीला 'भाव' म्हणण्यात येते, पण तिला 'भावालंकार' असे अभिनवगुप्तांनी का म्हणावे हे समजत नाही. असा 'भाव' संपूर्ण वाक्याच्या अर्थाला गौण असेल तर गोष्ट वेगळी, पण तो भाव जर मुख्य असेल, तर त्याला 'भावालंकार' न म्हणता 'भाव' किंवा 'भावध्वनि' असेच म्हणावयास हवे.

१०. स्तुति हा रसवत् अलंकाराचा विषय केव्हा होऊ शकेल ? तर नायकाने नायिकेची किंवा नायिकेने नायकाची केलेली स्तुति हा काव्याचा विषय असेल तेव्हाच, अन्य कोणाची (म्हणजे देव, गुरु वगैरेंची) स्तुति काव्यात केलेली असेल, तर ते प्रेयोऽलंकाराचे उदाहरण होईल. अनुचित रतीच्या पोटी स्तुति केली असल्यास ती 'ऊर्जस्वी' अलंकाराचा विषय होऊ शकेल. (उदा. रावणाने सीतेची स्तुति करणे)

११. म्हणजे भामहाच्या अनुयायांच्या मते अपि या शब्दाचा अर्थ 'तरी' (म्हणजे विरोध) असा, तर उद्‌भटाच्या अनुयायांच्या मते अपि याचा अर्थ 'सुद्धा' (म्हणजे समुच्चय) असा आहे.

ध्वन्यालोकः

स च रसादिरलङ्कारः शुद्धः सङ्कीर्णो वा। तत्राद्यो यथा—
किं हास्येन न मे प्रयास्यसि पुनः प्राप्तश्चिराद्दर्शनं
केयं निष्करुण प्रवासरुचिता केनासि दूरीकृतः।
स्वप्नान्तेष्विति ते वदन् प्रियतमव्यासक्तकण्ठग्रहो
बुद्ध्वा रोदिति रिक्तबाहुवलयस्तारं रिपुस्त्रीजनः॥

ध्वन्यालोक

तो रसादि अलंकार शुद्ध किंवा संकीर्ण (म्हणजे संमिश्र) असू शकतो. त्यांपैकी शुद्धाचे उदाहरण —

"हसतोस काय ? खूप दीर्घ काळानंतर भेटला आहेस; आता तुला मी पुन्हा जाऊ देणार नाही. अरे निर्दया, काय ही तुझी प्रवास करण्याची आवड ? माझ्या कोणत्या अपराधामुळे तू माझ्यापासून दूर गेलास ?" असे तुझ्या शत्रूंच्या स्त्रिया स्वप्नामध्ये ( दिसलेल्या ) आपल्या प्रियतमांच्या गळ्यात आपले बाहुपाश गुंतवून म्हणत असताना जाग्या झाल्याबरोबर आपले बाहुपाश रिकामेच असलेले पाहून तारस्वराने आक्रोश करितात.

या ठिकाणी शुद्ध करुणरस हा अंगभूत[1] असल्याने रसवदलंकार आहे, हे स्पष्टच आहे. याप्रमाणे अशासारख्या काव्यांमध्ये[2] इतर रसदेखील अंगभूत असतात, हेही स्पष्ट होईल.

**लोचनम्**

शुद्ध इति । रसान्तरेणाङ्गभूतेनालङ्कारान्तरेण वा न मिश्रः, आमिश्रस्तु सङ्कीर्णः । स्वप्नस्यानुभूतसदृशत्वेन भवनमिति हसन्नेव प्रियतमः स्वप्नेऽवलोकितः । न मे प्रयास्यसि पुनरिति । इदानीं त्वां विदितशठभावं बाहुपाशबन्धान्न मोक्ष्यामि । अत एव रिक्तबाहुवलय इति । स्वीकृतस्य चोपालम्भो युक्त इत्याह — कथं निष्करुणेति । केनासीति । गोत्रस्खलनादावपि न मया कदाचित्खेदितोऽसि । स्वप्नान्तेषु स्वप्नायितेषु सुप्तप्रलपितेषु पुनःपुनरुद्भूततया बहुषु, इति वदन्युष्माकं सम्बन्धी रिपुस्त्रीजनः प्रियतमे विशेषेणासक्तः कण्ठग्रहो येन तादृश एव सन् बुद्ध्वा शून्यवलयाकारीकृतबाहुपाशः सन् तारं मुक्तकण्ठं रोदितीति । अत्र शोकस्थायिभावेन स्वप्नदर्शनोद्दीपितेन करुणरसेन चर्व्यमाणेन सुन्दरीभूतो नरपतिप्रभावो भातीति करुणः शुद्ध एवालङ्कारः । न हि त्वया रिपवो हता इति यादृगनलङ्कृतोऽयं वाक्यार्थस्तादृगयम्, अपि तु सुन्दरतरीभूतोऽत्र वाक्यार्थः, सौन्दर्यं च करुणरसकृतमेवेति । चन्द्रादिना वस्तुना यथा वस्त्वन्तरं वदनाद्यलङ्क्रियते तदुपमितत्वेन चारुतयावभासात्, तथा रसेनापि वस्तु वा रसान्तरं वोपस्कृतं सुन्दरं भाति इति रसस्यापि वस्तुन इवालङ्कारत्वे को विरोधः ?

ननु रसेन किं कुर्वता प्रकृतोऽर्थोऽलङ्क्रियते । तर्हि उपमयाऽपि किं कुर्वत्याऽलंक्रियेत । ननु तयोपमीयते प्रस्तुतोऽर्थः । रसेनापि सरसी-

क्रियते सोऽर्थं इति स्वसंवेद्यमेतत् । तेन यत्केचिदचूचुदन् – 'अत्र रसेन विभावादीनां मध्ये किमलङ्क्रियते' इति तदनभ्युपगमपराहतम्, प्रस्तुतार्थस्यालङ्कार्यत्वेनाभिधानात् । अस्यार्थस्य भूयसा लक्ष्ये सद्भाव इति दर्शयति – एवमिति । यत्र राजादेः प्रभावख्यापनं तादृश इत्यर्थः ।

लोचन

'शुद्ध' म्हणजे अंगभूत असलेल्या दुसऱ्या रसाशी किंवा दुसऱ्या अलंकाराशी मिश्रित नसलेला. पण जो असा मिश्रित असेल तो 'संकीर्ण' प्रकारचा होय. स्वप्नातील घडामोडी ह्या जीवनात अनुभवास येणाऱ्या घडामोडींसारख्याच असतात. म्हणून त्या स्त्रियांना त्यांचे प्रियकर हसत असलेलेच दिसले.[3] 'आता तुला मी पुन्हा जाऊ देणार नाही'–तुझी लबाडी मला कळून आल्यामुळे आता मी तुला माझ्या हातांच्या मिठीतून सुटू देणार नाही. म्हणूनच 'बाहुपाश रिकामेच असलेले पाहून' असे म्हटले आहे.[4] आपल्या माणसालाच टोचून बोलणे योग्य, म्हणूनच (प्रेमापोटी त्या स्त्रियांनी प्रिय पतीला) 'अरे निर्दया' असे म्हटले आहे. 'माझ्या कोणत्या अपराधामुळे'— तुझ्याकडून गोत्रस्खलितादि[5] चुका घडल्या तरी मी तुझ्यावर कधीही रागावले नाही. स्वप्नांमध्ये म्हणजे स्वप्ने पाहात असताना म्हणजे झोपेत केल्या जाणाऱ्या बडबडींमध्ये. अशा तऱ्हेचे प्रसंग वारंवार घडत असल्याने 'स्वप्नांमध्ये' असे बहुवचन वापरले आहे. 'असे म्हणणारा तुझा' रिपुस्त्रीजन, म्हणजे तुमच्याशी संबंध असलेला रिपुस्त्रीजन, म्हणजे तुमच्याशी शत्रुत्वाचा संबंध असलेल्या राजांच्या स्त्रियांचा समूह. प्रियतमाच्या गळ्याभोवती आपली मिठी विशेष दृढ केली आहे ज्यांनी म्हणजे ज्या शत्रुस्त्रियांनी. अशा अवस्थेत असतानाच जाग्या होऊन आपल्या बाहुपाशांना पोकळ वर्तुळाचे स्वरूप प्राप्त झाल्यामुळे त्या तारस्वराने म्हणजे मुक्तकण्ठाने आक्रोश करितात.

या उदाहरणात शत्रुस्त्रियांच्या ठिकाणचा शोक हा स्थायिभाव स्वप्न पाहिल्याने उद्दीपित होऊन वाचकाला करुणरसाचा आस्वाद मिळतो व तो करुणरस राजाचा प्रभाव या मुख्य वाच्यार्थाला भूषवीत आहे, म्हणून ह्या ठिकाणी निर्भेळ करुणरस हाच अलंकार होय. कारण

'तू शत्रूंचा नाश केलास ' हा वाक्यातील अर्थ जसा अलंकारहीन आहे, तसा या उदाहरणातील वाक्यार्थ नाही; तर तो वाक्यार्थ अधिक रमणीय झाला आहे व ती रम्यता त्या वाक्यार्थाला करुणरसामुळेच प्राप्त झाली आहे. चन्द्र वगैरे उपमानांमुळे ज्याप्रमाणे वदन इ. उपमेयांचे सौंदर्य वाढविले जाते, म्हणजे त्या चंद्रादिकांची उपमा दिल्याने ज्याप्रमाणे वदनादि विषय अधिक सुंदर भासू लागतात, त्याप्रमाणे 'वस्तु' स्वरूपाचा किंवा रसस्वरूपाचा मुख्यार्थ दुसऱ्या अंगभूत रसामुळे अधिक सुंदर वाटतो. मग त्या अंगभूत रसालाही चंद्रादि वस्तूंप्रमाणे[६] 'अलंकार ' म्हणण्यास प्रत्यवाय तो कोणता ?

'पण काय हो, रस हा नेमके काय करून प्रस्तुत वाक्याला अलंकृत करितो ? तर या प्रश्नावर आमचाही प्रश्न असा की, उपमा-सुद्धा काय करून प्रस्तुत वाक्यार्थाला अलंकृत करिते ? यावर तुम्ही जर म्हणाल की, ' उपमेमुळे प्रस्तुत अर्थाची कशाशी तरी तुलना केली जाते; तर आम्हीही म्हणतो की, रसानेही तो मुख्य वाक्यार्थ 'सरस' (म्हणजे अधिक सुंदर) केला जातो, याचा अनुभव सहृदयांना स्वत:लाच येतो. त्यामुळे जर कोणी असा आक्षेप घेतला की, अशा ठिकाणी रस हा विभाव, अनुभाव, व्यभिचारिभाव ह्यांपैकी कोणाला विभूषित करितो, तर त्या आक्षेपामागील भूमिका[७] आम्हाला स्वीकारार्ह वाटत नसल्यामुळे तो आक्षेप निकालात निघतो, कारण प्रस्तुत वाक्यार्थ हाच 'अलंकार्य ' असतो असे ग्रंथकारांनी (५ व्या कारिकेत) म्हटले आहे. हा प्रकार (म्हणजे रसादि हे ज्यात अन्य मुख्य वाक्यार्थाला अंगभूत म्हणून अलंकार असतात, तो प्रकार) काव्यात विपुल प्रमाणात आढळतो, असे वृत्तिकार 'याप्रमाणे अशा-सारख्या ... ' इ. वाक्याने दर्शवितात. म्हणजे ज्यात राजा, देवता वगैरेंचा प्रभाव वर्णिलेला असतो अशासारख्या उदाहरणात, हा आशय.

टीपा

१. शत्रूंना मारणाऱ्या राजाविषयीचा कवीच्या मनातील रतिभाव या ठिकाणी मुख्य असून करुणरस त्याचे अंग आहे.

२. अशासारख्या काव्यात, म्हणजे ज्यात दुसरा कोणतातरी आशय मुख्य असून

रस इ. त्याचे अंग असतात, अशा.

३. म्हणजे त्यांचे प्रियकर हसतमुखच असल्यामुळे त्या स्त्रियांना ते स्वप्नातही त्याच स्वरूपात दिसले.

४. म्हणजे स्वप्नात दिसलेल्या आपल्या प्रियपतींना बांधून ठेवण्यासाठी त्या स्त्रियांनी त्यांच्या कंठाभोवती आपल्या हातांचे 'कडे' तयार केले. परंतु जाग्या झाल्यावर त्यांना हातांचे हे कडे तेवढे दिसले, पण त्यात त्यांचे प्रियतम मात्र दिसले नाहीत. यामुळे 'रिकामेच असलेले आपले बाहुपाश पाहून' असे म्हटले आहे. तुलनार्थ पाहा, मेघदूतम्, ११२, **मामाकाशप्रणिहित-भुजं**... इ. श्लोक व कुमारसंभवम्, ५–५७, **असत्यकण्ठार्पितबाहु-बन्धना** इ. श्लोक.

५. पृ. ११२ वरील टीप १ ली पाहा.

६. वस्तुतः चंद्रादि वस्तु या, 'वदनाचे अलंकार' या सदरात येत नाहीत, पण उपमान या नात्याने त्या वदनादि वर्ण्य वस्तूंचे सौंदर्य खुलविण्यास उपयोगी पडतात, म्हणून त्यांना येथे अलंकार मानले आहे. कुंडले वगैरे वस्तु ज्या-प्रमाणे शरीराचे अलंकार असतात, त्याप्रमाणे चन्द्रादि पदार्थ उपमान म्हणून वापरल्याने ते उपमेयांचे शोभाकर होतात. तसेच अंगभूत रस विशिष्ट परिस्थितीत शोभाकर झाल्यास त्यांना अलंकार मानणे तर्कसंगतच आहे.

ध्वन्यालोकः

सङ्कीर्णो रसादिरङ्गभूतो यथा —

क्षिप्तो हस्तावलग्नः प्रसभमभिहतोऽप्याददानोंऽशुकान्तं,
गृह्णन् केशेष्वपास्तश्चरणनिपतितो नेक्षितः सम्भ्रमेण ।
आलिङ्गन्योऽवधूतस्त्रिपुरयुवतिभिः साश्रुनेत्रोत्पलाभिः
कामीवार्द्रापराधः स दहतु दुरितं शाम्भवो वः शराग्निः ॥

इत्यत्र त्रिपुररिपुप्रभावातिशयस्य वाक्यार्थत्वे ईर्ष्याविप्रलम्भस्य श्लेषसहितस्याङ्गभाव इति ।

एवंविध एव रसवदाद्यलङ्कारस्य न्याय्यो विषयः । अत एव चेर्ष्याविप्रलम्भकरुणयोरङ्गत्वेन व्यवस्थानात्समावेशो न दोषः ।

यत्र हि रसस्य वाक्यार्थीभावस्तत्र कथमलङ्कारत्वम् ? अलङ्कारो हि चारुत्वहेतुः प्रसिद्धः । न त्वसावात्मैवात्मनश्चारुत्वहेतुः । तथा चायमत्र संक्षेपः —

रसभावादितात्पर्यमाश्रित्य विनिवेशनम् ।
अलङ्कृतीनां सर्वासामलङ्कारत्वसाधनम् ॥

तस्माद्यत्र रसादयो वाक्यार्थीभूताः स सर्वः न रसादेरलङ्कारस्य विषयः, स ध्वनेः प्रभेदः । तस्योपमादयोऽलङ्काराः । यत्र तु प्राधान्येनार्थान्तरस्य वाक्यार्थीभावे रसादिभिश्चारुत्वनिष्पत्तिः क्रियते स रसादेरलङ्कारताया विषयः ।

एवं ध्वनेः, उपमादीनां, रसवदलङ्कारस्य च विभक्तविषयता भवति ।

ध्वन्यालोक

' संमिश्र ' रसादि अंगभूत असतानाचे उदाहरण असे :—

प्रियेचा नुकताच अपराध केलेल्या प्रियकराप्रमाणे वागणारा, शंकरांच्या बाणातून पेटलेला अग्नि तुमचे पाप जाळून भस्म करो. त्रिपुरासुराच्या अश्रु गाळणाऱ्या तरुण पत्नींनी तो बाणाग्नि झटकला तरी त्यांच्या हातांना झोंबू लागला; त्यांनी जोराने थपडा मारल्या, तरी तो त्यांच्या वस्त्रांचे पदर पकडू लागला; बाजूला ढकलला, तरी त्याने त्यांचे केश धरायला आरंभ केला; त्यांनी घाईत त्याच्याकडे पाहिले नाही, तरी त्याने त्यांच्या पायावर लोटांगण घेतले, आणि त्यांनी त्याला झिडकारले, तरी तो त्यांना मिठी मारू लागला. *

या उदाहरणात त्रिपुरासुराच्या शत्रूचा म्हणजे शंकराचा लोकोत्तर प्रभाव हा मुख्य वर्ण्य विषय असून श्लेष या अलंकारासहित ईर्ष्याविप्रलंभ त्याला अंगभूत आहे.

अशा प्रकारच्या उदाहरणांनाच रसवदलंकाराचे क्षेत्र समजणे हे योग्य होईल. आणि म्हणूनच ईर्ष्याविप्रलंभ व करुण ( हे दोन रस विरुद्ध असले तरी ते ) मुख्यार्थाला अंगभूत असल्याने त्यांचा एकाच पद्यामध्ये समावेश करणे दोषास्पद नाही.

कारण जेथे रस हाच मुख्य विषय आहे, तेथे तो (रस) अलंकार कसा होईल ? याचे कारण असे की, अलंकार हा सौंदर्याचे ' साधन ' म्हणून प्रसिद्ध आहे. पण तो रस स्वतः आत्मा असताना स्वतःच्याच सौंदर्याचे साधन

* तुलना, रसगंगाधर, काव्यमाला आवृत्ति, पृ. १०७ वरील उत्क्षिप्ताः कबरीभरस् इ. श्लोक.

असू शकणार नाही.[१]

तेव्हा या चर्चेचा थोडक्यात सारांश असा—कोणताही अलंकार हा खराखुरा अलंकार केव्हा होईल ? तर रस, भाव वगैरेंसाठी म्हणजे मुख्य असलेल्या रस, भाव वगैरेंचे अंग म्हणून, त्यांना उपकारक म्हणून, त्यांची योजना करावी, तेव्हा ( तो ‘ अलंकार ’ होईल )

म्हणून ज्या ठिकाणी रसादि हाच मुख्य विषय असेल, त्यांपैकी कोणतेच रसवदलंकाराचे उदाहरण होणार नाही. तो ‘ध्वनी’चा एक प्रकार होईल व उपमा वगैरे त्याचे अलंकार होतील; पण ज्या ठिकाणी दुसरा कोणता तरी अर्थ मुख्यत्वाने सांगायचा असून रसादिकांनी त्याला सौंदर्य प्राप्त करून देण्यात येत असेल, त्या ठिकाणी रसादि हे ‘ अलंकार ’ होतात. याप्रमाणे ध्वनि, उपमादि अलंकार व रसवदलंकार यांचे विषय वेगळे वेगळे आहेत.

लोचनम्

क्षिप्त इति। कामिपक्षेऽनादृतः, इतरत्र धूतः। अवधूत इति न प्रतीप्सितः प्रत्यालिङ्गनेन, इतरत्र सर्वाङ्गधूननेन विशरारूकृतः। साश्रुत्वमेकत्रेर्ष्यया अन्यत्र निष्प्रत्याशतया। कामीवेत्यनेनोपमानेन श्लेषानुगृहीतेनेर्ष्याविप्रलम्भो य आकृष्टस्तस्य श्लेषोपमासहितस्याङ्गत्वम् न केवलस्य। यद्यप्यत्र करुणो रसो वास्तवोऽप्यस्ति तथापि स तच्चारुत्वप्रतीत्यै न व्याप्रियत इत्यनेनाभिप्रायेण श्लेषसहितस्येत्येतावदेवावोचत्, न तु करुणसहितस्येत्यपि। एतमर्थमपूर्वतयोत्प्रेक्षितं दृढीकर्तुमाह—एवंविध एवेति। अत एवेति। यतोऽत्र विप्रलम्भस्यालङ्कारत्वं न तु वाक्यार्थता, अतो हेतोरित्यर्थः। न दोष इति। यदि ह्यन्यतरस्य रसस्य प्राधान्यमभविष्यन्न द्वितीयो रसः समाविशेत्। रतिस्थायिभावत्वेन तु सापेक्षभावो विप्रलम्भः। स च शोकस्थायिभावत्वेन निरपेक्षभावस्य करुणस्य विरुद्ध एव। एवमलङ्कारशब्दप्रसङ्गेन समावेशं प्रसाध्य एवंविध एवेति यदुक्तं तत्रैवकारस्याभिप्रायं व्याचष्टे यत्र हीति। तत्रा-सामुपमादीनाम्।

अयं भावः — उपमादीनामलङ्कारत्वे यादृशी वार्ता तादृश्येव रसादीनाम्। तदवश्यमन्येनालङ्कार्येण भवितव्यम्। तच्च यद्यपि वस्तुमात्रमपि भवति, तथापि तस्य पुनरपि विभावादिरूपतापर्यवसानाद्र-

सादितात्पर्यमेवेति सर्वत्र रसध्वनेरेवात्मभाव:। तदुक्तं – रसभावादि-तात्पर्यमिति। तस्येति। प्रधानस्यात्मभूतस्य।

एतदुक्तं भवति– उपमया यद्यपि वाच्योऽर्थोऽलङ्क्रियते, तथापि तस्य तदेवालङ्करणं यद्व्यङ्ग्यार्थाभिव्यञ्जनसामर्थ्याधानमिति वस्तुतो ध्वन्यात्मैवालङ्कार्य:। कटककेयूरादिभिरपि हि शरीरसमवायिभिश्चेतन आत्मैव तत्तच्चित्तवृत्तिविशेषौचित्यसूचनात्मतयालङ्क्रियते। तथाहि– अचेतनं शवशरीरं कुण्डलाद्युपेतमपि न भाति, अलङ्कार्यस्याभावात्। यतिशरीरं कटकादियुक्तं हास्यावहं भवति, अलङ्कार्यस्यानौचित्यात्। न हि देहस्य किंचिदनौचित्यमिति वस्तुत आत्मैवालङ्कार्य:, अहमलङ्कृत इत्यभिमानात्। रसादिरलङ्कारताया इति। व्यधिकरणषष्ठ्यौ, रसादेर्या-लङ्कारता तस्या: स एव विषय:। एतदनुसारेणैव पूर्वत्रापि वाक्ये योज्यम्, रसादिकर्तृकस्यालङ्करणक्रियात्मनो विषय इति। एवमिति। अस्मदुक्तेन विषयविभागेनेत्यर्थ:।उपमादीनामिति। यत्र रसस्यालङ्कार्यता रसान्तरं चाङ्गभूतं नास्ति, तत्र शुद्धा एवोपमादय:। तेन संसृष्ट्या नोपमादीनां विषयापहार इति भाव:। रसवदलङ्कारस्य चेति। अनेन भावाद्यलङ्कारा अपि प्रेयस्यूर्जस्विसमाहिता गृह्यन्ते। तत्र भावालङ्कारस्य शुद्धस्योदाहरणं यथा–

> तव शतपत्रपत्रमृदुताम्रतलश्चरणश्चलकलहंसनूपुरकलध्वनिना मुखर:।
> महिषमहासुरस्य शिरसि प्रसभं निहित: कनकमहामहीध्रगुरुतां कथमम्ब गत:।।

इत्यत्र देवीस्तोत्रे वाक्यार्थीभूते वितर्कविस्मयादिभावस्य चारुत्व-हेतुतेति तस्याङ्गत्वाद्भावालङ्कारस्य विषय:। रसाभासस्यालङ्कारता यथा ममैव स्तोत्रे–

> समस्तगुणसम्पद: सममलङ्क्रियाणां गणै–
> र्भवन्ति यदि भूषणं तव तथापि नो शोभसे।
> शिवं हृदयवल्लभं यदि यथा तथा रञ्जये.
> स्तदेव ननु वाणि ! ते भवति सर्वलोकोत्तरम्।।

अत्र हि परमेशस्तुतिमात्रं वाच्य: परमोपादेयमिति वाक्यार्थे शृङ्गाराभासश्चारुत्वहेतु: श्लेषसहित:। न ह्ययं पूर्ण: शृङ्गारो नायि-

काया निर्गुणत्वे निरलङ्कारत्वे च भवति । 'उत्तमयुवप्रकृतिरुज्ज्वल-वेषात्मकः' इति चाभिधानात् । भावाभासाङ्गता यथा--

स पातु वो यस्य हतावशेषास्तत्तुल्यवर्णाञ्जनरञ्जितेषु ।
लावण्ययुक्तेष्वपि वित्रसन्ति दैत्याः स्वकान्तानयनोत्पलेषु ।।

अत्र रौद्रप्रकृतीनामनुचितस्त्रासो भगवत्प्रभावकारणकृत इति भावाभासः । एवं तत्प्रशमस्याङ्गत्वमुदाहार्यम् ।

लोचन

'झटकला' हा शब्द अपराधी प्रियकराकडे घेताना त्याचा 'उपेक्षिला' हा अर्थ. शंकराच्या बाणातून निघालेल्या अग्नीकडे घेताना ('झटकला' याचा) 'बाजूला ढकलला' हा अर्थ. 'झिडकारले' म्हणजे त्यांनी त्याला प्रत्यालिंगन देऊन त्याच्या आलिंगनाला प्रतिसाद दिला नाही (हा प्रियकराच्या बाबतीतला अर्थ). बाणाग्नीच्या बाबतीत 'आपले सर्वांग गदागदा हलवून त्याला हतबल करण्याचा प्रयत्न केला हा अर्थ. 'अश्रु गाळणे' हे प्रियकरपक्षी त्याच्याविषयीच्या क्रोधामुळे आणि दुसऱ्या पक्षी (म्हणजे अग्नीच्या बाबतीत) प्राण वाचविण्याची आशा नसल्यामुळे. 'प्रियकराप्रमाणे' या उपमेतील श्लेषाने उपकृत झालेल्या प्रियकर या उपमानामुळे जो ईर्ष्याविप्रलंभ सूचित होतो, तो ईर्ष्याविप्रलंभ श्लेषोपमा या अलंकारासह (शिव-विषयक रति या मुख्य भावाचे) अंग होतो, केवळ ईर्ष्याविप्रलंभ हा एकटाच त्याचे अंग होत नाही. जरी या उदाहरणात वस्तुतः करुणरसाची प्रतीति येत असली, तरीही श्लोकातील मुख्य अर्थाचे सौंदर्य वाढवण्यात त्या करुणरसाचा काहीही भाग नाही[२] हे लक्षात घेऊन वृत्तिकारांनी 'श्लेषाच्या मदतीने' इतकेच म्हटले, 'करुणरसाच्या मदतीने' असेही म्हटले नाही. हा मुद्दा (म्हणजे रसवदलंकाराचे निश्चित क्षेत्र) ग्रंथ-कारांना अगदी प्रथमच सुचला.[3] त्याला बळकटी आणण्यासाठी वृत्तिकार 'अशा प्रकारच्या उदाहरणांनाच' इ. विधान करितात. 'आणि म्हणूनच' म्हणजे ज्या अर्थी येथे विप्रलंभ हा मुख्य वाक्यार्थ नसून 'अलंकार' आहे, त्या कारणासाठी 'दोषास्पद नाही'—जर या उदाहरणात विप्रलंभ आणि करुण या दोहोंपैकी कोणताही एखादा रस मुख्य असता,

तर येथे त्यांपैकी दुसऱ्या रसाला प्रवेशच मिळाला नसता.[४] विप्रलंभाचा स्थायिभाव '(वियोगातील) रति' हा असल्यामुळे त्यात पुनर्भेटीची अपेक्षा असते. पण तो विप्रलंभ, शोक हा ज्याचा स्थायिभाव असतो व ज्यात पुनर्भेटीची आशा नसते अशा करुणरसाच्या विरुद्धच असतो[५] (यात शंका नाही). याप्रमाणे (कारिका ५ मधील) 'अलंकार' शब्दाच्या निमित्ताने, जाता जाता, अंगभूत असलेल्या दोन विरोधी रसांच्या समावेशाचे समर्थन करून 'अशा प्रकारच्या उदाहरणांनाच' असे जे म्हटले आहे, त्यातील 'च 'च्या योजनेमागील अभिप्राय वृत्तिकार 'कारण जेथे' इ. वाक्याने स्पष्ट करितात. (संक्षेपश्लोकातील) कोण-ताही (अलंकार) म्हणजे उपमा, (रसवत्), वगैरे कोणताही अलंकार.

ही कारिका लिहिण्यामधील ग्रंथकाराचा आशय असा :– काव्यात उपमा वगैरे अलंकार वापरलेले असताना त्यांची जी परिस्थिति असते, तीच रस, भाव वगैरेंची, ते अलंकार असताना, असते. उपमादि अलंकार काय, किंवा रसादि अलंकार काय, ते 'अलंकार' असले तर त्यांच्याहून वेगळा दुसरा कोणता तरी अर्थ 'अलंकार्य' असलाच पाहिजे. तो अलंकार्य काहीवेळा (सुरुवातीला) जरी केवळ वस्तुस्वरूपाचाही असला, तरी त्याचे पुन्हा विभावादि रसाङ्गांमध्ये रूपान्तर होत असल्याने तोही (परंपरेने) शेवटी रस, भाव इत्यादिकांचीच अभिव्यक्ति करितो;[६] म्हणून सर्व काव्यांमध्ये प्रधानत्वाने व्यंग्य असलेला रस, भाव इ. हाच आत्मा (व अलङ्कार्य) असतो. म्हणूनच वृत्तिकारांनी (सारांश सांग-ताना) 'मुख्य असलेल्या रस, भाव वगैरेंचे अंग म्हणून ...' असे म्हटले. 'त्याचे' म्हणजे मुख्य व आत्मा असलेल्या त्या ध्वनीचे.

अलङ्कारांचे काव्यात कार्य कोणते, या बाबतीतल्या वृत्तिकारांच्या म्हणण्याचा एकंदर भावार्थ असा :– उपमेमुळे (व इतर अलंकारांमुळे) जरी वाच्यार्थ भूषित केला जात असला, तरी 'भूषित केला जाणे' याचा खरा अर्थ (अलंकारांमुळे वाच्यार्थाला) व्यंग्यार्थाची अभिव्यक्ति करण्याचे सामर्थ्य प्राप्त करून दिले जाणे, हाच होय. म्हणून वस्तुत: ध्वनिरूपी आत्मा (म्हणजे प्रधानत्वाने व्यंग्य असणारा रसभावादि अर्थ) हाच 'अलंकार्य' होय.[७] कारण सलकडी, केयूर इ. लौकिक अलंकारांचा शरीराशी निकट संयोग[८] असला, तरी ते अलंकार शेवटी

चेतन आत्म्यालाच अलंकृत करीत असतात, कारण ते अलंकार त्यांना धारण करणाऱ्या व्यक्तीच्या ठिकाणी असणाऱ्या (विलासीपणा, साधेपणा इ.) चित्तवृत्तींचे सूचक असतात. म्हणजे असे की, निर्जीव असलेल्या मृताच्या शरीरावर कुंडले वगैरे अलंकार चढविलेले असले, तरी त्यांमुळे ते शरीर काही सुंदर दिसत नाही, कारण त्या शरीरात ज्याला अलंकृत करावयाचे, तो आत्माच असत नाही. संन्याशाच्या अंगावर सलकडी वगैरे (अलंकार) घातले, तर ते हास्यकारक वाटतात, कारण अलंकार्य असलेल्या संन्याशाच्या आत्म्याला ते उचित म्हणजे साजेसे नसतात.[९] खरे म्हणजे शरीराच्या बाबतीत (मग ते शरीर सजीव असो वा निर्जीव असो) औचित्य किंवा अनौचित्य यांचा प्रश्न नसतो,[१०] म्हणून (अलंकारांच्या द्वारा) वास्तविक आत्मा हाच अलंकृत होतो (शरीर होत नाही); कारण 'मी (आत्मा) अलंकारांनी भूषित झालो आहे' हीच ठाम समजूत अलंकार धारण करणाऱ्याच्या ठिकाणी असते. वृत्तीतल्या **रसादेः व अलंकारतायाः** या दोन्ही शब्दांतील विभक्ति 'षष्ठी' ही एकच असली, तरी ती 'व्यधिकरणषष्ठी'[११] आहे. रसादींचे जे अलंकारत्व (म्हणजे रसादींच्या ठिकाणी असणारा जो अलंकारत्व हा धर्म), त्याचा तोच 'विषय' म्हणजे उदाहरण होय, असा अर्थ. याप्रमाणेच पूर्वीच्याही (म्हणजे वृत्तीमधील न रसादेरलंकारस्य विषयः) या वाक्याचा[१२] अन्वयार्थ असा करावा :– (त्यांपैकी कोणतेही) रसादींकडून केली जाणारी जी भूषविण्याची क्रिया, तिचे उदाहरण होणार नाही.

'याप्रमाणे'– म्हणजे आम्ही (रस व रसवत् अलंकार यांच्या स्वरूपातील) जो वेगळेपणा सांगितला, त्याला अनुसरून. 'उपमादि अलंकार'–ज्या उदाहरणात एक रस अलंकार्य असून दुसरा कोणताही रस त्याला अंगभूत नसतो, तेथे असणारे उपमादि अलंकार हेच निर्भेळ उपमादि अलंकार होत. त्यामुळे जेथे रसवत् इ. अलंकार (उपमादिकांशी संसृष्ट (संकीर्ण) झालेले असतात, त्या उदाहरणांमुळे निर्भेळ उपमादि अलंकारांचे क्षेत्रच नाहीसे झाले, असे होत नाही, असा अभिप्राय.[१३] 'व रसवत् अलंकार यांचे'– रसवत् अलंकारांमध्ये प्रेयस्वी, ऊर्जस्वी, समाहित वगैरे भावादि अलंकारांचाही[१४] समावेश झाला

आहे. त्यांपैकी शुद्ध भावालंकाराचे उदाहरण पुढीलप्रमाणे–

'हे आई जगदम्बे ! शतदल कमळाच्या पाकळीप्रमाणे कोमल व तांबुस असलेल्या व जलविहार करणाऱ्या कलहंसाच्या कूजनाप्रमाणे मधुर नूपुरध्वनीने निनादित झालेल्या तुझ्या चरणाने तू महाभयंकर महिषासुराच्या मस्तकावर ज्यावेळी जोराने आघात केलास, त्यावेळी तो चरण सुवर्णमय व प्रचंड अशा मेरुपर्वताप्रमाणे वजनदार कसा बरे झाला ?'

या उदाहरणात महिषासुरमर्दिनी देवीची स्तुति हा मुख्य वाक्यार्थ असून वितर्क, विस्मय वगैरे (व्यंग्य) व्यभिचारिभाव हे त्या मुख्य वाक्यार्थाचे सौंदर्य खुलवितात, म्हणून ते भाव येथे देवीच्या स्तुतीला अंगभूत होऊन 'भावालंकारा' चा विषय होतात.

'रसाभास' हा अलंकार होतो, याचे उदाहरण मी रचलेल्या स्तोत्रातील पुढील पद्य–

'हे वाणि ! सर्व काव्यालंकारांच्या समूहासह सर्व काव्यगुणांच्या वैभवाने तू संपन्न झालीस, तरी त्यामुळे तुला खरी शोभा नाही. सर्वांचा आत्मा असल्यामुळे प्रिय जो शिव, त्याला तू (गुणालंकारांवाचूनसुद्धा) कोणत्याही उपायांनी प्रसन्न केलेस, तरच ते तुझे अलौकिक भूषण होईल यात शंका नाही.

(वरील पद्याचा दुसरा अर्थ–) 'हे नायिके, जरी सर्व प्रकारच्या अलंकारांसह गुणसंपदेने तू भूषित झाली असलीस, तरी त्यामुळे तुला काही खरी शोभा नाही. तू गुण व अलंकार यांच्या अभावीसुद्धा जर आपल्या मंगलकारक हृदयवल्लभाची मर्जी संपादन केलीस, तरच ते तुझे अलौकिक भूषण होईल यात शंका नाही.'

यात 'वाणीने संपादावयाचे परमसाध्य शंकराची स्तुति हेच होय' हा मुख्य अर्थ आहे. श्लेषामुळे प्रतीत होणारा शृंगाराभास हा त्या मुख्य वाक्यार्थाचे सौंदर्य खुलविण्यास कारणीभूत झाला आहे. कारण, नायिका ही निर्गुण व अलंकाररहित असल्यामुळे येथ शृंगाररस पूर्णतेस पोहोचत नाही. कारण म्हटले आहे, की,[१५] 'शृंगाररसाला उत्तम श्रेणीचे यौवनसंपन्न नायक व नायिका आवश्यक असतात व त्यांची वेषभूषा ही आकर्षक असावी लागते. 'भावाभास' हा मुख्य वाक्यार्थाचे अंग अस-

तानाचे (म्हणजे 'ऊर्जस्वी' अलंकाराचे) उदाहरण पुढीलप्रमाणे–

'ज्याने संहार केल्यानंतर उरलेसुरलेले दैत्य त्या कृष्णाग्रस्त्याला रंगाच्या काजळाने रंगलेली आपल्या प्रियपत्नींची नेत्रकमले सुंदर दिसत असली, तरी ती पाहून भयभीत होतात, तो कृष्ण तुमचे रक्षण करो'[१८]

यात ज्यांचा स्वभाव दुसऱ्यांना भयभीत करण्याचा आहे, अशांचा भीतीने थरकाप होणे ही गोष्ट अनुचित होय. तरी ती भीति भगवंताचा अद्भुत प्रभाव या कारणामुळे खरोखरीच घडून आली, म्हणून येथे 'भावाभास'[१९] आहे. याप्रमाणेच 'भावप्रशम' मुख्य वाक्यार्थाला अंगभूत असतानाचे (म्हणजे 'समाहित' अलंकाराचे) उदाहरण (सहृदयांनी) शोधून काढावे.

टीपा

१. रस हाच वाक्यात मुख्य असताना त्याला 'रसवत् अलंकार' म्हणावे हे मत भामह, दंडी, उद्भट यांचे आहे. त्याला अनुलक्षून आनंदवर्धन 'मुख्य असलेला रस अलंकार कसा होईल' ही अडचण मांडतात.
श्रीशंकराचार्य म्हणतात–न हि नटः शिक्षितः सन् स्वस्कन्धमधिरोक्ष्यति। (ब्रह्मसूत्र शांकरभाष्य, ३–३–५४). म्हणजे एखादा डोंबारी हा कितीही उत्तम शिकून तयार झाला, तरी तो काही स्वतःच्याच खांद्यावर चढून बसू शकत नाही. तसेच जो स्वतः आत्मा, अतएव 'अलंकार्य' आहे, तो स्वतःच स्वतःच्या सौंदर्याचे कारण कसा होऊ शकेल ?

२. 'प्रियेचा नुकताच अपराध केलेल्या'......' इत्यादि श्लोक संकीर्ण रसादि (म्हणजे रसवत्) अलंकाराचे उदाहरण म्हणून दिला आहे. या श्लोकामध्ये शंकराचे लोकोत्तर सामर्थ्य हा प्रधान वाच्यार्थ असून श्लेष (किंवा श्लिष्टोपमा) या अलंकाराबरोबर संकीर्ण (मिश्रित) झालेला ईर्ष्याविप्रलंभ शृंगार हा त्या वाक्यार्थाचे सौंदर्य वाढवीत असल्यामुळे येथे संकीर्ण रसवत् अलंकार आहे. 'हसतोस काय ?' इ. श्लोकामध्ये वर्ण्य राजाचा लोकोत्तर प्रभाव हा प्रधान वाच्यार्थ व करुणरस हा त्याचे सौंदर्य वाढविणारा म्हणून रसवत् अलंकार. करुण रसाचे दुसऱ्या कोणत्याही रसाशी किंवा अलंकाराशी मिश्रण झालेले नसल्यामुळे येथील रसवत् अलंकार शुद्ध आहे. 'संकीर्ण' याचा अर्थ दुसऱ्या कोणत्याही रसादि व्यंग्य अर्थाशी किंवा वाच्य अथवा व्यंग्य अलंकाराशी मिश्रण झालेला. 'प्रियेचा नुकताच अपराध केलेल्या' इ. श्लोकात खरे पाहू जाता करुण, ईर्ष्याविप्रलम्भ शृंगार व श्लेष (श्लिष्टो-

पणा) या तिहींचे मिश्रण झालेले आहे, व म्हणून ईर्ष्याविप्रलंभ शृंगार हा करुणरस व श्लेष अलंकार या दोहोंबरोबर संकीर्ण झाला आहे, असे आनंदवर्धनांनी म्हणावयास हवे होते. पण ते येथे आधीच्या वाक्यात करुणरसाचा उल्लेख करीत नाहीत. यावरून अभिनवगुप्त असे अनुमान करतात की, येथे करुणरस हा प्रधान वाक्यार्थाचे अंग नाही, म्हणजे करुण रसामुळे प्रधान वाक्यार्थाच्या सौंदर्याची वाढ होत नाही; पण हे म्हणणे पटण्यासारखे नाही. कारण, ' हसतोस काय ? ' इ. श्लोकामध्ये करुणरस हा प्रधान वाक्यार्थाचे अंग आहे. असे स्वतः आनंदवर्धनांनी वृत्तीमध्ये पृ. ३७४ वर म्हटले आहे. मग ' प्रियेचा नुकताच अपराध केलेल्या ' इ. श्लोकामध्येसुद्धा करुणरस हा ईर्ष्याविप्रलंभ शृंगार आणि श्लेष यांच्या बरोबरीने प्रधान वाक्यार्थाचे अंग ( म्हणजे त्याचे सौंदर्य वाढविणारा ) आहे असे का मानू नये ? पृ. ३७८ वर ईर्ष्याविप्रलंभ शृंगार व करुण हे दोनही मुख्य वाक्यार्थाची अंगे ( म्हणजे सौंदर्यवर्धक ) आहेत असे आनंदवर्धन म्हणतात. शिवाय पुढे (काही आवृत्तींच्या) उद्द्योत ३, पृ. ३६१ वर परस्परविरोधी दोन रस एका प्रधान वाक्यार्थाची अंगे असू शकतात असे म्हणून ' प्रियेचा नुकताच अपराध केलेल्या' इ. श्लोकाचाच हवाला ते देतात. यावरून हे स्पष्ट होते की, या श्लोकामध्ये करुणरस हा वाक्यार्थाचे मुख्यत्वाने अंग आहे. पृ. ३७८ वर आधीच्या वाक्यात आनंदवर्धनांनी करुणरसाच्या अंगत्वाचा निर्देश केला नाही हे केवळ अनवधानाने झाले असावे किंवा ईर्ष्याविप्रलंभ रसाची संकीर्णता दाखवावयासाठी केवळ श्लिष्टोपमेचा उल्लेख करणे त्यांना पुरेसे वाटले असावे व म्हणून आणखी करुणरसाचाही उल्लेख करण्याची जरूर वाटली नसावी. आणि तो उल्लेख त्यांनी लगेच पुढच्या वाक्यात केलाही आहे.

३. रसवत् इ. अलंकाराचे निश्चित स्वरूप ध्वन्यालोकातच प्रथम सांगितले गेले. त्यापूर्वी भामह, दण्डी, उद्भट या लेखकांनी रसवत् वगैरे अलंकारांची लक्षणे दिलेली असली, तरी त्यांचे स्वरूप निश्चित केले नव्हते. ' काव्यातून केवळ रसाची प्रतीति झाली की, तेथे रसवत् अलंकार असतो ' अशीच त्यांची समजूत असलेली दिसते. रस हा मुख्य वाक्यार्थाला अंगभूत असला, तरच त्याला रसवत् अलंकार म्हणावयाचे असे त्यांनी कोठेही म्हटलेले नाही.

४. पाहा, उद्द्योत ३ मधील २४ वी कारिका.

५. पाहा, पृ. १३५. तेथे करुणरसाचे वैशिष्टय सांगताना ' निरपेक्षभाव ' हा शब्द अभिनवगुप्तांनी वापरलेला आहे. (सापेक्ष व निरपेक्ष हे शब्द भरताने नाट्यशास्त्र, ६—४५ नंतरच्या गद्यभागात योजिले आहेत.)

६. पाहा, पृ. ८३ व १३७.

७. म्हणजे वाच्यार्थ हा काव्याचे अंतिम उद्दिष्ट नसल्याने तो अलंकार्य नव्हे.

८. मुळातल्या ' समवाय ' या शब्दाचा अर्थ वैशेषिक मतानुसार घ्यावयाचा नसून केवळ ' निकटचा संबंध ' इतकाच घ्यावयाचा.

९. कारण संन्याशाची चित्तवृत्ति विरागी असते, तर अलंकार हे विलासी चित्तवृत्तीचे सूचक असतात. म्हणून अलंकार हे संन्याशाच्या चित्तवृत्तीला उचित नसतात.

१०. कारण शरीर हे कधीही ' अलंकार्य ' असत नाही.

११. बहुतेक वेळा समानविभक्तिक शब्दांच्या अर्थांमध्ये तादात्म्य हा संबंध असतो. पण काही वेळा दोन शब्द एकाच विभक्तीत असले, तरी त्यांमध्ये तादात्म्यसंबंध नसतो. तसेच रसादेः अलंकारतायाः या शब्दांचे आहे. या शब्दांचा अर्थ ' रसादिकांहून अभिन्न असणाऱ्या अलंकारतेचा विषय ' असा नसून, ' रसादींचे जे अलंकारत्व ' म्हणजे ' रसादींच्या ठिकाणी असणारा अलंकारत्व हा जो धर्म, त्याचा विषय ' असा आहे.

१२. पूर्वीचे वाक्य म्हणजे वृत्तीतले ' न रसादेः अलंकारस्य विषयः हे वाक्य. यातील दोन षष्ठ्यन्त शब्दांच्या अर्थांमध्ये तादात्म्य संबंध नसून धर्म–धर्मिसंबंध आहे, असे अभिनवगुप्तांचे म्हणणे. कारण ' रसादिकांकडून केली जाणारी भूषविण्याची क्रिया ' असा ते रसादेः अलङ्कारस्य या दोन शब्दांचा अर्थ करितात. पण येथे हा द्राविडी प्राणायाम करण्याचे कारण नव्हते. कारण या दोन शब्दांचा ' रसादि हेच अलंकार असण्याचे उदाहरण ' असा अभेद दर्शविणारा अर्थच स्वाभाविक वाटतो.

१३. कारण संसृष्ट किंवा संकीर्ण उपमादि अलंकार आणि शुद्ध उपमादि अलंकार यांची क्षेत्रे वर दाखविल्याप्रमाणे अगदी वेगळी आहेत.

१४. भावादि अलंकार म्हणजे भाव, रसाभास, व भावाभास आणि व्यभिचारि-भावांचा प्रशम हे ज्या उदाहरणामध्ये अंगभूत झालेले असतात, असे अनुक्रमे प्रेयस्वी, ऊर्जस्वी व समाहित हे अलंकार. याशिवाय पुढे मम्मटादिकांनी भावोदय, भावसंधि व भावशबल हेही याप्रकारचे आणखी तीन अलंकार मानले आहेत.

यांपैकी ' प्रेयस्वी ' अशी विशिष्ट संज्ञा अभिनवगुप्तांशिवाय कोणीही वापरलेली दिसत नाही. इतरांनी याला ' प्रेयस् ' म्हटले आहे. उद्भटाने मात्र ' काव्यालंकारसारसंग्रह, ' ४–२ मध्ये प्रेयस्वत् अशी संज्ञा वापरली आहे.

१५. भरताचे नाट्यशास्त्र, ६–४५ नंतरचा गद्यभाग. या उदाहरणात यथा–तथा म्हणजे येन केन प्रकारेण म्हणजे गुणालंकारांच्या अभावीच. आणि असे असूनही नायिकेने नायकाला प्रसन्न करणे यामुळे शृंगाररसाचा संपूर्णपणे परिपोष होत नाही, तर त्यामध्ये काहीतरी उणीव राहते. गुणालंकारांखेरीज नायिकेने नायकाची मर्जी संपादन करणे हे अनुचित, म्हणून येथे

'शृंगाराभास' आहे' असे म्हटले आहे. हा शृंगाराभास 'शिवाची' स्तुति करणे हे वाणीचे परमसाध्य आहे' या मुख्य वाक्यार्थाचे अंग आहे.

१६. पाहा, रसभावविचार (कंगले आवृत्ति), पृ. २१५. तेथेही अभिनवभारती-मध्ये अभिनवगुप्तांनी हा श्लोक उद्धृत केला आहे.

१७. येथे भावाचा म्हणजे भीति या व्यभिचारिभावाचा आभास आहे.

ध्वन्यालोकः

यदि तु चेतनानां वाक्यार्थीभावो रसाद्यलङ्कारस्य विषय इत्युच्यते, तर्हि उपमादीनां प्रविरलविषयता निर्विषयता वाभिहिता स्यात्। यस्मादचेतनवस्तुवृत्ते वाक्यार्थीभूते पुनश्चेतनवस्तुवृत्तान्तयोजनया यथाकथञ्चिद्भवितव्यम्। अथ सत्यामपि तस्यां यत्राचेतनानां वाक्यार्थीभावो नासौ रसवदलङ्कारस्य विषय इत्युच्यते. तन्महतः काव्यप्रबन्धस्य रसनिधानभूतस्य नीरसत्वमभिहितं स्यात्। यथा --

तरङ्गभ्रूभङ्गा क्षुभितविहगश्रेणिरशना,
विकर्षन्ती फेनं, वसनमिव संरम्भशिथिलम्।
यथाविद्धं याति स्खलितमभिसन्धाय बहुशो,
नदीरूपेणेयं ध्रुवमसहना सा परिणता॥

यथा वा--

तन्वी मेघजलार्द्रपल्लवतया धौताधरेवाश्रुभिः,
शून्येवाभरणैः स्वकालविरहाद्विश्रान्तपुष्पोद्गमा।
चिन्तामौनमिवाश्रिता मधुकृतां शब्दैर्विना लक्ष्यते,
चण्डी मामवधूय पादपतितं जातानुतापेव सा॥

यथा वा--

तेषां गोपवधूविलाससुहृदां राधारहःसाक्षिणां,
क्षेमं भद्र कलिन्दशैलतनयातीरे लतावेश्मनाम्।
विच्छिन्ने स्मरतल्पकल्पनमृदुच्छेदोपयोगेऽधुना,
ते जाने जरठीभवन्ति विगलन्नीलत्विषः पल्लवाः॥

इत्येवमादौ विषयेऽचेतनानां वाक्यार्थीभावेऽपि चेतनवस्तुवृत्तान्तयोजनाऽस्त्येव। अथ यत्र चेतनवस्तुवृत्तान्तयोजनाऽस्ति तत्र रसादिरलङ्कारः। तदेवं सत्युपमादयो निर्विषयाः प्रविरलविषया वा

स्युः । यस्मान्नास्त्येवासावचेतनवस्तुवृत्तान्तो यत्र चेतनवस्तुवृत्तान्त-योजना नास्त्यन्ततो विभावत्वेन । तस्मादङ्गत्वेन च रसादीनामलङ्कारता । यः पुनरङ्गी रसो भावो वा सर्वाकारमलङ्कार्यः स ध्वनेरात्मेति ।

ध्वन्यालोक

पण यावर जर कोणाचे वेगळे म्हणणे असेल की, ज्या ठिकाणी सचेतनांचे ( जाणत्या सजीवांचे ) वर्णन करणे हा वाक्याचा मुख्य विषय असतो, तीच उदाहरणे रसवदलंकाराच्या क्षेत्रात येतील, तर उपमादि अलंकारांना अगदीच थोडे क्षेत्र उरेल किंवा मुळीच उरणार नाही असे म्हटल्यासारखे होईल ! कारण, अचेतन वस्तूंचे वर्णन हा वाक्याचा मुख्य अर्थ असला, तरी तेथे त्या अचेतन वस्तूंशी सचेतनांच्या व्यवहाराचा संबंध कोणत्या ना कोणत्या तरी प्रकाराने जोडलेला असतोच. आता सचेतनांच्या व्यवहारांचा संबंध जोडला गेला, तरी ज्या काव्यात अचेतन पदार्थांचे वर्णन हा काव्याचा मुख्य अर्थ असतो, ते काव्य रसवत् अलंकाराचे उदाहरण होणार नाही असे जर पूर्वपक्ष्याचे म्हणणे असेल, तर तसे झाल्यास ( अचेतनांचे वर्णन करणाऱ्या, पण ) रसाचे आगर असलेल्या कित्येक काव्यरचना नीरस आहेत, असे म्हटल्यासारखे होईल. उदा.—

"( हे ) तरंग म्हणजे तिने वक्र केलेल्या भ्रुकुटी होत. ही प्रवाहाच्या आसपास उडणाऱ्या पक्ष्यांची रांग म्हणजे तिचा कमरपट्टाच ! रागाच्या भरात सैल झालेल्या तिच्या वस्त्राप्रमाणे असलेला हा फेस ही आपल्या मागोमाग ओढून घेत आहे. आणि ज्या अर्थी ही नदी वाटेतले कित्येक अडथळे चुकवीत ( माझ्या कित्येक अपराधांची आठवण होऊन उर्वशीने अडखळत चालावे, तसे ) वेडेवाकडे वळसे घेऊन वाहते आहे, त्या अर्थी त्या कोपनेने खात्रीने या नदीचेच रूप घेतले असले पाहिजे."[१]

किंवा दुसरे उदाहरण—

"या लतेचे पल्लव मेघांच्या जलाने भिजून गेल्यामुळे ही लता म्हणजे जणू अधरोष्ठ अश्रूंनी धुतला गेलेली ती तनुगात्री आहे, असेच मला वाटते. या लतेचा फुले येण्याचा हा काळ नसल्याने फुले येणे थांबलेली ही लता म्हणजे एकही अलंकार न घातलेली ती उर्वशीच जणू. भृंगांच्या गुंजारवाच्या

अभावी ही लता, विचारात मग्न असल्याने मौन धारण केलेल्या तिच्यासारखी भासते. यामुळे मागे मी तिच्या पाया पडलो असताना तिने रागाच्या भरात मला जे झिडकारले, त्याचा तिला जणू पश्चात्ताप होत आहेसे वाटते."[२]

किंवा आणखी एक उदाहरण—

" मित्रा ! यमुनातीरावरील त्या लतागृहांचे कुशल आहे ना ? ती लतागृहे म्हणजे गोपींचे प्रणयक्रीडेच्या वेळचे सोबती व राधेने माझ्याशी केलेल्या एकांताचे साक्षीदार होते. त्यावेळी रतिशय्या रचण्यासाठी हळुवारपणे तोडलेल्या पल्लवांचा तो उपयोग आता संपला असल्याने त्यांचा हिरवेगारपणा लोपून त्या पल्लवांना मला वाटते आता फार जूनपणा येत असेल."

यांसारख्या उदाहरणांत मुख्यतया अचेतनांचेच वर्णन असले, तरी त्यांच्याशी चेतन वस्तूंच्या वर्णनाचा संबंध जोडण्यात आलेला आहेच. ह्यावर तुम्ही जर असे म्हणाल की, 'याप्रमाणे चेतन वस्तूंच्या वर्णनाचा संबंध जोडला असेल, तेथेही रसादि अलंकार समजावा,' तर असे झाल्यास उपमादि अलंकारांना ( मुख्य अलंकार म्हणून ) जागा मुळीच उरणार नाही, किंवा उरली तर फारच थोडी उरेल. कारण, असे अचेतन वस्तूंचे वर्णन सापडणारच नाही की, शेवटी ज्याच्याशी चेतन वस्तूंच्या वर्णनाचा निदान विभाव या नात्याने तरी संबंध पोहोचत नाही. म्हणून रसादि हे अंगभूत असतील तरच त्यांना अलंकार म्हणावे. पण जो रस किंवा भाव अंगी असेल, सर्वथैव ' अलंकार्य 'च असेल, तो ( ध्वनिकाव्याचा ) आत्मा होय.

लोचनम

'मे मति' रित्यनेन यत्परमतं सूचितं तद्दूषणमुपन्यस्यति—यदीत्यादिना। परस्य चायमाशयः— अचेतनानां चित्तवृत्तिरूपरसाद्यसंभवात्तद्वर्णने रसवदलङ्कारस्यानाशङ्क्यत्वात्तद्विभक्त एवोपमादीनां विषय इति। एतद्दूषयति—तर्हीति। तस्माद्वचनाद्धेतोरित्यर्थः। नन्वचेतनवर्णनं विषय इत्युक्तमित्याशङ्क्य हेतुमाह—यस्मादिति। यथाकथञ्चिदिति विभावादिरूपतया। तस्यामिति चेतनवृत्तान्तयोजनायाम्। नीरसत्वमिति। यत्र हि रसस्तत्रावश्यं रसवदलङ्कार इति परमतम्, ततो न रसवदलङ्कारश्चेन्नूनं तत्र रसो नास्तीति परमताभिप्रायान्नीरसत्वमुक्तम्। न ह्यस्माकं रसवदलङ्काराभावे नीरसत्वम्, अपि तु

ध्वन्यात्मभूतरसाभावे, तादृक्च रसोऽत्रास्त्येव ।

तरङ्गेति । तरङ्गा एव भ्रूभङ्गा यस्याः । विकर्षन्ती विलम्बमानं बलादाक्षिपन्ती । वसनमंशुकम् । प्रियतमालम्बननिषेधायेति भावः । बहुशो यत्स्खलितं येऽपराधास्तानभिसन्धाय हृदयेनैकीकृत्यासहमाना मानिनीत्यर्थः । अथ च मद्वियोगपश्चात्तापासहिष्णुस्तापशान्तये नदीभावं गतेति ।

तन्वीति । वियोगकृशाप्यनुतप्ता चाभरणानि त्यजति । स्वकालो वसन्तग्रीष्मप्रायः । उपायचिन्तनार्थं मौनं, किमिति पादपतितमपि दयितमवधूतवत्यहमिति च चिन्तया मौनम् । चण्डी कोपना । एतौ श्लोकौ नदीलतावर्णनपरौ तात्पर्येण पुरूरवस उन्मादाक्रान्तस्योक्तिरूपौ ।

तेषामिति । हे भद्र ! तेषामिति ये ममैव हृदये स्थितास्तेषाम् । गोपवधूनां गोपीनां ये विलाससुहृदो नर्मसचिवास्तेषाम् । प्रच्छन्नानुरागिणीनां नान्यो नर्मसुहृद्भवतीति । राधायाश्च सातिशयं प्रेमस्थानमित्याह—राधासम्भोगानां ये साक्षाद्द्रष्टारः । कलिन्दशैलतनया यमुना, तस्यास्तीरे लतागृहाणां क्षेमं कुशलमिति काक्वा प्रश्नः । एवं तं दृष्ट्वा गोपदर्शनप्रबुद्धसंस्कार आलम्बनोद्दीपनविभावस्मरणात् प्रबुद्धरतिभाव-* मात्मगतमौत्सुक्यगर्भमाह द्वारकागतो भगवान् कृष्णः — स्मरतल्पस्य मदनशय्यायाः कल्पनार्थं 'मृदु सुकुमारं कृत्वा यश्छेदस्त्रोटनं स एवोपयोगः साफल्यम् । अथ च स्मरतल्पे यत्कल्पनं क्लृप्तिः स एव मृदुः सुकुमार उत्कृष्टश्छेदोपयोगस्त्रोटनफलं तस्मिन् विच्छिन्ने । मय्यनासन्ने का स्मरतल्पकल्पनेति भावः । अत एव परस्परानुरागनिश्चयगर्भमेवाह-ते जाने इति । वाक्यार्थस्यात्र कर्मत्वम् । अधुना जरठीभवन्तीति । मयि तु सन्निहितेऽनवरतकथितोपयोगान्नेमे जराजीर्णताखिलीकारं कदाचिदवाप्नुवन्तीति भावः । विगलन्ती नीला त्विड्येषामित्यनेन कतिपयकालप्रोषितस्याप्यौत्सुक्यनिर्भरत्वं ध्वनितम् । एवमात्मगतैयमुक्तिर्यदि वा गोपं प्रत्येव सम्प्रधारणोक्तिः । बहुभिरुदाहरणैर्महतो भूयसः प्रबन्धस्येति यदुक्तं तत्सूचितम् ।

अथेत्यादि । नीरसत्वमत्र मा भूयादित्यभिप्रायेणेति शेषः ।

---

* कल्पलताविवेक, पृ. १३२ वर प्रबुद्धरतिभावः असा पाठ आहे.

ननु यत्र चेतनवृत्तस्य सर्वथा नानुप्रवेशः स उपमादेर्विषयो भविष्यतीत्याशङ्क्याह—यस्मादित्यादि। अन्तत इति स्तम्भपुलकाद्यचेतनमपि वर्ण्यमानमनुभावत्वाच्चेतनमाक्षिपत्येव तावत्। किमत्रोच्यते। अतिजडोऽपि चन्द्रोद्यानप्रभृतिः स्वविश्रान्तोऽपि वर्ण्यमानोऽवश्यं चित्तवृत्तिविभावतां त्यक्त्वा काव्येऽनाख्येय एव स्यात्, शास्त्रेतिहासयोरपि वा। एवं परमतं दूषयित्वा स्वमतमेव प्रत्याम्नायेनोपसंहरति तस्मादिति। यतः परोक्तो विषयविभागो न युक्त इत्यर्थः। भावो वेति वाग्रहणात्तदाभासतत्प्रशमादयः। सर्वप्रकारमिति क्रियाविशेषणम्। तेन सर्वाकारमित्यर्थं। अलङ्कार्य इति। अत एव नालङ्कार इति भावः।

लोचन

'असे माझे मत आहे' या (पाचव्या कारिकेतील) शब्दांनी (रसवत् इ. अलंकारांच्या बाबतीत) दुसऱ्यांचे[3] जे मत सूचित झाले आहे, त्या मताचे खंडन करण्यासाठी (वृत्तिकार) '(पण यावर) जर' इ. वाक्याने प्रारंभ करितात. आणि 'दुसऱ्यां'च्या या म्हणण्यामागील विचारसरणी पुढीलप्रमाणे आहे– 'अचेतनांच्या म्हणजे निर्जीवांच्या ठिकाणी चित्तवृत्तिरूपी रस म्हणजे स्थायिभाव असू शकत नसल्याने निर्जीवांच्या वर्णनामध्ये रसवत् अलंकार असण्याची शंकाही घेणे योग्य होणार नाही, म्हणून उपमादि अलंकारांचे क्षेत्र रसवत् इ. अलंकारांच्या क्षेत्राहून भिन्नच आहे[४] या विचारसरणीचे खंडन (वृत्तिकार) 'तर (या म्हणण्याचा)' इ. वाक्यांनी करितात. 'तर' म्हणजे 'प्राचीन आलंकारिकांचे असे म्हणणे असल्यामुळे.' 'पण काय हो, निर्जीवांचे वर्णन हा उपमादि अलंकारांचा स्वतंत्र विषय आहे, असे आमचे म्हणणे आहे असा मुद्दा पूर्वपक्ष पुढे करील हे ओळखूनच तो मुद्दा बरोबर नाही याचे कारण वृत्तिकार 'कारण' इ. शब्दांनी सांगतात. 'कोणत्या तरी प्रकाराने' म्हणजे विभाव, अनुभाव वगैरेंच्या नात्याने. 'तो' म्हणजे सजीवांच्या हकीकतीचा (अचेतनांच्या वर्णनाशी) संबंध. 'नीरस आहेत' इ.—कारण पूर्वपक्षाचे मत असेच आहे की, जेथे जेथे रस असेल, तेथे तेथे रसवत् अलंकार असणारच! म्हणून (अचेतन वस्तूंचे वर्णन केले असल्यामुळे) रसवत् अलंकार जेथे नसतो, तेथे तेथे वस्तुतः रसही

नसतो' असा पूर्वपक्षवाल्याच्या म्हणण्याचा आशय असल्यामुळे 'नीरसत्व मानावे लागेल' असे वृत्तिकारांनी म्हटले. पण आमच्या मताप्रमाणे 'रसवत् अलंकार नसलेल्या काव्यात रस नसतो' असे होत नाही, तर 'ध्वनिकाव्यामध्ये प्राधान्याने प्रकट होणारा रस जीमध्ये नसेल तीच रचना नीरस होय' असा आमच्या मतातील आशय आहे, आणि आता लगेच दिल्या जाणार असलेल्या तीन उदाहरणांमध्ये ( व तत्सदृश काव्यांमध्ये) तसा (म्हणजे ध्वनिकाव्याचा गाभा असणारा) रस आहेच की !

'(हे) तरंग' इ– तरंग ह्याच जिच्या भ्रुकुटी आहेत, अशी. 'ओढून नेत आहे.' म्हणजे माग नोंवणाऱ्या फेसाला जोराने आपल्या-बरोबर खेचून नेत आहे. वस्त्र म्हणजे रेशमी साडी, प्रियकराने ती साडी धरून आपल्याला अडवू नये, म्हणून प्रियकराने वारंवार केलेली जी स्खलिते म्हणजे अनेक अपराध, त्यांची आठवण होऊन म्हणजे ते सगळे लक्षात घेऊन. ते सहन करू न शकणारी म्हणजे क्रुद्ध झालेली, हा अर्थ. आणि मग माझ्या वियोगाच्या वेदना आणि तिला होणारा पश्चात्तापही सहन न झाल्याने त्या तापाचे शमन करण्यासाठी तिने नदीचे रूप घेतले आहे. (असाही आशय येथे ध्वनित झाला आहे).

'ती तनुगात्री' इ.– विरहाने कृश व पश्चात्तापाने व्यथित झालेली स्त्री अलंकारांचा त्यागच करिते. आपला (फुले येण्याचा) काळ म्हणजे मुख्यत: वसन्त, ग्रीष्म वगैरे ऋतूंचा काळ. (पुन-र्मीलनाच्या ) उपायांचा एकाग्रतेने विचार करता येण्यासाठी मौन धारण केलेली आणि 'प्रियकर माझ्या पाया पडला तरीदेखील मी त्याला का बरे झिडकारले ?' या (अनुतापरूपी) विचारानेही मौनाचा अवलंब करणारी 'चण्डी' म्हणजे क्रुद्ध झालेली.

हा व याच्या आधीचा या दोन्ही श्लोकांचे विषय अनुक्रमे नदीचे व वेलीचे वर्णन हे असले, तरी ते मुख्यत्वेकरून भ्रमिष्ट झालेल्या पुरूरव्याचे (उर्वशीला उद्देशून) बोलणे या स्वरूपाचे आहेत.[६]

'त्यांचे (लतागृहांचे)' इ –हे मित्रा ! त्यांचे म्हणजे जी लतागृहे माझ्याच हृत्पटलावर स्मृतिरूपाने कोरली गेली आहेत, त्यांचे. गोपवधूंचे म्हणजे गोपींचे. प्रणयक्रीडेच्या वेळचे सोबती म्हणजे (गोपींना) मनो-

रंजनाच्या वेळी जे नेहमी साथ करणारे असत, त्यांचे. कारण ज्या चोरून प्रेम करितात, त्यांना (अशा लतागृहांखेरीज) दुसरा कोणीही प्रणय-क्रीडेच्या वेळी मदतनीस नसतोच. शिवाय ती लतागृहे म्हणज (त्यातल्या त्यात) राधेच्या विशेषच आवडीचे विषय होती, हे कृष्णाने 'राधेशी मी केलेल्या क्रीडा ज्यांनी प्रत्यक्ष पाहिल्या' या शब्दांनी म्हटले आहे. 'कलिन्द पर्वताची कन्या म्हणजे यमुना. तिच्या तीरावरील लतागृहांचे कुशल ? असा प्रश्नार्थक स्वर काढून सुचविलेला प्रश्न. याप्रमाणे त्या गोपालाला विचारल्यानंतर त्याला पाहून कृष्णाच्या मनातील पूर्वीचे (गोकुळातील प्रणयरम्य प्रसंगांचे) संस्कार जागृत झाले आणि (राधा व इतर गोपी या) त्यावेळच्या आलंबन विभावांच्या व (लतागृहे इ.) उद्दीपन विभावांच्या स्मरणामुळे (सध्या) द्वारकेमध्ये राहणाऱ्या भगवान् कृष्णाच्या मनातील रतिभाव उद्बुद्ध होऊन तो उत्सुकतेने स्वतःशी पुढीलप्रमाणे म्हणतो. स्मरतल्प म्हणजे रतिशय्या रचण्याकरिता मृदुपणे म्हणजे हळुवारपणे जो छेद म्हणजे खुडले जाण्याची क्रिया, तोच (त्या पल्लवांचा) उपयोग म्हणजे त्यांच्या जीविताची सफलता होय. तसेच रतिशय्येवर ते पल्लव रचले जाणे म्हणजे अंथरले जाणे हाच मृदु म्हणजे नाजूक म्हणजे उत्कृष्ट असा त्यांच्या छेदाचा उपयोग म्हणजे ते खुडले जाण्याचे फळ. ते फळ आता नष्ट झाल्यावर. मी त्या शय्येवर आरूढ होणार नसताना ' रतिशय्या रचून काय फायदा, हा भावार्थ. म्हणूनच आपले व गोपींचे एकमेकांवरील प्रेम अजूनही टिकून आहे, या खात्रीने कृष्ण 'मला वाटते' इ. वाक्य म्हणतो. ४ थ्या ओळीतील 'त्या पल्लवांना आता जूनपणा' इ. वाक्याचा अर्थ हे 'मला वाटते' यातील क्रियेचे (व्याकरणदृष्टचा) कर्म आहे. 'आता जूनपणा येत असेल' –पण मी गोकुळात असताना मात्र त्या पल्लवांचा वर सांगितलेला उपयोग सतत होत असल्याने त्या पल्लवांना कधीही जराजीर्ण होण्याची अवकळा प्राप्त होत नसे' हा भावार्थ. 'लोपत चालला आहे हिरवेगार-पणा ज्यांचा' असे म्हणून असे सूचित केले आहे की कृष्णाला गोकुळ सोडून दूर गेल्याला कितीतरी दिवस झाले असले, तरीसुद्धा त्याला यमुनातीरावरील लतागृहांची काय अवस्था झाली असेल ते जाणण्याची उत्कंठा आहे. अशा रीतीने कृष्णाचे हे बोलणे स्वतःशी आहे किंवा त्या

लतागृहांची अवस्था जाणण्यासाठी कृष्णाने हे शब्द त्या गोपालालाच उद्देशून म्हटले असण्याचीही शक्यता आहे. पुष्कळ उदाहरणे देऊन वृत्तिकारांनी पूर्वी वृत्तीतले[९] 'कित्येक काव्यरचना' इ. आपले म्हणणे सिद्ध केले आहे.

'आता ह्यावर तुम्ही असे म्हणाल की,' इ.– 'यासारख्या काव्यरचना नीरस ठरू नयेत या अभिप्रायाने' या शब्दांची भर घालावी. 'पण काय हो, ज्या काव्यांत सचेतनांचा मुळीच संबंध नसेल ती काव्ये हे उपमादिकांचे क्षेत्र होईलच की!' अशी पूर्वपक्ष्याची शंका कल्पून तिचे उत्तर वृत्तिकार 'कारण असे' ....इ. वाक्याने देतात. शेवटी '... इ.... शरीर निश्चल होणे, रोमांच, इ. अचेतन शारीरिक अवस्थांचे वर्णनही त्या अवस्था 'अनुभाव' (म्हणजे कोणता तरी स्थायिभाव मनात जागृत झाल्याचे परिणाम) असल्यामुळे त्या अवस्था जाणत्या व्यक्तींच्या अस्तित्वाचे अटळपणे सूचन करितातच. याबाबत अधिक काय सांगायचे ? (थोडक्यात सांगावयाचे म्हणजे) सर्वस्वी अचेतन अशा चन्द्र, उद्यान; इत्यादींचे वर्णन त्यांच्या स्वतःसाठीच केले, तरी ते खात्रीने कोणत्यातरी चित्तवृत्तीचे उद्दीपनविभाव होणारच. तसे उद्दीपन-विभाव ते होत नसले, तर त्या गोष्टींचे काव्यात वर्णन करणे योग्य होणार नाही. इतकेच नव्हे, तर शास्त्र किंवा इतिहास या स्वरूपाच्या ग्रंथांतही तसे वर्णन करणे अयोग्यच[१०] होय. याप्रमाणे रसवत् इ. अलंकारांच्या बाबतीतले दुसऱ्या पक्षाचे मत सदोष आहे असे दाखविल्या-नंतर आपलेच (पूर्वी[११] सांगितलेले) मत पुन्हा सांगून वृत्तिकार 'म्हणून (रसादि)' इ. वाक्याने या सर्व विवेचनाचा समारोप करितात. 'म्हणून' याचा अर्थ पूर्वपक्षाने दाखविलेला रसवत् इ. अलंकारांचा खास प्रांत[१२] हा बरोबर नाही, म्हणून, असा आहे. 'किंवा भाव' यातील 'किंवा' या शब्दाने भावाभास, भावप्रशम वगैरेंचाही अंतर्भाव सूचित होतो. 'सर्वथैव' (सर्वाकारम्) हे क्रियाविशेषण[१३] आहे. त्याचा अर्थ 'सर्व प्रकारांनी, सर्वस्वी' असा आहे. 'अलंकार्य'– म्हणूनच (म्हणजे 'अलंकार्य' असल्यामुळेच) तो 'अलंकार' नाही, हे तात्पर्य ॥५॥

टीपा

१. विक्रमोर्वशीय, अंक ४, श्लोक २८.

२. विक्रमोर्वशीय, अंक ४, श्लोक ३८.

३. दुसऱ्यांचे म्हणजे भामह, दण्डी व उद्भट या प्राचीन आलंकारिकांचे.

४. तात्पर्य, अचेतनांचे वर्णन जेथे केलेले असते, तेच (प्रधानत्वाने असलेल्या) उपमादि अलंकारांचे क्षेत्र होय व सचेतनांचे वर्णन जेथे असते तेवढेच रसवत् इ. अलंकारांचे क्षेत्र, असे पूर्वपक्ष्याचे म्हणणे.

५. कारण प्रियकराच्या अनुपस्थितीत तिला अलंकार घालावेसे वाटत नाहीत.

६. म्हणजे वाच्य वर्णनाचा विषय जरी नदी व लता या अचेतन वस्तु हा असला, तरी त्या दोन अचेतन वस्तूंवर पश्चात्तापाने पोळलेल्या सचेतन उर्वशीचा आरोप केलेला असल्यामुळे तेथे सचेतनांच्या व्यवहारांचा अचेतनांच्या व्यवहाराशी संबंध जोडला आहे. यामुळे अचेतन वस्तूचे वर्णन-सुद्धा येथे शेवटी विप्रलंभ शृंगाररसाची प्रतीति करून देतेच.

७. हा अनासीने याचा एक अर्थ. आस् धातूचा (उपस्थित) असणे असाही अर्थ होतो. तो घेतल्यास सखि अनासीने इ. वाक्याचा अर्थ 'आता मी गोकुळात नसल्यामुळे रतिशय्या कोणासाठी रचावयाची ?' असा होईल.

८. यातील तात्पर्य असे आहे की, पूर्वी कृष्ण गोकुळात असताना त्या वेलींचे पल्लव वारंवार तोडले जात असल्यामुळे त्या लतांना नवीन पालवी फुटत असे, म्हणून त्या नेहमी हिरव्यागार पल्लवांनी आच्छादित असत. परंतु आता कृष्ण गोकुळात नसल्याने त्या वेलींचे पल्लव कधीच तोडले जात नाहीत, म्हणून निसर्गक्रमाने त्यांना पिवळे, जून होण्याचा दुर्धर प्रसंग प्राप्त होतो.

९. पाहा, पृ. ३८९.

१०. काव्यातच नव्हे तर शास्त्र, इतिहास इत्यादि ग्रंथांमध्येही जे विषय वर्णिलेले असतात, ते सर्व मानवांच्या उपयोगासाठीच वर्णिलेले असतात, म्हणून शास्त्रादि ग्रंथांमधील अचेतन वस्तूंच्या वर्णनाचाही मानवाच्या जीवनाशी व भावनांशी जिव्हाळ्याचा संबंध असतोच. तो तसा नसेल, तर मानव असा ग्रंथ हातातही घेणार नाही.

११. पाहा, पृ. ३६९, व पृ. ३७९ वरील 'पण ज्या ठिकाणी' इ. वाक्य.

१२. मुळातल्या विषयविभागः या शब्दाचा अर्थ रस व रसवत् अलंकार यांची वेगवेगळी क्षेत्रे असा केला, तर तो येथे जुळत नाही, कारण आनंदवर्धनां-पूर्वीच्या लोकांनी रस व रसवत् अलंकार यांची भिन्नभिन्न क्षेत्रे दाखविलेली नाहीत, तर त्यांनी रसालाच रसवत् अलंकार म्हटले आहे. म्हणून विषय-विभागः याचा अर्थ आम्ही 'रसवत् इ. 'अलंकारांचे खास क्षेत्र' असा

केला आहे.

१३. 'सर्वथैव' हे 'अलंकार्य' यामधील 'अलंकृत केले जाणे' या क्रियेचे विशेषण आहे.

ध्वन्यालोकः

किञ्च

तमर्थमवलम्बन्ते येऽङ्गिनं ते गुणाः स्मृताः।
अङ्गाश्रितास्त्वलङ्कारा मन्तव्याःकटकादिवत् ॥ ६ ॥

ये तमर्थं रसादिलक्षणमङ्गिनं सन्तमवलम्बन्ते ते गुणाः शौर्यादिवत्। वाच्यवाचकलक्षणान्यङ्गानि ये पुनराश्रितास्तेऽलङ्कारा मन्तव्याः कटकादिवत् ॥ ६ ॥

ध्वन्यालोक

आणखी असे की—

'तो' अर्थ अंगी असताना जे त्याच्या आश्रयाने असतात, त्यांना 'गुण' मानिले आहे. पण जे (त्या अंगी अर्थाच्या) 'अंगां'च्या आश्रयाने असतील, त्यांना कंकणे वगैरेप्रमाणे 'अलंकार' समजावे. ॥ ६ ॥

तो रसादि–स्वरूपाचा अर्थ अंगी असताना जे त्याच्या आश्रयाने असतात, ते (मनुष्य वगैरेंच्या ठिकाणी असणाऱ्या) शौर्यादिकांप्रमाणेच 'गुण' होत, पण जे वाच्य अर्थ व वाचक शब्द या प्रकारच्या अंगांच्या[१] आश्रयाने असतील, ते कंकणादिकांप्रमाणे 'अलंकार' मानावे. ॥ ६ ॥

लोचनम्

अलङ्कार्यव्यतिरिक्तश्चालङ्कारोऽभ्युपगन्तव्यः, लोके तथा सिद्धत्वात्, यथा गुणिव्यतिरिक्तो गुणः। गुणालङ्कारव्यवहारश्च गुणिन्यलङ्कार्ये च सति युक्तः। स चास्मत्पक्ष एवोपपन्न इत्यभिप्रायद्वयेनाह– किञ्चेत्यादि। न केवलमेतावद्युक्तिजातं रसस्याङ्गित्वे, यावदन्यदपीति समुच्चयार्थः। कारिकाप्यभिप्रायद्वयेनैव योज्या। केवलं प्रथमाभिप्राये प्रथमं कारिकार्धं दृष्टान्ताभिप्रायेण व्याख्येयम्। एवं वृत्तिग्रन्थोऽपि योज्यः ॥ ६ ॥

लोचन

आणि अलंकार हा नेहमी अलंकार्याहून (म्हणजे ज्याला अलंकृत करावयाचे त्या मुख्य अर्थाहून) वेगळाच मानला पाहिजे, कारण व्यवहारात नेहमी तसाच अनुभव येतो.[२] ज्याप्रमाणे गुण हा नेहमी गुणांच्या आश्रयाहून (म्हणजे जो गुणसंपन्न असतो, त्याहून) वेगळाच असतो, त्याप्रमाणे. आणि गुण व अलंकार या संज्ञांचा उपयोग करणे हे ते गुण किंवा अलंकार यांचा आश्रय असणारा कोणीतरी स्वतंत्रपणे अस्तित्वात असेल, तेव्हाच योग्य होईल.[३] त्या संज्ञांचा वापर आम्ही सांगितलेले मत मानल्यासच[४] अन्वर्थक ठरतो. हे दोन अभिप्राय ध्यानात घेऊनच वृत्तिकार 'आणखी असे की' इ. शब्दांनी कारिकेची प्रस्तावना करितात. 'आणखी' या वृत्तीतल्या शब्दामागील अभिप्राय असा की, रस हा 'अंगी' असताना केवळ आतापर्यंत सांगितलेल्या[५] कारणांमुळेच अलंकार हा अलंकार्याहून भिन्न असल्याचे सिद्ध होते असे नाही, तर याला समर्थक असे आणखीही एक कारण आहे.[६] ६ व्या कारिकेचा अर्थही हे दोन्ही अभिप्राय लक्षात घेऊनच लावला पाहिजे. मात्र या संदर्भात एवढेच लक्षात ठेवावे की, पहिल्या अभि-प्रायाच्या बाबतीत सहाव्या कारिकेचा पूर्वार्ध हा उत्तरार्धातील अर्थ स्पष्ट करणारा 'दृष्टांत' होईल.[७] त्याचप्रमाणे या कारिकेवरील वृत्तीतल्या वाक्यांचाही अर्थ करावा. ।।६।।

टीपा

१. दण्डीच्या 'काव्यादर्श' तील पुढील वचन पाहा: —
**तैः शरीरं च काव्यानामलङ्काराश्च दर्शिताः ।**
**शरीरं तावदिष्टार्थव्यवच्छिन्ना पदावली ।।**
(अर्थ – प्राचीन साहित्यशास्त्रकारांनी काव्याचे शरीर आणि अलंकार यांचे विवेचन केले आहे. काव्याचे शरीर म्हणजे सुंदर आशयाने युक्त असलेला पदसमूह होय.)

२. लौकिक व्यवहारात अंगावर घातले जाणारे अलंकार हे अलंकार्य असलेल्या आत्म्याहून अगदी निराळेच असतात. ते अलंकार प्रथम शरीराला भूष-वितात असे मानिले, तरी त्या अलंकार्य शरीराहूनही ते भिन्नच असतात. अर्थात् आनंदवर्धन व अभिनवगुप्त यांच्या मताने शरीर हे अलंकार्य नसते,

तर आत्मा हाच अलंकार्य असतो. (पाहा पृ. ३८३ वरील 'खरे म्हणजे शरीराच्या बाबतीत... ' इ. वाक्ये).

३. काव्याच्या संदर्भात ज्या अर्थी गुण व अलंकार हे शब्द वापरले जातात, त्या अर्थी काव्यातही त्या गुणालंकारांहून निराळे असे अनुक्रमे गुणी व अलंकार्य गृहीत धरले जातातच.

४. आम्ही सांगितलेले मत म्हणजे गुणांचा आश्रय व अलंकारांकडून भूषविला जाणारा रसादिरूप व्यंग्यार्थ हा गुण व अलंकार यांहून वेगळाच आहे, हे मत. यापूर्वीच्या लेखकांनी रसाला (मग तो प्रधान असला तरी त्याला) अलंकार मानले व अलंकार आणि अलंकार्य यांचा त्यांनी विवेक केला नाही.

५. म्हणजे कारिका ५ मध्ये व तीवरील वृत्तीमध्ये सांगितलेल्या पुढील दोन कारणांमुळे :– (१) रसादि हे दुसऱ्या कशाचे तरी अंग असतील, तरच ते 'अलंकार' होतात आणि (२) रसादि जर 'प्रधान' असतील, तर ते 'अलंकार्य' होऊन 'ध्वनि' ठरतात.

६. ते कारण असे :– जे अंगाच्या म्हणजे काव्याच्या शरीराच्या आश्रयाने राहतात, ते 'अलंकार' होत. काव्याचे शरीर हे 'अलंकार्य' असणाऱ्या काव्याच्या आत्म्याहून भिन्नच असते.

७. म्हणजे 'ज्याप्रमाणे रसादि अर्थावर जे अवलंबून असतात त्यांना गुण म्हणतात, त्याप्रमाणे जे काव्यशरीराच्या आश्रयाने असतात त्यांना अलंकार म्हणावे' असा कारिकेचा अर्थ होईल.

ध्वन्यालोकः

तथा च–

शृङ्गार एव मधुरः परः प्रह्लादनो रसः ।
तन्मयं काव्यमाश्रित्य माधुर्यं प्रतितिष्ठति ॥ ७ ॥

शृङ्गार एव रसान्तरापेक्षया मधुरः, प्रह्लादहेतुत्वात् । तत्प्रकाशनपरशब्दार्थतया काव्यस्य स माधुर्यलक्षणो गुणः । श्रव्यत्वं पुनरोजसोऽपि साधारणमिति ॥ ७ ॥

ध्वन्यालोक

(गुण हे 'रसांचेच' धर्म आहेत), कारण—

शृङ्गार हाच पराकाष्ठेचा आनंद देणारा आणि म्हणूनच मधुर असा रस होय. त्या रसाने निर्भर अशा काव्याचा आश्रय केल्याने 'माधुर्या'ला विशेष उठाव प्राप्त होतो ॥ ७ ॥

शृङ्गार हाच इतर रसांपेक्षा ( अधिक ) मधुर असतो, कारण तो अधिक आनंद देणारा असतो. ज्या काव्यामध्ये तो रस प्रकट करणारे शब्द व अर्थ असतात, त्या काव्यामध्ये माधुर्य हा गुण असतो ( असे लक्षणेने म्हटले जाते ). श्रव्यत्व ( हे माधुर्याचे लक्षण नव्हे, कारण तो ) ओजाचाही धर्म असतो. ॥ ७ ॥

लोचनम

ननु शब्दार्थयोर्माधुर्यादयो गुणाः, तत्कथमुक्तं रसादिकमङ्गिनं गुणा आश्रिता इत्याशङ्क्याह – तथा चेत्यादि। तेन वक्ष्यमाणेन बुद्धिस्थेन परिहारप्रकारेणोपपद्यते चैतदित्यर्थः। शृङ्गार एवेति। मधुर इत्यत्र हेतुमाह – परःप्रह्लादन इति। रतौ हि समस्तदेवतिर्यङ्नरादिजातिष्वविच्छिन्नैव वासनास्त इति न कश्चित्तत्र तादृग्यो न हृदयसंवादमयः, यतेरपि हि तच्चमत्कारोऽस्त्येव। अत एव मधुर इत्युक्तम्। मधुरो हि शर्करादिरसो विवेकिनोऽविवेकिनो वा स्वस्थस्यातुरस्य वा झटिति रसनानिपतितस्तावदभिलषणीय एव भवति। तन्मयमिति। स शृङ्गार आत्मत्वेन प्रकृतो यत्र व्यङ्ग्यतया। काव्यमिति शब्दार्थावित्यर्थः। प्रतितिष्ठतीति। प्रतिष्ठां गच्छतीति यावत्। एतदुक्तं भवति–वस्तुतो माधुर्यं नाम शृङ्गारादे रसस्यैव गुणः। तन्मधुररसाभिव्यञ्जकयोः शब्दार्थयोरुपचरितम्। मधुरशृङ्गाररसाभिव्यक्तिसमर्थता शब्दार्थयोर्माधुर्यमिति हि लक्षणम्। तस्माद्युक्तमुक्तं 'तमर्थमि'त्यादि। कारिकार्थं वृत्याह–शृङ्गार इति। ननु 'श्रव्यं नातिसमस्तार्थशब्दं मधुरमिष्यते' इति माधुर्यस्य लक्षणम् नेत्याह– श्रव्यत्वमिति। सर्वं लक्षणमुपलक्षितम्। ओजसोऽपीति। 'यो यः शस्त्रम्' इत्यत्र हि श्रव्यत्वमसमस्तत्वं चास्त्येवेति भावः ॥ ७ ॥

ध्वन्यालोक

"पण काय हो, माधुर्य वगैरे गुण शब्द व अर्थ यांचे ठिकाणी असतात असे आजपर्यंत सांगण्यात आले आहे !' मग गुण हे 'अंगी' असलेल्या रस वगैरेंच्या आश्रयाने असतात असे (कारिकेत व वृत्तीत) कसे बरे म्हटले ?" अशी शंका कल्पून वृत्तिकार 'कारण' इ. शब्दांनी

तिचे समाधान करण्यास प्रारंभ करितात. त्यामुळे आता प्राचीनांच्या मताचे जे खंडन पुढे केले जाणार आहे[२] व आता जे वृत्तिकारांच्या मतात आहे, त्यामुळे रसादि हेच गुणांचे आश्रय होत हे मत तर्कसंगत च आहे. 'शृंगार हाच' इ.–(शृंगाराला) 'मधुर' म्हणण्याचे कारण 'पराकाष्ठेचा आनंद देणारा' या शब्दांनी सांगितले आहे. रतिभावाच्या बाबतीतील वासना[३] ही देव, पशु, मानव वगैरे जातींमध्ये केव्हाही विनाश पावणारी नसते, म्हणून असा कोणीही नाही की, ज्याला रतिभावामध्ये स्वारस्य वाटत नाही कारण (विरागी) संन्यासीही स्त्रीच्या वर्णनाने प्रभावित होतात.[४] म्हणूनच शृंगाराला 'मधुर' म्हटले आहे. कारण एखादा मनुष्य ज्ञानी असो किंवा नसो, त्याची प्रकृति धड असो किंवा तो रोगग्रस्त असो, त्याच्या जिभेवर साखर वगैरे पदार्थांना पाक पडण्याचा अवकाश, की, तो पाक त्याला एकदम हवाहवासाच वाटतो. त्या रसाने निर्भर' म्हणजे तो शृंगाररस ज्या काव्याला व्यंग्य असल्यामुळे आत्मा म्हणून व्यापून असतो असे (काव्य). 'काव्य' याचा अर्थ 'शब्द व अर्थ' असा समजावा.[५] 'विशेष उठाव प्राप्त होतो' म्हणजे त्याला अगदी योग्य असे स्थान मिळते. ६ व्या कारिकेचा एकंदर भावार्थ असा– वास्तविक माधुर्य हा गुण शृंगार इ.[६] रसांचाच आहे. ते माधुर्य, मधुररसाचे व्यंजक असणाऱ्या शब्द व अर्थ यांचे ठिकाणी असते असे लक्षणेने म्हणजे गौण अर्थाने म्हटले आहे.[७] कारण शब्द व अर्थ यांचे ठिकाणी असणारे मधुर अशा शृंगार (व करुण) रसांची अभिव्यक्ति करण्याचे सामर्थ्य हेच माधुर्याचे स्वरूप आहे. म्हणून[८] सहाव्या कारिकेत 'तो अर्थ'... इ. म्हटले, ते अगदी योग्यच होय. कारिकेतील आशय वृत्तीच्या द्वारे 'शृंगार' वगैरे शब्दांनी सांगतात पण काय हो, 'श्रव्य (म्हणजे कानांना सुखविणारे) व दीर्घ समासयुक्त रचना नसल्याने ज्यात अर्थाची फार गुंतागुंत झालेली नसते, ते काव्य मधुर समजतात, असे माधुर्याचे लक्षण[९] आहे! 'हे म्हणणे बरोबर नाही' असे (वृत्तीतल्या) 'श्रव्यत्व' इ. वाक्याने सांगण्यात येत आहे. 'श्रव्यत्व' या शब्दात भामहाने दिलेले माधुर्याचे सर्व लक्षण अंतर्भूत झाले आहे.[१०] 'ओजा नाही' इ.– कारण 'पांडवांच्या सैन्यापैकी जो जो कोणी'... इ. श्लोकामध्ये (ओजोगुण असून)

श्रव्यत्वही आहे, व दीर्घ समासयुक्त रचनाही नाही, हे तात्पर्य. ।। ७ ।।

टीपा

१. भरत व वामन यांनी शब्दाचे व अर्थाचे प्रत्येकी दहा गुण सांगितले आहेत. दण्डीने वैदर्भी रीतीचे दहा गुण सांगितले, पण ते शब्दाचे की अर्थाचे याबद्दल तो काहीही बोलत नाही. भामहाने तीन गुणांचा उल्लेख केला आहे, पण तोही ते गुण शब्दाचे की अर्थाचे याबद्दल अवाक्षरही काढीत नाही. उद्भटाच्या काव्यालंकारसारसंग्रहामध्ये गुणांचा उल्लेख आढळत नाही. रुद्रटानेही गुणांचा निर्देश केलेला नाही. तात्पर्य, गुण हे रसाचे धर्म आहेत हे आनन्दवर्धनांच्या आधी कोणीही म्हटलेले दिसत नाही.

२. पुढील म्हणजे ७, ८, ९ व १० या कारिकांमधून गुण हे निरनिराळ्या रसांच्या आश्रयानेच राहतात असे ठामपणे व सविस्तरपणे म्हटले आहे. प्राचीनांचे मत कसे चुकीचे आहे हे या कारिकांत किंवा त्यांवरील वृत्तीत दाखविलेले नाही. तेव्हा कारिकाकारांनी ७ ते १० या कारिकांमध्ये ठामपणे केलेले व तर्कसंगत वाटणारे स्वमत–प्रतिपादन हेच प्राचीनांच्यामताचे खंडन होय.

३. पूर्वी अनुभवलेल्या विषयसुखांचे संस्कार सूक्ष्म वासनारूपाने सर्व प्राणिमात्रांच्या मनात स्थिर झालेले असतात व त्यांमुळे विषयसुखाकडे त्यांचा स्वाभाविक कल असतो. तुलनार्थ पाहा, काव्यालंकार, १४–३८ मधील पहिले दोन चरण : **अनुसरति रसानां रस्यतामस्य नान्यः । सकलमिदमनेन व्याप्तमाबालवृद्धम् ।।**

४. या संदर्भात पाहा, ध्वन्यालोकाची काशी आवृत्ति, पृ. ४८८ वरील **न हि वीतरागः ... प्रतिभाति** ' हे लोचनातील विधान.

५. भामहापासून जगन्नाथापर्यंत अनेक लेखकांनी (विशिष्ट प्रकारचे) शब्द व अर्थ यांनाच ' काव्य ' म्हटले आहे. उदा. **शब्दार्थौ सहितौ काव्यम्** (भामह, काव्यालंकार, २–१६).

६. ' इत्यादि ' म्हणजे करुण. पाहा, पुढचीच ८ वी कारिका.

७. पाहा, मम्मट, काव्यप्रकाश, झळकीकर आवृत्ति, पृ. ४७७ वरील पुढील वचन– **गुणवृत्त्या पुनस्तेषां वृत्तिः शब्दार्थयोर्मता ।**

८. म्हणून म्हणजे गुण हे रसांच्याच ठिकाणी राहत असतात, म्हणून.

९. पाहा, भामह, काव्यालंकार, २–३.

१०. म्हणजे दीर्घ समासांचा अभाव हाही वृत्तीमधील ' श्रव्यत्व ' या शब्दात अन्तर्भूत आहे.

ध्वन्यालोकः

शृङ्गारे विप्रलम्भाख्ये करुणे च प्रकर्षवत् ।
माधुर्यमार्द्रतां याति यतस्तत्राधिकं मनः ॥ ८ ॥

विप्रलम्भशृङ्गारकरुणयोस्तु माधुर्यमेव प्रकर्षवत् । सहृदयहृदयावर्जनातिशयनिमित्तत्वादिति ॥ ८ ॥

ध्वन्यालोक

शृंगाराच्या 'विप्रलंभ' नावाच्या प्रकारात आणि करुण रसात माधुर्य हे प्रकर्षाने असते, कारण त्या रसांचा आस्वाद घेतेवेळी मन जास्तच द्रवते. ॥ ८ ॥

विप्रलंभ शृंगार व करुण यांमध्ये माधुर्यच प्रकर्षाने असते, कारण सहृदयांची हृदये कमालीची वेधून घेण्यास ते कारणीभूत होतात. ॥ ८ ॥

लोचनम्

सम्भोगशृङ्गारान्मधुरतरो विप्रलम्भः, ततोऽपि मधुरतमः करुण इति तदभिव्यञ्जनकौशलं शब्दार्थयोर्मधुरतरत्वं मधुरतमत्वं चेत्यभिप्रायेणाह– शृङ्गार इत्यादि । करुणे चेति चशब्दः क्रममाह । प्रकर्षवदिति । उत्तरोत्तरं तरतमयोगेनेति भावः । आर्द्रतामिति । सहृदयस्य चेतः स्वाभाविकमनाविष्टत्वात्मकं काठिन्यं क्रोधादिदीप्तरूपत्वं विस्मयहासादिरागित्वं च त्यजतीत्यर्थः । अधिकमिति । क्रमेणेत्याशयः । तेन करुणेऽपि सर्वथैव चित्तं द्रवतीत्युक्तं भवति । ननु करुणेऽपि यदि मधुरिमास्ति तर्हि पूर्वकारिकायां शृङ्गार एवेत्येवकारः किमर्थः । उच्यते– नानेन रसान्तरं व्यवच्छिद्यते, अपि त्वात्मभूतस्य रसस्यैव परमार्थतो गुणा माधुर्यादयः, उपचारेण तु शब्दार्थयोरित्येवकारेण द्योत्यते । वृत्त्याऽर्थमाह– विप्रलम्भेति ॥ ८ ॥

लोचन

विप्रलम्भ शृंगार हा संभोग शृंगारापेक्षा जास्त मधुर (म्हणजे नाजूक) आणि करुणरस हा त्या विप्रलम्भाहूनही अधिक (म्हणजे सर्वांत) मधुर असल्याने त्या दोन रसांची अभिव्यक्ती करण्याचे शब्द

व अर्थ यांच्या ठिकाणचे सामर्थ्य हेच विप्रलम्भ शृंगाराचे मधुरतरत्व व करुणाचे मधुरतमत्व ' होय, या अभिप्रायाने ' शृंगाराच्या ...इ. कारिका लिहिण्यात आली आहे. ' आणि करुण रसात ' यातील ' आणि ' हा शब्द (चढत्या) क्रमाचा निदर्शक आहे. ' प्रकर्षाने असते,' कारण वरीलपैकी नंतरनंतरच्या रसात माधुर्य अधिकाधिक प्रमाणात असते, म्हणून, हे तात्पर्य. ' द्रवते ' म्हणजे सहृदयाचे मन आपल्या स्वाभाविक ' अभेद्यत्व ' या स्वरूपाच्या कठीणपणाचा, क्रोध वगैरेंमुळे आलेल्या दीप्तत्वाचा, म्हणजे पेट घेणे या धर्माचा व विस्मय हास इत्यादींमुळे उपरंजित म्हणजे प्रभावित होणे या धर्माचा त्याग करिते,[२] हा आशय. ' जास्तच ' म्हणजे क्रमाक्रमाने जास्त जास्त हा भावार्थ. त्यामुळे करुणाच्या बाबतीत सहृदयाचे मन सर्वांत जास्त द्रवते, हे या कारिकेद्वारे सुचविण्यात आले आहे. ' पण काय हो, करुणरसातही जर माधुर्य असेल, तर सातव्या कारिकेमध्ये ' शृंगार ' या शब्दानंतर ' हाच ' हा शब्द काय म्हणून वापरला ? ' या शंकेचे उत्तर असे – हाच असे म्हटल्याने दुसऱ्या कोणत्याही रसात माधुर्य नसते असे म्हणण्याचा हेतु नाही, तर माधुर्य वगैरे गुण हे काव्याचा आत्मा असणाऱ्या रसा-चेच असतात, शब्दार्थांमध्ये माधुर्य असते हे केवळ गौण अर्थाने,[३] हे ' हाच ' या शब्दामधील ' च ' ने सुचविले आहे[४]. ' विप्रलम्भ शृंगार ...इ. वृत्तीने (ग्रंथकार) कारिकेचा अर्थ सांगत आहेत. ॥ ८ ॥

**टीपा**

१. अभिनवगुप्तांनी शब्दार्थांच्या ठिकाणच्या शृंगार व करुण यांची अभिव्यक्ति करण्याच्या सामर्थ्यालाच मधुरत्व, मधुरतरत्व आणि मधुरतमत्व म्हटले आहे, ते कार्यकारणभावावर आधारलेल्या लक्षणेने. हे सामर्थ्य रसांच्या माधुर्याचे कारण असल्याने सामर्थ्य या कारणालाच लक्षणेने माधुर्य असे म्हटले आहे. वस्तुतः मधुरतरत्व व मधुरतमत्व हे अनुक्रमे विप्रलंभ शृंगार व करुण या रसांचे धर्म होत. (आणि ' मधुरत्व ' हा संभोगशृंगाराचा धर्म).

२. मधुसूदन सरस्वतींनी आपल्या भगवद्भक्तिरसायन या ग्रंथातील ४ थ्या श्लोकामध्ये या संदर्भात पुढील दृष्टांत दिला आहे–

चित्तद्रव्यं हि जतुवत् स्वभावात्कठिनात्मकम् ।
तापकैर्विषयैर्योगे द्रवत्वं प्रतिपद्यते ॥

कालिदासाचे सहजामप्यपहाय धीरताम्। अभितप्तमयोऽपि मार्दवं भजते (रघुवंशम्, ८–४३) हे उद्गार या संदर्भात पाहण्यासारखे आहेत.

३. पाहा, पृ. ४०४ वरील १ ली टीप.

४. वस्तुत: कारिकेतल्या शृङ्गार एव याचा सरळ अर्थ 'शृंगारच' असा होतो. पण 'शृंगारातच माधुर्य असते' असा त्याचा अर्थ केल्यास सर्वांत मधुर असलेल्या करुणरसाचे काय? अशी पूर्वपक्ष्याने शंका घेतली आहे. तिचे समाधान करण्यासाठी अभिनवगुप्तांनी 'शृंगारच म्हणजे (शृंगारादि) रसच (माधुर्यादि) गुणांचे आश्रय असतात, शब्दार्थ हे गुणांचे आश्रय नव्हेत' असा अर्थ लावला आहे. पण हा अर्थ फार ओढून ताणून लावल्यासारखा वाटतो. शिवाय गुण हे रसांचेच धर्म हा मुद्दा कारिका ६ व तीवरील वृत्ति व लोचन यांमध्ये आधीच सांगून झाला आहे. म्हणून (कारिका ८ मधील आशयाला अनुसरून) शृंगार एव म्हणजे शृंगार:, तदुपलक्षित: करुणश्चैव (न तु अन्ये रसा:) असा अर्थ लावणे अधिक स्वाभाविक व सरळ झाले असते.

ध्वन्यालोक:

रौद्रादयो रसा दीप्त्या लक्ष्यन्ते काव्यवर्तिनः।
तद्व्यक्तिहेतू शब्दार्थावाश्रित्यौजो व्यवस्थितम्॥९॥

रौद्रादयो हि रसाः परां दीप्तिमुज्ज्वलतां जनयन्तीति लक्षणया त एव दीप्तिरित्युच्यते। तत्प्रकाशनपरः शब्दो दीर्घसमासरचनालङ्कृतं वाक्यम्। यथा–

चञ्चद्भुजभ्रमितचण्डगदाभिघात–
सञ्चूर्णितोरुयुगलस्य सुयोधनस्य।
स्त्यानावबद्धघनशोणितशोणपाणि –
रुत्तंसयिष्यति कचांस्तव देवि भीमः॥

तत्प्रकाशनपरश्चार्थोऽनपेक्षितदीर्घसमासरचनः प्रसन्नवाचकाभिधेयः।

यथा—

यो यः शस्त्रं बिभर्ति स्वभुजगुरुमदः पाण्डवीनां चमूनाम्।
यो यः पाञ्चालगोत्रे शिशुरधिकवया गर्भशय्यां गतो वा।

यो यस्तत्कर्मसाक्षी चरति मयि रणे यश्च यश्च प्रतीपः
क्रोधान्धस्तस्य तस्य स्वयमपि जगतामन्तकस्यान्तकोऽहम् ॥
इत्यादौ द्वयोरोजस्त्वम् ।

ध्वन्यालोक

काव्यात असलेले रौद्रादि रस 'दीप्ती' मुळे वेगळे भासतात. त्या रसांची अभिव्यक्ति करण्यास कारणीभूत असलेल्या शब्द व अर्थ यांच्या आश्रयाने 'ओज' राहाते.॥ ९ ॥

कारण, रौद्रादि रस हे पराकाष्ठेची दीप्ति म्हणजे उज्ज्वलता[1] उत्पन्न करितात, म्हणून लक्षणेने[2] त्यांनाच दीप्ति म्हटले आहे. त्या दीप्तीचे प्रकाशन करणारे शब्द म्हणजे लांब लांब समास वापरून सजविलेली वाक्ये होत.

जसे —

"गरगर फिरणाऱ्या हातांनी घुमवलेल्या भयंकर गदेच्या आघातांनी ज्याच्या दोन्ही मांड्या फोडलेल्या आहेत अशा सुयोधनाच्या दाट व थिजल्यामुळे अधिकच घट्ट झालेल्या रक्ताने हात तांबडेलाल झालेला हा भीम, हे देवि! तुझी केशभूषा करील!"[3]

आणि त्या दीप्तीचे प्रकाशन करणारा अर्थ म्हणजे दीर्घ समासांच्या वापरावर अवलंबून नसलेला, प्रसादयुक्त शब्दांनी वाच्य होणारा अर्थ होय. जसे—

"पांडवांच्या सैन्यापैकी आपल्या बाहुबलाबद्दल विशेष गर्व बाळगून असलेला जो जो कोणी शस्त्र धारण करीत असेल, पांचाळांच्या कुळात जो जो लहान, मोठा किंवा अजून गर्भातच पहुडलेला असेल, ज्याने ज्याने ते (द्रोणवधाचे) कृत्य स्वतःच्या डोळयांनी पाहिले असेल आणि युद्धामध्ये जो जो मला विरोध करील, त्याचा त्याचा, इतकेच नव्हे तर जगाचा अंत करणाऱ्या प्रत्यक्ष यमाचाही, क्रोधाने अंध असा मी नाश करीन."[4]

वरील दोन्हीसारख्या उदाहरणात अनुक्रमे शब्द व अर्थ हे दोन्हीही ओजोगुणयुक्त आहेत. ॥ ९ ॥

लोचनम्

रौद्रेत्यादि। आदिशब्दः प्रकारे। तेन वीराद्भुतयोरपि ग्रहणम्। दीप्तिः प्रतिपत्तुर्हृदये विकासविस्तारप्रज्वलनस्वभावा। सा च मुख्यतया

ओजश्शब्दवाच्या । तदास्वादमया रौद्राद्याः, तया दीप्त्या आस्वादविशेषात्मिकया कार्यरूपया लक्ष्यन्ते रसान्तरात्पृथक्तया । तेन कारणे कार्योपचाराद्रौद्रादिरेवौजःशब्दवाच्यः । ततो लक्षितलक्षणया तत्प्रकाशनपरः शब्दो दीर्घसमासरचनवाक्यरूपोऽपि दीप्तिरुच्यते । यथा 'चञ्चद्' इत्यादि । तत्प्रकाशनपरश्चार्थः प्रसन्नैर्गमकैर्वाचकैरभिधीयमानः समासानपेक्ष्यपि दीप्तिरित्युच्यते । यथा—'यो यः' इत्यादि । चञ्चदिति । चञ्चद्भ्यां वेगादावर्तमानाभ्यां भुजाभ्यां भ्रमिता येयं चण्डा दारुणा गदा तया योऽभितः सर्वत ऊर्वोर्घातस्तेन सम्यक् चूर्णितं पुनरनुत्थानोपहतं कृतमूरुयुगलं युगपदेवोरुद्वयं यस्य तं सुयोधनमनादृत्यैव स्त्यानेनाश्यानतया न तु कालान्तरशुष्कतयावबद्धं हस्ताभ्यामविगलद्रूपमत्यन्तमाभ्यन्तरतया घनं न तु रसमात्रस्वभावं यच्छोणितं रुधिरं तेन शोणौ लोहितौ पाणी यस्य सः । अत एव स भीमः कातरत्रासदायी । तवेति । यस्यास्तत्तदपमानजातं कृतं देव्यनुचितमपि तस्यास्तव कचानुत्तंसयिष्यत्युत्तंसवतः करिष्यति, वेणीत्वमपहरन् करविच्युतशोणितशकलैर्लोहितकुसुमापीडेनेव योजयिष्यतीत्युत्प्रेक्षा । देवीत्यनेन कुलकलत्रखिलीकारस्मरणकारिणा क्रोधस्यैवोद्दीपनविभावत्वं कृतमिति नात्र शृङ्गारशङ्का कर्तव्या । सुयोधनस्य चानादरणं द्वितीयगदाघातदानाद्यनुद्यमः । स च सञ्चूर्णितोरुत्वादेव । स्त्यानग्रहणेन द्रौपदीमन्युप्रक्षालने त्वरा सूचिता । समासेन च सन्ततवेगवहनस्वभावात् तावत्येव मध्ये विश्रान्तिमलभमाना चूर्णितोरुद्वयसुयोधनानादरणपर्यन्ता प्रतीतिरेकत्वेनैव भवतीत्यौद्धत्यस्य परं परिपोषिका । अन्ये तु सुयोधनस्य सम्बन्धि यत्स्त्यानावबद्धं घनं शोणितं तेन शोणपाणिरिति व्याचक्षते ।

य इति । स्वभुजयोर्गुरुर्मदो यस्य । चमूनां मध्येऽर्जुनादिरित्यर्थः । पाञ्चालराजपुत्रेण धृष्टद्युम्नेन द्रोणस्य व्यापादनात्तत्कुलं प्रत्यधिकः क्रोधावेशोऽश्वत्थाम्नः । तत्कर्मसाक्षीति कर्णप्रभृतिः । रणे सङ्ग्रामे कर्तव्ये यो मयि मद्विषये प्रतीपं चरति समरविघ्नमाचरति । यद्वा मयि चरति सति सङ्ग्रामे यः प्रतीपं प्रतिकूलं कृत्वास्ते । स एवंविधो यदि सकलजगदन्तको भवति तस्याप्यहमन्तकः किमुतान्यस्य मनुष्यस्य देवस्य वा । अत्र पृथग्भूतैरेव क्रमाद्विमृश्यमानैरर्थैः पदात्पदं क्रोधः परां धारामाश्रित इत्यसमस्तत्वैव दीप्तिनिबन्धनम् । एवं माधुर्यदीप्ती परस्परप्रतिद्वन्द्वितया

स्थिते शृङ्गारादिरौद्रादिगते इति प्रदर्शयता तत्समावेशवैचित्र्यं हास्य-भयानकबीभत्सशान्तेषु दर्शितम्। हास्यस्य शृङ्गाराङ्गतया माधुर्यं प्रकृष्टं विकासधर्मतया चौजोऽपि प्रकृष्टमिति साम्यं द्वयोः। भयानकस्य मग्नचित्तवृत्तिस्वभावत्वेऽपि विभावस्य दीप्ततया ओजः प्रकृष्टं माधुर्य-मल्पम्। बीभत्सेऽप्येवम्। शान्ते तु विभाववैचित्र्यात् कदाचिदोजः प्रकृष्टं कदाचिन्माधुर्यमिति विभागः॥ ९॥

लोचन

'रौद्रादि'– यातल्या 'आदि' शब्दाचा अर्थ 'प्रकार' असा समजावा. त्यामुळे (रौद्रादि म्हणजे रौद्राच्या प्रकारचे, रौद्रासारखे) वीर व अद्भुत[५] हेही या संदर्भात अभिप्रेत आहेत. वाचकाच्या हृदयाने (प्रथम) विकसित होणे, (मग) विस्तार पावत जाणे (व नंतर) पेट घेणे हे 'दीप्तीचे' स्वरूप आहे.[६] ती दीप्ति हा या कारिकेतील 'ओजस्' या शब्दाचा मुख्य, वाच्य अर्थ आहे.[७] रौद्रादि रस हे त्या दीप्तीने विशिष्ट असा आस्वाद उत्पन्न करणारे होत[८] आणि त्या रौद्रा-दिरसांचे कार्य असणारी व आस्वादाचे ठिकाणी वैशिष्टय उत्पन्न कर-णारी जी दीप्ति, तीमुळे ते रौद्रादि रस इतर रसांहून वेगळे होतात. म्हणून म्हणजे दीप्ति हे रौद्रादि रसांचे कार्य असल्यामुळे लक्षणेने[९] रौद्रादि रसांना म्हणजे कारणांनाच ओजस् म्हणजे कार्य असे म्हणण्यात येते त्यानंतर लक्षितलक्षणेने म्हणजे द्वितीय लक्षणेने[१०] दीप्तीचे प्रकाशन करणाऱ्या, दीर्घ समासांचा वापर ज्याच्यात केला आहे अशा वाक्यरूपी शब्दसमूहालाही दीप्ति म्हणण्यात येते. उदा. 'गरगर फिर-णाऱ्या' इ. (श्लोकातील सामासिक शब्दांना दीप्ति म्हटले आहे). त्याचप्रमाणे समासयुक्त रचना नसतानासुद्धा जो वाच्यार्थ त्या दीप्तीचा व्यंजक असतो व जो (वाच्यार्थ) प्रसादगुणयुक्त म्हणजे तावडतोब अर्थबोध करून देणाऱ्या शब्दांनी सांगितलेला असतो, त्या अर्थालाही 'दीप्ति' म्हणण्यात येते. उदा, 'जो जो कोणी' इ. श्लोक.

'गरगर फिरणाऱ्या' इ.– फिरणाऱ्या म्हणजे वेगाने गरगर फिरणाऱ्या. अशा हातांनी घुमविलेली ही जी भयंकर म्हणजे भीति-दायक गदा, तिने सर्व बाजूंनी म्हणजे मांड्यांच्या सर्व भागांवर केलेला

जो आघात, त्या आघाताने ज्यांचा पूर्णपणे चुराडा केला आहे– पूर्णपण म्हणजे इतका की, त्यामुळे त्या दुर्योधनाचे उठण्याचे सामर्थ्य पूर्णपणे नष्ट करून टाकले आहे. त्याच्या दोन्ही मांड्यांचा म्हणजे एकाच तडाख्यात दोन्ही मांड्यांचा. त्या सुयोधनाची मुळीच कदर न करिताच म्हणजे त्याला दुसरा तडाखा मारण्याचा विचारही मनात न आणताच. (त्या दुर्योधनाच्या मांड्यांतून बाहेर येणारे रक्त) खोल भागातून निघालेले असल्यामुळे आधीच घट्ट असेल– सामान्य रक्ताप्रमाणे पातळ नसेल– आणि ते बाहेर आल्याबरोबर ताबडतोब थिजून त्याच्या गुठळ्या झाल्यामुळे, बराच काळ लोटल्याने– ते वाळून गेले म्हणून नव्हे– अधिकच घट्ट झालेले असेल. ते (रक्त) मी माझ्या हातांनी निपटून घेऊ लागलो असताना माझ्या हातातून खाली गळणारही नाही. त्या शोणिताने म्हणजे रक्ताने माझे दोन्ही हात शोण म्हणजे तांबडे लाल झालेले असतील व म्हणूनच तर हा भीम म्हणजे भित्र्यांना घाबरविणारा म्हणून 'भीम' आहे. (नुसत्या नावाचा भीम नव्हे). तो भीम तुझी म्हणजे जिची (द्यूतसभेमध्ये) ती ती (नाना प्रकारची) पांडवांच्या राणीला न शोभणारी विटंबना (कौरवांकडून केली गेली), त्या तुझ्या केसांवर साज चढवील म्हणजे ते केस शिरोभूषणांनी युक्त करील. तुझ्या वेणीची एकपदरी रचना बदलून, हातातून गळलेल्या रक्ताच्या गुठळ्यांची म्हणजे जणू काय लाल फुलांची माळ (त्या केसांची त्रिवेणी रूपाने बांधणी करून) त्या केसांवर चढवील अशी ही (गम्य) उत्प्रेक्षा आहे. देवि ! हे संबोधन कुलस्त्रीच्या अपमानाची आठवण करून देणारे व म्हणून ते भीमाच्या क्रोधाचाच उद्दीपनविभाव होते. म्हणून या ठिकाणी शृंगाररसाची शंकाही घेऊ नये.[११] सुयोधनाची कदर न करणे म्हणजे त्याच्यावर गदेचा दुसरा प्रहार करण्याच्या भानगडीत मुळीच न पडणे. त्याचे कारण अर्थात् त्याच्या मांड्यांचा आधीच चक्काचूर झाला होता हेच होय. 'थिजणे' हा शब्द योजिल्याने द्रौपदीचा राग धुऊन काढण्यासाठी भीमसेनाला झालेली घाई सुचविली जात आहे.[१२] श्लोकातील पहिल्या दीर्घसमासामुळे समासांचा स्वभाव वेगाने व सातत्याने वाहणारा असतो म्हणून त्या दीर्घ समासापासून होणारी अर्थप्रतीतिदेखील समासाप्रमाणेच मध्ये खंड न पडता एकजिनसीपणाने

होते व त्या प्रतीतीचा शेवट एकदम ज्याच्या मांड्यांचा चुराडा झाला आहे अशा सुयोधनाबद्दलच्या भीमसेनाच्या बेपर्वाईमध्ये होतो. ही सर्व प्रतीति एकदम, एकजिनसीपणानेच होते, म्हणून ती भीमाच्या क्रोधाचा कमालीचा परिपोष करिते. पण इतर काही विवरणकार मात्र ' सुयोधनाशी संबंध असलेले[13] व थिजल्यामुळे गुठळ्या झालेले जे दाट रक्त, त्याने हात तांबडेलाल झालेला ' असे विवरण करितात.

' जो जो कोणी '– आपल्या बाहूंच्या बळाबद्दल ज्याला ज्याला फार गर्व आहे असा, म्हणजे (पांडवांच्या) सैन्यामधला अर्जुन वगैरे, असा अर्थ. पंचाल देशच्या राजाचा (म्हणजे द्रुपदाचा) मुलगा धृष्टद्युम्न याने द्रोणाचा वध केल्यामुळे पांचाल कुलाबद्दल अश्वत्थाम्याला जास्तच संताप होता ! . ते कृत्य ज्याने ज्याने डोळ्यांनी पाहिले असा, म्हणजे कर्ण वगैरे. मी युद्ध करीत असताना माझ्याशी म्हणजे माझ्या बाबतीत जो शत्रुत्वाचे आचरण करील म्हणजे मी लढत असताना जो मला विरोध करील, किंवा, मी (रणांगणावर) स्वैर संचार करीत असताना युद्धात जो मला प्रतिबंध करीत राहील,[14] तो. अशा प्रकारचा माणूस जरी सर्व प्राणिमात्राचा संहारकर्ता (यम) असला, तरी मी त्याचाही नाश करीन, मग इतर मानवाची किंवा देवाची काय कथा ? या उदाहरणात जे वाच्यार्थ वेगवेगळेपणाने मांडले आहेत, त्या अर्थांचा क्रमाने विचार करीत गेले म्हणजे त्यामधून प्रत्येक पदागणिक अश्वत्थाम्याचा क्रोध शिगेला पोहोचत जातो (व त्याचा परमोत्कर्ष ४ थ्या ओळीतल्या 'यमाचाही नाश करीन' या बोलण्यामध्ये होतो), म्हणून समासयुक्त रचना येथे नाही हेच येथे 'दीप्ती' चे कारण आहे. याप्रमाणे माधुर्य आणि दीप्ती हे गुण परस्परविरोधी असून ते अनुक्रमे शृंगारादि[15] व रौद्रादि[16] रसांशी संबद्ध असतात हे दाखवून त्या गुणांचे कमीअधिक प्रमाणात झालेले मिश्रण (उरलेल्या चार म्हणजे) हास्य, भयानक, बीभत्स[17] व शांत या रसांमध्ये दिसते हे ग्रंथकारांनी सुचविले. हास्यरस हा शृंगाराचे अंग (म्हणजे शृंगाराची शोभा वाढविणारा) असल्यामुळे त्यात माधुर्यगुण प्रकर्षाने असतो व विकास हा त्या रसाचा धर्म असल्यामुळे त्यात ओजोगुणाचेही प्राबल्य असते व अशा रीतीने हास्यरसात या दोन्ही गुणांचे समप्राधान्य असते.

भयानकरसाचे स्वरूप चित्तवृत्ति दडपल्या जाणे हे असले तरी त्या भीतीचा विभाव म्हणजे कारण हे 'दीप्त'[१८] असल्याने त्या रसात ओजोगुण प्राचुर्याने असतो व माधुर्य अल्पप्रमाणात असते. बीभत्स रसाचे बाबतीतही असेच.[१९] शांत रसाचे बाबतीत मात्र विभाव वेगवेगळे असू शकतात, म्हणून (त्या त्या परिस्थित्यनुसार) केव्हा ओजोगुणाचे प्राचुर्य असेल, तर केव्हा माधुर्याचे, अशी माधुर्य, ओजस् व प्रसाद या गुणांची निरनिराळ्या रसांच्या बाबतीत विभागणी आहे ॥ ९ ॥

टीपा

१. रौद्रादि रसांनी ओथंबलेले काव्य वाचताना रसिकाच्या मनाची पेटल्यासारखी स्थिति होते. हीच दीप्ति होय. स्वातंत्र्यशाहीर गोविंद हे त्यांनी स्वतः रचलेल्या अफझुलखानाच्या पोवाड्याच्या अखेरीस वाचकांना विचारतात—

    स्वातंत्र्याची कथा तुम्हाला रुचली का सांगा।
    सांगायला नकोच, तुमचे बाहु करिति दंगा॥

   वीररसप्रधान काव्य वाचून वाचकाचे मन प्रदीप्त झाल्यासारखे होते, म्हणूनच त्याचे बाहू दंगा करू लागतात.

२. रौद्रादि रस हे 'दीप्ती' चे कारण असताना त्यांनाच 'दीप्ति' असे म्हटल्यास ती कार्यकारणभावावर आधारलेली लक्षणा होते. या लक्षणेचे 'तूप हे जीवन होय' (घृतम् आयुः।) हे प्रसिद्ध उदाहरण आहे (जीवन = जीवनाचे कारण)

३. वेणीसंहार, अंक १, श्लोक २१.

४. वेणीसंहार, अंक ३, श्लोक ३२.

५. रौद्र इ. म्हणजे रौद्र, वीर व अद्भुत असे अभिनवगुप्त म्हणतात. यातील अद्भुताऐवजी 'बीभत्स' हा शब्द मम्मट, विश्वनाथ, जगन्नाथ इत्यादिकांच्या ग्रंथात आढळतो व तो अधिक योग्य वाटतो. याचे कारण असे की, चित्ताने पेट घेणे ही अवस्था अद्भुत रसाचे बाबतीत स्वाभाविक वाटत नाही. बीभत्स रसाच्या बाबतीत जुगुप्सा ( म्हणजे तिटकारा ) या स्थायिभावाचे स्वरूप दीप्तीशी अधिक मिळते जुळते आहे.

   हेमचंद्राने मात्र काव्यानुशासन, पृ. २९० वर अद्भुत रस हा जेव्हा वीर, बीभत्स व रौद्र यांचे अंग असेल तेव्हाच त्याच्यामध्ये ओजोगुण प्रकर्षाने असतो असे म्हटले आहे. यावरून अद्भुत रस 'अंगी' असताना त्याच्यात ओजोगुण असत नाही असा निष्कर्ष निघतो.

६. विकास, विस्तार व प्रज्वलन हे तिन्ही शब्द एकाच अर्थाचे आहेत असे

'बालप्रिया' टीका म्हणते (विकासरूपो यो विस्तारः तद्रूपं यत् प्रज्वलनम्... इ.). वस्तुतः हे तीन शब्द चित्ताच्या वेगवेगळचा अवस्था दर्शविणारे असावेत असे वाटते. विकास म्हणजे प्रथम चित्त स्वाभाविकपणे उमलणे, मग विस्तार म्हणजे ते अधिक ताणले जाणे, व मग प्रज्वलन म्हणजे त्या चित्ताने पेट घेणे, असे अर्थ करावेत. विकास, विस्तार व प्रज्वलन हे शब्द लोचनात पृ. ३५० व ३५५ वर भट्टनायकाचे मत सांगताना व अभिनवभारतीत (रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. १४७ वर) वापरलेले आहेतच.

७. 'अमरकोशात ओजो दीप्तौ बले असे म्हटले आहे. त्यावरून ओजस् याचा पहिला अर्थ 'दीप्ति' हाच आहे व बल हा त्यानंतरचा, दुसरा अर्थ आहे. ओजोगुणाचे लक्षण मम्मटाने काव्यप्रकाशात (झळकीकर आवृत्ति, पृ. ४७५) दीप्त्यात्मविस्तृतेर्हेतुरोजः (म्हणजे 'दीप्ति' या स्वरूपाच्या चित्त-विस्ताराचे कारण ओजस् हे होय) असे केले आहे.

८. लोचनात 'तदास्वादमय' असा शब्द असून तो रौद्रादि रसांचे विशेषण म्हणून वापरला आहे. वस्तुतः मय या प्रत्ययाचा अर्थ 'त्यापासून उत्पन्न झालेले' असा आहे. पण या ठिकाणी 'त्याला उत्पन्न करणारे' असा अर्थ केला आहे. याचे कारण असे की, रौद्रादि रस हे दीप्तीचे 'कार्य' नसून 'कारण' आहेत असे वृत्तीमध्ये रौद्रादि रस हे पराकाष्ठेची इ. वाक्यात म्हटले आहे.

९. उदा. घृत हे आयुष्याचे कारण असताना त्याला लक्षणेने 'आयुष्य' असे म्हणण्यात येते. (आयुर्घृतम् ।) पाहा, पृ. ४११, टीप २.

१०. पाहा, पृ. ८९ व २७३.

११. कारण येथे भीमाने द्रौपदीला 'राणीसरकार' हे संबोधन प्रेमात येऊन वापरलेले नाही, तर पांडवांची राणी असूनसुद्धा तिची इतकी विटंबना झाली याची भीमाला चीड आल्यामुळे त्याने देवि ! हा शब्द वापरला आहे.

१२. म्हणजे ते रक्त थिजलेले असतानाच काही वेळाने वाळून जाण्यापूर्वीच भीमसेन त्या रक्ताने माखलेल्या हातांनी द्रौपदीची वेणी घालण्यास उतावीळ झाला आहे. थिजणे ही अवस्था वाळून जाणे या अवस्थेच्या पूर्वीची होय.

१३. म्हणजे इतर विवरणकार सुयोधनस्य या षष्ठयन्त पदाचा संबंध शोणिताकडे नेतात. म्हणजे ते ही षष्ठी नेहमीप्रमाणे संबंधवाचक आहे असे मानितात. या विवरणासंबंधी अभिनवगुप्तांनी स्पष्टपणे नापसंती व्यक्त केली नाही. यावरून असे दिसते की, वाच्य अवस्थेमध्ये षष्ठीचा असा अर्थ

घेण्यास हरकत नाही, पण व्यंग्य अवस्थेमध्ये मात्र सुयोधनस्य ही 'अनादरे षष्ठी' मानणे हे त्यांना योग्य वाटते व अशी ही अनादरे षष्ठी मानण्यात त्यांचा कमालीचा रसिकपणा दिसून येतो.

१४ चरति याचे अभिनवगुप्तांनी दोन वैकल्पिक अर्थ केलेले दिसतात–१) मयि मद्विषये यः प्रतीपं चरति । असा, म्हणजे चरति हे क्रियापद मानून केलेला अर्थ, २) मयि रणे चरति (मी रणांगणावर संचार करीत असताना) अशी सति सप्तमी घेऊन म्हणजे चरति हे वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणाचे सप्तमी एकवचन आहे असे मानून केलेला अर्थ मूळ श्लोकात प्रतीपः असे असताना अभिनवगुप्त त्याचे दोन्ही प्रकारांनी विवरण प्रतीपम् असा शब्द वापरून करिताना दिसतात. अभिनवगुप्तांपुढे प्रतीपम् असा पाठ होता असे वाटते, कारण हेमचन्द्राने काव्यानुशासन, पृ. २९३ वर प्रतीपम् हाच पाठ स्वीकारला आहे.

१५. म्हणजे शृंगार व करुण.

१६. म्हणजे रौद्र, वीर व (अभिनवगुप्तांच्या मते) अद्भुत.

१७. वस्तुतः बीभत्साचा उल्लेख रौद्रादींमध्ये करून येथे अद्भुताचा उल्लेख करणे अधिक उचित झाले असते, असे आम्हास वाटते. पाहा, पृ. ४११ टीप ५ वी.

१८. विभाव दीप्त असतो म्हणजे भीतीचे कारण उग्र, भीषण असे असते.

१९. असेच म्हणजे ओजोगुण विपुल प्रमाणात व माधुर्य अल्पांशाने असणे. अर्थात बीभत्सरसात माधुर्य अल्पांशाने का होईना, पण कसे असू शकते हे चिन्त्य आहे.

**ध्वन्यालोकः**

> **समर्पकत्वं काव्यस्य यत्तु सर्वरसान् प्रति ।**
> **स प्रसादो गुणो ज्ञेयः सर्वसाधारणक्रियः ॥१०॥**

**प्रसादस्तु स्वच्छता शब्दार्थयोः । स च सर्वरससाधारणो गुणः सर्वरचनासाधारणश्च व्यङ्ग्यार्थापेक्षयैव मुख्यतया व्यवस्थितो मन्तव्यः ॥१०॥**

**ध्वन्यालोक**

पण कोणत्याही रसाची प्रतीति झटकन व उत्तम प्रकारे करून देण्याचे काव्यातील सामर्थ्य म्हणजे प्रसादगुण होय. या प्रसादगुणाचे कार्य सर्वांच्या (म्हणजे सर्व रस व रचना यांच्या) बाबतीत सारखेच आहे ॥ १० ॥

पण प्रसाद म्हणजे शब्द व अर्थ यांचा पारदर्शकपणा. तो गुण सर्व रसांना व सर्व रचनांना साधारण असून व्यंग्यार्थ प्रकट करण्याचे कामी (इतर गुणांहून) मुख्य असतो असे समजावे.

**लोचनम्**

समर्पकत्वं सम्यगर्पकत्वं हृदयसंवादेन प्रतिपत्तॄन् प्रति स्वात्मावेशेन व्यापकत्वं झटिति शुष्ककाष्ठाग्निदृष्टान्तेन । अकलुषोदकदृष्टान्तेन च । तदकालुष्यं प्रसन्नत्वं नाम सर्वरसानां गुणः । उपचारात्तु तथाविधे व्यङ्ग्येऽर्थे यच्छब्दार्थयोः समर्पकत्वं तदपि प्रसाद । तमेव व्याचष्टे– प्रसादेति । ननु रसगतो गुणस्तत्कथं शब्दार्थयोः स्वच्छतेत्याशङ्क्याह– स चेति । चशब्दोऽवधारणे । सर्वरस–साधारण एव गुणः । स एव च गुण एवंविधः । सर्वा येयं रचना शब्दगता चार्थगता च समस्ता चा–समस्ता च तत्र साधारणः । मुख्यतयेति । अर्थस्य तावत्समर्पकत्वं व्यङ्ग्यं प्रत्येव सम्भवति नान्यथा । शब्दस्यापि स्ववाच्यार्पकत्वं नाम कियदलौकिकं येन गुणः स्यादिति भावः । एवं माधुर्यौजःप्रसादा एव त्रयो गुणाः उपपन्ना भामहाभिप्रायेण । ते च प्रतिपत्त्रास्वादमया मुख्यतया तत आस्वाद्ये उपचरिता रसे ततस्तद्व्यञ्जकयोः शब्दार्थयोरिति तात्पर्यम् ॥१०॥

**लोचन**

'समर्पकत्व' म्हणजे 'सम्यक् अर्पकत्व' (म्हणजे कोणत्याही रसाची प्रतीति उत्तम प्रकारे करून देण्याचे सामर्थ्य) म्हणजे सहृदयांचा हृदयसंवाद घडवून आणून (व्यंग्यार्थाने) सहृदयांचे हृदय आपल्या स्वरूपाने तावडतोब व्यापणे [1] कसे म्हणाल, तर अग्नि ज्याप्रमाणे वाळलेल्या लाकडाला तत्क्षणी व्यापतो त्याप्रमाणे, किंवा निर्मळ पाणी जसे (स्वच्छ कापडाला) तावडतोब व्यापते, तसे. [2] तो निर्मळपणा म्हणजे प्रसन्नपणा (म्हणजे प्रसाद) हा सगळ्या रसांचा गुण आहे पण त्या प्रकारच्या व्यंग्यार्थाची म्हणजे रसरूपी व्यंग्यार्थाची प्रतीति उत्तम प्रकारे व तावडतोब घडविण्याच्या बाबतीतले शब्द व अर्थ यांच्या ठिकाणचे जे सामर्थ्य, त्यालाही लक्षणेने 'प्रसाद' च

म्हटले आहे.[४] त्याचेच विवरण (वृत्तिकार) 'पण प्रसाद' ... इ. शब्दांनी करितात. 'पण काय हो, ग्रंथकारांच्या मते गुण हा जर रसाचाच धर्म आहे तर (वृत्तिकारांनी) शब्द व अर्थ यांनाच कसे काय स्वच्छ (पारदर्शक) म्हटले ?' अशी शंका कल्पून तिचे उत्तर वृत्तिकार 'तो गुण' ... इ. शब्दांनी देतात. वृत्तीतला (संस्कृत) च हा शब्द एव (म्हणजे मराठीतला 'च') या अर्थाने वापरला आहे. म्हणजे तो प्रसाद गुण सर्व रसांच्याच ठिकाणी असणारा म्हणजे शब्द व अर्थ यांचे ठिकाणी नसणारा) या प्रकारचा आहे. आणि तो प्रसादगुणच सर्व रसांना साधारण असा आहे. (आणि माधुर्य व ओजस् हे मात्र सर्व रसांना साधारण नाहीत) आणि शब्दांची व अर्थाची दीर्घ समासयुक्त रचना म्हणा, किंवा लघुसमासयुक्त अथवा समासरहित रचना म्हणा[४]– त्या सर्व प्रकारच्या रचनांतही प्रसाद गुण आढळून येतो. 'मुख्य असतो' –(वाच्य) अर्थाने समर्पकत्व हे फक्त व्यंग्यार्थ प्रकट करण्याच्या बाबतीतच संभवते, दुसऱ्या कोणत्याही अर्थाच्या बाबतीत संभवत नाही. शब्दाच्या ठिकाणीही स्वतःचा वाच्यार्थ तत्क्षणी प्रकट करण्याचे सामर्थ्य असणे हे कितपत कौतुकास्पद समजावे,[५] की ज्यामुळे तो प्रसाद हा गुण शब्दाचा मानिता येईल, हा आशय. अशा तऱ्हेने भामहाने सांगितलेले[६] माधुर्य, ओजस् व प्रसाद हे तीनच गुण आम्हाला तर्कसंगत वाटतात,[७] (तिहींहून अधिक म्हणजे दहा, वीस इतके गुण मानण्याची आवश्यकता नाही) आणि ते गुण मुख्यतः सहृदयाला मिळणारा रसास्वाद या स्वरूपाचे असून त्यामुळे ते गुण ज्याचा आस्वाद घेतला जातो त्या रसाचे धर्म असे लक्षणेने म्हटले जाते व मग ते गुण ते रस अभिव्यक्त करणाऱ्या शब्दार्थांचे असे द्वितीय लक्षणेने म्हणण्यात येते, हे (कारिकेचे व तीवरील वृत्तीचे) तात्पर्य. ।। १० ।।

टीपा

१. काव्यमाला आवृत्तीतील 'व्यापकत्व' हा पाठ आम्हाला अधिक ग्राह्य वाटतो. काशी आवृत्तीतील 'व्यापारकत्व' हा मुद्रणदोष असण्याचा संभव आहे. कारण बालप्रियेनेही झटिति या शब्दाचा अन्वय व्यापकत्वम् या शब्दाशीच केला आहे.

२. पाहा, मम्मट, काव्यप्रकाश, झळकीकर आवृत्ति, पृ. ४७६. मम्मटाने हेच दोन दृष्टांत प्रसादगुणाचे वर्णन करिताना घेतले आहेत.

३. पाहा, पृ. ४०२ वरील ८ ही टीप. अभिनवगुप्तांच्या 'शब्दार्थाच्या सामर्थ्यालाही लक्षणेने प्रसाद म्हटले आहे' या विधानाचा रोख वृत्तीतील 'प्रसाद म्हणजे शब्द व अर्थ यांचा पारदर्शकपणा' या वाक्याकडे आहे.

४. पाहा, उद्द्योत ३, कारिका ५ व तीवरील वृत्ति.

५. म्हणजे अभिनवगुप्तांचे म्हणणे असे की, शब्द उच्चारल्यावर त्याने आपल्या वाच्य अर्थाचा बोध करून देणे हे जरी आवश्यकच असले, तरी तो त्या शब्दाचा विशेष गुण मानिता येत नाही. म्हणून रस वगैरे व्यंग्यार्थाची प्रतीति तत्क्षणी आणून देणे हेच शब्दाचे अलौकिकत्व म्हणता येईल.

६. भामहाने काव्यालंकार, परिच्छेद दोनमधील १ ते ३ या श्लोकांमध्ये माधुर्य, ओजस् व प्रसाद अशा तीनच गुणांची लक्षणे दिली आहेत. पण ते गुण काव्यामध्ये समास योजिलेले असणे किंवा नसणे, वाच्यार्थ तावडतोब ध्यानात येणे अथवा न येणे, वर्ण कानाला सुखविणारे असणे किंवा नसणे यांवर अवलंबून असतात असे म्हटले आहे. त्यांचा रसाशी संबंध असतो असे भामहाने कोठेही म्हटलेले नाही. आनंदवर्धनांनी मात्र गुण हे रसाचेच धर्म होत हे प्रथम व स्पष्टपणे सांगितले. आणि अभिनवगुप्तांनीही त्याच मताचे समर्थन केले.

७. मम्मटाने काव्यप्रकाशात (झळकीकर आवृत्ति, पृ. ४७३ वर) गुण हे तीनच आहेत, ते दहा आहेत असे मानण्याची गरज नाही, हेच मत प्रतिपादन करून त्याचे समर्थनही केले आहे. हे मत त्याने अर्थात अभिनवगुप्तांच्या मतावरूनच बनविलेले वाटते. याचे कारण अर्थात हेच दिसते की, हे तीनच गुण रसाशी निगडित आहेत. (पाहा, ध्वन्यालोकातली २-६ ही कारिका व ये रसस्याङ्गिनो धर्माः हे झळकीकर आवृत्ति पृ. ४६२ वरील मम्मटाचे वचन). बाकीच्या गुणांचा रसाशी निकटचा संबंध दाखविता येत नाही.

ध्वन्यालोकः

श्रुतिदुष्टादयो दोषा अनित्या ये च दर्शिताः
ध्वन्यात्मन्येव शृङ्गारे ते हेया इत्युदाहृताः ॥ ११ ॥

अनित्या दोषाश्च ये श्रुतिदुष्टादयः सूचितास्तेऽपि न वाच्ये अर्थमात्रे, न च व्यङ्ग्ये शृङ्गारव्यतिरेकिणि, शृङ्गारे वा ध्वनेरनात्मभूते। किं तर्हि ? ध्वन्यात्मन्येव शृङ्गारेऽङ्गितया व्यङ्ग्ये ते हेया इत्युदाहृताः,

अन्यथा हि तेषामनित्यदोषतैव न स्यात् । एवमयमसंलक्ष्यक्रमोद्द्योतो ध्वनेरात्मा प्रदर्शितः सामान्येन ॥ ११ ॥

ध्वन्यालोक

आणि श्रुतिदुष्टादि जे दोष अनित्य म्हणून वर्णिले गेले आहेत, ते शृंगारध्वनिकाव्यातच वर्ज्य होत, असे सांगितले आहे. ॥११॥

आणि श्रुतिदुष्टादि दोष जे अनित्य असल्याचे (भामहाने) सुचविले आहे, तेदेखील केवळ वाच्य अर्थाच्या दृष्टीने वर्ज्य असतात असे नव्हे, किंवा शृंगाराखेरीज इतर व्यंग्यार्थांच्या बाबतीत नव्हे किंवा ध्वनिकाव्याचा आत्मा नसणाऱ्या शृंगारातही नव्हे. तर मग काय? तर ध्वनीचा आत्मा असलेल्या म्हणजे अंगी म्हणून अभिव्यक्त होणाऱ्या शृंगारातच ते वर्ज्य म्हणून सांगितले आहेत. नाहीतर ते दोष अनित्य असणारच नाहीत. याप्रमाणे हे असंलक्ष्यक्रमाने प्रकाशित होणारे ध्वनिकाव्याचे स्वरूप सर्वसाधारणपणे दाखवले. ॥ ११ ॥

लोचनम्

एवमस्मत्पक्ष एव गुणालङ्कारव्यवहारो विभागेनोपपन्नत इति प्रदर्श्य नित्यानित्यदोषविभागोऽप्यस्मत्पक्ष एव सङ्गच्छत इति दर्शयितुमाह – श्रुतिदुष्टादय इत्यादि । वान्तादयोऽसभ्यस्मृतिहेतवः श्रुतिदुष्टाः । अर्थदुष्टा वाक्यार्थबलादश्लीलार्थप्रतिपत्तिकारिणः । यथा – 'छिद्रान्वेषी महान् स्तब्धो घातायैवोपसर्पति' इति । कल्पनादुष्टास्तु द्वयोः पदयोः कल्पनया । यथा 'कुरु रुचिम्' इत्यत्र क्रमव्यत्यासे । श्रुतिकष्टस्तु अधाक्षीत् अक्षौत्सीत् तृणेढि इत्यादि । शृङ्गार इत्युचितरसोपलक्षणार्थम् । वीरशान्ताद्भुतादावपि तेषां वर्जनात् । सूचिता इति । न त्वेषां विषयविभागप्रदर्शनेनानित्यत्वं भिन्नवृत्तादिदोषेभ्यो विविक्तं प्रदर्शितम् । नापि गुणेभ्यो व्यतिरिक्तत्वम् । बीभत्सहास्यरौद्रादौ त्वेषामस्माभिरुपगमात् शृङ्गारादौ च वर्जनादनित्यत्वं च दोषत्वं च समर्थितमेवेति भावः ॥ ११ ॥

याप्रमाणे आमचे (म्हणजे) ध्वनिवाद्यांचे मत[1] मान्य केले, तरच गुण व अलंकार या संकल्पनांचा वेगवेगळ्या अर्थांनी होणारा वापर तर्कसंगत ठरतो, हे दाखविल्यानंतर दोषांचे 'नित्य' दोष व 'अनित्य' दोष असे जे वर्गीकरण केले जाते, त्याचीही आमच्याच पक्षी संगति लागते[2] हे, 'आणि श्रुतिदुष्टादि जे दोष...' इत्यादि कारिकेने दाखविले जात आहे. 'श्रुतिदुष्ट'[3] म्हणजे असभ्य गोष्टींची आठवण करून देणाऱ्या, 'वान्त' (निष्ठ्यूत, उद्‌गीर्ण) वगैरे शब्दांचा वापर. 'अर्थदुष्ट' म्हणजे वाक्याच्या अर्थाच्या सामर्थ्याने[4] जे अश्लील अर्थाचा बोध करून देतात, ते. जसे 'शत्रूंची छिद्रे शोधणारा, सामर्थ्यसंपन्न असणारा, स्थिर राहणारा म्हणजे न डगमगणारा असा राजा शत्रूचा नाश करण्यासाठीच (त्याच्यावर) चाल करून जात आहे'[5], हे उदाहरण. 'कल्पनादुष्ट' म्हणजे दोन पदांपैकी पहिल्याचे शेवटचे व दुसऱ्याचे पहिले अशी दोन अक्षरे मध्ये न थांबता जोडून उच्चारल्या-मुळे होणारी अश्लील अर्थाची स्मृति. जसे, कुरु रुचिम् या पदांचा क्रम उलटा केल्यास[6] (होणारी अश्लील अर्थाची स्मृति). 'श्रुतिकष्ट' दोषाची उदाहरणे म्हणजे अधाक्षीत्, अक्षौत्सीत्, तृणेढि[7] इ. शब्दांचा[8] वापर. 'शृंगार' हा शब्द तत्सम (म्हणजे ज्यामध्ये श्रुतिदुष्टादि दोष वर्ज्य केले पाहिजेत असे) रस यांचे उपलक्षण[9] समजावा, कारण वरील दोष वीर, शांत, अद्‌भुत[10] इत्यादींच्या बाबतीतही वर्ज्यच आहेत. 'सुचवले आहेत'[11] म्हणजे 'भिन्नवृत्त' इ. (नित्य) दोषांपेक्षा या दोषांचे क्षेत्र वेगळे दाखवून हे दोष अनित्य कसे हे त्यांनी सांगितलेले नाही. किंवा हे दोष गुणांहून भिन्न[12] कसे हेही त्यांनी स्पष्ट केले नाही. बीभत्स, हास्य, रौद्र इ. रसांमध्ये श्रुतिकष्ट इत्यादींचा उपयोग आम्ही स्वीकारार्ह मानीत असल्यामुळे (म्हणजे त्या रसांच्या बाबतीत श्रुतिकष्ट वगैरे शब्द हे दोष नव्हेत असे आमचे मत असल्यामुळे) आणि शृंगारादि रसांचे बाबतीत हे दोष वर्ज्य करावेत असे आम्ही मानीत असल्यामुळे ह्यांच्या ठिकाणचे अनित्यत्व आणि दोषत्व या दोहोंचेही (पूर्वाचार्यांनी सुचविलेल्या विभागणीमुळे) समर्थनच झाले, हा भावार्थ. ॥११॥

१. आमचे मत म्हणजे ६ व्या कारिकेत सांगितलेले, 'रसादि हा काव्याचा आत्मा, गुण हे त्या आत्म्याच्या ठिकाणी असणारे धर्म आणि अलंकार हे काव्यशरीराचा आश्रय करून त्याद्वारे रसादि आत्म्याला खुलविणारे, हा रसादि, गुण व अलंकार यांमधील विवेक.

२. पाहा, पृ. ३९८ वरील 'आणि गुण व अलंकार या संज्ञांचा उपयोग करणे, ...इ. एकदोन वाक्ये.

३. 'श्रुतिदुष्ट' वगैरे दोषांची लक्षणे व उदाहरणे भामहाने काव्यालंकार, परिच्छेद १ मधील ४७ ते ५३ या श्लोकांत दिली आहेत.

४. म्हणजे संपूर्ण वाक्याचा अर्थ कळल्यावर.

५. या वाक्यातून मागाहून ध्यानात येणारा अश्लील अर्थ मैथुनक्रियेला लागू पडणारा आहे.

६. म्हणजे कुरु रुचिम् या ऐवजी रुचिं कुरु अशा क्रमाने शब्द उच्चारल्यास 'चिकु' असा अश्लीलार्थबोधक शब्द तयार होतो. पाहा, काव्यप्रकाश, झळकीकर आवृत्ति, पृ. ३३३.

७. तृणेढि हे क्रियापद श्रीहर्षाने नैषधीयचरितम् ९-१५२ मध्ये वापरले आहे.

८. म्हणजे कर्णकटु वर्ण असलेल्या शब्दांचा उपयोग करणे.

९. 'उपलक्षण' या शब्दाचा अर्थ पूर्वी पृ. २५७ वरील २ ऱ्या व पृ. २९९ वरील १ ल्या टीपांत सांगितला आहेच.

१०. या संदर्भात अभिनवगुप्तांनी 'वीर' रसाचा उल्लेख केला आहे. त्या रसाचे बाबतीत 'श्रुतिदुष्ट' वगैरे दोष ठरतील, पण 'श्रुतिकष्ट' हा मात्र दोष न ठरता उलट गुणच ठरतो. 'अद्भुत इत्यादि' यांतील 'इत्यादि' शब्दामध्ये 'करुण' रस अंतर्भूत आहे.

११. कारिकेत दर्शिताः असा शब्द आहे. त्याचा अर्थ आनंदवर्धनांनी वृत्तीत सूचिताः असा सांगितला आहे. याचे कारण भामह, दण्डी, वामन व रुद्रट या पूर्वाचार्यांनी आपापल्या ग्रंथात काही दोष हे काही प्रसंगी दोष ठरत नाहीत व काही दोष हे कुठल्याही परिस्थितीत दोषच असतात असे म्हणून त्यांची उदाहरणेही दिली आहेत. यावरून काही दोष नित्य व काही अनित्य असतात याची त्यांची त्यांना जाणीव होती. पण दोषांचे नित्यानित्यत्व त्यांनी नित्य, अनित्य हे शब्द प्रत्यक्ष न वापरता सूचित केले आहे. अनित्य हा शब्द प्रत्यक्षपणे ध्वनिकारिकेतच वापरलेला दिसतो.

तस्याङ्गानां प्रभेदा ये प्रभेदाः स्वगताश्च ये ।
तेषामानन्त्यमन्योन्यसम्बन्धपरिकल्पने ॥ १२ ॥

अङ्गितया व्यङ्ग्यो रसादिर्विवक्षितान्यपरवाच्यस्य ध्वनेरेक आत्मा य उक्तस्तस्याङ्गानां वाच्यवाचकानुपातिनामलङ्काराणां ये प्रभेदा निरवधयो ये च स्वगतास्तस्याङ्गिनोऽर्थस्य रसभावतदाभासतत्प्रशमलक्षणा विभावानुभावव्यभिचारिप्रतिपादनसहिता अनन्ताः स्वाश्रयापेक्षया निःसीमानो विशेषास्तेषामन्योन्यसम्बन्धपरिकल्पने क्रियमाणे कस्यचिदन्यतमस्यापि रसस्य प्रकाराः परिसङ्ख्यातुं न शक्यन्ते किमुत सर्वेषाम् । तथा हि शृङ्गारस्याङ्गिनस्तावदाद्यौ द्वौ भेदौ – सम्भोगो विप्रलम्भश्च । सम्भोगस्य च परस्परप्रेमदर्शनसुरतविहरणादिलक्षणाः प्रकाराः । विप्रलम्भस्याप्यभिलाषेर्ष्याविरहप्रवासविप्रलम्भादयः । तेषां च प्रत्येकं विभावानुभावव्यभिचारिभेदः । तेषां च देशकालाद्याश्रयावस्थाभेद इति स्वगतभेदापेक्षयैकस्य तस्यापरिमेयत्वम्, किं पुनरङ्गप्रभेदकल्पनायाम् । ते ह्यङ्गप्रभेदाः प्रत्येकमङ्गिप्रभेदसम्बन्धपरिकल्पने क्रियमाणे सत्यानन्त्यमेवोपयान्ति ॥१२॥

ध्वन्यालोक

त्याच्या अंगांचे जे प्रकार किंवा त्याचे स्वतःचे जे प्रकार, त्यांची परस्परांशी ( होऊ शकणारी ) मिश्रणे विचारात घेतल्यास ते ( प्रकार ) असंख्य होतील. ॥१२॥

'अंगी' म्हणून व्यंग्य असलेला रसादि हा 'विवक्षितान्यपरवाच्य' ध्वनीचा एक प्रकार म्हणून सांगितला. त्याच्या अंगांचे म्हणजे वाच्य अर्थ व वाचक शब्द यांच्या अलंकारांचे असंख्य प्रकार आणि 'अंगी' असलेल्या ह्या व्यंग्यार्थाचे रस, भाव, त्यांचे आभास व भावप्रशमन या स्वरूपाचे प्रकार, त्यांच्या विभाव अनुभाव–व्यभिचारिभावांच्या प्रतिपादनासह अनंत होतील. त्यांचा ( म्हणजे स्थायी भावांचा ) आश्रय स्त्री की पुरुष या दृष्टीने ते आणखीच अगणित होतील, आणि त्यांची परस्परांशी होऊ शकणारी मिश्रणे विचारात घेतली, तर त्यांपैकी कोठल्याही एका रसाचे प्रकारदेखील मोजणे

अशक्य; मग सर्व रसांचे प्रकार कोठून मोजणार? उदा. प्रथम 'अंगी' असलेल्या शृंगाराचेच दोन प्रकार :– संभोग आणि विप्रलंभ. आणि संभोगाचे परस्परांकडे प्रेमदृष्टीने पाहणे, भोगविलास, उद्यानविहार इत्यादि स्वरूपाचे प्रकार. विप्रलंभाचे देखील अभिलाष, ईर्ष्या, विरह, प्रवास वगैरे. त्यांपैकी प्रत्येकाचे निरनिराळे विभाव, अनुभाव, व्यभिचारी, यांमुळे होणारे भेद आणि त्यांच्या निरनिराळे देश, काळ, इत्यादि कारणांमुळे होणाऱ्या अवस्थांचे प्रकार. अशा रीतीने केवळ त्याच्या (म्हणजे शृंगाराच्या) स्वतःच्याच प्रकारांचा विचार केल्यास ते अपरिमित होतील, तर मग अंगांच्या (अलंकारांच्या) प्रभेदांचा विचार केला, तर काय म्हणावे? कारण अंगांच्या (अलंकारांच्या) त्या प्रभेदांपैकी एकेक जर अंगीच्या एकेका प्रभेदाशी मिश्रित केला, तर ध्वनीचे प्रकार अगणितच होतील! ॥१२॥

लोचनम्

अङ्गानामित्यलङ्काराणाम्। स्वगता इति। आत्मगताः सम्भोगविप्रलम्भाद्याः, आत्मीयगता विभावादिगतास्तेषां लोष्टप्रस्तारेणाङ्गाङ्गिभावे का गणनेति भावः। स्वाश्रयः स्त्रीपुंसप्रकृत्यौचित्यादिः। परस्परं प्रेम्णा दर्शनमित्युपलक्षणं सम्भाषणादेरपि। सुरतं चातुःषष्टिकमालिङ्गनादि। विहरणमुद्यानगमनम्। आदिग्रहणेन जलक्रीडापानकचन्द्रोदयक्रीडादि। अभिलाषविप्रलम्भो द्वयोरप्यन्योन्यजीवितसर्वस्वाभिमानात्मिकायां रतावुत्पन्नायामपि कुतश्चिद्धेतोरप्राप्तसमागमत्वे मन्तव्यः। यथा 'सुखयतीति किमुच्यत' इत्यतः प्रभृति वत्सराजरत्नावल्योः, न तु पूर्वं रत्नावल्याः। तदा हि रत्यभावे कामावस्थामात्रं तत्। ईर्ष्याविप्रलम्भः प्रणयखण्डनादिना खण्डितया सह। विरहविप्रलम्भः पुनः खण्डितया प्रसाद्यमानयापि प्रसादमगृह्णत्या ततः पश्चात्तापपरीतत्वेन विरहोत्कण्ठितया सह मन्तव्यः। प्रवासविप्रलम्भः प्रोषितभर्तृकया सहेति विभागः। आदिग्रहणाच्छापादिकृतः। विप्रलम्भ इव च विप्रलम्भः। वञ्चनायां ह्यभिलषितो विषयो न लभ्यते; एवमत्र। तेषां चेति। एकत्र सम्भोगादीनामपरत्र विभावादीनाम्। आश्रयो मलयादिः मारुतादीनां विभावानामिति यदुच्यते तद्देशशब्देन गतार्थम्। तस्मादाश्रयः कारणम्। यथा ममैव–

दयितया ग्रथिता स्रगियं मया
हृदयधामनि नित्यनियोजिता ।
गलति शुष्कतयापि सुधारसं
विरहदाहरुजां परिहारकम् ।।

तस्येति शृङ्गारस्य । अङ्गिनां रसादीनां प्रभेदस्तत्सम्बन्धकल्पनेत्यर्थः ।। १२ ।।

लोचन

'अंगांचे म्हणजे अलंकारांचे. स्वगत म्हणजे आत्मगत. म्हणजे काव्याचा आत्मा असणाऱ्या त्या रसादींचे स्वतःचे संभोग, विप्रलंभ वगैरे आणि त्या आत्म्याशी संबद्ध असणाऱ्या विभाव वगैरेंचे जे अनेक प्रकार, त्यांच्या 'लोष्टप्रस्तार न्यायाने' होऊ शकणाऱ्या कित्येक अंगांगिसंबंधावर अवलंबून असण्यामुळे होणाऱ्या प्रकारांची मोजदाद करावी तेवढी थोडीच[२] हा आशय. त्या रसांचा—म्हणजे त्यांच्या स्थायिभावांचा—आश्रय असणाऱ्या स्त्री, पुरुष वगैरे पात्रांचे औचित्य वगैरे. (त्यांच्या दृष्टीने ते प्रकार आणखीच अगणित होतील). परस्परांकडे प्रेमदृष्टीने पाहणे हे संभाषण वगैरेंचेही उपलक्षण (म्हणजे बोधक) आहे. 'भोगविलास' हे आलिंगन इ. चौसष्ट प्रकारचे आहेत.[3] 'विहार' म्हणजे उद्यानामध्ये स्वैरसंचार करणे.' 'इत्यादी' मध्ये जलक्रीडा, मद्यपान, चांदण्यातील विहार इत्यादींचा समावेश होतो. दोघाही प्रेमिकांमध्ये आपण एकमेकांचे जीवितसर्वस्व आहोत असा अभिमान वाटणे हे प्रीतीचे स्वरूप होय. अशी प्रीति उत्पन्न झाली असतानाही कोणत्यातरी कारणाने त्या दोघांची भेट होत नसली तर ती अवस्था म्हणजे 'अभिलाष-विप्रलंभ' असे समजावे. जसे 'ही चित्रातील युवती मला सुख देते काय, हे तू मला काय विचारतोस?'[४] या वत्सराजाच्या उद्गारापासून पुढे[५] वत्सराज व रत्नावली या दोघांच्याही बाबतीत अभिलाषविप्रलंभ आहे. या उद्गाराच्या आधी मात्र रत्नावलीच्या बाबतीत अभिलाषविप्रलंभ आहे असे म्हणता येणार नाही कारण त्या आधी केवळ रत्नावलीच्याच मनात प्रीति होती, राजाच्या मनात तिजविषयी रति उत्पन्न झालेली

नव्हती, म्हणून तिच्या एकांगी प्रीतीला केवळ 'कामावस्था' म्हणता येईल.[६] प्रेमाचा अवमान झाल्यामुळे 'खंडिता'[७] नायिका व नायक यांमधील दुराव्याला ईर्ष्याविप्रलम्भ म्हणतात. आणि खंडित नायिकेची मनधरणी करूनही ती प्रथम प्रसन्न झालेली नसते, पण मागाहून तिला पश्चात्ताप होऊन ती विरहामुळे उत्कंठित झाली असताना तिच्या बाबतीतला प्रकार 'विरहविप्रलम्भ'[८] हा असतो असे समजावे. आणि जिचा पति दूर देशी गेला आहे अशा नायिकेच्या व नायकाच्या अवस्थेला 'प्रवास– विप्रलम्भ' म्हणावे. असा विप्रलम्भाच्या प्रकारांमधील भेद आहे.[९] (वृत्तीमधील) 'प्रवास वगैरे' यातील 'वगैरे' शब्दाने शाप इ. कारणामुळे होणाऱ्या वियोगाचाही अंतर्भाव झाला आहे. आणि विप्रलम्भासारखा म्हणजे वंचनेसारखा असतो म्हणून त्याला 'विप्रलम्भ' असे नाव दिले आहे. कारण वंचनेमध्ये ज्याप्रमाणे हवी असलेली वस्तु प्राप्त होत नाही, तसाच प्रकार विप्रलम्भातही असतो.[१०] 'आणि त्यांचे' म्हणजे एका बाजूला संभोगादि प्रकारांचे व दुसऱ्या बाजूला विभाव, अनुभाव इत्यादिकांचे (देशकालादिकांमुळे होणारे भेद). 'आश्रय' म्हणज वारा वगैरे विभावांचा मलयपर्वत वगैरेसारखा आश्रय असे जे कोणीतरी म्हटले आहे, ते बरोबर नाही, कारण 'देश' शब्दाने तो अर्थ आधीच सांगितला गेला आहे. म्हणून 'आश्रय' म्हणजे 'कारण' (असे मानावे). जसे माझ्याच पुढील श्लोकात—

'माझ्या प्रियेने गुंफलेली ही माळ मी माझ्या हृदयावर नेहमी ठेविल्याने माझ्या हृदयातील तापामुळे ती वाळून गेली, तरीही तीतून विरहतापामुळे होणाऱ्या पीडांना शमविणारा सुधारस स्रवत[११] आहे.'

'त्यांच्या' म्हणजे शृंगाराच्या. 'अंगी' असणाऱ्यांचे म्हणजे रसादींचे जे पोटभेद, त्यापैकी प्रत्येकाशी अंगांच्या एकेका पोटभेदाचे मिश्रण केल्यास, हा भावार्थ. ॥१२॥

टीपा

१. लोष्ट म्हणजे मातीचे ढेकूळ आणि प्रस्तार म्हणजे विस्तार म्हणजे (मातीची) निरनिराळी कार्ये. ज्याप्रमाणे माती ही एकच असून तीपासून बनणारे भांडी वगैरे असंख्य प्रकार असतात, त्याप्रमाणे रसादिध्वनीचे

अलंकार व विभावादिक यांच्या निरनिराळ्या मिश्रणांमुळे अनंत प्रकार होऊ शकतात हा भावार्थ. ' लोष्टप्रस्तारन्याय ' म्हणजे एकाच प्रकृतीपासून अगणित विकृति बनणे. (पाहा, पृ. ३५७, काशी आवृत्ति.)

२. उद्द्योत ३, ४४ मध्ये असाच विचार मांडला आहे.

३. हे चौसष्ट प्रकार वात्स्यायन, कामसूत्र २–२–५ मध्ये सांगितले आहेत.

४. हे वाक्य रत्नावली नाटिकेच्या दुसऱ्या अंकातील ९ व्या श्लोकाच्या (पाहा, पृ. ३४२ वरील ३५ वी टीप) लगेच आधी आले आहे.

५. येथपासून पुढे उदयन व रत्नावली या दोघांच्याही मनात रति उत्पन्न झालेली स्पष्ट दिसते, पण त्यांच्या समागमात पुष्कळच विघ्ने येत असल्याने त्यांच्या रतीला ' अभिलाष-विप्रलंभ–रति ' म्हणणे योग्य होईल.

६. प्रेम हे उभयनिष्ठ असेल, तेव्हाच त्याला ' रति ' म्हणावयाचे. मालविकाग्निमित्रात प्रेमिक हे ' समानुराग ' असले पाहिजेत असे म्हटले आहे (३–१५ ). विक्रमोर्वशीयातही **साधारणोऽयमुभयोः प्रणयः** असे पुरूरवा म्हणतो.

७. पाहा, पृ. ११२ वरील २ री टीप.

८. येथे विरह–विप्रलम्भ याचा अर्थ प्रणयकोपामुळे नायक व नायिका यांमध्ये उत्पन्न झालेला दुरावा.

९. तात्पर्य १) उभय प्रेमिकांना एकमेकांची प्राप्ति होण्यापूर्वी त्यांना एकमेकांबद्दल वाटणाऱ्या ओढीला अभिलाष–विप्रलम्भ म्हणावे. २) नायकाने दुसरीवर प्रेम करून नायिकेची वंचना केल्यामुळे तिला क्रोध येऊन होणाऱ्या दोघांच्या ताटातुटीला ईर्ष्याविप्रलम्भ म्हणावे. ३) नायिकेला ईर्ष्या वाटल्यामुळे प्रथम ती नायकावर रुष्ट होते, पण मागाहून तिला पश्चात्ताप झाल्यावरही ( पडते घेण्याइतकी मनाची तयारी न झाल्यामुळे ) उभयतांची भेट न होणे ही विरह–विप्रलम्भाची स्थिति होय. ४) पति प्रवासास गेला असता त्या वियोगामध्ये दोघांना एकमेकाबद्दल वाटणारी ओढ म्हणजे प्रवास–विप्रलम्भ.

कै. गडकऱ्यांनी ' भावबंधन ' नाटकात महेश्वराच्या तोंडी विरहाचे सहा प्रकार घातले आहेत. विप्रलंभाच्या वरील प्रकारांवरून त्यांनी विरहाच्या त्या प्रकारांना गमतीदार स्वरूप दिले असल्यास न कळे !

१०. विप्रलंभ म्हणजे वंचना म्हणजे इष्टवस्तूच्या प्राप्तीपासून वंचित होणे. त्या अवस्थेप्रमाणेच येथेही दोघांना कोणत्याही कारणाने का होईना, पण एकमेकांची भेट होत नाही, म्हणून या अवस्थेला ' विप्रलंभ ' म्हटले आहे.

११. या पद्यात ' आश्रय ' हा शब्दच आढळत नाही, मग तो ' कारण ' या अर्थी वापरला असण्याचा प्रश्न दूरच. पुष्पमाला हे प्रस्तुत प्रसंगी विरहवेदना शांत

करण्याचे कारण आहे, कारण ती पुष्पमाला, नायकाच्या प्रियेने गुंफलेली असणे या धर्माचा 'आश्रय' आहे. ती त्या धर्माचा 'आश्रय' असल्यामुळे वेदनाशमनाचे 'कारण' झाली आहे, म्हणून जो आश्रय तेच कारण असा काहीतरी अभिनवगुप्तांच्या मनातील अभिप्राय असावा.

ध्वन्यालोकः

दिङ्मात्रं तूच्यते येन व्युत्पन्नानां सचेतसाम्
बुद्धिरासादितालोका सर्वत्रैव भविष्यति ॥ १३ ॥

दिङ्मात्रकथनेन हि व्युत्पन्नानां सहृदयानामेकत्रापि रसभेदे सहालङ्कारैरङ्गाङ्गिभावपरिज्ञानादासादितालोका बुद्धिः सर्वत्रैव भविष्यति ।

ध्वन्यालोक

तरी पण येथे याबाबत आम्ही थोडेसे दिग्दर्शन करितो; कारण, त्यामुळे विद्वान् सहृदयांच्या बुद्धीला सगळ्याच रसांच्या बाबतीत उमज पडेल.॥ १३ ॥

कारण थोडेसे दिग्दर्शन जरी केले, तरी रसांपैकी एकाच्या बाबतीत, अलंकारांचा त्याच्याशी असलेला अंग–अंगि–संबंध जाणत्या सहृदयांना कळेल, आणि त्यामुळे सर्वच रसादींच्या बाबतीत अलंकारांचा त्यांच्यांशी अंग–अंगिभाव कसा होऊ शकतो, हे समजण्याची पात्रता त्यांना प्राप्त होईल.

लोचनम्

येनेति । दिङ्मात्रोक्तेनेत्यर्थः । सचेतसामिति । महाकवित्वं सहृदयत्वं च प्रेप्सूनामिति भावः । सर्वत्रेति । सर्वेषु रसादिष्वासादित आलोकोऽवगमः सम्यग्व्युत्पत्तिर्ययेति सम्बन्धः ॥ १३ ॥

लोचन

'त्यामुळे' म्हणजे केवळ दिग्दर्शन केल्यामुळे. सहृदयांच्या म्हणजे महाकवीची व सहृदयाची योग्यता मिळवू इच्छिणाऱ्यांच्या, असा अर्थ. सर्वत्र म्हणजे सर्व रसभावादिकांच्या बाबतीत मिळविला आहे 'आलोक' म्हणजे 'ज्ञान' म्हणजे उत्तम प्रकारचा 'उमज' जिने अशी बुद्धि, असा अन्वय ( व अर्थ ) करावा. ॥ १३ ॥

ध्वन्यालोकः

तत्र—

शृङ्गारस्याङ्गिनो यत्नादेकरूपानुबन्धवान् ।
सर्वेष्वेव प्रभेदेषु नानुप्रासः प्रकाशकः ॥१४॥

अङ्गिनो हि शृङ्गारस्य ये उक्ताः प्रभेदास्तेषु सर्वेष्वेकप्रकारानुबन्धितया प्रबन्धेन प्रवृत्तोऽनुप्रासो न व्यञ्जकः । अङ्गिन इत्यनेनाङ्गभूतस्य शृङ्गारस्यैकरूपानुबन्ध्यनुप्रासनिबन्धने कामचारमाह ॥१४॥

ध्वन्यालोक

तेव्हा —

शृंगाररस अंगी असताना, एकाच, म्हणजे त्याच त्या वर्णांचा अनुप्रास रचण्यास प्रयास पडत असल्याने असा अनुप्रास त्या रसाच्या कोणत्याही प्रकाराची अभिव्यक्ति करू शकत नाही. ॥ १४ ॥

कारण शृंगार अंगी असताना त्याचे जे प्रकार सांगितले, त्यांपैकी कोणत्याही प्रकारात एकच एक तऱ्हेचा अनुप्रास सतत रचून घातला, तर तो त्या रसाची अभिव्यक्ति करू शकत नाही. 'अंगी' असे विशेषण वापरण्याचा हेतु इतकाच की, तो शृंगार अंगभूत असेल तेव्हा एकाच स्वरूपाचा अनुप्रास वापरला तरी चालेल.

लोचनम्

तच्चेति । वक्तव्ये दिङ्मात्रे सतीत्यर्थः । यत्नादिति । यत्नतः क्रियमाणत्वादिति हेत्वर्थोऽभिप्रेतः । एकरूपं त्वनुबन्धं त्यक्त्वा विचित्रोऽनुप्रासो निबध्यमानो न दोषायेत्येकरूपग्रहणम् ॥ १४ ॥

लोचन

'तेव्हा' याचा 'केवळ दिग्दर्शन करण्याचा प्रसंग आला असताना' हा अर्थ. 'प्रयास पडत असल्याने' म्हणजे तशा तऱ्हेचा अनुप्रास जमविणे कष्टाचे असल्यामुळे, अशी हेत्वर्थक पंचमी विभक्ति येथे विवक्षित आहे. त्याच त्या वर्णांचा अनुप्रास न वापरता निरनिराळ्या वर्णांच्या अनुप्रासाची योजना केल्यास ती दोषास्पद ठरत नाही, हे

सुचविण्यासाठी कारिकेत ' त्याच त्या वर्णांचा ' असे शब्द घातले आहेत. ॥ १४ ॥

टीपा

१. म्हणजे त्याच त्या वर्णांचा किंवा वर्णसमूहाचा पुन्हा पुन्हा केलेला वापर

ध्वन्यालोकः

ध्वन्यात्मभूते शृङ्गारे यमकादिनिबन्धनम् ।
शक्तावपि प्रमादित्वं विप्रलम्भे विशेषतः ॥ १५ ॥

ध्वनेरात्मभूतः शृङ्गारस्तात्पर्येण वाच्यवाचकाभ्यां प्रकाश्यमानस्तस्मिन्यमकादीनां यमकप्रकाराणां निबन्धनं दुष्करशब्दभङ्गश्लेषादीनां शक्तावपि प्रमादित्वम् । ' प्रमादित्व ' मित्यनेनैतद्दर्श्यते– काकतालीयेन कदाचित्कस्यचिदेकस्य यमकादेर्निष्पत्तावपि भूम्नालङ्कारान्तरवद्रसाङ्गत्वेन निबन्धो न कर्तव्य इति । ' विप्रलम्भे विशेषत ' इत्यनेन विप्रलम्भे सौकुमार्यातिशयः ख्याप्यते । तस्मिन्द्योत्ये यमकादेरङ्गस्य निबन्धो नियमान्न कर्तव्य इति ॥ १५ ॥

ध्वन्यालोक

शृंगाररस हा ध्वनिकाव्यात प्रधानभूत असताना कवीमध्ये यमकादि अलंकारांची रचना करण्याचे सामर्थ्य असले, तरी ते अलंकार वापरणे चुकीचेच होय. त्यातही विप्रलंभ शृंगार अंगी असताना यमकादींचा वापर अधिकच दोषास्पद. ॥ १५ ॥

शृंगार हा ध्वनीचा आत्मा असताना म्हणजे वाच्यार्थ आणि वाचक शब्द यांकडून प्रधान म्हणून अभिव्यक्त केला जात असताना त्या काव्यात यमकादींचा म्हणजे यमक – प्रकारांचा तसेच जुळवायला कठीण अशा शब्द– चमत्कृति, उदा. सभंगश्लेष इत्यादींचा उपयोग करणे हे, तसे सामर्थ्य असले, तरी चुकीचेचे होय. ' चुकीचेच ' या शब्दाने असे दाखवावयाचे आहे की, काकतालीय न्यायाने एखादे वेळेस एखादे यमक सहज जुळले, तरी मोठ्या प्रमाणावर इतर अलंकारांप्रमाणे त्याचा रसाचे अंग म्हणून समावेश करू नये. ' विशेषतः विप्रलंभ शृंगार अंगी असताना ' असे म्हणण्याचे कारण, विप्रलंभ

कमालीचा नाजूक आहे, हे सांगायचे आहे. तो विप्रलम्भ अभिव्यक्त करावयाचा असल्यास यमकादींचा वापर करून नये, हा नियम. ॥ १५ ॥

लोचनम्

यमकादीत्यादिशब्दः प्रकारवाची । दुष्करं मुरजचक्रबन्धादि । शब्दभङ्गश्लेष इति । अर्थश्लेषो न दोषाय 'रक्तस्त्वम्' इत्यादौ । शब्दभङ्गोऽपि क्लिष्ट एव दुष्ट, न त्वशोकादौ ॥१५॥

लोचन

'यमकादि' यातल्या 'आदि' शब्दाचा अर्थ 'सदृश'.[१] (वृत्तीतल्या) 'जुळवावयास कठीण' रचनांची उदाहरणे म्हणजे मुरजबंध, चक्रबंध[२], वगैरे. सभंगश्लेष[३], – अर्थश्लेष हा दोषाला कारणीभूत होत नाही,[४] जसे 'तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे'[५], इ. उदाहरणात. शब्दभंग म्हणजे सभंगश्लेषसुद्धा क्लिष्ट असला, तरच दोषास्पद असतो, पण (त्याच[६] उदाहरणातील) 'अशोक', 'सशोक' यासारख्या शब्दप्रयोगांमध्ये (तो दोषास्पद नसतो[७]). ॥ १५ ॥

टीपा

१. तेव्हा 'यमकादि' म्हणजे यमकासारखे. जुळविण्यास कठीण असे शब्दालंकार.
२. मुरजबंध, चक्रबंध, बक्रबंध, वगैरे 'चित्र' रचनांची माहिती काव्यप्रकाश, उल्लास, ९ व साहित्यदर्पण, परिच्छेद १० मध्ये दिलेली आहे.
३. एकाच वर्णसमुदायाचे दोन निरनिराळ्या तऱ्हांनी विश्लेषण केल्याने जेथे दोन स्वतंत्र अर्थ प्रकट होतात, तो सभंग–श्लेष (शब्दभंगश्लेष) समजावा.
४. सभंगश्लेष हा क्लिष्ट असल्यामुळे जरी दोषास्पद असला, तरी अर्थश्लेष हा क्लिष्ट नसल्यामुळे दोषास्पद ठरत नाही.
५. 'तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे' हा श्लोक पुढे कारिका १९ नंतरच्या वृत्तीत आला आहे.
६. त्याच म्हणजे 'तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे'... या.
७. मराठीमधील 'औषध नलगे मजला' हे सभंगश्लेषाचे सुप्रसिद्ध उदाहरण मुळीच क्लिष्ट नसल्याने ते दोषास्पद नाही.

अत्र युक्तिरभिधीयते—

रसाक्षिप्ततया यस्य बन्धः शक्यक्रियो भवेत्।
अपृथग्यत्ननिर्वर्त्यः सोऽलङ्कारो ध्वनौ मतः ॥ १६ ॥

निष्पत्तावाश्चर्यभूतोऽपि यस्यालङ्कारस्य रसाक्षिप्ततयैव बन्धः शक्यक्रियो भवेत्सोऽस्मिन्नलक्ष्यक्रमव्यङ्ग्ये ध्वनावलङ्कारो मतः। तस्यैव रसाङ्गत्वं मुख्यमित्यर्थः।

यथा--

कपोले पत्त्राली करतलनिरोधेन मृदिता।
निपीतो निःश्वासैरयममृतहृद्योऽधररसः।
मुहुः कण्ठे लग्नस्तरलयति बाष्पः स्तनतटीं।
प्रियो मन्युर्जातस्तव निरनुरोधे न तु वयम्॥



या बाबतीत दण्डक असा—

कवीचे लक्ष रसनिष्पत्ति करण्यावर[1] केंद्रित झाले असताना जो (अलंकार) वेगळा प्रयत्न करावा न लागता सहजपणे गुंफणे शक्य होईल, तोच ध्वनिकाव्यामध्ये 'अलंकार' या संज्ञेस पात्र मानला आहे. ॥ १६ ॥

याची निष्पत्ति कशी झाली याचे (खुद्द कवीलाच मागाहून) आश्चर्य वाटले, तरी जो अलंकार रसपरिपोष करीत असतानाच समाविष्ट करणे शक्य होईल, तो या अलक्ष्यक्रमव्यंग्य ध्वनिकाव्यामध्ये 'अलंकार' म्हणून मानला आहे; म्हणजे तोच खरोखर रसाचे अंग (म्हणजे रसाभिव्यक्तीस उपकारक) ठरतो, हा आशय. जसे—

"गालावर[2] काढलेल्या लतापल्लवांच्या आकृती तळहाताचा दाब दिल्याने पुसट झाल्या आहेत. अधरातला अमृतमधुर रस हा निःश्वासांनी पार पिऊन टाकला आहे. पुनः पुनः गळ्याला बिलगणाऱ्या हुंदक्यांमुळे वक्षःस्थल वरखाली होत आहे. अग निर्दये, राग तुझा प्रियकर झाला; मी मात्र नाही."[3]

लोचनम्

युक्तिरिति । सर्वव्यापकं वस्त्वित्यर्थः । रसेति । रससमवधानेन विभावादिघटनामेव कुर्वंस्तन्नान्तरीयकतया यमासादयति स एवात्रालङ्कारो रसमार्गे, नान्यः । तेन वीराद्भुतादिरसेष्वपि यमकादि कवेः प्रतिपत्तुश्च रसविघ्नकार्येव सर्वत्र । गड्डुरिकाप्रवाहोपहतसहृदयधुराधिरोहणविहीनलोकावर्जनाभिप्रायेण तु मया शृङ्गारे विप्रलम्भे च विशेषत इत्युक्तमिति भावः । तथा च 'रसेऽङ्गत्वं तस्मादेषां न विद्यते' इति सामान्येन वक्ष्यति । निष्पत्ताविति । प्रतिभानुग्रहात्स्वयमेव सम्पत्तौ निष्पादनानपेक्षायामित्यर्थः । आश्चर्यभूत इति । कथमेष निबद्ध इत्यद्भुतस्थानम् । करकिसलयन्यस्तवदना श्वासतान्ताधरा प्रवर्तमानबाष्पभरनिरुद्धकण्ठी अविच्छिन्नरुदितचञ्चत्कुचतटा रोषमपरित्यजन्ती चाटूक्त्या यावत्प्रसाद्यते तावदीर्ष्याविप्रलम्भगतानुभावचर्वणावहितचेतस एव वक्तुः श्लेषरूपकव्यतिरेकाद्या अयत्ननिष्पन्नाश्चर्वयितुरपि न रसचर्वणाविघ्नमादधतीति ।

लोचन

'दण्डक' म्हणजे 'सर्वच (रसप्रधान) काव्यांच्या बाबतीत उपयोगी पडणारा नियम' असा अर्थ. 'रसनिष्पत्ति'– रसपरिपोष हेच एकमेव उद्दिष्ट ठेवून विभाव वगैरेंची जुळणी करीत असतानाच ते उद्दिष्ट ठेवण्याचा परिणाम म्हणूनच सहजपणे जो अलंकार कवीच्या हाताला लागतो, तोच रसपरिपोषाच्या संदर्भात खराखुरा अलंकार होतो. दुसरा कोणताही होत नाही. असे असल्यामुळे वीर, अद्भुत यांसारख्या रसांचे बाबतीतही यमकासारख्या (दुष्कर) रचनांचा वापर कवीच्या[४] व वाचकाच्या दृष्टीने सगळीकडे रसहानिकारकच होतो. गतानुगतिक[५] झाल्यामुळे ज्यांची विचारशक्ति नष्ट झाली आहे व जे सहृदयांच्या योग्यतेने संपन्न होऊ शकत नाहीत अशा लोकांची समजूत पटविण्याकरिताच[६] मी आधी ( म्हणजे १५ वी कारिका लिहिताना ) 'शृंगार व त्यातही विप्रलंभ शृंगार अंगी असताना' इतकेच म्हटले, असा भावार्थ. आणि असे असल्यामुळेच दुसऱ्या उद्द्योतात (पृ. ४३३ वर) 'म्हणून हे ( यमकादि अलंकार ) रसाला उपकारक होऊ शकत

नाहीत ' असे वृत्तिकार सर्वसाधारणपणे म्हणणार आहेत. 'याची निष्पत्ति (कशी झाली)' इ.– प्रतिभेच्या कृपेने तो अलंकार आपोआप सिद्ध झाल्यामुळे तो निष्पन्न करण्यासाठी खटपट करण्याची गरज नाही हा आशय. 'आश्चर्य वाटले '– हा अलंकार कसा 'साधला गेला ' हे आश्चर्याचे कारण. आपल्या पल्लवांसारख्या कोमल तळहातावर जिने आपले मुख टेकले आहे, जिचा अधर उष्ण निःश्वासांमुळे सुकून गेला आहे, येणाऱ्या हुंदक्यांच्या आवेगामुळे जिचा कंठ दाटून आला आहे, सतत रडून रडून जिचा ऊर वरखाली होत आहे आणि नायकावरील आपला कोप जी सोडून देण्यास तयार नाही अशा नायिकेची खुशामत करून नायक तिची मनधरणी करीत आहे. अशा वेळी ईर्ष्याविप्रलंभा-मुळे नायिकेच्या ठिकाणी प्रकट होणाऱ्या अनुभावांचा आस्वाद घेण्यात मन गुंतले असतानाच नायकाच्या बोलण्यात श्लेष, रूपक, व्यतिरेक वगैरे अलंकार अनायासे योजिले गेल्याने ते अलंकार रसिकाला होणाऱ्या रसास्वादातसुद्धा मुळीच अडथळा उत्पन्न करीत नाहीत.

टीपा

१. म्हणजे रसानुकूल विभावादिकांचे प्रतिपादन करण्यावर.
२. अमरुशतक–८१.
३. आपला कोप न आवरणाऱ्या नायिकेला प्रसन्न करीत असतानाच ईर्ष्या-विप्रलंभामुळे तिच्या ठिकाणी दिसणाऱ्या अनुभावांकडे, म्हणजे परिणामांकडे त्याचे वारंवार लक्ष वेधले जाऊन त्याच्या बोलण्यातून श्लेष, रूपक, व्यतिरेक वगैरे अलंकार आपोआप निष्पन्न झाले आहेत. ' अधररस पिऊन टाकला,' ' गळ्याला बिलगणारा,' वगैरे शब्दांत श्लेष आहे. ' राग हाच प्रियकर ' हे रूपक व ' माझ्यावर त्या कोपाने मात केली,' हा व्यतिरेक.
४. ' कवीच्या ' या शब्दप्रयोगावरून कवीलाही रसास्वाद मिळतो असे अभिनव-गुप्तांचे मत असावेसे दिसते. हे त्यांचे मत विचारणीय आहे.
५. मुळात गड्डुरिकाप्रवाहोपहत असा शब्द आहे. काव्यप्रकाशाच्या ८ व्या उल्लासातही गड्डुरिकाप्रवाह असा शब्दप्रयोग केलेला आहे. ' गड्डुरिका ' म्हणजे मेंढी. पुढची मेंढी काही कारणाने खड्ड्यात पडली तर तिच्या मागून येणाऱ्या मेंढ्याही अंधानुकरणामुळे खड्ड्यात पडतात. याचेच ' गतानुगति-कत्व ' हे तात्पर्य.
६. कोणत्याही रसाच्या बाबतीत यमकादि रचना विघातकच होते असे सरळ

म्हटले असते, तर सामान्य लोकांना ते एकदम पटणे कठीण झाले असते; पण ते त्यांच्या लवकर गळी उतरावे म्हणून ज्या रसांना यमकादि रचना सर्वांत जास्त प्रतिकूल असते तेच, म्हणजे शृंगार व त्यातल्या त्यात विप्रलंभ शृंगार हे रस प्रथम उदाहरणादाखल घेतले.

ध्वन्यालोकः

रसाङ्गत्वे च तस्य लक्षणमपृथग्यत्ननिर्वर्त्यमिति यो रसं बन्धुमध्यवसितस्य कवेरलङ्कारस्तां वासनामत्यूह्य यत्नान्तरमास्थितस्य निष्पद्यते स न रसाङ्गमिति । यमके च प्रबन्धेन बुद्धिपूर्वकं क्रियमाणे नियमेनैव यत्नान्तरपरिग्रह आपतति शब्दविशेषान्वेषणरूपः ।

अलङ्कारान्तरेष्वपि तत्तुल्यमिति चेत्, नैवम्; अलङ्कारान्तराणि हि निरूप्यमाणदुर्घटनान्यपि रससमाहितचेतसः प्रतिभानवतः कवेरहंपूर्विकया परापतन्ति । यथा कादम्बर्यां कादम्बरीदर्शनावसरे । यथा च मायारामशिरोदर्शनेन विह्वलायां सीतादेव्यां सेतौ । युक्तं चैतत् । यतो रसा वाच्यविशेषैरेवाक्षेप्तव्याः । तत्प्रतिपादकैश्च शब्दैः । तत्प्रकाशिनो वाच्यविशेषा एव रूपकादयोऽलङ्काराः । तस्मान्न तेषां बहिरङ्गत्वं रसाभिव्यक्तौ । यमकदुष्करमार्गेषु तु तत्स्थितमेव । यत्तु रसवन्ति कानिचिद्यमकादीनि दृश्यन्ते, तत्र रसादीनामङ्गता यमकादीनां त्वङ्गितैव । रसाभासे चाङ्गत्वमप्यविरुद्धम् । अङ्गितया तु व्यङ्ग्ये रसे नाङ्गत्वं पृथक्प्रयत्ननिर्वर्त्यत्वाद्यमकादेः ।

अस्यैवार्थस्य संग्रहश्लोकाः –

रसवन्ति हि वस्तूनि सालङ्काराणि कानिचित् ।<br>
एकेनैव प्रयत्नेन निर्वर्त्यन्ते महाकवेः ॥<br>
यमकादिनिबन्धे तु पृथग्यत्नोऽस्य जायते ।<br>
शक्तस्यापि रसेऽङ्गत्वं तस्मादेषां न विद्यते ॥<br>
रसाभासाङ्गभावस्तु यमकादेर्न वार्यते ।<br>
ध्वन्यात्मभूते शृङ्गारे त्वङ्गता नोपपद्यते ॥

ध्वन्यालोक

तो अलंकार रसाचे अंग होण्यासाठी वेगळा प्रयत्न करावा न लागता तो

निष्पन्न झाला पाहिजे, असे त्या अलंकाराचे सर्वसामान्यपणे लक्षण होय. म्हणून रसनिष्पत्ति करण्याचे ठरवलेल्या कवीच्या त्या प्रवृत्तीला बाजूस सारून त्याला वेगळा यत्न करावा लागून जो अलंकार निष्पन्न होतो, तो रसाला अंगभूत म्हणजे उपकारक होत नाही ( हे स्पष्टच झाले ). पण यमक ज्या वेळी बुद्धि-पुरस्सर रचले जाते, त्या वेळी त्याच्यासाठी विशिष्ट शब्द शोधीत बसण्याचा खास प्रयत्न करणे हटकून भाग पडते.

यावर ' मग, इतर अलंकारांच्या बाबतीतही तसेच आहे ' अशी शंका घेऊ नये. कारण, दुसरे अलंकार सहृदर्शनी घडवायला कठीण वाटले, तरी रस, भाव, यांवरच लक्ष केंद्रित करणाऱ्या प्रतिभावान् कवीपुढे ते अहमहमिकेने गर्दी करतात. जसे ' कादंबरी 'मध्ये चन्द्रापीडाला कादंबरीचे प्रथम दर्शन होते, त्या वेळी[1] आणि ' सेतुबंध ' काव्यात मायेने निर्माण केलेले रामाचे शिर पाहून सीता विह्वल होते, त्या प्रसंगी.[2] आणि असे होणे स्वाभाविकच आहे. कारण, रस हे विशिष्ट प्रकारच्या वाच्यार्थांनी आणि त्या अर्थांच्या वाचक असणाऱ्या शब्दांनीच व्यक्त करावयाचे असतात. आणि रूपकादि अलंकार म्हणजे रसांची अभिव्यक्ति करणारे विशेष प्रकारचे वाच्यार्थच ! म्हणून रसाभि-व्यक्ति करण्याचे बाबतीत ते ' बाह्य ' म्हणजे रसाभिव्यक्तीशी संबंध नसलेले नव्हेत. पण यमकासारख्या दुर्घट रचनांच्या बाबतीत हे बाह्य असणे येणारच. आता काही यमक वगैरे शब्दालंकारसुद्धा रसयुक्त असलेले दिसतात,[3] त्या ठिकाणी यमक वगैरे प्रधानच होतात व रसादींच्या पदरी गौणता येते. रसाभासाच्या बाबतीत मात्र यमक वगैरे त्या रसाभासाची अंगे होण्यालाही अडचण नाही. पण रस जेव्हा अंगित्वाने व्यंग्य असेल, तेव्हा यमक वगैरे अंगभूत होऊ शकत नाहीत, कारण यमकादि रचण्यास खास, वेगळा प्रयत्न करावा लागतो.

हाच अर्थ थोडक्यात पुढीलप्रमाणे सांगता येईल– अलंकारयुक्त असलेली काही रसाळ काव्ये महाकवीच्या एकाच प्रयत्नाने रचली जातात.

पण यमकादींची रचना करण्यात त्याला वेगळा प्रयत्न खर्ची पडतो व म्हणून तो यमकादि रचण्यास समर्थ असला, तरी ती यमके वगैरे रसाला अंगभूत होत नाहीत.

मात्र यमकादि हे रसाभासाची अंगे होण्याची शक्यता बाजूला सारता

येत नाही. पण शृंगारप्रधान ध्वनिकाव्यात यमकादींच्या ठिकाणी रसाचे अंगत्व ( रसाला उपकारकत्व ) असण्याचे समर्थन करिता येत नाही.

लोचनम्

लक्षणमिति व्यापकमित्यर्थः । 'प्रबन्धेन क्रियमाण' इति संबन्धः । अत एव बुद्धिपूर्वकत्वमवश्यंभावीति बुद्धिपूर्वकशब्द उपात्त : । रससमव-धानादन्यो यत्नो यत्नान्तरम् । निरूप्यमाणानि सन्ति दुर्घटनानि । बुद्धिपूर्वं चिकीर्षितान्यपि कर्तुमशक्यानीत्यर्थः । तथा निरूप्यमाणे दुर्घट-नानि कथमेतानि रचितानीत्येवं विस्मयावहानीत्यर्थः । अहं पूर्वः अन्य इत्यर्थः । अहमादावहमादौ प्रवर्ते इत्यर्थः । अहं पूर्वं इत्यस्य भावोऽहं-पूर्विका । अहमिति निपातो विभक्तिप्रतिरूपकोऽस्मदर्थवृत्तिः ।

एतदिति । अहंपूर्विकया परापतनदित्यर्थः । कानिचिदिति । कालि-दासदिकृतानीत्यर्थः । शक्तस्यापि पृथग्यत्नो जायते इति सम्बन्धः । एषा-मिति यमकादीनाम् । ध्वन्यात्मभूते शृङ्गारे इति यदुक्तं तत्प्राधान्येनार्ध-श्लोकेन सङ्गृह्णीते ध्वन्यात्मभूत इति ॥ १६ ॥

लोचन

'लक्षण' म्हणजे सर्व उदाहरणांना व्यापणारा[४] ( 'वेगळ्या प्रयत्नाशिवाय निष्पन्न होणे' हा ) धर्म. 'प्रातल्याने' याचा 'रचले जाते' याच्याशी अन्वय करावा. यामुळेच यमकाची रचना बुद्धिपुर-स्सर केली जाणे अपरिहार्य आहे, म्हणून वृत्तीत 'बुद्धिपुरस्सर' असा शब्द वापरला आहे. 'वेगळा यत्न' म्हणजे रसपरिपोषावर लक्ष केंद्रित करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या यत्नाहून वेगळा यत्न. 'जे अलंकार रचावयाचे योजिले, तर रचावयास कठीण असतात,' हा **निरूप्यमाणदुर्घटनानि** हा समास सोडविण्याचा एक प्रकार. म्हणजे ते अलंकार जाणूनबुजून रचावे अशी कवीची इच्छा असली तरी ते रचणे अशक्य असते, असा अर्थ. त्याचप्रमाणे त्या अलंकारांकडे नजर टाक-ल्यास ते रचणे कठीण आहे असे वाटते. म्हणजे हे दुर्घट अलंकार कसे रचले गेले या विचाराने ते कवीला ( आणि सहृदयाला ) आश्चर्य-चकित करून सोडतात, हा आशय. मी आधी म्हणजे पहिला. 'मी

आधी, मी आधी (कवीकडे) जातो' असे म्हणण्याची अवस्था म्हणज् 'अहंपूर्विका.'[5] 'अहम्' हे अव्यय विभक्त्यन्त पदासारखे असून त्याचा अर्थ 'मी' असा आहे. 'असे होणे' म्हणजे अहमहमिकेने पुढे येऊन उभे राहणे असा अर्थ. 'काही' म्हणजे कालिदास वगैरेंनी[6] वापरलेले असा अभिप्राय. कवि ते दुष्कर अलंकार रचावयास समर्थ असला, तरी त्याला वेगळा यत्न करावा लागतो, असा अन्वय करावा.[7] 'ती' म्हणजे यमके वगैरे. (पंधराव्या कारिकेत) 'शृंगार रस हा ध्वनि-काव्यात प्रधान असताना' इ. जे म्हटले आहे, ते फार महत्त्वाचे असल्याने वृत्तिकार त्याचा संक्षेप 'शृंगारप्रधान ध्वनिकाव्याच्या,' या संग्रह-श्लोकाच्या उत्तरार्धात करितात. ॥ १६ ॥



टीपा

१. पीटरसनची आवृत्ति, पृ. १८६ पासून पुढे.
२. सेतुबंध, उच्छ्वास ११, श्लोक ५२ पासून पुढे.
३. उदाहरणार्थ, कालिदासाच्या रघुवंशाच्या ९ व्या सर्गात रस असूनही त्या सर्गाच्या पहिल्या कित्येक श्लोकांत यमके भरलेली आहेत. उदा. 'यमवतां-अवतां च धुरि स्थितः।', 'अमरलेऽमरतेजसि पार्थिवे।', तिलकजालक-जालकमौक्तिकैः।' वगैरे.
४. पाहा, पृ. ४२९ वरील 'दण्डक म्हणजे सर्वच काव्यांच्या बाबतीत उपयोगी पडणारा नियम' हे वाक्य.
५. अमरकोशावरील क्षीरस्वामींच्या टीकेमध्ये अहंपूर्व या शब्दाला इक हा मत्वर्थी तद्धित प्रत्यय (अत इनिठनौ। ५-२-११५ या पाणिनिसूत्राने) लागून अहंपूर्विक असा शब्द बनला आहे, असे म्हटले आहे व 'मी आधी, मी आधी' असे प्रत्येकजण ज्या क्रियेमध्ये म्हणतो, ती क्रिया (म्हणजे स्पर्धा) असा त्या शब्दाचा अर्थ सांगितला आहे. अहंपूर्विक हे 'क्रिया' याचे विशेषण म्हणून त्याचे अहंपूर्विका असे स्त्रीलिंगी रूप झाले आहे.
६. वगैरे म्हणजे उदा. माघ. त्याने शिशुपालवधाच्या ६ व्या सर्गात यमक अलंकार सढळ हाताने वापरला आहे.
७. हे विधान वृत्तीतील संग्रह-श्लोक २ याला अनुलक्षून आहे.

ध्वन्यालोकः

इदानीं ध्वन्यात्मभूतस्य शृङ्गारस्य व्यञ्जकोऽलङ्कारवर्ग आख्यायते—

ध्वन्यात्मभूते शृङ्गारे समीक्ष्य विनिवेशितः ।
रूपकादिरलङ्कारवर्ग एति यथार्थताम् ॥ १७ ॥

अलङ्कारो हि बाह्यालङ्कारसाम्यादङ्गिनश्चारुत्वहेतुरुच्यते । वाच्यालङ्कारवर्गश्च रूपकादिर्यावानुक्तो, वक्ष्यते च कैश्चित्, अलङ्काराणामनन्तत्वात् । स सर्वोऽपि यदि समीक्ष्य विनिवेश्यते तदलक्ष्यक्रमव्यङ्ग्यस्य ध्वनेरङ्गिनः सर्वस्यैव चारुत्वहेतुर्निष्पद्यते ॥ १७ ॥

ध्वन्यालोक

आता ध्वनिकाव्यात शृंगाररस प्रधान असताना, कोणते अलंकार त्याचे व्यंजक म्हणजे त्याला उपकारक होतात, ते सांगण्यात येत आहे-

शृंगाररस हा ध्वनिकाव्यात प्रधान असताना रूपकादि अलंकारांची योजना जर नीट विवेक करून केली, तर ते अलंकार आपले 'अलंकार' हे नाव सार्थ करितात. ॥ १७ ॥

कारण अलंकाराला प्रधान व्यंग्यार्थाचा सौंदर्यहेतु म्हणून जे म्हटले जाते, ते शरीरावर घालावयाच्या अलंकाराशी असलेल्या त्याच्या साम्यामुळे. आणि वाच्यालंकारांचा वर्ग कोणता म्हणाल, तर, रूपक वगैरे जे अलंकार आतापर्यंत (शास्त्रकारांनी) सांगितले आहेत, ते; व यापुढेही काहीजण सांगतील, ते, कारण अलंकार अनंत असू शकतात. त्यांपैकी कोणताही अलंकार जर नीट विवेक करून वापरला, तर 'अंगी' असणाऱ्या अलक्ष्यक्रम ध्वनीच्या कोणत्याही प्रकाराचे सौंदर्य खुलविण्यास तो कारणीभूत होऊ शकतो.

लोचनम्

इदानीमिति । हेयवर्ग उक्तः, उपादेयवर्गस्तु वक्तव्य इति भावः । व्यञ्जक इति । यश्च यथा चेत्यध्याहारः । यथार्थतामिति । चारुत्वहेतुतामित्यर्थः । उक्त इति । भामहादिभिरलङ्कारलक्षणकारैः । वक्ष्यते चेत्यत्र हेतुमाह- अलङ्काराणामनन्तत्वादिति । प्रतिभानन्त्यात् अन्यैरपि भाविभिः कैश्चिदित्यर्थः ॥ १७॥

लोचन

'आता'– 'आतापर्यंत (अनुप्रास, यमक इ.) वर्ज्य अलंकारांचा समूह सांगितला. आता स्वीकारार्ह अलंकारांचा समूह कोणता, तो सांगणे इष्ट होईल' असा 'आता' शब्दाचा आशय. 'व्यंजक'–यापूर्वी 'जो' व 'जसा' हे शब्द अध्याहृत घ्यावेत.[1] 'अलंकार हे नाव सार्थ करितात' म्हणजे (शृंगार रसाचे) सौंदर्य वाढविण्यास कारणीभूत होतात, हा अर्थ. 'सांगितले आहेत'– म्हणजे भामह वगैरे अलंकार-लक्षणकारांनी (सांगितले आहेत). 'व यापुढेही सांगतील' असे म्हणावयाचे कारण वृत्तिकार 'अलंकार अनंत असू शकतात' हे सांगतात. प्रतिभेची स्फुरणे अनंत असतात म्हणून[2] आणखीही जे कोणी अलंकार-लक्षणकार पुढे होतील, तेही जे अलंकार सांगतील[3], ते. ।।१७।।

टीपा

१. म्हणजे कोणता अलंकार कोणत्या प्रकारे व्यंजक होतो, हे आता सांगितले जाईल, हे तात्पर्य.
२. पाहा, पृ. १९ वरील 'भरतमुनि इ. चिरंतनांना'......इ. वाक्य व पृ. ३५ वरील 'भाषेमध्ये बोलण्याचे प्रकार अनंत असल्याने'... हे वाक्य.
३. पाहा, पृ. ३५ वरील 'कारण दुसऱ्या थोर विद्वानांनी'...हे वाक्य व दण्डीच्या काव्यदर्शनातील २–१ मधील पुढील श्लोकार्ध–ते (अलङ्काराः) चाद्यापि विकल्प्यन्ते, कस्तान् कार्त्स्न्येन वक्ष्यति ।

ध्वन्यालोकः

एषा चास्य विनिवेशने समीक्षा–
विवक्षा तत्परत्वेन नाङ्गित्वेन कदाचन ।
काले च ग्रहणत्यागौ नातिनिर्वहणैषिता ॥१८॥
निर्व्यूढावपि चाङ्गत्वे यत्नेन प्रत्यवेक्षणम् ।
रूपकादेरलङ्कारवर्गस्याङ्गत्वसाधनम् ॥ १९ ॥

ध्वन्यालोक

आणि ते अलंकार वापरताना जो सारासारविवेक करावयाचा तो, किंवा जी खबरदारी घ्यावयाची, ती पुढीलप्रमाणे—

रूपकादि अलंकार हे रसादींना उपकारक होण्यासाठी ते अलंकार १) रसादींना प्राधान्य देऊन योजावेत, कोणत्याही प्रकारे ते अलंकारच 'अंगी' होतील अशी इच्छा ठेवू नये. २) ते अलंकार योग्य काळी वापरावयास घ्यावेत व योग्य वेळ येताच त्यांचा त्यागही करावा, ३) त्यांचा वाजवीपेक्षा जास्त विस्तार करण्याची इच्छा बाळगू नये. ४) एखादे वेळी त्या अलंकारांचा विकास करावा लागला, तरी ते रसादींना दुय्यमच राहतील हे कसोशीने पाहावे ॥ १८, १९ ॥

**लोचनम्**

समीक्षेति । समीक्ष्येत्यनेन शब्देन कारिकायामनुवर्ततिभावः । श्लोकपादेषु चतुर्षु श्लोकार्धे चाङ्गत्वसाधनमिदम्, रूपकादेरिति प्रत्येकं संबन्धः । यमलङ्कारं तदङ्गतया विवक्षति नाङ्गित्वेन, यमवसरे गृह्णाति, यमवसरे त्यजति, यं नात्यन्तं निर्वोढुमिच्छति, यं यत्नादङ्गत्वेन प्रत्यवेक्षते, स एवमुपनिबध्यमानो रसाभिव्यक्तिहेतुर्भवतीति विततं महावाक्यम् । तन्महावाक्यमध्ये चोदाहरणावकाशमुदाहरणस्वरूपं तद्योजनं तत्समर्थनं च निरूपयितुं ग्रन्थान्तरमिति वृत्तिग्रन्थस्य सम्बन्धः ।

**लोचन**

सारासारविवेक-'नीट विवेक करून' या (वृत्तीतील) शब्दांनी कारिकेत सांगितलेला सारासारविवेक, हा भावार्थ. १८ व्या कारिकेच्या चार चरणांत व त्यानंतरच्या १९ व्या कारिकेच्या पूर्वार्धात जे काही सांगितले आहे, तो अलंकारांनी रसादींना उपकारक होण्याचा उपाय आहे. कारिकेतील 'ते अलंकार' या शब्दांचा संबंध प्रत्येक उपायाशी जोडावा. (कवि) जो अलंकार रसादींचे अंग म्हणूनच योजू इच्छितो,[१] अंगी म्हणून योजिण्याची इच्छा करीत नाही, जो अलंकार (कवि) योग्य वेळी वापरावयास घेतो, आणि योग्य वेळी ज्याचा त्याग करितो, ज्याचा वाजवीपेक्षा जास्त विस्तार करू इच्छीत नाही व जो अलंकार (रसादींना) दुय्यमच ठेवण्याचा प्रयत्न करतो तो अलंकार अशा रीतीने काव्यात गुंफला गेला असताना रसादींच्या अभिव्यक्तीस उपकारक होतो[२] असे हे वृत्तीमध्ये लांबच लांब पसरलेले महावाक्य[३] वापरण्यात

आले आहे. आणि त्या महावाक्यामध्ये उदाहरणे देण्याचे प्रयोजन, प्रत्यक्ष उदाहरण, मग ते उदाहरण त्या उपायाला कसे योग्य आहे याचे स्पष्टीकरण व त्या उपायाला धरून वापरलेल्या अलंकारामुळे रसपरिपोष कसा होतो याचे विवेचन, या चार गोष्टींचे विवरण करण्यासाठी इतर मजकूर वृत्तिकारांनी घातला आहे. असा या (गुंतागुंतीच्या) वृत्ति-ग्रंथाचा अन्वय आहे.

टीपा

१. हे वाक्य पुढे पृ. २२४ वर वृत्तीत (काशी आवृत्ति) आले आहे. त्यापुढील वाक्येही वृत्तीत पृ. २२५, २२६, २२७ व २३२ वर आली आहेत.
२. हे शब्द पृ. २३३ वर वृत्तीमध्ये (काशी आवृत्ति) आले आहेत.
३. एकाच विषयावरील (परस्परसंबद्ध) अशा अनेक छोट्या वाक्यांचा समूह म्हणजे महावाक्य होय. साहित्यदर्पणात वाक्योच्चयो महावाक्यम् असे विश्वनाथ (२–१) म्हणतो.

ध्वन्यालोकः

रसबन्धेष्वत्यादृतमनाः कविर्यमलङ्कारं तदङ्गतया विवक्षति ।
यथा–

चलापाङ्गां दृष्टिं स्पृशसि बहुशो वेपथुमतीं
रहस्याख्यायीव स्वनसि मृदु कर्णान्तिकचरः ।
करौ व्याधुन्वत्याः पिबसि रतिसर्वस्वमधरं
वयं तत्त्वान्वेषान्मधुकर हतास्त्वं खलु कृती ॥
अत्र हि भ्रमरस्वभावोक्तिरलङ्कारो रसानुगुणः ।

ध्वन्यालोक

रसप्रतीति घडविण्याचीच ज्याच्या मनाला विशेष ओढ आहे असा कवि ज्या अलंकाराला रसादींचे अंग म्हणूनच योजू इच्छितो. उदा—

" कोपऱ्यांशी चंचल व थरथरणाऱ्या अशा तिच्या दृष्टीला तू वारंवार स्पर्श करीत आहेस. काही गुजगोष्ट सांगणार असल्याप्रमाणे तिच्या कानांजवळ घिरट्या घालून हळूच गुंजन करितो आहेस. ती हातांनी निवारण करीत

असताही विषयोपभोगाचे एकमेव निधान असलेल्या तिच्या अधराचे पान करीत आहेस. हे भ्रमरा ! खऱ्या परिस्थितीचा पत्ता आम्ही अजून लावीतच असलो असल्याने आम्ही हतभागी असून तू मात्र खरोखर कृतकृत्य आहेस.[१] "

या ठिकाणी भ्रमराच्या वागणुकीचे वर्णन असलेला स्वभावोक्ति अलंकार रसाला उपकारक आहे.

लोचनम्

चलापाङ्गामिति। हे मधुकर ! वयमेवंविधाभिलाषचाटुप्रवणा अपि तत्त्वान्वेषणाद्वस्तुवृत्तेऽन्विष्यमाणे हता आयासपात्रीभूता जाताः। त्वं खल्विति निपातेनायत्नसिद्धं तवैव चरितार्थत्वमिति शकुन्तलां प्रत्यभिलाषिणो दुष्यन्तस्येयमुक्तिः। तथाहि कथमेतदीयकटाक्षगोचरा भूयास्म, कथमेषास्मदभिप्रायव्यञ्जकं रहोवाक्यमाकर्णयेत्, कथं नु हठादनिच्छन्त्या अपि परिचुम्बनं विधेयास्मेति यदस्माकं मनोराज्यपदवीमधिशेते तत्तवायत्नसिद्धम्। भ्रमरो हि नीलोत्पलधिया तदाशङ्काकरीं दृष्टिं पुनः पुनः स्पृशति। श्रवणावकाशपर्यन्तत्वाच्च नेत्रयोरुत्पलशङ्कानपगमात्तत्रैव दन्ध्वन्यमान आस्ते। सहजसौकुमार्यत्रासकातरायाश्च रतिनिधानभूतं विकसितारविन्दकुवलयामोदमधुरमधुरं पिबतीति भ्रमरस्वभावोक्तिरलङ्कारोऽङ्गतामेव प्रकृतरसस्योपगतः। अन्ये तु भ्रमरस्वभावे उक्तिरर्थस्येति भ्रमरस्वभावोक्तिरत्र रूपकव्यतिरेक इत्याहुः।

लोचन

'कोपऱ्यांशी चंचल'— " हे भ्रमरा ! आम्हालाही तुझ्यासारखीच या सुंदरीशी प्रेमाचे चाळे करण्याची अभिलाषा असली व तीमुळे आम्ही तिला खुष करण्यास उत्सुक असलो, तरी आम्ही तत्त्वान्वेषण करण्यासाठी (तिची जातकुळी वगैरे बाबतीतील) खऱ्या परिस्थितीचा शोध लावण्यात व्यग्र झालो असल्यामुळे हतभागी (म्हणजे त्या सुखाला पारखे, म्हणून) केवळ मनस्तापाचे धनी झालो आहोत. ' (तू) खरोखर ' या अव्ययाने तुझाच कार्यभाग काहीही प्रयत्न करावा न लागता साध्य होत आहे ' असे शकुंतलेचा अभिलाष धरणाऱ्या दुष्यंताने (भ्रमराला उद्देशून) म्हटले आहे. कारण,[२] आम्ही हिच्या नजरेस कसे

पडू, आमचा अभिप्राय सूचित करणारे सलगीचे शब्द हिच्या कानांवर कसे पडणार, हिच्या इच्छेविरुद्ध बळेच आम्ही हिचे मनमुराद चुंबन कसे घेऊ शकू वगैरे जे केवळ आमच्या मनातले[3] मांडेच आहेत, ते तुला अनायासेच प्राप्त झाले आहेत." कारण, भ्रमर हा 'हे नील-कमल आहे' अशा समजुतीने, तशी समजूत व्हावयास कारण होणाऱ्या शकुंतलेच्या डोळ्यांना पुन्हा पुन्हा स्पर्श करीत आहे. आणि तिचे डोळे कानांपर्यंत पोहोचू शकणारे म्हणजे विशाल असल्यामुळे 'हे नेत्र म्हणजे नीलकमले आहेत' हा भ्रम भ्रमराला सोडीतच नाही आणि म्हणून तो तिच्या कानाशीच पुन्हा पुन्हा गुणगुण करीत राहिला आहे. आणखी असे की, स्वाभाविक नाजूकपणामुळे व भित्रेपणामुळे ती घाबरून गेली असताना रतिसुखाचे सारसर्वस्व असलेला व उमललेल्या तांबड्या किंवा निळ्या कमळाच्या सुगंधासारख्या सुगंधाने मोहक असलेला तिचा अधर तो भ्रमर प्राशन करीत आहे. अशा रीतीने 'भ्रमरस्वभावोक्ति'[4] हा अलंकार या श्लोकातील (अभिलाष – विप्रलंभ शृंगार या) रसाला पोषक झाला आहे, पण इतर काही लोक 'भ्रमराच्या वागणुकीचे वर्णन चालू असतानाच जो उक्त झाला आहे असा रूपकव्यतिरेक[5] अलंकार यात आहे' असे म्हणतात.[6]

टीपा

१. अभिज्ञानशाकुंतल, अंक १, श्लो. २४.
२. भ्रमराचा कार्यभाग कसा सिद्ध होत आहे याची कारणे 'कारण' या शब्दाने सुरू होणाऱ्या वाक्यात सांगितली आहेत.
३. या इच्छा भ्रमराच्या निरनिराळ्या कृतींना अनुसरूनच दुष्यन्ताच्या मनात उत्पन्न होत आहेत.
४. म्हणजे भ्रमराच्या स्वभावाचे हुबेहुब वर्णन. वस्तुतः या अलंकाराचे नाव 'स्वभावोक्ति' असे आहे, पण या ठिकाणी भ्रमराचा स्वभाव वर्णिला असल्यामुळे या अलंकाराला 'भ्रमरस्वभावोक्ति' म्हटले आहे.
५. रूपकव्यतिरेक म्हणजे रूपकासहित असलेला व्यतिरेक (मध्यमपदलोपी तत्पुरुष समास).
६. या श्लोकातील ४ थ्या चरणात 'आम्ही हतभागी व तू खरा भाग्यशाली' या वाक्यात 'व्यतिरेक' अलंकार आहे. पहिल्या तीन चरणांत 'तू तिच्या

दृष्टीला स्पर्श करीत आहेस, तिच्या अधराचे पान करीत आहेस' वगैरे वर्णनामुळे हठकामुकाचा व्यवहार सुचविला जात असल्यामुळे 'समासोक्ति' हा अलंकार आहे. 'अन्य' म्हणतात त्याप्रमाणे येथे रूपक अलंकार मात्र दिसत नाही. आता 'अधर' याच्यावर 'विषयोपभोगाचे एकमेव निधान' याचा जो आरोप केलेला आहे, त्यामुळे ते रूपक मानावयाचे असल्यास न कळे. 'काही गुजगोष्ट सांगणार असल्याप्रमाणे' यात 'फलोत्प्रेक्षा' अलंकारही आहे. रूपकाचा उल्लेख अभिनवगुप्तांनी 'अन्यां'चे मत म्हणून सांगितला आहे, स्वतःचे मत म्हणून सांगितलेला नाही. म्हणून काशी आवृत्तीच्या पृ. ५०७ वरील 'पूर्वी सांगितलेला' याचा अर्थ 'पूर्वी दुसऱ्यांचे मत म्हणून सांगितलेला' असा समजावा.

ध्वन्यालोकः

नाङ्गित्वेनेति न प्राधान्येन। कदाचिद्रसादितात्पर्येण विवक्षितोऽपि ह्यलङ्कारः कश्चिदङ्गित्वेन विवक्षितो दृश्यते। यथा

चक्राभिघातप्रसभाज्ञयैव चकार यो राहुवधूजनस्य।
आलिङ्गनोद्दामविलासवन्ध्यं रतोत्सवं चुम्बनमात्रशेषम्॥

अत्र हि पर्यायोक्तस्याङ्गित्वेन विवक्षा रसादितात्पर्ये सत्यपीति।

ध्वन्यालोक

ते अलंकारच अंगी होऊ नयेत, म्हणजे त्यांना प्राधान्य देण्याची इच्छा असू नये. कारण काही उदाहरणे अशी सापडतात की जेथे रसादींचे अंग म्हणूनच एखादा अलंकार योजावयाची प्रथम इच्छा असली तरी परिणामी त्या अलंकारालाच प्राधान्य देण्याची इच्छा असल्यासारखे दिसते।

उदा.—

ज्या ( विष्णू ) ने आपल्या चक्राला राहूवर तुटून पडण्याची अनुल्लंघनीय आज्ञा करूनच राहूच्या स्त्रियांचे प्रेमभोग हे आलिंगनप्रधान विलासांना पारखे करून टाकून केवळ चुंबनापुरतेच उरवले.

या उदाहरणात जरी मुख्य उद्देश[१] रसादींची ( विष्णु-विषयक रति-भावाची ) प्रतीति ( प्रधानत्वाने ) घडवण्याचा असला, तरी येथे तो रतिभाव बाजूलाच राहून पर्यायोक्त[२] अलंकाराचेच सौंदर्य मुख्यत्वाने उठून दिसेल अशीच कवीची इच्छा असल्यासारखी वाटते.

लोचनम्

चक्राभिघात एव प्रसभाज्ञा अलङ्घनीयो नियोगस्तया यो राहुदयितानां रतोत्सवं चुम्बनमात्रशेषं चकार। यत आलिङ्गनमुद्दामं प्रधानं येषु विलासेषु तैर्वन्ध्यः शून्योऽसौ रतोत्सवः। अत्राह कश्चित् पर्यायोक्तमेवात्र कवेः प्राधान्येन विवक्षितं, न तु रसादि। तत्कथमुच्यते रसादितात्पर्ये सत्यपीति। नैवम्; वासुदेवप्रतापो ह्यत्र विवक्षितः। स चात्र चारुत्वहेतुतया न चकास्ति, अपि तु पर्यायोक्तमेव। यद्यपि चात्र काव्ये न काचिद्दोषाशङ्का, तथापि दृष्टान्तवदेतत्। यत्प्रकृतस्य पोषणीयस्य स्वरूपतिरस्कारकोऽङ्गभूतोऽप्यलङ्कारः सम्पद्यते। ततश्च क्वचिदनौचित्यमागच्छतीत्ययं ग्रन्थकृत आशयः। तथा च ग्रन्थकार एवाग्रे दर्शयिष्यति। महात्मनां दूषणोद्घोषणमात्मन एव दूषणमिति नेदं दूषणोदाहरणं दत्तम्।

लोचन

चक्राला करावयास सांगितलेला आघात हीच अनुल्लंघनीय आज्ञा म्हणजे जो मोडता येणे अशक्य आहे, असा हुकूम, तो करून ज्या (विष्णू) ने राहूच्या स्त्रियांची रतिक्रीडा केवळ चुंबनापुरतीच उरवली. कारण रतिक्रीडेच्या, ज्यात आलिंगन हे प्रमुख अंग आहे, त्या अंगांना ती रतिक्रीडा पारखी झाली. या श्लोकाबाबत कोणीतरी अशी शङ्का उपस्थित केली आहे की यामध्ये कवीला पर्यायोक्त हाच अलंकार मुख्य म्हणून विवक्षित आहे, रसादि[३] नाही; मग 'या उदाहरणातील मूळ उद्देश रसादींची प्रतीति प्रधानत्वाने (व पर्यायोक्ताची गौणत्वाने घडवावयाचा असला, तरी' असे वृत्तीत कसे म्हटले? अशी शङ्का घेणे योग्य नाही, कारण या श्लोकात वासुदेवाच्या पराक्रमाचे वर्णन करणे हा कवीचा मूल उद्देश आहे. पण त्या पराक्रमामुळे या श्लोकातील सौंदर्याला उठाव प्राप्त झालेला दिसत नाही. उलट पर्यायोक्त अलंकारच विशेष चमत्कृतिजनक वाटतो[४] जरी या काव्यात कोणताही 'दोष' असण्याची शंका नाही, तरी हे काव्य दृष्टांत म्हणून उद्धृत केल्यासारखे आहे. रसाचे अंग असलेला अलंकारसुद्धा काही वेळा[५] ज्याचा परिपोष करावयास पाहिजे, त्या रसाचे स्वरूप झाकून टाकण्यास कारणीभूत

होतो, आणि त्यामुळे अनौचित्य उत्पन्न होते, हा प्रस्तुत उदाहरण देण्यामागे ग्रन्थकाराचा अभिप्राय आहे; आणि असे असल्यामुळे ग्रंथकारांनी (प्रस्तुत उदाहरण काहीसे सदोष असले तरी ) हे उदाहरण दोष दाखविण्याच्या उद्देशाने दिलेले नाही. कारण, ते पुढे[6] म्हणणारच आहेत की, 'महात्म्यांच्या दोषांची वाच्यता करणे हे आपणासच दूषणास्पद होते.'

टीपा

१. मुख्य उद्देश अर्थात् विष्णूचा प्रताप वर्णन करणे हा आहे.
२. जे सुचवावयाचे, त्याचे वाचक शब्द न वापरता ते निराळ्या शब्दांनी सुचविणे याला 'पर्यायोक्त' अलंकार म्हणतात. (पाहा, पृ. २०२, टीप २ री). विष्णूने राहूच्या धडाचा नाश केला हाच व्यंग्यार्थ 'त्याने राहुस्त्रियांचे भोग, आलिंगन-विरहित करून चुंबनापुरते उरवले' या शब्दांनी सांगितला.
३. या श्लोकात 'भाव' (कवीला विष्णुविषयी वाटणारी रति किंवा विष्णूच्या ठिकाणचा 'उत्साह' हा वीररसाचा स्थायिभाव) कवीला विवक्षित आहे. पण उपर्युक्त शंका उपस्थित करणाऱ्याला पर्यायोक्त अलंकारच कवीला मुख्यत्वानें विवक्षित आहे, असे वाटते.
४. पर्यायोक्त अलंकाराच्या उठावदारपणामुळे येथे तोच अलंकार वाचकांचे लक्ष वेधून घेतो व त्यामुळे विष्णूच्या पराक्रमाला दुय्यमपणा प्राप्त झाल्यासारखा वाटतो.
५. क्वचित् (काही वेळा) हा शब्द येथेच घेणे आम्हाला इष्ट वाटते. मुळात तो शब्द पुढच्या वाक्यात पडला आहे, तो लेखनिकाचा प्रमाद असावा. कारण, तो पुढच्या वाक्यातच घेतल्यास जेथे जेथे अंगभूत अलंकाराला अवास्तव महत्त्व दिलेले असते, त्यांपैकी काही ठिकाणीच अनौचित्य उत्पन्न होते, हे बरोबर वाटत नाही.
६. 'पुढे' म्हणजे काशी आवृत्तीच्या पृ. २३३ वर.

ध्वन्यालोकः

अङ्गत्वेन विवक्षितमपि यमवसरे गृह्णाति नानवसरे। अवसरे गृहीतिर्यथा–

उद्दामोत्कलिकां विपाण्डुररुचं प्रारब्धजृम्भां क्षणा–
दायासं श्वसनोद्गमैरविरलैरातन्वतीमात्मनः।
अद्योद्यानलतामिमां समदनां नारीमिवान्यां ध्रुवं

पश्यन् कोपविपाटलद्युति मुखं देव्याः करिष्याम्यहम् ॥
इत्यत्र उपमाश्लेषस्य ।

ध्वन्यालोक

अलंकार रसादींचे अंगच राहील अशी काळजी घेतली, तरी कवीने तो योग्य वेळीच उपयोजावा, त्याची योग्य वेळ आली नसताना नव्हे. योग्य वेळी अलंकार योजिल्याचे उदाहरण—

"कळ्या आल्यामुळे ( दुसरा अर्थ :— जी उत्कंठित झाल्यामुळे ) जिचा वर्ण पांढुरका ( झाला ) आहे, जिच्या क्रमाक्रमाने विकास व्हायला नुकतीच सुरवात झाली आहे ( दुसरा अर्थ :— जी मदनपीडित झाल्यामुळे वारंवार जांभया देत आहे ), वाऱ्याचे झोत वारंवार आल्यामुळे जी आंदोलन पावत आहे ( दुसरा अर्थ :— आपल्याला होणारे आयास जी निःश्वास टाकून प्रकट करीत आहे ), व मदनवृक्षाच्या आश्रयाने असलेली जी एखाद्या मदनातुर परस्त्रीप्रमाणे आहे अशा या बागेतल्या वेलीकडे मी पाहात बसल्यामुळे देवीचे ( माझ्या पट्टराणीचे ) मुख आज नक्कीच रागाने लालबुंद होईल."

या ठिकाणी 'उपमाश्लेष' अलंकार ( योग्य वेळी ) वापरला आहे.

लोचनम्

उद्दामा उद्गताः कलिका यस्याः । उत्कलिकाश्च रहरहिकाः । अस्मिन्नेवावसरे प्रारब्धा जृम्भा विकासो यया । जृम्भा च मन्मथकृतोऽङ्गमर्दः । श्वसनोद्गमैर्वसन्तमारुतोल्लासैरात्मनो लतालक्षणस्यायासमायासनमान्दोलनयत्नमातन्वतीम् । निःश्वासपरम्पराभिश्चात्मन आयासं हृदयस्थितं सन्तापमातन्वतीं प्रकटीकुर्वाणाम् । सह मदनाख्येन वृक्षविशेषेण मदनेन कामेन च । अत्रोपमाश्लेष ईर्ष्याविप्रलम्भस्य भाविनो मार्गपरिशोधकत्वेन स्थितस्तच्चर्वणाभिमुख्यं कुर्वन्नवसरे रसस्य प्रमुखीभावदशायां पुरःसरायमाणो गृहीत इति भावः । अभिनयोऽप्यत्र प्राकरणिके प्रतिपदम् । अप्राकरणिके तु वाक्यार्थाभिनयेनोपाङ्गादिना । न तु सर्वथा नाभिनय इत्यलमवान्तरेण । ध्वनशब्दश्च भावोन्मीलकाराप्रधानजीवितम् ।

उद्दामवणे म्हणजे (१) अनिर्बन्धपणे वर उगवून आल्या आहेत कळ्या जिच्या ठिकाणी. आणि (२) अनावर झाली आहे उत्कलिका म्हणजे उत्कंठा (जिच्या ठिकाणी). क्षणात् म्हणजे त्याच वेळी म्हणजे नुकतीच जिने जृम्भा म्हणजे (१) विकास पावावयास सुरवात केली आहे, अशी लता आणि जिने (क्षणात् म्हणजे) वारंवार जृम्भा म्हणजे (२) मदनपीडेमुळे आळोखे-पिळोखे[3] किंवा जांभया देण्यास सुरुवात केली आहे अशी परस्त्री. (१) वाऱ्याचे झोत वारंवार आल्यामुळे म्हणजे वसन्तवाऱ्याच्या झुळुकांमुळे जी लतास्वरूपी असलेल्या स्वतःला आयास म्हणजे श्रम म्हणजे आंदोलन पावण्याचा शीण देत आहे. आणि (२) एकसारखे उसासे टाकून जी आपला आयास म्हणजे आपल्या हृदयातील दुःख प्रकट करीत आहे. (१) मदन-नामक विशिष्ट वृक्षाचा आश्रय घेऊन असलेली आणि (२) मदनाने म्हणजे काम-विकाराने पीडित झालेली. या उदाहरणात श्लेषमूलक उपमा हा अलंकार पुढे (रत्नावली नाटिकेच्या याच अंकात) घडून येणाऱ्या ईर्ष्याविप्रलम्भाला[3] यावयास वाट करून देत आहे.[4] आणि तो श्लेषोपमा अलंकार रसिकाची चित्तवृत्ति ईर्ष्याविप्रलम्भाच्या आस्वादाला अनुकूल करण्यास कारण होत असल्यामुळे ईर्ष्याविप्रलंभ शृंगार हा रस रसिकांच्या आटोक्यात येणाच्या बेतात असताना तो अलंकार आपण होऊन कवीच्या पुढे येऊन उभा राहिल्यामुळे कवीने त्याचा (योग्य वेळी) स्वीकार केला आहे, असा आशय. या ठिकाणी नटाने प्रस्तुत लतेच्या बाबतीत अभिनय प्रत्येक शब्द उच्चारताना करावयाचा आहे. अप्रस्तुत परस्त्रीच्या बाबतीत मात्र संपूर्ण वाक्याच्या अर्थाचा अभिनय उपांगे वगैरेंनी[4] करावयाचा आहे. अप्रस्तुत परस्त्रीच्या बाबतीत अभिनय मुळीच करावयाचा नाही असे मात्र नाही. असो. हे विषयांतर आता पुरे. आणि (तिसऱ्या चरणातला) 'नवकीच' हा शब्द पुढे उत्पन्न होणाऱ्या ईर्ष्येची पूर्वसूचना करून देण्याला मुख्यत्वेकरून कारणीभूत होत आहे.[5]

टीपा

१. श्रीहर्षांच्या 'रत्नावली' नाटिकेतला हा श्लोक. (अंक २, श्लोक ४) यात द्व्यर्थी विशेषणांच्या आधारे लता स्त्रीसारखी, असे वर्णन केल्यामुळे श्लिष्ट उपमा किंवा उपमाश्लेष अलंकार साधला आहे. हा योग्य वेळी वापरला असे म्हणण्याचे कारण, पुढे दुसऱ्या अंकाच्या शेवटी राणी वासवदत्तेला वाटणार असलेल्या ईर्ष्येमुळे जो ईर्ष्या-विप्रलंभाचा प्रसंग लवकरच येणार आहे, त्या प्रसंगाचा प्रस्तुत श्लोक सूचक, अतएव त्याची पूर्वतयारी करणारा आहे.

२. जृम्भा याचा अर्थ अमरकोशावरील क्षीरस्वामींच्या टीकेमध्ये 'जांभया देणे व हातपाय ताणणे' असा दिला आहे. हे दोन्हीही रतिभावाचे 'अनुभाव' आहेत. अभिनवगुप्त मात्र 'अंगमर्द' म्हणजे हातपाय रगडणे किंवा चोळणे असा 'जृम्भा' शब्दाचा अर्थ करितात. पृष्ठ २५२ (काशी आवृत्ति) वरही जृम्भित याचा अर्थ 'गात्रसंमर्दनात्मक' असाच केला आहे. हातपाय रगडणे किंवा चोळणे या अर्थाला कोशाचा आधार मिळत नाही व तो रतिभावाचे अनुभाव असल्याचेही ऐकिवात नाही. म्हणून आम्ही 'अंगमर्द' याचा अर्थ 'आळोखे-पिळोखे' असा केला आहे.

३. पुढे याच अंकात राजाचे सागरिकेशी प्रेमसंबंध असल्याचे राणी वासवदत्तेला कळल्यावर ती मत्सराने जळते. तोच पुढे येणारा ईर्ष्याविप्रलंभ होय.

४. पुढे काशी आवृत्तीच्या २७० पृष्ठावरही अभिनवगुप्तांनी **मार्गपरिशुद्धि** हा शब्द याच अर्थाने वापरला आहे.

५. नाट्यशास्त्र, ८–१४ येथे शिर, हस्त, ऊरु, पार्श्व, कटि व चरण ही अभिनयाची सहा अंगे व नेत्र, भ्रू, नासा, अधर, कपोल व चिबुक म्हणजे हनुवटी ही उपांगे सांगितली आहेत. अभिनयासंबंधी मार्गदर्शन करण्याचा हा प्रकार अभिनवगुप्तांनी याच श्लोकाचे बाबतीत केलेला दिसतो. कारण अन्यत्र कोठेही त्यांनी तसा प्रयत्न केलेला आढळत नाही. परंतु वाक्याभिनयाचा निर्देश लोचन, काशी आवृत्ति, पृ. ३१९–३२१, पृ. ३२८ व ३७४ येथे केला आहे.

६. 'नक्कीच' हा शब्द 'ईर्ष्या' सुचवायास मुख्यत्वेकरून कारणीभूत होतो की काय, हा प्रश्नच आहे, कारण ईर्ष्येची यथार्थ कल्पना **नारीमिव** इ. उपमेमुळेच येऊ शकते. **ध्रुवम्** हा शब्द त्या उपमेला पोषक होतो, हे मात्र खरे.

ध्वन्यालोकः

गृहीतमपि च यमवसरे त्यजति तद्रसानुगुणतयालङ्कारान्तरापेक्षया।

यथा—

रक्तस्त्वं नवपल्लवैरहमपि श्लाघ्यैः प्रियाया गुणै–
स्त्वामायान्ति शिलीमुखाः स्मरधनुर्मुक्तास्तथा मामपि।
कान्तापादतलाहतिस्तव मुदे तद्वन्ममाप्यावयोः
सर्वं तुल्यमशोक केवलमहं धात्रा सशोकः कृतः॥

अत्र हि प्रबन्धप्रवृत्तोऽपि श्लेषो व्यतिरेकविवक्षया त्यज्यमानो रसविशेषं पुष्णाति। नात्रालङ्कारद्वयसन्निपातः, किं तर्हि? अलङ्कारान्तरमेव श्लेषव्यतिरेकलक्षणं नरसिंहवदिति चेत्, न, तस्य प्रकारान्तरेण व्यवस्थापनात्। यत्र हि श्लेषविषय एव शब्दे प्रकारान्तरेण व्यतिरेकप्रतीतिर्जायते स तस्य विषयः। यथा—'स हरिर्नाम्ना देवः सहरिर्वरतुरगनिवहेन' इत्यादौ। अत्र ह्यन्य एव शब्दः श्लेषस्य विषयोऽन्यश्च व्यतिरेकस्य। यदि चैवंविधे विषयेऽलङ्कारान्तरत्वकल्पना क्रियते तत्संसृष्टेर्विषयापहार एव स्यात्।

ध्वन्यालोक

योग्य वेळी वापरायला घेतला, तरी रसपरिपोष करण्यासाठी जर दुसरा अलंकार वापरण्याची जरूर भासली, तर कवीने आधीच हाती घेतलेल्या अलंकाराचा योग्य वेळी त्यागही केला पाहिजे. उदा—

"तू' तुझ्या कोवळ्या पालवीमुळे रक्त ( तांबडा ) आहेस, तर मीही माझ्या प्रियेच्या वाखाणण्याजोग्या गुणांमुळे रक्त ( अनुरक्त ) आहे, शिलीमुख ( भ्रमर ) जसे तुझ्याकडे येतात, तसे मदनाच्या धनुष्यापासून सुटलेले शिलीमुख ( बाण ) माझ्याही रोखाने येतात. कांतेने ( सुंदर तरुणीने ) पायाने केलेला प्रहार जसा तुला आनंद देऊन फुलवतो, तसा कांतेच्या ( माझ्या प्रियेच्या ) पदतलाचा आघात मलाही आनंदित करितो. हे अ-शोका, तुझी माझी सर्व परिस्थिती सारखी आहे; पण फरक इतकाच की, विधात्याने मला स–शोक केले आहे."

या श्लोकात ( पहिल्या तीन ओळींमध्ये ) श्लेषोपमा एकसारखी वापरली असली, तरी ( चवथ्या ओळीत ) व्यतिरेक योजिण्याच्या इच्छेने ती श्लेषोपमा चालू ठेवणे सोडून दिले. त्यामुळे विप्रलम्भशृंगार रसाचा केवढा तरी परिपोष होत आहे.

' वरील उदाहरणात ( श्लेषोपमा व व्यतिरेक असे ) दोन स्वतंत्र अलंकार नाहीत. मग काय आहे ? तर विष्णूच्या नरसिंहरूपाप्रमाणे[2] श्लेष–व्यतिरेक अशा स्वरूपाचा वेगळाच ( संकर[3] नावाचा ) एक अलंकार आहे ' असे जर कोणी म्हणेल, तर त्यावर आमचे मत ' नाही ' असे आहे. कारण तो संकरालंकार जेथे असतो तेथे तो वेगळ्या प्रकाराने झालेला असतो. कारण ज्या शब्दामध्ये श्लेष असतो, त्याच शब्दांमधून निराळ्या तऱ्हेने व्यतिरेकाची प्रतीति होत असेल, तर ते त्या संकरालंकाराचे उदाहरण होय. जसे—

' तो देव ( विष्णु ) नावानेच हरि आहे, पण आपण उत्तम घोडदळ आपल्या दिमतीस असल्याने सहरि[4] आहात '.... वगैरेमध्ये.

पण वरील ' तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे '—वगैरे श्लोकांत श्लेषोपमा असलेले शब्द निराळे, व व्यतिरेक असलेले ( सशोक – अशोक इ. ) निराळे; आणि जर अशासारख्या ( म्हणजे ' तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे ' यासारख्या ) श्लोकात संकरासारखा वेगळाच अलंकार आहे अशी कल्पना करून घेतली, तर संसृष्टि[5] अलंकाराचे क्षेत्र नाहीसेच केल्यासारखे होईल.

**लोचनम्**

**रक्तो लोहितः । अहमपि रक्तः प्रबुद्धानुरागः । तत्र च प्रबोधको विभावस्तदीयपल्लवराग इति मन्तव्यम् । एवं प्रतिपादमाद्योऽर्थो विभावत्वेन व्याख्येयः । अत एव हेतुश्लेषोऽयम् । सहोक्त्युपमाहेत्वलङ्काराणां हि भूयसा श्लेषानुग्राहकत्वम् । अनेनैवाभिप्रायेण भामहो न्यरूपयत्– ' तत्सहोक्त्युपमाहेतुनिर्देशात्त्रिविधम् ' इत्युक्त्या न त्वन्यालङ्कारानुग्रहनिराचिकीर्षया । रसविशेषमिति विप्रलम्भम् । सशोकशब्देन व्यतिरेकमानयता शोकसहभूतानां निर्वेदचिन्तादीनां व्यभिचारिणां विप्रलम्भपरिपोषकाणामवकाशो दत्तः । किं तर्हीति । सङ्करालङ्कार एक एवायम्; तत्र किं त्यक्तं किं वा गृहीतमिति परस्याभिप्रायः। तस्येति सङ्करस्य । एकत्र हि विषयेऽलङ्कारद्वयप्रतिभोल्लासः सङ्करः । सहरि-**

शब्द एको विषयः । सः हरिः, यदि वा सह हरिभिः सहरिरिति । अत्र हीति । हिशब्दस्तुशब्दस्यार्थे, 'रक्तस्त्व' मित्यत्रेत्यर्थः । अन्य इति रक्त इत्यादिः । अन्यश्च अशोकसशोकादिः । नन्वेकं वाक्यात्मकं विषय-माश्रित्यैकविषयत्वादस्तु सङ्कर इत्याशङ्क्याह– यदीति । एवंविधे वाक्यलक्षणे विषये । विषय इत्येकत्वं विवक्षितं बोध्यम् । एकवाक्या-पेक्षया यद्येकविषयत्वमुच्यते तत्र क्वचित्संसृष्टिः स्यात्, सङ्करेण व्याप्तत्वात् ।

लोचन

रक्त म्हणजे (१) तांबडा. मीहि रक्त झालो आहे म्हणजे (२) माझ्या प्रियेवरील माझे प्रेम उद्दीपित झालेले आहे. आणि तो तिच्या-वरील अनुराग उद्दीपित होण्याचे कारण मात्र अशोकाच्या पालवीच्या तांबुसपणाचे रामाला झालेले दर्शन हे समजावे. याप्रमाणे प्रत्येक चरणाच्या पहिल्या भागाचा अशोकाकडे घ्यावयाचा अर्थ वक्त्याच्या मनातील विप्रलंभ रतीचा उद्दीपन विभाव समजूनच विवरण करावयाचे. म्हणूनच या श्लोकातील पहिल्या तीन चरणांत श्लेषमूलक हेतु हा अलंकार आहे. कारण सहोक्ति, उपमा व हेतु हे अलंकार पुष्कळ वेळा श्लेषमूलक असल्याचे आढळून येते.[६] हाच अभिप्राय भामहाने 'तो (म्हणजे श्लेष) सहोक्ति, उपमा व हेतु या तीन अलंकारांच्या मुळाशी असल्यामुळे तीन प्रकारचा असतो' असे म्हणून[७] प्रकट केला आहे, 'दुसऱ्या कोणत्याही अलंकाराच्या मुळाशी श्लेष नसतो' असे म्हणण्याचा त्याचा उद्देश नव्हता. विशिष्ट रसाचा म्हणजे विप्रलंभ शृंगार या रसाचा (परिपोष होत आहे). 'स–शोक' (तसेच 'अ–शोक') या शब्दामुळे व्यतिरेकाचा बोध करून दिला जात आहे व त्यायोगे शोकाशी साहचर्य असलेल्या व विप्रलंभाचा परिपोष करणाऱ्या निर्वेद, चिंता इ. व्यभि-चारिभावांना वाट मोकळी करून दिली जात आहे (म्हणजे तो व्यतिरेक त्या व्यभिचारिभावांना सूचित करीत आहे).

'मग काय आहे ?'.... असे म्हणण्यामागे आक्षेपकाचा अभिप्राय असा आहे की, वरील श्लोकात (श्लेषोपमा आणि व्यतिरेक यांच्या अंगांगिभावमूलक मिश्रणामुळे) संकर हा एकच अलंकार आहे– त्यांपैकी

एक (म्हणजे श्लेषोपमा) बाजूला सारला व दुसरा (म्हणजे व्यतिरेक) स्वीकारला हे म्हणण्यात काय तथ्य आहे ? 'तो' म्हणजे संकर. कारण एकाच शब्दसमूहात जेथे दोन अलंकारांचे भान होते. तेथे संकर असतो 'स हरिः' हा एक शब्दरूपी आश्रय आहे. त्यातून (सः म्हणजे) 'तो (नावानेच) हरि (आहे)'. किंवा तो 'हरीसह (म्हणजे अश्वदळाने युक्त) आहे' असे दोन अर्थ होऊ शकतील. अत्र हि-हि हा शब्द येथे 'पण' या अर्थी वापरलेला आहे. 'तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे' या श्लोकात, असा (अत्र याचा) अर्थ. निराळे म्हणजे 'रक्त' वगैरे शब्द आणि निराळे म्हणजे अ-शोक-स-शोक वगैरे शब्द.

'पण काय हो, एका महावाक्यरूपी पद्यात असणारा म्हणजे एक आश्रय असणारा असे समजून येथे संकर आहे असे माना' अशी कोणी शंका घेईल, तर तिचे समाधान वृत्तिकार 'आणि जर' ... ... इ. वाक्याने करितात. अशा प्रकारच्या म्हणजे (महा) वाक्यरूपी आश्रयामध्ये 'विषय' या (एकवचनी) शब्दाने दोन्ही अलंकारांचा आश्रय एक (महावाक्य) आहे हे अभिप्रेत आहे असे समजावे. संपूर्ण श्लोक हे एकच महावाक्य असल्याने या दोन अलंकारांचा आश्रय एकच आहे असे जर तुम्ही म्हटले, तर 'संसृष्टी'ला कोठेच वाव मिळणार नाही, कारण अशा सर्व महावाक्यात्मक उदाहरणांना 'संकर' हाच अलंकार व्यापून टाकील.[१]

टीपा

१. हा श्लोक 'रामाभ्युदय' या यशोवर्मकृत नाटकातून उद्धृत केला आहे असे डॉ. राघवन् यांनी 'Some old lost Rama plays' या नावाच्या लेखामध्ये म्हटले आहे. पण हनुमन्नाटक ५-२४ येथेही हा श्लोक सापडतो. अर्थात् हनुमन्नाटकात इतर कवींचे श्लोकही समाविष्ट केलेले आढळतात.

२. ज्याप्रमाणे विष्णूच्या नरसिंहरूपात सिंहाचे मस्तक आणि नराचे बाकीचे शरीर यांमध्ये कोठेही जोड दिल्यासारखे दिसत नाही, ती एकजीव झालेली दिसतात, त्याप्रमाणे संकरालंकारामधील दोन अलंकार वेगळे न राहता त्या दोहोंचा एकच अलंकार बनतो. संकरालंकाराच्या बाबतीत 'नरसिंहा-'चा दृष्टांत उपलब्ध ग्रंथात आनंदवर्धनांनीच प्रथम दिलेला दिसतो.

३. एखाद्या उदाहरणात एकाहून अधिक अलंकार असून त्यांपैकी एकावर दुसरा

अलंकार अवलंबून असेल म्हणजे त्यांमध्ये अंग व अंगी असा संबंध असेल तर, त्या अलंकारांमिळून अंगांगिभावावर आधारित असलेला ' संकरालंकार ' होतो.

४. हरि = घोडा. म्हणून सहरि = ज्याजवळ घोडे आहेत असा.

५. आनंदवर्धनांचे मत असे दिसते की, एका पद्यातील दोन वेगवेगळ्या भागांमध्ये दोन वेगवेगळे अलंकार असतील, तर त्यांच्यापैकी एक दुसऱ्यावर अवलंबून असला, तरी तेथे त्या दोन अलंकारांची ' संसृष्टि ' मानावी. हे मत त्यांनी वृत्तीमध्ये (काशी आवृत्ति, पृ. ५१० वर) प्रकट केले आहे. (**वाच्यालंकारसंसृष्टत्वं च पदापेक्षया एव।**) या मताला अनुसरूनच त्यांनी ' तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे ' या उदाहरणात व पृ. ५१४ (काशी आवृत्ति) वरील **दन्तक्षतानि करजैः** इ. उदाहरणात अनुक्रमे श्लेषोपमा व व्यतिरेक यांची संसृष्टि, आणि समासोक्ति व विरोध यांची संसृष्टि मानिली आहे. वस्तुत: या दोन्ही ठिकाणी एक अलंकार दुसऱ्यावर अवलंबून आहे. नंतरचे आलंकारिक मात्र एका पद्यात दोन अलंकार स्वतंत्रपणे (म्हणणे एक दुसऱ्यावर अवलंबून नाही अशा रीतीने) असले, तरच तेथे संसृष्टि असते असे मानितात. काव्यप्रकाशातील १० व्या उल्लासांमध्ये मम्मट अलंकारांची अन्योन्य–निरपेक्षता हेच संसृष्टीचे स्वरूप असे सांगतो.

६. पाहा, दण्डीच्या ' काव्यादर्श ' तील २ – ३६३ या श्लोकातील पुढील ओळ–
**श्लेषः सर्वासु पुष्णाति प्रायो वक्रोक्तिषु श्रियम् ।**

७. भामह, काव्यालंकार, ३–१७.

८. म्हणजे या दोन अलंकारांमिळून एक अविभाज्य अलंकार बनला असल्याने ते दोन वेगळे अलंकार समजता येत नाहीत.

९. कारण जेथे जेथे संसृष्टि हा अलंकार आहे असे आम्ही मानीत असू, तेथे तेथे संपूर्ण श्लोकरूपी महावाक्य हा एकच आश्रय असे समजून तुम्ही संकरच आहे असे म्हणाल, तर अशा सर्व पद्यांतून संसृष्टीची हकालपट्टी होईल, असे आनंदवर्धनांचे आणि अभिनवगुप्तांचे म्हणणे.

**ध्वन्यालोकः**

**श्लेषमुखेनैवात्र व्यतिरेकस्यात्मलाभ इति नायं संसृष्टेर्विषय इति चेत् – न; व्यतिरेकस्य प्रकारान्तरेणापि दर्शनात् । यथा–**

**नो कल्पापायवायोरदयरयदलत्क्ष्माधरस्यापि शम्या**
**गाढोद्गीर्णोज्ज्वलश्रीरहनि न रहिता नो तमःकज्जलेन ।**
**प्राप्तोत्पत्तिः पतङ्गान्न पुनरुपगता मोषमुष्णत्विषो वो**

वर्तिः सैवान्यरूपा सुखयतु निखिलद्वीपदीपस्य दीप्तिः ॥

अत्र हि साम्यप्रपञ्चप्रतिपादनं विनैव व्यतिरेको दर्शितः। नात्र श्लेषमात्राच्चारुत्वप्रतीतिरस्तीति श्लेषस्य व्यतिरेकाङ्गत्वेनैव विवक्षितत्वात् न स्वतोऽलङ्कारतेत्यपि न वाच्यम्। यत एवंविधे विषये साम्यमात्रादपि सुप्रतिपादिताच्चारुत्वं दृश्यत एव। यथा—

आक्रन्दाः स्तनितैर्विलोचनजलान्यश्रान्तधाराम्बुभि-
स्तद्विच्छेदभुवश्च शोकशिखिनस्तुल्यास्तडिद्विभ्रमैः।
अन्तर्मे दयितामुखं तव शशी वृत्तिः समैवावयो-
स्तत्किं मामनिशं सखे जलधर त्वं दग्धुमेवोद्यतः ॥

इत्यादौ।

ध्वन्यालोक

वरील ( 'तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे' इ. ) उदाहरणात व्यतिरेक-देखील ( उपमा ही श्लेषावर, व्यतिरेक हा उपमेवर, म्हणून व्यतिरेकसुद्धा ) श्लेषावर अवलंबून आहे, म्हणून हे संसृष्टीचे उदाहरण नाही' असे म्हणाल, तर ते बरोबर नाही. कारण व्यतिरेक हा निराळ्या प्रकाराने, म्हणजे श्लेषावर आधारलेल्या साम्यावाचूनही झालेला दिसतो. उदा.—

उष्णकिरण सूर्याची दीप्ति तुम्हाला सुख देवो. तो सूर्य म्हणजे सर्व भूप्रदेशांचा दिवा आणि त्याची दीप्ति म्हणजे त्या दिव्याची एक आगळी ज्योतच ! ( तिला आगळी म्हणण्याचे कारण ) आपल्या जबरदस्त वेगाने पर्वतही फोडणाऱ्या कल्पांतीच्या झंझावातानेदेखील ती ज्योत विझत नाही. ती दिवसादेखील विपुल प्रमाणात प्रकाश पसरविते. अंधाररूपी काजळ त्या ज्योतीत मुळीच नाही. ती ज्योत पतंगामुळे ( सूर्यापासून ) उत्पन्न होते, विझत नाही.[२] [ दिव्याची ज्योत मात्र पतंगापासून ( टोळापासून ) उत्पन्न होत नाही, उलट पतंगामुळे ( टोळाने झडप घातल्यामुळे ) नाश पावते. ]

येथे साम्याचा म्हणजे उपमेचा प्रपंच न मांडताच व्यतिरेक तेवढाच दाखवला आहे.

पण '(इतरत्र उपमेचा निर्देश न करिताही व्यतिरेक होत असला, तरी ) या ( तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे ......इ. ) उदाहरणात नुसत्या श्लेषोपमेत विशेष सौंदर्य नाही, ती व्यतिरेकाचे अंग म्हणूनच घातली असल्याने ती

श्लेषोपमा स्वतंत्र अलंकार होऊ शकत नाही ' असे तुमचे म्हणणे असेल, तर तेही बरोबर नाही. कारण अशा प्रकारच्या काव्यात केवळ ( म्हणजे व्यतिरेकविरहित ) उपमा जरी नीट योजिली तरी त्यामुळे काव्याला सौंदर्य प्राप्त झालेले आढळतेच, जसे —

" हे मेघा ! माझे विलाप तुझ्या गडगडाटासारखे; डोळ्यांतील अश्रुधारा तुझ्या अखंड वर्षणाऱ्या जलधारांप्रमाणे; तिच्या वियोगामुळे माझ्या मनात प्रज्वलित होणाऱ्या शोकाग्नीच्या ज्वाला ( तुझ्या ) विद्युद्विलासांप्रमाणे; माझ्या अन्तःकरणात माझ्या प्रियेचे मुख, तर तुझ्या ( अन्तर्भागी ) चन्द्र. अशा रीतीने तुझी माझी स्थिति सारखीच असताना, हे मित्रा ! मला रात्रंदिवस होरपळूनच काढावयास का बरे उद्युक्त होत आहेस ? "[१२]

अशासारख्या उदाहरणांमध्ये.

लोचनम्

ननूपमागर्भो व्यतिरेकः, उपमा च श्लेषमुखेनैवायातेति श्लेषोऽत्र व्यतिरेकस्यानुग्राहक इति सङ्करस्यैवैष विषयः। यत्र त्वनुग्राह्यानुग्राहकभावो नास्ति तत्रैकवाक्यगामित्वेऽपि संसृष्टिरेव; तदेतदाह— श्लेषेति । श्लेषबलानीतोपमामुखेनेत्यर्थः । एतत्परिहरति— नेति । अयं भावः — किं सर्वत्रोपमायाः स्वशब्देनाभिधाने व्यतिरेको भवत्युत गम्यमानत्वे । तत्राद्यं पक्षं दूषयति— प्रकारान्तरेणेति । उपमाभिधानेन विनापीत्यर्थः ।

शक्या शमयितुं शक्येत्यर्थः । दीपवर्तिस्तु वायुमात्रेण शमयितुं शक्यते । तम एव कज्जलं, तेन । न नो रहिता अपि तु रहितैव । दीपवर्तिस्तु तमसापि युक्ता भवति, अत्यन्तमप्रकटत्वात्, कज्जलेन चोपरिचरेण । पतङ्गादर्कात् । दीपवर्तिः पुनः शलभाद्ध्वंसते नोत्पद्यते । साम्येति । साम्यस्योपमायाः प्रपञ्चेन प्रबन्धेन यत्प्रतिपादनं स्वशब्देन तेन विनापीत्यर्थः । एतदुक्तं भवति— प्रतीयमानैवोपमा व्यतिरेकस्यानुग्राहिणी भवन्ती नाभिधानं स्वकण्ठेनापेक्षते। तस्मान्न श्लेषोपमा व्यतिरेकस्यानुग्राहित्वेनोपात्ता । ननु यद्यप्यन्यत्र नैवं, तथापीह तत्प्राधान्येनैव सोपात्ता, तदप्राधान्ये स्वयं चारुत्वहेतुत्वाभावादिति श्लेषोपमात्र पृथगलङ्कारभावमेव न भजते । तदाह—नात्रेति । एतदसिद्धं

स्वसंवेदनबाधितत्वादिति हृदये गृहीत्वा स्वसंवेदनमपह्नुवानं परं श्लेषं विनोपमामात्रेण चारुत्वसम्पन्नमुदाहरणान्तरं दर्शयन्निरुत्तरीकरोति– यत इत्यादिना। उदाहरणश्लोके तृतीयान्तपदेषु तुल्यशब्दोऽभिसम्बन्ध- नीयः। अन्यत्सर्वं 'रक्तस्त्वम्' इतिवद्योज्यम्।

**लोचन**

पण काय हो, व्यतिरेक हा तर साम्यावरच आधारलेला असतो, आणि (वरील उदाहरणातील 'तुझी माझी सर्व परिस्थिति सारखी आहे' ही) उपमा तर श्लेषामुळेच संभवते असे असल्यामुळे या उदा- हरणात श्लेष हा व्यतिरेकाला (परंपरेने) उपकारक आहे, म्हणून हे उदाहरण 'संकरा'चेच होईल![४] मात्र जेथे एक अलंकार उपकार्य व दुसरा त्याच्यावर उपकार करणारा अशी परिस्थिति नसेल, ते एकच वाक्य असले (किंवा ती भिन्न वाक्ये असली) तरी तेथे संसृष्टिच असणार. हीच पूर्वपक्ष्याची शंका वृत्तिकार '(वरील उदाहरणात व्यतिरेकदेखील) श्लेषावर'...इ. वाक्याने प्रकट करितात. श्लेषावर (अवलंबून) म्हणजे श्लेषाच्या सामर्थ्याने उत्पन्न झालेल्या उपमेवर (अवलंबून). या शंकेचे समाधान वृत्तिकार 'ते बरोबर नाही.' इ. शब्दांनी करितात. वृत्तिकारांच्या या म्हणण्याचे तात्पर्य असे :– नेहमी उपमा वाच्य असतानाच व्यतिरेक हा अलंकार संभवतो, की ती व्यंग्य असतानाही संभवतो? यांपैकी पहिल्या पक्षाचे[५] खंडन वृत्तिकार '(कारण व्यतिरेक हा) निराळ्या प्रकाराने'...इ. वाक्याने करितात. (निराळ्या प्रकाराने म्हणजे) उपमा शब्दवाच्य नसतानासुद्धा, (म्हणजे उपमा ही 'गम्य' असतानासुद्धा) असा अर्थ.

'विझविली जाणारी' म्हणजे 'विझविता येणे शक्य असणारी' असा अर्थ. पण दिव्याची ज्योत मात्र केवळ वाऱ्याच्या बारीकशा झुळकेनेही विझविली जाते. अंधार हीच काजळी, तिने. काजळीशिवाय नसलेली नाही, उलट काजळीशिवाय असलेलीच दिव्याची ज्योत मात्र फारशी प्रकाशमान नसल्याने[६] अंधारानेही घेरलेली असते. शिवाय ती दिव्याची ज्योत तिच्या टोकाशी साचणाऱ्या काजळीनेही (आच्छा- दित असते). पतंगापासून म्हणजे सूर्यापासून. दिव्याची ज्योत तर उलट

पतंगामुळे (म्हणजे टोळामुळे) विझते, पतंगापासून म्हणजे टोळापासून उत्पन्न होत नाही. 'साम्याचा' म्हणजे उपमेचा 'प्रपंच' म्हणजे अविच्छिन्नपणे व विस्तृतपणे साम्यवाचक शब्द वापरून केलेले प्रतिपादन; त्यावाचून असा अर्थ. वृत्तिकारांच्या या म्हणण्याचा आशय असा :–साम्य जरी (अभिधेने बोलून न दाखविता) केवळ सुचविले गेलेले असले, तरी ते व्यतिरेकाला उपकारक होत असल्यामुळ ते साम्य त्याच्या वाचकशब्दांनी बोलून दाखविण्याची गरज नसते. म्हणून 'उष्णकिरण सूर्याची' या पद्यामध्ये श्लेषोपमाही व्यतिरेक अलंकाराला उपकारक व्हावी या हेतूने योजिलेली नाही.

पण काय हो, 'उष्णकिरण'... या श्लोकात व यासारख्या इतर श्लोकांत जरी असे (म्हणजे साम्य हे त्याच्या वाचकशब्दांनी प्रतिपादिलेले) नसले, तरी या म्हणजे 'तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे' इ. पद्यामध्ये श्लेषोपमा ही व्यतिरेकाला उपकारक म्हणूनच योजिलेली आहे ! कारण ती श्लेषोपमा जर व्यतिरेकाला उपकारक होत नसेल, तर ती स्वतंत्रपणे सौंदर्यनिर्मितीस कारणीभूत होऊ शकणार नाही. म्हणून श्लेषोपमेला येथे (म्हणजे 'तू तुझ्या' ....इ. श्लोकात) स्वतंत्र अलंकार म्हणून स्थान नाही. (तर व्यतिरेकाचे अंग म्हणूनच आहे[९] ): हाच आशय वृत्तिकार 'पण इतरत्र....' इ. शब्दांनी प्रकट करितात.

विरोधकाचे हे म्हणणे त्याच्या स्वतःच्या अनुभवाशी विसंगत असल्यामुळे सिद्ध होऊ शकत नाही या अभिप्रायाने स्वतःच्या अनुभवाचा अपलाप करणाऱ्या विरोधकाला वृत्तिकार श्लेष (किंवा व्यतिरेकही) न वापरता केवळ सुंदर उपमेमुळे रमणीय झालेले उदाहरण पुढे करून 'कारण अशा प्रकारच्या' इ. वाक्याने निरुत्तर करीत आहे. उदाहरण म्हणून दिलेल्या 'हे मेघा' इ. श्लोकामधील प्रत्येक तृतीयान्त पदाशी तुल्य (म्हणजे सारखे किंवा प्रमाणे)या शब्दाचा संबंध जोडावा. इतर सर्व गोष्टींची[८] योजना 'तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे' इ. श्लोकात सांगितल्याप्रमाणे करावयाची आहे.

१. व्यतिरेकात दोन गोष्टींमध्ये कोठल्या तरी गुणधर्माचे साम्य असावे लागते, व त्या गुणधर्माचे बाबतीत एक दुसऱ्याहून वरचढ असे वर्णन असते. 'तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे ...' या प्रस्तुत श्लोकात ज्या श्लेषावर उपमा अवलंबून आहे, त्याहून वेगळ्या [अशोक = १) वृक्ष, २) शोकरहित]; श्लेषावर व्यतिरेक अवलंबून आहे; तथापि शेवटच्या चरणातील 'तुझी माझी सर्व परिस्थिति सारखी आहे' हे साम्य व्यतिरेकाला आवश्यक आहे. ते साम्य येथे सर्वस्वी पहिल्या तीन चरणांतल्या श्लेषोपमेनेच कळत असल्याने या उदाहरणात तरी श्लेषोपमा व व्यतिरेक यांचा संकर मानणे अधिक योग्य वाटते. अर्थात् येथे संकर आहे की संसृष्टि आहे हा वाद गौण आहे. प्रारंभिलेला अलंकार योग्य वेळी सोडून देणे हा मुद्दा महत्त्वाचा असून तो अगदी योग्य आहे.

२. 'सूर्यशतक' (मयूरकृत), २३.

३. हा श्लोक **यशोवर्म्याच्या 'रामाभ्युदय'** नावाच्या नाटकातील आहे असे डॉ. याकोबी व डॉ. राघवन् म्हणतात.

४. हे प्रतिपक्ष्याचे म्हणणे योग्य वाटते, कारण संकर व संसृष्टि यांमधील भेद वस्तुतः दोन अलकारांमध्ये उपकार्य– उपकारक संबंध आहे किंवा नाही यावर अवलंबून आहे; ते दोन अलंकार एकाच वाक्यात आहेत की भिन्न वाक्यांत आहेत, यावर संकर व संसृष्टि यांमधील भेद अवलंबून नाही.

५. म्हणजे व्यतिरेकाला उपमा ही शब्दवाच्यच असावी लागते, हा पक्ष.

६. **तमःकज्जलेन** हा समास अभिनवगुप्तांनी दोन प्रकारांनी सोडविला आहे. सूर्याकडे घेताना त्यांनी **तमः एव कज्जलं, तेन ।** असा रूपकसमास मानिला. व दिव्याच्या ज्योतीकडे घेताना **तमःसहितं कज्जलं तमःकज्जलं, तेन ।** असा मध्यमपदलोपी तत्पुरुष समास मानून त्यांनी 'अंधाराने व काजळीने' असा अर्थ केला.

काशी आवृत्तीत 'लोचन' टीकेत **अत्यन्तमप्रकटत्वात्** हे शब्द **कज्जलेन** च **उपरिचरेण** याच्याशी जोडलेले आहे. पण ते त्या आधीच्या **तमसाऽपि युक्ता भवति** यानंतरचा दण्डक गाळून त्या शब्दांशी जोडणे आम्हाला अधिक योग्य वाटते

७. याच पृष्ठावरील १ ली टीप पाहा.

८. 'इतर सर्व गोष्टी' म्हणजे संस्कृतातील प्रत्येक तृतीयान्त पदाने सांगितलेला आशय हा पुढील प्रथमान्त पदाने सांगितलेल्या आशयाचे कारण असणे, इ.

ध्वन्यालोकः

रसनिर्वहणैकतानहृदयो यं च नात्यन्तं निर्वोढुमिच्छति । यथा–
कोपात्कोमललोलबाहुलतिकापाशेन बद्ध्वा दृढं
नीत्वा वासनिकेतनं दयितया सायं सखीनां पुरः ।
भूयो नैवमिति स्खलत्कलगिरा संसूच्य दुश्चेष्टितं
धन्यो हन्यत एव निह्नुतिपरः प्रेयान्रुदत्या हसन् ॥
अत्र हि रूपकमाक्षिप्तमनिर्व्यूढं च परं रसपुष्टये ।

ध्वन्यालोक

आणि मन रसपरिपोष करण्यावरच एकाग्र झाल्यामुळे ( सत्कवि ) अलंकाराचा फार विकास करू इच्छीत नाही. जसे—

" प्रियेने रागावून सायंकाळी मैत्रिणींच्या देखत प्रियकराला आपल्या बाहुलतांच्या पाशात करकचून बांधले व ती त्याला आपल्या शय्यागृहाकडे घेऊन गेली. " पुन्हा असे ( करायचे ) नाही हं ! " असे आपल्या अडखळणाऱ्या मधुर वाणीने म्हणत तिने त्याच्या दुष्कृत्यांच्या चिन्हांकडे[1] अंगुलिनिर्देश केला, व आपला अपराध तो हसून लपवू लागल्याने ती रडतरडत त्या प्रियकराला बडवीतच राहिली, हे खरोखर त्याचे भाग्यच. "

' या ठिकाणी, ( संपूर्ण साङ्ग ) रूपकाच्या ( ' बाहुलतिका हाच पाश ' एवढ्याच ) अंशाचा निर्देश केल्यामुळे व ते रूपक न लांबवल्यामुळे रसाचा विलक्षण परिपोष होत आहे.

लोचनम्

एवं ग्रहणत्यागौ समर्थ्य ' ' नातिनिर्वहणैषिता ' इति भागं व्याचष्टे–यमिति । चकारः समीक्षाप्रकारसमुच्चयार्थः । बाहुलतिकाया बन्धनीयपाशत्वेन रूपणं यदि निर्वाहयेत्, दयिता व्याधवधूः, वासगृहं कारागारपञ्जरादीति परमनौचित्यं स्यात् । सखीनां पुर इति । भवत्योऽनवरतं ब्रुवते नायमेवं करोतीति । तत्पश्यन्त्विदानीमिति भावः । स्खलन्ती कोपावेशेन कला मधुरा च गीर्यस्याः सा । कासौ गीरित्याह– भूयो नैवमित्येवंरूपा । एवमिति यदुक्तं तत्किमित्याह– दुश्चेष्टितं नख-

पदादि । संसूच्य अङ्गुल्यादिनिर्देशेन । हन्यत एवेति । न तु सख्यादिकृतोऽनुनयोऽनुरुध्यते । यतोऽसौ हसनं निमित्तीकृत्य निह्नुतिपरः प्रियतमश्च । तदीयं व्यलीकं का सोढुं समर्थेति ।

लोचन

अशा रीतीने (अलंकार योग्य वेळी) वापरावयास घेणे व (योग्य वेळी) त्यांचा त्यागही करणे या कारिकेतील मुद्द्यांचे विवरण केल्यावर आता वृत्तिकार 'त्यांचा वाजवीपेक्षा जास्त विस्तार करण्याची इच्छा बाळगू नये' या भागाचे व्याख्यान 'आणि मन रसपरिपोष करण्यावरच' इ. वाक्यामध्ये करितात. वृत्तीतले 'आणि' हे अव्यय सारासारविवेकाचे जे चार मुद्दे आतापर्यंत सांगितले, त्यांमध्ये आणखी एका मुद्द्याची भर घालण्याच्या उद्देशाने वापरले आहे. बाहुलतिकेवर केलेले, 'बांधणाऱ्या पाशा' चे रूपक 'प्रिया हीच कोणी पारध्याची बायको', 'शय्यागृह म्हणजेच तुरुंगासारखा असणारा पिंजरा' वगैरे आरोप करून कवीने जर शेवटपर्यंत लांबविले असते, तर श्लोकात (शृंगाररसाच्या दृष्टीने) कमालीचे अनौचित्य निर्माण झाले असते. 'मैत्रिणींच्या देखत'–'तुम्ही (ह्याची बाजू घेऊन) एकसारख्या म्हणत असता की, हा असे[2] करणार नाही; तेव्हा आता तुम्हीच (त्याचा बेइमानीपणा) पाहून खात्री करून घ्या.' हे तात्पर्य. रागाच्या भरामुळे अडखळणारी आणि कल म्हणजे मधुर आहे वाणी जिची, अशी.[3] ती (तिने उच्चारिलेली) वाणी कोणती, तर 'पुन्हा असे करावयाचे नाही,' या स्वरूपाची. 'असे' हा जो शब्द नायिकेने म्हटला, त्याचा अर्थ काय, हे वृत्तिकार 'दुष्कृत्य' या शब्दाने सांगतात. दुष्कृत्य म्हणजे (दुसऱ्या प्रेयसीने केलेली) नखक्षते वगैरे (हे नायकाच्या दुर्वर्तनाचे पुरावे). 'हे सुचवून' म्हणजे बोटे वगैरेंनी[4] खुणा करून. 'बडवीतच राहिली' म्हणजे तिच्या मैत्रिणींनी तिला (त्याला न बडविण्याविषयी) केलेल्या मनधरणीला तिने जुमानिले नाही. कारण तो हसून आपले दुष्कृत्य झाकू पाहात होता व तरी तिचे त्यांच्यावर प्रेमही होते. असल्या (लपवालपवी करणाऱ्या व अत्यंत प्रिय अशा) वल्लभाचा अपराध कोणती प्रेयसी सहन करू शकेल, हा आशय.

टीपा

१. नखक्षत वगैरे चिन्हे.

२. म्हणजे तुझ्याशी बेइमानी.

३. म्हणजे स्खलत्कलगिरा हा समास बहुव्रीही घेऊन तो नायिकेचे विशेषण समजावा असा अभिनवगुप्तांचा अभिप्राय आहे. पण तो नायिकेने आपल्या अडखळणाऱ्या मधुर वाणीने (पुन्हा असे करायचे नाही असे) म्हणून अशा अर्थाचा कर्मधारय समासही मानिता येईल.

४. म्हणजे उदा. नेत्र.

ध्वन्यालोकः

निर्वोढुमिष्टमपि यं यत्नादङ्गत्वेन प्रत्यवेक्षते यथा–

श्यामास्वङ्गं चकितहरिणीप्रेक्षणे दृष्टिपातं
गण्डच्छायां शशिनि शिखिनां बर्हभारेषु केशान् ।
उत्पश्यामि प्रतनुषु नदीवीचिषु भ्रूविलासान्
हन्तैकस्थं क्वचिदपि न ते भीरु सादृश्यमस्ति ॥

इत्यादौ ।

स एवमुपनिबध्यमानोऽलङ्कारो रसाभिव्यक्तिहेतुः कवेर्भवति । उक्तप्रकारातिक्रमे तु नियमेनैव रसभङ्गहेतुः संपद्यते । लक्ष्यं च तथाविधं महाकविप्रबन्धेष्वपि दृश्यते बहुशः । तत्तु सूक्तिसहस्रद्योतितात्मनां महात्मनां दोषोद्घोषणमात्मन एव दूषणं भवतीति न विभज्य दर्शितम् । किन्तु रूपकादेरलङ्कारवर्गस्य येयं व्यञ्जकत्वे रसादिविषये लक्षणदिग्दर्शिता तामनुसरन् स्वयं चान्यल्लक्षणमुत्प्रेक्षमाणो यद्यलक्ष्यक्रमप्रतिभमनन्तरोक्तमेनं ध्वनेरात्मानमुपनिबध्नाति सुकविः समाहितचेतास्तदा तस्यात्मलाभो भवति महीयानिति ।

ध्वन्यालोक

एखादे वेळी अलंकाराचा विकास करण्याची इच्छा असूनही सुकवि तो अलंकार अंगच राहील हे कसोशीने पाहतो जसे—( यक्ष आपल्या संदेशात कान्तेला म्हणतो- ) श्यामा लतांच्या ठिकाणी तुझ्या तनुलतिकेची, बावरलेल्या हरिणींच्या नजरेत तुझ्या कटाक्षांची, चन्द्रामध्ये तुझ्या कपोलांच्या कांतीची,

मोरांच्या पिसाऱ्यात तुझ्या केशपाशाची आणि नदीच्या लहान लहान लहरींमध्ये तुझ्या भ्रूविलासांची मी कल्पना करितो. पण हाय! हे भीरु, तुझे (संपूर्ण) साम्य एके ठिकाणी कोठेच आढळत नाही!'' [१]

अशासारख्या उदाहरणांमध्ये.

तेव्हा अलंकार अशा रीतीने योजिला गेल्यास तो कवीला रसाभिव्यक्तीचे साधन म्हणून उपयोगी पडतो. पण वर सांगितलेली खबरदारी न घेता अलंकार वापरल्यास तो हटकून रसभंग घडवून आणण्यास कारण होतो. याची (म्हणजे वरील नियमांच्या उल्लंघनाची) उदाहरणे महाकवींच्या काव्यातही पुष्कळ दिसतात; पण ती आम्ही मुद्दाम वेगळी काढून उद्धृत केली नाहीत; कारण हजारो उत्कृष्ट कवने लिहून ज्यांनी आपली थोर प्रतिभा प्रकट केली, त्यांच्या दोषांची वाच्यता करणे हे आपल्यासच दूषणास्पद होते. परंतु रूपकादि अलंकार रसादींचे व्यंजक होण्याच्या निकषांबाबत आम्ही ही जी दिशा दाखवली, तिला अनुसरून आणि स्वतःही आणखी काही निकषांची कल्पना करून सुकवि जर नुकताच सांगितलेला 'अलक्ष्यक्रम' प्रकारचा आत्मा असलेले ध्वनिकाव्य अवधानपूर्वक रचील, तर त्या कवीची 'कवि' ही पदवी विशेष सार्थ होईल, हे तात्पर्य.

लोचनम्

निर्वोढुमिति। निश्शेषेण परिसमापयितुमित्यर्थः। श्यामासु सुगन्धिप्रियङ्गुलतासु पाण्डिम्ना तनिम्ना कण्टकित्वेन च योगात्। शशिनीति पाण्डुरत्वात्। उत्पश्यामीति यत्नेनोत्प्रेक्षे। जीवितसन्धारणायेत्यर्थः। हन्तेति कष्टम्। एकस्थसादृश्याभावे हि दोलायमानोऽहं सर्वत्र स्थितो न कुत्रचिदेकत्र धृतिं लभ इति भावः। भीरिति। यो हि कातरहृदयो भवति नासौ सर्वस्वमेकस्थं धारयतीत्यर्थः। अत्र ह्युत्प्रेक्षायास्तद्भावाध्यारोपरूपाया अनुप्राणकं सादृश्यं यथोपक्रान्तं, तथा निर्वाहितमपि विप्रलम्भरसपोषकमेव जातम्।

तत्तु लक्ष्यं न दर्शितमिति संबन्धः। प्रत्युदाहरणे ह्यदर्शितेऽप्युदाहरणानुशीलनदिशा कृतकृत्यतेति दर्शयति किं त्विति। अन्यल्लक्षणमिति। परीक्षाप्रकारमित्यर्थः। तद्यथावसरे त्यक्तस्यापि पुनर्ग्रहणमित्यादि। यथा ममैव।

शीतांशोरमृतच्छटा यदि कराः कस्मान्मनो मे भृशं
सम्प्लुष्यन्त्यथ कालकूटपटलीसंवाससंदूषिताः ।
किं प्राणान्न हरन्त्युत प्रियतमासंजल्पमन्त्राक्षरैः,
रक्ष्यन्ते किमु मोहमेमि हहहा ! नो वेद्मि केयं गतिः ॥

इत्यत्र रूपकसन्देहनिदर्शनास्त्यक्त्वा पुनरुपात्ता रसपरिपोषायेत्यलम् ॥ १८, १९ ॥

**लोचन**

'अलंकारांचा निर्वाह करण्याची' म्हणजे अलंकार सर्वांगपरिपूर्ण करण्याची. श्यामा लतांच्या ठिकाणी म्हणजे प्रियंगु नावाच्या सुगंधी लतांच्या ठिकाणी. कारण त्या लतांमध्ये गौरवर्ण, सडपातळपणा व काटेरीपणा[२] हे धर्म असतात. 'चन्द्रामध्ये' म्हणण्याचे कारण त्याची कान्ति (हिच्या कपोलांप्रमाणे) गौर असते. 'कल्पना करितो' म्हणजे कल्पिण्याचा प्रयत्न करितो, म्हणजे मला जगावयास आधार मिळावा, म्हणून. (पण) हाय, म्हणजे केवढी दुःखाची गोष्ट आहे की, तुझे सादृश्य कोणत्याही एका ठिकाणी नसल्यामुळे माझे मन ह्या अंशात्मक सादृश्याच्या कल्पनांमध्ये घुटमळतच राहते, ते सगळीकडे सैरावैरा धावत सुटून कोणत्याही एका ठिकाणी स्थिर होऊन राहात नाही व त्यामुळे मला मनःशांति मिळत नाही, हा भावार्थ. 'भीरु'– कारण ज्याचे मन भित्रे असते तो आपली सर्व संपत्ति, एके ठिकाणी ठेवीत नाही,[३] असा अर्थ. या श्लोकात 'उपमेय हे उपमान आहे अशी कल्पना' हेच जिचे स्वरूप आहे अशा उत्प्रेक्षेला आधारभूत असलेले सादृश्य श्लोकाच्या प्रारंभी जसे मांडले, तसेच श्लोकाच्या शेवटापर्यंत टिकवले असले तरी ते सादृश्य विप्रलंभशृंगाररसाच्या परिपोषासच कारण झाले आहे.

'ती' (म्हणजे नियमांच्या उल्लंघनांची) उदाहरणे उद्धृत केली नाहीत असा अन्वय करावा. आणि ती उलट उदाहरणे दाखविली नाहीत, तरी (नियमांच्या पालनाची) जी उदाहरणे दिली आहेत त्यांचा काळजीपूर्वक विचार केल्यास पुरेसा कार्यभाग[४] होतो हे वृत्तिकार 'परंतु' इ. शब्दांनी सांगतात. 'आणखी काही निकष' म्हणजे अलंकारांचा वापर करिताना पाळावयाच्या नियमांचे प्रकार म्हणजे उदा-

हरणार्थ योग्य वेळी सोडून दिलेला अलंकारसुद्धा (योग्य वेळ येताच) पुन्हा हातात घेणे, इ. जसे माझेच पुढील कवन—

चंद्राच्या किरणांत जर अमृताच्या राशी असतील तर ते किरण माझ्या मनाला होरपळून का काढीत आहेत ? आता ते किरण कालकूट विषाच्या सान्निध्यामुळे दाहक झाले आहेत असे म्हणावे, तर मग ते किरण तावडतोब माझे प्राण का हरण करीत नाहीत ? किंवा मी करीत असलेल्या प्रियतमेच्या नावाच्या जपरूपी मंत्राक्षरांनी माझ्या प्राणांचे रक्षण केले जात असेल काय ? पण हाय ! हाय ! मला भोवळ का येत आहे ? तेव्हा हा सर्व प्रकार आहे तरी काय, हे मला समजत नाही.

या उदाहरणात रूपक, सन्देह व निदर्शना[५] यांचा त्याग करून (रसपरिपोषाच्या दृष्टीने) त्यांचा पुन्हा स्वीकार केला गेला आहे. (दिग्दर्शनासाठी) वर दिलेले एक उदाहरण पुरेसे आहे.

टीपा

१. मेघदूतम्– १०१.
२. लतेच्या काटेरीपणासारखी असणारी नायिकेची अवस्था म्हणजे ती रोमांचित झालेली असतानाची अवस्था.
३. तू सुद्धा आपले सौंदर्य श्यामा लता, हरिणी, इ. निरनिराळ्या ठिकाणी थोड थोडे विखरून ठेवले आहेस. एकंदरीत तूही 'भीरु' आहेस हेच खरे.
४. कार्यभाग होतो म्हणजे निर्दोष काव्यरचना करण्यात मदत होते.
५. चंद्राचे किरण याच अमृताच्या राशी, हे रूपक आहे. 'ते किरण मला का होरपळून काढतात ?' असे म्हटल्याने ते किरण अमृताच्या राशी नाहीत असे म्हटल्यासारखे होऊन रूपकाचा त्याग केला जातो. आता ते किरण अमृतराशी असूनही कालकूटाने मिश्रित झाले असतील काय ? असे म्हणून रूपकाचा पुन्हा स्वीकार केला गेला आहे. चन्द्रकिरणांचे दाहकत्व विरहावस्थेमुळे जाणवत आहे किंवा ते कालकूटमिश्रित असल्यामुळे जाणवत आहे,' हा संदेह अलंकार होय. पण ते माझे प्राण का हरण करीत नाहीत असे म्हटल्याने ते कालकूटमिश्रित नाहीत असे मानिल्यासारखे होऊन संदेहाचा त्याग केला गेला. पण प्रियतमेच्या नामजपाच्या प्रभावामुळे माझ्या प्राणांचे रक्षण होत आहे असे म्हटल्याने ते किरण कालकूटमिश्रित आहेत

असे मानिल्यासारखे होऊन संदेहाचा पुन्हा स्वीकार होत आहे.

यानंतर प्रियतमेच्या नामाचा जप हीच मंत्राक्षरे हे वस्तुतः रूपक आहे. या श्लोकात निदर्शना अलंकार कोठेही सापडत नाही, तेव्हा त्याचा स्वीकार त्याग व पुन्हा स्वीकार यांचा प्रश्नच उपस्थित होत नाही. मात्र प्रियतमेचा जप हीच मंत्राक्षरे या रूपकालाच निदर्शना समजल्यास त्या अलंकाराचा 'मला मोबळ का बरे येत आहे ? असे म्हटल्याने त्याग केला जातो.' 'पण हा काय प्रकार आहे हे मला समजत नाही' असे म्हटल्याने प्रियतमानामजप ही मंत्राक्षरे असूनही मोवळ का येत आहे ते समजत नाही असे म्हटल्याने तथाकथित निदर्शनेचा पुन्हा स्वीकार केला असे मानणे शक्य आहे.

मात्र रूपकालाच निदर्शना मानणे हे बरोबर वाटत नाही. उपमान व उपमेय या दोन गोष्टी भिन्न असल्याने त्यांचा अभेद कल्पिल्यास 'असवन् वस्तुसंबन्ध' होतो असे समजून निदर्शना मानिल्यास मुखचंद्रासारखी (सर्व) रूपके निदर्शनाच होऊ लागतील व रूपक अलंकाराचे समूळ उच्चाटन होईल.

रूपकात आधी साम्य गृहीत धरून अभेद मांडलेला असतो, तर निदर्शनेमध्ये आधी अभेद गृहीत धरला जातो व शेवटी त्याचे साम्यात पर्यवसान होते. अशा रीतीने हे दोन अलंकार एकमेकांहून भिन्न आहेत.

हेमचन्द्राने काव्यानुशासन, पृ. २७१ वर अत्र ससंदेहालङ्कारस्त्यक्त्वा त्यक्त्वा पुनरुपात्तः रसपरिपोषाय । असे म्हटले आहे. म्हणजे त्याच्या मते येथे प्रथमपासून शेवटपर्यंत ससंदेह अलंकारच असून त्याचा पुन्हा पुन्हा स्वीकार केला आहे. म्हणजे हेमचंद्राच्या म्हणण्याप्रमाणे उद्भट, मम्मट इत्यादिकांनी सांगितलेल्या ससंदेह अलंकारासारखा हा अलंकार आहे.

**ध्वन्यालोकः**

> **क्रमेण प्रतिभात्यात्मा योऽस्यानुस्वानसन्निभः ।**
> **शब्दार्थशक्तिमूलत्वात् सोऽपि द्वेधा व्यवस्थितः ॥ २० ॥**

**अस्य विवक्षितान्यपरवाच्यस्य ध्वनेः संलक्ष्यक्रमव्यङ्ग्यत्वादनुरणनप्रख्यो य आत्मा सोऽपि शब्दशक्तिमूलोऽर्थशक्तिमूलश्चेति द्विप्रकारः ।**

**ध्वन्यालोक**

(आता) या ध्वनिकाव्याचा जो आत्मा घंटेच्या अनुरणनाप्रमाणे क्रमाने, म्हणजे वाच्यार्थाच्या मागाहून भासमान होतो, तोदेखील 'शब्दशक्तिमूल' आणि 'अर्थशक्तिमूल' असा दोन प्रकारचा असतो. ॥२०॥

हा, म्हणजे 'विवक्षितान्यपरवाच्य' ध्वनि 'संलक्ष्यक्रम' असल्यामुळे त्यातील प्रधान असलेला व्यंग्यार्थ घंटेच्या अनुरणनाप्रमाणे काही काळाने ध्यानात येतो. त्याचे 'शब्दशक्तिमूल' आणि 'अर्थशक्तिमूल' असे दोन प्रकार आहेत.

लोचनम्

एवं विवक्षितान्यपरवाच्यस्य ध्वनेः प्रथमं भेदमलक्ष्यक्रमं विचार्य द्वितीयं भेदं विभक्तुमाह– क्रमेणेत्यादि। प्रथमपादोऽनुवादभागो हेतुत्वेनोपात्तः। घण्टाया अनुरणनमभिघातजशब्दापेक्षया क्रमेणैव भाति। सोऽपीति। न केवलं मूलतो ध्वनिर्द्विविधः। नापि केवलं विवक्षितान्यपरवाच्यो द्विविधः। अयमपि द्विविध एवेत्यपिशब्दार्थः।

लोचन

याप्रमाणे आतापर्यंत 'विवक्षितान्यपरवाच्य' ध्वनीच्या अलक्ष्यक्रमव्यंग्य या पहिल्या प्रकारचे विवेचन केल्यावर दुसऱ्या म्हणजे (संलक्ष्यक्रमव्यंग्य या) प्रकाराचे विभाग '(आता) ... क्रमाने' इ. कारिकेने कारिकाकार वर्णितात. (संस्कृत) कारिकेच्या पहिल्या चरणाने पूर्वी सांगितलेल्याच[1] मजकुराचा पुनर्निर्देश केला असून तो पुनर्निर्देश त्यापुढील मजकुराचे[2] कारण म्हणून केला आहे. घंटेचा झणत्कार टोल्यापासून उत्पन्न होणाऱ्या पहिल्या आवाजाच्या दृष्टीने मागाहून, क्रमानेच ऐकू येतो. तोदेखील – ध्वनि हा केवळ मुळातच दोन प्रकारचा असतो[3] असे नाही, किंवा त्याच्या फक्त विवक्षितान्यपरवाच्य या प्रकाराचे दोन प्रकार[4] आहेत असेही नाही, तर हा म्हणजे विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीचा संलक्ष्यक्रमव्यंग्य हा उपप्रकारही दोन प्रकारचा असतो, हा 'देखील' या शब्दातील आशय आहे ॥ २० ॥

टीपा

१. पूर्वी याच उद्द्योतातील कारिका २ मध्ये (पृ. ३२७ वर) असलेले 'ज्याच्या बाबतीत तो (क्रम) लक्षात येतो, असा दुसरा' या शब्दांनी निर्देशिलेल्या.

२. म्हणजे २ ऱ्या चरणात अनुस्वानसंनिभः असे जे म्हटले आहे, त्याचे.

३. या प्रकारासाठी पाहा, पृ. २४४, पृ. ३०६ व पृ. ३२७.
४. पाहा, पृ. ३२७.

ध्वन्यालोकः

ननु शब्दशक्त्या यत्रार्थान्तरं प्रकाशते स यदि ध्वनेः प्रकार उच्यते, तदिदानीं श्लेषस्य विषय एवापहृतः स्यात्, नापहृत इत्याह–

आक्षिप्त एवालङ्कारः शब्दशक्त्या प्रकाशते ।
यस्मिन्ननुक्तः शब्देन शब्दशक्त्युद्भवो हि सः ॥ २१ ॥

यस्मादलङ्कारो न वस्तुमात्रं यस्मिन् काव्ये शब्दशक्त्या प्रकाशते स शब्दशक्त्युद्भवो ध्वनिरित्यस्माकं विवक्षितम् । वस्तुद्वये च शब्दशक्त्या प्रकाशमाने श्लेषः ।

यथा–
येन ध्वस्तमनोभवेन बलिजित्कायः पुरास्त्रीकृतो
यश्चोद्वृत्तभुजङ्गहारवलयो गङ्गां च योऽधारयत् ।
यस्याहुः शशिमच्छिरो हर इति स्तुत्यं च नामामराः
पायात्स स्वयमन्धकक्षयकरस्त्वां सर्वदोमाधवः ।

ध्वन्यालोक

"पण कायहो, ज्या ठिकाणी द्वयर्थी शब्दांच्या शक्तीने दुसरा अर्थ प्रकट केला जातो तो जर ध्वनीचा प्रकार असे तुम्ही म्हणत असाल तर मग आता श्लेषाचे क्षेत्रच काढून टाकल्यासारखे होईल!" अशी शंका घेतल्यास '(श्लेषाचे क्षेत्र) काढून टाकल्यासारखे होणार नाही' असे कारिकाकार (पुढील कारिकेत) म्हणतात–

ज्या उदाहरणात अलंकार हा द्वयर्थी शब्दांच्या शक्तीने 'सुचवलेल्या' स्वरूपातच प्रकाशित केला जातो व शब्दांनी वाच्य असत नाही, ते शब्दशक्त्युद्भव ध्वनीचे उदाहरण होय. ॥ २१ ॥

कारण ज्या काव्यात द्वयर्थी शब्दांच्या शक्तीने नुसती 'वस्तु' नव्हे, तर 'अलंकार' सुचवला जात असेल, ते शब्दशक्त्युद्भव (अलंकार) ध्वनीचे उदाहरण होय, असे आम्हाला म्हणायचे आहे' आणि द्वयर्थी शब्दशक्तीने दोन 'वस्तु'चाचा बोध होत असेल तर मात्र तो श्लेष. जसे[१] —

ज्याने लहानपणी गाडा ( गाड्याचे रूप घेतलेला असुर )[३] मोडला, अजन्मा असलेल्या ज्याने दानवांना जिंकणाऱ्या आपल्या शरीराचे स्त्रीमध्ये ( मोहिनीमध्ये ) रूपांतर केले, उन्मत्त भुजंगाला ( कालियाला ) ज्याने मारिले, जो शब्दाशी ( म्हणजे ' अ ' काराशी ) एकरूप आहे, ज्याने ( गोवर्धन ) पर्वत व पृथ्वी उचलून धरिली, ' चन्द्राला गिळणाऱ्या राहूचा शिरच्छेद करणारा ' असे गौरवास्पद नाव ज्याला देव देतात, ज्याने स्वतः होऊन अंधक नावाच्या लोकांसाठी द्वारकानगरी उभारली.[४] तो सर्व देणारा लक्ष्मीपति ( विष्णु ) तुमचे रक्षण करो.

दुसरा अर्थ—

" ज्याने मदनाचा नाश केला, पूर्वी त्रिपुरासुरवधाच्या वेळी ज्याने विष्णूच्या शरीराला बाण बनवले, उद्दाम सर्पांचा जो हार व बाहुभूषण म्हणून उपयोग करितो, ज्याने गंगा धारण केली, ज्याने मस्तकी चन्द्रकोर धरिली आहे आणि ज्याचे ' हर ' असे प्रशंसनीय नाव आहे असे देव म्हणतात व जो स्वतः अंधकासुराचा नाश करणारा आहे, तो उमापति ( शंकर ) तुमचे सदैव रक्षण करो. "

लोचनम्

कारिकागतं हिशब्दं व्याचष्टे– यस्मादिति । अलङ्कारशब्दस्य व्यवच्छेद्यं दर्शयति– न वस्तुमात्रमिति । वस्तुद्वये चेति । चशब्दस्तुशब्दस्यार्थे । येनेति । येन ध्वस्तं बालक्रीडायामनः शकटम् । अभवेनाजेन सता । बलिनो दानवान् यो जयति तादृग्येन कायो वपुः पुरामृतहरणकाले स्त्रीत्वं प्रापितः । यश्चोद्वृत्तं समदं कालियाख्यं भुजङ्गं हतवान् । रवे शब्दे लयो यस्य । ' अकारो विष्णुः ' इत्युक्तेः । यश्चागं गोवर्धनपर्वतं गां च भूमिं पातालगतामधारयत् । यस्य च नाम स्तुत्यमृषयः आहुः । किं तत् ? शशिनं मथ्नातीति क्विप् राहुः, तस्य शिरोहरो मूर्धापहारक इति । स त्वां माधवो विष्णुः सर्वदः पायात् । कीदृक् ? अन्धकनाम्नां जनानां येन क्षयो निवासो द्वारकायां कृतः । यदि वा मौसले इषिकाभिस्तेषां क्षयो विनाशो येन कृतः । द्वितीयोऽर्थः — येन ध्वस्तकामेन सता बलिजितो विष्णोः सम्बन्धी कायः पुरा त्रिपुरनिर्दहनावसरेऽस्त्रीकृतः शरत्वं नीतः । उद्वृत्ता भुजङ्गा एव हारा वलयाश्च यस्य, मन्दाकिनीं च

योऽधारयत् । यस्य च ऋषयः शशिमच्चन्द्रयुक्तं शिर आहुः, हर इति च यस्य नाम स्तुत्यमाहुः, स भगवान्स्वयमेवान्धकासुरस्य विनाशकारी त्वां सर्वदा सर्वकालमुमाया धवो वल्लभः पायादिति । अत्र वस्तुमात्रं द्वितीयं प्रतीतं नालङ्कार इति श्लेषस्यैव विषयः ।

लोचन

आता वृत्तिकार (२१ व्या) कारिकेतील हि या शब्दाचे व्याख्यान 'कारण' या शब्दाने करितात. 'अलंकार' या शब्दामुळे काय वर्ज्य करावयाचे, ते वृत्तिकार 'कोणताही केवळ वस्तुरूप अर्थ नव्हे' या शब्दांनी सांगतात. 'आणि शब्दाचा अर्थ 'पण' असा आहे.

'ज्याने' – ज्याने लहानपणी खेळ खेळताना अनः म्हणजे गाडा मोडून टाकला. जो स्वतः अ–भव म्हणजे अजन्मा असून प्रबल दानवांना जिंकणाऱ्या आपल्या शरीराला ज्याने पूर्वी म्हणजे अमृत हिराबून घेण्याच्या प्रसंगी[५] स्त्रीरूप दिले. आणि ज्याने 'उद्‌वृत्त' म्हणजे माजलेल्या कालिया नावाच्या नागाला ठार मारले. शब्दाशी म्हणजे अकाराशी जो एकरूप आहे, कारण 'अकार हा विष्णूच होय'[६] असे वचन आहे. आणि ज्याने अगम् म्हणजे गोवर्धन पर्वताला व गाम् म्हणजे पृथ्वीला ती खाली पाताळात गेली असताना उचलून धरिले आणि ज्याला एक प्रशंसनीय नाव ऋषींनी[७] दिले आहे. ते नाव कोणते ? तर 'चन्द्राला गिळणाऱ्या राहूचा शिरोहर म्हणजे मस्तक उडविणारा' असे. शशिमथ् यात मन्थ् या धातूला क्विप् हा प्रत्यय लागलेला आहे.[८] तो 'सर्वद' (म्हणजे भक्तांचे सर्व मनोरथ पुरविणारा) माधव म्हणजे विष्णु तुझे रक्षण करो. कसा माधव ? तर अंधक[९] नावाच्या लोकांसाठी ज्याने द्वारकानगरीमध्ये 'क्षय' म्हणजे निवासस्थान उभारले, किंवा महाभारतातील मौसल पर्वामध्ये सांगितल्याप्रमाणे ज्याने 'एरका' नावाच्या गवताने त्या अंधक लोकांचा नाश केला.[१०] (याच श्लोकाचा) दुसरा (शंकराला लागू पडणारा) अर्थ – ज्याने मदनाचा नाश केला व ज्याने बळीला जिंकणाऱ्या विष्णूच्या देहाचे, पूर्वी म्हणजे त्रिपुरासुराच्या तीन नगरींना जाळण्याच्या प्रसंगी 'अस्त्र' बनविले म्हणजे त्याचा बाण म्हणून उपयोग केला. उद्दाम अशा सर्पांना जो आपल्या

गळयातले हार व हातातली सलकडी म्हणून वापरतो, मंदाकिनीला ज्याने आपल्या जटांमध्ये धारण केले आणि ज्याचे शिर शशिमत् म्हणजे चन्द्रकोरीने मंडित आहे व ज्याचे 'हर' असे गौरवास्पद नाम आहे असे ऋषिजन म्हणतात, तो भगवान् उमेचा धव म्हणजे प्रिय पति, स्वतःच अंधकासुराचा विनाशकर्ता असलेला,[११] तुझे सर्वदा म्हणजे सर्ववेळी रक्षण करो. या उदाहरणात दुसरा शिवस्तुतिरूप केवळ वस्तुस्वरूपी असलेलाच अर्थ प्रत्ययास येतो, अलंकार प्रत्ययास येत नाही, म्हणून हा श्लोक हे श्लेष या वाच्य अलंकाराचेच उदाहरण होय ( शब्दशक्तिमूल वस्तुध्वनीचे नाही.)

टीपा

१. या व पुढल्या वाक्यावरून वाचकांचा असा ग्रह होण्याचा संभव आहे की, आनंदवर्धनांच्या मते द्व्यर्थी शब्दयोजनेमुळे जेथे दोन्ही अर्थ वाच्य म्हणूनच प्रकट होत असतील तेथेच नव्हे, तर जेथे दुसरा अर्थ सूचित होत असूनही तो जर केवळ वस्तुरूपच असेल, तरी तेथेही श्लेषालंकारच समजावा. असा समज 'काव्यालंकारसारसंग्रह' या ग्रंथाचा टीकाकार 'प्रतीहारेन्दुराज' याचाही झाला आहे, कारण तो त्या टीकेत (पृ. ८९ वर) म्हणतो-- **तत्र वाचकशक्त्याश्रयम् (व्यंजकत्वम्) एकप्रकारम् । तत्र हि अलंकारा एव व्यज्यन्ते न तु वस्तुमात्रम्, नापि रसादयः । वाच्यशक्त्याश्रयं तु रसादि-वस्तुमात्र-अलंकार व्यक्तिहेतुत्वात् त्रिविधम् ।**

पण वरील ग्रह सर्वस्वी बरोबर म्हणता येत नाही, कारण याच उद्द्योतातील (काशी आवृत्ति, पृ. २५२ वरील) **बाले मा गा विषादं** (बाळे, विषादाप्रद जाऊ नकोस) इ. उदाहरणात पहिल्या दोन चरणांतील द्व्यर्थी शब्दांच्या सामर्थ्यामुळे अलंकार सूचित होत नाही, तर 'इतर देवांचे निराकरण' हा वस्तुरूप अर्थच सूचित होत आहे पण तो वस्तुरूप अर्थ कवीने तिसऱ्या चरणातील '(इतर) देवांचे निराकरण करवून' इ. शब्दांनी वाच्य करून टाकला आहे. तो तसा वाच्य केला नसता, तर आनंदवर्धनांनी या पद्याला शब्दशक्तिमूल वस्तुध्वनीचे उदाहरणच मानले असते. तिसऱ्या उद्द्योतातील (काशी आवृत्ति पृ. ५१५ वरील) **अहिणअपओअ-** (नवोदित मेघांची) इ. उदाहरणात शब्दशक्तिमूलध्वनि आहे असे आनंदवर्धनांनी वृत्तीत स्पष्टपणे म्हटले आहे. त्या उदाहरणात वाच्य अलंकार आहेत, पण व्यंग्य अर्थ अलंकारस्वरूप नसल्याने ते उदाहरण वस्तुध्वनी-चेच आहे. तेव्हा आनंदवर्धनांना शब्दशक्तिमूल वस्तुध्वनि हा प्रकारच मान्य नव्हता असे म्हणता येणार नाही. मम्मटादि सर्व उत्तरकालीन ध्वनिवादी लेख-

कांनी शब्दशक्त्युद्भव वस्तुध्वनीला जी मान्यता दिली आहे (उदा. पाहा, काव्यप्रकाश, उल्लास ४, कारिका ३८–३९), ती आनंदवर्धनांच्या मताविरुद्ध असण्याचे कारण नाही. प्रस्तुत २१ व्या कारिकेत शब्दशक्तिमूल अलंकारध्वनीचे विवरण करण्यात आले आहे व त्या कारिकेत किंवा तीवरील वृत्तीमध्ये शब्दशक्तिमूल वस्तुध्वनीचा खास उल्लेख केलेला नसला, तरी ज्या काव्यात द्व्यर्थी शब्दांच्या शक्तीने केवळ 'म्हणजे अलंकारस्वरूपी नसलेली 'वस्तु' मुख्यत्वाने व सुंदरपणे सूचित होत असेल ते उदाहरण शब्दशक्तिमूल वस्तुध्वनीचे होय. अलंकारध्वनीचे नव्हे, हे आनंदवर्धनांना अभिप्रेत असले पाहिजे.

या संदर्भात याच उद्द्योतातील कारिका ३१ नंतरची टीप ९ वी पाहा.

२. पुढील उदाहरण आनंदवर्धनांनी श्लेषाचे म्हणूनच दिले आहे. यावरील टीकेत अभिनवगुप्तही म्हणतात की, येथे जे दोन अर्थ प्रतीत होतात ते वस्तुस्वरूपच आहेत, म्हणून हे उदाहरण श्लेषाचेच होय.

३. हा प्रसंग विष्णुपुराण, सर्ग ५, अध्याय ६ मध्ये पाहा.

४. या प्रसंगाची माहिती महाभारतातील मौसलपर्वात आढळते. खाली टीप १० वी पाहा.

५. ज्या अमृतावर दानवांचाही डोळा होता, ते केवळ देवांनाच मिळावे, यासाठी.

६. पाहा, श्रीमद्भगवद्गीता, १०–३३ मधील अक्षराणामकारोऽस्मि । हे वचन.

७. मुळात अमराः असा शब्द आहे. पण अभिनवगुप्तांनी त्याचे विवरण ऋषयः असे केले आहे. तेव्हा अभिनवगुप्तांपुढे नामामराः याऐवजी नामर्षयः असा पाठ होता की काय कोण जाणे.

८. हा प्रत्यय अष्टाध्यायी ३–२–७५ व ७६ या सूत्रांनुसार लागला आहे.

९. यादवांच्या समाजापैकी एक कुळ.

१०. विश्वामित्रादि ऋषींच्या शापामुळे यादवांमध्ये जेव्हा यादवी माजली तेव्हा ते 'एरका' नावाच्या गवताच्या काड्या घेऊन परस्परांना मारू लागले. हे प्रकरण विकोपाला गेल्यावर कृष्णही क्रुद्ध झाला व तेच 'एरका' गवत एका मुठीत घेऊन उरल्यासुरल्या यादवांचा त्याने संहार केला. अभिनवगुप्तांच्या जवळील मूळ महाभारताच्या पोथीत 'एरका' याऐवजी 'इषिका' हा पाठ असल्यास नकळे.

११. 'स्वतःच' या शब्दाचा संबंध 'अंधकासुराचा विनाशकर्ता असलेला' याकडे घेण्यापेक्षा 'तुझे रक्षण करो' याकडे घेणे अधिक योग्य वाटते.

ननु अलङ्कारान्तरप्रतिभायामपि श्लेषव्यपदेशो भवतीति दर्शितं भट्टोद्भटेन, तत्पुनरपि शब्दशक्तिमूलो ध्वनिर्निरवकाश इत्याशङ्क्येदमुक्तम् 'आक्षिप्तः' इति। तदयमर्थः — यत्र शब्दशक्त्या साक्षादलङ्कारान्तरं वाच्यं सत्प्रतिभासते स सर्वः श्लेषविषयः। यत्र तु शब्दशक्त्या सामर्थ्याक्षिप्तं वाच्यव्यतिरिक्तं व्यङ्ग्यमेवालङ्कारान्तरं प्रकाशते स ध्वनेर्विषयः। शब्दशक्त्या साक्षादलङ्कारान्तरप्रतिभा यथा–

तस्या विनापि हारेण निसर्गादेव हारिणौ।
जनयामासतुः कस्य विस्मयं न पयोधरौ॥

अत्र शृङ्गारव्यभिचारी विस्मयाख्यो भावः साक्षाद्विरोधालङ्कारश्च प्रतिभासत इति विरोधच्छायानुग्राहिणः श्लेषस्यायं विषयः, न त्वनुस्वानोपमव्यङ्ग्यस्य ध्वनेः। अलक्ष्यक्रमव्यङ्ग्यस्य तु ध्वनेर्वाच्येन श्लेषेण विरोधेन वा व्यञ्जितस्य विषय एव। यथा ममैव—

श्लाघ्याशेषतनुं सुदर्शनकरः सर्वाङ्गलीलाजित—
त्रैलोक्यां चरणारविन्दललितेनाक्रान्तलोको हरिः।
बिभ्राणां मुखमिन्दुरूपमखिलं चन्द्रात्मचक्षुर्दध—
त्स्थाने यां स्वतनोरपश्यदधिकां सा रुक्मिणी वोऽवतात्॥

अत्र वाच्यतयैव व्यतिरेकच्छायानुग्राही श्लेषः प्रतीयते। यथा च–

भ्रमिमरतिमलसहृदयतां प्रलयं मूर्च्छां तमः शरीरसादम्।
मरणं च जलदभुजगजं प्रसह्य कुरुते विषं वियोगिनीनाम्॥

यथा वा–

चमढिअमाणसकंचणपंकअणिम्महिअपरिमला जस्स।
अक्खुडिअदाणपसरा बाहुप्फलिहाच्चिअ गइंदा॥
( खण्डितमानसकाञ्चनपङ्कजनिर्मथितपरिमला यस्य।
अखण्डितदानप्रसरा बाहुपरिघा इव गजेन्द्राः॥ इति छाया )

अत्र रूपकच्छायानुग्राही श्लेषो वाच्यतयैवावभासते।

"पण काय हो, कोणत्याही उदाहरणात द्व्यर्थी शब्दयोजनेमुळे अलंकाराचा बोध झाला असतानाही ते उदाहरण श्लेषाचेच म्हणावे असे भट्टोद्‌भटाने[1] दाखवले असल्यामुळे या ( तुमच्या ) शब्दशक्तिमूल ध्वनीला कुठे जागाच नाही ! " अशी शंका घेतली जाणार हे जाणूनच ( कारिकेत ) 'आक्षिप्त' ( सुचवलेला ) हा शब्द ( मुद्दाम ) घातला आहे. तेव्हा मग कारिकेचा अर्थ असा—

ज्या ठिकाणी द्व्यर्थी शब्दांच्या शक्तीने दुसरा अलंकार साक्षात् वाच्य म्हणून प्रतीत होत असेल ती सगळी श्लेषाची उदाहरणे; पण ज्या उदाहरणात द्व्यर्थी शब्दांच्या शक्तीने वाच्यार्थाच्या सामर्थ्याने वाच्यार्थाहून निराळा अलंकार व्यंग्य स्वरूपातच प्रकाशित होत असेल, ती उदाहरणे ध्वनीची समजावी. द्व्यर्थी शब्दांच्या शक्तीने सरळ ( वाच्यत्वाने ) दुसऱ्या अलंकाराचा बोध होतो असे उदाहरण पुढीलप्रमाणे—

'हाराशिवायदेखील निसर्गतः च हारि ( १. हारयुक्त, २. मनोहर ) अशा तिच्या पयोधरांनी कोणाच्या अन्तःकरणात विस्मय उत्पन्न केला नाही ? "

या श्लोकात शृंगाररसाचा 'विस्मय' नावाचा व्यभिचारिभाव आणि विरोधालंकार शब्दांनी[2] वाच्य केले असल्यामुळे हे उदाहरण ( वाच्य ) विरोधाभासाच्या सौंदर्याला पोषक अशा श्लेषाचे आहे. अनुरणनरूप व्यंग्यार्थ असलेल्या ध्वनीचे नव्हे. मात्र यातल्या वाच्य श्लेषाने म्हणा, किंवा वाच्य विरोधाने म्हणा, सुचवल्या जाणाऱ्या अलक्ष्यक्रम-व्यंग्याचे ( शृंगाररसाचे ) हे उदाहरण जरूर होईल. ( किंवा ) जसे माझाच पुढील श्लोक—

"ती रुक्मिणी तुमचे रक्षण करो. ती आपल्या तनूहून वरचढ आहे हे कृष्णाला कळून आले, ते योग्यच झाले. कारण त्याचे हातच दिसायला चांगले आहेत ( दुसरा अर्थ – त्याने हातात 'सुदर्शन' घेतले आहे ), तर तिची सर्वच तनु सुंदर आहे; त्याने आपल्या केवळ पदकमलाच्या एकेका प्रक्षेपाने एकेकाच भुवन व्यापले, तर तिने आपल्या सर्व शरीराच्या मोहक लीलांनी त्रैलोक्य जिंकले. चन्द्र म्हणजे त्याचा एक डोळाच आहे, तर तिचे सर्व मुखच चन्द्ररूप आहे. "

येथे ( वाच्य ) व्यतिरेकाला[3] उपकारक असलेला श्लेष वाच्य असल्या-चेच प्रत्ययाला येते. आणखी उदाहरण—

"मेघरूपी सर्पापासून उत्पन्न होणारे विष ( १. पाणी, २. गरळ ) हे विरहिणींना चक्कर येणे, कशातच गोडी न वाटणे, अंतःकरणास बधिरता येणे, डोळ्यांपुढे अंधेरी, गुंगी, बेशुद्धी, शरीराला ग्लानि येणे आणि मरण असे परिणाम जबरदस्तीने भोगायला लावते."

किंवा—

त्या राजाचे परिघाप्रमाणे ( म्हणजे दरवाजाच्या अडसराप्रमाणे बलशाली ) असणारे बाहू हेच त्याचे मदोन्मत्त हत्ती होते. ( कारण ) त्याच्या बाहूंनी शत्रुहृदयरूपी सुवर्णकमळांना निराश करून त्यांना चिरडून टाकले होते व त्यामुळे त्या राजाच्या पराक्रमाची कीर्ति सर्वत्र पसरली होती. व त्याचे बाहु अखंड दान करीत असत ( दुसरा अर्थ — त्याच्या मदोन्मत्त हत्तींनी मानससरोवरातील कमळांची नासधूस केल्यामुळे त्या कमळांचा परिमल आसमंतात पसरला होता. आणि त्याच्या मदोन्मत्त हत्तींच्या गंडस्थळांतून मदजलाचा अविच्छिन्नपणे स्राव होत असे. )

या ( दोन्ही ) श्लोकांत ( रूपक वाच्य असल्यामुळे ) रूपकाचे सौंदर्य वाढवणारा श्लेष वाच्य म्हणूनच प्रत्ययाला येतो.

लोचनम्

आक्षिप्तशब्दस्य कारिकागतस्य व्यवच्छेद्यं दर्शयितुं चोद्यमुपक्रमते— नन्वलङ्कारेत्यादिना ।

तस्या विनापीति । अपिशब्दोऽयं विरोधमाचक्षाणोऽर्थद्वयेऽप्यभिधाशक्तिं नियच्छति, हरतो हृदयमवश्यमिति हारिणौ । हारो विद्यते ययोस्तौ हारिणाविति । अत एव विस्मयशब्दोऽप्यैवार्थस्योपोद्बलकः । अपिशब्दाभावे तु न तत एवार्थद्वयस्याभिधा स्यात्, स्वसौन्दर्यादेव स्तनयोर्विस्मयहेतुत्वोपपत्तेः । विस्मयाख्यो भाव इति दृष्टान्ताभिप्रायेणोपात्तम् । यथा विस्मयः शब्देन प्रतिभाति विस्मय इत्यनेन शब्देन तथा विरोधोऽपि प्रतिभात्यपीत्यनेन शब्देन । ननु किं सर्वथात्र ध्वनिर्नास्तीत्याशङ्क्याह— अलक्ष्येति । विरोधेन वेति । वाग्रहणेन श्लेषविरोधसङ्करालङ्कारोऽयमिति दर्शयति, अनुग्रहयोगादेकतरत्यागग्रहणनिमित्ताभावो हि वाशब्देन सूच्यते । सुदर्शनं चक्रं करे यस्य । व्यतिरेकपक्षे सुदर्शनौ श्लाघ्यौ करावेव यस्य । चरणारविन्दस्य ललितं त्रिभुवनाक्रमणक्रीडनम् ।

चन्द्ररूपं चक्षुर्धारयन्। वाच्यतयैवेति। स्वतनोरधिकामिति शब्देन व्यतिरेकस्योक्तत्वात्। भुजगशब्दार्थपर्यालोचनाबलादेव विषशब्दो जल-मभिधायापि न विरन्तुमुत्सहते, अपि तु द्वितीयमर्थं हालाहललक्षणमाह। तदभिधानेन विनाभिधाया एवासमाप्तत्वात्। भ्रमिप्रभृतीनां तु मरणान्तानां साधारण एवार्थः। निराशीकृतत्वेन खण्डितानि यानि मानसानि शत्रुहृदयानि तान्येव काञ्चनपङ्कजानि ससारत्वात्। तैर्हेतुभूतैः। णिम्मढिअपरिमला इति। प्रसृतप्रतापसाराः। अखण्डितवितरणप्रसरा* बाहुपरिघा एव यस्य गजेन्द्रा इति। गजेन्द्रशब्दवशाच्चमढिअशब्दः परिमलशब्दो दानशब्दश्च त्रोटनसौरभमदलक्षणानर्थान्प्रतिपाद्यापि न परिसमाप्ताभिधाव्यापारा भवन्तीत्युक्तरूपं द्वितीयमप्यर्थमभिदधत्येव।

लोचन

'सुचविलेल्या स्वरूपात' या (कारिकेतील) शब्दाने काय वर्ज्य करावयाचा कारिकाकारांचा उद्देश आहे ते दाखविण्यासाठी वृत्तिकार 'पण काय हो' या शब्दांनी प्रतिपक्ष्याचा आक्षेप मांडून प्रारंभ करितात.

'हाराशिवाय देखील'... इ.— यातला 'देखील' हा शब्द विरोधाचा वाचक असून तो 'हारी' या शब्दाची अभिधाशक्ति पुढील दोन्ही अर्थांच्या बाबतीत निश्चित करितो.[४] हटकून हृदय 'हरण करितात' ते हारी आणि ज्यांवर हार रुळत आहे ते हारी, असे ते दोन अर्थ. म्हणूनच 'विस्मय' हा शब्दही हारी या शब्दाच्या दोन अर्थांचे वाचकत्व या धर्मालाच पोषक असा आहे. 'देखील' हा शब्द येथे वापरला नसता,[५] तर केवळ हारी या शब्दानेच आता जे दोन्ही अर्थ वाच्य केले जात आहेत, ते केले गेले नसते, कारण स्तन हे आपल्या स्वतःच्या सौंदर्यानेच विस्मय उत्पन्न करण्यास कारण होतात हे मान्य होण्यासारखे आहे. 'विस्मय नावाचा व्यभिचारिभाव' असे जे शब्द वृत्तीत योजिले आहेत, ते दृष्टांत म्हणून योजिले आहेत. म्हणजे 'विस्मय' हा (व्यभिचारिभावरूप) अर्थ जसा शब्दाने म्हणजे विस्मय

* कल्पलताविवेकामध्ये (पृ. १३८) वितरण या ऐवजी 'विश्राणन' असा पाठ आहे.

या शब्दाने वाच्य होत आहे. तसाच विरोधस्वरूपी अर्थही 'देखील' या शब्दाने वाच्य होत आहे.

शंका – पण काय हो, या पद्यात ध्वनि मुळीच नाही का ? अशी शंका कल्पून (वृत्तिकार) तिचे समाधान 'मात्र यातल्या... अलक्ष्यक्रमव्यंग्याचे' इ. वाक्याने करितात. 'किंवा (वाच्य) विरोधाने म्हणा,' इ.... 'किंवा' या (येथे समुच्चयवाचक असलेल्या शब्दाने वृत्तिकारांना असे दाखवावयाचे आहे की, येथे श्लेष व विरोध यांचा (अंगांगिभाव–) संकर हा अलंकार आहे. कारण येथील श्लेष व विरोध यांमध्ये एक अनुग्राहक व दुसरा अनुग्राह्य असा संबंध प्रत्ययास येत असल्याने त्यांपैकी एकाचा त्याग व दुसऱ्याचे ग्रहण करावयास अनुकूल असे काहीही कारण नाही असे 'वा' या शब्दाने सुचविले जात आहे.

सुदर्शन नावाचे चक्र ज्याच्या हातात आहे असा. व्यतिरेक अलंकाराच्या संदर्भात सुदर्शन म्हणजे दर्शनीय आहेत फक्त हातच ज्याचे, असा. चरणकमलाची लीला म्हणजे त्रैलोक्याला व्यापण्याचा पराक्रम. चंद्ररूपी (एकच) नेत्र धारण करणारा. 'वाच्य असल्याचेच'– 'ती आपल्या तनूहून वरचढ' यातील 'वरचढ' या शब्दाने व्यतिरेक 'वाच्य' झाला असल्यामुळे.[६]

('मेघरूपी सर्पापासून' इ. पद्यात) 'सर्प' शब्दाचा वाच्य अर्थ लक्षात आल्यामुळेच 'विष' हा शब्द आपला 'पाणी' हा अर्थ (अभिधेने) सांगून झाल्यावरही आपले अर्थ सांगण्याचे कार्य थांबवीत नाही, तर तो 'हालाहल' या स्वरूपाच्या आपल्या दुसऱ्या अर्थाचाही (अभिधेनेच) बोध करून देतो. कारण तो दुसरा अर्थ सांगितल्यावाचून त्याच्या अभिधेचेच कार्य पूर्ण होत नाही. 'चक्कर येणे' यापासून 'मरण' पर्यंतच्या सर्व शब्दांचा अर्थ मेघ व सर्प या दोघांनाही सारखाच लागू पडणारा आहे.[७]

('त्या राजाचे' इ. पद्यात) निराश करून टाकल्यामुळे चुरगळली गेलेली जी मने म्हणजे शत्रूंची अंतःकरणे, तीच कोणी सुवर्णकमळे, त्यामुळे. (त्यांना सुवर्णकमळे म्हणण्याचे) कारण ती कठीण (किंवा टणक) होती. पराक्रमाची कीर्ति पसरली होती– ज्याच्या बाहूंच्या

पराक्रमाचे सार (म्हणजे यश चहूकडे) प्रसृत झाले होते. अखंड दान करीत–म्हणजे जे बाहु अखंडपणे दान करीत राहण्यात मग्न होत असत. ज्याचे बाहुरूपी अडसर हेच कोणी मदोन्मत्त हत्ती. 'मदोन्मत्त हत्ती' या शब्दांमुळे, 'खण्डित' या शब्दाने, तसेच 'परिमल' व 'दान' या शब्दांनी अनुक्रमे चिरडणे, सुगंध व मद या स्वरूपाच्या अर्थांचा बोध (अभिधेने) करून दिल्यावरही त्यांच्या अभिधेचे कार्य पुरे होत नाही, म्हणून ते शब्द वरील विवरणात सांगितलेल्या त्यांच्या दुसऱ्या अर्थांचेही वाचक आहेत.

टीपा

१. इचर्थी शब्दयोजनेतून जरी (श्लेषाखेरीज) दुसऱ्या अलंकाराचा बोध झाला, तरी तेथे श्लेषच अलंकार समजावा. दुसरा अलंकार तेथे प्रत्यक्ष शब्दांनी मांडलेला नसतो, तर श्लेषामुळे त्याचा आभास उत्पन्न होतो, म्हणून श्लेष हा त्या आभासस्वरूप अलंकाराचा बाधक होतो हे उद्भटपक्षीयांचे मत. पाहा, उद्भट, 'काव्यालंकारसारसंग्रह', ४–९, १०.
अशा ठिकाणी दुसऱ्या अलंकाराकडून श्लेषाचाच बाध होतो असे इतर काहींचे मत, तर आणखी काही लोक तेथे श्लेष व तो दुसरा अलंकार हे दोन्हीही संकीर्ण स्वरूपात असतात असे म्हणतात. पाहा, रसगंगाधर, श्लेषालंकार प्रकरण, पृ. ५२६–५२९ (निर्णयसागर आवृत्ति १९४७)
२. श्लोकात 'विस्मय' हा शब्दच वापरला म्हणून तो व्यभिचारी वाच्य झाला, व 'देखील' हा शब्द वापरल्याने विरोधालंकारही वाच्य झाला. विस्मय हा जरी अद्भुत रसाचा स्थायी भाव असला, तरी तो येथे शृंगाररसाला पोषक म्हणून वापरल्याने तो शृंगाराचा 'व्यभिचारी' झाला आहे.
३. 'आपल्या तनूहून वरचढ' या शब्दांमुळे व्यतिरेक हा अलंकार वाच्यच झाला आहे.
४. 'देखील' हा शब्द विरोधाचा वाचक असल्यामुळे तो हारिणी या शब्दाला प्रथम विरोधाला उपकारक असा 'हारयुक्त' हा अर्थ अभिधेने दाखवायास लावतो, पण त्या विरोधाचा परिहार होणे हेही आवश्यक असल्याने तोच, 'देखील' हा शब्द 'मनोहारी' हा दुसरा अर्थही अभिधेनेच दाखवायास लावतो. म्हणून अभिनवगुप्तांनी 'देखील' 'हा शब्द हारी या शब्दाची अभिधाशक्ति दोन्ही अर्थांच्या बाबतीत निश्चित करितो' असे म्हटले आहे.
५. म्हणजे येथे **विनापि हारेण** यांऐवजी **विनैव हारेण** यांसारखे शब्द वापरले

असते, तर हारिणी याच्या केवळ 'मनोहर' याच अर्थाचा प्रत्यय आला असता, 'हारयुक्त' या अर्थाचा आला नसता. तो प्रत्यय 'देखील' या शब्दाने येतो.

६. म्हणजे एखाद्या पद्यातील अलंकार जर वाच्य असला व तो अलंकार श्लेषा-वर आधारित असला, तर तो श्लेषही वाच्यच मानला पाहिजे. याउलट अलंकार व्यंग्य असेल, तर त्याला आधारभूत श्लेषही व्यंग्यच होय, हेच मत आनंदवर्धनांनी सर्वत्र स्वीकारलेले आहे.

७. कारण चक्कर येणे इ. अर्थ हे मेघजल आणि सर्पविष या दोहोंचेही परिणाम आहेत. अशा रीतीने या शब्दांत अर्थश्लेष असून विष या शब्दात मात्र शब्दश्लेष आहे, म्हणून हे पद्य वाच्य श्लेषाचे उदाहरण आहे

८. 'स–सार' हा शब्द कालिदासाने कुमारसंभव, ५–१९ मध्ये वापरला असून पार्वतीचे शरीर जणू 'कान्चनपद्मनिर्मित' होते, असेही म्हटले आहे.

९. म्हणजे निरास करून टाकणे, पराक्रमाची कीर्ति व (सत्पात्री) दान करणे या तीन अर्थांचे.

ध्वन्यालोकः

स चाक्षिप्तोऽलङ्कारो यत्र पुनः शब्दान्तरेणाभिहितस्वरूपस्तत्र न शब्दशक्त्युद्भवानुरणनरूपव्यङ्ग्यध्वनिव्यवहारः । तत्र वक्रोक्त्यादि-वाच्यालङ्कारव्यवहार एव ।

यथा –

दृष्ट्या केशव गोपरागहृतया किञ्चिन्न दृष्टं मया
तेनैव स्खलितास्मि नाथ पतितां किं नाम नालम्बसे ।
एकस्त्वं विषमेषु खिन्नमनसां सर्वाबलानां गति-
र्गोप्यैवं गदितः सलेशमवताद् गोष्ठे हरिर्वश्चिरम् ॥

एवंजातीयकः सर्व एव भवतु कामं वाच्यश्लेषस्य विषयः ।

ध्वन्यालोक

आणि तो अलंकार सुचवलेला असून देखील ज्या उदाहरणात त्याचे स्वरूप पुन्हा दुसऱ्या एखाद्या शब्दाने वाच्य केले जाते, ते उदाहरण शब्द-शक्त्युद्भव अनुरणनरूप ध्वनीचे म्हणता येणार नाही. ते वक्रोक्ति[१] वगैरेसारख्या वाच्य अलंकाराचेच उदाहरण म्हणावे लागेल. जसे––

"हे केशवा ! गायींच्या खुरांनी उडालेले धुळीचे कण डोळ्यांत गेल्याने

( दुसरा अर्थ – हे केशवगोपाळा ! प्रेमाने दृष्टी अंध झाल्याने ) मला काही दिसले नाही, म्हणून मी अशी घसरले. ( दुसरा अर्थ—माझे असे वाकडे पाऊल पडले ). हे नाथा, ( रक्षणकर्त्या ! ) मी पडलेली असताना तू मला आधार का देत नाहीस ? ( दुसरा अर्थ–हे प्राणेश्वरा, तू माझे पतित्व का स्वीकारीत नाहीस ? ) तू एकटाच संकटामुळे खिन्नहृदय झालेल्या ( दुसरा अर्थ– मदन-पीडित झालेल्या ) सर्व दुर्बलांचे ( दुसरा अर्थ–सर्व स्त्रियांचे ) आश्रयस्थान आहेस, " असे गोपीने सूचकपणे[२] ज्याला गोकुळात म्हटले, तो कृष्ण आपले चिरकाल रक्षण करो !

यासारखी सर्व उदाहरणे ही कुशल वाचःश्लेषाची समजावीत.

लोचनम्

एवमाक्षिप्तशब्दस्य व्यवच्छेद्यं प्रदर्श्यैवकारस्य व्यवच्छेद्यं दर्शयितुमाह– स चेति । उभयार्थप्रतिपादनशक्तशब्दप्रयोगे, यत्र तावदेकतरविषयनियमनकारणमभिधाया नास्ति, यथा 'येन ध्वस्तमनोभवेन' इति । यत्र वा प्रत्युत द्वितीयाभिधाव्यापारसद्भावावेदकं प्रमाणमस्ति, यथा 'तस्या विना' इत्यादौ, 'चमहिअ' इत्यन्ते । तत्र तावत् सर्वथा सोऽर्थोऽभिधेय एवेति स्फुटमदः । यत्राप्यभिधाया एकत्र नियमहेतुः प्रकणादिर्विद्यते तेन द्वितीयस्मिन्नर्थे नाभिधा संक्रामति, तत्र द्वितीयोऽर्थोऽसावाक्षिप्त इत्युच्यते; तत्रापि यदि पुनस्तादृक्छब्दो विद्यते येनासौ नियामकः प्रकरणादिरपहृतशक्तिकः सम्पाद्यते । अत एव साभिधाशक्तिर्बाधितापि सती प्रतिप्रसूतेव, तत्रापि न ध्वनेर्विषयः इति तात्पर्यम् । चशब्दोऽपिशब्दार्थे भिन्नक्रमः आक्षिप्तोऽप्याक्षिप्ततया झटिति सम्भावयितुमारब्धोऽपीत्यर्थः । न त्वसावाक्षिप्तः किन्तु शब्दान्तरेणान्येनाभिधाया प्रतिप्रसवनादभिहितस्वरूपः सम्पन्नः । पुनर्ग्रहणेन प्रतिप्रसवं व्याख्यातं सूचयति । तेनैवकार आक्षिप्ताभासं निराकरोतीत्यर्थः ।

हे केशव, गोधूलिहृतया दृष्ट्या न किञ्चिद् दृष्टं मया तेन कारणेन स्खलितास्मि मार्गे । तां पतितां सतीं मां किं नाम कः खलु हेतुर्यन्नालम्बसे हस्तेन । यतस्त्वमेवैकोऽतिशयेन बलवान्निम्नोन्नतेषु सर्वेषामबलानां बालवृद्धाङ्गनादीनां खिन्नमनसां गन्तुमशक्नुवतां गतिरालम्बनाभ्युपाय इत्येवंविधेऽर्थे यद्यप्येते प्रकरणेन नियन्त्रिताभिधाशक्तयः शब्दास्तथापि

द्वितीयेऽर्थे व्याख्यास्यमानेऽभिधाशक्तिर्निरुद्धा सती सलेशमित्यनेन प्रत्युज्जीविता। अत्र सलेशम् ससूचनमित्यर्थः, अल्पीभवनं हि सूचनमेव। हे केशव, गोप, स्वामिन्! रागाहृतया दृष्टयेति। केशवगेन उपरागेण हृतया दृष्टयेति वा सम्बन्धः। स्खलितास्मि खण्डितचरित्रा जातास्मि। पतितामिति भर्तृभावं मां प्रति। एक इत्यसाधारणसौभाग्यशाली त्वमेव। यतः सर्वासामबलानां मदनविधुरमनसामीर्ष्याकालुष्यनिरासेन सेव्यमानः सन् गतिर्जीवितरक्षोपाय इत्यर्थ।

लोचन

याप्रमाणे 'सुचविलेल्या' या शब्दामुळे काय वर्ज्य करणे अभिप्रेत आहे हे सांगून झाल्यावर 'स्वरूपातच' यातील 'च' या अव्ययामुळे काय वर्ज्य करावयाचे, ते दाखविण्यासाठी वृत्तिकार 'आणि तो' ... इ. म्हणतात. ज्या उदाहरणात दोन अर्थ प्रकट करणारे शब्द वापरले असून १) अभिधेला एका अर्थाचे ठिकाणी नियंत्रित करण्यास अनुकूल असे कोणतेही कारण नसते, जसे 'ज्याने लहानपणी गाडा' इ. पद्यात, किंवा ज्या उदाहरणात २) (असे कारण तर नसतेच, पण) उलट दुसऱ्या अभिधेचा व्यापार आहे असे ज्ञान करून देणारे प्रमाण[3] उपलब्ध असते, जसे – 'हाराशिवाय देखील' येथपासून 'त्या राजाचे परिघाप्रमाणे'[4] यापर्यंतच्या सर्व पद्यांत, तेथे तो दुसरा अर्थ 'वाच्य'च असतो ही गोष्ट निर्विवाद आहे. आणि ज्या उदाहरणामध्ये अभिधेचे एका अर्थाचे ठिकाणी नियमन करणारे संदर्भ वगैरेसारखे कारण उपलब्ध असते व त्यामुळे अभिधा दुसऱ्या अर्थाचा बोध करून देत नाही, तेथे तो दुसरा (काही वेळ बाजूला सारलेला) अर्थ 'सुचविलेला असतो' असे म्हणण्यात येते, पण अशा काही उदाहरणांमध्येसुद्धा जर कवीने असा शब्द योजिला असला की, त्यामुळे अभिधेचे नियमन करणारे ते (संदर्भ इ.) कारण कुंठित करून टाकले जाते, तर त्या ठिकाणी अभिधाशक्ती जरी प्रथम जखडली गेलेली असली, तरी ती जणू पुन्हा मुक्त केल्यासारखी होते[5] व त्यामुळे ती उदाहरणेही ध्वनीची नव्हेत, हे या सर्व म्हणण्याचे तात्पर्य. वृत्तीतल्या '(आणि) तो' या शब्दांपैकी 'आणि' शब्दाचा अर्थ 'सुद्धा' असा असून त्याचा क्रम बदलाव-

यास पाहिजे.[६] (तो अलंकार) सुचविलेला असूनसुद्धा म्हणजे 'तो सुचविलेला आहे अशी वाचकांची प्रथम कल्पना झाली असली तरी-देखील' असा अर्थ. पण तो अलंकार खरोखर 'सूचित' झालेला नसतो, तर दुसऱ्या वेगळ्या शब्दामुळे[७] अभिधा पुनरुज्जीवित केली जात असल्याने त्याला वाच्य अलंकाराचेच स्वरूप प्राप्त होते. वृत्तीमध्ये 'पुन्हा' हा शब्द वापरून वृत्तिकार आता आम्ही विवरणात सांगितलेले 'अभिधेचे पुनरुज्जीवन' सुचवितात. त्यामुळे कारिका २१ मधील 'सुचवलेल्या स्वरूपातच' यातले 'च' हे अव्यय असे दाखविते की, तो अर्थ खरोखरच सूचित असतो, केवळ सुचविला गेल्यासारखा नसतो.

'हे केशवा ! गाईच्या खुरांनी उधळलेल्या धुळीच्या कणांनी मला दिसेनासे झाले व त्यामुळेच मी रस्त्यात घसरले. मी खाली पडले असताना मला काय म्हणून म्हणजे खरोखरच कोणत्या कारणामुळे तू आपल्या हाताचा आधार देत नाहीस ? कारण तूच खूप बलशाली असून उंचसखल मार्गावर म्हणजे अडचणीच्या प्रसंगी मन खिन्न झालेल्या म्हणजेच पुढे पाऊल टाकावयास असमर्थ असलेल्या सर्व दुर्बलांचे म्हणजे लहान मुले, म्हातारे व स्त्रिया यांचे आश्रयस्थान म्हणजे त्यांना आधार देणारे कारण आहेस, या प्रकारच्या अर्थावर जरी या श्लोकातील शब्दांची अभिधाशक्ती संदर्भामुळे नियंत्रित झाली असली, तरीही या-नंतर सांगण्यात येणार असलेल्या दुसऱ्या अर्थाचे बाबतीत त्यांची आधी रोखली गेलेली अभिधाशक्ति 'सूचकपणे' या शब्दामुळे पुन्हा जिवंत झाली आहे. या ठिकाणी **सलेशम्** याचा अर्थ 'सूचकपणाने' असा आहे. कारण (लेश म्हणजे थोडा अंश आणि) थोडे किंवा संक्षिप्त होणे म्हणजे सुचविले जाणेच होय.[८] (या श्लोकाचा दुसरा अर्थ––) 'हे केशवा ! हे गोपा आणि हे स्वामिन् ![९] 'माझी नजर म्हणजे विवेकशक्ती तुझ्या विषयीच्या अनुरागामुळे नष्टप्राय झाल्यामुळे' असा किंवा 'केशवग (म्हणजे केशवावर जडलेल्या) उपरागाने (म्हणजे अनुरागाने) दृष्टि हिरावून घेतल्यामुळे' असाही अन्वयार्थ करावा. मी घसरले म्हणजे माझे शील भंग पावले आहे. माझ्या बाबतीत पति–ता म्हणजे पतीची भूमिका. (तूच) एकटा म्हणजे तूच या जगामध्ये असामान्य मोहक-पणाने संपन्न आहेस. कारण मदनविकाराने पीडित झालेल्या स्त्रियांनी

आपल्या मनाला ईर्ष्येमुळे आलेला मलिनपणा बाजूला करून जर तुझा आश्रय केला, तर तूच त्यांच्या जीविताच्या रक्षणाचा उपाय आहेस, असा अर्थ.

टीपा

१. रुद्रटाने आपल्या 'काव्यालंकारात' वक्रोक्ति नावाच्या अलंकाराचे श्लेष-वक्रोक्ति व काकुवक्रोक्ति असे दोन प्रकार सोदाहरण वर्णिले आहेत. वक्त्याने एखादे वाक्य एका अर्थाने उच्चारले असता उत्तर देणाराने त्या वाक्यातली पदे वेगळ्या तऱ्हेने तोडून त्या वाक्यातून दुसराच अर्थ काढायचा, ही श्लेषवक्रोक्ति. वक्त्याने विशिष्ट स्वरात उच्चारलेल्या वाक्याचा एक अर्थ होत असताना स्वर बदलल्यामुळे (उदा. वाक्य साधे सरळ न उच्चारता प्रश्नासारखे वगैरे उच्चारून) दुसऱ्याने त्यातून दुसरा अर्थ काढावयाचा ही 'काकुवक्रोक्ति'. पाहा, रुद्रट, काव्यालंकार, अध्याय २, श्लोक १४ ते १७.

'व्यंग्य अर्थाचा एखाद्या वाचक शब्दाने गौप्यस्फोट करणे म्हणजे वक्रोक्ति अलंकार' असे आनंदवर्धनांचे मत असावेसे दिसते. हे मत यापूर्वीच्या व या-नंतरच्या आलंकारिकांच्या मताहून वेगळे आहे. कुवलयानंद, पृ. १५८–१५९ वर अशा प्रकाराला 'विवृतोक्ति' अलंकार म्हटले आहे.

२. वरील श्लोकातला दुसरा अर्थ शेवटी 'सूचकपणे' असा शब्द वापरल्याने वाच्य केल्यासारखा झाला.

३. उदा. 'हाराशिवाय' इ. श्लोकातील 'देखील' या शब्दाचा प्रत्यक्ष उपयोग.

४. उदा. 'त्या राजाचे' इ. पद्यातील 'बाहुरूपी अडसर हेच मदोन्मत्त हत्ती' हे 'वाच्य' रूपक. हे रूपक स्वतः वाच्य असल्यामुळे, खंडित, परिमल व दान या शब्दांमधील श्लेष व त्या श्लेषामुळे प्रकट होणारे दोन्ही अर्थ वाच्यच होत.

५. कबड्डीच्या खेळात ज्याप्रमाणे एका बाजूचा बाद झालेला खेळाडू विरुद्ध बाजूचा खेळाडू बाद झाल्यावर पुन्हा जिवंत होतो, तसेच एकदा क्षीण झालेल्या अभिधेचे हे पुनरुज्जीवन दिसते.

६. म्हणजे मुळातल्या स च आक्षिप्तः या ऐवजी स आक्षिप्तोऽपि असे म्हणावयास पाहिजे.

७. उदा. पुढील पद्यातील तलेशब् या शब्दामुळे.

८. मूळ विस्तृत स्वरूपात सांगावयाची हकीकत संक्षिप्त रूपात सांगण्यात आली म्हणजे तिच्या संक्षिप्त रूपामुळे तिचे मूळ विस्तृत रूप सुचविले जाते. उदा.

व्यक्तीच्या नावाची आद्याक्षरे तिचे संपूर्ण नाव सुचवितात. पाहा, पृ. १८९ वरील भामहाच्या अपह्नुतीच्या लक्षणातील 'काही प्रमाणात' हा शब्द व त्यावरील पृ. १९३ वर दिलेली २१ वी टीप.

९. मूळ लोचनात **गोप स्वामिन्** असे आहे. त्यापैकी **स्वामिन्** हा शब्द पुढील ओळीतील **नाथ** या शब्दाचे विवरण करण्याकरिता वापरला असावा.

ध्वन्यालोकः

यत्र तु सामर्थ्याक्षिप्तं सदलङ्कारान्तरं शब्दशक्त्या प्रकाशते स सर्व एव ध्वनेर्विषयः। यथा—

'अत्रान्तरे कुसुमसमययुगमुपसंहरन्नजृम्भत ग्रीष्माभिधानः फुल्लमल्लिकाधवलाट्टहासो महाकालः।

ध्वन्यालोक

पण जेथे दुसरा अलंकार हा द्व्यर्थी शब्दांच्या वापरामुळे, पण वाच्यार्थाच्या सामर्थ्याने, 'सुचवलेल्या' स्वरूपात प्रकट होतो, ती सगळीच ध्वनीची उदाहरणे होत. जसे—

"येवढ्या अवधीत वसंतऋतूच्या दोन महिन्यांचा (दुसरा अर्थ— 'कृत' वगैरे युगांचा) शेवट करीत ग्रीष्म नावाचा (दुसरा अर्थ— ज्याचे नाव असुरांना भयभीत करणारे आहे, असा), कंटाळवाणेपणामुळे दीर्घ वाटणारा काळ (दुसरा अर्थ— श्रीशंकर) सुरू झाला (दुसरा अर्थ— प्रकट झाला). फुललेल्या मल्लिकापुष्पांच्या विकासामुळे फुलांची दुकाने पांढरीशुभ्र झाली होती. (दुसरा अर्थ— फुललेल्या मल्लिकापुष्पांप्रमाणे शुभ्र असा ज्या शंकरांचा अट्टहास (हास्य) होता.[१]

लोचनम्

**एवं श्लेषालङ्कारस्य विषयमवस्थाप्य ध्वनेराह — यत्र त्विति। कुसुमसमयात्मकं यद् युगं मासद्वयं तदुपसंहरन्। धवलानि हर्म्याण्यट्टान्यापणा येन तादृक् फुल्लमल्लिकानां हासो विकासः सितिमा यत्र। फुल्लमल्लिका एव धवलाट्टहासोऽस्येति तु व्याख्याने 'जलदभुजगजम्' इत्येतत्तुल्यमेतत्स्यात्। महांश्चासौ दिनदैर्घ्यदुरतिवाहयोगात्कालः समयः। अत्र ऋतुवर्णनप्रस्तावनियन्त्रिताभिधाशक्तयः, अत एव 'अवयव-**

प्रसिद्धेः समुदायप्रसिद्धिर्बलीयसी ' इति न्यायमपाकुर्वन्तो महाकालप्रभृतयः शब्दाः एतमेवार्थमभिधाय कृतकृत्या एव । तदनन्तरमर्थावगतिर्ध्वनन-व्यापारादेव शब्दशक्तिमूलात् ।

अत्र केचिन्मन्यन्ते – " यत एतेषां शब्दानां पूर्वमर्थान्तरेऽभिधान्तरं दृष्टं ततस्तथाविधेऽर्थान्तरे दृष्टतदभिधाशक्तेरेव प्रतिपत्तुर्नियन्त्रिताभि-धाशक्तिकेभ्य एतेभ्यः प्रतिपत्तिर्ध्वननव्यापारादेवेति शब्दशक्तिमूलकत्वं व्यङ्ग्यत्वं चेत्यविरुद्धम् " इति ।

अन्ये तु–" साभिधैव द्वितीयार्थसामर्थ्यं भीषणस्य भीषणदेवता-विशेषसादृश्यात्मकं सहकारित्वेन यतोऽवलम्बते ततो ध्वननव्यापार-रूपोच्यते " इति ।

एके तु – " शब्दश्लेषे तावद्भेदे सति शब्दस्य, अर्थश्लेषेऽपि शक्तिभेदाच्छब्दभेद इति दर्शने द्वितीयः शब्दस्तत्रानीयते । स च कदाचिद-भिधाव्यापारात् यथोभयोरुत्तरदानाय ' श्वेतो धावति ' इति, प्रश्नोत्तरादौ वा, तत्र वाच्यालङ्कारता । यत्र तु ध्वननव्यापारादेव शब्द आनीतः तत्र शब्दान्तरबलादपि तदर्थान्तरं प्रतिपन्नं प्रतीयमानमूलत्वात्प्रतीयमानमेव युक्तम् " इति ।

इतरे तु – " द्वितीयपक्षव्याख्याने यदर्थसामर्थ्यं तेन द्वितीयाभिधैव प्रतिप्रसूयते, ततश्च द्वितीयोऽर्थोऽभिधीयत एव न ध्वन्यते, तदनन्तरं तु तस्य द्वितीयार्थस्य प्रतिपन्नस्य प्रथमार्थेन प्राकरणिकेन साकं या रूपणा सा तावद्भात्येव, न चान्यतः शब्दादिति सा ध्वननव्यापारात् । तत्रा-भिधाशक्तेः कस्याश्चिदप्यनाशङ्कनीयत्वात् । तस्याञ्च द्वितीया शब्द-शक्तिर्मूलम् । तया विना रूपणाया अनुत्थानात् । अत एवालङ्कार-ध्वनिरयमिति युक्तम् । वक्ष्यते च ' असम्बद्धार्थाभिधायित्वं मा प्रसाङ्क्षीत्' इत्यादि । पूर्वत्र तु ' सक्लेश ' पदेनैव असंबद्धता निराकृता । ' येन ध्वस्त ' इत्यत्रासंबद्धता नैव भाति । ' तस्या विनापि ' इत्यत्रापिशब्देन, ' श्लाघ्या-' इत्यत्राधिकशब्देन' ' भ्रमिम् ' इत्यादौ च रूपकेणासंबद्धता निराकृतेति-' तात्पर्यम् ।

याप्रमाणे श्लेष अलंकाराचे क्षेत्र निश्चित करून ध्वनीचे क्षेत्र कोणते ते वृत्तिकार 'पण जेथे' इ. शब्दांनी सांगतात. फुले बहरण्याचा जो दोन महिन्यांचा अवधि, तो संपविणारा (असा ग्रीष्म). शुभ्र म्हणजे रमणीय झाली आहेत अट्ट म्हणजे (फुलांची) दुकाने ज्यामुळे असे मल्लिकापुष्पांचे हास्य म्हणजे विकास म्हणजे शुभ्रपणा[२] ज्यामध्ये (असा ग्रीष्म). पण 'फुललेल्या मल्लिका हाच ज्याचा शुभ्र असा अट्टहास' असे जर या समासाचे विवरण केले, तर हे वर्णन 'मेघरूपी सर्पापासून उत्पन्न होणारे (जलरूपी विष)' यासारखेच होईल.[३] महान् म्हणजे दिवस लांब असल्यामुळे कंटाळवाणा वाटणारा. येथे ग्रीष्म ऋतूच्या वर्णनाचा संदर्भ असल्यामुळे 'महाकाल' इ. शब्दांची अभिधाशक्ति नियंत्रित झालेली आहे व म्हणून ते शब्द 'अवयवांच्या अर्थबोधक सामर्थ्यापेक्षा संपूर्ण शब्दाचे अर्थबोधक सामर्थ्य अधिक प्रबल असते'[४] हा (सर्वसाधारण) नियम गुंडाळून ठेवतात व ते (महा-काल इ.) शब्द हाच म्हणजे ग्रीष्म ऋतूच्या वर्णनाला अनुकूल असाच (म्हणजे लांबच लांब काळ इ.) अर्थ अभिधेने सांगितल्यावर कृत-कृत्यच होतात, म्हणजे त्यांचे जीवितकार्य संपतेच. मग त्यानंतर वाचकांना दुसऱ्या अर्थाचे जे ज्ञान होते, ते शब्दशक्तीवर (म्हणजे) शब्दांच्या दोन अर्थांना बोध करून देण्याच्या सामर्थ्यावर) अवलंबून असलेल्या व्यंजनाव्यापारामुळे होते[५] (अभिधाव्यापारामुळे नव्हे).

या विषयाबाबत म्हणजे शब्दशक्तिमूल ध्वनीच्या बाबत काहींचे मत असे की— 'ज्या अर्थी या (म्हणजे महाकाल इ.) शब्दांची दुसऱ्या (म्हणजे शिव ही देवता इ. रूप) अर्थाचा बोध करून देणारी दुसरी अभिधाशक्ति पूर्वी कोठेतरी वाचकांच्या प्रत्ययाला आलेली असते त्याअर्थी त्या दुसऱ्या अर्थाच्या बोधक अशा दुसऱ्या अभिधाशक्तीचा ज्या वाचकाने अनुभव घेतलेला असतो त्या वाचकालाच, ज्यांची अभिधाशक्ति एका अर्थाचे ठिकाणी (संदर्भ इ. कारणांमुळे) नियंत्रित झाली आहे अशा या (महाकाल इ.) शब्दापासून (शिव इ.) द्वितीय अर्थाचे ज्ञान त्यांच्या व्यंजना व्यापारामुळेच होते. आणि म्हणून हा दुसरा अर्थ शब्दशक्तिमूल असणे व व्यंग्यही असणे यात काही विरोध

नाही.[३]

पण दुसरे म्हणतात– '(महाकाल इ. शब्दांची) जी दुसरी अभिधाशक्ति, ती ग्रीष्म ऋतूचे (शिव या) विशिष्ट भीषण देवतेशी असलेल्या सादृश्याचे साहाय्य घेते,[७] म्हणून त्या दुसऱ्या अभिधेलाच 'ध्वनन व्यापारस्वरूपाची' असे म्हणण्यात येते.'

आणखी एक पक्ष असे मानितो की, शब्दश्लेषामध्ये दोन दोन अर्थ प्रकट करणारे शब्द हे भिन्न भिन्न असतात, म्हणून 'व अर्थ-श्लेषातही (वरवर एकच भासणाऱ्या) शब्दाच्या दोन वेगवेगळे अर्थ सांगणाऱ्या शक्ति वेगवेगळ्या असल्यामुळे ते शब्दही वेगळे' या मता-नुसार त्या ठिकाणी दुसऱ्या शब्दाचे अस्तित्व मानिले जाते. तो दुसरा शब्द काही वेळा अभिधाव्यापारामुळेच आपला दुसरा अर्थ प्रकट करितो, उदा. जेव्हा ('इकडून कोण धावतो आहे ?' व 'तो धावणारा कशा-प्रकारचा आहे ?' या) दोन्ही प्रश्नांना एकच उत्तर देण्यासाठी म्हणून **श्वेतो धावति** (१. **श्वा इतो धावति** म्हणजे 'कुत्रा इकडून धावतो आहे, व **श्वेतः धावति** म्हणजे पांढरा कुत्रा धावतो आहे') असे सांगितले जाते तेव्हा, किंवा 'प्रश्नोत्तर' या प्रकाराममध्येही[९] श्लेष हाच वाच्यालंकार असतो (असे मानावे).[१०] पण जेथे दुसऱ्या शब्दाचे अस्तित्व ध्वननव्यापारामुळेच मानिले जाते, तेथे त्या दुसऱ्या अर्थाचा बोध जरी दुसऱ्या शब्दामुळे होत असला, तरी तो दुसरा शब्द व्यंजनेनेच लक्षात येत असल्याने[११] त्या शब्दाच्या अर्थालाही 'प्रतीयमान' म्हणजे व्यंग्य अर्थच म्हणणे योग्य होय.

पण याहून निराळ्या पक्षाचे लोक असे म्हणतात की, क्रमांक दोनमध्ये मांडलेल्या मताप्रमाणे 'ग्रीष्म ऋतूचे शिव या देवतेशी साम्य हे जे ग्रीष्म या शब्दाचे अर्थसामर्थ्य, त्यामुळे महाकाल या शब्दाची 'लांबच लांब काळ' हा अर्थ प्रकट करून क्षीण झालेली अभिधाच दुसऱ्या अभिधेच्या रूपाने[१२] पुनरुज्जीवित केली जाते व त्या पुनरुज्जी-वित अभिधेने दुसरा अर्थ 'वाच्य'च केला जातो, 'सुचविला' जात नाही. पण त्यानंतर मात्र या (दुसऱ्या अभिधेने) लक्षात आलेल्या दुसऱ्या अर्थाचा पहिल्या, प्रस्तुत अर्थावर आरोप[१३] झालेला तर प्रत्य-यास येतो यात शंका नाही, पण तो काही शब्दाच्या दुसऱ्या कोणत्याही

व्यापारामुळे[१४] प्रत्ययास येत नाही, म्हणून तो आरोप ध्वनन या शब्द-व्यापारामुळेच लक्षात येतो (असे मानावयाचे). कारण त्या आरोपाचा बोध करून देण्याचे कामी कोणत्याही अभिधाशक्तीची कल्पना करणे शक्य नाही. आणि त्या आरोपाचे ज्ञान होण्याच्या मुळाशी शब्दाची दुसरा अर्थ प्रकट करणारी दुसरी अभिधाशक्ति हेच कारण असते. त्या दुसऱ्या अभिधाशक्तीवाचून आरोपाचे ज्ञान उत्पन्नच होऊ शकत नाही.[१५] म्हणूनच अशा उदाहरणात अलंकारध्वनि असतो असे म्हणणे योग्य आहे[१६] व हेच वृत्तिकार आता लवकरच 'वाक्य असंबद्ध अर्थाचा बोध करून देते असा प्रसंग ओढवू नये म्हणून ' इ. शब्दांनी सांगणार आहेत. पूर्वीच्या (म्हणजे 'हे केशवा ! ' या) उदाहरणात मात्र सश्लेषम् (म्हणजे सूचकपणे) या शब्दानेच दुसरा अर्थ असंबद्ध असण्याचा संभव[१७] दूर करून टाकला आहे. 'ज्याने लहानपणी गाडा ' इ. पद्यात असंबद्धता प्रतीत होतच नाही.[१८] 'हाराशिवाय देखील ' इ. पद्यात 'देखील ' या शब्दामुळे, 'ती रुक्मिणी ' इ. पद्यात 'वरचढ ' या शब्दा-मुळे आणि 'मेघरूपी सर्पापासून ' इ. पद्यात वाच्य रूपकामुळे असं-बद्धतेची शक्यता बाजूला सारली गेली आहे, हा वृत्तिकाराचा अभिप्राय.[१९]

टीपा

१. हर्षचरित, उच्छ्वास २. या वाक्यातून दुसरा अर्थ सूचित झाल्यावर रूपक सूचित होते म्हणून येथे रूपकध्वनि आहे असे अभिनवगुप्त म्हणतात. येथे उपमाध्वनिही मानणे शक्य आहे.

२. हास्यामुळे मुख विकसित होते, म्हणून हास्य याचा लक्षणेने होणारा अर्थ 'विकास '. आणि मुखविकासामुळे दंतपंक्तीचा शुभ्रपणा प्रकट होत असल्या-मुळे 'हास्य ' याचा लक्षणेने होणारा दुसरा अर्थ 'शुभ्रपणा '.

३. म्हणजे 'मल्लिका हाच अट्टहास ' असा कर्मधारय मानिल्यास येथे रूपक हा वाच्य अलंकार होईल, ज्याप्रमाणे 'मेघ हाच सर्प ' यात वाच्य रूपक आहे, त्याप्रमाणे. पण हे उदाहरण वृत्तिकाराने 'व्यंग्य ' अलंकाराचे म्हणून दिले असल्यामुळे हा समास कर्मधारय घेऊन चालणार नाही, तर अभिनव-गुप्तांनी आधी सांगितल्याप्रमाणे बहुव्रीहिगर्भ बहुव्रीहि आहे असेच मानिले पाहिजे.

४. अवयवाचे अर्थबोधक सामर्थ्य म्हणजे शब्दाचे व्युत्पत्तीच्या द्वारे अर्थबोध करून देण्याचे सामर्थ्य. उदा. महाकाल: याचा 'दीर्घ असा काळ' हा व्युत्पत्तिलभ्य अर्थ होय. संपूर्ण शब्दाचे अर्थबोधक सामर्थ्य म्हणजे संपूर्ण शब्दाचे आपला रूढार्थ प्रकट करण्याचे सामर्थ्य. उदा. 'महाकाल' याचा रूढार्थ 'शिव' हा होय. याच अर्थाने योगाद् रूढिर्बलीयसी । असेही वचन उद्धृत केले जाते. यातील 'योग' म्हणजे व्युत्पत्ति.

५. हाच मुद्दा काव्यप्रकाश, उल्लास २, कारिका १९ मध्ये मम्मटाने सांगितला आहे.

६. कारण ते शब्द द्व्यर्थी असल्यामुळे त्यांचे दोन अर्थ हे वाच्यार्थच असतात, म्हणजे दोन्ही अर्थांच्या ज्ञानाचे कारण अभिधा हेच आहे. परंतु प्रस्तुत-सारख्या ठिकाणी संदर्भ इ. मुळे त्या दोन अर्थांपैकी एकच अर्थ (वाच्य म्हणून) स्वीकारला जातो व दुसरा अर्थ काही वेळ बाजूला सारला जातो. अर्थात तो अर्थ काही वेळानंतर वाचकांच्या मनात येतोच. पण तो पहिल्या अर्थाच्यानंतर ध्यानात येतो, म्हणून त्याला व्यंग्य म्हणण्यातही काही विरोध नाही.

७. दुसरी शक्ति ही वस्तुत: अभिधाच, पण ती ग्रीष्म ऋतु व शंकर यांमधील भीषणता हे साम्य या व्यंग्य अर्थाची मदत घेते, म्हणून त्या अभिधेला व्यंजना म्हणावयाचे.

८. यावन्त: अर्था: तावन्त: शब्दा: (म्हणजे जितके निरनिराळे अर्थ तितके निरनिराळे शब्द) या मतानुसार शब्दश्लेष व अर्थश्लेष या दोहोंमध्ये दिसावयास जरी शब्द एकच दिसला, तरी त्यातून प्रकट होणारे अर्थ वेगवेगळे, म्हणून ते भिन्न अर्थ प्रकट करणारे शब्दही भिन्नच, असे मानिले जाते.

९. प्रश्नोत्तर हा प्रकार म्हणजे जेथे प्रश्न–वाक्यामध्येच त्या प्रश्नाचे उत्तर दडविलेले असते, असे वाक्य. याचे उदाहरण पुढीलप्रमाणे –
के दारपोषणरता: ? का शीतलवाहिनी ? गङ्गा ।
कं सञ्जघान कृष्ण: ? कं बलवन्तं न बाधते शीतम् ॥

१०. येथे श्लेष हा वाच्यालंकार मानावयाचे कारण दोन्ही अर्थ बोलणाऱ्याला विवक्षित असल्यामुळे प्रस्तुत असतात आणि ते वाचकाच्या ध्यानात एकाच वेळी येतात.

११. या पक्षाचे म्हणणे थोडक्यात असे दिसते– एका शब्दामुळे प्रथम ज्या एका अर्थाचा बोध होतो तो अर्थ वाच्यच, हे उघड आहे पण दुसरा अर्थही नंतर लक्षात येत असल्यामुळे त्या दुसऱ्या अर्थाचा वाचक शब्द वेगळा मानावा लागतो. हा वेगळा शब्द वेगळेपणाने प्रत्यक्ष मांडलेला नसला,

तरी वेगळा मानिला जातो म्हणून तो दुसरा शब्द पहिल्या शब्दाकडून व्यंजित केला जातो असे समजावयाचे व म्हणून या व्यंजित शब्दामुळे ध्यानात येणारा दुसरा अर्थही व्यंग्यच समजावयाचा.

१२. मुळात **द्वितीयाभिधैव प्रतिप्रसूयते** म्हणजे दुसरी अभिधाशक्ति पुनरुज्जीवित होते असे म्हटले आहे. दुसरी अभिधा पुनरुज्जीवित होते याचा अर्थ एकदा कार्य केलेली दुसरी अभिधा पुन्हा जिवंत होते असा नसून पहिलीच अभिधा २ ऱ्या अभिधेच्या रूपाने पुनरुज्जीवित होते असा पाहिजे. कारण, येथे दोनच अभिधांचा प्रश्न आहे, तीन अभिधांचा नाही.

१३. आरोप म्हणजे उपमान व उपमेय यांमधला रूप्यरूपकसंबंध किंवा अभेदसंबंध.

१४. मुळातल्या **अन्यतः शब्दात्** याचा अर्थ दोन प्रकारांनी करिता येईल—

१. **शब्दात् अन्यस्मात्** म्हणजे शब्दव्यापाराहून दुसऱ्या कोणत्याही व्यापारामुळे म्हणजे प्रत्यक्ष, अनुमान इ. प्रमाणांमुळे किंवा २. **अन्यस्मात्** शब्दव्यापारात् म्हणजे शब्दाच्या ध्वनन व्यापाराहून दुसऱ्या, म्हणजे अभिधा, लक्षणा इ. व्यापारांमुळे.

१५. सारांश, पहिल्या अभिधेने पहिला अर्थ जरी ध्यानात आला, तरी दुसऱ्या अभिधेने दुसरा अर्थ प्रकट केल्यावाचून १ ल्या व २ ऱ्या अर्थांमधील अभेदसंबंध ध्यानात येण्याचा प्रश्नच उद्‌भवू शकत नाही.

१६. व्यंजनेने 'अभेदसंबंध' ध्यानात येणे म्हणजेच रूपक हा अलंकार ध्वनित होणे

१७. 'हे केशवा !..' या उदाहरणातील 'घसरलेल्या मला तू आधार का देत नाहीस ?' हा एक अर्थ असून दुसरा 'वाकडे पाऊल पडलेल्या माझे पतित्व तू का स्वीकारीत नाहीस ?' हा दुसरा अर्थ आहे. त्या दोन अर्थांमधील गोप्य-गोपकसंबंध (म्हणजे दुसरा अर्थ गुप्त ठेविला जाणारा व पहिला त्याला गुप्त ठेवणारा हा संबंध) **सलेशम्** या शब्दाने वाच्य केल्यामुळे त्या दोन अर्थांमधील असंबद्धता दूर केली गेली.

१८. कारण विष्णुविषयक व शिवविषयक हे दोन्ही अर्थ कवीला प्रस्तुत म्हणून अभिप्रेत असल्याने त्यांमध्ये असंबद्धता असण्याचा प्रश्नच नाही.

१९. तात्पर्य, द्व्यर्थी शब्दयोजनेमध्ये ध्यानात येणाऱ्या दोन अर्थांमध्ये असंबद्धता प्रत्ययास येत नसेल किंवा ती प्रत्ययास येऊन जर कोणत्यातरी वाचक शब्दानेच दूर होत असेल, तर तेथे अलंकारध्वनि नसून श्लेष किंवा श्लेषमूलक वाच्य अलंकार असतो, पण जेथे त्या दोन अर्थांमधील असंबद्धता प्रत्ययास येते व ती दूर करण्यासाठी त्या दोन अर्थांमध्ये उपमानोपमेयसंबंध किंवा अभेदसंबंध कल्पावा लागतो, तेथेच अलंकारध्वनि असतो.

यथा च --

उन्नतः प्रोल्लसद्धारः कालागुरुमलीमसः ।

पयोधरभरस्तन्व्याः कं न चक्रेऽभिलाषिणम् ॥

यथा वा --

दत्तानन्दाः प्रजानां समुचितसमयाकृष्टसृष्टैः पयोभिः

पूर्वाह्णे विप्रकीर्णा दिशि दिशि विरमत्यह्नि संहारभाजः ।

दीप्तांशोर्दीर्घदुःखप्रभवभवभयोदन्वदुत्तारनावो,

गावो वः पावनानां, परमपरिमितां प्रीतिमुत्पादयन्तु ॥

एषूदाहरणेषु शब्दशक्त्या प्रकाशमाने सत्यप्राकरणिकेऽर्थान्तरे वाक्यस्यासम्बद्धार्थाभिधायित्वं मा प्रसाङ्क्षीदित्यप्राकरणिकप्राकरणिकार्थयोरुपमानोपमेयभावः कल्पयितव्यः सामर्थ्यादित्यर्थाक्षिप्तोऽयं श्लेषो न शब्दोपारूढ इति विभिन्न एव श्लेषादनुस्वानोपमव्यङ्ग्यस्य ध्वनेर्विषयः ।

ध्वन्यालोक

आणि जसे ( पुढील उपमाध्वनीचे उदाहरण )—

त्या तन्वंगीचा पयोधरभार ( दुसरा अर्थ– मेघांचा वृंद ) कोणाच्या मनात अभिलाष ( १. आकर्षण २. उत्कण्ठा ) उत्पन्न करणार नाही ? तो पयोधरभार उन्नत ( १. उभारीने युक्त, २. आकाशात वर चढू लागलेला ) आणि कालागुरूच्या उटीमुळे ( दुसरा अर्थ– कालागुरुप्रमाणे ) काळा असून त्यावर हार झळकतो आहे ( दुसरा अर्थ-त्यातून जलधारा वर्षत आहेत ). किंवा ज्याप्रमाणे—

" त्या चण्डकिरण सूर्याचे, पवित्र करणारांमध्ये अग्रगण्य असे किरण ( दुसरा अर्थ - गायी ) तुमच्या मनास अपरिमित आनंद देवोत. ते किरण योग्य वेळी पाणी ओढून घेऊन व योग्य वेळी वर्षून लोकांना (दुसरा अर्थ–योग्य वेळी आंचळे ओढल्यामुळे दूध देऊन वासरांना) आनंद देतात. सकाळच्या वेळी ते किरण (दुसरा अर्थ–गायी) दिशादिशांना लांबवर पसरलेले (दुसरा अर्थ– दूर चरायला गेलेल्या) असतात व दिवस मावळू लागला की गोळा होतात; ते किरण (व त्या गाई) म्हणजे दीर्घकाळ दुःख देणाऱ्या संसाराचे भय या

स्वरूपाचा समुद्र तरून नेणाऱ्या नावाच होत.'

या उदाहरणांमध्ये द्व्यर्थी शब्दयोजनेमुळे दुसऱ्या अप्रस्तुत अर्थाची प्रतीति घडवून दिली जाते. पण त्यामुळे वाक्य असंबद्ध अर्थाचा बोध करून देते असा प्रसंग ओढवू नये म्हणून प्रस्तुत वाच्यार्थ व अप्रस्तुत व्यंग्यार्थ यांमध्ये अर्थ–सामर्थ्यामुळे उपमेय–उपमान संबंध कल्पावा लागतो. येथील दुसरा अर्थ वाच्यार्थाच्या सामर्थ्यामुळे सुचवला गेलेला आहे, तो दुसरा अर्थ येथे शब्दांचा साक्षात् वाच्यार्थ नाही. अशा रीतीने श्लेषालंकारापेक्षा अनुरणनतुल्य व्यंग्यार्थ असलेल्या ( शब्दशक्तिमूल ) ध्वनीचे क्षेत्र वेगळेच आहे.

लोचनम्

**पयोभिरिति पानीयैः क्षीरैश्च । संहारो ध्वंसः, एकत्र ढौकनं च । गावो रश्मयः सुरभयश्च । असम्बद्धार्थाभिधायित्वमिति । असंवेद्यमानमेवेत्यर्थः । उपमानोपमेयभाव इति । तेनोपमारूपेण व्यतिरेकनिह्नवादयो व्यापारमात्ररूपा एवात्रास्वादप्रतीतेः प्रधानं विश्रान्तिस्थानम्, न तूपमेयादीति सर्वत्रालङ्कारध्वनौ मन्तव्यम् । सामर्थ्यादिति । ध्वननव्यापारादित्यर्थः ।**

**लोचन**

**पयोभिः** म्हणजे (१) जलधारांमुळे व (२) दुग्धधारांमुळे. 'संहार पावतात' म्हणजे (१) अदृश्य होतात व (२) एके ठिकाणी गोळा होतात. गावः म्हणजे (१) किरण आणि (२) गायी.

वाक्य दोन असंबद्ध अर्थांचा बोध करून देते – (वाक्य दोन असंबद्ध अर्थांचे ज्ञान करून देते असे) सहृदय वाचकांच्या अनुभवास येत नाहीच, असा अर्थ. उपमानोपमेयसंबंध– त्यामुळे उपमेच्या ( म्हणजे उपमानोपमेयसंबंधाच्या) रूपाने ज्यांचा बोध होतो असे व्यतिरेक, निह्नव[२] इ. व्यापारच रसिकाच्या आस्वादाचे विश्रांतिस्थान होतात, केवळ उपमेय, उपमान वगैरे आस्वादाचे विश्रांतिस्थान[३] होत नाहीत, असेच अलंकारध्वनीच्या सव उदाहरणांचे बाबतीत समजावे. 'सामर्थ्यामुळे–म्हणजे ध्वननव्यापारामुळे, हा अर्थ.

टीपा

१. सूर्यशतक (मयूरकृत)– श्लोक ९.

२. व्यतिरेचन म्हणजे एका वस्तूच्या दुसरीहून वरचढपणाचे वर्णन व निह्नव म्हणजे उपमेय लपवून त्याच्या जागी उपमानाची स्थापना करणे.

३. म्हणजे केवळ दोन अर्थ समजल्याने सहृदयाला खरा आनंद मिळत नाही, तर त्या दोन अर्थांमधील उपमानोपमेयसंबंध, निह्नव, व्यतिरेचन, विरोध इ. व्यंग्य संबंध ध्यानात आल्यावरच त्याला खराखुरा आनंद मिळतो.

ध्वन्यालोकः

अन्येऽपि चालङ्काराः शब्दशक्तिमूलानुस्वानरूपव्यङ्ग्ये ध्वनौ सम्भवन्त्येव। तथा हि विरोधोऽपि शब्दशक्तिमूलानुस्वानरूपो दृश्यते। यथा स्थाण्वीश्वराख्यजनपदवर्णने भट्टबाणस्य –

'यत्र च मातङ्गगामिन्यः शीलवत्यश्च, गौर्यो विभवरताश्च, श्यामाः पद्मरागिण्यश्च, धवलद्विजशुचिवदनाः मदिरामोदिश्वसनाश्च, प्रमदाः।'

अत्र हि वाच्यो विरोधस्तच्छायानुग्राही वा श्लेषोऽयमिति न शक्यं वक्तुम्। साक्षाच्छब्देन विरोधालङ्कारस्याप्रकाशितत्वात्। यत्र हि साक्षाच्छब्दावेदितो विरोधालङ्कारस्तत्र हि श्लिष्टोक्तौ वाच्यालङ्कारस्य विरोधस्य श्लेषस्य वा विषयत्वम्।

यथा तत्रैव –

"समवाय इव विरोधिनां पदार्थानाम्। तथाहि–सन्निहितबालान्धकारापि भास्वन्मूर्तिः।" इत्यादौ।

यथा वा ममैव —

सर्वैकशरणमक्षयमधीशमीशं धियां हरिं कृष्णम्।
चतुरात्मानं निष्क्रियमरिमथनं नमत चक्रधरम्॥

अत्र हि शब्दशक्तिमूलानुस्वानरूपो विरोधः स्फुटमेव प्रतीयते।

एवंविधो व्यतिरेकोऽपि दृश्यते। यथा ममैव

खं येऽत्युज्ज्वलयन्ति लूनतमसो ये वा नखोद्भासिनो
ये पुष्णन्ति सरोरुहश्रियमपि क्षिप्ताब्जभासश्च ये
ये मूर्धस्ववभासिनः क्षितिभृतां ये चामराणां शिरा–
स्याक्रामन्त्युभयेऽपि ते दिनपतेः पादाः श्रिये सन्तु वः॥

एवमन्येऽपि शब्दशक्तिमूलानुरणनरूपव्यङ्ग्यध्वनिप्रकाराः सन्ति, ते सहृदयैः स्वयमनुसर्तव्याः। इह तु ग्रन्थविस्तरभयान्न तत्प्रपञ्चः कृतः।

ध्वन्यालोक

शब्दशक्तिमूल अनुरणनरूप ध्वनीमध्ये ( औपम्यमूलक अलंकारांखेरीज ) अन्य अलंकारदेखील संभवतातच. उदा. 'विरोध' देखील शब्दशक्तिमूल अनुरणन स्वरूपाचा दिसतो. उदा—स्थाण्वीश्वर नावाच्या प्रदेशाचे वर्णन करिताना भट्टबाणाने लिहिलेला पुढील भाग पाहा—

"आणि जेथील तरुण स्त्रिया गजगामिनी आणि शीलवती ( दुसरा अर्थ–मातंगांशी रत होणाऱ्या असूनही शीलवती ), गौरवर्ण व वैभवात रमणाऱ्या ( दुसरा अर्थ–पार्वती असून शंकरविरहित स्थानी रमणाऱ्या ), यौवनाच्या भराताल्या व माणकांचे अलंकार घातलेल्या ( दुसरा अर्थ–श्यामल वर्णाच्या असून कमळाप्रमाणे तांबूस वर्ण असलेल्या ), शुभ्र दंतांमुळे झळकणारी मुखे असलेल्या व मदिरेमुळे श्वास सुगंधित झालेल्या ( दुसरा अर्थ–शुद्धाचरणी ब्राह्मणाप्रमाणे पवित्र मुख असूनही श्वासांना मदिरेचा गन्ध येत असलेल्या ) होत्या."[1]

या ठिकाणी विरोधालंकार किंवा त्या विरोधाची शोभा वाढवणारा श्लेष यांपैकी कोणीही वाच्य आहे असे म्हणणे शक्य नाही. कारण विरोधालंकार हा ( 'अपि = सुद्धा' सारख्या ) प्रत्यक्ष शब्दाने प्रकट केला गेलेला नाही. ज्या ठिकाणी विरोधालंकार प्रत्यक्ष शब्दांनी सांगितला असेल, त्या ठिकाणी द्व्यर्थी शब्द असताना ते, विरोध व श्लेष, या वाच्य अलंकारांचे उदाहरण होईल. जसे तेथेच भट्टबाणाने केलेल्या वर्णनात—

"त्या सुंदरीच्या ठिकाणी जणू काही परस्परविरुद्ध[2] पदार्थांचा संगम झाला होता. उदाहरणार्थ–तिच्याजवळ पूर्वरात्रीचा ( निबिड ) अंधार ( दुसरा अर्थ–अंधकाराप्रमाणे काळे असलेले केश ) असूनही ती सूर्याची मूर्ति ( दुसरा अर्थ– तिची तनु कांतियुक्त ) होती.

किंवा जसे माझेच पुढील ( शब्दशक्तिमूल ध्वनीचे ) उदाहरण—

"सर्वांचे एकच आश्रयस्थान व अविनाशी असलेल्या ( दुसरा अर्थ–ज्याला स्वतःला निवाऱ्याचे स्थान नाही, अशा ) कृष्णाला नमन करा. तो सर्वांचा अधिराजा असून ( दुसरा अर्थ–बुद्धीचा स्वामी नसून ) बुद्धीचा स्वामी आहे. तो कृष्ण असून ( दुसरा अर्थ–काळा असून ) हरि ( दुसरा अर्थ– पिवळसर ) आहे.

तो चार स्वरूपांचा असून[3] (दुसरा अर्थ–चतुर म्हणजे पराक्रमी स्वभावाचा असून) निष्क्रिय आहे. तो शत्रुनाशक असून (दुसरा अर्थ– चक्राचा नाश करणारा असून) चक्र धारण करणारा आहे.

वरील उदाहरणात शब्दशक्तिमूल अनुरणनरूप व्यंग्य असलेला विरोध असल्याचे स्पष्टच प्रत्ययाला येते,

अशा प्रकारे (सुचवलेला) व्यतिरेकही आढळतो. जसे माझाच पुढील श्लोक—

"सूर्याचे जे (किरण) अंधार नाहीसा करून आकाशाला अतिशय प्रकाशित करतात आणि जे (चरण) पाप नाहीसे करून नखांच्या कांतीने झळकतात (दुसरा अर्थ–आकाशाला प्रकाशित करीत नाहीत) जे (किरण) कमळांच्या वैभवाचे पोषण करितात व जे (चरण) कमळांच्या शोभेला मागे टाकतात (दुसरा अर्थ–कमळांच्या शोभेचा नाश करितात), जे (किरण) पर्वतांच्या शिखरांवर प्रकाशतात व जे (चरण) देवांच्या मस्तकावर विराजमान होतात, ते सूर्याचे दोन्ही प्रकारचे पाद (१. किरण २. चरण) तुमच्या उत्कर्षाला कारण होवोत."

याप्रमाणे ज्यात शब्दशक्तिमूल, अनुरणनरूप व्यंग्यार्थ असतो, अशा ध्वनीचे इतरही प्रकार संभवतात. ते सहृदयांनी स्वतः शोधून काढावेत. इथे मात्र, हा ग्रंथ फारच मोठा होईल या भीतीमुळे त्या प्रकारांचे आणखी सविस्तर विवरण आम्ही केले नाही.

लोचनम्

मातङ्गेति। मातङ्गावद् गच्छन्ति ताः गवरांश्च गच्छन्तीति विरोधः। विभवेषु रताः, विगतमहादेवे स्थाने च रताः। पद्मरागरत्न-युक्ताः पद्मरवृशलौहित्ययुक्ताश्च। धवलैर्द्विजैर्दन्तैः शुचि निर्मलं वदनं यासां, धवलद्विजवदुत्कृष्टविप्रवच्छुचि वदनं च यासाम्।

यत्र हीति। यस्यां श्लेषोक्तौ काव्यरूपायां, तत्र यो विरोधः श्लेषो वेति सङ्करस्तस्य विषयत्वम्। स विषयो भवतीत्यर्थः। कस्य? वाच्या-लङ्कारस्य वाच्यालङ्कृतेः वाच्यालङ्कृतित्वस्येत्यर्थः। तत्रैव विरोधे श्लेषे वा वाच्यालङ्कारत्वं सुवचमिति यावत्।

वालेषु केशेष्वन्धकारः कार्ष्ण्यम्, बालः प्रत्यग्रश्चान्धकारस्तमः।

ननु मातङ्गेत्यादावपि धर्मद्वये यश्चकारः स विरोधद्योतक एव । अन्यथा प्रतिधर्मं सर्वधर्मान्ते वा न क्वचिद्वा चकारः स्यात्, यदि समुच्चयार्थः स्यादित्यभिप्रायेणोदाहरणान्तरमाह यथेति । शरणं गृहम-क्षयरूपमगृहं कथम् । यो न धीशः स कथं धियामीशः । यो हरिः कपिलः सः कथं कृष्णः । चतुरः पराक्रमयुक्तो यस्यात्मा स कथं निष्क्रियः । अरिणामरयुक्तानां च यो नाशयिता स कथं चक्रं बहुमानेन धारयति । विरोध इति । विरोधनमित्यर्थः । प्रतीयत इति । स्फुटं नोच्यते केन-चिदिति भावः ।

नखैरुद्भासन्ते येऽवश्यं रवे गगने न उद्भासन्ते । उभये रश्म्या-त्मानोऽङ्गुलीपार्ष्ण्याद्यवयविरूपाश्चेत्यर्थः ।

लोचन

मातंग इ. – (१) गजाप्रमाणे गमन करणाऱ्या (आणि (२) भिल्लांशी रममाण होणाऱ्या ) व (शिवाय) शीलवती असणाऱ्या हा विरोध होय. (१) वैभवात रमणाऱ्या व (२) शंकरविरहित स्थानी रममाण होणाऱ्या [४] (१) माणके या रत्नांनी अलंकृत व (२) कमळाप्रमाणे तांबूस वर्णाने संपन्न असलेल्या [५] (१) शुभ्र द्विजांमुळे म्हणजे दंतपंक्तीमुळे शुचि म्हणजे निर्मळ आहे मुख ज्यांचे अशा (२) धवल द्विजाप्रमाणे म्हणजे शुद्धाचरणी ब्राह्मणाप्रमाणे पवित्र मुख असलेल्या.[६] ज्या ठिकाणी – म्हणजे ज्या श्लेषयुक्त काव्यामध्ये (विरोध हा अलंकार वाच्य असेल) त्या काव्यामध्ये विरोध आणि श्लेष यांचा अंगांगिभाव-संकर असतो. म्हणजे ते काव्य विरोध व श्लेष ह्यांच्या अंगांगिभावसंकराचे उदाहरण असते. कोणत्या प्रकारच्या संकरा-लंकाराचे ? तर वाच्य संकरालंकाराचे, म्हणजे संकरालंकार 'वाच्य' असण्याचे. अशाच उदाहरणांमध्ये असणाऱ्या विरोध व श्लेष या अलंकारांना व त्यांच्या संकराला वाच्यालंकार म्हणणे सहज शक्य होते, हा सारांश.

(१) बालांच्या म्हणजे केशांच्या ठिकाणी अंधकार म्हणजे काळभोरपणा (२) 'बाल' म्हणजे पूर्वरात्रीचा, अंधकार म्हणजे (निविड) अंधार.

'पण काय हो, मातंग इ. उदाहरणामध्ये गुणधर्मांच्या प्रत्येक जोडीमध्ये च (म्हणजे आणि) हा जो शब्द वापरलेला आहे, तो विरोधाचाच वाचक नाही काय? तसा तो नसता, व जर तो समुच्चय-वाचक असता, तर तो च हा शब्द प्रत्येक विशेषणाच्या शेवटी किंवा सर्व विशेषणांच्या शेवटी वापरला गेला असता, किंवा कोठेच वापरला गेला नसता[७]; अशी शंका कल्पून तिच्या उत्तरादाखल वृत्तिकार 'किंवा असे मानेल' असा प्रारंभ करून दुसरे उदाहरण देतात. जो स्वत: आश्रयस्थान म्हणजे गृह आहे तो क्षयरूप नसलेला म्हणजे गृहरूप नसलेला कसा असेल? जो बुद्धीचा स्वामी नाही तो बुद्धीचा स्वामी कसा असेल? जो हरि म्हणजे पिवळसर आहे, तो काळा कसा? ज्याचा स्वभाव पराक्रमी आहे, तो निष्क्रिय कसा? 'अरींचा' म्हणजे अरांनी युक्त असलेल्या चक्रांचा जो नाश करणारा आहे, तो चक्राला आदरपूर्वक कसे धारण करील? 'विरोध' याचा अर्थ परस्परांना विरोध करण्याची क्रिया. प्रत्ययास येतो म्हणजे तो विरोध कोणत्याही शब्दाने स्पष्टपणे वाच्य केलेला नाही, हा भावार्थ.

(१) जे नखांनी अवश्यमेव झळकणारे आहेत, (२) जे 'खे' म्हणजे आकाशात प्रकाशित होत नाहीत.[८] दोन्ही प्रकारचे पाद म्हणजे (१) किरणरूपी पाद व (२) ज्यांना बोटे, टाचा इ. अवयव आहेत असे चरण, हा अर्थ. ॥२१॥

टीपा

१. हर्षचरित – उच्छ्वास १.
२. विरुद्ध या अर्थाचा शब्द वापरल्याने, तसेच अपि (सुद्धा) हा शब्द वापरल्याने येथील विरोध आणि श्लेष, दोन्ही वाच्य झाले आहेत.
३. विष्णूची (= परमात्मा), संकर्षण (= जीव), प्रद्युम्न (= मन), व अनिरुद्ध (= अहंकार) ही चार स्वरूपे भागवत धर्मात सांगितली असून त्या चार स्वरूपांना 'व्यूह' असे म्हणतात. अभिनवगुप्तांनी मात्र हा अर्थ सांगितलेला नाही.
४. या दुसऱ्या अर्थाचा 'गौरी' या शब्दाच्या 'पार्वती' या अर्थाशी विरोध आहे.
५. या अर्थाचा, श्यामाः या शब्दाच्या 'श्यामल वर्णाच्या' या अर्थाशी विरोध आहे.

६. या अर्थाचा 'श्वासांना मदिरेचा गंध असलेल्या' या अर्थाशी विरोध आहे.
७. चकार कोठेच न वापरण्याचे उदाहरण म्हणून पृ. २३४ वरील **गामश्वं पुरुषं पशुम्।** हे वाक्य पाहा. तसेच एका प्रसिद्ध सुभाषितातील **श्वानं युवानं मघवानमाह।** हा चरणही पाहा.
८. **नखोद्भासिनः** याच्या दुसऱ्या अर्थाचे विवरण अभिनवगुप्तांनी **ये खे न उद्भासन्ते** (म्हणजे जे 'आकाशात' प्रकाशित होत नाहीत) असे केले आहे, ते, '**ये खं न उद्भासयन्ति**' (म्हणजे जे 'आकाशाला' प्रकाशित करीत नाहीत) असेही करिता येईल व ते विवरण **खं येऽभ्युज्ज्वलयन्ति** या शब्दयोजनेशी अधिक जुळणारे होईल.

ध्वन्यालोकः

अर्थशक्त्युद्भवस्त्वन्यो यत्रार्थः स प्रकाशते।
यस्तात्पर्येण वस्त्वन्यद्व्यनक्त्युक्तिं विना स्वतः॥ २२॥

यत्रार्थः स्वसामर्थ्यादर्थान्तरमभिव्यनक्ति शब्दव्यापारं विनैव सोऽर्थशक्त्युद्भवो नामानुस्वानोपमव्यङ्ग्यो ध्वनिः।

यथा—
एवंवादिनि देवर्षौ पार्श्वे पितुरधोमुखी।
लीलाकमलपत्राणि गणयामास पार्वती॥

अत्र हि लीलाकमलपत्रगणनमुपसर्जनीकृतस्वरूपं शब्दव्यापारं विनैवार्थान्तरं व्यभिचारिभावलक्षणं प्रकाशयति। न चायमलक्ष्यक्रमव्यङ्ग्यस्यैव ध्वनेर्विषयः। यतो यत्र साक्षाच्छब्दनिवेदितेभ्यो विभावानुभावव्यभिचारिभ्यो रसादीनां प्रतीतिः, स तस्य केवलस्य मार्गः। यथा कुमारसम्भवे मधुप्रसङ्गे वसन्तपुष्पाभरणं वहन्त्या देव्या आगमनादिवर्णनं मनोभवशरसन्धानपर्यन्तं शम्भोश्च परिवृत्तधैर्यस्य चेष्टाविशेषवर्णनादि साक्षाच्छब्दनिवेदितम्। इह तु सामर्थ्याक्षिप्तव्यभिचारिमुखेन रसप्रतीतिः। तस्मादयमन्यो ध्वनेः प्रकारः।

ध्वन्यालोक

पण अर्थशक्तिमूल ध्वनि ( याहून ) वेगळा आहे. त्या प्रकारात असा ( वाच्य ) अर्थ प्रकट होतो की, जो त्या दुसऱ्या अर्थाचे वाचक शब्द वापरले

नसतानाही स्वतःच त्या दुसऱ्या अर्थाला[१] प्राधान्य देऊन सूचित करतो ॥ २२ ॥

ज्या ठिकाणी ( वाच्य ) अर्थ स्वतःच्या सामर्थ्याने, शब्दांच्या (अभिधा) व्यापाराशिवायच दुसरा अर्थ व्यक्त करितो, तो अर्थशक्त्युद्भव नावाचा, अनुरणनरूप व्यंग्यार्थ असलेल्या ध्वनीचा ( दुसरा ) प्रकार होय.

जसे—

" तो देवर्षि ( अंगिरस् ) असे[२] म्हणत असताना पार्वती पित्याच्या जवळ, खाली मान घालून, हातातल्या, क्रीडेसाठी असलेल्या कमळाच्या पाकळ्या मोजू लागली."[३]

या उदाहरणात, क्रीडेसाठी असलेल्या कमळाच्या पाकळ्या मोजणे ही गोष्ट गौण असून ती 'लज्जा' या दुसऱ्या अर्थाचे वाचक शब्द येथे वापरले नसतानाही 'लज्जा' हा, व्यभिचारिभावाचे स्वरूप असलेला, दुसरा अर्थ सुचवते. आणि हे उदाहरण केवळ म्हणजे शुद्ध अलक्ष्यक्रमव्यंग्य ध्वनीचे नाही. कारण, ज्या उदाहरणात विभाव, अनुभाव व व्यभिचारी भाव यांचे, शब्दांनी वर्णन करून रसादींची प्रतीति साक्षात् म्हणजे विनाविलंब घडवली जाते, ते निव्वळ अलक्ष्यक्रम-व्यंग्याचे उदाहरण होय. उदाहरणार्थ— 'कुमारसंभवा'मध्ये वसंत ऋतूचा प्रारंभ झाला असताना वसंतकालीन पुष्पांचा साज चढवलेल्या पार्वतीदेवीच्या आगमन वगैरेंचे, मदन शंकरावर शरसंधान करीपर्यंतचे वर्णन आणि शंकरांची मनःशांति ढळल्यामुळे त्यांनी केलेल्या विशिष्ट कृतींचे वर्णन शब्दांनी केले आहे. पण प्रस्तुत उदाहरणात वाच्यार्थाच्या व्यंजकत्व-सामर्थ्याने व्यभिचारिभाव सुचवून रसप्रतीति घडविली आहे. म्हणून हा ध्वनीचा ( निव्वळ असंलक्ष्यक्रमव्यंग्याहून ) वेगळा ( म्हणजे संलक्ष्यक्रमव्यंग्याशी मिश्रित अशा असंलक्ष्यक्रमव्यंग्याचा ) प्रकार होय.

## लोचनम्

एवं शब्दशक्त्युद्भवं ध्वनिमुक्त्वार्थशक्त्युद्भवं दर्शयति— अर्थेति। अन्य इति शब्दशक्त्युद्भवात्। स्वतस्तात्पर्येणेत्यभिधाव्यापारनिराकरणपरमिदं पदं ध्वननव्यापारमाह न तु तात्पर्यशक्तिम्। सा हि वाच्यार्थप्रतीतावेवोपक्षीणेत्युक्तं प्राक्। अनेनैवाशयेन वृत्तौ व्याचष्टे— यत्रार्थः स्वसामर्थ्यादिति। स्वत इति शब्दः स्वशब्देन व्याख्यातः। उक्ति

विनेति व्याचष्टे— शब्दव्यापारं विनैवेति। उदाहरति— यथा एवमिति। अर्थान्तरमिति लज्जात्मकम्। साक्षादिति। व्यभिचारिणां यत्रालक्ष्य-क्रमतया व्यवधिवन्ध्यैव प्रतिपत्तिः स्वविभावादिबलात्तत्र साक्षाच्छब्द-निवेदितत्वं विवक्षितमिति न पूर्वापरविरोधः। पूर्वं ह्युक्तं व्यभिचारि-णामपि भावत्वान्न स्वशब्दतः प्रतिपत्तिरित्यादि विस्तरतः। एतदुक्तं भवति— यद्यपि रसभावादिरर्थो ध्वन्यमान एव भवति न वाच्यः कदाचिदपि, तथापि न सर्वोऽलक्ष्यक्रमस्य विषयः। यत्र हि विभावानु-भावेभ्यः स्थायिगतेभ्यो व्यभिचारिगतेभ्यश्च पूर्णेभ्यो झटित्येव रस-व्यक्तिस्तत्रास्त्वलक्ष्यक्रमः।

यथा—

निर्वाणभूयिष्ठमथास्य वीर्यं सन्धुक्षयन्तीव वपुर्गुणेन।
अनुप्रयाता वनदेवताभिरदृश्यत स्थावरराजकन्या॥
इत्यादौ सम्पूर्णालम्बनोद्दीपनविभावतायोग्यस्वभाववर्णनम्।
प्रतिग्रहीतुं प्रणयिप्रियत्वात्त्रिलोचनस्तामुपचक्रमे च।
संमोहनं नाम च पुष्पधन्वा धनुष्यमोघं समधत्त बाणम्॥
इत्यनेन विभावतोपयोग उक्तः।
हरस्तु किञ्चित्परिवृत्तधैर्यश्चन्द्रोदयारम्भ इवाम्बुराशिः।
उमामुखे बिम्बफलाधरोष्ठे व्यापारयामास विलोचनानि॥

अत्र हि भगवत्याः प्रथममेव तत्प्रवणत्वात्तस्य चेदानीं तदुन्मुखी-भूतत्वात् प्रणयिप्रियतया च पक्षपातस्य सूचितस्य गाढीभावाद्रत्यात्मनः स्थायिभावस्यौत्सुक्यावेगचापल्यहर्षादेश्च व्यभिचारिणः साधारणीभूतोऽनुभाववर्गः प्रकाशित इति विभावानुभावचर्वणैव व्यभिचारिचर्वणायां पर्यवस्यति। व्यभिचारिणां पारतन्त्र्यादेव स्रक्सूत्रकल्पस्थायिचर्वणा-विश्रान्तेरलक्ष्यक्रमत्वम्। इह तु पद्मदलगणनमधोमुखत्वं चान्यथापि कुमारीणां सम्भाव्यत इति झटिति न लज्जायां विश्रमयति हृदयम्, अपि तु प्राग्वृत्ततपश्चर्यादिवृत्तान्तानुस्मरणेन तत्र प्रतिपत्तिं करोतीति क्रम-व्यङ्ग्यतैव। रसस्त्वत्रापि दूरत एव व्यभिचारिस्वरूपे पर्यालोच्यमाने भातीति तदपेक्षयाऽलक्ष्यक्रमतैव। लज्जापेक्षया तु तत्र लक्ष्यक्रमत्वम्। अमुमेव भावमेवशब्दः केवलशब्दश्च सूचयति।

याप्रमाणे (कारिका २१ मध्ये) शब्दशक्तिमूल ध्वनीचे वर्णन केल्यावर कारिकाकार अर्थशक्तिमूल ध्वनि कोणता, ह्याचा विचार 'पण अर्थशक्तिमूल' इ. शब्दांनी करितात. 'वेगळा' म्हणजे 'शब्दशक्ति-मूल' प्रकाराहून (वेगळा). 'स्वतः (स्वसामर्थ्याने) आणि 'व्यंग्या-र्थाला प्राधान्य देऊन' हे शब्द अभिधाव्यापाराचे निराकरण करण्या-साठी असून त्यांचा रोख ध्वननव्यापाराकडे आहे, 'तात्पर्य' नामक वाक्यवृत्तीकडे नाही.[४] कारण, ती तात्पर्यवृत्ति (संपूर्ण वाक्याच्या एकमुखी) वाच्यार्थाचा बोध करून देताक्षणीच क्षीण होऊन जाते हे पूर्वी[५] सांगितलेले आहे, हाच अभिप्राय ग्रंथकार वृत्तीमध्ये 'ज्या ठिकाणी स्वतःच्या सामर्थ्याने' इ. शब्दांनी सांगतात. स्वतः या (कारिकेतील) शब्दाचे व्याख्यान वृत्तीत 'स्वतःच्या (सामर्थ्याने)' या शब्दाने केले आहे. 'वाचकशब्द वापरले नसताही' याचे विवरण 'शब्दांच्या अभिधाव्यापाराशिवायच' या शब्दांनी (वृत्तिकार) करितात. व अर्थशक्तिमूल ध्वनीचे उदाहरण देतात. 'जसे— तो देवर्षि असे'... इ. दुसरा अर्थ म्हणजे (या उदाहरणात) 'लज्जा' हा व्यभिचारिभाव.

'प्रत्यक्ष' इ.— व्यभिचारिभावांची प्रतीति जेथे वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांचे पौर्वापर्य लक्षात न येता, कोणत्याही व्यवधानावाचून, स्वतःच्या विभावादिकांच्या वर्णनामुळेच येते, तेथे व्यभिचारिभावांची प्रतीति त्यांच्या (बोधक) शब्दांच्या द्वारे साक्षात् म्हणजे विनाविलंब[६] होते असे वृत्तिकारांना म्हणावयाचे असल्यामुळे त्यांनी पूर्वी[७] केलेल्या व आता केलेल्या विधानांमध्ये विरोध नाही. कारण पूर्वी त्यांनी 'व्यभि-चारिभाव हे देखील भावच असल्याने त्यांची प्रतीति त्यांच्या स्वतःच्या वाचकशब्दांनी येत नाही.' इ. विस्ताराने सांगितले होते. तेव्हा आता-पर्यंत वृत्तिकारांनी केलेल्या विवेचनाचा सारांश असा :— रस, भाव इ. स्वरूपाचे (भावनात्मक) अर्थ जरी नेहमी व्यंजनेनेच सुचविले जातात आणि जरी ते कधीही 'वाच्य' असत नाहीत, तरी ते नेहमीच अलक्ष्य-क्रम प्रकाराचेच असतात[८] असे नाही. कारण, ज्या ठिकाणी स्थायिभाव व व्यभिचारिभाव यांचे विभाव—अनुभाव हे पूर्णपणे वर्णिलेले असल्या-

मुळे रसादिकांची प्रतीति व्यंजनेने तत्क्षणी येते, तेथेच अलक्ष्यक्रम हा ध्वनीचा प्रकार असतो.

उदा .–

'त्यानंतर मदनाचे जवळजवळ संपुष्टात आलेले बळ आपल्या शरीरसौंदर्याने जणू पुनरुज्जीवित करणारी गिरिराजाची कन्या (पार्वती) आपल्या वनदेवता–मैत्रिणींसह तेथे आलेली मदनाच्या दृष्टीस पडली.'[१]

या व यानंतरच्या चार श्लोकांत कवीने पार्वती व तिची रूपसंपदा, वेषभूषा वगैरेंचे वर्णन अशा कुशलतेने केले आहे की, त्यांना शंकराच्या रति या स्थायिभावाचे अनुक्रमे आलंबन व उद्दीपन विभाव होण्याचे सामर्थ्य प्राप्त झाले आहे.

'आणि भक्तांबद्दल आपुलकी असणारा शंकर (पार्वतीने अर्पण केलेली) ती जपमाळ घेऊ लागला, तोच मदनाने संमोहन नावाचा हमखास विजयी होणारा बाण आपल्या धनुष्याला जोडला.'[१०]

या श्लोकात शंकराच्या रतीचा आलंबनविभाव होण्याचे सामर्थ्य (पार्वतीला) प्राप्त झाल्याचे दाखविले आहे.

'पण चंद्रोदय होताना सागराची शांतता जशी डळमळते, तशीच शंकराचीही मनःशांति किंचित् विचलित होऊन त्याने उमेच्या बिंबफल-सदृश अधरोष्ठ असलेल्या मुखाकडे आपले (तिन्ही) नेत्र वळविले.'[११]

देवी पार्वतीचे मन आधीपासूनच[१२] शंकराकडे ओढ घेत होते आणि आता शंकर तिच्याकडे वळून पाहू लागल्यामुळे व त्याला भक्तांविषयी आपुलकी वाटत असल्यामुळे सूचित झालेली त्याची तिच्याविषयीची सहानुभूति दृढ होऊन रतिरूपी स्थायिभावाला व औत्सुक्य, आवेग, चापल्य, हर्ष इ. व्यभिचारिभावांनाही साधारण असलेले अनुभाव[१३] या श्लोकात वर्णिले आहेत, म्हणून येथे विभाव–अनुभावांच्या आस्वादाचे पर्यवसान (रतिभावाच्याच नव्हे, तर) व्यभिचारिभावांच्याही आस्वादात होत आहे. व्यभिचारिभाव हे परतंत्र म्हणजे स्थायिभावावर अवलंबून असल्यामुळेच माळेच्या दोऱ्याप्रमाणे असणारा[१४] जो स्थायिभाव, त्याच्या चर्वणेमध्येच व्यभिचारिभावांच्या चर्वणेचे पर्यवसान होते व त्यांचा आस्वाद तत्क्षणी म्हणजे क्रम लक्षात न येताच मिळतो. पण प्रस्तुत (म्हणजे 'तो देवर्षि' इ.) उदाहरणात

कमळाच्या पाकळ्या मोजणे, खाली मान घालणे या क्रिया कुमारिकांच्या बाबतीत (केवळ लज्जेमुळेच नव्हे, तर) इतर कारणांमुळेही संभवत असल्याने[१५] त्या क्रिया सहृदयाच्या मनाला एकदम 'लज्जा' या व्यभिचारिभावावर आणून सोडीत नाहीत, तर पूर्वी पार्वतीने केलेली तपश्चर्या इ. घटनांचे स्मरण झाल्यावर मगच सहृदयाला तिच्या मनात लज्जा उत्पन्न झाली आहे ( व त्यामुळे ती या क्रिया करीत आहे) असे निश्चितपण ज्ञान होते, म्हणून तिच्या ठिकाणची लज्जा हा व्यंग्यार्थ क्रमाने म्हणजे वाच्यार्थाच्या ज्ञानानंतर काही वेळानेच लक्षात येणारा आहे.[१६] आणि रस तर या उदाहरणातही सरतेशेवटीच, म्हणजे लज्जा या व्यभिचारिभावाच्या स्वरूपाचा विचार केल्यावरच प्रत्ययास येतो, म्हणून रसाच्या दृष्टीने हे उदाहरण असंलक्ष्यक्रमव्यंग्याचे, पण लज्जा या व्यंग्यार्थाच्या दृष्टीने ते संलक्ष्यक्रमव्यंग्याचे उदाहरण होय.[१७] वृत्तीतले **एव** (केवळ) आणि **केवल** (निव्वळ) हे शब्द हाच आशय सुचवितात.

टीपा

१. मूळ संस्कृत कारिकेत अन्यद् वस्तु असे शब्द आहेत. त्यांचे विवरण वृत्ती-मध्ये **अर्थान्तरम्** असे केले आहे. हा दुसरा अर्थ केवळ वस्तुस्वरूपाचाच असेल असे नाही, तर अलंकार स्वरूपाचाही असेल.

२. आम्ही पार्वतीला शंकरातर्फे मागणी घालावयास आलो आहोत, हा त्या देवर्षींच्या म्हणण्याचा सारांश.

३. कुमारसंभव, सर्ग ६, श्लोक ८६.

४. **तात्पर्येण** या (कारिकेतील) शब्दाचा अर्थ 'त्याला (म्हणजे व्यंग्य अर्थाला) प्राधान्य देऊन' असा आहे. 'तात्पर्यनामक वाक्यव्यापाराने' असा नाही.

५. पूर्वी म्हणजे पृ. ८९ वरील 'कारण तो तात्पर्यरूपी व्यापार अन्वयाची प्रतीति होताच क्षीण होऊन जातो' या वाक्यात.

६. मूळ वृत्तीत **साक्षाच्छब्दनिवेदितेभ्यो विभावानुभावव्यभिचारिभ्यो रसादीनां प्रतीतिः ।** असे शब्द आहेत. पूर्वी १ ल्या उद्द्योतात वृत्तीमध्ये पृ. १२२ व १२३ वर आनंदवर्धनांनी 'रसादि हे कोणत्याही प्रकारे वाच्य नसतात' असे स्पष्ट म्हटले होते. पृ. १२३ वर अभिनवगुप्तही **रसभावतदाभासतत्प्रशमाः पुनर्न कदाचिदभिधीयन्ते ।** असे म्हणतात. रसादि म्हणजे रस, भाव इ. यांतील 'भाव' शब्दात व्यभिचारिभावही आलेच. **व्यभिचारी तयाञ्जितः**

भाव: प्रोक्त: असे मम्मटाने काव्यप्रकाश, झळकीकर आवृत्ति, पृ. ११८ वर 'भावा'च्या एका प्रकाराचे लक्षण केले आहे.

पण येथें तर साक्षाच्छब्दनिवेदितेभ्यो व्यभिचारिभ्य: असे आनंदवर्धन म्हणतात ! तेव्हा हे त्यांचे विधान पूर्वीच्या त्यांच्या विधानाशी विसंगत आहे असे वाटेल. अभिनवगुप्तांनाही या विधानाचे विवरण करिताना 'पूर्वापरविरोध वाटेल' ही कल्पना आलेली आहे, व म्हणून वृत्तीतल्या प्रस्तुत विधानाचा असा अर्थ लावला म्हणजे पूर्वापरविरोध राहणार नाही, असे ते म्हणतात.

तरीही काव्यप्रकाशाच्या 'श्रीधर' या टीकाकाराने (Calcutta Sanskrit College Series च्या १९५९ साली प्रसिद्ध झालेल्या Vo.. I च्या पृ. १२८ वर) पुढील उद्गार काढले आहेत — यत्तु ध्वनिकृता 'यत्र साक्षादवर्णनिवेदितेभ्यो विभावानुभावव्यभिचारिभ्य: स्वतो रसादिप्रतिपत्ति: अव्यवधानेन सोऽलक्ष्यक्रमस्य ध्वनेर्विषय:' इत्युक्तम्, तन्मुने: मतस्य अननुगुणम् यतो विभाववत् नैव व्यभिचारिण: साक्षाच्छब्दप्रतिपाद्या:, किं तु रसवत् स्थायिवच्च विभावादिसंयोगेनैव प्रकाश्या:, भावत्वात् । तदिदम् आमृष्टं: सहृदयै: अनुन्मीलितपूर्वे अलघ्यनिर्माणे व्यग्रचेतस: ग्रन्थकर्तु: विस्मृतं ग्रन्थान्तरैकदेशत्वात्, अनवधानवशाच्च । अस्योद्घोषणमात्मन एव दूषणम् इति उपेक्षणीयमेव । श्रीधराने म्हटलेली ही वाक्ये काहींनी उद्धृतही केली आहेत. श्रीधराने या संदर्भात अभिनवगुप्तांचे विवरण लक्षात घेतलेले दिसत नाही. अभिनवगुप्त साक्षात् याचा संबंध प्रतीति: या शब्दाशी जोडावयास सांगतात. विभाव व अनुभाव हे शब्दांनी नेहमीच वाच्य असतात (पाहा, लोचन, पृ. ३३६ वरील अभिनवगुप्तांचे पुढील वाक्य— 'विभाव व अनुभाव हे तर आपल्या वाचक शब्दांनी वाच्यच झालेले असतात.'), पण व्यभिचारिभावांचे 'शब्दांनी वर्णन करून' या (वृत्तीतील) शब्दांचा अर्थ 'व्यभिचारिभाव हे त्यांच्या सूचक शब्दांनी जेथे सुचविलेले असतील व त्यामुळे त्यांची व्यवधिबन्ध्या म्हणजे कोणत्याही व्यवधानाशिवाय झटित्येच म्हणजे तत्क्षणी प्रतीति येत असेल' असा करावयाचा. ध्वन्यालोकावरील 'दीधिति' टीका लिहिणाराने पृ. १२५ वर 'अत्र शब्दसाक्षान्निवेदितत्वस्य वाच्यार्थप्रतीत्यव्यवहितप्रतीतिविषयत्वमात्रपरत्वात्' असेच म्हटले आहे. साक्षात् याचा अर्थ अव्यवधानेन असा घ्यावयास आणखी एक आधार म्हणजे वाचकशब्दाची व्याख्या करिताना मम्मटाने (काव्यप्रकाश, झळकीकर आवृत्ति, पृ. ३१ वर साक्षात्संकेतितम् असे कारिकेत म्हणून वृत्तीमध्ये साक्षात् याचा अर्थ अव्यवधानेन असाच केला आहे.

७. म्हणजे पृ. १२२ वर, (मराठी) वृत्तीमधील पहिल्याच वाक्यात.

८. पाहा, पृ. ३३३, लोचनातील 'रसादिरूप अर्थ जेव्हा'..... पासून 'पुढे सांगण्यात येईल' पर्यंतची ३–४ वाक्ये.

९. कुमारसंभवम्, ३–५२
१०. कुमारसंभवम्, ३–६६
११. कुमारसंभवम्, ३–६७
१२. पाहा, कुमारसंभवम् १–५० व ६०
१३. शंकराचे धैर्य किंचित् ढळणे व त्याने आपले तिन्ही नेत्र तिच्या अधरोष्ठा-कडे फिरविणे हे दोन्ही 'अनुभाव' म्हणजे रति या (व्यंग्य) स्थायि-भावाचे व औत्सुक्य इ. (व्यंग्य) व्यभिचारिभावांचेही परिणाम आहेत, म्हणून ते अनुभाव स्थायिभावाला व व्यभिचारिभावांनाही साधारण आहेत असे म्हटले आहे.
१४. हा स्रक्सूत्रांचा दृष्टांत मागे (पृ. ३०७ वर) उपादान लक्षणेच्या संदर्भात देण्यात आला आहे. पृ. ३१० वरील ८ वी टीपही पाहा. प्रस्तुत ठिकाणी स्थायिभाव हा माळेतील दोऱ्यासारखा व व्यभिचारिभाव हे त्या दोऱ्यावर ओवलेल्या फुलांसारखे किंवा मोत्यांसारखे, असतात. म्हणजेच त्या स्थायि-भावावर संपूर्णतया अवलंबून असतात, असे म्हटले आहे.
१५. उदा. एक निरर्थक चाळा म्हणूनही.
१६. याउलट 'पण चंद्रोदय होताना' (पृ. ५००) इ. श्लोकात शंकराचे धैर्य ढळून त्याने आपले नेत्र पार्वतीच्या अधरोष्ठाकडे वळविणे हे दोन अनुभाव रतीचे बिनाविलंब सूचन करितात, म्हणून ते निर्भेळ अलक्ष्यक्रम ध्वनीचे उदाहरण होय.
१७. वाच्यार्थ कळल्यावर लज्जा या व्यभिचारिभावाचे ज्ञान व्हावयास वेळ लागतो, म्हणून व्यभिचारिभावाच्या प्रतीतीच्या दृष्टीने हे उदाहरण संलक्ष्य-क्रम ध्वनीचे होय. परंतु लज्जेची प्रतीति झाल्यावर अभिलापविप्रलंभ रतीची प्रतीति तावडतोब होत असल्याने त्या दृष्टीने म्हणजे रसाचे दृष्टीने हे असंलक्ष्यक्रम व्यंग्याचे उदाहरण ठरते. अशा रीतीने या उदाहरणामध्ये असंलक्ष्यक्रमव्यंग्य व संलक्ष्यक्रमव्यंग्य या दोन ध्वनिप्रकारांचा अनुग्राह्य–अनुग्राहक संबंधावर आधारलेला संकर आहे असे आनंदवर्धनांनी पुढे (काशी आवृत्ति, पृ. ५०२ वर) म्हटले आहे.

हाच विषय जगन्नाथाने 'रसगंगाधरा'त हेच उदाहरण उद्धृत करून पृ. १३०–१३१ वर चर्चिला आहे. तसेच रसगंगाधर, पृ. १४ व १६५–१६६ वरही दुसऱ्या उदाहरणांच्या संदर्भात याच विषयाची चर्चा केली आहे. अभिलाषरतीची प्रतीति जरी लज्जेच्या प्रतीतीनंतर लगेच होत असली, तरी विभावानुभावांच्या प्रतीतीनंतर लज्जेची विलंबाने प्रतीति होत असल्यामुळे विभावानुभावांच्या प्रतीतीच्या दृष्टीने अभिलाषरतीचीही प्रतीति व्हावयास विलंबच लागतो म्हणून येथे अभिलाषरतीचा ध्वनि हा संलक्ष्यक्रम आहे असे वाटणे शक्य आहे. पण तसे

वाटले तरी काही बिघडत नाही. कारण काही विशिष्ट परिस्थितीमध्ये रत्यादि स्थायिभावांचा ध्वनिसुद्धा संलक्ष्यक्रम असू शकतो हा मुद्दा जगन्नाथाने तर रसगंगाधर, पृ. ११४ वर चर्चिला आहेच, पण त्याआधी अभिनवगुप्तांनीही मागे पृ. ३३३ व १५० वर हाच मुद्दा मांडला आहे.

ध्वन्यालोक:

यत्र च शब्दव्यापारसहायोऽर्थोऽर्थान्तरस्य व्यञ्जकत्वेनोपादीयते स नास्य ध्वनेर्विषयः । यथा —

सङ्केतकालमनसं विटं ज्ञात्वा विदग्धया ।
हसन्नेत्रार्पिताकूतं लीलापद्मं निमीलितम् ॥

अत्र लीलाकमलनिमीलनस्य व्यञ्जकत्वमुक्त्यैव निवेदितम् ।

तथा च —

शब्दार्थशक्त्याऽऽक्षिप्तोऽपि व्यङ्ग्योऽर्थः कविना पुनः ।
यत्राविष्क्रियते स्वोक्त्या सान्यैवालङ्कृतिर्ध्वनेः ॥ २३ ॥

शब्दशक्त्यार्थशक्त्या शब्दार्थशक्त्या वाक्षिप्तोऽपि व्यङ्ग्योऽर्थः कविना पुनर्यत्र स्वोक्त्या प्रकाशीक्रियते सोऽस्मादनुस्वानोपमव्यङ्ग्याद्ध्वनेरन्य एवालङ्कारः । अलक्ष्यक्रमव्यङ्ग्यस्य वा ध्वनेः सति सम्भवे स तादृगन्योऽलङ्कारः ।

तत्र शब्दशक्त्या यथा —

वत्से मा गा विषादं श्वसनमुरुजवं सन्त्यजोर्ध्वप्रवृत्तं
कम्पः को वा गुरुस्ते भवतु बलभिदा जृम्भितेनात्र याहि ।
प्रत्याख्यानं सुराणामिति भयशमनच्छद्मना कारयित्वा
यस्मै लक्ष्मीमदाद्वः स दहतु दुरितं मन्थमूढां पयोधिः ॥

अर्थशक्त्या यथा —

अम्बा शेतेऽत्र वृद्धा परिणतवयसामग्रणीरत्र तातो
निःशेषागारकर्मश्रमशिथिलतनुः कुम्भदासी तथात्र ।
अस्मिन् पापाहमेका कतिपयदिवसप्रोषितप्राणनाथा
पान्थायेत्थं तरुण्या कथितमवसरव्याहृतिव्याजपूर्वम् ॥

उभयशक्त्या यथा — 'दृष्ट्या केशवगोपरागहृतया' इत्यादौ ॥२३॥

आणि ज्या उदाहरणात वाच्यार्थ हा व्यंग्यार्थाला वाच्य करणाऱ्या शब्दांच्या मदतीने दुसऱ्या अर्थाचा व्यंजक म्हणून योजिला जातो, ते या ध्वनीचे उदाहरण नव्हे. जसे—

" ( ज्याने आपल्या हसऱ्या डोळ्यांनी आपला अभिप्राय प्रकट केला आहे अशा ) प्रियकराला आपल्याकडून संकेताची वेळ कळायला हवी आहे हे ओळखून त्या चतुर स्त्रीने आपल्या हसऱ्या डोळ्यांनी आपला अभिप्राय प्रकट करीत आपल्या हातातील क्रीडाकमळ मिटवून टाकले. "[१]

या ठिकाणी ' क्रीडाकमळ मिटविणे ' या शब्दांमधील ' संध्याकाळ ' हा अर्थ सुचविण्याचे सामर्थ्य कवीने शब्दांनीच सांगून टाकले आहे !

आणि त्यामुळे—

शब्द किंवा अर्थ यांच्या शक्तीने व्यंग्य अर्थ सुचवलेला असतानासुद्धा ज्या उदाहरणात तो व्यंग्यार्थ आपल्या वाचक शब्दांनी प्रकट केला जातो, तो ( या ) अनुरणनरूपव्यंग्यार्थप्रधान ध्वनीहून निराळाच अलंकार होय. ॥ २२ ॥

केवळ शब्दशक्तीने, किंवा केवळ अर्थशक्तीने किंवा शब्द आणि अर्थ या दोघांच्याही शक्तीने व्यंग्यार्थ सुचवला गेला असतानाही कवीकडून ज्या उदाहरणात व्यंग्यार्थाच्या वाचक शब्दांनी तो ( व्यंग्यार्थ ) उघड केला जातो, तो या अनुरणनरूप व्यंग्यार्थ असलेल्या ध्वनीहून वेगळाच अलंकार[२] होय. किंवा जेथे असंलक्ष्यक्रम ध्वनि संभवत असेल तेथे तो त्या असंलक्ष्यक्रमव्यंग्य ध्वनीचा तसल्या प्रकारचा, वाच्य अलंकाराहून आगळाच अलंकार[३] होय.

त्यांपैकी द्व्यर्थी शब्दयोजनेने व्यंग्यार्थ सुचवून तो पुनः वाचक शब्दांनी उघड केल्याचे उदाहरण—

" बाले ! विषादाप्रत जाऊ नकोस ( १. खिन्न होऊ नकोस, २. विष प्राशन करणाऱ्या शंकराकडे जाऊ नकोस ). वेगाने चाललेले आणि वरवर जाणारे उसासे थांबव. ( दुसरा अर्थ– वेगाने वाहणारा ' वायु ' हा देव आणि ज्याच्या ज्वाळा वरवरच उसळतात असा अग्नि, या दोघांनाही सोडून दे ). हा इतका मोठा कंप तुला का बरे ( उत्पन्न झाला आहे ) ( दुसरा अर्थ – पाण्याचा स्वामी वरुण किंवा जलदेव हे तर तुला वडील माणसांप्रमाणे आहेत, म्हणून त्यांना वरू नकोस ). बळ नाहीसे करणारे आळोखेपिळोखे देणे राहू दे ( दुसरा

अर्थ—गर्वाने मातलेल्या इन्द्राचा विचार नको ). तू आपली इकडे जा." अशा रीतीने लक्ष्मीची भीती बालवयाच्या बहाण्याखाली इतर देवांचे ( तिच्याकरवी) निराकरण करवून समुद्राने मंथनामुळे दिङ्मूढ झालेली लक्ष्मी ज्याला देऊन टाकली तो ( विष्णु ) तुमचे पाप जाळून भस्म करो."

अर्थशक्तीने व्यंग्यार्थ सुचवून तो पुन्हा शब्दांनी वाच्य केल्याचे उदाहरण पुढीलप्रमाणे—

"माझी म्हातारी सासू इथे झोपते. पिकले पान झालेल्यांचे दादा असलेले माझे मामंजी इथे ( झोपतात ). त्याचप्रमाणे घरातली सगळी कामे करून त्या श्रमांनी गलितगात्र झालेली मोलकरीण इथे निजते. थोड्याच दिवसांपूर्वी माझे प्राणनाथ परगावी गेले आहेत. मी दळभद्री एकटीच या अंथरुणावर असते!" वाटसराला जागा दाखवून देण्याच्या मिषाने तरुणीने त्याला वरीलप्रमाणे सांगितले.

शब्द व अर्थ या दोहोंच्याही शक्तीने सुचवलेल्या व्यंग्यार्थाची पुन्हा वाच्यता केल्याचे उदाहरण म्हणजे 'हे केशवा'!....वगैरे.

लोचनम्

'उक्ति विने'ति यदुक्तं तद्व्य वच्छेद्यं दर्शयितुमुपक्रमते–यत्र चेति। चशब्दस्तुशब्दस्यार्थे। अरूयेति। अलक्ष्यक्रमस्तु तत्रापि स्यादेवेति भावः। उदाहरति– सङ्केतेति। व्यञ्जकत्वमिति। प्रदोषसमयं प्रतीति शेषः। उक्त्यैवेति। आद्यपादत्रयेणेत्यर्थः। यद्यपि चात्र शब्दान्तरसन्निधानेऽपि प्रदोषार्थं प्रति न कस्यचिदभिधाशक्तिः पदस्येति व्यञ्जकत्वं न विघटितं, तथापि शब्देनैवोक्तमयमर्थोऽर्थान्तरस्य व्यञ्जक इति। ततश्च ध्वनेर्य-द्गोप्यमानतोदितचारुत्वात्मकं प्राणितं तदपहस्तितम्। यथा कश्चिदाह– 'गम्भीरोऽहं न मे कृत्यं कोऽपि वेद न सूचितम्। किञ्चिद् ब्रवीमि' इति। तेन गाम्भीर्यसूचनार्थः प्रत्युत आविष्कृत एव। अत एवाह– व्यञ्जकत्वमिति उक्त्यैवेति च ॥ २२ ॥

प्रक्रान्तप्रकारद्वयोपसंहारं तृतीयप्रकारसूचनं चैकेनैव यत्नेन करो-मीत्याशयेन साधारणमवतरणपदं प्रक्षिपति वृत्तिकृत्– तथा चेति। तेन चोक्तप्रकारद्वयेनायमपि तृतीयः प्रकारो मन्तव्य इत्यर्थः। शब्दश्चार्थश्च

शब्दार्थौ चेत्येकशेषः। सान्यैवेति। न ध्वनिरसौ, अपि तु श्लेषादिरलङ्कार इत्यर्थः। अथवा ध्वनिशब्देनालक्ष्यक्रमः तस्यालङ्कार्यस्याङ्गिनः स व्यङ्ग्योऽर्थोऽन्यो वाच्यमात्रालङ्कारापेक्षया द्वितीयो लोकोत्तरश्चालङ्कार इत्यर्थः। एवमेव वृत्तौ द्विधा व्याख्यास्यति। विषमत्तीति विषादः। ऊर्ध्वप्रवृत्तमग्निमित्यत्र चार्थो मन्तव्यः। करूपोऽपास्पतिःको ब्रह्मा वा तव गुरुः। बलभिदा इन्द्रेण जृम्भितेन ऐश्वर्यमदमत्तेनेत्यर्थः। जृम्भितं च गात्रसंमर्दनात्मकं बलं भिनत्ति आयासकारित्वात्। प्रत्याख्यानमिति वचसैवान्न द्वितीयोऽर्थोऽभिधीयत इति निवेदितम्। कारयित्वेति। सा हि कमला पुण्डरीकाक्षमेव हृदये निधायोत्थितेति स्वयमेव देवान्तराणां प्रत्याख्यानं करोति। स्वभावसुकुमारतया तु मन्दरान्दोलितजलधितरङ्गभङ्गपर्याकुलीकृतां तेन प्रतिबोधतया तत्समर्थाचरणमन्यत्र दोषोद्घाटनेन अत्र याहीति चाभिनयविशेषेण सकलगुणादरदर्शकेन कृतम्। अत एव मन्थमूढामित्याह। इत्युक्तप्रकारेण भयनिवारणव्याजेन सुराणां प्रत्याख्यानं मन्थमूढां लक्ष्मीं कारयित्वा पयोधिर्यस्मै तामदात्स वो युष्माकं दुरितं दहत्विति सम्बन्धः।

अस्वेति। अत्रैकैकस्य पदस्य व्यञ्जकत्वं सहृदयैः सुकल्प्यमिति स्वकण्ठेन नोक्तम्। व्याजशब्दोऽत्र स्वोक्तिः। एवमुपसंहारव्याजेन प्रकारद्वयं सोदाहरणं निरूप्य तृतीयं प्रकारमाह– उभयेति। शब्दशक्तिस्तावद्गोपरागादिशब्दश्लेषवशात्। अर्थशक्तिस्तु प्रकरणवशात्। यावदत्र राधारमणस्याखिलतरुणीजनच्छन्नानुरागगरिमास्पदत्वं न विदितं तावदर्थान्तरस्याप्रतीतेः। सलेशमिति चात्र स्वोक्तिः॥ २३॥

लोचन

'वाचक शब्द वापरले नसताही' हे (प्रस्तुत कारिकेत) शब्द वापरले, त्यामुळे काय वर्ज्य करावयाचे ते दाखविण्याभ वृत्तिकार 'आणि या उदाहरणात' इ. शब्दांनी प्रारंभ करितात. यातला 'आणि' हा शब्द 'पण' या अर्थी घ्यावा. 'या (म्हणजे अर्थशक्तिमूल संलक्ष्यक्रम वस्तु वा अलंकार–) ध्वनीचे (उदाहरण नव्हे)– मात्र तेही ('तां देवपि' इ. श्लोकावरील विवेचनात सांगितल्याप्रमाणे) असंलक्ष्यक्रम प्रकाराचे उदाहरण होईलच. याचे (म्हणजे संलक्ष्यक्रमध्वनि नसल्याचे)

'प्रियकराला संकेताची वेळ' इ. उदाहरण (वृत्तिकार) देतात. 'सुचविण्याचे सामर्थ्य'– येथे सूर्यास्तानंतरची वेळ हा व्यंग्यार्थ सुचविण्याचे (सामर्थ्य),' ह्या शब्दांची भर घालावी. 'शब्दांनीच' याचा अर्थ उदाहरणातील पहिल्या तीन चरणांमध्ये (वापरलेल्या शब्दांनी). या पद्यात जरी निरनिराळे शब्द वापरले असले, तरी त्यांपैकी कोणताही शब्द अभिधाशक्तीने 'सूर्यास्तानंतरची वेळ' हा अर्थ सांगणारा नाही, आणि म्हणून 'क्रीडाकमळ मिटवून टाकले' या शब्दांच्या वाच्यार्थाचे जे व्यंजकत्वसामर्थ्य, त्याला धक्का पोहोचत नसला, तरी '(नायिकेने क्रीडाकमळ मिटविले) हा वाच्य अर्थ संध्याकाळ हा संकेतकाल होय या दुसऱ्या अर्थाला सुचविणारा आहे' असे 'संकेताची वेळ' इ. शब्दांनीच सामान्यतः वाच्य झालेले आहे. आणि त्यामुळे ध्वनीचा प्राण असलेले जे गूढत्वामुळे निर्माण होणारे[४] सौंदर्य, ते नाहीसे करून टाकले आहे. जसे एखाद्याने म्हणावे की– 'मी आतल्या गाठीचा आहे, मी मनात योजिलेल्या कृति किंवा माझ्या हालचालींनी सूचित होणारे अर्थ कोणालाही कळत नाहीत, मी अगदी थोडेसेच बोलणारा आहे,' तर त्यामुळे उलट गांभीर्य सुचविणे' हा जो अर्थ, तो 'मी आतल्या गाठीचा आहे' या शब्दांनी सांगितल्यासारखाच आहे. म्हणूनच वृत्तिकार (वृत्तीत) 'सुचविण्याचे सामर्थ्य' आणि 'शब्दांनीच सांगून टाकले आहे' असे म्हणतात. ॥ २२ ॥

ध्वनीच्या चालू (म्हणजे शब्दशक्तिमूल व अर्थशक्तिमूल या) दोन उपप्रकारांचा समारोप व तिसऱ्या (म्हणजे उभयशक्तिमूल या) उपप्रकाराची सूचना– दोन्ही एकाच प्रयत्नात करून टाकावे या उद्देशाने वृत्तिकार या तिन्ही प्रकारांना लागू पडणारी 'आणि त्यामुळे' इ. प्रस्तावना करितात. आणि नुकत्याच सांगितलेल्या दोन उपप्रकारांवरून हा तिसरा उपप्रकारही संलक्ष्यक्रम ध्वनीचाच आहे असे समजावे, हा आशय. (केवळ) शब्द, (केवळ) अर्थ, आणि शब्द व अर्थ असा (कारिकेतील 'शब्दार्थ' हा शब्द) एकशेषवृत्तीचे उदाहरण[५] समजावा. 'तो निराळाच'– म्हणजे तो 'ध्वनि' नव्हे, तर तो (ध्वनीहून वेगळा) श्लेष इ. (वाच्य) अलंकार होय, हा भावार्थ. किंवा (वृत्तीमधील) (ध्वनेः हे षष्ठीचे एकवचन मानून) त्या शब्दाचा अर्थ 'असंलक्ष्यक्रम

ध्वनीचा ' असा समजावा. तेव्हा अंगी व अलंकार्य असणाऱ्या त्या अलक्ष्यक्रम, ध्वनीचा तो (म्हणजे कारिका [२३] मध्ये सांगितलेला) व्यंग्यार्थ हा वेगळाच अलंकार म्हणजे केवळ वाच्य अलंकाराहून वेगळा व अलौकिक [६] प्रकारचा अलंकार समजावा, हा आशय. अशाच तऱ्हेने कारिकेतील या भागाचे विवरण वृत्तीमध्ये [७] वृत्तिकार दोन प्रकारांनी करितील.

विष प्राशन करितो, तो 'विषाद' (म्हणजे शंकर). 'वरवर जाणारा' याचा दुसरा अर्थ 'अग्नि' असा समजून [८] त्या पक्षी (वेगाने वाहणारा वायुदेव आणि वरवर जाणारा अग्निदेव असा अर्थ करून) 'आणि' हे अव्यय अध्याहृत समजावे. 'कम्प' म्हणजे पाण्याचा पालनकर्ता (वरुण), कः म्हणणे ब्रह्मदेव. हे दोघेही तुला गुरु म्हणजे वडील माणसांप्रमाणे आहेत. **बलभिद्** म्हणजे (बलासुराचा वध करणारा) इंद्र. (**जृम्भित** याचा) 'ऐश्वर्याच्या गर्वाने मातलेला' हा एक अर्थ. शिवाय आळोखेपिळोखे या स्वरूपाचे '**जृम्भित**' शरीराला कष्ट देऊन बळ कमी करिते. [९] 'निराकरण' या शब्दानेच येथे (द्व्यर्थी शब्दांचा) दुसरा म्हणजे व्यंग्य अर्थ बोलून दाखविला जातो, असा (वृत्तिकारांचा) अभिप्राय. 'करवून'– कारण ती लक्ष्मी कमललोचन विष्णूचीच हृदयात स्थापना करून समुद्रातून वर आली होती. म्हणून ती स्वतःच इतर देवांचा त्याग करणार होती. पण ती स्वभावतःच नाजूक, म्हणून मंदरपर्वताने घुसळून काढलेल्या समुद्राच्या लाटा एकमेकांवर आदळल्यामुळे गोंधळून गेली होती. या कारणाने तिचे सांत्वन करण्यासाठी इतर देवतांच्या निराकरणास अनुकूल असे आचरण समुद्राने केले. ते आचरण त्याने दुसऱ्या देवांची न्यूने दाखवून व 'इकडे जा' असे म्हणत (अंगुलिनिर्देशपूर्वक) विशिष्ट अभिनयाच्या द्वारे आणि विष्णूच्या सर्वगुणसंपन्नतेबद्दल आदर दर्शवून केले. म्हणूनच कवीने लक्ष्मीला 'मंथनामुळे दिङ्मूढ झालेली' असे म्हटले. अशा रीतीने तिची भीति दूर करण्याच्या बहाण्याखाली मंथनामुळे दिङ्मूढ झालेल्या लक्ष्मीकरवी इतर देवांचे निराकरण करवून सागराने ती ज्या विष्णूला अर्पण केली, तो विष्णु तुमचे पाप जाळून टाको, असा अन्वय (व अर्थ) लावावा.

सासू इ.—या पद्यातल्या एकेका पदाची सूचकता सहृदयांच्या सहज लक्षात येण्यासारखी आहे. म्हणून आम्ही स्वतः तिचे विवरण करीत नाही. या उदाहरणातील 'मिषाने' हा व्यंग्यार्थ उघड करणारा शब्द कवीने स्वतःच वापरला आहे. याप्रमाणे या विषयाचा (म्हणजे शब्दशक्तिमूल व अर्थशक्तिमूल या दोन प्रकारांचा) समारोप करण्याच्या निमित्ताने त्या दोन प्रकारांचे उदाहरणांसह विवरण करून वृत्तिकार 'दोहोंचाही शक्तीने' इ.[10] शब्दांनी तिसरा (म्हणजे शब्दार्थोभयशक्तिमूल हा) प्रकार वर्णितात. ('हे केशवा' इ.) पद्यात 'गोपराग' इ. शब्द द्व्यर्थी असल्याने त्यांमध्ये दुसरा अर्थ प्रकट करण्याचे सामर्थ्य (म्हणजे शब्दशक्ति) आहे. परंतु वाच्यार्थाला व्यंजकत्वसामर्थ्य प्राप्त होते, ते संदर्भामुळे.[11] राधारमण म्हणजे कृष्ण हा सर्व तरुणींच्या प्रच्छन्न व गाढ प्रीतीचा विषय झाला आहे हे जोपर्यंत वाचकाला माहीत नाही, तोपर्यंत या पद्यातून प्रकट होणारा दुसरा अर्थ त्याच्या लक्षात येणार नाही. या पद्यात तो दुसरा अर्थ कवीने स्वतःच 'सूचकपणे' हा शब्द वापरून उघड करून टाकला आहे. ॥२३॥

टीपा

१. पाहा– दण्डीचा काव्यादर्श, परिच्छेद दुसरा, श्लोक २६१.

२. अलंकार हा शब्द येथे उपमा, रूपक यासारख्या विशिष्ट अर्थाने वापरला नसून 'काव्यशोभाकर धर्म' या सर्वसामान्य अर्थाने वापरला आहे. अशा अलंकाराला आनंदवर्धनांनी पूर्वी पृ. ४७७ वर 'वक्रोक्ति इ. अलंकार' म्हटले आहे (पृ. ४८१ वरील १ ल्या टीपेचा २ रा परिच्छेदही पाहा). अभिनवगुप्तांनी (पृ. ५०८ वर) 'श्लेष इ. वाच्य अलंकार' असे म्हटले आहे.

३. येथेही 'अलंकार' या शब्दाचा अर्थ 'काव्याची शोभा वाढवणारा' असा सर्वसामान्यच घ्यावयाचा.

४. पाहा, पृ. २४९ वरील 'उत्तम नायिकेच्या...' इ. वाक्य व काव्यप्रकाश, झळकीकर आवृत्ति, पृ. १९१ वरील **कामिनीकुचकलशवत्** इ. शब्द व त्यांवरचे विवरण.

५. पाहा, अष्टाध्यायी, १–२–६४, **सरूपाणामेकशेष एकविभक्तौ ।** याची उदाहरणे काशिका वृत्तीत **वृक्षश्च वृक्षश्च वृक्षौ ।** व **वृक्षश्च वृक्षश्च वृक्षश्च**

वृक्षाः । अशी दिली आहेत. त्यांना अनुसरून प्रस्तुत ठिकाणी प्रथम शब्दश्च अर्थश्च शब्दार्थौ हा द्वंद्वसमास व मग शब्दार्थौ च शब्दार्थौ च शब्दार्थाः अशी एकशेषवृत्ति मानावयाची.

६. म्हणजे अन्या या शब्दाचे अभिनवगुप्तांनी 'भिन्न' व 'अलौकिक' असे दोन अर्थ केले.

७. म्हणजे पृ. ५०५ वर 'तो या...... ध्वनीहून वेगळा अलंकार...... आगळाच अलंकार होय.' पर्यंतच्या दोन वाक्यात.

८. पाहा, शिशुपालवध, १–२ मधील प्रसिद्धमूर्ध्वज्वलनं हविर्भुजः । हा चरण.

९. जृम्भित याचा अर्थ अभिनवगुप्त म्हणतात त्याप्रमाणे गात्रसंमर्दन म्हणजे हातपाय दाबणे असा केला किंवा आळोखेपिळोखे देणे असा केला, तरी त्यामुळे बळ कमी कसे होते हे समजत नाही. जृम्भा याचा 'अंगमर्द' असा अर्थ अभिनवगुप्तांनी पृ. ४४५ वरही केला आहे.

१०. इत्यादि म्हणजे पतितां किं नालम्बसे, विषमेषुखिन्नमनसाम्, इ. शब्दशक्तीची व दृष्टया, न किंचिद् दृष्टम् इ. अर्थशक्तीची.

११. श्रीकृष्ण हा सर्व गोपींच्या प्रीतीचा विषय झाला असल्यामुळे या गोपीलाही त्याच्याविषयी प्रेमभावना उत्पन्न झाली आहे, हा संदर्भ.

ध्वन्यालोकः

प्रौढोक्तिमात्रनिष्पन्नशरीरः सम्भवी स्वतः ।
अर्थोऽपि द्विविधो ज्ञेयो वस्तुनोऽन्यस्य दीपकः ॥२४॥

अर्थशक्त्युद्भवानुरणनरूपव्यङ्ग्ये ध्वनौ यो व्यञ्जकोऽर्थ उक्तस्तस्यापि द्वौ प्रकारौ–कवेः कविनिबद्धस्य वा वक्तुः – प्रौढोक्तिमात्रनिष्पन्नशरीर एकः, स्वतः सम्भवी च द्वितीयः ।

कविप्रौढोक्तिमात्रनिष्पन्नशरीरो यथा ––

सज्जेइ सुरहिमासो ण दाव अप्पेइ जुअइजणलक्खसहे * ।
अहिणवसहआरमुहे णवपल्लवपत्तले अणंगस्स सरे ॥

कविनिबद्धवक्तृप्रौढोक्तिमात्रनिष्पन्नशरीरो यथोदाहृतमेव –– 'शिखरिणि' इत्यादि ।

यथा वा ––

साअरविइण्णजोव्वणहत्थालंबं समुण्णमंतेहिम् ।
अब्भुट्ठाणं विअ वम्महस्स दिण्णं तुह थणेहिं ॥

* काशी आवृत्तीमध्ये (पृ. ३५५) 'सहे' ऐवजी 'मुहे' असा पाठ.

दुसरा वस्तुरूप अर्थ सुचवण्याचे कार्य जो अर्थ करितो, तो ( व्यंजक ) अर्थ देखील (१) (कवीच्या) कल्पनासृष्टीतच संभवणारा व (२) स्वतः होऊन, म्हणजे व्यावहारिक सृष्टीत संभवणारा, असा दोन प्रकारचा असतो असे जाणावे. ॥२४॥

अर्थशक्तीने सुचवला जाणार अनुरणनरूपरूप[1] व्यंग्यार्थ असलेल्या ध्वनिकाव्यात जो अर्थ व्यंजक असतो म्हणून सांगितले, त्याचेदेखील दोन प्रकार :- कवीच्या किंवा कविनिर्मित पात्राच्या कल्पनासृष्टीतच असू शकणारा एक व स्वतः लौकिक सृष्टीत संभवणारा दुसरा.

त्यातल्या कवीच्या कल्पनासृष्टीतच उद्भवू शकणाऱ्याचे उदाहरण पुढीलप्रमाणे–

" वसंतऋतु मदनासाठी आंब्याचा मोहर हीच अग्रे असलेले बाण नुसते तयारच करीत नाही, तर ते बाण तो त्याला देऊनही टाकीत आहे. त्या बाणांच्या टोकांचे लक्ष्य म्हणजे तरुण स्त्रिया व मागचा पिसारा म्हणजे आम्राची कोवळी पालवी.

कविनिर्मित पात्राने केवळ कल्पनेनेच निर्मिलेल्या व्यंजक अर्थाचे उदाहरण पूर्वीच ( उद्द्योत १, कारिका १३ वरील वृत्तीच्या अखेरच्या भागात ) दिलेले– " हे सुवदने ! " इ.

किंवा ( दुसरे उदाहरण ), जसे–

" यौवनाने आदरपूर्वक दिलेल्या आपल्या हाताचा आधार घेऊन तुझ्या उभारी प्राप्त होत असलेल्या स्तनांनी मदनाला जणू उत्थापन देऊन त्याचे स्वागत केले आहेसे वाटते. "

लोचनम्

**एवमर्थशक्त्युद्भवस्य सामान्यलक्षणं कृतम् । श्लेषाद्यलङ्कारेभ्यश्चास्य विभक्तो विषय उक्तः। अधुनास्य प्रभेदनिरूपणं करोति– प्रौढोक्तीत्यादिना । योऽर्थान्तरस्य दीपको व्यञ्जक उक्तः सोऽपि द्विविधः । न केवलमनुस्वानोपमो द्विविधः, यावत्तद्भेदो यो द्वितीयः सोऽपि व्यञ्जकार्थद्वैविध्यद्वारेण द्विविध इत्यपिशब्दस्यार्थः । प्रौढोक्तेरप्यवान्तरभेदमाह-**

कवेरिति। तेनैते त्रयो भेदा भवन्ति। प्रकर्षेण ऊढ: सम्पादयितव्येन वस्तुना प्राप्तस्तत्कुशलः प्रौढः। उक्तिरपि समर्पयितव्यवस्त्वर्पणोचिता प्रौढेत्युच्यते।

सज्जयति सुरभिमासो न तावद् अर्पयति युवतिजनलक्ष्यमुखान्।
अभिनवसहकारमुखान्नवपल्लवपत्त्रलाननङ्गस्य शरान्॥

अत्र वसन्तश्चेतनोऽनङ्गस्य सखा सज्जयति केवलं न तावदर्पयतीत्येवंविधया समर्पयितव्यवस्त्वर्पणकुशलयोक्त्या सहकारोद्भेदिनी वसन्तदशा यत उक्ता अतो ध्वन्यमानं मन्मथोन्माथस्यारम्भं क्रमेण गाढगाढीभविष्यन्तं व्यनक्ति। अन्यथा वसन्ते सपल्लवसहकारोद्गम इति वस्तुमात्रं न व्यञ्जकं स्यात्। एषा च कवेरेवोक्तिः प्रौढा।

शिखरिणीति। अत्र लोहितं बिम्बफलं शुको दशतीति न व्यञ्जकता काचित्। यदा तु कविनिबद्धस्य साभिलाषस्य तरुणस्य वक्तुरित्थं प्रौढोक्तिस्तदा व्यञ्जकत्वम्।

सादरवितीर्णयौवनहस्तालम्बं समुन्नमद्भ्याम्।
अभ्युत्थानमिव मन्मथस्य दत्तं तव स्तनाभ्याम्॥

स्तनौ तावदिह प्रधानभूतौ ततोऽपि गौरवितः कामस्ताभ्यामभ्युत्थानेनोपचर्यते। यौवनं चानयोः परिचारकभावेन स्थितमित्येवंविधनोक्तिवैचित्र्येण त्वदीयस्तनावलोकनप्रवृद्धमन्मथावस्थः को न भवतीति भङ्ग्या स्वाभिप्रायध्वननं कृतम्। तव तारुण्येनोन्नतौ स्तनाविति हि वचने न व्यञ्जकता। न केवलमिति। उक्तिवैचित्र्यं तावत्सर्वथोपयोगि भवतीति भावः।

## लोचन

अशा प्रकारे (ग्रंथकाराने) अर्थशक्तिमूल ध्वनीचे सामान्यपणे लक्षण केले आणि श्लेष[२] वगैरे अलंकारांहून या ध्वनिप्रकाराचे क्षेत्र कसे निराळे आहे हे दाखविले. आता या म्हणजे अर्थशक्तिमूल ध्वनीच्या उपप्रकारांचे स्पष्टीकरण कारिकाकार '(कवीच्या) कल्पनासृष्टीतच संभवणारा' इ. शब्दांनी करितात. दुसऱ्या (म्हणजे व्यंग्य) अर्थाचा व्यंजक म्हणून ज्या (वाच्य) अर्थाचा (कारिका २२ मध्ये) उल्लेख

केला, तो व्यंजक अर्थही दोन प्रकारचा असतो. केवळ अनुरणनरूप ध्वनि हाच दोन प्रकारचा असतो असे नाही, तर त्याचा जो दुसरा म्हणजे अर्थशक्तिमूल हा प्रकार, तोही व्यंजक अर्थ दोन प्रकारचा असल्याकारणाने दोन प्रकारचा असतो, हा (कारिकेतील) 'देखील' शब्दाचा अर्थ होय. 'कवीच्या कल्पनासृष्टीतच संभवणाऱ्या' अर्थाचे दोन उपप्रकार वृत्तिकार 'कवीच्या (किंवा कविनिर्मित पात्राच्या[३])' इ. वाक्याने सांगतात. त्यामुळे हे एकूण तीन प्रकार होतात. 'प्रकर्षाने ऊढ म्हणजे[४] 'उत्कटत्वाने धारण केलेला' म्हणजे वर्ण्य वस्तूला कवीच्या मनात कल्पनेमुळे प्राप्त झालेला, म्हणून (वर्ण्य वस्तूला सौंदर्याने नटविण्यात) कुशल असा आकार. (त्या आकाराची उक्ति) आणि उक्तिसुद्धा जी सहृदयाला अर्पण करावयाच्या अर्थाचा प्रत्यय घडविण्यास योग्य असेल, तिला 'प्रौढ' म्हटले आहे.

'वसंतऋतु मदनासाठी'... इ.–या पद्यात मदनाच्या सुबुद्ध मित्राप्रमाणे असणारा वसंतऋतु बाण केवळ तयारच करतो असे नाही, तर ते मदनाच्या स्वाधीनही करितो, अशा, कवीच्या मनातील अर्थ प्रकट करण्यास समर्थ अशा पद्धतीने[५] आम्रवृक्षांना मोहोर येण्याची वसंताची अवस्था वर्णिली आहे, म्हणून ते वर्णन 'मदनाने लोकांच्या मनात उत्पन्न केलेला प्रक्षोभ हा क्रमाने अधिकाधिक वाढत जाणारा आहे'[६] हा अर्थ सूचित करिते. असे वर्णन केले केले नसते व केवळ 'वसंतकाली आम्रवृक्षाला पालवी फुटून मोहोर येतो' येवढेच म्हटले असते, तर त्या विधानातून वर सांगितलेला अर्थ सूचित झाला नसता. येथील वर्णन हे केवळ कवीच्या कल्पनेने केलेले आहे (कवीने निर्मिलेल्या पात्राच्या कल्पनेने केलेले नाही.) 'हे तरुणी!' इ.–येथे 'पोपट तांबड्या बिंबफळाला टोच्या मारीत आहे' या वर्णनात कसलीही सूचकता नाही, पण जेव्हा कवीने निर्मिलेल्या प्रेमी तरुणाने श्लोकातल्याप्रमाणे आपली कल्पनाशक्ती वापरून बोलावे, तेव्हा त्या बोलण्याला सूचकता प्राप्त होते.[७] यौवनाने आदरपूर्वक'... इ.– या पद्यात नायिकेचे स्तन हाच वर्णनाचा मुख्य विषय. पण ज्या मदनामुळे त्या स्तनांना यौवनावस्थेत विशिष्ट आकृतिबंध प्राप्त होतो, तो मदन त्या स्तनांहूनही अधिक गौरवास्पद आहे. ते स्तन उभे राहून (म्हणजे उभारीने युक्त होऊन)

त्या मदनाचा मानसन्मान करितात (असे म्हटले आहे) तारुण्य हे सेवक या नात्याने त्या स्तनांशी सहकार्य करीत आहे. याप्रमाणे अशा प्रकारचे चमत्कृतिपूर्ण वर्णन केल्यामुळे 'तुझे स्तन दृष्टीस पडल्यावर कोणाची कामवासना प्रज्वलित होत नाही? (अर्थात् माझीही कामवासना उद्दीपित झाली आहे) हा बोलणाऱ्याने स्वतःच्या मनातील अभिप्राय सुचविला आहे. कारण, 'तारुण्यामुळे तुझ्या स्तनांना उभारी प्राप्त झाली आहे' एवढेच म्हटल्याने वर निर्देशिलेला व्यंग्यार्थ मुळीच सूचित झाला नसता.

टीपा

१. पृ. ४६४ वरील कारिका २० पाहा.

२ ज्या ठिकाणी द्व्यर्थी शब्दयोजनेमुळे दोन अर्थ तुल्यबलत्वाने एकाच वेळी ध्यानात येतात त्या ठिकाणी श्लेष अलंकार असतो व जेथे द्व्यर्थी शब्द-योजनेमुळे दोन अर्थ एकामागून एक गुणप्रधानभावाने प्रकट होतात, तेथे शब्दशक्तिमूल ध्वनि असतो. पाहा, पृ. ४६९ वरील १ ली टीप.

३. प्रौढोक्तीचे दोन प्रकार मम्मटानेही उल्लेखिले आहेत (काव्यप्रकाश, झळकीकर आवृत्ति, पृ. १३५, १६२ व १६६). पण जगन्नाथाने रसगंगाधर पृ. १३४ वर त्यांवर प्रतिकूल टीका करून कविप्रौढोक्ति व कविनिबद्धवक्तृ-प्रौढोक्ति हे दोन प्रकार वेगळे मानण्याचे कारण नाही, तो एकच प्रकार समजावा, असे म्हटले आहे.

४. 'प्रौढोक्ति' हा समास दोन तऱ्हांनी सोडविता येईल– १) प्रौढस्य (सौंदर्य-संपन्नत्वेन प्राप्तस्य) आकारस्य उक्तिः व २) प्रौढा (सौंदर्यनिर्माणक्षमा) उक्तिः। यांपैकी अभिनवगुप्तांनी पहिल्या वाक्यात पहिला प्रकार व त्यानंतरच्या दुसऱ्या वाक्यात दुसरा प्रकार स्वीकारला आहे. काव्यप्रकाशात पृ. १३५ वर झळकीकरांनी प्रौढोक्तिः याचा अर्थ **चमत्कारानुगुणोक्तिः (चमत्कारानुगुणा उक्तिः)** असा केला आहे.

५. येथे वसंतऋतु, आम्रवृक्षाला फुटणारी पालवी आणि मोहोर हा वर्णनाचा विषय आहे. या वर्णनाच्या विषयाला कवीने आपल्या कल्पनेने एक विशिष्ट स्वरूप दिले आहे, ते असे–वसंतऋतु हा मदनाचा सहकारी मित्र, आम्रपल्लव म्हणजे मदनाच्या बाणांना लावलेली पिसे आणि आम्रवृक्षांचा मोहोर त्या बाणांची टोके असे वर्णन हीच येथील 'कविप्रौढोक्ति' होय. व या प्रौढोक्तीमुळेच वसंतऋतूमध्ये लोकांच्या मनात मदनविकार अधिकाधिक उद्दीपित होत आहे हा अर्थ सूचित होतो.

६. या प्राकृत गाथेच्या विवरणात हेमचंद्राने काव्यानुशासन, पृ. ७३ वर पुढील अधिक मजकूर घातलेला आढळतो– (वसन्तदशाः यतः उक्ता), 'अतः अनर्पितेष्वपि शरेषु यद्येवं मन्मथः प्रतपति तदर्पितेषु कियद्विजृम्भिष्यते इति ' (मन्मथोन्माथकस्यारम्भं क्रमेण गाढगाढीभविष्यन्तं व्यनक्ति । )
हेमचंद्राच्या वरील वाक्याचा अर्थ असा :– वसंतऋतूने 'मदनाला बाण अर्पण केले नसतानाही तो जर इतका तापदायक होतो, तर बाण अर्पण केले असताना तो किती तापदायक होईल ! '
कल्पलताविवेक, पृ. १४४–१४५ येथेही वरीलप्रमाणेच विवरण केलेले आढळते.

७. या पद्यातून सूचित होणारा व्यंग्यार्थ कोणता ते अभिनवगुप्तांनी पृ. २४९–२५० वर स्पष्ट केले आहे.

## ध्वन्यालोकः

स्वतःसम्भवी य औचित्येन बहिरपि सम्भाव्यमानसद्भावो न केवलं भणितिवशेनैवाभिनिष्पन्नशरीरः । यथोदाहृतम् – ' एवंवादिनि ' इत्यादि ।

यथा वा –

सिहिपिच्छकण्णऊरा जाआ वाहस्स गव्विरी भमइ ।
मुत्ताहलरइअपसाहणाणँ मज्झे सवत्तीणं ॥

## ध्वन्यालोक

स्वतः संभवणारा, म्हणजे प्रस्तुत प्रसंगाशी सुसंगत असल्यामुळे प्रत्यक्षात देखील संभवू शकणारा, केवळ कल्पनामय शब्दयोजनेने निर्मिलेला नव्हे. याचे उदाहरण " तो देवर्षि ... " इ. पूर्वी ( पृ. ४९७ वर ) दिलेच आहे.

किंवा ( आणखी एक उदाहरण ), जसे–

मोरपिसांची कर्णभूषणे ल्यालेली पारध्याची पत्नी मोत्यांचे दागिने अंगावर घातलेल्या सवतींच्यामध्ये मोठ्या गर्वाने हिंडते.

## लोचनम्

न केवलमिति । उक्तिवैचित्र्यं तावत् सर्वथोपयोगि भवतीति भावः ।

शिखिपिच्छकर्णपूरा जाया व्याधस्य गर्विणी भ्रमति ।
मुक्ताफलरचितप्रसाधनानां मध्ये सपत्नीनाम् ।।

शिखिमात्रमारणमेव तदासक्तस्य कृत्यम् । अन्यासु त्वासक्तो हस्तिनोऽप्यमारयदिति हि वचनेनोक्तमुत्तमसौभाग्यम् । रचितानि विविधभङ्गीभिः प्रसाधनानीति तासां सम्भोगव्यग्रिमाभावात्तद्विरचनशिल्पकौशलमेव परमिति दौर्भाग्यातिशय इदानीमिति प्रकाशितम् । गर्वश्च बाल्याविवेकादिनापि भवतीति नात्र स्वोक्तिसद्भावः शङ्क्यः । एष चार्थो यथा यथा वर्ण्यते, आस्तां वा वर्णना, बहिरपि यदि प्रत्यक्षादिनावलोक्यते तथा तथा सौभाग्यातिशयं व्याधवध्वा द्योतयति ।। २४ ।।

लोचन

'केवळ (कल्पनामय)' इ. उक्तीचे वैचित्र्य (म्हणजे कल्पनामय शब्दयोजना) असेल, तर[1] ते (वाच्यार्थ स्वत: संभवणारा असला तरी) कोणत्याही परिस्थितीत उपयोगी पडतेच, हे तात्पर्य.

'तो व्याध ह्या नूतन पत्नीवर आसक्त असल्यामुळे तो फक्त मोरच मारण्याची कामगिरी करू शकतो. पूर्वी तिच्या सवतीवर तो आसक्त होता, तेव्हा तो हत्तींचीदेखील शिकार करीत असे.' अवांतर व्यंग्यवस्तु म्हणून मुळातून प्रस्तुत नायिकेचा खास आकर्षकपणा सूचित करण्यात आला आहे. 'त्यांनी निरनिराळ्या प्रकारांनी (मोत्यांचे) अलंकार चढविले आहेत' असे वर्णन करून संभोगक्रीडेत भाग घेण्याचे काम त्यांना मुळीच शिल्लक राह्यात नाही व म्हणून त्यांना मोत्यांच्या अलंकारांनी नटण्यात आपले कौशल्य दाखविणे हेच मुख्य काम उरले आहे, व त्यामुळे आपल्या पतीचे मन आपल्याकडे वेधून घेण्यास आता त्या अगदीच असमर्थ आहेत[2] हे सूचित केले आहे. या उदाहरणात ('गर्विणी' म्हणजे गर्वयुक्त या शब्दाने गर्व उक्त झाला असला तरी) व्यंग्यार्थ उघड केला आहे. अशी शंकाही घेण्याचे कारण नाही, कारण गर्व हा लहानपणामुळे किंवा अविचारीपणामुळे वाटू शकतो.[3] आणि या पद्यातील वाच्यार्थ जसजसा अधिकाधिक वर्णिला जातो, किंवा वर्णनही राहू दे, व्यवहारातसुद्धा अशी परिस्थिति प्रत्यक्ष वगैरे प्रमाणांनी जसजशी अनुभवास येऊ लागते, तसतशी ती परिस्थिति पारध्याच्या

पत्नीच्या ठिकाणी असणारा मोहकपणाच अधिकाधिक प्रमाणात सुचविते.[४] ।। २४ ।।

टीपा

१. म्हणजे स्वतः संभवणाऱ्या अर्थाला कवीच्या कल्पनासृष्टीची मदत नसली, तरी स्वतः संभवणारा अर्थसुद्धा कवि सर्वसामान्य माणसापेक्षा निराळ्या पद्धतीने मांडतो, म्हणून ती वर्णनाची निराळी पद्धतही व्यंजकत्वाला सर्वप्रकारे उपयोगी पडते व आवश्यक असतेच.
२. मुळातील 'दौर्भाग्य' याचा अर्थ आम्ही 'सौभाग्या'च्या (म्हणजे मोहक-पणाच्या) उलट घेतला आहे. पण दौर्भाग्य म्हणजे दुर्दैव असा अर्थ केला तरी चालण्यासारखा आहे.
३. 'हे केशवा ! ' इ. (पृ. ४७७ वरील) उदाहरणातील व्यंग्यार्थ ज्याप्रमाणे 'सूचकपणे' या शब्दाने वाच्य केला गेला आहे, त्याप्रमाणे या उदाहरणात 'गर्विणी' या शब्दाने 'व्याधपत्नीला आपल्या मोहकपणाची झालेली जाणीव' हा अर्थ उक्त झाला आहे असे नाही. वाच्य अर्थाच्या पातळीवर ती गर्विणी असण्याचे कारण बाल्य किंवा अविचारीपणा हे असू शकेल, पण व्यंग्य अर्थाच्या पातळीवर ती आपल्या मोहकपणाच्या जाणीवेमुळेच गर्वोन्नत झाली आहे.
४. म्हणूनच हे स्वतः संभवणाऱ्या वाच्यार्थाच्या व्यंजकत्वाचे उदाहरण होय.

ध्वन्यालोकः

अर्थशक्तेरलंकारो यत्राप्यन्यः प्रतीयते ।
अनुस्वानोपमव्यङ्ग्यः स प्रकारोऽपरो ध्वनेः ॥ २५ ॥

वाच्यालङ्कारव्यतिरिक्तो यत्रान्योऽलङ्कारोऽर्थसामर्थ्यात् प्रतीयमानोऽवभासते सोऽर्थशक्त्युद्भवो नामानुस्वानरूपव्यङ्ग्योऽन्यो ध्वनिः ।

ध्वन्यालोक

ज्या उदाहरणात (वाच्य) अर्थाच्या सामर्थ्याने दुसरा 'अलंकार' सूचित होत असेल, तो ध्वनीचा, अनुरणनरूप व्यंग्यार्थ असलेला दुसरा प्रकार होय. ।।१५।।

वाच्य अर्थाच्या सामर्थ्याने वाच्य अलंकाराहून निराळाच अलंकार ज्या उदाहणात व्यंग्यत्वाने प्रकाशित होतो, तो ध्वनीचा अनुरणनरूप व्यंग्यार्थ असलेला, अर्थशक्त्युद्भव नावाचा दुसरा प्रकार होय.

### लोचनम्

एवमर्थशक्त्युद्भवो द्विभेदो वस्तुमात्रस्य व्यञ्जनीयत्वे वस्तुध्वनिरूपतया निरूपितः। इदानीं तस्यैवालंकाररूपे व्यञ्जनीयेऽलङ्कारध्वनित्वमपि भवतीत्याह – अर्थेत्यादि। न केवलं शब्दशक्तेरलङ्कारः प्रतीयते पूर्वोक्तनीत्या यावदर्थशक्तेरपि। यदि वा न केवलं यत्र वस्तुमात्रं प्रतीयते यावदलङ्कारोऽपीत्यपिशब्दार्थः। अन्यशब्दं व्याचष्टे– वाच्येति॥

### लोचन

याप्रमाणे अर्थशक्तिमूल ध्वनीच्या दोन प्रकारांचे विवरण करण्यात आले. त्या दोन्ही प्रकारांमध्ये हा निव्वळ वस्तुस्वरूपी होता, म्हणून ते दोन्ही प्रकार वस्तुध्वनीचे होते. आता त्या अर्थशक्तिमूल ध्वनीमध्ये व्यंग्यार्थ हा अलंकारस्वरूपी असल्यास तो ' अलंकारध्वनि– ' देखील होऊ शकतो, हे (कारिकाकार) ' (वाच्य) अर्थाच्या सामर्थ्याने ' इ. शब्दांनी सांगतात. पूर्वी सांगितल्याप्रमाणे द्व्यर्थी शब्दांच्या सामर्थ्यामुळेच अलंकार सूचित होतो असे नाही, तर वाच्य अर्थाच्या सामर्थ्यानेही होतो. किंवा ज्या उदाहरणात वाच्यार्थाच्या शक्तीमुळे केवळ वस्तूच सूचित होते असे नाही, तर अलंकारही सूचित होतो (तो अर्थशक्तिमूल ध्वनि होय) असा अपि या (कारिकेतल्या) शब्दाचा अर्थ घेता येईल. (कारिकेतल्या) ' दुसऱ्या ' या शब्दाचे व्याख्यान (वृत्तिकार) ' वाच्य अलंकाराहून ( निराळाच अलंकार) ' इ. शब्दांनी करितात ॥२५॥

### टीपा

१. पूर्वी, म्हणजे कारिका २–२१ मध्ये.

२. अपि या शब्दाचा अन्वय दोन प्रकारांनी केल्यामुळे या संपूर्ण वाक्याचा अर्थही दोन प्रकारांनी लावता येतो. पहिल्या प्रकारात ' न केवलं शब्दशक्तेः

......अर्थशक्तेरपि ' असा अन्वय केला आहे, तर दुसऱ्या प्रकारात न केवलं वस्तुमात्रम्... यावत् अलंकारोऽपि असा केला आहे.

ध्वन्यालोकः

तस्य प्रविरलविषयत्वमाशङ्क्येदमुच्यते–

रूपकादिरलङ्कारवर्गो यो वाच्यतां श्रितः।

स सर्वो गम्यमानत्वं बिभ्रद् भूम्ना प्रदर्शितः॥ २६ ॥

अन्यत्र वाच्यत्वेन प्रसिद्धो यो रूपकादिरलङ्कारः सोऽन्यत्र प्रतीयमानतया बाहुल्येन प्रदर्शितस्तत्रभवद्भिर्भट्टोद्भटादिभिः। तथा च ससन्देहादिषूपमारूपकातिशयोक्तीनां प्रकाशमानत्वं प्रदर्शितमित्यलङ्कारान्तरस्यालङ्कारान्तरे व्यङ्ग्यत्वं न यत्नप्रतिपाद्यम् ॥ २६ ॥

ध्वन्यालोक

याची उदाहरणे विरळाच सापडतील अशी कोणी शंका घेईल, म्हणून (पुढील कारिकेत) असे म्हटले जात आहे की –

रूपक वगैरे जे अलंकार ' वाच्य ' रूपात आढळतात, ते सगळे व्यंग्य रूपानेदेखील असू शकल्याचे (आतापर्यंत) पुष्कळ वेळा दाखवले गेले आहे. ॥ २६ ॥

काही उदाहरणात वाच्य म्हणून प्रसिद्ध असलेले रूपक वगैरे अलंकार, दुसऱ्या ठिकाणी 'प्रतीयमान ' (सूचित होणारे) असल्याचे मान्यवर भट्टोद्भटादिकांनी पुष्कळ प्रमाणावर दाखवले आहे. उदाहरणार्थ, ' ससंदेह ' वगैरे अलंकारांमध्ये उपमा, रूपक व अतिशयोक्ति सूचित होतात हे त्यांनी दाखवले असल्यामुळे एका (वाच्य) अलंकारातून दुसरा अलंकार सूचित होऊ शकतो, हे सिद्ध करण्यास प्रयास पडू नयेत.

लोचनम्

आशङ्क्येति। शब्दशक्त्या श्लेषाद्यलङ्कारो भासत इति सम्भाव्यमेतत्। अर्थशक्त्या तु कोऽलङ्कारो भातीत्याशङ्काबीजम्। सर्व इति प्रदर्शित इति च पदेनासम्भावनात्र मिथ्येवेत्याह।

उपमानेन तत्त्वं च भेदं च वदतः पुनः ।
ससन्देहं वचः स्तुत्यै ससन्देहं विदुर्यथा ॥
इति ।
तस्याः पाणिरयं नु मारुतचलत्पत्राङ्गुलिः पल्लवः ।

इत्यादावुपमा रूपकं वा ध्वन्यते । अतिशयोक्तेश्च प्रायशः सर्वालङ्कारेषु ध्वन्यमानत्वम् । अलङ्कारान्तरस्येति । यत्रालङ्कारोऽप्यलङ्कारान्तरं ध्वनति तत्र वस्तुमात्रेणालङ्कारो ध्वन्यत इति कियदिदमसम्भाव्यमिति तात्पर्येणालङ्कारान्तरशब्दो वृत्तिकृता प्रयुक्तो न तु प्रकृतोपयोगी; न ह्यलङ्कारेणालङ्कारो ध्वन्यत इति प्रकृतमदः, अर्थशक्त्युद्भवे ध्वनौ वस्त्वेवालङ्कारोऽपि व्यङ्ग्य इत्येतावतः प्रकृतत्वात् । तथा चोपसंहारग्रन्थे 'तेऽलङ्काराः परां छायां यान्ति ध्वन्यङ्गतां गताः' इत्यत्र श्लोके वृत्तिकृत् 'ध्वन्यङ्गता चोभाभ्यां प्रकाराभ्याम्' इत्युपक्रम्य 'तत्रेह प्रकरणाद्व्यङ्ग्यत्वेनेत्यवगन्तव्यम्' इति वक्ष्यति । अन्तरशब्दो वोभयत्रापि विशेषपर्यायः; वैषयिकी सप्तमी, न तु प्राग्व्याख्यायामिव निमित्तसप्तमी । तदयमर्थः – वाच्यालङ्कारविशेषविषये व्यङ्ग्यालङ्कारविशेषो भातीत्युद्भटादिभिरुक्तमेवेत्यर्थशक्त्यालङ्कारो व्यज्यत इति तैरुपगतमेव । केवलं तेऽलङ्कारलक्षणकारत्वाद्वाच्यालङ्कारविशेषविषयत्वेनाहुरिति भावः ॥ २६ ॥

लोचन

'शंका येईल, म्हणून' –द्व्यर्थी शब्दांच्या सामर्थ्यामुळे श्लेष[1] (उपमा, रूपक) वगैरे अलंकारांचा व्यंग्य स्वरूपात प्रत्यय येतो, ही गोष्ट सहज पटण्यासारखी आहे. पण वाच्य अर्थाच्या सामर्थ्याने कोणत्या अलंकाराची प्रतीति व्यंग्य रूपाने संभवणार, हा विचार या शंकेच्या मुळाशी आहे. (अर्थाच्या शक्तीने व्यंग्य अलंकाराची प्रतीति) संभवणार नाही, ही कल्पना चुकीची आहे हे कारिकेतल्या 'सगळे' आणि '(पुष्कळ वेळा) दाखविले गेले आहे' या शब्दांनी सांगितले आहे.

उपमानाशी[2] (उपमेयाचा) अभेद असेल काय असा संदेह प्रकट करून मग भेदही वर्णन करून कवि जेव्हा वर्ण्य विषयाची स्तुति करितो, तेव्हा तो 'ससंदेह' अलंकार मानितात. उदा. 'हा तिचा हात

आहे की ज्याची वाऱ्याने हलणारी सुटी पाने बोटांसारखी आहेत असा हा पल्लव (म्हणजे पानांचा घोस) आहे? ' इ. उदाहरणात[3] उपमा म्हणा, किंवा रूपक म्हणा, सूचित होत आहे. आणि अतिशयोक्ति तर जवळजवळ सगळयाच अलंकारांतून ध्वनित होत असते.[4] 'दुसरा अलंकार सूचित ' इ. – जेथे वाच्यार्थ हा स्वत: अलंकार–स्वरूपाचा असूनही दुसऱ्या अलंकाराला ध्वनित करितो, तेथे केवळ वस्तुरूपी वाच्यार्थ अलंकाराला ध्वनित करील यात असंभवनीयता कोठली असणार, या अभिप्रायाने वृत्तिकारांनी 'दुसरा अलंकार' हा शब्द वापरला आहे, प्रस्तुत विषयाचा एक भाग म्हणून नव्हे. कारण एक (वाच्य) अलंकार दुसऱ्या अलंकाराला सूचित करितो हा मुद्दा येथे प्रस्तुत नाही, तर अर्थशक्तिमूल ध्वनीमध्ये ज्याप्रमाणे वस्तु व्यंग्य असते, त्याप्रमाणे अलंकारही व्यंग्य असतो इतकेच येथे प्रस्तुत आहे; आणि हीच गोष्ट या विषयाचा[5] समारोप करिताना 'ते अलंकार स्वतः सूचित झाल्यामुळे ध्वनिकाव्याचे अंग बनल्यास त्यांना कमालीचे सौंदर्य प्राप्त होते' या कारिकार्धाच्या[6] विवरणात '(अलंकारांचे) ध्वनीला अंगभूत होणे हे दोन प्रकारांनी संभवते' अशी सुरुवात करून 'त्या दोन प्रकारांपैकी या ठिकाणी प्रकरणामुळे[7] ते अलंकार व्यंग्य म्हणून ध्वनिकाव्याचे अंग बनल्यास असे समजावे,' असे वृत्तिकार सांगतील. किंवा ('अलंकारान्तर' या सामाजिक शब्दातला) 'अन्तर' हा शब्द दोन्ही ठिकाणी 'विशिष्ट' या अर्थाचा समजावा. अलंकारान्तरे ह्या (वृत्तीतील शब्दातल्या) सप्तमीचा अर्थ 'विषय' हा घ्यावा, पूर्वी-प्रमाणे 'निमित्त' हा घेऊ नये.[8] तेव्हा या विवेचनाचे तात्पर्य असे :– एखाद्या उदाहरणात एखादा अलंकार वाच्य असला, तर त्या उदाहरणात त्या अलंकारामुळे दुसरा विशिष्ट अलंकार प्रतीत होऊ शकतो हे उद्भट वगैरेंनी सांगितलेच असल्यामुळे वाच्य अर्थाच्या व्यंजकत्वसामर्थ्याने दुसरा अलंकार सूचित होतो हे त्यांनी मान्य केल्यासारखेच समजावयास हरकत नाही. मात्र त्यांची भूमिका वाच्य अलंकारांची लक्षणे करणे ही असल्यामुळे अशी उदाहरणे[9] म्हणजे वाच्य अलंकारांचाच एक प्रकार असे त्यांनी म्हटले, हा भावार्थ. ॥२६॥

टीपा

१. श्लेष अलंकारही द्व्यर्थी योजनेमुळे सूचित होऊ शकतो याचे उदाहरण पुढे काशी आवृत्ति, पृ. २७२ वर रम्या इति इ. दिले आहे.

२. भामह, काव्यालंकार, ३–४३ (व उद्भट, काव्यालंकारसारसंग्रह, ६–२).

३. ससंदेहाचे लक्षण जरी अभिनवगुप्तांनी भामहावरून घेतले असले, तरी त्याचे वरील उदाहरण मात्र कोठून घेतले आहे, हे कळण्यास मार्ग नाही. शिवाय, या पद्याचा एकच चरण अभिनवगुप्तांनी उद्धृत केला असल्यामुळे त्या ठिकाणी शुद्ध ससंदेह आहे की निश्चयगर्भ ससंदेह आहे, हेही सांगता येत नाही. मात्र या एकाच चरणापुरता विचार केला, तर हे शुद्ध ससंदेहाचे उदाहरण होते व मग ते भामहाच्या किंवा उद्भटाच्या लक्षणाशी जुळत नाही.

४. पुढे उद्द्योत, ३, काशी आवृत्ति, पृ. ४६५ ते ४७० या ठिकाणी आनंद-वर्धनांनी हाच विषय भामह, काव्यालंकार, २–८५ चा निर्देश करून चर्चिला आहे.

५. म्हणजे अलंकार हा व्यंग्य असू शकतो, या विषयाचा.

६. पाहा, उद्द्योत २, कारिका २८ वी.

७. म्हणजे अलंकारांच्या व्यंग्यत्वाचे विवेचन चालू असल्यामुळे.

८. **अलंकारान्तरस्य अलंकारान्तरे व्यंङग्यत्वम्** या वृत्तीतील वाक्याचा अर्थ दोन प्रकारांनी लावता येईल असे अभिनवगुप्तांचे म्हणणे, पहिल्या प्रकारात **अलंकारान्तरे** यातील सप्तमी ही निमित्तवाचक म्हणजे हेतुवाचक समजावी व अन्तर शब्दाचा अर्थ ' अन्य किंवा दुसरा ' असा करावा. म्हणजे त्या वाक्याचा एक अर्थ ' एका अलंकाराने दुसरा अलंकार सूचित होणे ' असा होईल. दुसऱ्या प्रकाराने अर्थ केल्यास सप्तमीचा अर्थ ' विषय ' असा समजावा व ' अन्तर ' याचा अर्थ ' विशिष्ट ' असा घ्यावा. मग त्या वाक्याचा अर्थ ' (एका) विशिष्ट अलंकाराच्या स्थळी (त्या अलंकारामुळे दुसरा) विशिष्ट अलंकार सुचविला जाणे ' असा होईल.

९. अशी उदाहरणे म्हणजे ज्यात एका अलंकारामध्ये दुसरा अलंकार व्यंग्य असतो अशी उदाहरणे. एक अलंकार दुसऱ्या अलंकाराकडून सुचविला जातो या मुद्द्याचा त्यांनी स्वतंत्रपणे विचार केला नाही, तर अशा उदाहर-णांना त्यांनी वाच्य अलंकारांचाच एक प्रकार मानिले. म्हणजे पृ ४७ वर आनन्दवर्धनांनी लक्षणावाद्यांच्या संदर्भात **ध्वनिमार्गो मनाक् स्पृष्टोऽपि न लक्षितः** असे जे म्हटले, तशाच तऱ्हेने उद्भटादि आलंकारिकांच्या बाबतीतही **तैः अलंकारध्वनिमार्गो मनाक् स्पृष्टोऽपि न लक्षितः** असे म्हणता येईल.

ध्वन्यालोकः

इयत्पुनरुच्यत एव —

अलङ्कारान्तरस्यापि प्रतीतौ यत्र भासते।
तत्परत्वं न वाच्यस्य नासौ मार्गो ध्वनेर्मतः॥ २७॥

अलङ्कारान्तरेषु त्वनुरणनरूपालङ्कारप्रतीतौ सत्यामपि यत्र वाच्यस्य व्यङ्ग्यप्रतिपादनौन्मुख्येन चारुत्वं न प्रकाशते नासौ ध्वनेर्मार्गः। तथा च दीपकादावलङ्कारे उपमाया गम्यमानत्वेऽपि तत्परत्वेन चारुत्वस्याव्यवस्थानान्न ध्वनिव्यपदेशः।

यथा—

चंदमऊएहि णिसा णलिणी कमलेहि कुसुमगुच्छेहि लआ।
हंसेहि सरअसोहा कव्वकहा सज्जणेहि कीरइ गरुई॥
( चन्द्रमयूखैर्निशा नलिनी कमलैः कुसुमगुच्छैर्लता।
हंसैश्शारदशोभा काव्यकथा सज्जनैः क्रियते गुर्वी॥ इति च्छाया )

इत्यादिषूपमागर्भत्वेऽपि सति वाच्यालङ्कारमुखेनैव चारुत्वं व्यवतिष्ठते न व्यङ्ग्यालङ्कारतात्पर्येण। तस्मात्तत्र वाच्यालङ्कारमुखेनैव काव्यव्यपदेशो न्याय्यः।

ध्वन्यालोक

पण तरी एवढे सांगितलेच पाहिजे की—

ज्या उदाहरणात दुसरा अलंकार सूचित होत असूनही वाच्यार्थ हा त्या व्यंग्य अलंकारालाच मुख्यत्व देऊन सूचित करण्यासाठी आहे असे वाटत नसेल, ते उदाहरण ध्वनीचे मानले जात नाही. ॥ २७ ॥

काही (वाच्य) अलंकारांच्या बाबतीत अनुरणनरूप अलंकार सूचित होत असूनही वाच्यार्थाचे सौंदर्य हे मुख्यत : व्यंग्यार्थ प्रतिपादन करण्यासाठी आहे असे प्रत्ययास येत नसेल, तो ध्वनीचा प्रान्त नव्हे. म्हणूनच दीपक वगैरे[1] अलंकारांमध्ये उपमा सूचित होत असली, तरी मुख्य सौंदर्य उपमेत नसते, म्हणून त्या काव्याला ' ध्वनिकाव्य ' हे नाव दिले जात नाही.

उदा :—

चन्द्रकिरण रात्रीचे, कमले पुष्करिणीचे, फुलांचे घोस वेलीचे, हंस

शरद्‌ऋतूच्या शोभेचे व सज्जन ( सहृदय ) काव्यशास्त्रविनोदाचे माहात्म्य वाढवतात.[२]

अशा उदाहरणांच्या पोटात उपमा असली, तरी त्यांमध्ये सौंदर्य हे वाच्यालंकारामुळेच प्रत्ययास येते, व्यंग्य उपमेला सौंदर्यदृष्ट्या प्राधान्य दिल्यामुळे नव्हे. म्हणून अशा उदाहरणांना वाच्यालंकारामुळेच ' काव्य ' हे नाव देणे न्याय्य होईल.

लोचनम्

ननु पूर्वैरेव यदीदमुक्तं किमर्थं तव यत्न इत्याशङ्क्याह – इयदिति । अस्माभिरिति वाक्यशेषः । पुनःशब्दस्तदुक्ताद्विशेषद्योतकः । चन्द्रमऊ इति । चन्द्रमयूखादीनां न निशादिना विना कोऽपि परभाग-लाभः । सज्जनानामपि काव्यकथां विना कीदृशी साधुजनता । चन्द्र-मयूखैश्च निशाया गुरुकीकरणं भास्वरत्वसेव्यत्वादि यत्क्रियते, कमलैर्न-लिन्याः शोभापरिमललक्ष्म्यादि, कुसुमगुच्छैर्लतायाः अभिगम्यत्वमनो-हरत्वादि, हंसैः शारदशोभायाः श्रुतिसुखकरत्वमनोहरत्वादि, तत्सर्वं काव्यकथायाः सज्जनैरित्येतावानयमर्थो गुरुः क्रियत इति दीपकबलाच्च-कास्ति । कथाशब्द इदमाह – आस्तां तावत्काव्यस्य केचन सूक्ष्मा विशेषाः, सज्जनैर्विना काव्यमित्येष शब्दोऽपि ध्वंसते । तेषु तु सत्स्वास्ते* सुभगं काव्यशब्दव्यपदेशभागपि शब्दसन्दर्भमात्रम्; तथा तैः क्रियते यथादरणीयतां प्रतिपद्यते । इति दीपकस्यैव प्राधान्यं नोपमायाः ।

लोचन

पण काय हो, हे[३] जर पूर्वीच्या आलंकारिकांनी सांगितलेच आहे, तर मग तुमची (तेच पुन्हा सांगण्यासाठी ) यातायात कशाला ? अशी शंका कोणी घेतल्यास तिच्या समाधानासाठी वृत्तिकार ' पण तरी येवढे ' इ. सांगतात. हे वाक्य पूर्ण करण्याकरिता ( ' सांगितलेच पाहिजे ' यापूर्वी) ' आम्ही ' हा शब्द अध्याहृत घ्यावा. वृत्तिकारांचा

---

* काव्यानुशासन, पृ. ३५६, आस्तां सुभगं काव्यं काव्यशब्दस्य व्यपदेशभागपि असा पाठ.

'पण' हा शब्द, प्राचीनांच्या सांगण्याहून आमचे म्हणणे वेगळे आहे हे दर्शविणारा आहे.[४] 'चंद्रकिरण' इ. – चंद्रकिरण वगैरेंना रात्र इत्यादींशिवाय कोणतेही मोठेपण प्राप्त होत नाही. सहृदयांनाही त्यांनी काव्यसौंदर्याचे विवरण केल्याशिवाय सहृदय कसे म्हणता येईल ?[५] आणि चंद्रकिरण, कमळ, फुलांचे घोस व हंस हे अनुक्रमे रात्र, कमलिनी, वेल व शरद्‌ऋतूची शोभा यांना अनुक्रमे उजळपणा व आनन्दप्रदता, सौंदर्य व सुगंधाची लयलूट, आकर्षकपणा व मनोहारित्व आणि कर्णमधुर कूजन व आकर्षक डौलदार चाल या प्रकारचे जे जे मोठेपण प्राप्त करून देतात, ते ते सर्व प्रकारचे मोठेपण सहृदय काव्यसौंदर्याच्या चर्चेला प्राप्त करून देतात, हा इतका (उपमारूपी) अर्थ 'महत्त्व प्राप्त होते' या, एकदाच केलेल्या शब्दप्रयोगामुळे निष्पन्न झालेल्या दीपक अलंकाराच्या योगाने[६] (व्यंग्य स्वरूपात) प्रकाशित केला जातो. 'विवरण' या शब्दामागील अभिप्राय असा: – काव्याची काही सूक्ष्म वैशिष्ट्ये[७] तर राहूच द्या, पण सहृदयांच्या अभावी काव्य हे नाव देणेही शक्य होत नाही. पण ते सहृदय उपस्थित असले म्हणजे मात्र साधा शब्दसमुदायही सुंदर व 'काव्य' या नावास पात्र ठरावा अशी योग्यता त्या शब्दसमुदायाला सहृदयांमुळे प्राप्त होते. म्हणजे त्या सहृदयांच्या कर्तृत्वामुळे तो साधा शब्दसमुदायदेखील लोकांच्या आदरास प्राप्त होतो.[८] म्हणून प्रस्तुत उदाहरणात दीपक हाच (वाच्य) अलंकार मुख्य आहे, (व्यंग्य असलेला) उपमा हा अलंकार मुख्य नाही.[९]

**टीपा**

१. 'दीपक' अलंकाराच्या लक्षणासाठी पुढचीच, २ री टीप पहा.

२. येथे 'माहात्म्य वाढवण्याचे सामर्थ्य' हा साधारण धर्म चन्द्रकिरण, कमले, फुलांचे घोस, हंस व सज्जन या सर्वांमध्ये आहे. म्हणून साम्य, म्हणजे उपमा येथे व्यंग्य आहे. पण हे वर्णन उपमेच्या स्वरूपात मांडणे हा कवीचा मुख्य उद्देश नाही. (प्रस्तुत व अप्रस्तुत अशा) अनेकांमध्ये असलेल्या गुणक्रियारूप साधारण धर्माचा प्रत्येकाबरोबर वेगवेगळा उल्लेख न करिता तो एकदाच करणे हे दीपकाचे लक्षण. ते स्वरूप येथे कवीने आपल्या मांडणीला दिले, म्हणून येथे वाच्य अलंकार 'दीपक' असून तोच कवीला मुख्यत्वाने अभिप्रेत आहे उपमा मुख्यतया अभिप्रेत नाही. ती तशी असती तर, त्याने

आपल्या निरूपणाला उपमेचे स्वरूप दिले असते. शिवाय या अलंकाराला 'दीपक' हेच नाव आहे, 'उपमा' हे नाही. ज्या अलंकारात जे प्रधान असेल, त्याला अनुसरूनच त्याला नाव दिले जाते.

वरील उदाहरणात सज्जन हे प्रस्तुत असून चंद्रकिरण वगैरे सर्व अप्रस्तुत आहेत. सहृदयाशिवाय काव्याचा 'काव्य' पणादेखील संपुष्टात येतो व त्याचे स्वरूप केवळ एक 'वाक्य' एवढेच उरते.

३. हे म्हणजे एका वाच्य अलंकारातून दुसरा अलंकार सूचित होऊ शकतो हा मुद्दा.

४. उद्भटादिकांनी वाच्य अलंकाराच्या उदाहरणातून व्यंग्य अलंकाराची प्रतीति होऊ शकते हे जरी दाखविले असले तरी व्यंग्यार्थाचे प्रधानत्व किंवा गौणत्व हा विवेक त्यांनी मुळीच केला नाही. व्यंग्य अर्थ प्रधान असला तरच त्याला ध्वनि म्हणावे व तो गौण असला तर ते गुणीभूतकाव्याचे उदाहरण समजावे हे ध्वनिकारांनीच प्रथम सांगितले, असा अभिनवगुप्तांच्या म्हणण्याचा रोख आहे. हा मुद्दा त्यांनी वेळोवेळी पृ. २००, ३८१, व पुढे काशी आवृत्ति, पृ. ४८६ वर पुन्हा पुन्हा सांगितला आहे.

५. वस्तुतः हे व या पूर्वीचे वाक्य 'चंद्रकिरण' इ. गाथेतल्या वर्णनाशी सुसंगत नाही. गाथेत चंद्रकिरण वगैरेंमुळे रात्र वगैरेंना, तसेच सहृदयांमुळे काव्यचर्चेला शोभा येते असे म्हटले आहे. पण अभिनवगुप्तांची ही पहिली दोन वाक्ये रात्र वगैरेंशिवाय चंद्रकिरण वगैरेंना व काव्यचर्चेशिवाय सहृदयांना शोभा येत नाही, अशी वेगळ्या रूपात मांडलेली आहे. यापुढील वाक्ये मात्र गाथेतल्या मांडणीला धरून आहेत.

६. 'दीपक' अलंकारासंबंधी माहिती पृ. ५२७ वरील दुसऱ्या टीपेत दिलीच आहे.

७. म्हणजे काव्य हे ध्वनिकाव्य असणे, गुणीभूतव्यंग्य काव्य असणे, इ. सूक्ष्म वैशिष्ट्ये.

८. असा सहृदयांचा महिमा असल्यामुळेच लोचनाच्या प्रारंभीच्या मंगलाचरणपर श्लोकात अभिनवगुप्तांनी सहृदयांनाही सरस्वती देवतेचे खरेखुरे चैतन्य-स्वरूप म्हटले आहे.

९. दीपकात 'दीपन' हे मुख्य असते व औपम्य गौण असते हा मुद्दा पूर्वी पृ. १८९ वर, पृ. १९० वरील ५ व्या टीपेत व पृ. १९२ वरील २० व्या टीपेत येऊन गेलाच आहे.

ध्वन्यालोकः

यत्र तु व्यङ्ग्यपरत्वेनैव वाच्यस्य व्यवस्थानं तत्र व्यङ्ग्यमुखेनैव व्यपदेशो युक्तः । यथा—

प्राप्तश्रीरेष कस्मात्पुनरपि मयि तं मन्थखेदं विदध्या-
न्निद्रामप्यस्य पूर्वामनलसमनसो नैव संभावयामि ।
सेतुं बध्नाति भूयः किमिति च सकलद्वीपनाथानुयात-
स्त्वय्यायाते वितर्कानिति दधत इवाभाति कम्पः पयोधेः ॥

ध्वन्यालोक

पण ज्या ठिकाणी वाच्यार्थ हा व्यंग्यार्थाला मुख्यत्व देऊन त्याला सूचित करण्यासाठीच असतो, त्या ठिकाणी व्यंग्यार्थाला अनुसरूनच त्याचे काव्यत्व ठरवणे योग्य होईल. जसे-

" तू आलास की पुढीलप्रमाणे तर्क करीत बसल्यामुळे समुद्र कंपित झाल्यासारखे भासते- ' याला एकदा लक्ष्मी मिळाल्यावर हा पुन्हा माझे मंथन करून मला कष्ट कशाला देईल ? याचे मन आलस्यरहित असल्याने याने पूर्वी कधी निद्रा घेतली असेल ( व यापुढे हा मजवर निद्रा घेईल ) असे मला मुळीच शक्य दिसत नाही. सर्व भूप्रदेशांचे राजे याच्या आज्ञेत असल्याने हा मजवर सेतु तरी कशाला बांधील ? "

लोचनम्

एवं तु कारिकार्थमुदाहरणेन प्रदर्श्यास्या एव कारिकाया व्यवच्छेद्यबलेन योऽर्थोऽभिमतो यत्र तत्परत्वं स ध्वनेर्मार्ग इत्येवंरूपस्तं व्याचष्टे— यत्र त्विति । तत्र च वाच्यालङ्कारेण कदाचिद्व्यङ्ग्यमलङ्कारान्तरं, यदि वा वाच्यालङ्कारस्य सद्भावमात्रं न व्यञ्जकता, वाच्यालङ्कारस्याभाव एव वेति त्रिधा विकल्पः । एतच्च यथायोगमुदाहरणेषु योज्यम् । उदाहरति – प्राप्तेति । कस्मिंश्चिदनन्तबलसमुदायवति नरपतौ समुद्रपरिसरवर्तिनि पूर्णचन्द्रोदयतदीयबलावगाहनादिना निमित्तेन पयोधेस्तावत्कम्पो जातः । सोऽनेन सन्देहेनोत्प्रेक्ष्यते इति ससन्देहोत्प्रेक्षयोः सङ्करात्सङ्करालङ्कारो वाच्यः । तेन च वासुदेवरूपता तस्य नृपते-

ध्वन्यते। यद्यपि चात्र व्यतिरेको भाति तथापि स पूर्ववासुदेवस्वरूपात्, नाद्यतनात्। अद्यतनत्वे भगवतोऽपि प्राप्तश्रीकत्वेनानालस्येन सकल-द्वीपाधिपतिविजयित्वेन च वर्तमानत्वात्। न च सन्देहोत्प्रेक्षानुपपत्ति-बलाद्रूपकस्याक्षेपः, येन वाच्यालङ्कारोपस्कारकत्वं व्यङ्ग्यस्य भवेत्। यो योऽसम्प्राप्तलक्ष्मीको निर्व्याजविजिगीषाक्रान्तः स मां मथ्नीयादित्या-द्यर्थसम्भावनात्। न च पुनरपीति पूर्वामिति भूय इति च शब्दैरयमा-कृष्टोऽर्थः। पुनरर्थस्य च कर्तृभेदेऽपि समुद्रेक्यमात्रेणाप्युपपत्तेः। यथा पृथ्वी पूर्वं कार्तवीर्येण जिता पुनरपि जामदग्न्येनेति। पूर्वा निद्रा च सिद्धा राजपुत्राद्यवस्थायामपीति सिद्धं रूपकध्वनिरेवायमिति। शब्दव्यापारं विनैवार्थसौन्दर्यबलाद्रूपणाप्रतिपत्तेः।

यथा च-

ज्योत्स्नापूरप्रसरधवले[1] सैकतेऽस्मिन् सरय्वा
वादद्यूतं सुचिरमभवत्सिद्धयूनोः कयोश्चित्[2]॥
एकोऽवादीत्प्रथमनिहतं[3] केशिनं[4] कंसमन्यो
मत्वा[5] तत्त्वं कथय भवता को हतस्तत्र पूर्वम्॥

इति केचिदुदाहरणमत्र पठन्ति, तदसत्, भवतेत्यनेन शब्दबलेन वासुदेव इत्यर्थस्य स्फुटीकृतत्वात्।

लोचन

अशा रीतीने कारिकेचा अर्थ उदाहरणाने स्पष्ट करून याच कारिकेमध्ये कोणाला ध्वनि म्हणू नये हे जे सांगितले आहे, त्याच्या आधाराने 'जेथे वाच्यार्थ हा व्यंग्यार्थपर म्हणजे व्यंग्य अर्थालाच प्राधान्य देणारा असतो, तोच ध्वनीचा विषय होय' हा जो कारिकाकाराला इष्ट असलेला अभिप्राय सूचित होतो; त्याचे विवरण वृत्तिकार 'पण ज्या ठिकाणी' इ. वाक्याने करितात. आणि त्या बाबतीत[9] पुढील तीन प्रकारची परिस्थिति संभवते– १) काही उदाहरणांत एक अलंकार वाच्य असून त्यामुळे दुसरा अलंकार (प्राधान्याने) सूचित होतो, किंवा २) काही उदाहरणांत वाच्य अलंकार फक्त 'असतो'; तो व्यंग्य अलंकाराला सूचित करीत नाही (तर त्या उदाहरणातील वाच्य अलंकाराहून निराळ्याच कारणामुळे व्यंग्य अलंकार सुचविला

जातो), किंवा ३) वाच्य अलंकार मुळी नसतोच (आणि तरीही व्यंग्य अलंकार प्रधानत्वाने सूचित होतो). या तीन प्रकारांपैकी कोणता प्रकार कोणत्या ठिकाणी आहे हे आम्ही पुढे देणार असलेली व्यंग्य अलंकारांची उदाहरणे पाहून (सहृदयांनी) त्या उदाहरणातील परिस्थितीला अनुसरून ठरवावे.

आता वृत्तिकार अलंकारध्वनीची उदाहरणे ' तू आलास की ' इ. पद्यांतून देतात.

कोणी एक राजा आपल्या अगणित सैन्यसमुदायासह समुद्र-किनाऱ्यावर उभा असताना त्याच वेळी पूर्णचंद्र उगवणे, त्या राजाचे सैन्य सागरात जलविहारासाठी उतरणे, वगैरे कारणांमुळे समुद्रात लाटा उसळू लागल्या. तो कंप वरील श्लोकात सांगितलेले निरनिराळे संशय सागराने घेतल्यामुळे उत्पन्न झाला अशी कवीने उत्प्रेक्षा केल्याने ससंदेह आणि उत्प्रेक्षा या वाच्य अलंकारांचे अंगांगिभावाने मिश्रण प्रस्तुत श्लोकात असल्यामुळे येथे संकरालंकार वाच्य आहे. आणि त्या वाच्य संकर अलंकारामुळे ' राजा हा वासुदेवच आहे ' असे सूचित होते[२] आणि जरी येथे राजाचा वासुदेवाहून उत्कर्ष (म्हणजे व्यतिरेक अलंकार) व्यंग्यत्वाने प्रतीत होत असला, तरी तो वासुदेवाच्या पूर्वीच्या स्वरूपाच्या[३] तुलनेने प्रतीत होतो, आताच्या[४] वासुदेवाच्या स्वरूपाच्या तुलनेने नव्हे. आताच्या काळी भगवान वासुदेवालाही लक्ष्मी प्राप्त झाली आहे, तो वासुदेव आलस्यविरहित आहे व सर्व द्वीपांच्या अधिराजांना त्याने जिंकले आहे. (म्हणून आताच्या वासुदेवाहून तो राजा अधिक आहे असा बोध होत नाही, त्या दोघांच्या ' अभेदा 'चाच प्रत्यय येतो.[५])

आणि या श्लोकात संदेह व उत्प्रेक्षा यांची उपपत्ति (राजा व वासुदेव यांचा अभेद प्रत्ययास आल्याशिवाय) लागत नसल्यानेच रूपक हे या ठिकाणी (अर्थापत्तीने) अनिवार्यपणे प्रतीत होत आहे आणि म्हणून व्यंग्यरूपक हे या पद्यात वाच्यार्थाचे समर्थनच करणारे आहे (व म्हणून हे गुणीभूतव्यंग्याचे उदाहरण आहे, ध्वनीचे नाही) असे नव्हे. कारण, ज्याला ज्याला लक्ष्मी म्हणजे संपत्ती प्राप्त

झालेली नाही व जो जो केवळ विजयाच्याच इच्छेने प्रेरित झालेला असेल, तो तो माझे मंथन करील, अशा प्रकारचा अर्थही घेणे शक्य आहे. (केवळ रूपकच अटळपणे सूचित होईल असे नाही[६]). बरे, (मागील[७] उदाहरणामधील 'सूचकपणे' इ. शब्दांप्रमाणे) या पद्यातील 'पुन्हा,' 'पूर्वी,' व ' 'फिरून' या शब्दांमुळे हे व्यंग्य रूपक वाच्य केले जात आहे असेही नाही! कारण, पुन्हा, फिरून इ. शब्दांच्या अर्थाचे समर्थन 'त्या त्या क्रियांचे कर्ते वेगळे असले तरी त्या मंथनादि क्रियांचा समुद्र हा आधार एकच आहे;' असा अर्थ घेऊनही होऊ शकेल. उदा. पृथ्वी पूर्वी सहस्रार्जुनाने जिंकली होती, पण पुन्हा परशुरामाने जिंकली. (तसे पूर्वी विष्णूने माझे मंथन केले, आता हा राजाही पुन्हा माझे मंथन कशासाठी करील ?) तसेच हा राजा राजपुत्र वगैरे अवस्थांत असताना यानेही विष्णूप्रमाणे आधी निद्रा घेतली असणे शक्य आहे.[८] अशा रीतीने येथे 'रूपकध्वनि'च आहे (म्हणजे व्यंग्य रूपक वाच्यार्थाच्या समर्थनासाठीच खर्ची पडते असे नाही) हे सिद्ध झाले. कारण येथील रूपक हे शब्दाच्या अभिधा या व्यापाराने प्रत्ययास येत नसून (वाच्य) अर्थाच्या व्यंजकत्व सामर्थ्यामुळेच[९] प्रत्ययास येते (म्हणून हा अर्थशक्तिमूल रूपकध्वनिच आहे). वृत्तीतल्या 'तू आलास की' इ. श्लोकानंतर 'आणखी असे की' हे शब्द व त्यानंतर पुढील श्लोक रूपकध्वनीचे उदाहरण म्हणून काही लोक उद्धृत करितात.

"सरयू नदीच्या ह्या वाळवंटावर एकदा चांदणे ओसंडून वाहू लागून ते वाळवंट पांढरे शुभ्र दिसत असताना सिद्ध कोटीतील कोणातरी दोन तरुणांचा खूप वेळ वाद होऊन पैज लागली. त्यांपैकी एक म्हणाला— 'केशी' राक्षस प्रथम मारला गेला. तर दुसरा म्हणाला — 'कंस' (प्रथम मारला गेला). तर (हे राजा !) खरे काय, त्याचा विचार करून तू त्यांपैकी पहिल्याने कोणास मारिलेस ते सांग."

पण त्या लोकांचे मत बरोबर नाही, कारण या श्लोकात 'तू' हा शब्द प्रत्यक्ष वापरला असल्याने येथ 'तू वासुदेवच आहेस' हा अर्थ वाच्य झाल्यासारखा[१०] आहे.

टीपा

१. त्या बाबतीत म्हणजे व्यंग्य अलंकार प्रधानत्वाने सूचित केला जाण्याच्या बाबतीत.

२. म्हणजे येथे रूपक अलंकार प्राधान्याने सूचित होत आहे.

३. म्हणजे मंथनोद्युक्त निद्रोन्मुख व सेतुबंधनोद्यत अशा वासुदेवाच्या मानाने.

४. आताच्या म्हणजे मंथनोत्तरकालीन, झोपेतून जागृत झालेल्या व सेतुबंधनोत्तरकालीन वासुदेवाच्या.

५. 'राजा हा पूर्वकालीन विष्णूहून वरचढ आहे,' असा व्यतिरेक अलंकार जरी येथे सूचित होत असला, तरी 'आताच्या विष्णूशी त्या राजाचा अभेद' हे रूपक येथे मुख्यत्वाने व्यंग्य आहे; हे रूपकध्वनीचे उदाहरण होय, व्यतिरेकध्वनीचे नव्हे.

जगन्नाथपंडिताने रसगंगाधर, पृ. ३२८ वर आनंदवर्धनांचे वरील 'तू आलास की' इ. पद्य उद्‌धृत करून 'आनन्दवर्धनांचे म्हणणे येथे रूपकध्वनि आहे असे असले, तरी वस्तुत: येथे भ्रांतिमान् अलंकाराचा ध्वनि आहे'– असे आपले मत प्रकट केले आहे. याचे कारण असे की, समुद्राला 'हा राजा विष्णु आहे' अशी जाणीव नसून 'हा विष्णूच आहे' अशी त्याची समजूत झाली आहे. म्हणजे समुद्राला राजा व विष्णू असे आहार्यज्ञान (म्हणजे भेदाची जाणीव) नाही, हा विष्णूच आहे अशी समुद्राला भ्रांति झालेली असल्याने येथे 'भ्रांतिमान्' सूचित होत आहे.

६. पूर्वपक्ष्याचे म्हणणे असे की, 'राजा हा विष्णूच आहे' असे धरून चालल्याशिवाय समुद्राच्या मनात 'हा माझे मंथन करील काय' इ. शंका उद्‌भवणे शक्य नाही व त्या शंकांवर अवलंबून असलेली उत्प्रेक्षाही कवि करू शकणार नाही. म्हणून 'समुद्र अशा शंका घेतो' याच्या म्हणजे वाच्यार्थाच्या समर्थनासाठीच व्यंग्य रूपक खर्ची पडते, ते रूपक केवळ त्याच्या स्वत:साठीच नाही, यास्तव हे गुणीभूतव्यंग्याचे उदाहरण आहे, ध्वनीचे नाही.

यावर अभिनवगुप्तांचे उत्तर असे की, समुद्राच्या मनात अशी शंका उत्पन्न होण्यास समुद्राने 'हा राजा विष्णु आहे' असेच मानण्याची आवश्यकता नाही. तो कोणीतरी राजा आहे असे मानिले तरी त्याने संपत्ति मिळविण्यासाठी मंथन करणे व पैलतीरावरील राजांना जिंकण्यासाठी सेतु बांधणे शक्य आहे. अशा तऱ्हेने राजाला विष्णु मानिले तरी, किंवा त्याला विष्णु न मानिता कोणी एक पराक्रमी राजाच समजले तरी समुद्राच्या मनात असे संशय येणे संभवनीय आहे. म्हणून अटळपणे रूपकच प्रतीत होते असे नाही; रूपक हे दोन शक्यतांपैकी एक आहे, या कारणाने रूपक हे व्यंग्य मानावयाचे व ते वाच्यार्थाच्या सिद्धीसाठी आवश्यक

नसल्याने वाच्यार्थाचे अंग नसून स्वतंत्र आहे, अत एव येथे रूपकध्वनिच मानावयाचा.

७. 'हे केशवा !' इ. उदाहरणातील प्रियकर या नात्याने कृष्णाला लागू पडणाऱ्या व्यंग्यार्थाचे अस्तित्व 'सूचकपणे' या शब्दाने जसे उघड करून टाकले आहे, तसेच या श्लोकातील राजा हा विष्णूच आहे' या व्यंग्यार्थाचे अस्तित्व 'पुन्हा', 'पूर्वी', 'फिरून' इ. शब्दांनी वाच्य केले आहे. कारण, ते शब्द 'राजा हा विष्णु' या अर्थालाच वाचकापुढे खेचून आणण्यास मदत करितात, असे पूर्वपक्षाचे म्हणणे.

८. राजपुत्र असताना जबाबदारी अंगावर पडलेली नसल्यामुळे झोप घेतलेली चालण्यासारखी होती. राजा झाल्यावर मात्र त्याला झोपून चालणार नाही. त्याला सदैव प्रजाहितदक्ष असावयास पाहिजे. यासारख्या विचारासाठी, पाहा, रघुवंश, ५–६६ मधील पुढील दोन चरण–

**तामेकस्तव बिभर्ति गुर्वविनिद्रः ।**
**तस्या भवानपरधुर्यपदावलम्बी ॥**

या श्लोकात राजा असलेल्या रघूला 'विनिद्र' म्हटले असून राजपुत्र अजानेही आता विनिद्र व्हावे, असे म्हणण्याचा हेतु आहे. प्रस्तुत श्लोकातील राजाचे '**अनलसमनस्**' हे विशेषण रघुवंशातील वरील श्लोकातल्या 'विनिद्र' या विशेषणाची आठवण करून देणारे आहे.

९. येथे अर्थसौंदर्य म्हणजे वाच्यार्थाचे 'व्यंजकत्व' हे सामर्थ्य.

१०. वस्तुतः येथे भवता या शब्दाने उपमेयाचा निर्देश केलेला आहे. उपमान जो वासुदेव, त्याचा उल्लेख प्रत्यक्ष शब्दांनी केला नसून 'त्याने केलेला केशी व कंस या दानवांचा वध' या कार्याच्या वर्णनावरून वासुदेव हे उपमान सुचवले गेले आहे. तरीही रूपक हे या ठिकाणी वाच्य झाले आहे असे अभिनवगुप्त का म्हणतात हे समजत नाही. कारण उपमेयाचाही उल्लेख येथे केला नसता, तर येथे रूपकच संभवणार नाही, आणि मग ते ध्वनित होण्याचा प्रश्न दूरच. वृत्तीतील रूपकध्वनीच्या दोन्ही उदाहरणात अनुक्रमे 'तू' व 'मुख' ही उपमेये शब्दांनी वाच्यच केली आहेत ! तेव्हा 'सरयू नदीच्या' इ. उदाहरणातही फक्त उपमेयच वाच्य असल्याने तेथेही रूपक-ध्वनि मानावयास हरकत नसावी असे आम्हास वाटते.

ध्वन्यालोकः

यथा वा ममैव–

लावण्यकान्तिपरिपूरितदिङ्मुखेऽस्मिन्

स्मेरेऽधुना तव मुखे तरलायताक्षि ।

क्षोभं यदेति न मनागपि तेन मन्ये

सुव्यक्तमेव जलराशिरयं पयोधिः ॥

इत्येवंविधे विषयेऽनुरणनरूपकाश्रयेण काव्यचारुत्वव्यवस्थानाद्रूपकध्वनिरिति व्यपदेशो न्याय्यः ।

उपमाध्वनिर्यथा–

वीराणँ रमइ घुसिणारुणम्मि ण तहा पिआथणुच्छङ्गे ।

दिट्ठी रिउगअकुंभत्थलम्मि जह बहलसिंदूरे ॥

ध्वन्यालोक

किंवा जसे माझाच पुढील श्लोक–

" हे चञ्चल-विशाल-नयने ! सर्व दिग्भागांना आपल्या लावण्यकांतीने भरून टाकणारे तुझे हे मुख आता हसरे झाले असतानाही या समुद्रात ज्या अर्थी थोडीही खळबळ उत्पन्न होत नाही, त्या अर्थी अगदी उघड आहे की, हा ( समुद्र ) म्हणजे मूर्तिमंत जडपणाचा १. निर्जीवपणाचा २. पाण्याचा ) एक साठा आहे. "[1]

अशासारख्या उदाहरणात अनुरणनासारख्या असलेल्या ( म्हणजे वाच्यार्थानंतर प्रतीत होणाऱ्या ) रूपकाच्या आधारेच काव्य सुंदर झाले असल्यामुळे या काव्याला ' रूपक-ध्वनि ' हे नाव देणे न्याय्य होईल.[2]

उपमाध्वनीचे उदाहरण जसे–

" शत्रूंच्या हत्तींची दाट शेंदराने माखलेली गंडस्थळे पाहून वीरांची दृष्टी जशी आनंदित होते, तशी केशराच्या उटीमुळे तांबडे झालेले आपल्या प्रियांचे स्तन पाहून होत नाही. "

लोचनम्

लावण्यं संस्थानसुभिधमा, कान्तिः प्रभा, ताभ्यां परिपूरितानि संविभक्तानि हृद्यानि संपादितानि दिङ्मुखानि येन । अधुना कोपकालुष्या-

दनन्तरं प्रसादौन्मुख्येन स्मेरे ईषद्विहसनशीले। तरलायते प्रसादान्दोलन-विकाससुन्दरे अक्षिणी यस्यास्तस्याः आमन्त्रणम्। अथ चाधुना न एति, वृत्ते वृत्ते तु क्षणान्तरे क्षोभमगमत्। कोपकषायपाटलं स्मेरं च तव मुखं सन्ध्यारुणपूर्णशशधरमण्डलमेवेति भाव्यं क्षोभेण चलचित्ततया सहृदयस्य। न चैति तत्सुव्यक्तमन्वर्थतोऽयं जलराशिर्जाड्यसञ्चयः। जलादयः शब्दा भावार्थप्रधाना इत्युक्तं प्राक्। अत्र च क्षोभो मदनविकारात्मा सहृदयस्य त्वन्मुखावलोकनेन भवतीतीयत्यभिधाया विश्रान्ततया रूपकं ध्वन्यमान-मेव। वाच्यालङ्कारश्चात्र श्लेषः, स च न व्यञ्जकः। अनुरणनरूपं यद्रूपकमर्थशक्तिव्यङ्ग्यं तदाश्रयेणेह काव्यस्य चारुत्वं व्यवतिष्ठते। ततस्तेनैव व्यपदेश इति सम्बन्धः। तुल्ययोजनत्वादुपमाध्वन्युदाहरणयो-र्लक्षणं स्वकण्ठेन न योजितम्।

वीराणां रमते घुसृणारुणे न तथा प्रियास्तनोत्सङ्गे।
दृष्टी रिपुगजकुम्भस्थले यथा बहलसिन्दूरे॥

प्रसाधितप्रियतमाश्वासनपरतया समनन्तरीभूतयुद्धत्वरितमनस्क-तया च दोलायमानदृष्टित्वेऽपि युद्धे त्वरातिशय इति व्यतिरेको वाच्या-लङ्कारः। तत्र तु येयं ध्वन्यमानोपमा प्रियाकुचकुड्मलाभ्यां सकल-जनत्रासकरेष्वपि शात्रवेषु मर्दनोद्यतेषु गजकुम्भस्थलेषु तद्दर्शनं रतिमा-ददानानामिव* बहुमान इति।
सैव वीरतातिशयचमत्कारं विधत्त इत्युपमायाः प्राधान्यम्।

लोचन

लावण्य म्हणजे अवयवांच्या ठेवणीचा मोहकपणा. कांति म्हणजे तजेलदारपणा. त्या दोहोंच्या योगाने ज्या मुखाने सर्व दिग्भाग व्यापून टाकले आहेत म्हणजे रमणीय केले आहेत. आता म्हणजे त्या मुखावरील रोषाची लाली मावळून त्यावर प्रसन्नता दिसू लागली असल्यामुळे 'स्मेर' म्हणजे ते मंदस्मित करू लागले असताना. तरल म्हणजे चंचल आणि आयत म्हणजे प्रसन्नतेच्या लहरींनी भरून जाऊन पूर्ण विकसित झाल्यामुळे मनोहर दिसत आहेत नेत्र जिचे, तिला (तरलायताक्षि !

* कल्पलताविवेक, पृ. १४७, रतिमयानामिव असा पाठ.

या विशेषणाने) संबोधिले आहे. आणखी असे की, समुद्राला काही क्षणापूर्वी (म्हणजे आकाशात पूर्णचंद्र असताना) भरती येत होती, आणि आता (तुझे प्रसन्न मुख पाहून) मात्र त्याला भरती येत नाही. तुझे कोपाच्या तांबुसपणामुळे आरक्त झालेले आणि हसरे मुख म्हणजे सायंकालीन ताम्रवर्णी पूर्णचंद्राचे बिंबच होय आणि (तो समुद्र सहृदय असता तर) तो क्षुब्ध व्हावयास पाहिजे होता. कारण सहृदयाचे मन (सौंदर्याच्या दर्शनाने) अस्थिर होते. पण हा सागर क्षुब्ध होत नाही, म्हणून हे अगदी स्पष्ट आहे की, हा सागर जलराशी या आपल्या नावाला शोभेल असा जडपणाचा साठाच होय. जल (म्हणजे जड[3]) वगैरे शब्द मुख्यतया 'भाव' वाचक म्हणजे गुणधर्मवाचक असतात हे मागे[4] सांगितलेच आहे. आणि या ठिकाणी तुझ्या मुखाच्या दर्शनाने सहृदयाच्या मनात मदनविकार या स्वरूपाचा क्षोभ म्हणजे अस्वस्थपणा उत्पन्न होतो, पण सागरामध्ये होत नाही, (म्हणून तो जडपणाचा ढिगारा आहे) ह्या इतक्या अर्थाचा बोध करून दिल्यावर अभिधेचे कार्य संपते.[5] म्हणून तुझे मुख हा चंद्रच होय हे रूपक (येथे वाच्य नसून) व्यंग्यच आहे. या ठिकाणी वाच्य अलंकार श्लेष हा आहे, पण तो, मुखचंद्र हे रूपक सूचित करीत नाही.[6] रूपक हे या ठिकाणी अनुरणनात्मक म्हणजे संलक्ष्यक्रम असून वाच्यार्थाच्या सामर्थ्याने सूचित होणारे आहे व त्यामुळेच या पद्यात काव्यसौंदर्य निष्पन्न झालेले आहे, म्हणून येथील ध्वनिप्रकाराला वृत्तिकारांनी 'रूपकध्वनि' म्हटले आहे. यापुढील दोन उपमाध्वनीच्या उदाहरणांची परिस्थिती तशीच आहे (म्हणजे त्यांतही उपमा प्राधान्याने सूचित होत असल्यामुळे 'उपमाध्वनि'च आहे), म्हणून वृत्तिकारांनी त्या दोन उदाहरणांना (उपमाध्वनीचे) लक्षण कसे लागू पडते याचे स्वतःच्या शब्दात विवरण केले नाही.

'वीरांची दृष्टि' इ.–अलंकारांनी सजलेल्या आपल्या प्रियतमांचे समाधान करण्यास उत्सुक झाल्यामुळे आणि अगदी तोंडाशी आलेल्या युद्धात उडी घेण्यासाठी मनात आतुरता उत्पन्न झाली आहे म्हणून वीरांची नजर दोहोंकडेही आंदोलित होत असली, तरी युद्धाच्या बाबतीतली त्यांची धांदल (प्रियतमांचे सान्त्वन करण्यापेक्षा अधिक) प्रबल आहे, म्हणून या पद्यातील वाच्य अलंकार 'व्यतिरेक' हा आहे.

पण शत्रूंच्या हत्तींची गंडस्थळे सर्व लोकांना घाबरवून सोडणारी आणि सैनिकांना चिरडण्यास उद्युक्त झालेली असली, तरी त्यांना दिलेली प्रियांच्या स्तनकलिकांची उपमा या वर्णनातून सूचित होत आहे. त्या उपमेमुळे त्या वीरांना हत्तींची गंडस्थळे रगडण्यात प्रियतमांचे स्तन रगडण्याचा आनंद होत असल्यामुळे त्यांना त्या गंडस्थळांविषयी आदर वाटतो म्हणून ती उपमाच वीरांचे विस्मयकारक शौर्य प्रत्ययास आण-ण्यास कारणीभूत, अत एव मुख्य आहे.[७]

टीपा

१. राग सोडून आता प्रसन्न झालेल्या नायिकेला उद्देशून नायकाने म्हटलेले हे वाक्य आहे.

२. "तुझे मुख चन्द्रच" हे रूपक या ठिकाणी मुख्यतया सूचित होत आहे.

३. 'डलयोरभेदः' म्हणजे ड व ल हे वर्ण एकच किंवा परिवर्तनीय समजावेत असा एक संकेत असल्याने वस्तुतः "जलराशि" असलेल्या समुद्राला "जड-राशि" असेही आपोआपच म्हटले जाते. नायिकेच्या प्रसन्न मुखचन्द्राला पाहून या समुद्राच्या मनात खळबळ उत्पन्न व्हायला पाहिजे होती, पण तरीही तो थंडच असल्याने त्याला "जडराशि" म्हटले आहे.
या ठिकाणी 'जडराशि–जलराशि' असा श्लेषालंकार वाच्य असला, तरी व्यंग्य रूपक त्याच्यावर मुळीच अवलंबून नाही

४. पाहा, पृ. ७ वरील ९ व १० या ओळी.

५. अभिनवगुप्तांच्या या म्हणण्यावरून या वाक्यातून ज्ञात होणारा सर्वच अर्थ 'वाच्य' आहे असा समज होईल, पण त्यातला 'सहृदयाच्या मनात मदन-विकाररूपी अस्वस्थपणा उत्पन्न होतो' हा भाग वाच्य नसून व्यंग्यच आहे व तो समासोक्ति अलंकाराच्या पद्धतीने सुचविलेला आहे.

६. 'जलराशि' या शब्दात शब्दश्लेष व 'क्षोभ' या शब्दात अर्थश्लेष आहे. तथापि ते दोन्ही शब्द काढून टाकून त्यांच्याऐवजी **लोलत्वमेति न मनागपि तेन मन्ये । संवेदनाविकल एव हि सिन्धुरेषः ।** अशी शब्दांची योजना केली, म्हणजे श्लेष अलंकार काढून टाकला, तरीही 'मुखचन्द्र' हे रूपक सूचित होतेच.

७. मात्र येथे उपमाध्वनि असला, तरी त्याचेही पर्यवसान शेवटी वीररसाच्या ध्वनीमध्येच होते. पाहा, पृ. ८३ व १३७ वरील लोचनातील 'वस्तुध्वनि व अलंकारध्वनि'... इ. वाक्ये.

यथा वा ममैव विषमबाणलीलायामसुरपराक्रमणे कामदेवस्य—

तं ताण सिरिसहोअररअणाहरणम्मि हिअअमेक्करसं ।
बिंबाहरे पिआणं णिवेसिअं कुसुमबाणेण ॥
(तत्तेषां श्रीसहोदररत्नाहरणे हृदयमेकरसम् ।
बिम्बाधरे प्रियाणां निवेशितं कुसुमबाणेन ॥ इति च्छाया)

आक्षेपध्वनिर्यथा–

स वक्तुमखिलाञ् शक्तो हयग्रीवाश्रितान् गुणान् ।
योऽम्बुकुम्भैः परिच्छेदं ज्ञातुं शक्तो महोदधेः ॥

अत्रातिशयोक्त्या हयग्रीवगुणानामवर्णनीयताप्रतिपादनरूपस्यासाधारणतद्विशेषप्रकाशनपरस्याक्षेपस्य प्रकाशनम् ।

ध्वन्यालोक

किंवा माझ्याच 'विषमबाणलीले' तले कामदेवाने असुरांवर पराक्रम गाजवला, त्यावेळचे ( पुढील ) उदाहरण–

" त्या असुरांचे जे मन, लक्ष्मीबरोबर ( समुद्रातून ) निघालेली रत्ने ( अमृत ) हिरावून घेण्याकडे लागले होते, ते मदनाने त्यांच्या प्रिय पत्नींच्या पक्वबिंबासारख्या अधरांवर गुंतवले.

' आक्षेपध्वनी ' चे उदाहरण—

" हयग्रीवाच्या ठिकाणी असणाऱ्या सर्व गुणांचे वर्णन करणे त्यालाच जमेल की, जो पाण्याच्या घागरींनी महासागरातल्या पाण्याचे मोजमाप करणे जाणू शकेल. "

यात ( वाच्य ) असलेल्या ' अतिशयोक्ती ' ने हयग्रीवाचे गुण अवर्णनीय आहेत असे सांगणे हे ज्याचे स्वरूप आहे, व त्या द्वारे त्याच्या असामान्यपणाचा प्रत्यय घडवणे हे ज्याचे उद्दिष्ट आहे, असा ' आक्षेप ' सुचवला जात आहे.

लोचनम्

असुरपराक्रमण इति । त्रैलोक्यविजयो हि तत्रास्य वर्ण्यते । तेषामसुराणां पातालवासिनां यैः पुनः पुनरिन्द्रपुरावमर्दनादि किं किं न कृतं,

तद्धृदयमिति यत्तेभ्यस्तेभ्योऽतिदुष्करेभ्योऽप्यकम्पनीयव्यवसायं तच्च । श्रीसहोदराणामत एवानिर्वाच्योत्कर्षाणामित्यर्थः । तेषां रत्नानामा समन्ताद्धरणे एकरसं तत्परं यद्धृदयं तत्कुसुमबाणेन सुकुमारतरोपकरणसम्भारेण प्रियाणां बिम्बाधरे निवेशितम्, तदवलोकनपरिचुम्बनदशनमात्रकृतकृत्यताभिमानयोगि तेन कामदेवेन कृतम् । तेषां हृदयं यदत्यन्तं विजिगीषाज्वलनजाज्वल्यमानमभूदिति यावत् । अत्रातिशयोक्तिर्वाच्यालङ्कारः । प्रतीयमाना चोपमा । सकलरत्नसारतुल्यो बिम्बाधर इति हि तेषां बहुमानो वास्तव एव । अत एव न रूपकध्वनिः । रूपकस्यारोप्यमाणत्वेनावास्तवत्वात् । तेषामसुराणां वस्तुवृत्त्यैव सादृश्यं स्फुरति । तदेव च सादृश्यं चमत्कारहेतुः प्राधान्येन । अतिशयोक्त्येति । वाच्यालङ्काररूपयेत्यर्थः । अवर्णनीयताप्रतिपादनमेवाक्षेपस्य रूपमिष्टप्रतिषेधात्मकत्वात् । तस्य प्राधान्यं विशेषणद्वारेणाह– असाधारणेति ।

लोचन

'असुरांवर पराक्रम गाजविला, त्यावेळी'– कारण त्या (म्हणजे विषमबाणलीला या) ग्रंथात मदनाने त्रैलोक्यावर मिळविलेल्या विजयाचे वर्णन केले आहे. त्यांचे म्हणजे पाताळात राहणाऱ्या त्या असुरांचे, की ज्यांनी वारंवार इन्द्राची नगरी उद्ध्वस्त करणे इ. काय काय कृत्ये केली नाहीत (अशा असुरांचे). आणि ते हृदय म्हणजे ज्याचा उत्साह ती ती अतिशय दुष्कर कर्मे करण्यापासून ढळला नाही, असे (हृदय). लक्ष्मीबरोबर (समुद्रातून) निघालेली– म्हणूनच ज्यांचा उत्कृष्टपणा यथार्थपणे वर्णन करणे शक्य नाही अशी रत्ने, असा भावार्थ. ती रत्ने 'आ' म्हणजे सर्वप्रकारे आपल्याच ताब्यात घेण्याकडे 'एकरस' म्हणजे तन्मय झालेले जे त्यांचे मन, ते 'कुसुमबाणाने' म्हणजे ज्याची फुले ही साधनसामग्री अतिशय कोमल आहे अशा मदनाने, त्यांच्या प्रेयसीच्या पक्वबिंबतुल्य अधरोष्ठांवर गुंतविले, म्हणजे त्या अधरोष्ठांकडे एकटक पाहणे, त्यांची चुंबने घेणे व त्यांवर दंतक्षते करणे[1] या गोष्टी करूनच त्या मनाला कृतार्थतेचा अभिमान वाटावा असे कामदेवाने करून टाकले. त्यांचे हृदय म्हणजे जे केवळ देवांना जिंकण्याच्या ज्वलंत इच्छेने प्रदीप्त झाले होते, ते. या पद्यात 'अतिशयोक्ति' हा अलंकार

वाच्य आहे[२] आणि उपमा ही व्यंग्य आहे. कारण, सर्वश्रेष्ठ रत्नांइतका बिंबाधर अभिलषणीय असल्यामुळे त्या असुरांना बिंबाधराविषयी वाटणारा आदर वस्तुस्थितीस धरूनच आहे. म्हणूनच या पद्यात रूपक-ध्वनि नाही (तर 'उपमाध्वनि'च आहे). कारण रूपकामध्ये उपमेयावर उपमानाचा आरोप केला जात असल्याने रूपकालंकार हा अ-वास्तव (म्हणजे कविकल्पित) असतो.[३] त्या दैत्यांना रत्ने व प्रियांचे बिंबाधर यांमध्ये खरोखरच सारखेपणा वाटत होता आणि तो सारखेपणाच येथे (सहृदयांना) मुख्यत: सौंदर्याची प्रतीति करून देणारा आहे.

'अतिशयोक्तीने'—म्हणजे अतिशयोक्ति नावाच्या[४] वाच्य अलंकाराने. जे वस्तुत: सांगावयाची इच्छा आहे त्याचा इन्कार करणे हे आक्षेपाचे स्वरूप असल्याने प्रस्तुत श्लोकात हयग्रीवाचे गुण अवर्णनीय आहेत असे सुचविणे अशा स्वरूपाचा आक्षेप अलंकार आहे. 'असामान्य-पणाचा प्रत्यय घडविणारा' या विशेषणाच्या द्वारे तो व्यंग्य आक्षेपच येथ प्रधान आहे हे वृत्तिकारांनी सांगितले आहे.[५]

टीपा

१. मूळ लोचनात 'दर्शन' असा पाठ आहे, पण त्यापेक्षा कल्पलताविवेक, पृ. १४७ वरील 'दशन' हा पाठ कल्पिणे हे आम्हांस अधिक योग्य वाटते, कारण 'अवलोकना' नंतर पुन्हा दर्शन हा शब्द वापरणे म्हणजे पुनरुक्ति होते.

२. प्रस्तुत गाथेचा अनुवाद आम्ही अभिनवगुप्तांना अनुसरून केला आहे, पण 'रत्ने म्हणजे चौदा रत्ने व प्रिया म्हणजे असुरांच्या स्वप्रिया' हे मत हृद्य वाटत नाही. रत्न म्हणजे अमृत व प्रिया म्हणजे मोहिनी हा अर्थ अधिक समर्पक वाटतो. कारण, असुरांचे मन 'एकरस' झाले होते असे म्हटले आहे. असुरांना मुख्यत: अमृत पाहिजे होते, इतर रत्नांसाठी त्यांनी मंथन आरंभिले नव्हते. मुळातील पिआणं हे बहुवचन प्राकृतामध्ये लिंगवचनांचा वापर शैथिल्याने केला जात असल्यामुळे वापरले असावे. काव्यप्रकाश, झळकीकर-संपादित आवृत्तीत पृ. ६९३ वर झळकीकरांनीही प्रियाणां प्रियाया: मोहिन्या: असे विवरण केले आहे. काही विशेष कारण नसताना, समुद्रमंथनात मग्न झालेल्या असुरांना एकाएकी स्वप्रियांची आठवण होण्यापेक्षा त्यांचे मन समोर असलेल्या मोहिनीकडे आकर्षिले जाणे हे अधिक स्वाभाविक वाटते. तसेच येथे वाच्य अलंकार 'अतिशयोक्ति' आहे या आनंदवर्धनांच्या व अभिनवगुप्तांच्या मतापेक्षा 'पर्याय' आहे हे मम्मटाचे म्हणणे अधिक ग्राह्य

वाटते. तथापि पर्याय अलंकारही अतिशयोक्तीवर आधारलेला असतो, या दृष्टीने त्या दोघांचे म्हणणे समर्थनीय आहे. एकच गोष्ट कालांतराने अनेक ठिकाणी जाणे किंवा असणे हे 'पर्याय' अलंकाराचे लक्षण होय. त्या असुरांचे मन एकीकडून काढून दुसरीकडे गुंतवले गेले हा वाच्य पर्याय अलंकार, पण मोहिनीचा अधररस अमृतासारखा ही उपमा प्रामुख्याने सूचित झाली आहे.

३. उपमेमध्येदेखील कविकल्पना असते, पण 'उपमेय उपमानासारखे आहे' हे म्हणणे 'उपमेय हे उपमानच आहे' या म्हणण्यापेक्षा वस्तुस्थितीला अधिक जवळचे आहे.

४. येथे अभिनवगुप्तांनी वाच्य अलंकार 'अतिशयोक्ति' आहे असे म्हटले आहे. पण वस्तुतः येथील वाच्य अलंकार (अतिशयोक्तिमूलक) 'निदर्शना' हा आहे. अर्थात् बहुतेक सर्वच अलंकारांच्या मुळाशी अतिशयोक्ति असते म्हणून येथेही तशी अतिशयोक्ति आहे, पण ही वस्तुतः 'निदर्शना' च. 'जो असे करितो, तो तसे करितो' असे वर्णन जेथे असून त्या दोन वाक्यांचा संबंध जुळणे सकृद्दर्शनी असंभवनीय भासते, पण तात्पर्य 'त्याचे असे करणे त्याच्या तसे करण्यासारखे आहे' असे उपमेसारखे असते, तेथे 'निदर्शना' हा अलंकार असतो. हयग्रीवाचे गुणवर्णन करणे म्हणजे पाण्याच्या घागरींनी महासागराचे पाणी मोजण्यासारखे आहे, असा वरील उदाहरणाचा रोख आहे. या वाच्य निदर्शनेतून हयग्रीवाचे गुण अ-वर्णनीय आहेत असा, गुणांच्या वर्णनीयत्वाचा निषेध सूचित होत आहे.

निषेधालाच आक्षेप अलंकार समजावे असे आनंदवर्धनांचे मत दिसते. याउलट 'निषेधाचा आभास म्हणजे आक्षेप' असे माझे मत असल्यामुळे वरील उदाहरणात (ज्यात निषेधाचा आभास नसून निषेधच आहे) आक्षेपाचे नाव नाही अशी 'अलंकारसर्वस्व' कार रुय्यकाने टीका केली आहे. पण जगन्नाथपंडिताने आनंदवर्धनाची बाजू घेऊन रुय्यकाचा खरपूस समाचार घेतला आहे. तो रुय्यकास उद्देशून म्हणतो की, —निषेधाचा आभास म्हणजेच आक्षेप अशी काही वेदाची आज्ञा नव्हे, किंवा पूर्वीच्या काव्यशास्त्रकारांचेही तसे मत नाही, किंवा निषेधाभासालाच आक्षेप का म्हणावे याबाबत तू एखादे समर्थक कारणही दिले नाहीस. तसे काही असते, तर आम्ही ध्वनिकारांच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून तुझ्या म्हणण्यावर श्रद्धा ठेवली असती. वास्तविक याच्या उलटच करणे, म्हणजे तुझ्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून ध्वनिकारांच्या सांगण्यावरच श्रद्धा ठेवणे आम्हाला अधिक योग्य वाटते. कारण आलंकारिकांनी (काव्यशास्त्रकारांनी) ज्या मार्गाने जाणे योग्य आहे तो मार्ग जर कोणी व्यवस्थित दाखवला असेल, तर तो ध्वनिकारांनीच !

भामहाने **इष्टस्य प्रतिषेधः इव** म्हणजे निषेधाच्या आभासाला आक्षेप म्हटले

आहे. पण आनंदवर्धनांनी आक्षेपध्वनीचे जे उदाहरण दिले आहे, त्यावरून खराखुरा निषेध हाही आक्षेपच होय, असे त्यांचे मत दिसते. दण्डीनेही 'काव्यादर्शा' त (२–१२०) प्रतिषेधोक्तिराक्षेप: असे म्हटले आहे व पुढे मम्मटानेही, 'काव्य-प्रकाशा' त (पृ. ६५४) वक्तुमिष्टस्य निषेध: असे आक्षेपाची व्याख्या करिताना म्हटले आहे.

५. हयग्रीवाचे गुण असामान्य होते हे सांगण्याचा कवीचा उद्देश असल्याने 'त्याचे गुण अवर्णनीय आहेत' हा व्यंग्य आक्षेप येथे मुख्य आहे.

ध्वन्यालोकः

अर्थान्तरन्यासध्वनिः शब्दशक्तिमूलानुरणनरूपव्यङ्ग्योऽर्थशक्ति-मूलानुरणनरूपव्यङ्ग्यश्च सम्भवति । तत्राद्यस्योदाहरणम्–

देव्वाअत्तम्मि फले किं कीरउ एत्तिअं पुणो भणिमो ।
कंकेल्लिपल्लवाः पल्लवाणँ अण्णाण ण सरिच्छा ॥

पदप्रकाशश्चायं ध्वनिरिति वाक्यस्यार्थान्तरतात्पर्येऽपि सति न विरोधः ।

द्वितीयस्योदाहरणं यथा–

हिअअट्ठाविअमण्णुं अणरुट्ठ* मुहं हि मं पसाअंत ।
अवरद्धस्स वि ण हु दे बहुजाणअ रोसिउं सक्कं ॥
(हृदयस्थापितमन्युमरुष्टमुखीमपि मां प्रसादयन् ।
अपराद्धस्यापि न खलु ते बहुज्ञ रोषितुं शक्यम् ॥ इति च्छाया)

अत्र हि वाच्यविशेषेण सापराधस्यापि बहुज्ञस्य कोपः कर्तुम-शक्य इति समर्थकं सामान्यमन्वितमन्यत्तात्पर्येण प्रकाशते ।

ध्वन्यालोक

अर्थान्तरन्यास-ध्वनि दोन प्रकारचा असू शकतो– (१) शब्दशक्तिमूल अनुरणनासारखा व्यंग्यार्थ असलेला, व (२) अर्थशक्तिमूल अनुरणनासारखा व्यंग्यार्थ असलेला. त्यांपैकी पहिल्या (शब्दशक्तिमूल) प्रकाराचे उदाहरण–

"फळ" हे दैवाच्या अधीन असल्यामुळे काय करणार ? पण आम्ही

---

* काशी आवृत्तीमध्ये (पृ. २६७) 'अवरुण्ण मुहं' असा पाठ.

इतके म्हणतो की, तांबड्या अशोकाचे पल्लव दुसऱ्या वृक्षांच्या पल्लवांप्रमाणे नाहीत." [२]

हा ध्वनि 'फळ' या पदातून प्रकाशित होणारा असल्याने एकूण वाक्याचे तात्पर्य दुसऱ्या अर्थाकडे असले, तरी त्यामुळे ( या ध्वनीशी त्या दुसऱ्या अर्थाचा ) काही विरोध नाही.

"मी माझा राग माझ्या मनातच ठेवला आहे. तो माझ्या चेहऱ्यावर मी प्रकट केला नाही, तरीही तू मला प्रसन्न करून पाहात आहेस. तेव्हा तुला पुष्कळच कळते आहे ( असे दिसते ). तू अपराध केला असलास, तरी तुझ्यावर रागावणे शक्य नाही."

या श्लोकाच्या 'तुझ्यावर रागावणे शक्य नाही' या 'विशेष' स्वरूपाच्या वाच्यार्थाच्या सामर्थ्याने, 'ज्याला पुष्कळ कळते असा मनुष्य जरी अपराधी असला, तरी त्याच्यावर रागावणे अशक्य आहे' हा त्या विशेष स्वरूपाच्या अर्थाशी समर्थक म्हणून संबद्ध असलेला 'सामान्य' स्वरूपाचा दुसरा अर्थ, प्रधानत्वाने सूचित होत आहे.[3]

लोचनम्

सम्भवतीत्यनेन प्रसङ्गाच्छब्दशक्तिमूलस्यात्र विचार इति दर्शयति ।

दैवायत्ते फले किं क्रियतामेतावत्पुनर्भणामः ।
रक्ताशोकपल्लवाः पल्लवानामन्येषां न सदृशाः ॥

अशोकस्य फलमाम्रादिवन्नास्ति, किं क्रियतां, पल्लवास्त्वतीव हृद्या इतीयताभिधा समाप्तैव । अत्र फलशब्दस्य शक्तिवशात्समर्थकमस्य वस्तुनः पूर्वमेव प्रतीयते, लोकोत्तरजिगीषातदुपायप्रवृत्तस्यापि हि फलं सम्पल्लक्षणं दैवायत्तं कदाचिन्न भवेदपीत्येवंरूपं सामान्यात्मकम् । नन्वस्य सर्ववाक्यस्याप्रस्तुतप्रशंसा प्राधान्येन व्यङ्ग्या तत्कथमर्थान्तरन्यासस्य व्यङ्ग्यता, द्वयोर्युगपदेकत्र प्राधान्यायोगादित्याशङ्क्याह– पदप्रकाशोऽति । सर्वो हि ध्वनिप्रपञ्चः पदप्रकाशो वाक्यप्रकाशश्चेति वक्ष्यते । तत्र फलपदेऽर्थान्तरन्यासध्वनिः प्राधान्येन । वाक्ये त्वप्रस्तुतप्रशंसा । तत्रापि पुनः फलपदोपात्तसमर्थ्यसमर्थकभावप्राधान्यमेव भातीत्यर्थान्तरन्यासध्वनिरेवायमिति भावः ।

हृदये स्थापितो न तु बहिः प्रकटितो मन्युर्यया । अत एवाप्रदर्शितरोषमुद्रामपि मां प्रसादयन् हे बहुज्ञ, अपराद्धस्यापि तव न खलु रोषकरणं शक्यम् । अत्र बहुज्ञेत्यामन्त्रणार्थो विशेषे पर्यवसितः । अनन्तरं तु तदर्थपर्यालोचनाद्यत्सामान्यरूपं समर्थकं प्रतीयते तदेव चमत्कारकारि । सा हि खण्डिता सती वैदग्ध्यानुनीता तं प्रत्यसूयां दर्शयन्तीत्थमाह । यः कश्चिद्बहुज्ञो धूर्तः स एवं सापराधोऽपि स्वापराधावकाशमाच्छादयतीति मा त्वमात्मनि बहुमानं मिथ्या ग्रहीरिति । अन्वितमिति । विशेषे सामान्यस्य संबद्धत्वादिति भावः ।

लोचन

'असू शकतो' असे म्हणण्यामुळे शब्दशक्तिमूल अर्थान्तरन्यासध्वनीचा विचार येथे जाता जाता केला जात आहे असे वृत्तिकार दर्शवितात. 'फळ हे दैवाच्या' इ. — 'आम्र वगैरे वृक्षांना असते, त्याप्रमाणे अशोक वृक्षाला फळ नसते. त्याला कोण काय करणार? पण अशोकाचे पल्लव मात्र कमालीचे मोहक असतात.' इतक्या अर्थाचा बोध करून दिल्यावर ( गाथेतील शब्दांच्या ) अभिधेचे काम संपलेच. त्यानंतर या पद्याच्या वाच्यार्थाचे समर्थन करणारा ( कर्माचे फळ ) हा जो सर्वसामान्य स्वरूपाचा अर्थ आहे, तो पद्याच्या पूर्वार्धातच सांगितल्याचे लक्षात येते. अलौकिक विजय मिळविण्याची महत्त्वाकांक्षा मनात धरून त्या विजयप्राप्तीचे उपाय योजण्यास प्रवृत्त झालेल्यालाही त्यांचे, वैभव या स्वरूपाचे फळ दैवाच्या अधीन असल्याने एखाद्या वेळी मिळणारही नाही, हा तो सर्वसामान्य स्वरूपाचा अर्थ होय.[४]

'पण काय हो, ही सर्वच गाथा मुख्यतया 'अप्रस्तुतप्रशंसा' हा अलंकार सूचित करीत आहे,[५] मग येथे अर्थान्तरन्यास (प्रधानत्वाने) व्यंग्य कसा असेल ? कारण, एका उदाहरणात दोन अलंकार एकाच वेळी मुख्य कसे असू शकतील ?' या शंकेचे उत्तर वृत्तिकार 'पदातून प्रकाशित होणारा' इ. शब्दांनी देतात. कारण, ध्वनीचे सर्वच प्रकार पदप्रकाश व वाक्यप्रकाश या दोन प्रकारचे असतात हे पुढे[६] सांगण्यात येईल. त्या दोन प्रकारांपैकी वरील उदाहरणातील 'फल' या (द्व्यर्थबोधक) शब्दानेच अर्थान्तरन्यासध्वनि प्राधान्याने प्रकाशित होतो. वाक्यातून मात्र अप्र-

स्तुतप्रशंसा (प्राधान्याने प्रकाशित होते[७]). पण त्या दोहोंतही 'फल' या द्वयर्थबोधक शब्दाने सूचित होणारा समर्थ्य-समर्थकसंबंध हाच अधिक उत्कटत्वाने प्रत्ययास येत असल्याने हे उदाहरण अर्थान्तरन्यास-ध्वनीचेच होय, हा भावार्थ.

'जिने आपला राग मनातच ठेविला आहे, बाहेर दाखविला नाही, अशा मला. म्हणूनच मी माझ्या चेहऱ्यावर माझा राग प्रकट केला नसतानाही मला प्रसन्न करू पाहणाऱ्या हे धूर्त प्रियकरा ! तू माझ्याशी (बेइमानीपणाचा) अपराध केला असलास तरी मला तुझ्यावर खरो-खर रागावणे शक्य होत नाही.' या ठिकाणी हे धूर्ता (पुष्कळच समजू शकणाऱ्या)! या संबोधनामुळे वरील उदाहरणातील एकूण अर्थाला पर्यवसानी विशिष्ट अर्थाचे स्वरूप प्राप्त होत आहे. पण त्यानंतर मात्र विशिष्ट व्यक्तीला उद्देशून असलेला तो अर्थ लक्षात घेतल्यामुळे त्याचे समर्थन करणारा जो सामान्य स्वरूपाचा व्यंग्य अर्थ प्रतीत होतो, तोच चमत्कार वाटावयास लावणारा आहे. कारण ती नायिका प्रणयाच्या बाबतीत वंचित झाल्यामुळे तो चतुरपणाने तिची मनधरणी करू पाहात आहे, म्हणून ती त्याच्याविषयीचा आपला तिरस्कार प्रकट करण्यासाठी त्याला पुढीलप्रमाणे म्हणत आहे – ज्या कोणा लबाडाला पुष्कळ समजते, तो प्रेयसीचा अपराध करूनही आपल्या अपराधावर असेच[८] पांघरूण घालीत असतो; तेव्हा आपणच फार समजदार आहोत असा (खोटा) मोठेपणा तू आपल्याकडे घेऊ नकोस.[९] 'संबद्ध असलेला'–कारण सामान्य स्वरूपाच्या अर्थाचा विशेष स्वरूपाच्या अर्थाशी समर्थक म्हणून संबंध असतो, हा भावार्थ.

टीपा

१. अशोक वृक्षाला आंबा वगैरेंप्रमाणे फळच नसते. काय करणार ? पण त्याची पालवी मात्र कमालीची मनोहर असते, या वाच्यार्थाचा बोध करून दिल्यावर अभिधेचे काम संपते. मग 'फळ' हा शब्द द्वयर्थी असल्याने वरील वाच्यार्थाशिरीज दुसरा, 'सामान्य' स्वरूपाचा अर्थ– 'लोकोत्तर विजय मिळवण्याच्या इच्छेने त्याच्या प्राप्तीसाठी प्रयत्न करणारासही वैभवरूपी फळ दैवाधीन असल्याने एखादे वेळी मिळतही नाही' असा– लगेच सूचित होतो. तो वाच्यार्थाचे समर्थन करणारा असल्याने येथे

'अर्थान्तरन्यास' हा अलंकार सूचित होतो.

२. गाथासप्तशती, ३– ७९ मध्ये पुढीलप्रमाणे पाठ आहे– कंकेल्लिपल्लवाणं ण पल्लवा होंति सारिच्छा.

३. अवमानित नायिकेला नायकाने आपल्या चातुर्याने प्रसन्न केल्यावर त्याच्या-बद्दलची आपली असूया प्रकट करीत ती असे सुचवीत आहे की, ज्यांना पुष्कळ समजते अशी सगळीच धूर्त माणसे आपला अपराध असाच दडवून ठेवतात व त्यामुळे तुलाच आपल्या करामतीबद्दल फार अभिमान वाटायला नको आहे. येथे 'पुष्कळ कळणारा' अशा अर्थाचे सम्बोधन वापरले आहे, त्यामुळे नायकाला लागू पडणारा 'विशेष' स्वरूपाचा अर्थ वाच्य आहे व 'ज्यांना पुष्कळ कळते अशी सगळीच धूर्त माणसे… …' इ. सामान्य स्वरूपाचा अर्थ सूचित होत आहे. मग त्या सामान्याने पहिल्या विशेषाचे होणारे समर्थनही सूचित होत असल्याने येथे सर्व वाक्यातून अर्थान्तरन्यास-ध्वनि प्रकाशित होत आहे.

४. 'ध्वनिगाथापञ्जिका' या ग्रन्थाच्या हस्तलिखितामध्ये लोचनातील या वाक्यानंतर तस्मादर्थान्तरन्यासध्वनिरेवायम् असे वाक्य आहे. त्याचा अर्थ – म्हणून या पद्यात अर्थान्तरन्यास हा अलंकारच प्रधानत्वाने सूचित झाला.' लोचनातील वाक्यानंतरच हे वाक्य असल्यामुळे मूळ लोचनातही हे वाक्य असण्याची शक्यता आहे. (पाहा, ध्वनिगाथापञ्जिका, भांडारकार प्राच्य-विद्यासंशोधनमंदिर, हस्तलिखितांची सूचि, खंड १२, क्रमाङ्क १८२).

५. कारण येथे अशोकवृक्ष या अप्रस्तुताच्या वर्णनावरून एखाद्या थोर व्यक्तीला, योग्य प्रयत्न करूनही आलेले अपयश हा प्रस्तुत अर्थ सुचविला जात आहे.

६. पुढे, म्हणजे उद्द्योत ३, कारिका १ व २ यांमध्ये.

७. मागे पृ. २०९ वर आनंदवर्धनांनी अप्रस्तुतप्रशंसेच्या ज्या उदाहरणात सूचित प्रस्तुत अर्थ प्रधान असेल, ते ध्वनीचे उदाहरण समजावे असे म्हटले होते. अप्रस्तुतप्रशंसा या अलंकारामध्ये वाच्यार्थ अप्रस्तुत असल्यामुळे प्रस्तुत असलेला सूचित अर्थ हा अप्रस्तुत असलेल्या वाच्यार्थाच्या सिद्धीसाठी खर्ची पडतो, म्हणून ते उदाहरण (वाच्यसिद्ध्यंग) गुणीभूतव्यंग्याचे होय. पण ज्या उदाहरणात वाच्यार्थ प्रस्तुतच असून त्यामुळे प्रथम एक अप्रस्तुत अर्थ सूचित होतो व त्या सूचित अप्रस्तुत अर्थामुळे दुसरा प्रस्तुत अर्थ सूचित होतो, त्याच उदाहरणात सबंध 'अप्रस्तुत- प्रशंसा' अलंकार प्रधानत्वाने सूचित होतो. म्हणून तेथे अप्रस्तुतप्रशंसा अलंकाराचा ध्वनि असतो असे मानावे.

वरील 'हे फळ हे दैवाच्या अधीन' इ. उदाहरणात रक्ताशोक वृक्षाच्या जवळच असलेली एखादी व्यक्ति बोलत आहे अशी परिस्थिति असल्यास रक्ता-

शोकाचा वृत्तान्त हा 'प्रस्तुत' होतो. त्यावरून ! प्रयत्न करून अयशस्वी होणाऱ्या कोणाही थोर पुरुषाची हकीकत हा अप्रस्तुत अर्थ सुचविला जातो व त्यावरून या प्रकारच्या कोणातरी विशिष्ट 'प्रस्तुत' व्यक्तीची हकीकत सूचित केली जात असते. म्हणून ते अप्रस्तुतप्रशंसालङ्कारध्वनीचे उदाहरण होय. या अप्रस्तुतप्रशंसालङ्कारध्वनीचा विषय पुढे लोचनात काशी आवृत्ति, पृ. २७४–२७५ येथे कुंकल्लं-तो इ. उदाहरणाच्या अनुषंगाने विवेचिला आहे.

८, असेच, म्हणजे तू जसे घालीत आहेस, तसेच.

९. म्हणजे मी तुझ्यावर रागवावे इतक्याही लायकीचा तू नाहीस, हे तात्पर्य.

ध्वन्यालोकः

व्यतिरेकध्वनिरप्युभयरूपः सम्भवति । तत्राद्यस्योदाहरणं प्राक्प्रदर्शितमेव । द्वितीयस्योदाहरणं यथा–

जाएज्ज वणुद्देसे खुज्जो च्चिअ पाअवो गलिअवत्तो । *
मा माणुसम्मि लोए चाएक्करसो दरिद्दो अ ॥
[ जायेय वनोद्देशे कुब्ज एव पादपो गलितपत्रः ।
मा मानुषे लोके त्यागैकरसो दरिद्रश्च ॥ इति च्छाया । ]

अत्र हि त्यागैकरसस्य दरिद्रस्य जन्मानभिनन्दनं त्रुटितपत्रकुब्जपादपजन्माभिनन्दनं च साक्षाच्छब्दवाच्यं तथाविधादपि पादपात्तादृशस्य पुंस उपमानोपमेयत्वप्रतीतिपूर्वकं शोच्यतायामाधिक्यं तात्पर्येण प्रकाशयति ॥

उत्प्रेक्षाध्वनिर्यथा–

चन्दनासक्तभुजगनिःश्वासानिलमूर्च्छितः ।
मूर्च्छयत्येष पथिकान् मधौ मलयमारुतः ॥

अत्र हि मधौ मलयमारुतस्य पथिकमूर्च्छाकारित्वं मन्मथोन्माथदायित्वेनैव । तत्तु चन्दनासक्तभुजगनिःश्वासानिलमूर्च्छितत्वेनोत्प्रेक्षितमित्युत्प्रेक्षा साक्षादनुक्तापि वाक्यार्थसामर्थ्यादनुरणनरूपा

---

* काव्यानुशासन, पृ. ७८ व व्यक्तिविवेक पृ. १४८ वर सडिअपत्तो असा पाठ.

लक्ष्यते। न चैवंविधे विषये इवादिशब्दप्रयोगमन्तरेणासम्बद्धतैवेति शक्यते वक्तुम्। गमकत्वादन्यत्रापि तदप्रयोगे तदर्थावगतिदर्शनात्।
यथा–

ईसाकलुसस्स वि तुह मुहस्स णं* * एस पुण्णिमाचंदो।
अज्ज सरिसत्तणं पाविऊण अंगे च्चिअ ण माइ॥
[ ईर्ष्याकलुषस्यापि तव मुखस्य नन्वेष पूर्णिमाचन्द्रः।
अद्य सदृशत्वं प्राप्याङ्ग एव न माति॥ ] इति च्छाया।

यथा वा–

त्रासाकुलः परिपतन् परितो निकेतान्
पुंभिर्न कैश्चिदपि धन्विभिरन्वबन्धि।
तस्थौ तथापि न मृगः क्वचिदङ्गनाभि –
राकर्णपूर्णनयनेषुहतेक्षणश्रीः॥
शब्दार्थव्यवहारे च प्रसिद्धिरेव प्रमाणम्।

ध्वन्यालोक

'व्यतिरेकध्वनि' देखील दोन्ही (शब्दशक्तिमूल व अर्थशक्तिमूल) प्रकारचा संभवतो. त्यांपैकी पहिल्याचे उदाहरण पूर्वी (सूर्याचे जे किरण.... वगैरे, पृ. ४९३ वर) दिलेच आहे. दुसऱ्या (अर्थशक्तिमूल) प्रकाराचे उदाहरण पुढीलप्रमाणे–

'एक वेळ एखाद्या वनप्रदेशात मी एखादा पाने गळून गेलेला, पोक आलेला, वेडावाकडा वृक्ष म्हणून जन्माला आलो तरी चालेल, पण या मानव-लोकात केवळ दानच करण्याची ओढ असलेला आणि दरिद्री म्हणून जन्माला येणे नको.'

या उदाहरणात दानाचीच ओढ असणाऱ्या दरिद्र्याचा जन्म नको असणे व पाने गळून पडलेल्या वाकड्यातिकड्या वृक्षाचा जन्म मान्य असणे हा अर्थ प्रत्यक्ष शब्दांनीच वाच्य आला आहे. व तो वाच्य अर्थ तशा प्रकारच्या वृक्षाशी तशा प्रकारच्या माणसाचे प्रथम साम्य सुचवून मग त्या वृक्षाच्या

* * काव्यानुशासन, पृ. २६, नणु व कल्पलताविवेक पृ. १४९, णणु असा पाठ.

अवस्थेपेक्षा त्या माणसाची अवस्था अधिक शोचनीय आहे या व्यंग्य अर्थाला प्रकाशित करितो.

'उत्प्रेक्षा' ध्वनीचे उदाहरण पुढीलप्रमाणे —

"चन्दनवृक्षांना कवटाळून बसलेल्या सर्पांच्या निःश्वासांच्या झोतांमुळे मूर्च्छित झालेला (१. वाढलेला, २. मूर्च्छा आलेला) मलयपर्वताकडचा वारा वसंतऋतुत वाटसरांना बेशुद्ध करितो."

या उदाहरणातल्या वाटसरांना मलयाकडील वारा वसंतऋतुत मूर्च्छित करितो, ते वस्तुतः त्यांना तो मदनव्यथेने व्याकुळ करितो, म्हणूनच ! पण ते मूर्च्छित करणे चन्दनाला वेटोळे घातलेल्या सर्पांचे ( विषारी ) निःश्वास त्यात मिसळल्यामुळे आहे, ही उत्प्रेक्षा [२] 'जणू काय' वगैरेसारख्या शब्दांनी प्रत्यक्ष वाच्य केली नसली, तरी संपूर्ण वाक्यार्थाच्या सामर्थ्याने वाच्यार्थाच्या मागाहून अनुरणनाप्रमाणे प्रकट होते. आणि अशा उदाहरणात 'जणू काय' वगैरे शब्द वापरले नसतील तर 'चन्दनवृक्षांना कवटाळून मूर्च्छित झालेला' इ. विशेषण निरर्थकच ठरेल असे म्हणता येत नाही, [३] 'कारण, इतर उदाहरणांतही तसे ( म्हणजे 'जणू काय इ. ) शब्द न वापरताही व्यंजनेमुळे तसा अर्थ समजतो, असे आढळते. उदा.— तुझे मुख ईर्ष्येमुळे मलिन झाले आहे, म्हणूनच केवळ, हा पौर्णिमेचा चन्द्र आज त्या मुखाच्या बरोबरीला आला व त्यामुळे तो स्वतःच्या शरीरातही मावत नाही !' [४]

किंवा जसे—

"भयाने व्याकुळ झालेला हरिण राहुट्यांच्या आसपास धावतच होता. कोणीही धनुर्धारी पुरुष त्याच्या मागे लागलेले नसतानाही तो कोठेच थांबला नाही. ( कारण ) त्याच्या डोळ्यांच्या सौंदर्याला सुंदरींच्या कानांपर्यंत ( पसरलेल्या ) ताणलेल्या नयनबाणांनी पार घायाळ करून टाकले ( मागे टाकले ) होते."[५]

( हे व्यंग्य उत्प्रेक्षेचे उदाहरण आहे ), कारण शब्दांचे अर्थ असे लावावेत की नाही ( म्हणजे 'जणू काय' वगैरे शब्द वापरले नसताना ते कवीला अभिप्रेत आहेत असे गृहीत धरून अर्थ लावावा की नाही ) याबाबत 'प्रसिद्धी' ( म्हणजे सहृदयांच्या मनाचा कौल ) हाच प्रमाणभूत समजावा. [६]

व्यतिरेकध्वनिरपीति । अपिशब्देनार्थान्तरन्यासवदेव द्विप्रकारत्वमाह । प्रागिति । 'खं येऽत्युज्ज्वलयन्ति' इति । 'रक्तस्त्वं नवपल्लवैः' इति । जायेय, वनोद्देश एव वनस्यैकान्ते गहने यत्र स्फुटतरबहुवृक्षसंपत्त्या प्रेक्षतेऽपि न कश्चित् । कुब्ज इति रूपघटनादावनुपयोगी ।* गलितपत्र इति । छायामपि न करोति तस्य का पुष्पफलवत्तेत्यभिप्रायः ।† तादृशोऽपि कदाचिदाङ्गारिकस्योपयोगी भवेदुलूकादीनां वा निवासायेति भावः । मानुष इति । सुलभार्थिजन इति भावः । लोक इति । यत्र लोक्यते सोऽर्थिभिस्तेन चार्थिजनो, न च किञ्चिच्छक्यते कर्तुं तन्महद्वैशसमिति भावः। अत्र वाच्यालङ्कारो न कश्चित् । उपमानेत्यनेन व्यतिरेकस्य मार्गपरिशुद्धिं करोति ।

आधिक्यमिति । व्यतिरेकमित्यर्थः ।

उत्प्रेक्षितमिति । विषवातेन हि मूर्च्छितो बृंहित उपचितो मोहं करोति । एकश्च मूर्च्छितः पथिकमध्येऽन्येषामपि धैर्यच्युतिं विदधन्मूर्च्छां करोतीत्युभयथोत्प्रेक्षा ।

नन्वत्र विशेषणमधिकीभवद्धेतुतयैव सङ्गच्छते । ततः किम् ? न हि हेतुता परमार्थतः । तथापि तु हेतुता उत्प्रेक्ष्यत इति यत्किञ्चिदेतत् । तदिति । तस्येवादेरप्रयोगेऽपि तस्यार्थस्येत्युत्प्रेक्षारूपस्यावगतेः प्रतीतेर्दर्शनात् । एतदेवोदाहरति – यथेति । ईर्ष्याकलुषस्यापीषदरुणच्छायाकस्य । यदि तु प्रसन्नस्य मुखस्य सादृश्यमुद्वहेत् सर्वदा वा तत्किं कुर्यात् । त्वन्मुखं त्वेतद्भवतीति मनोरथानामप्यपथमिदमित्यपिशब्दस्याभिप्रायः । अङ्गे स्वदेहे न मात्येव दशदिशः पूरयति यतः । अद्यतया कालेनैकं दिवसमात्रमित्यर्थः । अत्र पूर्णचन्द्रेण दिशां पूरणं स्वरससिद्धमेवमुत्प्रेक्ष्यते ।

ननु ननुशब्देन वितर्कोत्प्रेक्षारूपमाचक्षाणेनासंबद्धता निराकृतेति सम्भावयमान उदाहरणान्तरमाह । यथा वेति । परितः सर्वतः निकेतान् परिपतन्नाक्रामन् न कैश्चिदपि चापपाणिभिरसौ मृगोऽनुबद्धस्तथापि न

---

* कल्पलताविवेक, पृ. १४८ येथे रूपकघटना ... असा पाठ.

† काव्यानुशासन, पृ. ७९ व कल्पलताविवेक, पृ. १४८ येथे पुष्पफलवार्ता असा पाठ आहे.

क्वचित्तस्थौ, त्रासचापलयोगात्स्वाभाविकादेव। तत्र चोत्प्रेक्षा ध्वन्यते– अङ्गनाभिराकर्णपूर्णैर्नेत्रशरैर्हृता ईक्षणश्री: सर्वस्वभूता यस्य यतोऽतो न तस्थौ। नन्वेतदप्यसम्बद्धमस्त्वित्याशङ्क्याह् – शब्दार्थेति।

लोचन

'व्यतिरेकध्वनि' देखील–यातील 'देखील' या शब्दाने व्यतिरेक-ध्वनीचेही अर्थान्तरन्यासध्वनीप्रमाणेच (शब्दशक्तिमूल व अर्थशक्तिमूल असे) दोन प्रकार आहेत असे वृत्तिकार सांगतात. पूर्वीचे म्हणजे (पृ. ४९३ वरील) 'सूर्याचे जे किरण' हे (शब्दशक्तिमूल ध्वनीचे उदाहरण होय) आणि (पृ. ४४८ वरील) 'तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे' (हे नव्हे).[७] 'जन्माला आलो तरी चालेल', वनप्रदेशातच (म्हणजे) वनाच्या दाट झाडीच्या एका भागात की जेथे सहज डोळ्यात भरणाऱ्या पुष्कळ वृक्षांच्या दाटीमुळे (माझ्याकडे) कोणी पाहणारही नाही. वेडावाकडा म्हणजे उपयुक्त किंवा शोभेच्या वस्तु निर्माण करावयास उपयोगी नसलेला. पाने गळून गेलेला–म्हणजे जो सावलीदेखील देऊ शकत नाही, तो फुले किंवा फळे देण्याची गोष्टच नको, हा आशय. पण तसा असला तरीसुद्धा तो एखाद्या वेळी कोळसेवाल्याच्या उपयोगी पडू शकेल किंवा त्याच्यावर घुबडे वगैरे वास्तव्य करू शकतील, (आणि त्यामुळे तरी त्याच्या जन्माचे सार्थक होईल) हा भावार्थ. 'मानव' ... ...इ. म्हणजे जेथे याचकलोक जागोजाग भेटतात अशा, असा आशय. लोकात म्हणजे ज्या ठिकाणी तो याचकांकडून अवलोकिला जातो, आणि याचक त्याच्याकडून अवलोकिले जातात, पण त्याला त्यांच्यासाठी काहीही करिता तर येत नाही, ही गोष्ट फार हृदयविदारक आहे असा अभिप्राय. या पद्यात वाच्य–अलंकार कोणताही नाही. 'साम्य सुचवून' या शब्दांनी वृत्तिकार वरील उदाहरणातील व्यति-रेक अलंकाराच्या अस्तित्वाची पूर्वतयारी करितात. (शोचनीयतेचा) 'अधिकपणा' म्हणजेच व्यतिरेक.

'ही उत्प्रेक्षा'–कारण विषारी निःश्वासांनी मूर्च्छित झालेला, म्हणजे वृद्धि पावलेला, म्हणजे पुष्ट झालेला (मलयपर्वताकडील वारा वाटसरांना) मूर्च्छित करितो (ही एक उत्प्रेक्षा आणि) 'मूर्च्छित'

झालेल्या मलयमारुताला पाहूनही वाटसरू गलितधैर्य होऊन मूच्छित होतात[९] अशा दोन्ही प्रकारांनी येथे उत्प्रेक्षा व्यंग्य आहे.

शंका–पण काय हो, येथे पहिल्या ओळीतील मलयमारुताचे विशेषण हे अनावश्यक[१०] असल्याने ते मूर्छेचे कारण म्हणून मानले, तरच सुसंगत होते.

उत्तर–तर मग तुम्हाला काय सिद्ध करावयाचे आहे ? कारण येथे वाऱ्याचे मूच्छित होणे हे काही वाटसरांना मूर्च्छा येण्याचे खरेखुरे कारण नव्हे. पण तरीही ते कारण आहे अशी येथे कवीने कल्पना केली आहे. म्हणून हे तुमचे म्हणणे काहीतरीच[११] आहे. 'तसे' इ. – तसे शब्द म्हणजे 'जणू काय' वगैरेसारखे शब्द वापरले नसले तरीही तो उत्प्रेक्षारूपी अर्थ ज्ञात झालेला म्हणजे प्रतीत झालेला दिसतो. याचेच[१२] उदाहरण 'उदा. तुझे मुख' इ. शब्दांनी वृत्तिकार देतात. 'ईर्ष्येमुळे मलिन झालेले' म्हणजे तांबूसपणाची किंचित् छटा प्राप्त झालेले. पण जर या पूर्णिमाचंद्राला प्रसन्न असलेल्या तुझ्या मुखाचे साम्य प्राप्त झाले तर किंवा (पौर्णिमेच्या ऐवजी) तो नेहमीच तुझ्या प्रसन्न मुखासारखा झाला, तर तो काय करील[१३] (हे सांगता येत नाही.) तो ह्या तुझ्या मुखाशी तादात्म्य पावेल ही गोष्ट चंद्राच्या (किंवा कोणाच्याही) कल्पनेच्या पलीकडची आहे हा अपि (म्हणजे 'केवळ') या शब्दामागील सूचितार्थ आहे.[१४] 'अंगात' म्हणजे स्वतःच्या शरीरात मावतच नाही, कारण तो आपल्या प्रकाशाने दाही दिशा व्यापून टाकतो. आज म्हणजे इतक्या अवधीनंतर केवळ एका दिवसा-पुरतीच (त्याला तुझ्या मुखाची बरोबरी करिता आली), हा आशय. या ठिकाणी पूर्णचन्द्राने दिशा व्यापणे ही घटना वास्तविक असून तिच्यावर (तो आनंदातिशयामुळे आपल्या शरीरात मावत नाही अशी) कवीने उत्प्रेक्षा केली आहे.

पण काय हो, (वरील उदाहरणातील) ननु हा शब्द 'वितर्क' हे स्वरूप असलेल्या उत्प्रेक्षेचा वाचक आहे, म्हणून या गाथेतील (चंद्र आपल्या शरीरात मावत नाही या विधानातील) असंबद्धता (म्हणजे तर्कदुष्टता) दूर होते, अशी कोणीतरी शंका घेणे शक्य आहे अशा अभिप्रायाने वृत्तिकार 'किंवा जसे' असे म्हणून निराळे उदाहरण देतात.

'राहुटयांच्या आसपास' म्हणजे सर्व बाजूंनी धावत म्हणजे वेगाने पळत राहिला. कोणीही धनुर्धर त्याचा पाठलाग करीत नव्हते, तरीही तो कोठेही थांबला नाही, याचे कारण भित्रेपणा व चंचलपणा हा त्याचा स्वभावच होता हे होय. त्या वस्तुस्थितीवर कवीने केलेली उत्प्रेक्षा पुढीलप्रमाणे सूचित होत आहे. (छावणीतल्या सैनिकांच्या) सुंदर रमणींनी आपल्या कानांपर्यंत पसरलेल्या नयनबाणांनी त्या हरिणाचे सौंदर्यसर्वस्व असलेले नेत्रसौंदर्य पराभूत केले होते, म्हणून तो एके-जागी थांबला नाही. पण काय हो, ही कल्पनाही तर्कदुष्ट आहे[५] अशी कोणी शंका घेईल असे वाटून वृत्तिकार कारण शब्दाचे अर्थ इ. शब्दांनी त्या शंकेचे समाधान करितात.

टीपा

१. 'गाथासप्तशती,' ३–३०.

२. एखाद्या घटनेचे कारण जर कविकल्पित असले तर ते हेतूत्प्रेक्षेचे उदाहरण होय. येथे मलयाकडचा वारा सर्पांच्या निःश्वासामुळे 'मूर्च्छित' (बेशुद्ध) झाल्याने (वाटसरू बेशुद्ध झाले) हे कारण सर्वस्वी कल्पित आहे.

३. हे वाच्य विशेषण निरर्थक नाही, म्हणजे त्याचा अर्थ पूर्णपणे संभवनीय आहे.

४. येथे चन्द्राची प्रभा पौर्णिमेच्याच दिवशी सर्व दिशांना व्यापून टाकते या (स्वाभाविक) घटनेचे कारण मुखाची बरोबरी आज तरी मला करायला मिळाली म्हणून त्या चन्द्राला हर्ष हे होय. हे कारण अर्थात कल्पिलेले, म्हणून ही हेतूत्प्रेक्षा ('जणू काय' वगैरे शब्द न वापरताच) येथे सुचवली आहे.

५. येथे तो मृग स्वाभाविकपणेच घाबरल्यामुळे व अंगच्या चपळपणामुळे थांबला नाही. पण त्याच्या न थांबण्याचे कारण 'सुंदरींच्या नयनबाणांनी त्याच्या डोळयांचे सौन्दर्य फिके पाडले' हे कल्पिलेले आहे आणि 'जणू काय' वगैरे शब्द वापरले नसल्याने ही उत्प्रेक्षा सूचित आहे.

६. तुलनार्थ पाहा, अभिज्ञानशाकुन्तल, १–१२ मधील **सतां हि संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमन्तःकरणप्रवृत्तयः।** हा उत्तरार्ध.

७. लोचनात **रक्तस्त्वं नवपल्लवैरिति** इतकेच म्हटले आहे, 'हे नव्हे' या अर्थाचे शब्द त्यात नाहीत. म्हणून बालप्रियेने (काशी आवृत्ति, पृ. २६९) हा पाठ प्रामादिक आहे यास्तव तो गाळावा किंवा न तु अशा शब्दांची

त्यात भर घालावी असे म्हटले आहे. 'तू तुझ्या कोवळ्या पालवीमुळे' हे उदाहरण व्यतिरेकध्वनीचे होऊ शकणार नाही, कारण त्यातील चौथ्या चरणातील व्यतिरेक हा व्यंग्य नसून वाच्य आहे.

८. म्हणजे लोचनात पृ. ५२९ वर सांगितलेल्या तीन प्रकारांपैकी हा तिसरा, म्हणजे वाच्य अलंकार कोणताही नसताना कोणतातरी अलंकार प्रामुख्याने सूचित होणे.

९. मलयमारुत हा सर्पांच्या विषाने जणू काय परिपुष्ट (मूर्च्छित) झाला आहे ही एक व्यंग्य उत्प्रेक्षा आणि मलयमारुताला भोवळ आलेली पाहून वाटसरूंनाही भोवळ येते ही दुसरी व्यंग्य उत्प्रेक्षा.

१०. दुसऱ्या ओळीतील अर्थाच्या दृष्टीने पहिल्या ओळीतील विशेषण हे अनावश्यक वाटते (कारण, केवळ मलयमारुत हा विरही वाटसरूंना मूर्च्छित करण्यास पुरेसा आहे), पण तरीसुद्धा ते विशेषण वरील श्लोकात वापरले तर आहे! ते का, याचे समर्थन ते दुसऱ्या ओळीतील घटनेचे कारण म्हणून कल्पिले आहे असे समजावे लागते. अशा रीतीने या श्लोकातील व्यंग्य उत्प्रेक्षा ही वाच्य अर्थाच्या समर्थनासाठी खर्ची पडत असल्याने वाच्यसिद्ध्यंग गुणीभूतव्यंग्याचे उदाहरण आहे, उत्प्रेक्षाध्वनीचे नाही, असे पूर्वपक्ष्याचे म्हणणे.

११. पूर्वपक्ष्याचे म्हणणे असे आहे की, प्रस्तुत पद्यातील पहिल्या ओळीतल्या विशेषणाचे समर्थन करण्यासाठी व्यंग्य उत्प्रेक्षा खर्ची पडत असल्यामुळे हे 'वाच्यसिद्ध्यंगव्यंग्य' या प्रकारच्या गुणीभूतव्यंग्याचे आहे, उत्प्रेक्षाध्वनीचे नव्हे. त्यावर अभिनवगुप्तांनी दिलेले 'मूर्च्छा येण्याचे खरेखुरे कारण नव्हे' हे उत्तर समर्पक वाटत नाही. कारण 'हे खरेखुरे कारण नाही' हे पूर्वपक्ष्यालाही मान्य असलेच पाहिजे. तो येथें व्यंग्य उत्प्रेक्षा आहे असे मानतोच. फक्त ती व्यंग्य उत्प्रेक्षा गुणीभूत आहे इतकेच त्याचे म्हणणे दिसते. वस्तुतः अभिनवगुप्तांनी असे म्हणावयास पाहिजे होते – सर्पांच्या निःश्वासांची भर मलयानिलामध्ये पडल्यामुळे त्या मलयानिलाचे मूर्च्छा उत्पन्न करण्याचे सामर्थ्य थोडे फार वाढले आहे ही वस्तुस्थिती आहे. म्हणून पहिल्या ओळीचा अर्थ हा स्वयंपूर्ण आणि सुसंगत असल्यामुळे तो अर्थ दुसऱ्या ओळीतील अर्थाचे कारण म्हणून मानला, तरच सुसंगत ठरतो असे नाही, यास्तव व्यंग्य उत्प्रेक्षा ही स्वतंत्रपणे अस्तित्वात येत असल्यामुळे येथे 'उत्प्रेक्षा-ध्वनि'च आहे, अशासारखे उत्तर अधिक समर्पक झाले असते.

१२. याचेच म्हणजे 'जणू काय' वगैरेसारखे शब्द नसताही उत्प्रेक्षा सूचित होऊ शकते, याचे.

१३. म्हणजे हर्षाने किती वेडा होऊन जाईल.

१४. म्हणजे अपि या शब्दाचा संबंध फक्त 'ईर्ष्याकलुष' या शब्दाशीच नसून साबृश्यम् या शब्दाशीही आहे असा अभिनवगुप्तांच्या या विवरणामागील अर्थ दिसतो. म्हणजे 'तुझे मुख मलिन झालेले असतानाच आणि या चंद्राला त्याच्याशी केवळ पौर्णिमेच्या रात्री नुसते साम्यच प्राप्त झाले असताना त्याचा आनंद गगनात मावत नाही. मग त्या चंद्राने आपला कलंक नाहीसा करून प्रत्येक दिवशी तुझ्या मुखाशी तादात्म्य प्राप्त करून घेतले, तर त्याची अवस्था काय होईल कोण जाणे.'

१५. सुंदर रमणींचे नेत्रबाण हरिणाला घायाळ करितात ही कल्पना असंभवनीय आहे, म्हणून ती कल्पना सोडूनच द्या; तिचे समर्थन करण्याच्या लायकीची ती नाही, हे पूर्वपक्ष्याचे म्हणणे.

ध्वन्यालोकः

श्लेषध्वनिर्यथा –

रम्या इति प्राप्तवतीः पताकाः, रागं विविक्ता इति वर्धयन्तीः।
यस्यामसेवन्त नमद्वलीकाः समं वधूभिर्वलभीर्युवानः॥

अत्र वधूभिः सह वलभीरसेवन्तेति वाक्यार्थप्रतीतेरनन्तरं वध्व इव वलभ्य इति श्लेषप्रतीतिरशब्दाप्यर्थसामर्थ्यान्मुख्यत्वेन वर्तते।

यथासङ्ख्यध्वनिर्यथा–

अङ्कुरितः पल्लवितः कोरकितः पुष्पितश्च सहकारः।
अङ्कुरितः पल्लवितः कोरकितः पुष्पितश्च हृदि मदनः॥

अत्र हि यथोद्देशमनूद्देशे यच्चारुत्वमनुरणनरूपं मदनविशेषण-भूताङ्कुरितादिशब्दगतं तन्मदनसहकारयोस्तुल्ययोगितासमुच्चय-लक्षणाद्वाच्यादतिरिच्यमानमालक्ष्यते।

ध्वन्यालोक

'श्लेष' ध्वनीचे उदाहरण पुढीलप्रमाणे– "त्या (द्वारका) नगरीमध्ये तरुणांनी सर्वांत वरच्या खोल्यांचा उपभोग आपल्या पत्न्यांबरोबरच घेतला. त्या खोल्या रमणीय असल्यामुळे पताकांनी शृंगारल्या होत्या. (दुसरा अर्थ – त्यांच्या पत्न्या सुंदर म्हणून प्रसिद्धी पावल्या होत्या.). त्या खोल्यांत जनसंपर्क नसल्या-मुळे त्या रतिसुखाची इच्छा वृद्धिंगत करीत होत्या. (दुसरा अर्थ – त्या पत्न्या

रेखीव अवयवांमुळे आपणांवरील प्रेम वृद्धिंगत करीत होत्या ). आणि त्या खोल्यांवरील छपरांच्या ( बाजूस असलेल्या ) कडा उतरत्या होत्या. ( दुसरा अर्थ - पत्न्यांच्या उदरांवर तीन बहिर्गोलाकार वळ्या पडल्या होत्या. ) "

या उदाहरणात " त्या तरुणांनी वधूंसह खोल्यांचा उपभोग घेतला " असा वाक्याचा अर्थ प्रथम प्रतीत होऊन मग " खोल्या पत्न्यांप्रमाणे होत्या " अशा श्लेषाची ( दोन अर्थांची ) प्रतीति, त्या अर्थाचे वाचक शब्द वापरले नसताही वाच्यार्थाच्या ( व्यंजकत्व ) सामर्थ्यामुळे प्रधानतेने होते.

' यथासंख्य ' – ध्वनीचे उदाहरण—

" आम्रवृक्षाला अंकुर फुटले, पालवी फुटली, कळ्या आल्या व फुले आली हृदयात मदनाला अंकुर फुटले, पालवी फुटली, कळ्या आल्या व फुले आली. "

या उदाहरणात तुल्ययोगिता [२] व समुच्चय [३] हे अलंकार वाच्य आहेत. पण त्या अलंकारांपेक्षाही ' ज्या क्रमाने आम्रवृक्षाच्या अवस्था पालटत गेल्या, त्याच क्रमाने, अगदी तसाच मदनही वृद्धिंगत होत गेला ' हा जो अनुरणन-स्वरूप व्यंग्यार्थ प्रकट होतो, तो त्या वाच्य अलंकारांहून अधिक सुंदर असल्याचा प्रत्यय येतो.

लोचनम्

पताका ध्वजपटान् प्राप्तवतीः रम्या इति हेतोः । पताकाः प्रसिद्धीः प्राप्तवतीः । किमाकाराः प्रसिद्धीः ? रम्या इत्येवमाकाराः । विविक्ता जनसङ्कुलत्वाभावादित्यतो हेतो रागं सम्भोगाभिलाषं वर्धयन्तीः । अन्ये तु रागं चित्रशोभामिति । तथा रागमनुरागं वर्धयन्तीः । यतो हेतोः विविक्ता विभक्ताङ्ग्यो लटभाः याः । नमन्ति वलीकानि छदिपर्यन्तभागा यासु । नमन्त्यो वल्लयस्त्रिवलीलक्षणा यासाम् । सममिति सहेत्यर्थः । ननु समशब्दात्तुल्यार्थोऽपि प्रतीतः । सत्यम्; सोऽपि श्लेषबलात् । श्लेषश्च नाभिधावृत्तेराक्षिप्तः, अपि त्वर्थसौन्दर्यबलादेवेति सर्वथा ध्वन्यमान एव श्लेषः । अत एव वध्व इव वलभ्य इत्यभिदधतापि वृत्तिकृतोपमाध्वनि-रिति नोक्तम् । श्लेषस्यैवात्र मूलत्वात् । समा इति हि यदि स्पष्टं भवेत्तदोपमाया एव स्पष्टत्वाच्छ्लेषस्तदाक्षिप्तः स्यात् । सममिति निपातोऽसा सहार्थवृत्तिर्व्यञ्जकत्वबलेनैव क्रियाविशेषणत्वेन शब्दश्लेष-तामेति । न च तेन विनाभिधाया अपरिपुष्टता काचित् । अत एव

समाप्तायामेवाभिधायां सहृदयैरेव स द्वितीयोऽर्थोऽपृथक्प्रयत्नेनैवाव गम्यः। यथोक्तं प्राक्– 'शब्दार्थशासनज्ञानमात्रेणैव' इत्यादि। एतच्च सर्वोदाहरणेष्वनुसर्तव्यम्। 'पीनश्चैत्रो दिवा नात्ति।' इत्यत्राभिधैवा-पर्यवसितेति सैव स्वार्थनिर्वाहायार्थान्तरं शब्दान्तरं वाकर्षतीत्यनुमानस्य श्रुतार्थापत्तेर्वा तार्किकमीमांसकयोर्न ध्वनिप्रसङ्ग इत्यलं बहुना। तदाह– अशब्दापीति।

लोचन

पताकांनी म्हणजे ध्वजांच्या कापडांनी ज्या वरच्या खोल्या शृंगारल्या होत्या. का, तर त्या मूळच्याच सुंदर होत्या म्हणून. ( आणि त्या तरुणांच्या पत्न्या) पताका म्हणजे ख्याति मिळविलेल्या होत्या. कसली ख्याति ? तर त्या सुंदर आहेत अशा प्रकारची ख्याति. (त्या वरच्या खोल्या) एका बाजूला म्हणजे लोकांची ये जा नसलेल्या अशा होत्या. या कारणाने त्या 'राग' म्हणजे संभोगाची इच्छा उद्दीपित करणाऱ्या होत्या. पण दुसरे काही (टीकाकार) म्हणतात की, राग म्हणजे चित्रां-च्या रंगांची शोभा वाढवीत होत्या[४] (अशा खोल्या). तसेच (त्या स्त्रिया) राग म्हणजे (आपल्या पतींच्या मनातील) प्रीति वृद्धिगत करणाऱ्या होत्या. कारण त्या (स्त्रिया) विविक्त होत्या म्हणजे त्यांचा एकेक अवयव रेखीवपणामुळे स्पष्ट दिसत[५] होता, म्हणजे त्या सुंदर होत्या. ज्यांची वलीके म्हणजे ज्यांच्यावरील छपरांच्या ( बाजूस असलेल्या[६] ) कडा उतरत्या होत्या, अशा (खोल्या). आणि (पत्न्यांच्या बाबतीत) ज्यांच्या 'वली' म्हणजे उदरावरील तीन घड्या बहिर्गोलाकार व उतरत्या होत्या, अशा. समम् याचा 'सह' असा अर्थ.

शंका – पण काय हो, समम् शब्दामुळे 'सारखेपणा' या अर्था-चाही बोध होत नाही काय ? [७] उत्तर–खरे आहे. पण तोही (म्हणजे सादृश्याचाही) बोध सूचित श्लेषामुळेच होतो. आणि हा श्लेषही समम् शब्दाच्या अभिधाशक्तीने ज्ञात होत नाही, तर वाच्यार्थाच्या सौंदर्यामुळे (म्हणजे व्यंजकत्वसामर्थ्यामुळे); म्हणून श्लेष हा येथं पूर्णपणे ध्वनित होणाराच आहे. आणि यामुळेच वृत्तिकारांनी 'पत्न्यां-प्रमाणे असणाऱ्या खोल्या' असे वृत्तीत म्हटले असले तरी येथं

'उपमाध्वनि' आहे असे त्यांनी म्हटले नाही. कारण या पद्यातील (व्यंग्य) श्लेषच सौंदर्याचे मुख्य कारण आहे. येथे जर समम् (= सह) या ऐवजी समाः (= सारख्या) असाच उघड अर्थाचा शब्द वापरला असता, तर तेथे उपमा हाच अलंकार वाच्य म्हणून स्पष्ट झाला असता व त्या उपमेचे कारण असणारा श्लेषही वाच्यच ठरला असता. समम् हे अव्यय उच्चारताक्षणी (म्हणजे अभिधाशक्तीने) सह (म्हणजे बरोबर) या अर्थाचे वाचक आहे. पण वस्तुतः ते क्रियाविशेषण असल्यामुळे 'सारख्या' या दुसऱ्या (गुणविशेषणात्मक) अर्थाचा बोध व्यंजनेनेच करून देऊ शकते.[८] आणि तो दुसरा अर्थ लक्षात आला नाही, तरी त्यावाचून अभिधाशक्तीने कळणारा वाच्य अर्थ कोणत्याही प्रकारे अपुरा असलेला आढळून येत नाही. म्हणूनच समम् शब्दाच्या अभिधेचे (वाच्य अर्थ प्रकट करण्याचे) काम संपल्यावर मग केवळ रसिकांनाच समम् शब्दाचा तो दुसरा अर्थ (आणि व्यंग्य श्लेष) वेगळा प्रयत्न करावा न लागताच समजून येतो. कारण कारिकाकारांनी पूर्वी[९] सांगितलेच होते– 'केवळ शब्दांचे शास्त्र व अर्थांचे शास्त्र यांच्या अभ्यासानेच (प्रतीयमान अर्थाचे आकलन होत नाही).' आणि हीच परिस्थिति[१०] शब्दशक्तिमूल किंवा अर्थशक्तिमूल ध्वनीच्या सर्वच उदाहरणांचे बाबतीत असते, हे लक्षात ठेवावे. 'धष्टपुष्ट चैत्र दिवसा जेवीत नाही' यासारख्या वाक्यांमध्ये अभिधेचेच कार्य पुरे होत नसल्यामुळे तीच आपले वाच्यार्थबोधनाचे कार्य पूर्ण व्हावे म्हणून 'चैत्र रात्री अन्न खातो' ह्या निराळ्या अर्थाला म्हणा किंवा[११] निराळ्या शब्दांना म्हणा, आपल्याकडे ओढून घेते. व त्यामुळे अशी उदाहरणे नैयायिकांच्या मते अनुमानाची[१२] किंवा मीमांसकांच्या मते श्रुतार्थापत्तीची[१३] होतील. येथे (त्यांच्या किंवा आमच्याही मते) 'ध्वनि' संभवणार नाही.[१४] असो. याबाबत आणखी लांबण लावणे नको म्हणूनच वृत्तिकार (या श्लोकाच्या विवरणामध्ये) 'वाचक शब्द वापरले नसताही'[१५] असे म्हणतात.

१. शिशुपालवध, ३–३३.
२. अनेकांना साधारण असलेल्या धर्माचा एकदाच उल्लेख करून ज्या अनेकांशी त्याचा संबंध जोडला जातो त्या सर्व वस्तु एकजात प्रस्तुत किंवा एकजात अप्रस्तुत असतील तर तो तुल्ययोगिता अलंकार समजावा. वरील उदाहरणात आम्रवृक्ष व मदन या दोहोंचाही एकाच (अंकुर फुटले वगैरे) क्रियासमूहाशी संबंध जोडला आहे व मदन व आम्रवृक्ष हे दोघेही प्रस्तुत आहेत म्हणून वरील उदाहरणात ( वाच्य ) तुल्ययोगिता अलंकार आहे. अर्थात् अंकुर फुटले वगैरे साधारण धर्मांची पुनरुक्ति न करता त्यांचा उल्लेख एकदाच केला असता, तर ते तुल्ययोगितेचे अगदी लक्षणानुसार उदाहरण झाले असते.
३. अनेक गुण किंवा अनेक क्रिया एकाच वेळी घडतात असे वर्णन असले, तर तेथे 'समुच्चय' अलंकार होतो. वरील उदाहरणात अंकुर फुटणे, पालवी फुटणे वगैरेपैकी प्रत्येक क्रिया मदन व सहकार या दोहोंच्याही बाबतीत एकदम झाली असे वर्णन असल्याने येथे समुच्चय अलंकार हाही वाच्य आहे.
४. कारण त्या खोल्यांमध्ये लोकांची ये जा नसल्यामुळे तेथील चित्रांचे रंग पुसट न होता तसेच कायम राहिले होते.
५. म्हणजे प्रत्येक अवयव कोरल्यासारखा वेगवेगळा दिसत होता.
६. बाजूस असलेल्या म्हणजे घराच्या पुढच्या व मागच्या नव्हेत, तर उरलेल्या दोन्ही बाजूंच्या ∧ अशा आकाराच्या कडा. कारण पुढच्या व मागच्या 'कडा' उतरत्या नसून आडव्या सरळ असतात.
७. म्हणजे येथील उपमा वाच्य आहे, म्हणून यातील श्लेषही वाच्य आहे असे पूर्वपक्षाचे म्हणणे.
८. वास्तविक अभिनवगुप्तांनी येथे (व्यञ्जकत्वबलेनैव) **शब्दश्लेषताम्** असे शब्द न वापरता (व्यञ्जकत्वबलेनैव) द्वितीयार्थबोधकताम् असे म्हणणे अधिक योग्य झाले असते. कारण **समम्** याचा सह हा अर्थ प्रथम अभिधा-वृत्तीने कळतो. मागाहून व्यंजनेने 'तुल्यत्वाने' हा क्रियाविशेषणरूपी अर्थ ध्यानात येतो. म्हणून **समम्** या शब्दात श्लेष नाही. 'त्या तरुणांनी खोल्यांचा उपभोग पत्न्यांशी तुल्यत्वाने घेतला' यावरून पत्न्या आणि खोल्या यांमध्ये साम्य असावे हे सुचविले जाते. मग पत्न्या व खोल्या यांमध्ये काय साम्य असावे याचा विचार करू लागल्यावर पत्न्यांशी जुळ-णारा असा विशेषणांचा अर्थ (विभक्तिविपरिणामाने म्हणजे विभक्ति-प्रत्ययामध्ये योग्य ते बदल करून) प्रतीत होऊ लागतो. म्हणजेच व्यंजनेने श्लेषाचे अस्तित्व ध्यानात येते.

९. उद्द्योत १, कारिका ७ मध्ये.

१०. हीच परिस्थिति म्हणजे वाच्यार्थ कोणतीही अडचण न येता ध्यानात आल्यावर मग व्यंग्य अर्थ ध्यानात येतो, ही परिस्थिति.

११. 'अर्थाला किंवा शब्दांना' असे म्हणण्याचे कारण भाट्टमीमांसकांच्या मते अर्थापत्तीमध्ये शब्दांचा आक्षेप केला जातो व प्राभाकरमीमांसकांच्या मते अर्थांचा आक्षेप केला जातो.

१२. कारण नैयायिक 'अर्थापत्ति' हे वेगळे प्रमाण न मानिता तिचा अन्तर्भाव अनुमानातच करितात.

१३. श्रुतार्थापत्तीची माहिती पृ. १७३ वर १५ व्या टीपेमध्ये पाहा.

१४. याचे कारण नैयायिक व मीमांसक हे व्यंजनेचा अंतर्भाव अनुक्रमे अनुमान व अभिधा यांमध्येच करितात. ते व्यंजनेचे स्वतंत्र अस्तित्व मानीत नाहीत. ते व्यंजनाच मानीत नसल्याने त्यांच्या मते येथेच काय, कोठेही व्यंजना संभवणार नाही. अभिनवगुप्तांच्या मते मात्र प्रस्तुत उदाहरण व्यंजनेचे नसून अनुमानाचेच आहे (पाहा, पृ. १३०).

१५. येथे बलभ्य: वध्व: इव किंवा बलभ्य: वधूभि: समा: असे शब्द प्रत्यक्ष वापरले असते तर ही उपमा शब्दवाच्य होऊन तिला कारणीभूत असणारा श्लेषही शब्दवाच्य झाला असता. पण प्रस्तुत श्लोकातील ही उपमा व्यंग्य असल्यामुळे तिला कारणीभूत असणारा श्लेषही व्यंग्यच होय. या संदर्भात पृ. ४७७ वरील ६ ही टीप पाहा.

ध्वन्यालोकः

एवमन्येऽप्यलङ्कारा यथायोगं योजनीयाः ।

ध्वन्यालोक

याप्रमाणे इतर (बहुतेक सर्व)[१] अलंकारही ध्वनित होतात. ते जसजसे आढळतील, तसतसे सहृदयांनी समजून घ्यावेत.

लोचनम्

एवमन्येऽपीति । सर्वेषामेवार्थालङ्कारा्णां ध्वन्यमानता दृश्यते । यथा च दीपकध्वनि :–

मा भवन्तमनलः पवनो वा वारणो मदकलः परशुर्वा ।
वज्रमिन्द्रकरविप्रसृतं वा स्वस्ति तेऽस्तु लतया सह वृक्ष ॥

इत्यत्र बाधिष्टेति गोप्यमानादेव दीपकादत्यन्तस्नेहास्पदत्वप्रतिपत्त्या चारुत्वनिष्पत्तिः। अप्रस्तुतप्रशंसाध्वनिरपि—

ढुंढुल्लंतो मरिहिसि* कंटअकलिआइँ केअइवणाइं।
मालइकुसुमसरिच्छं भमर भमंतो ण पाविहिसि॥

प्रियतमेन साकमुद्याने विहरन्ती काचिन्नायिका भ्रमरमेवमाहेति भृङ्गस्याभिधायां प्रस्तुतत्वमेव। न चामन्त्रणादप्रस्तुतत्वावगतिः प्रत्युतामन्त्रणं तस्या मौग्ध्यविजृम्भितमिति अभिधया तावन्नाप्रस्तुतप्रशंसा समाप्ता। समाप्तायां पुनरभिधायां वाच्यार्थबलादन्यापदेशता ध्वन्यते। यत्सौभाग्याभिमानपूर्णा सुकुमारपरिमलमालतीकुसुमसदृशी **कुलवधूर्निर्व्याजप्रेमपरतया कृतकवैदग्ध्यलब्धप्रसिद्धयतिशयानि शम्भलीकण्टकव्याप्तानि दूरामोदकेतकीवनस्थानीयानि वेश्याकुलानीतश्चेतश्च* चञ्चूर्यमाणं प्रियतममुपालभते। अपह्नुतिध्वनिर्यथास्मदुपाध्यायभट्टेन्दुराजस्य—

यः कालागुरुपत्रभङ्गरचनावासैकसारायते
गौराङ्गीकुचकुम्भभूरिसुभगाभोगे सुधाधामनि।
विच्छेदानलदीपितोत्कवनिताचेतोधिवासोद्भवं
सन्तापं विनिनीषुरेष विततैरङ्गैर्नताङ्गि स्मरः॥

अत्र चन्द्रमण्डलमध्यवर्तिनो लक्ष्मणो वियोगाग्निपरिचितवनिताहृदयोदितप्लोषमलीमसच्छविमन्मथाकारतयापह्नवो ध्वन्यते। अत्रैव ससन्देहध्वनिः—यतश्चन्द्रवर्तिनस्तस्य नामापि न गृहीतम्। अपि तु गौराङ्गीस्तनाभोगस्थानीये चन्द्रमसि कालागुरुपत्रभङ्गविच्छित्त्यास्पदत्वेन यः सारतामुत्कृष्टतामाचरतीति तन्न जानीमः किमेतद्वस्त्विति ससन्देहोऽपि ध्वन्यते। पूर्वमनङ्गीकृतप्रणयामनुतप्तां विरहोत्कण्ठितां वल्लभागमनप्रतीक्षापरत्वेन कृतप्रसाधनादिविधितया† वासकसज्जीभूता

---

* काव्यानुशासन, पृ. ३४३ व कल्पलताविवेक, पृ. १५० येथे ढुंढुल्लितु मरीहसि असा पाठ आहे.

** कल्पलताविवेक, पृ. १५०, मुग्धकुलवधू असा पाठ

* ,, पृ. १५० इतश्चामुतश्च ,, ,,

† काव्यानुशासन, पृ. ७८, विधेयतया असा पाठ

पूर्णचन्द्रोदयावसरे दूतीमुखानीतः प्रियतमस्त्वदीयकुचकलशन्यस्तकालागुरुपत्रभङ्गरचना मन्मथोद्दीपनकारिणीति चाटुकं कुर्वाणश्चन्द्रवर्तिनी चेयं कुवलयदलश्यामलकान्तिरेवमेव करोतीति प्रतिवस्तूपमाध्वनिरपि। सुधाधामनीति चन्द्रपर्यायतयोपात्तमपि पदं सन्तापं विनिनीषुरित्यत्र हेतुतामपि व्यनक्तीति हेत्वलङ्कारध्वनिरपि। त्वदीयकुचशोभा मृगाङ्कशोभा च सह मदनमुद्दीपयत इति सहोक्तिध्वनिरपि। 'त्वत्कुचसदृशश्चन्द्रश्चन्द्रसमस्त्वत्कुचाभोगः' इत्यर्थप्रतीतेरुपमेयोपमाध्वनिरपि। एवमन्येऽप्यत्र भेदाः शक्योत्प्रेक्षाः। महाकविवाचोऽस्याः कामधेनुत्वात्। यतः —

हेलापि कस्यचिदचिन्त्यफलप्रसूत्यै
कस्यापि नालमणवेऽपि फलाय यत्नः।
दिग्दन्तिरोमचलनं धरणीं धुनोति
वातस्पतन्नपि लतां चलयेन्न भृङ्गः।

एषां तु भेदानां संसृष्टित्वं सङ्करत्वं च यथायोगं चिन्त्यम्। अतिशयोक्तिध्वनिर्यथा ममैव—

केलीकन्दलितस्य विभ्रममधोर्धुर्यं वपुस्ते दृशौ
भङ्गीभङ्गुरकामकार्मुकमिदं भ्रूर्नर्मकर्मक्रमः।
आपातेऽपि विकारकारणमहो वक्त्राम्बुजन्मासवः
सत्यं सुन्दरि वेधसस्त्रिजगतीसारस्त्वमेका कृतिः॥

अत्र हि मधुमासमदनासवानां त्रैलोक्ये सुभगतान्योन्यं परिपोषकत्वेन। ते तु त्वयि लोकोत्तरेण वपुषा सम्भूय स्थिता इत्यतिशयोक्तिर्ध्वन्यते। आपातेऽपि विकारकारणमित्यास्वादपरम्पराक्रिययापि विना विकारात्मनः फलस्य सम्पत्तिरिति विभावनाध्वनिरपि। विभ्रममधोर्धुर्यमिति तुल्ययोगिताध्वनिरपि। एवं सर्वालङ्काराणां ध्वन्यमानत्वमस्तीति मन्तव्यम्। न तु यथा कैश्चिन्नियतविषयीकृतम्। यथायोगमिति (पृ. ५६०)। क्वचिदलङ्कारः क्वचिद्वस्तु व्यञ्जकमित्यर्थो योजनीय इति॥ २७॥

'याप्रमाणे इतर'– (जवळजवळ) सगळेच अलंकार सूचित होऊ शकतात असे दिसते.[२] उदा. दीपकध्वनी'चे उदारण पुढील-प्रमाणे–[३]

'हे वृक्षा! या वेलीसह तुझे कल्याण होवो. तुला अग्नि किंवा वारा, मदोन्मत्त हत्ती किंवा (लाकूडतोड्याची) कुऱ्हाड किंवा इंद्राच्या, हाताने फेकले गेलेले वज्र यांनी....नको.'

या उदाहरणात 'पीडा करावयास' हे दीपक (म्हणजे अग्नि वारा, हत्ती इ. पुष्कळांशी संबद्ध असणारा एक साधारण धर्म) बोलून दाखविलेले नाही आणि त्यामुळेच बोलणाराचे त्या वृक्षावरील उत्कट प्रेम ध्वनित होऊन, चमत्कृति निष्पन्न होत आहे.[४]

(आता) 'अप्रस्तुतप्रशंसा' ध्वनीचेही उदाहरण पाहा– 'हे भ्रमरा! तू काटेरी केतकीच्या राईत शोध करकरून मरशील, पण कितीही भडकलास, तरी मालतीच्या फुलाच्या तोडीचे (फूल) तुला (कोठेही) सापडणार नाही.'

आपल्या प्रियकरासमवेत उपवनात विहार करणारी कोणी एक नायिका भ्रमराला उद्देशून वरीलप्रमाणे म्हणत आहे. (असा या पद्याचा संदर्भ आहे.) म्हणून भ्रमरवृत्तांत येथे वाच्य आहे व त्यामुळेच प्रस्तुतही आहे. ती (भ्रमरासारख्या कीटकाला) हाक मारिते (हे असंभाव्य आहे) यावरून तो (भ्रमरवृत्तान्त) अप्रस्तुत असल्याचा बोध होतो असे नाही.[५] उलट तिने (भृङ्गाला) हाक मारणे हे तिच्या भोळसटपणामुळे घडत आहे, या कारणाने येथे अप्रस्तुतप्रशंसेचा बोध अभिधेने होत नाही. पण अभिधेचे कार्य संपल्यावर वाच्यार्थाच्या व्यंजकत्वसामर्थ्यामुळे तिचे भ्रमराला उद्देशून बोलणे हे दुसऱ्या कोणाला तरी अनुलक्षून आहे असे सूचित होते. त्या तिच्या म्हणण्यातील व्यंग्य आशय असा :– स्वतःच्या सौंदर्याचा अभिमान बाळगणारी, नाजूक मन्द सुगन्धाने युक्त असणाऱ्या मालती पुष्पासारखी कोणीतरी एक कुलीन स्त्री आहे. तिचे आपल्या प्रियपतीवर अकृत्रिम प्रेम आहे. म्हणून प्रीतीचा नाटकी देखावा करण्यामुळे ज्यांना खूप प्रसिद्धि मिळाली आहे

अशा आणि कुंटिणीरूपी काट्यांनी व्याप्त व ज्यांचा भपकेबाज सुगन्ध दूरवर दरवळतो अशा केतकीच्या ताटव्यांप्रमाणे असणाऱ्या वेश्यागृहांचे उंबरठे झिजवीत इकडे तिकडे फिरणाऱ्या आपल्या प्रियपतीला ती कुलीन स्त्री टोमणा देत आहे.[६]

अपह्नुति अलंकाराच्या ध्वनीचे उदाहरण म्हणजे आमचे गुरु भट्ट इंदुराज यांचा पुढील श्लोक–

'हे सुंदरि! एखाद्या गौरवर्ण रमणीच्या कलशतुल्य स्तनांप्रमाणे गोलाकार, विपुल आणि आकर्षक विस्तार असलेल्या या (सुधामय) चंद्राच्या बिंबावर कालागुरूच्या द्रवाने काढलेल्या लतापल्लवांच्या आकृतीसारखे जे काही सुंदर दिसत आहे, ते म्हणजे विरहानलाने पेटलेल्या उत्कंठित रमणींच्या मनात वास्तव्य केल्यामुळे स्वतःचा झालेला दाह शमविण्यासाठी आपले अवयव ताणून पडून राहिलेला मदनच आहे.'

या पद्यात चंद्रबिंबावर असलेल्या कलंकाचा 'तो कलंक नसून विरहानलाने युक्त अशा रमणींच्या हृदयात राहून होरपळल्यामुळे अंगकान्ति काळवंडून गेलेला मदनच आहे अशी १) अपह्नुति[७] सूचित होत आहे. या पद्यातच २) ससंदेह अलंकाराचा[८] ध्वनि आहे. कारण, येथे चंद्रावर असलेल्या त्या कलंकाचे कवीने नावही घेतलेले नाही, तर 'गौरवर्ण रमणीच्या विशाल स्तनप्रदेशाप्रमाणे असणाऱ्या चंद्रावर कालागुरूच्या द्रवाने काढलेल्या लतापल्लवाकृतींसारखे जे अत्यंत सुंदर आहे, ते नक्की काय आहे हे आम्हाला समजत नाही,' असा संदेह सूचित होत आहे. प्रियकराने केलेल्या याचनेचा आपण आधी स्वीकार केला नाही म्हणून पश्चात्ताप पावून मागाहून विरहाने उत्कंठित झालेली नायिका प्रियकराच्या आगमनाची वाट पाहू लागली. त्यासाठी वेषभूषा करून तिने अंगावर अलंकार वगैरे चढविले व आपल्या निवासस्थानी ती त्याला भेटावयास अगदी सज्ज होऊन बसली. आकाशात पूर्णचन्द्र उगवण्याचे वेळी दूतीला पाठवून तिच्याकरवी तिने प्रियकराला बोलावून आणले. त्यावेळी तो प्रियकर 'तुझ्या कुंभसदृश स्तनांवर कालागुरूच्या द्रवाने काढलेल्या लतापल्लवांच्या आकृति कामविकार उद्दीपित करणाऱ्या आहेत.' अशी तिची स्तुति करीत असताना चंद्रावर असलेली ही नीलकमलपत्रासारखी कांतिदेखील

अशीच कामोद्दीपक आहे अशा प्रकारचा ३) प्रतिवस्तूपमा अलंकाराचा ध्वनिही या पद्यात आहे.[९] 'सुधेचे माहेरघर असलेला' असा शब्द केवळ चंद्राशी समानार्थक म्हणूनच वापरला असला, तरी तो शब्द (चवथ्या ओळीतील) 'दाह शमविण्यासाठी' याचे कारण सुचविणारा आहे, म्हणून या पद्यात ४) 'हेतु' अलंकाराचाही ध्वनि आहे.[१०] तुझ्या स्तनांचा डौल व चंद्राची शोभा हे दोन्ही एकाच वेळी (सह) मदनविकार उद्दीपित करतात असा (५) 'सहोक्ति' अलंकारही येथे प्राधान्याने ध्वनित होत आहे. 'चन्द्र तुझ्या स्तनांप्रमाणे असून तुझ्या स्तनांचा गोलाकृति विस्तार चंद्राप्रमाणे आहे' असा अर्थ प्रतीत होत असल्यामुळे येथे (६) 'उपमेयोपमे' चाही ध्वनि आहे. अशाच रीतीने या पद्यात आणखीही अलंकारांचे ध्वनि आहेत, असे मानणे शक्य आहे. कारण, ही महाकवींची वाणी म्हणजे कामधेनूच होय.[११] कारण म्हटलेच आहे की–

एखाद्याने सहजगत्या केलेली कृतिसुद्धा आश्चर्यकारक फळ मिळवून देते तर एखाद्याने प्रयत्न करकरूनही त्याला तिळाएवढीदेखील फलप्राप्ति होत नाही. दिग्गजाच्या अंगावरील एक केस जरी हलला, तरी तो भूमीला हादरून सोडतो आणि भुङ्ग्याने जरी आकाशातून खाली लतेवर उडी घेतली, तरी तो लतेला चलित करू शकणार नाही.[१२]

मात्र अनेक अलंकारांचा ध्वनि असणाऱ्या या (भट्ट इंदुराजांच्या) उदाहरणात त्या त्या अलंकारांची 'संसृष्टि' झाली आहे की 'संकर' झाला आहे[१३] हे सहृदयांनी विचार करून ठरवावे.

'अतिशयोक्ति' अलंकाराच्या ध्वनीचे उदाहरण जसे माझाच पुढील श्लोक—

हे सुंदरी ! त्रैलोक्याचे सारसर्वस्व असलेली अशी तू विधात्याची एकुलती एक निर्मिति आहेस, (कारण) तुझे डोळे म्हणजे विलासी लोकांच्या क्रीडेचे ज्याला अंकुर फुटले आहेत असा आणि स्त्रियांच्या विभ्रमांनी शोभणारा जो वसंतऋतु, त्याचा मोहक आविष्कारच ! तुझ्या भुवयांच्या खोडकर हालचाली म्हणजे मदनाच्या निरनिराळ्या प्रकारे वाकविलेल्या धनुष्याचे स्पंदनच होय. तुझ्या मुखकमलातील मदिरा ही जरा चाखली तरी किती धुंद करणारी आहे ![१४]

वसन्तऋतु, मदन व मदिरा या गोष्टी (एरवी जरी वेगवेगळ्या राहात असल्या तरी) त्या एकमेकींशी सहकार्य करण्यामुळे तिन्ही लोकांना मोह पाडतात. पण त्या तिन्ही तुझ्या ठिकाणी आश्चर्यकारक रीतीने एकत्र जमून वास्तव्य करीत आहेत असा अतिशयोक्ति अलंकार प्रामुख्याने सूचित होत आहे.[15] 'जरा चाखली तरी धुंद करिते' या विधानामुळे 'एकसारखे घुटके न घेताही धुंदीरूपी कार्य उत्पन्न होते' अशा विभावना अलंकाराचाही ध्वनि या उदाहरणात आहे. (तुझे दोन्ही डोळे म्हणजे) 'स्त्रियांच्या विभ्रमांनी शोभणाऱ्या वसंताचा मोहक आविष्कारच' असे म्हटल्याने तुल्ययोगिता अलंकारही[16] येथे प्रधानत्वाने ध्वनित होतो. याप्रमाणेच (जवळजवळ) सगळेच अलंकार प्राधान्याने ध्वनित होऊ शकतात असे समजावे. काही ठराविकच अलंकार ध्वनित होऊ शकतात असे जे काही आलंकारिकांनी म्हटले आहे, ते मात्र बरोबर नाही.

'जसजसे आढळतील तसे–' काही ठिकाणी एक अलंकार दुसऱ्या अलंकाराचा व्यंजक होतो, तर काही ठिकाणी वस्तुस्वरूपाचा अर्थ अलंकाराला सूचित करितो, असा यथायोगम् या वृत्तीतल्या शब्दाचा अर्थ (सहृदयांनी) समजून घ्यावा, असा आशय. ॥ २७ ॥

टीपा

१. हे पूर्वी पृ. ५२० वर 'याची उदाहरणे विरळाच सापडतील...' इत्यादि शंकेला उत्तर आहे.

२. पाहा, उद्द्योत २, कारिका २६ वी.

३. वस्तुतः येथे दीपकध्वनि आहे असे म्हणण्याऐवजी तुल्ययोगिताध्वनि आहे असे म्हणणे योग्य झाले असते. कारण, येथे अग्नि, तारा इ. सर्व प्रस्तुत आहेत. त्यात काही प्रस्तुत व काही अप्रस्तुत अशी स्थिति नाही. दीपक व तुल्ययोगिता यांमधील हा भेद भामहाने मांडलेला नसला, तरी उद्भटाने स्पष्टपणे मांडलेला आहे. जगन्नाथ तर दीपक व तुल्ययोगिता असे दोन अलंकार न मानिता दीपक हा तुल्ययोगितेचाच प्रकार मानावा असे म्हणतो.

४. म्हणजे येथे व्यंग्य दीपकामुळे वृक्षादिविषयक रति हा 'भाव' पर्यवसानी सूचित होत असला, तरी या व्यंग्य दीपकामुळे चारुत्वनिष्पत्ति होत असल्यामुळे हे दीपकध्वनीचे उदाहरण म्हटले आहे.

५. म्हणजे येथे वाच्य, अप्रस्तुत भ्रमरवृत्तांतावरून प्रस्तुत नायकवृत्तांताचे सूचन होत असल्यामुळे येथील अप्रस्तुतप्रशंसा हा अलङ्कार 'वाच्य' आहे असे पूर्वपक्ष्याचे म्हणणे असेल तर ते बरोबर नाही.

६. पृ. ५४६ वरील ७ वी टीप पाहा. येथे भ्रमरवृत्तान्त हा प्रस्तुत असल्यामुळे भ्रमराला उद्देशून असलेला वाच्यार्थ प्रथम कळतो. मग त्या वाच्यार्थाच्या व्यंजकत्वसामर्थ्यामुळे कोणीतरी कुलीन स्त्री वेश्यांचे उंबरठे झिजविणाऱ्या आपल्या प्रियपतीची निर्भर्त्सना करीत आहे असा अप्रस्तुत अर्थ सूचित होऊन त्यावरून बोलणारी नायिका आपल्याच, अशा स्वभावाच्या प्रियपतीला टोचून बोलत आहे असा प्रस्तुत अर्थ सुचविला जात असल्यामुळे संपूर्ण अप्रस्तुतप्रशंसा अलंकार प्रामुख्याने ध्वनित होतो.

७. म्हणजे येथे कलंक या उपमेयाचा अपलाप व त्याच्या जागी मदन या उपमानाची स्थापना या दोन्ही गोष्टी सूचित होत असल्यामुळे येथे अपह्नुति अलंकाराचा ध्वनि आहे.

८. 'हे मुख आहे की चन्द्र आहे' अशा प्रकारच्या विधानास ससंदेह अलंकार म्हणतात. वरील पद्यात 'हा कलंक आहे किंवा काळवंडलेला मदन आहे' असा ससंदेह कल्पिता येईल. या वाक्य ससंदेहामधील उपमेय जो कलंक, त्याचा प्रस्तुत पद्यात उल्लेख केलेला नाही आणि 'किंवा, अथवा' यासारखा संशयवाचक शब्दही नाही, म्हणून येथे ससंदेह व्यंग्य आहे असेही मान्य करिता येईल. पण 'हे जे काही दिसते आहे ते काय आहे हे आम्हाला समजत नाही' या म्हणण्याला अभिनवगुप्त म्हणतात त्याप्रमाणे ससंदेह मानावे किंवा नाही हा प्रश्न आहे. कारण, समोर दिसणारी कोणतीतरी वस्तु आणि ते काय आहे या दोहोंमध्ये कोठलेही साम्य नाही. ससंदेहामधील दोन वस्तूंमध्ये साम्य असावे लागते व त्या दोघांमध्ये कवीचे मन सारख्याच प्रमाणात दोलायमान होते असे भामह, दंडी, उद्भट, रुद्रट इ. प्राचीनांचे मत आहे.

९. दोन वाक्यांमध्ये साम्य असून ते सूचित असेल (म्हणजे तेथे 'प्रमाणे' या अर्थाचा शब्द वापरलेला नसेल) आणि त्या दोन वाक्यांतील साधारण धर्म एकच असून त्याचा दोन वाक्यांत केवळ वेगवेगळ्या शब्दांनी निर्देश केला असेल, तर तेथे प्रतिवस्तूपमा हा अलंकार असतो. वर अभिनवगुप्तांनी दोन वाक्यांतील साधारण धर्म 'कामविकार उद्दीपित करणाऱ्या' व 'कामोद्दीपक' असे, म्हणजे सारखेच शब्द वापरून निर्देशिला आहे, त्याऐवजी वेगवेगळे शब्द वापरले असते, तर ते प्रतिवस्तूपमेच्या लक्षणाशी अधिक जुळते झाले असते.

१०. 'हेतु' हा अलंकार म्हणून भामह किंवा उद्भट यांनी मानलेला नाही.

दण्डीने मात्र मानिला आहे. रुद्रटाचा 'हेतु' अलंकार निराळचा म्हणजे कारण व कार्य यांचे तादात्म्य वर्णन करणे या स्वरूपाचा आहे. अभिनव-गुप्तांनी तो दण्डीच्या प्रमाणेच मानिलेला दिसतो. मम्मट वगैरे नंतरच्या लोकांनी त्याला 'काव्यलिङ्ग' असे नाव दिले आहे. मम्मटाने रुद्रटाच्या 'हेतु' चे मात्र खंडन केले आहे. अभिनवगुप्तांच्या म्हणण्याप्रमाणे येथे हेतु किंवा नंतरच्या लोकांचा काव्यलिङ्ग अलंकार असला तरी त्यांनी त्याला 'हेतुध्वनि' का म्हणावे हे समजत नाही. 'चन्द्र हा सुधाधाम असल्यामुळे तो दाह शमविण्याचे कारण' आहे. पण 'मुळे', 'कारण' इ. अर्थाचा शब्द येथे वापरला नाही. तो सूचित होतो, म्हणून त्यांनी येथे हेतुध्वनि मानिला असावा. पण कारणत्व सूचित होत असले, तरी मम्मटादिकांनी काव्यलिङ्ग हा अलंकार वाच्यच मानिला आहे.

११ म्हणजे कामधेनूच्या दातृत्वाला ज्याप्रमाणे मर्यादा नसते, त्याप्रमाणे महा-कवींच्या वाणीच्या अलंकारव्यंजकत्वालाही सीमा नसते.

१२. महाकवींनी सहज उच्चारलेले शब्दसुद्धा अमाप सौंदर्य निर्माण करितात, म्हणूनच आनंदवर्धनांनी १ ल्या उद्द्योतातील ६ व्या कारिकेवरील वृत्ती-मध्ये 'दोन-तीनच किंवा पाच-सहाच महाकवि म्हणून गणले जातात' असे म्हटले आहे. भवभूतीच्या उत्तररामचरितातील वाचमर्थोऽनुधावति हे वाक्य या संदर्भात आठवते.

१३. ध्वनीच्या निरनिराळ्या प्रकारांची संसृष्टि व संकर यांसंबंधी विचार पुढे द्वितीय खंड, उद्द्योत ३, कारिका ४३ वरील वृत्तीत केला आहे

१४. अभिनवगुप्तांनी हाच श्लोक अभिनवभारतीमध्येही (पाहा, रसभावविचार, कंगले आवृत्ति, पृ. १५०) उद्धृत केला आहे.

१५ वस्तुस्थितीत वेगवेगळ्या ठिकाणी राहणाऱ्या वरील तीन गोष्टी नायिकेच्या मुखकमलामध्ये एकत्र येऊन राहतात अशी कल्पना येथे केली असल्यामुळे असंबन्धे संबन्धः या प्रकारची अतिशयोक्ति सूचित होत आहे.

१६. तुल्ययोगिता अलंकाराची माहिती पृ. ५५९ वरील २ ऱ्या टीपेत पाहा. 'तुझे डोळे आणि वसंताचा आविष्कार ही दोन्ही मोहक आहेत' अशी तुल्ययोगिता येथे आहे. वसंतऋतूमध्ये नायकाने नायिकेला उद्देशून वरील पद्य म्हटले असे समजले, तर वसंतऋतु व नायिकेचे डोळे हे दोन्हीही प्रस्तुत मानिता येतील व त्यांचा 'मोहक असणे' या एकाच साधारण धर्माशी संबंध जोडला असल्यामुळे येथे तुल्ययोगिता अलंकार झाला आहे.

ध्वन्यालोकः

एवमलङ्कारध्वनिमार्गं व्युत्पाद्य तस्य प्रयोजनवत्तां ख्यापयितुमिदमुच्यते–

शरीरीकरणं येषां वाच्यत्वेन व्यवस्थितम् ।
तेऽलङ्काराः परां छायां यान्ति ध्वन्यङ्गतां गताः ॥ २८ ॥

ध्वन्यङ्गता चोभाभ्यां प्रकाराभ्यां व्यञ्जकत्वेन व्यङ्ग्यत्वेन च । तत्रेह प्रकरणाद्व्यङ्ग्यत्वेनेत्यवगन्तव्यम् । व्यङ्ग्यत्वेऽप्यलङ्काराणां प्राधान्यविवक्षायामेव सत्यां ध्वनावन्तःपातः । इतरथा तु गुणीभूतव्यङ्ग्यत्वं प्रतिपादयिष्यते ।

ध्वन्यालोक

अशा रीतीने अलंकारध्वनीचे स्वरूप स्पष्ट करून त्यासंबंधी (आतापर्यंत) केलेल्या चर्चेचा काय उपयोग आहे ते दाखविण्यासाठी पुढीलप्रमाणे सांगितले जात आहे–

(सुकवीच्या सामर्थ्यामुळे) जे अलंकार वाच्य असल्यामुळे[1] (जास्तीत जास्त) काव्याच्या शरीराचे अंश होऊ शकतील ते अलंकार स्वतः सूचित झाल्यामुळे ध्वनिकाव्याचे अंग बनल्यास त्यांना कमालीचे सौंदर्य प्राप्त होते. ॥ २८ ॥

(अलंकाराचे) ध्वनीला अंगभूत होणे हे दोन प्रकारांनी संभवते– १) व्यंजक म्हणून आणि २) व्यंग्य म्हणून. त्यांपैकी या ठिकाणी 'अलंकार ध्वनिकाव्याचे अंग बनल्यास' असे जे कारिकेत म्हटले आहे, त्याचा अर्थ प्रकरणामुळे (अलंकारांच्या व्यंग्यत्वाचे विवेचन चालू असल्यामुळे) 'व्यंग्य या नात्याने ध्वनिकाव्याचे अंग बनल्यास' असा समजावा. आणि अलंकार व्यंग्य असले तरी, ते प्रधान म्हणून समाविष्ट केले असतील, तरच त्यांची ध्वनिकाव्यात गणना होईल. तसे (म्हणजे ते प्रधान) नसल्यास ते 'गुणीभूतव्यंग्य' काव्याच्या सदरात येतील असे पुढे[2] सांगितले जाईल.

लोचनम्

ननूक्तास्तावच्चिरन्तनैरलङ्कारास्तेषां तु भवता यदि व्यङ्ग्यत्वं प्रदर्शितं किमियतेत्याशङ्क्याह – एवमित्यादि । येषामलंकाराणां वाच्य-

त्वेन शरीरीकरणं शरीरभूतात्प्रस्तुतादर्थान्तरभूततया अशरीराणां कटकादिस्थानीयानां शरीरतापादनं व्यवस्थितं सुकवीनामयत्नसम्पाद्य-तया। यदि वा वाच्यत्वे सति येषां शरीरतापादनमपि न व्यवस्थितं दुर्घटमिति यावत्, तेऽलङ्कारा: ध्वनेर्व्यापारस्य काव्यस्य वाङ्गतां व्यङ्ग्यरूपतया गता: सन्त: परां दुर्लभां छायां कान्तिमात्मरूपतां यान्ति। एतदुक्तं भवति – सुकविर्विदग्धपुरन्ध्रीवद्भूषणं यद्यपि श्लिष्टं योजयति तथापि शरीरतापत्तिरेवास्य कष्टसम्पाद्या कुङ्कुमपीतिकाया इव। आत्मतायास्तु का सम्भावनापि। एवम्भूता चेयं व्यङ्ग्यता या अप्रधान-भूतापि वाच्यमात्रालङ्कारेभ्य उत्कर्षमलङ्काराणां वितरति। बालक्रीडा-यामपि राजत्वमिवेत्यमुमर्थं मनसि कृत्वाह – इतरथात्विति ॥२८॥

लोचन

पण काय हो, प्राचीन आलंकारिकांनी (वाच्य) अलंकारांचे विवरण तर उदाहरणे देऊन केले आहे, मग तुम्ही ते व्यंग्यही असू शकतात हे दाखविण्याने विशेष काय साधले ? अशी शंका कल्पून वृत्तिकार 'अशा रीतीने' इ. वाक्याने (२८ व्या कारिकेची प्रस्तावना करून) त्या शंकेचे समाधान करितात.

'जे अलंकार वाच्य असताना त्यांना जास्तीत जास्त काव्याच्या शरीराचा एक भाग बनविता येते, म्हणजे शरीर असलेला जो प्रस्तुत अर्थ, त्याहून अलंकार हे वेगळे असल्याने ते 'शरीर' असू शकत नाहीत; ते हातातील सलकडी वगैरेप्रमाणे (बाह्य[3]) असतात. पण प्रतिभाशाली कवीकडून ते अलंकार अनायासे, सहज योजिले गेल्यामुळे[4] त्यांना काव्याच्या शरीराचाच भाग बनविता येते. किंवा जे अलंकार वाच्य असताना (सामान्य कवीने योजिल्यामुळे) काव्याच्या शरीराचाही अंश होऊ शकत नाहीत म्हणजे होणे कठीण असते असा अर्थ. तेच अलंकार व्यङ्ग्य होऊन ध्वनीचे म्हणजे व्यंजनाव्यापाराचे किंवा ध्वनिकाव्याचे अंग झाले असताना त्यांना कमालीची म्हणजे साधण्यास कठीण अशी शोभा म्हणजे झळाळी म्हणजे काव्याच्या आत्म्याचेच स्वरूप प्राप्त होते. यातील आशय असा :– एखादा कुशल प्रौढ स्त्रीप्रमाणे कुशल कवीनेही अलंकार शरीराशी एकरूप झालेला दिसेल अशा रीतीने गुंफला, त॰।

(हलक्या हाताने लावलेल्या) केशराच्या (फिक्या रंगाच्या) उटीप्रमाणे त्या अलंकाराला काव्याच्या शरीराचाच भाग बनविणे फार कठीण आहे, मग त्याला आत्म्याचा अंश बनविण्याची कल्पना देखील कशाला? पण काव्यातील व्यंग्यता मात्र अशी आगळी आहे की, जी गुणीभूत असली तरी (व्यंग्य) अलंकाराला वाच्य अलंकारापेक्षा कितीतरी उत्कृष्टपणा प्राप्त करून देते.[५] मुलांच्या खेळातही राजा झालेल्या मुलाला इतर मुलांहून वैशिष्ट्य प्राप्त होते, तसेच.[६] हाच आशय लक्षात घेऊन वृत्तिकार म्हणतात—'तसे (म्हणजे प्रधान) नसल्यास' इ. ॥ २८ ॥

टीपा

१. अभिनवगुप्तांनी या कारिकेच्या पूर्वार्धात 'वाच्यत्वेन' आणि 'वाच्यत्वे न' असे दोन पाठ कल्पून विवरण केले आहे. त्यांपैकी 'वाच्यत्वेन' या पाठानुसार वर भाषांतर केले आहे. 'वाच्यत्वे न' असा पाठ स्वीकारल्यास पूर्वार्धाचे भाषांतर पुढीलप्रमाणे होईल– 'जे अलंकार वाच्य असताना काव्याचे शरीर (सुद्धा) होऊ शकत नाहीत, ते... '
२. पाहा, काशी आवृत्ति, वृत्ति, पृ. ४७०.
३. बाह्य म्हणजे शरीरापासून अलग करिता येण्याजोगे. पाहा, २–६ या कारिकेचा उत्तरार्ध (पृ. ३९७).
४. पाहा, कारिका २–१६ (पृ. ४२९).
५. 'अलंकार व्यंग्य असू शकतात हे दाखवून तुम्ही विशेष काय मिळविले?' या आक्षेपाला हे उत्तर आहे. जे अलंकार वाच्य असताना लोखंडाप्रमाणेच असतात, त्यांना व्यंग्यत्व प्राप्त झाल्याने परिसामुळे व्हावे तसे त्यांचे सोने बनते, इतका त्यांच्या सौंदर्यामध्ये फरक पडतो.
६. म्हणजे तो मुलगा वस्तुतः राजा नसून इतर मुलांनी खेळात त्याला राजा बनविले तरी तो तेवढ्या वेळेपुरता इतर मुलांहून उठून दिसतो. त्याप्रमाणे अलंकार व्यंग्य झाला की, त्याला वाच्य अलंकाराहून केवढे तरी अद्भुतत्व प्राप्त होते.

ध्वन्यालोक :

अङ्गित्वेन व्यङ्ग्यतायामपि, अलङ्काराणां द्वयी गतिः—कदाचिद्वस्तुमात्रेण व्यज्यन्ते, कदाचिदलङ्कारेण ।

तत्र—

व्यज्यन्ते वस्तुमात्रेण यदालङ्कृतयस्तदा ।

ध्रुवं ध्वन्यङ्गता तासाम्

अत्र हेतु :--

काव्यवृत्तिस्तदाश्रया ॥ २९ ॥

यस्मात्तत्र तथाविधव्यङ्ग्यालङ्कारपरत्वेनैव काव्यं प्रवृत्तम् । अन्यथा तु तद्वाक्यमात्रमेव स्यात् ॥ २९ ॥

तासामेवालङ्कृतीनाम्--

अलङ्कारान्तरव्यङ्ग्यभावे

पुनः,

ध्वन्यङ्गता भवेत् ।

चारुत्वोत्कर्षतो व्यङ्ग्यप्राधान्यं यदि लक्ष्यते ॥ ३० ॥

उक्तं ह्येतत्– ' चारुत्वोत्कर्षनिबन्धना वाच्यव्यङ्ग्ययोः प्राधान्यविवक्षा ' इति । वस्तुमात्रव्यङ्ग्यत्वे चालङ्काराणामनन्तरोपदर्शितेभ्य एवोदाहरणेभ्यो विषय उन्नेयः । तदेवमर्थमात्रेणालङ्कारविशेषरूपेण वार्थेनार्थान्तरस्यालङ्कारस्य वा प्रकाशने चारुत्वोत्कर्षनिबन्धने सति प्राधान्येऽर्थशक्त्युद्भवानुरणरूपव्यङ्ग्यो ध्वनिरवगन्तव्यः ॥ ३० ॥

ध्वन्यालोक

अलंकार प्रधानत्वाने व्यंग्य असतानादेखील त्यांच्या बाबतीत दोन प्रकार संभवतात – काही अलंकार केवळ ( वाच्य ) वस्तूवरून सूचित होतात, तर काही (वाच्य) अलंकारांवरून. त्यांपैकी—

ज्यावेळी अलंकार हे केवळ 'वस्तु'मुळे सूचित केले जात असतील, त्यावेळी ते अलंकार ध्वनिकाव्यातच अंतर्भूत होतात. याला कारण कवीचा ते काव्य रचण्याच्या प्रयत्नाचा कल केवळ त्या अलंकारांना 'सूचित' करण्याकडेच असतो. ॥ २९ ॥

कारण अशा ठिकाणी व्यंग्य जो अलंकार, त्याच्यासाठीच तर कवि काव्य रचण्याची धडपड करितो. तसे नसते, तर ते काव्य (' काव्य ' न होता ) केवळ ( साधे ) ' वाक्य 'च झाले असते. आता तेच व्यंग्य अलंकार—

जेव्हा दुसऱ्या ( वाच्य ) अलंकारामुळे सूचित होत असतील, तेव्हा—

मात्र—

जर अधिक सौंदर्यामुळे व्यंग्य अलंकाराला ( वाच्य अलंकाराहून ) मुख्यत्व मिळत असेल, तरच तो व्यंग्य अलंकार ध्वनिकाव्यात अंतर्भूत होतो. ॥ ३० ॥

कारण ( मागेच [१] ) असे म्हटले आहे की, ' वाच्य आणि व्यंग्य यांपैकी प्रधान म्हणून (कवीला) कोणते विवक्षित आहे याचे उत्तर त्या दोहोंपैकी ज्यात सौंदर्य अधिक असेल ते, असे आहे.' आता अलंकार हे केवळ वाच्य वस्तूवरून सूचित होण्याची उदाहरणे आतापर्यंत दिलेल्या उदाहरणांतूनच शोधून काढावीत. तेव्हा आता एकंदरीत तात्पर्य असे की, केवळ वस्तुस्वरूप वाच्य अर्थाने किंवा कोठल्यातरी अलंकाराच्या स्वरूपात असलेल्या वाच्य अर्थाने केवळ वस्तुस्वरूप अर्थ किंवा दुसरा अलंकार सूचित केला असताना त्या सूचित अर्थाला जर अधिक सौंदर्यामुळे प्राधान्य प्राप्त होत असेल, तर ते उदाहरण अर्थशक्त्युद्‌भव, अनुरणनरूप व्यंग्यार्थ असलेल्या ध्वनीचे आहे, असे समजावे.

लोचनम्

तत्रेति । द्वय्यां गतौ सत्याम् । अत्र हेतुरित्ययं वृत्तिग्रन्थः । काव्यस्य कविव्यापारस्य वृत्तिस्तदाश्रयालङ्कारप्रवणा यतः । अन्यथेति । यदि न तत्परत्वमित्यर्थः । तेन तत्र गुणीभूतव्यङ्ग्यता नैव शङ्क्येति तात्पर्यम् । तासामेवालङ्कृतीनामित्ययं पठिष्यमाणकारिकोपस्कारः । पुनरिति कारिकामध्य उपस्कारः । ध्वन्यङ्गतेति । ध्वनिभेदत्वमित्यर्थः ।

व्यङ्ग्यप्राधान्यमिति । अत्र हेतुः – चारुत्वोत्कर्षत इति । यदीति । तदप्राधान्ये तु वाच्यालङ्कार एव प्रधानमिति गुणीभूतव्यङ्ग्यतेति भावः । नन्वलङ्कारो वस्तुना व्यज्यते अलङ्कारान्तरेण च व्यज्यत इत्यत्रोदाहरणानि किमिति न दर्शितानीत्याशङ्क्याह – वास्त्विति । एतत्संक्षिप्योपसंहरति – तदेवमिति । व्यङ्ग्यस्य व्यञ्जकस्य च प्रत्येकं वस्त्वलङ्काररूपतया द्विप्रकारत्वाच्चतुर्विधोऽयमर्थशक्त्युद्भव इति तात्पर्यम् ॥२९-३०॥

लोचन

' त्यांपैकी '— (अलङ्कार प्रधानत्वाने व्यंग्य असताना जे) दोन प्रकार संभवतात, त्यांपैकी. ' याला कारण ' हे शब्द वृत्तीतले आहेत.

(कारिकेतील 'काव्यवृत्ति' यामधील) 'काव्य' म्हणजे कवीचा प्रयत्न.[२] त्याची 'वृत्ति' (म्हणजे कवीच्या प्रयत्नाचा कल) त्यांच्यावर अवलंबून असते, म्हणजे त्या अलंकारांना प्रधानत्वाने सूचित करण्याकडेच असते, म्हणून. 'तसे नसते तर'—म्हणजे अलंकाराला मुख्यतया सूचित करण्याचा कवीचा प्रयत्न नसला तर. त्यामुळे (म्हणजे अलंकार मुख्यतया सूचित केला गेला, तर) ते गुणीभूतव्यंग्याचे उदाहरण असेल असा संशयही घेणे योग्य नाही. 'आता तेच व्यंग्य अलंकार' हे वृत्तीतले शब्द म्हणजे पुढेच सांगितल्या जाणाऱ्या (२-३० या) कारिकेची प्रस्तावना होय. 'मात्र (पुन:)' हा शब्द म्हणजे कारिकेच्या मध्ये घातलेली भर आहे. 'ध्वनिकाव्यात अन्तर्भूत होतो'[3] म्हणजे ध्वनीचाच एक प्रकार होतो, हा अर्थ. व्यंग्य अलंकाराला मुख्यत्व (मिळत असेल तर)—हे मुख्यत्व प्राप्त होते, ते कोणत्या कारणामुळे ? तर त्यात अधिक सौंदर्य असल्यामुळे. 'जर इ.—पण तो व्यंग्य अलंकार मुख्य झाला नाही, तर वाच्य अलंकारच मुख्य होईल व त्या काव्याला गुणी-भूतव्यङ्ग्यत्व प्राप्त होईल,[४] असा भावार्थ. पण काय हो, वस्तुस्वरूपाच्या वाच्यार्थातून अलंकार ध्वनित होतो आणि वाच्य अलंकारातूनही तो ध्वनित होतो यांची वेगवेगळी उदाहरणे वृत्तिकारांनी काय म्हणून दिली नाहीत ? अशी शङ्का कोणी घेईल असे समजूनच वृत्तिकार '(अलंकार हे केवळ) वाच्य वस्तूवरून' इ. वाक्य सांगतात.[५] या विषयाचा[६] थोडक्यात सारांश सांगून वृत्तिकार 'तेव्हा आता एकंदरीत तात्पर्य' या वाक्याने समारोप करितात. व्यंग्यार्थ आणि व्यंजक अर्थ हे दोन्हीही वस्तुस्वरूपी किंवा अलंकारस्वरूपी असू शकतात, म्हणून प्रत्येकाचे दोन प्रकार होत असल्याने हा अर्थशक्तिमूल ध्वनि चार प्रकारचा असतो, हे तात्पर्य.[७] ॥ २९, ३० ॥

**टीपा**

१. पाहा, उद्द्योत १, पृ १८३.

२. येथे अभिनवगुप्तांनी 'काव्य' शब्दाचा अर्थ 'कविव्यापार' असा केला आहे, तर पृ. ३० वर **कवनीयं काव्यम्** म्हणजे जे गेयच असते ते काव्य असा केला आहे. पाणिनीच्या व्याकरणानुसार हे दोन्ही अर्थ बरोबरच आहेत. पण

आनन्दवर्धनांना मात्र येथे 'काव्य' शब्दाचा अर्थ 'कवीने केलेली वाङ्मय-रचना' हाच अभिप्रेत आहे हे 'नाहीतर ते (काव्य) केवळ वाक्यच झाले असते' या विधानावरून स्पष्ट होते.

३. ध्वन्यङ्गता हा शब्द कारिका २–२८, २९ व ३० या तिन्ही कारिकांतून वापरण्यात आला आहे. पण २–२८ मध्ये याचे दोन अर्थ होतात :— (१) ध्वनिकाव्याचे अंग म्हणजे व्यंजक या नात्याने त्याला उपकारक. (२) प्रधानत्वाने व्यंग्य, म्हणजे ध्वनिकाव्याचा आत्मा. म्हणजे अलंकारध्वनि या प्रकारच्या काव्यामध्ये जो अलंकार व्यंजक असेल, तो पहिल्या अर्थाने ध्वन्यङ्ग समजावा व जो (प्रधानत्वाने) व्यंग्य असेल तो दुसऱ्या अर्थाने ध्वन्यङ्ग समजावा. कारिका २९ मध्ये ध्वन्यङ्गता याचा अर्थ 'स्वतः ध्वनि असणे' असा आहे. कारिका ३० मधील ध्वन्यङ्गता या शब्दाचा अर्थ तो शब्द व्यंजक अलंकाराला अनुलक्षून घेतल्यास पहिल्या प्रकारे करावा व व्यंग्य अलंकाराला अनुलक्षून घेतल्यास दुसऱ्या प्रकारे करावा.

४. उदा. 'दीपक' अलंकार हे 'गुणीभूतव्यंग्य' काव्याचे उदाहरण होय. कारण, तेथे दीपक हा वाच्य अलंकारच मुख्य असून उपमा हा व्यंग्य अलंकार गौण असतो. पाहा, पृ. १८४ व ५२४.

५. 'अलंकार हे सूचित होऊ शकतात' (कारिका २–२६) या विधानाच्या समर्थनार्थ वृत्तीमध्ये पृ. ५२८ ते ५५६ पर्यंत जी एकूण चौदा उदाहरणे दिली आहेत त्यांपैकी पृ. ५४३ वरील 'मी माझा राग' वगैरे काही उदाहरणे वाच्य वस्तूने सुचविलेल्या (व्यंग्य) अलंकाराची आहेत, तर उरलेली, म्हणजे 'हयग्रीवाच्या ठिकाणी' ... इ. काही उदाहरणे वाच्य अलकारावरून अलंकार सूचित होतो, याची आहेत. म्हणून पुन्हा उदाहरणे देण्याचे कारण नाही, असे अभिनवगुप्त म्हणतात.

६. या विषयाचा, म्हणजे 'अर्थशक्तिमूल' ध्वनिप्रकाराचा.

७. म्हणजे (१) वाच्य वस्तूवरून 'वस्तु' सूचित होणे, (२) वाच्य वस्तूवरून 'अलंकार' सूचित होणे, (३) वाच्य अलंकारामुळे वस्तु सूचित होणे व (४) वाच्य अलंकारामुळे अलंकार सूचित होणे. यांत अर्थात् जर सूचितार्थ अधिक सुंदर व प्रधान असेल, तरच ते ध्वनिकाव्याचे उदाहरण होईल.

ध्वन्यालोकः

एवं ध्वनेः प्रभेदान् प्रतिपाद्य तदाभासविवेकं कर्तुमुच्यते —
यत्र प्रतीयमानोऽर्थः प्रम्लिष्टत्वेन भासते ।
वाच्यस्याङ्गतया वापि नास्यासौ गोचरो ध्वनेः ॥ ३१ ॥

द्विविधोऽपि प्रतीयमानः स्फुटोऽस्फुटश्च। य तत्र एव स्फुटः शब्दशक्त्यार्थशक्त्या वा प्रकाशते स एव ध्वनेर्मार्गो नेतरः। स्फुटोऽपि योऽभिधेयस्याङ्गत्वेन प्रतीयमानोऽवभासते सोऽस्यानुरणनरूपव्यङ्ग्यस्य ध्वनेरगोचरः।

यथा —

कमलाअरा ण मलिआ हंसा उड्डाविआ ण अ सहसा* ।
केण वि गामतलाए अब्भं उत्ताणअं छित्तं* ॥

अत्र हि प्रतीयमानस्य मुग्धवध्वा जलधरप्रतिबिम्बदर्शनस्य वाच्याङ्गत्वमेव। एवंविधे विषयेऽन्यत्रापि यत्र व्यङ्ग्यापेक्षया वाच्यस्य चारुत्वोत्कर्षप्रतीत्या प्राधान्यमवसीयते, तत्र व्यङ्ग्यस्याङ्गत्वेन प्रतीतेर्ध्वनेरविषयत्वम्। यथा —

वाणीरकुडुंगोड्डीणसउणिकोलाहलं सुणंतीए ।
घरकम्मवावडाए वहूएँ* सीअंति अंगाइं ॥

एवंविधो हि विषयः प्रायेण गुणीभूतव्यङ्ग्यस्योदाहरणत्वेन निर्देक्ष्यते। यत्र तु प्रकरणादिप्रतिपत्त्या निर्धारितविशेषो वाच्योऽर्थः पुनः प्रतीयमानाङ्गत्वेनैवावभासते सोऽस्यैवानुरणनरूपव्यङ्ग्यस्य ध्वनेर्मार्गः। यथा —

उच्चिणसु पडिअकुसुमं मा धुण सेहालिअं हलिअसुण्हे ।
अह दे विसमविवाओ ससुरेण सुओ वलअसद्दो ॥

अत्र ह्यविनयपतिना सह रममाणा सखी बहिःश्रुतवलयकलकलया सख्या प्रतिबोध्यते। एतदपेक्षणीयं वाच्यार्थप्रतिपत्तये। प्रतिपन्ने च वाच्येऽर्थे तस्याविनयप्रच्छादनतात्पर्येणाभिधीयमानत्वात्पुनर्व्यङ्ग्याङ्गत्वमेवेत्यस्मिन्ननुरणनरूपव्यङ्ग्यध्वनावन्तर्भावः ॥ ३१ ॥

ध्वन्यालोक

याप्रमाणे ध्वनीचे प्रकार सांगून झाल्यावर ते प्रकार ध्वनीच्या आभासापासून वेगळे आहेत हे दाखवण्यासाठी असे सांगण्यात येत आहे की—

---

* कल्पलताविवेक, पृ. १४४, पिउच्छा असा पाठ.
* कल्पलताविवेक, पृ. १५४, छूढं असा पाठ.
* काशी आवृत्ति, पृ. २८२, वहुए असा पाठ.

ज्या उदाहरणात व्यंग्यार्थ अस्पष्टपणे किंवा वाच्याचे अंग म्हणून प्रत्ययाला येत असेल, ते या ध्वनीच्या क्षेत्रात पडत नाही. (ते 'ध्वन्याभासा'चे उदाहरण समजावे.) ॥३१॥

व्यंग्यार्थ दोन प्रकारचा :– स्पष्ट आणि अस्पष्ट. त्यांपैकी शब्दांच्या शक्तीने म्हणा, किंवा अर्थाच्या शक्तीने म्हणा, जो व्यंग्यार्थ स्पष्टपणे प्रतीत होत असेल, तोच ध्वनीचा विषय होय. त्याहून निराळा (म्हणजे अस्पष्टपणे प्रत्ययास येणारा[१]) व्यंग्यार्थ हा ध्वनीचा विषय नव्हे. आणि जो व्यंग्यार्थ स्पष्ट असूनही वाच्याचे अंग म्हणून भासमान होत असेल, तोही या अनुरणनरूप व्यंग्यार्थ असलेल्या ध्वनीच्या कक्षेत येत नाही. उदा :—

"कमळांचे ताटवे चुरडले गेले नाहीत, किंवा हंसही (घाबरून) एकदम उडवले गेले नाहीत. गावातल्या तळ्यात कोणीतरी आभाळ उताणे करून फेकून दिलेले दिसते."[२]

या उदाहरणातील 'एका भोळ्या विवाहित स्त्रीने ढगाचे प्रतिबिम्ब पाहिले' हा व्यंग्यार्थ वाच्यार्थापेक्षा गौणच होय.[३] अशासारख्या इतर उदाहरणांतदेखील ज्या ठिकाणी व्यंग्यार्थापेक्षा वाच्यार्थ अधिक सुंदर वाटल्यामुळे (सहृदय) त्यालाच प्रधान म्हणून ठरवतात, तेथे व्यंग्यार्थ अंगभूत म्हणूनच प्रत्ययास येत असल्याने ती उदाहरणे ध्वनीची नव्हेत. उदा :–

"वेताच्या वेलींच्या जाळीतून उडालेल्या पक्ष्यांचा किलबिलाट ऐकून घरकामात बुडालेल्या सुनेची गात्रे एकदम ढिली पडतात."[४]

अशासारखी उदाहरणे सर्वसाधारणपणे 'गुणीभूतव्यंग्या'ची उदाहरणे होत, असे पुढे[५] सांगितले जाईल.

मात्र (त्यांहीपैकी) ज्या उदाहरणांत संदर्भ वगैरे समजल्यावर व वाच्यार्थाचे वैशिष्ट्य पूर्णपणे निश्चित केल्यावर तो वाच्यार्थ पुन्हा व्यंग्यार्थाचे अंग असल्याचेच अनुभवास येते, ती (मात्र), याच अनुरणनरूप व्यंग्यार्थ असलेल्या ध्वनीचीच उदाहरणे होत. उदा :–

"हे शेतकऱ्याच्या सूनबाई! पडलेली फुले वेचून घे. शेफालिकेची वेल (पारिजात) हलवू नकोस. अनिष्ट परिणाम घडवून आणणारा हा तुझ्या कंकणांचा आवाज तुझ्या मामंजींच्या कानी गेला!"[६]

या उदाहरणात एक स्त्री उपपतीशी रममाण झाली असताना तिच्या कंकणांचा आवाज बाहेर ऐकू गेला, म्हणून तिला तिची मैत्रीण सावध करीत

आहे. हा संदर्भ व या (या कंकणध्वनीमुळे तुझे दुराचरण उघडकीला येईल ) हा व्यंग्यार्थ, वरील उदाहरणाचा वाच्यार्थ सुसंगत होण्यास आवश्यक आहेत. पण वाच्यार्थ संपूर्णपणे समजल्यावर ती मैत्रीण त्या स्त्रीच्या अविनयावर पांघरूण घालण्याच्या उद्देशानेच मुख्यत : हे सगळे बोलली आहे, असे असल्यामुळे हा वाच्यार्थ पुनः (तिचा अविनय लपविणे या मुख्य) व्यंग्यार्थाचे* अंगच होत आहे, म्हणून त्या दृष्टीने त्या उदाहरणाचा अनुरणनरूप व्यंग्यार्थ असलेल्या (वस्तु) ध्वनीतच अंतर्भाव होईल.

लोचनम्

एवमिति। अविवक्षितवाच्यो विवक्षितान्यपरवाच्य इति द्वौ मूलभेदौ। आद्यस्य द्वौ भेदौ– अत्यन्ततिरस्कृतवाच्योऽर्थान्तरसंक्रमितवाच्यश्च। द्वितीयस्य द्वौ भेदौ– अलक्ष्यक्रमोऽनुरणनरूपश्च। प्रथमोऽनन्तभेदः। द्वितीयो द्विविधः – शब्दशक्तिमूलोऽर्थशक्तिमूलश्च। पश्चिमस्त्रिविधः – कविप्रौढोक्तिकृतशरीरः कविनिबद्धवक्तृप्रौढोक्तिकृतशरीरः स्वतस्सम्भवी च। ते च प्रत्येकं व्यङ्ग्यव्यञ्जकयोरुक्तभेदनयेन चतुर्धेति द्वादशविधोऽर्थशक्तिमूलः। आद्याश्चत्वारो भेदा इति षोडश मुख्यभेदाः। ते च पदवाक्यप्रकाशत्वेन प्रत्येकं द्विविधा वक्ष्यन्ते। अलक्ष्यक्रमस्य तु वर्णपदवाक्यसङ्घटनाप्रबन्धप्रकाश्यत्वेन पञ्चत्रिंशद्भेदाः।

तदाभासेभ्यो ध्वन्याभासेभ्यो विवेको विभागः। अस्येत्यात्मभूतस्य ध्वनेरसौ काव्यविशेषो न गोचरः, न विषय इत्यर्थः।

कमलाकरा न मर्दिता हंसा उड्डायिता न च सहसा।
केनापि ग्रामतडागेऽभ्रमुत्तानितं क्षिप्तम्॥ इति च्छाया।

अन्ये तु पिउच्छा पितृष्वसः इत्यमामन्त्र्यते। केनापि अतिनिपुणेन। वाच्याङ्गत्वमेवेति। वाच्येनैव हि विस्मयविभावरूपेण मुग्धमातिशयः प्रतीयत इति वाच्यादेव चारुत्वसम्पत्। वाच्यं तु स्वात्मोपपत्तयेऽर्थान्तरं स्वोपकारवाञ्छया व्यनक्ति।

वेतसलतागहनोड्डीनशकुनिकोलाहलं शृण्वत्याः।
गृहकर्मव्यापृताया वध्वाः सीदन्त्यङ्गानि॥ इति च्छाया।

अत्र दत्तसङ्केतचौर्यकामुकरतसमुचितस्थानप्राप्तिर्व्यंग्यमाना वाच्यमेवोपस्कुरुते। तथा हि गृहकर्मव्यापृताया इत्यन्यपराया अपि, वध्वा

इति सातिशयलज्जापारतन्त्र्यबद्धाया अपि, अङ्गानीत्येकमपि न तादृगङ्गं यद्गाम्भीर्यावहित्थवशेन संवरीतुं पारितम्, सीदन्तीत्यास्तां गृहकर्मसम्पादनं स्वात्मानमपि धर्तुं न प्रभवन्तीति। गृहकर्मयोगेन स्फुटं तथा लक्ष्यमाणानीति। अस्मादेव वाच्यात्सातिशयमदनपरवशताप्रतीतेश्चारुत्वसम्पत्तिः। यत्र त्विति। प्रकरणमादिर्यस्य शब्दान्तरसन्निधानसामर्थ्यलिङ्गादेस्तदवगमादेव यत्रार्थो निश्चितसमस्तस्वभावः। पुनर्वाच्यः पुनरपि स्वशब्देनोक्तोऽत एव स्वात्मावगतेः सम्पन्नपूर्वत्वादेव तावन्मात्रपर्यवसायी न भवति तथाविधश्च प्रतीयमानस्याङ्गतामेतीति सोऽस्य ध्वनेर्विषय इत्यनेन व्यङ्ग्यतात्पर्यनिबन्धनं स्फुटं वदता व्यङ्ग्यगुणीभावे त्वेतद्विपरीतमेव निबन्धनं मन्तव्यमित्युक्तं भवति।

उच्चिनु पतितकुसुमं मा धुनीहि शेफालिकां हालिकस्नुषे।

एष ते विषमविपाकः श्वशुरेण श्रुतो वलयशब्दः॥ इति च्छाया।

यतः श्वशुरः शेफालिकालतिकां प्रयत्नेन रक्षंस्तस्या आकर्षणधूननादिना कुप्यति, तेनात्र विषमपरिपाकत्वं मन्तव्यम्। अन्यथा स्वोक्त्यैव व्यङ्ग्याक्षेपः स्यात्। अत्र च 'कस्स वा ण होइ रोसो' इत्येतदनुसारेण व्याख्या कर्तव्या। वाच्यार्थस्य प्रतिपत्तये लाभाय एतद्व्यङ्ग्यमपेक्षणीयम्। अन्यथा वाच्योऽर्थो न लभ्येत। स्वलस्सिद्धतया अवचनीय एव सोऽर्थः स्यादिति यावत्। नन्वेवं व्यङ्ग्यस्योपस्कारकता प्रत्युतोक्ता भवेदित्याशङ्क्याह – प्रतिपन्ने चेति। शब्देनोक्त इति यावत्॥ ३१॥

लोचन

याप्रमाणे-- ध्वनीचे मुख्य प्रकार दोन:—(१) अविवक्षितवाच्य आणि (२) विवक्षितान्यपरवाच्य. यांपैकी पहिल्या मुख्य प्रकाराचे दोन (उप) प्रकार–(१) अत्यन्ततिरस्कृतवाच्य आणि (२) अर्थान्तरसंक्रमितवाच्य. दुसऱ्या मुख्य प्रकारचे दोन (उप) प्रकार म्हणजे (१) अलक्ष्यक्रमव्यङ्ग्य (२) अनुरणनरूपव्यङ्ग्य. यांतील पहिल्या म्हणजे अलक्ष्यक्रमव्यङ्ग्य प्रकाराचे पोटप्रकार असंख्य आहेत.[८] दुसऱ्या म्हणजे अनुरणनरूपव्यङ्ग्य प्रकाराचे दोन पोटप्रकार :— (१) शब्दशक्तिमूल (२) अर्थशक्तिमूल. हा दुसरा म्हणजे अर्थशक्तिमूल प्रकार पुन्हा तीन प्रकारचा :— (१) कवीच्या कल्पनासृष्टीतच संभवणारा वाच्यार्थ

असलेला, (२) कविनिर्मित पात्राच्या कल्पनासृष्टीत संभवणारा वाच्यार्थ असलेला आणि (३) स्वत: लौकिक सृष्टीत संभवणारा वाच्यार्थ असलेला. या तीन प्रकारांपैकी प्रत्येकाचे, व्यंग्यार्थ व व्यंजक अर्थ यांचे जे (वस्तुस्वरूपी असणे व अलंकारस्वरूपी असणे हे) भेद वर सांगितले, तदनुसार चार चार प्रकार होऊन अर्थशक्तिमूलाचे एकूण बारा प्रकार होतात. यांत प्रारंभीचे चार[९] प्रकार मिळवले की, ध्वनीचे एकूण सोळा प्रकार होतात. तेही (१) पदाच्या द्वारे प्रकाशित होणारा व (२) वाक्याच्या द्वारे प्रकाशित होणारा असे प्रत्येकी दोन प्रकारचे आहेत, असे पुढे[१०] सांगितले जाईल. अलक्ष्यक्रमव्यंग्य हा प्रकार मात्र वर्णामुळे प्रकट होणारा, पदातून, वाक्यातून, संघटनेतून व प्रबंधातून प्रकट होणारा असू शकतो, म्हणून ध्वनि एकूण पस्तीस प्रकारचा[११] होतो. 'त्याच्या आभासांहून' म्हणजे ध्वनीच्या आभासांहून.[१२] 'विवेक' म्हणजे विभाग म्हणजे वेगळेपणा. 'याच्या' म्हणजे काव्याचा आत्मा असलेल्या (म्हणजेच) व्यंग्यार्थ ज्यात प्रधानत्वाने व स्पष्टपणे सुचविला गेला आहे अशा ध्वनीच्या क्षेत्रात तो काव्यप्रकार येऊ शकत नाही, म्हणजे तो काव्यप्रकार ध्वनीचा विषय होऊ शकत नाही.

'कमळांचे ताटवे' इ.—पण दुसरे (टीकाकार) सहसा याऐवजी **पिउच्छा** असा पाठ घेऊन 'आत्या!' या अर्थाचे हे संबोधन आहे असे मानितात. 'कोणीतरी' म्हणजे कोणातरी अतिशय कुशल मनुष्याने. 'वाच्यार्थापेक्षा गौणच'—कारण येथे (वाचकांना वाटणाऱ्या) विस्मयाचा विभाव (म्हणजे कारण) असलेला नायिकेचा कमालीचा भोळसटपणा वाच्यार्थामुळेच वाचकांच्या ध्यानात येतो म्हणून वाच्यार्थामुळेच[१३] या काव्याला सौंदर्य प्राप्त झाले आहे.[१४] वाच्यार्थ मात्र स्वतःच्या सिद्धीसाठी आपल्याला कोणीतरी मदतीचा हात द्यावा या इच्छेने दुसरा अर्थ सूचित करितो.[१५] 'वेताच्या वेलींच्या जाळीतून'—प्रस्तुत गाथेतून (नायिकेने) ज्याला भेटीची वेळ दिली होती, तो चोरून प्रेम करणारा प्रियकर रममाण होण्याच्या उचित स्थळी (दिलेल्या वेळी) आला आहे, असा अर्थ सूचित होतो. पण तो सूचित अर्थ ('उडून जाणाऱ्या पक्ष्यांचा किलबिलाट ऐकून सुनेची गात्रे ढिली पडतात' या) वाच्यार्थाचेच सौंदर्य वाढविणारा आहे.[१६] म्हणजे असे की, (नायिका) घरकामात गुंतलेली

म्हणजे (प्रियकराच्या भेटीच्या चिंतनाखेरीज) दुसऱ्याच उद्योगात मग्न झालेली असूनही; सून म्हणजे अत्यंत लज्जा व पराधीनता यांमुळे जखड-लेली असूनही; 'गात्रे' असे बहुवचन वापरण्यातील व्यंग्य हेतु असा की, तिचा एकसुद्धा अवयव असा नव्हता की, ज्या अवयवाला गंभीरपणामुळे आणि आपले भाव शरीरावर प्रकट होऊ न देण्याच्या प्रयत्नांमुळे ती शौण्डस्फोट करू देण्यापासून परावृत्त करू शकली; 'ढिली पडतात' म्हणजे घरकाम पार पाडणे तर दूरच राहू द्या, पण त्या अवयवांना स्वतःचे शरीर देखील सावरून धरणे अशक्य झाले; घरकामात गुंतलेले असले, तरी[17] अवयव तसे म्हणजे निर्जीव झालेले स्पष्टपणे दिसून येत होते; याच म्हणजे (व्यंग्यार्थाच्या छटांनी सजलेल्या) वाच्यार्थामुळे ती मदनबाधेने कमालीची पीडित झाल्याचे वाचकाच्या लक्षात येते व म्हणून त्या वाच्यार्थामुळेच या काव्याला सौंदर्य प्राप्त झालेले आहे.[18]

'मात्र (त्यांपैकी) ज्या उदाहरणात'— संदर्भ वगैरे म्हणजे (१) संदर्भ, (२) प्रसिद्ध अर्थ असलेला दुसरा शब्द जवळच वापरलेला असणे, (३) उत्पादकत्व, (४) असाधारणधर्म इत्यादींचे ज्ञान झाल्या-मुळेच जेथे वाक्याच्या संपूर्ण अर्थाचे निश्चित स्वरूप ध्यानात आलेले असते.[19] पण वाच्य अर्थ जेथे आपल्या वाचक शब्दांनी सांगितला जात असल्यामुळे त्याच्या स्वरूपाचा बोध आधीच झालेला असतो, तेथे तो वाच्यार्थ आपले कार्य तेवढ्यावरच संपवीत नाही, तर पुन्हा व्यंग्यार्थाचे अंग होतो म्हणून तो तशा प्रकारचा वाच्यार्थ या (म्हणजे अनुरणनरूप) ध्वनीच्या क्षेत्रात येतो, असे म्हणून वृत्तिकारांनी या वाक्याच्या द्वारे असे म्हटले आहे की, अनुरणनरूप ध्वनीमध्ये वाच्यार्थाचे (सरते शेवटी) व्यंग्यार्थातच पर्यवसान होते. आणि त्यामुळे त्यांनी असे सुचविले आहे की व्यंग्य अर्थ जेथे वाच्यार्थाला गुणीभूत असतो, त्या उदाहरणात ध्वनिकाव्यातील परिस्थितीच्या उलट परिस्थिति[20] असते, असे समजावे. 'हे शेतकऱ्याच्या सूनबाई—' ज्या अर्थी मामंजी शेफालिका-वेलीची परिश्रम करून निगा राखतात व म्हणूनच त्या वेलीला कोणी ओढले किंवा जोराने हलविले तर रागावतात, त्या अर्थी (सूनबाईच्या कंकणांचा आवाज त्यांच्या कानी पडल्याचा) परिणाम फार वाईट होणार आहे, असे म्हटले आहे हे ध्यानात घ्यावे. तसे नसते, तर[21] व्यंग्यार्थ स्व-

शब्दांनी वाच्यच करून टाकल्यासारखा होईल. येथें पृ. ११८ वरील 'आपल्या प्रियेच्या अधरोष्ठावर ' इ. गाथेच्या बाबतीत आम्ही ज्या पद्धतीने विवरण केले, त्याच पद्धतीने विवरण करावे.[१२] वाच्यार्थ नीट-पणें समजण्यासाठी हा व्यंग्यार्थ[२३] माहीत होणे अवश्य आहे. हा व्यंग्यार्थ वाचकाला समजला नाही, तर वाच्यार्थ सुसंगत वाटणार नाही, कारण वेल हलवलेली सासऱ्याला आवडत नाही ही गोष्ट सुनेला आधीच माहीत असल्यामुळे तीच गोष्ट सखीने तिला पुन्हा ऐकविण्याची जरूर वाटत नाही. व म्हणून वाच्यार्थाची संगति लागत नाही.

'पण काय हो, येथे जर तुम्ही म्हटल्याप्रमाणे व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाच्या समर्थनासाठी खर्ची पडत असेल, तर तो व्यंग्यार्थ उलट वाच्यार्थाचेच अंग आहे असे म्हटल्यासारखे होईल. ' अशी शंका कल्पून वृत्तिकार ' पण वाच्यार्थ पूर्णपणें समजल्यावर ' इ. वाक्याने त्या शंकेला उत्तर देतात. ' समजल्यावर ' म्हणजे वाचक शब्दांमुळे ध्यानात आल्यावर. ।। ३१ ।।

टीपा

१. याच्या उदाहरणासाठी पाहा. काव्यप्रकाश, उल्लास ५, ' अदृष्टे दर्शनोत्कण्ठा ' ...इ. श्लोक.

२. ' गाथासप्तशती ', २–१०.

३. ' तिने आभाळाचे प्रतिबिंब पाहिले. ' या व्यंग्यार्थापेक्षा ' आभाळ कोणीतरी उताणे करून पाण्यात फेकून दिलेले दिसते ' ही तिची अगदीच भोळी समजूत होणे व ती तिने बोलून दाखविणे हेच अधिक चमत्कृतिपूर्ण वाटते; कारण वाच्यार्थामुळेच तिचा पराकाष्ठेचा भोळेपणा प्रकट होतो.

४. ' आधी संकेत केल्याप्रमाणे तिचा प्रियकर त्या वेलींच्या जाळीत आला आहे ' या व्यंग्यार्थापेक्षा तो आल्याचे लक्षात येताच तिची झालेली अवस्था सांगणारा वाच्यार्थच अधिक चमत्कृतिपूर्ण आहे. त्या वाच्यार्थामुळेच तिची कमालीची मदनपरवशता (इतकी की, पक्ष्यांचा आवाज ऐकल्यावर घरकामात वगैरे लक्ष लागणे तर राहूच द्या, पण तिच्या अवयवांचा स्वतःवरही ताबा उरत नाही) सूचित होत आहे व तीच चमत्कारजनक आहे.

' तिची गात्रे ढिली पडतात ' या वाच्यार्थाचे कारण समजण्यासाठीही वरील व्यंग्यार्थ कळणे आवश्यक असल्याने तो व्यंग्यार्थ वाच्यार्थसिद्धीचे अंग आहे व म्हणूनही तो गौण आहे.

ही गाथा परंपरागत गाथासप्तशतीतली नाही, पण जर्मन पंडित 'वेबर' याने संपादिलेल्या गाथासप्तशतीमध्ये या गाथेचा समावेश ८७४ या क्रमांकाने केला आहे

५. उद्द्योत ३ रा, कारिका ३४ पाहा.

६. हीही गाथा परंपरेतील नसून वेबरच्या आवृत्तीत ९५९ या क्रमांकाने उद्धृत केलेली आढळते.

७. शेफालिका लता मामंजींची अतिशय आवडती, म्हणून ते तिची विशेष परिश्रम घेऊन निगा राखतात. ती लता कोणी जोराने हलवलेली त्यांना खपत नाही. नायिकेच्या कंकणांच्या आवाजामुळे तिने ती वेल हलवली हे त्यांना कळून ते तिच्यावर रागावतील ही गोष्ट नायिकेला माहीत असताना माहीत असलेलीच गोष्ट सखी तिला पुन्हा कशाला सांगते आहे? तर कंकणध्वनीमुळे तिचे दुर्वर्तन उघडकीला येण्याचा संभव आहे, म्हणून ती सखी वरीलप्रमाणे बोलून तिला जागे करीत आहे, हा व्यंग्यर्थ वाच्यार्थाची गति लागण्यासाठी आवश्यक असल्यामुळे वाच्यार्थाचे अंग आहे. पण वाच्यार्थ संपूर्णपणे समजल्यावर मागाहून, मैत्रिणीने केवळ तिचे रक्षण करण्यासाठी हे शब्द उच्चारले आहेत, तिच्या अविनयाची कोणास शंका येऊ नये म्हणून उच्चारले आहेत, हे लक्षात घेतल्यावर तिने शेफालिका हलविल्यामुळेच तिच्या कंकणांचा आवाज झाला असाच सर्वांचा समज व्हावा हा व्यंग्यार्थ मुख्य आहे आणि वाच्यार्थ त्याचे अंग आहे, हे स्पष्ट होते.

८. पाहा, कारिका २–१२ व तीवरील वृत्ति.

९. म्हणजे अर्थशक्तिमूल ध्वनीचे बारा प्रकार व अत्यंततिरस्कृतवाच्य, अर्थान्तरसंक्रमितवाच्य, अलक्ष्यक्रमव्यंग्य व शब्दशक्तिमूल अनुकरणरूपव्यंग्य हे चार प्रकार मिळून एकूण १६ प्रकार.

ध्वनीचे एकूण प्रकार सांगताना शब्दशक्तिमूल ध्वनीचा एकच (अलंकारध्वनि हा) प्रकार अभिनवगुप्तांनी सांगितला आहे. या संदर्भात पृ. ४६९ वरील १ ली टीप पाहा. त्यावरून शब्दशक्तिमूल ध्वनीचा 'वस्तु' हा प्रकार आनंदवर्धनांना मुद्दाम सांगावासा वाटला नाही तरी मान्यच नव्हता असे दिसत नाही. त्यामुळे त्याही प्रकाराचा अभिनवगुप्तांनी उल्लेख केला असता तर बरे झाले असते. २३ व्या कारिकेनंतर वृत्तीमध्ये शब्दशक्त्या आक्षिप्तः व्यङ्ग्यः अर्थः असे म्हटले आहे, व्यङ्ग्यः अलंकारः असे म्हटले नाही, त्यावरूनही शब्दशक्तिमूल वस्तुध्वनि आनंदवर्धनांना सर्वथैव अमान्य होता असे म्हणता येत नाही.

१०. 'पुढे' म्हणजे उद्द्योत ३, कारिका १ आणि तीवरील वृत्तीमध्ये.

११. अलक्ष्यक्रमव्यंग्याचे हे पाच प्रकार उद्द्योत ३, कारिका २ व तीवरील वृत्तीमध्ये सांगितले आहेत. या पाच प्रकारांपैकी पदप्रकाश व वाक्यप्रकाश हे दोन

पहिल्या बत्तीसांमध्ये येऊन गेले असल्यामुळे वर्ण, संघटना व प्रबंध यांतून प्रकाशित होणारे तीन प्रकार ह्या ३२ प्रकारांत मिळविले की एकूण ३५ प्रकार होतात.

१२. ध्वनीचा आभास म्हणजे ध्वनीसारखा वाटणारा (व्यंग्य अर्थ), पण अस्सल 'ध्वनि' नसणारा. 'हेत्वाभास' जसा हेतूसारखा भासतो, पण 'सद् हेतु' नसतो, तसा. म्हणजे अशा ठिकाणी व्यंग्यार्थ हा प्रधान असत नाही, तर तो गुणीभूत असतो. या 'गुणीभूतव्यंग्य' काव्याचे दोन प्रकार म्हणजे (१) व्यंग्यार्थ प्रश्लिष्ट म्हणजे अस्फुट असणे व (२) व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाचे अंग असणे. मम्मटाने काव्यप्रकाशातील तिसऱ्या उल्लासाच्या एक व दोन या कारिकांमध्ये गुणीभूतव्यंग्याचे जे एकूण आठ प्रकार सांगितले, त्यांपैकी पुढील पाच प्रकार ध्वन्यालोकात व लोचनात येऊन गेले आहेत :--१. अस्फुटव्यंग्य, २. अपराङ्गव्यंग्य, ३. तुल्यप्राधान्यव्यंग्य, ४. वाच्यसिद्ध्यङ्ग॰ व्यंग्य व ५. असुन्दरव्यंग्य.

१३. म्हणजे येथे विस्मय हा व्यभिचारिभाव प्रामुख्याने सूचित होत असल्याने हा भावध्वनि आहे हे सांगणे हा या ठिकाणी अभिनवगुप्तांचा उद्देश नाही. तर (नायिकेला ढगाचे प्रतिबिंब दिसले) या व्यंग्यार्थापेक्षा वाच्यार्थ हाच विस्मय या व्यभिचारिभावाच्या अभिव्यक्तीला अधिक उपकारक असल्यामुळे वाच्यार्थ येथे व्यंग्यार्थापेक्षा प्रधान आहे एवढेच त्यांना दाखवावयाचे आहे. अर्थात् या गुणीभूतव्यंग्य प्रकाराचे शेवटी भावध्वनीमध्ये पर्यवसान होते, हा भाग निराळा. (पाहा, उद्द्योत ३. कारिका ४०).

१४. पाहा, उद्द्योत १, पृ. १८३ वरील 'वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांतील कोणता अर्थ' इ. वाक्य व उद्द्योत २, कारिका ३० चा उत्तरार्ध.

१५. व्यंग्यार्थ वाच्यार्थापेक्षा असुंदर असल्यामुळेही हे पद्य गुणीभूतव्यंग्याचे आहे हे आनंदवर्धन स्पष्ट करितात.

१६. उपस्कार्य हा उपस्कारकापेक्षा प्रधान, म्हणून येथे वाच्यार्थ हा प्रधान व व्यंग्यार्थ हा अप्रधान होय.

१७. मुळात गृहकर्मयोगेन असे असले तरी त्यानंतर अपि या शब्दाची भर घालून आम्ही अनुवाद केला आहे.

१८. या गाथेमधून दोन प्रकारचे व्यंग्यार्थ प्रतीत होतात :– १ 'सुनेची', 'गात्रे' इ. सुट्या शब्दांतून प्रकट होणारे व्यंग्यार्थ व २. सबंध गाथेतून प्रकट होणारा 'प्रियकर संकेतस्थळी येऊन पोहोचला आहे' हा. हे दोन्ही प्रकारचे व्यंग्यार्थ 'वस्तु' स्वरूपाचे आहेत. त्या सर्वांमुळे 'सुनेची गात्रे ढिली पडतात' या वाच्यार्थाचेच सौंदर्य वाढविले जात आहे, म्हणून येथील व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाला गुणीभूत झालेला आहे. शिवाय 'पक्ष्यांचा किल-

किलाट ऐकून सुनेची गात्रे ढिली पडतात' हा वाच्यार्थ प्रथमदर्शनी विसंगत वाटतो, पण 'प्रियकर संकेतस्थळी येऊन पोहोचला आहे' या व्यंग्यार्थामुळे तो वाच्यार्थ सुसंगत होतो, म्हणून हे वाच्यसिद्ध्यंगव्यंग्य गुणीभूतव्यंग्याचे उदाहरण आहे.

१९. कोणत्याही वाक्याचा वाच्यार्थ कोणता, हे निश्चित करण्यासाठी कोणकोणती कारणे उपयोगी पडतात, हे भर्तृहरीने 'वाक्यपदीया'त २– ३१७ व ३१८ या श्लोकांमध्ये सांगितले आहे. हे श्लोक मम्मटाने 'काव्यप्रकाशात (झळकीकर आवृत्ति, पृ. ६३–६४ वर) उद्धृत केले आहेत.

२०. म्हणजे या प्रकारात व्यंग्यार्थाचे वाच्यार्थात पर्यवसान होते.

२१. तसे नसते तर म्हणजे शेफालिकेला हलविल्यामुळे होणाऱ्या कंकणांच्या आवाजाला वाईट परिणाम घडवून आणणारा न मानिता प्रियकराबरोबरच्या प्रणयक्रीडेमुळे झालेल्या कंकणांच्या आवाजालाच वाईट परिणाम घडवून आणणारा मानिला, तर 'सूनबाईचे दुर्वर्तन' हा व्यंग्यार्थ वाच्य करून उघड केला, असे होईल.

२२. पूर्वीच्या (म्हणजे 'आपल्या प्रियेच्या अधरोष्ठावर' इ.) गाथेचा वाच्यार्थ जरी एकाच व्यक्तीला उद्देशून व एकाच प्रकारचा असला, तरी व्यंग्यार्थ सहा निरनिराळ्या व्यक्तींना उद्देशून व सहा निरनिराळ्या प्रकारांचा आहे असे दाखविले होते. त्याचप्रमाणे येथेही व्यंग्यार्थ निरनिराळ्या प्रकारचा व निरनिराळ्या व्यक्तींना उद्देशून आहे, असे दाखविता येईल असे अभिनवगुप्तांचे म्हणणे.

२३. हा व्यंग्यार्थ म्हणजे 'तुझ्या कंकणांच्या आवाजामुळें तुझ्या दुर्वर्तनाची शंका तुझ्या मामंजींना येईल, म्हणून कंकणांचा आवाज होऊ देऊ नकोस' हा.

ध्वन्यालोकः

एवं विवक्षितवाच्यस्य ध्वनेस्तदाभासविवेके प्रस्तुते सत्यविवक्षितवाच्यस्यापि तं कर्तुमाह

अव्युत्पत्तेरशक्तेर्वा निबन्धो यः स्खलद्गतेः ।
शब्दस्य स च न ज्ञेयः सूरिभिर्विषयो ध्वनेः ॥ ३२ ॥

स्खलद्गतेरुपचरितस्य शब्दस्याव्युत्पत्तेरशक्तेर्वा निबन्धो यः स च न ध्वनेर्विषयः । यतः —

सर्वेष्वेव प्रभेदेषु स्फुटत्वेनावभासनम् ।
यद्व्यङ्ग्यस्याङ्गिभूतस्य तत्पूर्णं ध्वनिलक्षणम् ॥ ३३ ॥

तच्चोदाहृतविषयमेव ॥

इति श्रीराजानकानन्दवर्धनाचार्यविरचिते ध्वन्यालोके द्वितीय उद्द्योतः ॥

ध्वन्यालोक

अशा रीतीने वाच्यार्थ विवक्षित असलेल्या ध्वनीचे स्वरूप त्याच्या आभासाहून वेगळे आहे याचे प्रतिपादन करणे प्रस्तुत असताना ' अविवक्षित-वाच्य ' ध्वनिदेखील त्याच्या आभासाहून वेगळा आहे हे दाखविण्यासाठी सांगण्यात येत आहे की —

शब्दार्थ वगैरेंबाबत पुरेसे शिक्षण नसल्याने किंवा प्रतिभा नसल्याने एखाद्याकडून लाक्षणिक शब्दाचा उपयोग केला गेला, तर जाणत्यांनी ते ध्वनीचे उदाहरण समजू नये ॥ ३२ ॥

अनुप्रास वगैरे वापरण्याच्या नादामुळे किंवा प्रतिभा नसल्यामुळे ज्याचा वाच्यार्थ अडतो अशा, म्हणजे लाक्षणिक शब्दाचा एखाद्या ( कवी ) ने वापर केला, तर ते ' ध्वनी ' चे उदाहरण नव्हे, कारण —

व्यंग्यार्थाच्या सर्व प्रकारांत तो व्यंग्यार्थ ' अंगी ' असणे व तो स्पष्टपणे प्रकाशित होणे हे ' ध्वनी 'चे संपूर्ण स्वरूप होय. ॥ ३३ ॥

आणि ध्वनीच्या या स्वरूपाची उदाहरणे आतापर्यंत दिलीच आहेत.

अशा रीतीने श्री राजानक आनन्दवर्धनाचार्यांनी रचलेल्या ' ध्वन्या-लोका ' मधील दुसरा उद्द्योत समाप्त झाला.

लोचनम्

तदाभासविवेके प्रस्तुत इति सप्तमी हेतौ । तदाभासविवेकलक्षणात् प्रसङ्गादिति यावत् । कस्य तदाभास इत्यपेक्षायामाह – विवक्षितवाच्य-स्येति । स्पष्टे तु व्याख्याने प्रस्तुत इत्यसङ्गतम् । परिसमाप्तौ हि विवक्षिताभिधेयस्य तदाभासविवेकः । न ह्यधुना प्रस्तुतः । नाप्युत्तर-कालमनुबध्नाति । स्खलद्गतेरिति । गौणस्य लाक्षणिकस्य वा शब्दस्येत्यर्थः । अव्युत्पत्तिरनुप्रासादिनिबन्धनतात्पर्यप्रवृत्तिः । यथा–

प्रेङ्खत्प्रेमप्रबन्धप्रचुरपरिचये प्रौढसीमन्तिनीनां
चित्ताकाशावकाशे विहरति सततं यः स सौभाग्यभूमिः ॥

अत्रानुप्रासरसिकतया प्रेङ्खदिति लाक्षणिकः, चित्ताकाश इति

गौणः प्रयोगः कविना कृतोऽपि न ध्वन्यमानरूपसुन्दरप्रयोजनांशपर्यवसायी। अशक्तिर्वृत्तपरिपूरणाद्यसामर्थ्यम्। यथा—

विषमकाण्डकुटुम्बकसञ्चयप्रवर वारिनिधौ पतता त्वया।
चलतरङ्गविघूर्णितभाजने विचलतात्मनि कुड्यमये कृता॥

अत्र प्रवरान्तमाद्यपदं चन्द्रमस्युपचरितम्। भाजनमित्याशये, कुड्यमय इति चाविचले। अत्रैतत्कामपि कान्तिं न पुष्यति, ऋते वृत्तपूरणात्।

स चेति। प्रथमोद्द्योते यः 'प्रसिद्ध्यनुरोधप्रवर्तितव्यवहाराः कवयः' इत्यत्र 'वदति बिसिनीपत्रशयनम्' इत्यादिभक्ति उक्तः। स न केवलं ध्वनेर्न विषयो यावदयमन्योऽपीति चशब्दार्थः। उक्तमेव ध्वनिस्वरूपं तदाभासविवेकहेतुतया कारिकाकारोऽनुवदतीत्यभिप्रायेण वृत्तिकृद् उपस्कारं ददाति – यत्त इति। अवभासनमिति। भावानयने द्रव्यानयनमिति न्यायादवभासमानं व्यङ्ग्यम्। ध्वनिलक्षणं ध्वनेः स्वरूपं पूर्णम्। अवभासमानं वा ज्ञानं तद्ध्वनेर्लक्षणं प्रमाणम्, तच्च पूर्णम्, पूर्णध्वनिस्वरूपनिवेदकत्वात्। अथवा ज्ञानमेव ध्वनिलक्षणम्, लक्ष्यस्य ज्ञानपरिच्छेद्यत्वात्। वृत्तावेवकारेण ततोऽन्यस्य चाभासरूपत्वमेवेति सूचयता तदाभासविवेकहेतुभावो यः प्रक्रान्तः स निर्वाहित इति शिवम्।

प्राज्यं प्रोल्लासमात्रं सद्भेदेनासूत्र्यते यया।
वन्देऽभिनवगुप्तोऽहं पश्यन्तीं तामिदं जगत्॥

इति श्रीमहामाहेश्वराचार्यवर्याभिनवगुप्तोन्मीलिते सहृदयालोकलोचने ध्वनिसङ्केते द्वितीय उद्द्योतः॥

लोचन

तदाभासविवेके प्रस्तुते यातील सप्तमी 'निमित्त' वाचक आहे. ध्वनीच्या आभासांहून ध्वनि वेगळा कसा हे दाखविणे हा चालू प्रतिपाद्य विषय असल्यामुळे, हा अर्थ. 'आता कोणाचा ध्वनीच्या आभासांहून वेगळेपणा दाखविण्यात येणार आहे ?' अशी शंका कोणी घेतल्यास तिचे उत्तर वृत्तिकार 'विवक्षितवाच्यध्वनीचा' (त्याच्या आभासांपासून वेगळेपणा)' इ. वाक्याने देतात. कारण 'प्रस्तुत' शब्दाचा नेहमीचा (म्हणजे 'आता आरंभ केलेला' असा) अर्थ केल्यास 'प्रस्तुत'

हे विशेषण येथे जुळणार नाही. कारण विवक्षितवाच्याचे निरूपण संपतेवेळीच त्याचा ध्वनीच्या आभासांहून वेगळेपणा दाखविला गेला. आता त्याचे निरूपण पुन्हा चालू केलेले नाही किंवा ते निरूपण वृत्तिकार यानंतर करणार आहेत, असेही नाही ' लाक्षणिक शब्दाचा '— गौणी म्हणजे सादृश्य संबंधावर आधारलेल्या किंवा लाक्षणिक म्हणजे सादृश्येतर संबंधावर आधारलेल्या लक्षणेने युक्त असलेल्या शब्दाचा असा अर्थ. ' पुरेसे शिक्षण नसणे ' म्हणजे अनुप्रास वगैरे योजण्याचा हव्यास बाळगून काव्य रचावयास प्रवृत्त होणे, उदा.

" झोके घेणाऱ्या प्रेमाच्या प्रवाहाचा ज्यांना पुष्कळ अनुभव आहे अशा प्रौढ स्त्रियांच्या चित्तरूपी आकाशाच्या पोकळीमध्ये जो सतत विहार करीत असतो, तोच खरे सौभाग्याचे म्हणजे मोहकपणाचे माहेरघर होय. "

या पद्यात कवि केवळ अनुप्रासाच्या नादी लागल्यामुळे त्याने प्रेङखत् (म्हणजे झोके घेणारे) हा लाक्षणिक (म्हणजे सादृश्येतर संबंधावर आधारलेल्या लक्षणेने युक्त) शब्द योजिला असला व ' चित्ता-काश ' हा शब्द गौणी (म्हणजे सादृश्यमूलक) लक्षणेने युक्त वापरला असला, तरी त्या शब्दांचे पर्यवसान सुंदर असे काही प्रयोजन सूचित करण्यात होत नाही.[२] ' प्रतिभा नसणे ' म्हणजे वृत्त पूर्ण करणे वगैरेंचे सामर्थ्य नसणे. उदा. —

' ज्याच्या बाणांची संख्या विषम आहे, अशा मदनाच्या नातेवाईक मंडळीत प्रमुख असणाऱ्या ( हे चन्द्रा ) ! तू चंचल लहरींच्या तांडव-नृत्याचे निवासस्थान असलेल्या समुद्रात ( प्रतिबिंबरूपाने ) प्रवेश केलास, त्यावेळी तू कुडाच्या भिंतींच्या म्हणजे स्थिर असलेल्या आपल्या स्वतःच्या शरीरात चंचलता निर्माण केलीस ! '

येथे ' प्रमुख असणाऱ्या ' हे शब्द ज्याच्या शेवटी आहेत असे पहिले (सामासिक) पद लक्षणेने ' चन्द्र ' या अर्थाचा बोध करून देते. तसेच मुळातला (भांडे या अर्थाचा) ' भाजन ' हा शब्द लक्षणेने 'आश्रय' या अर्थी व ' कुडाच्या भिंतींच्या ' हे विशेषण लक्षणेने ' स्थिर असणाऱ्या' या अर्थी योजिले आहे. पण या पद्यात या शब्दप्रयोगांमुळे काहीही सौंदर्यनिष्पत्ति होत नाही.[३] त्या शब्दांचा फक्त वृत्त जुळवावयाच्याच

कामी उपयोग होत आहे.

'तर ते-' १ल्या उद्द्योतात (पृ. २५८ वर वृत्तीमध्ये) 'केवळ परंपरेला अनुसरून कवि' इ. विधानाच्या स्पष्टीकरणार्थ 'कमलिनी-पत्रांची शय्या विरहताप सांगत आहे' वगैरे जी (लाक्षणिक प्रयोगाची) उदाहरणे दिली, तीच ध्वनीच्या क्षेत्रात येणारी नसतात असे नव्हे, तर आता सांगितल्यासारखी[४] आणखीही कित्येक उदाहरणे ध्वनीत अन्तर्भूत होत नाहीत, हा 'तेही' मधील 'ही'चा अर्थ. आतापर्यंत सांगून झालेल्याच ध्वनीच्या स्वरूपाचा ध्वनीच्या आभासाहून वेगळेपणा दाखविण्या-साठी कारिकाकार त्याचा पुनरुल्लेख करीत आहेत ह्या अभिप्रायाने वृत्तिकार ३३ व्या कारिकेला 'कारण' हा शब्द प्रस्तावनेदाखल जोडीत आहेत.[५]

'एखाद्या वस्तूच्या बाबतीत क्रियेचा उल्लेख केला असताना त्या क्रियेने युक्त असलेली ती वस्तु असा अर्थ प्रकट होतो' या न्यायाने 'व्यंग्यार्थ प्रकाशित होणे' म्हणजे 'प्रकाशित होणारा व्यंग्यार्थ' 'ध्वनीचे पूर्ण लक्षण' म्हणजे ध्वनीचे संपूर्ण स्वरूप. किंवा 'प्रकाशित होणे' म्हणजे ज्ञान होणे हेच ध्वनीचे लक्षण म्हणजे त्याच्या अस्तित्वाचा पुरावा होय.[६] आणि तो पुरावा पूर्ण आहे, कारण तो ध्वनीचे स्वरूप स्पष्ट करणारा आहे. किंवा (प्रधानभूत व्यंग्यार्थाचे स्फुटत्वाने) ज्ञान हेच ध्वनीचे लक्षण होय. कारण कोणत्याही वस्तूचे ज्ञान झाले की, तिचे लक्षण (म्हणजे असाधारण धर्म) कळते. वृत्तीमध्ये ('दिलीच आहेत' या शब्दात 'च' हे जे अव्यय योजिले आहे, त्यामुळे त्याहून म्हणजे आतापर्यंत सांगितलेल्या प्रकारांहून निराळा प्रकार हा ध्वनीचा आभासच होय, असे सुचविले जात आहे. आणि त्यामुळे नुकतेच जे (ध्वनीचा) त्याच्या आभासाहून वेगळेपणा दाखविणे या विषयाचे प्रतिपादन हाती घेतले होते, तेच पूर्ण केले (असे जाणावे). असो. सर्वांचे मंगल होवो.

केवळ आनंदरूप आणि सत्तारूप आणि अनंत अशा मूळ तत्त्वाला जी वैचित्र्याची जोड देते, त्या, या जगाचे चित्र त्याच्या उत्पत्तीपूर्वीच जाणू शकणाऱ्या[७] शिवशक्तीला मी अभिनवगुप्त वन्दन करितो.

अशा रीतीने श्रीमहामाहेश्वराचार्यवर्य अभिनवगुप्तांनी उम-छविलेल्या 'सहृदयालोक' या ग्रन्थावरील ध्वनिशास्त्राचे विवरण

करणारी जी लोचनात्मक टीका, तीमधील दुसरा उद्द्योत समाप्त झाला.

**टीपा**

१. 'प्रस्तुत' याचे दोन अर्थ करिता येतील :– (१) सुरुवात करण्यात आलेला व (२) करून पूर्ण झालेला. यातला (१) हा अर्थ जास्त वापरातला, प्रसिद्ध आहे. पण तो येथे घेतला, तर जुळत नाही; कारण विवक्षितवाच्य ध्वनीचा त्याच्या आभासांहून वेगळेपणा दाखविण्याचे काम ३१ वी कारिका व तीवरील वृत्तीमध्ये पूर्ण केले गेले आहे. ते आता चालू नाही किंवा यापुढेही चालू करण्यात येणार नाही. म्हणून 'प्रस्तुत' ह्याचा दुसरा अर्थ म्हणजे 'करून पूर्ण झालेला' हाच घ्यावा, असे अभिनवगुप्तांचे म्हणणे.

२. प्रेङ्खत् याचा वाच्यार्थ आन्दोलन पावणारे, झोके घेणारे असा आहे. 'प्रेम' ही झोके घेणारी व्यक्ति असणे असंभवनीय आहे, म्हणून प्रेङ्खत् ह्याचा 'चंचल, अस्थिर' असा लक्ष्यार्थ घ्यावा लागतो. झोके घेणे व चंचल असणे यात वस्तुतः साम्य आहे, तरीही अभिनवगुप्तांनी प्रेङ्खत् हा शब्द लाक्षणिक आहे म्हणजे ही लक्षणा सादृश्येतर संबंधावर आधारलेली आहे असे का म्हणावे ते कळत नाही. दुसरे, हा शब्द कवीने केवळ अनुप्रास साधण्यासाठी वापरला, यावरून त्यामुळे काहीच चारुत्व निष्पन्न होत नाही असे म्हणता येत नाही, कारण **प्रेङ्खत्प्रेमप्रबन्धप्रचुर** ...... इ. ओळ म्हणताना प्र, प्र च्या अनुप्रासामुळे वरखाली हेलकावे चालू असल्याचा आभास उत्पन्न होतोच. प्रेमाला **प्रेङ्खत्** असे विशेषण लक्षणेने लावण्यामागे कमालीचा अस्थिरपणा सुचविणे हे प्रयोजन आहे. आता हे प्रयोजन विशेष सुंदर आहे की नाही, याबाबत भिन्न मते असू शकतील.

३. अभिनवगुप्तांच्या मते या पद्यात 'कुटुम्बक', 'भाजन' आणि 'कुड्यमय' हे तीन शब्द लाक्षणिक आहेत. त्यांचे वाच्यार्थ अनुक्रमे 'नातेवाईक मंडळी', 'भांडे' आणि 'कुडाच्या भिंतींचे' असे असून लक्ष्यार्थ (अनुक्रमे) साधनसामग्री, आश्रय व स्थिर असे आहेत. या तीन लक्षणांपैकी 'कुटुम्बक' व 'भाजन' या दोन शब्दांत लक्षणा असलीच तर ती 'रूढिमूल' आहे. तेथे काही सुंदर प्रयोजन सुचविले जाण्याचा प्रश्नच नाही. तिसऱ्या 'कुड्यमय' या शब्दातील लक्षणा मात्र प्रयोजनवती आहे आणि तिचे प्रयोजन 'कमालीचे स्थैर्य सुचविणे' हे आहे. आता ते प्रयोजन 'कुड्यमय' याच शब्दामुळे उत्तम प्रकारे व्यक्त होते किंवा नाही याबद्दल मतभिन्नता असू शकेल. मात्र हे शब्द या पद्यात केवळ वृत्त जुळविण्यासाठीच वापरले आहेत असे म्हणणे कठीण आहे.

४. आता सांगितल्यासारखी, म्हणजे व्युत्पत्ति किंवा प्रतिभा नसल्याने जेथे

लक्षणेचा अवलंब केला जातो, ती.

५. कारिका ३३ मध्ये नवीन असा काही मुद्दा सांगितलेला नाही, तर तो पूर्वी (म्हणजे कारिका १–१३ व तीवरील वृत्ति यामध्ये) सांगितलेल्या ध्वनीच्या स्वरूपाचा केवळ पुनरुच्चार आहे. पण हा पुनरुच्चार ध्वनीचा त्याच्या आभासांहून वेगळेपणा दर्शविण्यासाठी आहे.

६. म्हणजे येथे लक्ष्यते, ज्ञायते अनेन इति लक्षणम् असा अर्थ आहे. ज्याअर्थी ध्वनीचे ज्ञान होते, त्याअर्थी ध्वनि आहे. (पाहा, पृ. ७३).

७. ग्रंथील 'आनंदरूप', 'सत्तारूप' व 'जाणू शकणाऱ्या' या शब्दांनी उपनिषदामधील सत्, चित् व आनन्द ही ब्रह्माची तीन वैशिष्टये सुचविली असून 'अनन्त' या शब्दाने ब्रह्माचे अनन्तत्व सूचित केले आहे.

## प्रथम खंड समाप्त

—०—

प्रथम खंडातील

# कारिकार्धांची सूची


| | पृष्ठ |
|---|---|
| अङ्गाश्रितास्त्वलङ्कारा | ३९७ |
| अतिव्याप्तेरथाव्याप्तेः | २५७ |
| अनुस्वानोपमव्यङ्ग्यः | ५१८ |
| अपृथग्यत्ननिर्वर्त्यः | ४२९ |
| अर्थशक्तेरलङ्कारो | ५१८ |
| अर्थशक्त्युद्भवस्त्वन्यो | ४९६ |
| अर्थान्तरे संक्रमित– | ३०६ |
| अर्थोऽपि द्विविधो ज्ञेयः | ५११ |
| अलङ्कारान्तरव्यङ्ग्यभावे | ५७२ |
| अलङ्कारान्तरस्यापि | ५२४ |
| अलोकसामान्यमभिव्यनक्ति | १४६ |
| अविवक्षितवाच्यस्य | ३०६ |
| अव्युत्पत्तेरशक्तेर्वा | ५८५ |
| असंलक्ष्यक्रमोद्द्योतः | ३२७ |
| आक्षिप्त एवालङ्कारः | ४६६ |
| आलोकार्थी यथा दीप– | १५८ |
| उक्त्यन्तरेणाशक्यं यत् | २६५ |
| कस्यचिद् ध्वनिभेदस्य | २९७ |
| काले च ग्रहणत्यागौ | ४३७ |
| काव्यस्यात्मा ध्वनिरिति | १० |
| काव्यस्यात्मा स एवार्थः | १३४ |
| काव्ये तस्मिन्नलङ्कारो | ३६९ |
| केचिद्वाचां स्थितमविषये | १० |
| क्रमेण प्रतिभात्यात्मा | ४६४ |
| क्रौञ्चद्वन्द्ववियोगोत्थः | १३४ |
| चारुत्वोत्कर्षतो व्यङ्ग्य– | ५७२ |
| तत्परत्वं न वाच्यस्य | ५२४ |
| तत्र वाच्यः प्रसिद्धो यः | ७० |
| तदुपायतया, तद्वत् | १५८ |
| तद्वत्सचेतसां सोऽर्थः | १६४ |
| तद्व्यक्तिहेतू शब्दार्थौ– | ४०५ |
| तन्मयं काव्यमाश्रित्य | ३९९ |
| तमर्थमवलम्बन्ते | ३९७ |
| तस्याङ्गानां प्रभेदा ये | ४२० |
| तेऽलङ्काराः परां छायां | ५६२ |
| तेषामानन्त्यमन्योन्य– | ४२० |
| दिङ्मात्रं तूच्यते येन | ४२५ |
| ध्रुवं ध्वन्यङ्गता तासां | ५७२ |
| ध्वनेरात्माङ्गिभावेन | ३२९ |
| ध्वन्यात्मभूते शृङ्गारे यम…… | ४२७ |
| ध्वन्यात्मभूते शृङ्गारे समीक्ष्य | ४३६ |
| ध्वन्यात्मन्येव शृङ्गारे | ४१६ |
| निर्व्यूढावपि चाङ्गत्वे | ४३७ |
| प्रतीयमानं पुनरन्यदेव | ७१ |
| प्रधानेऽन्यत्र वाक्यार्थे | ३६९ |
| प्रौढोक्तिमात्रनिष्पन्नः | ५११ |
| बहुधा व्याकृतः सोऽन्यैः | ७० |
| बुद्धिरासादितालोका | ४२५ |
| बुद्धौ तत्त्वार्थदर्शिन्यां | १६४ |
| भक्त्या बिभर्ति नैकत्वं | २५४ |
| माधुर्यमार्द्रतां याति | ४०३ |
| मुख्यां वृत्तिं परित्यज्य | २७० |
| यत्तत्प्रसिद्धावयवातिरिक्तं | ७१ |
| यत्नतः प्रत्यभिज्ञेयौ | १५३ |
| यत्र प्रतीयमानोऽर्थः | ५७५ |
| यत्रार्थः शब्दो वा तमर्थ– | १६६ |
| यत्राविष्क्रियते स्वोक्त्या | ५०४ |
| यथा पदार्थद्वारेण | १६० |
| यथा व्यापारनिष्पत्तौ | १६२ |
| यदुद्दिश्य फलं तत्र | २७० |
| यद्व्यङ्ग्यस्याङ्गिभूतस्य | ५८५ |
| यस्तात्पर्येण वस्त्वन्यद् | ४९६ |

